महाराष्ट्र शासन

# महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर

# इतिहास : प्राचीन काळ (खंड १)



दर्शनिका विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई

## महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर




महाराष्ट्र शासन

# इतिहास : प्राचीन काळ (खंड १)

संपादक
डॉ. अरुणचंद्र शं. पाठक

लेखक

डॉ. शं. न. राजगुरू
डॉ. र. सु. पप्पु
डॉ. म. के. ढवळीकर
डॉ. अजय मित्र शास्त्री
डॉ. हरिहर ठोसर
डॉ. एस. जे. मंगलम्
डॉ. मालती महाजन
डॉ. अ. शं. पाठक

मुंबई
दर्शनिका विभाग
सांस्कृतिक कार्य विभाग, महाराष्ट्र शासन
२००२

महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर
इतिहास : प्राचीन काळ (खंड १)

प्रथम आवृत्ती (इंग्रजी) : १९६७
मराठी आवृत्ती (सुधारित) : २००२

किंमत रु. ३५०-००

**प्रकाशक :**

**श्री. गोविंद स्वरुप,**
अध्यक्ष, संपादक मंडळ, दर्शनिका;
प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग,
महाराष्ट्र शासन,
मुंबई



**मुद्रक :**

व्यवस्थापक,
शासकीय मुद्रणालय व लेखनसामग्री भांडार,
कोल्हापूर

**ग्रंथ मिळण्याची ठिकाणे :**

[१] शासकीय ग्रंथ भांडार, नेताजी सुभाष रोड,
मुंबई–४०० ००४

[२] शासकीय मुद्रणालय व ग्रंथ भांडार, सिव्हिल लाईन्स,
नागपूर–४४० ००१

[३] शासकीय फोटोझिंको मुद्रणालय व ग्रंथ भांडार,
पुणे–४११ ००१

[४] शासकीय मुद्रणालय व ग्रंथ भांडार,
औरंगाबाद–४३१ ००१

[५] शासकीय मुद्रणालय व लेखनसामग्री भांडार,
टाऊन हॉल गार्डन, कोल्हापूर–४१६ ००३

**[या ग्रंथातील मजकुराशी शासन सहमत असेलच असे नाही.]**

# अनुक्रमणिका



------

# आकृत्या व छायाचित्रांची यादी

सहा

**फलक**

| | | |
|---|---|---|
| सतरा | छायाचित्र ४ | : कोरीव नक्षी केलेले मणी, महापाषाणीय संस्कृती |
| | छायाचित्र ५ | : सोन्याचे अलंकार, महापाषाणीय संस्कृती |
| अठरा | आकृती १ | : विदर्भातील महापाषाणीय संस्कृतीची स्थळे |
| एकोणीस | आकृती २ | : शिलावर्तुळाचा आलेख |

**राजकीय इतिहास**

| | |
|---|---|
| वीस | प्राचीन शैलगृहे, व्यापारी मार्ग व नगरे |
| एकवीस | अ) सातवाहन राजा शिवश्री पुळुमावि याचा बनारसी लेख |
| | ब) व क) शिवश्री पुळुमावि याचा सन्नती लेख (ब्राह्मी लिपी) |
| बावीस | वाकाटक राजा द्वितीय पृथिवीषेणाचा माहुरझरी ताम्रपट, पेटीकाशीर्ष स्वरुपाची ब्राह्मी लिपी (भाषा संस्कृत) |
| तेवीस | राष्ट्रकूट राजा द्वितीय कृष्ण याच्या काळातील कंधार शिलालेख (लिपी देवनागरी, भाषा संस्कृत) |
| चोवीस | चालुक्य राजा विक्रमादित्य सहावा याचा बिमरा शिलालेख (लिपी कन्नड) |
| पंचवीस | अ) शिलाहार राजा अपराजित याचा जंजिरा ताम्रपट. दुसरा पत्रा-पहिली बाजू (लिपी देवनागरी, भाषा संस्कृत) |
| | ब) शिलाहार राजा गंडरादित्याचा शक संवत् १०३७ चा ताम्रपट. पहिला पत्रा (लिपी कन्नड, भाषा संस्कृत) |
| सव्वीस | यादव राजा रामचंद्र देव याच्या वेळचा उन्हकदेव शिलालेख |
| सत्तावीस | चांदीचे पंचमार्क्ड नाणे |
| अठ्ठावीस | यज्ञ सातकर्णीचे चांदीचे नाणे (प्रतिमायुक्त) |
| एकोणतीस | सिमुक सातवाहन याचे तांब्याचे नाणे |
| तीस | गौतमीपुत्र विळिवायकुराचे शिशाचे (लीड) नाणे |
| एकतीस | पश्चिमी क्षत्रप चष्टनाचे चांदीचे नाणे (प्रतिमायुक्त) |
| बत्तीस | पश्चिमी क्षत्रप नहपानाचे चांदीचे नाणे |
| तेहतीस | पश्चिमी क्षत्रप नहपानाचे चांदीचे नाणे (प्रतिमायुक्त) |
| चौतीस | रामचंद्र यादवाचे सुवर्ण नाणे |
| पस्तीस | सिंघणदेव यादवाचे चांदीचे नाणे |

| फलक | सांस्कृतिक इतिहास |
|---|---|
| छत्तीस | आकृती (१) अजिंठा लेणी : वाकाटककालीन केशभूषा |
| सदतीस | आकृती (२) अजिंठा लेणी : वाकाटककालीन विविध वाद्ये |
| अडतीस | आकृती (३) वेरूळ लेणी : राष्ट्रकूटकालीन केशभूषा |
| एकोणचाळीस | आकृती (४) वेरूळ लेणी : राष्ट्रकूटकालीन उपयुक्त वस्तू व वाद्ये |
| चाळीस | अ) नाणेघाट |
| | ब) यक्षमूर्ती, पितळखोरे |
| एकेचाळीस | अ) नाशिक येथील देवी लेण्याचा दरवाजा |
| | ब) अजिंठा लेणी क्रमांक २३, नागद्वारपाल |
| बेचाळीस | कार्ले, चैत्य गुंफेचा दर्शनी भाग |
| त्रेचाळीस | शिवमूर्ती, मन्सर, जि. नागपूर |
| चव्वेचाळीस | गंगेची मूर्ती, पवनार, जि. वर्धा |
| पंचेचाळीस | कंधार येथील महिषासूरमर्दिनी |
| शेहेचाळीस | नृत्य गणेश, होट्टल |
| सत्तेचाळीस | विठ्ठलमूर्ती, पंढरपूर, जि. सोलापूर |
| अट्ठेचाळीस | अ) इंद्र व सचि (अष्टदिक्पाल) |
| | ब) निरुत्ती (अष्टदिक्पाल) |
| एकोणपन्नास | अ) धर्मापुरी येथील मंदिर, जि. बीड |
| | ब) यादवकालीन मंदिर व विरगळ शिल्प |
| पन्नास | शवमंदिर, होट्टल, जि. नांदेड |

———

# लेखक परिचय

१) **डॉ. शं. न. राजगुरू** (२६ नोव्हेंबर १९३३) : अध्यापक, डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे. "पुरापर्यावरण" या क्षेत्रातील मान्यवर तज्ञ. "महाराष्ट्राचे पुरापर्यावरण" या प्रकरणाचे लेखन. २ ग्रंथ व ४०० लेख प्रकाशित.

२) **डॉ. र. सु. पप्पु** (१८ नोव्हेंबर १९३३) : प्रपाठक, डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे. प्रागैतिहास, भूपुरातत्व व पुरापर्यावरण या क्षेत्रात काम. ३ ग्रंथ व ७० शोध निबंध प्रकाशित, "अश्मयुग" या प्रकरणाचे लेखन.

३) **डॉ. म. के. ढवळीकर** (१६ मे १९३०) : संचालक, डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे. राष्ट्रीय स्तरावरील पुरातत्वज्ञ व उत्खनक. इनामगाव उत्खनन ही विशेष उल्लेखनीय बाब. एकूण २७ ग्रंथ प्रकाशित व १५० पेक्षा अधिक शोधनिबंध प्रकाशित. "ताम्रपाषाणयुग" व "महापाषाणयुग" या प्रकरणांचे लेखन.

४) **डॉ. अजय मित्र शास्त्री** (२६ फेब्रुवारी १९३४) : प्राध्यापक व विभाग प्रमुख, प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती व पुरातत्व विभाग, नागपूर विद्यापीठ. एक सर्वमान्य नाणेतज्ञ, अभिलेख अभ्यासक व भाषाप्रभू. २५ ग्रंथ व ४५० लेख प्रसिद्ध. विविध पुरस्काराने सन्मानित. मुंबई एशियाटिक सोसायटीचे जेम्स. एम. कॅम्बेल सुवर्णपदक प्राप्त. "सातवाहन राजवंश", "पश्चिमी क्षत्रप", "वाकाटक राजवंश" व "प्रारंभिक ऐतिहासिक काळ ते वाकाटक काळ : सांस्कृतिक इतिहास" या प्रकरणांचे लेखन.

५) **डॉ. हरिहर ठोसर** (१९ डिसेंबर १९३६) : प्रपाठक, इतिहास विभाग, एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई. एपिग्राफिकल सोसायटी ऑफ इंडिया ताम्रपटाने सन्मानित. १०० पेक्षा अधिक शोधनिबंध प्रकाशित. "वातापीचे चालुक्य" व "राष्ट्रकूट राजवंश" या प्रकरणांचे लेखन.

६) **डॉ. एस. जे. मंगलम्** (३० जानेवारी १९४१) : प्राध्यापक, डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे. ८ ग्रंथ व १०० लेख प्रकाशित. कल्याणीचे चालुक्य, शिलाहार राजवंश आणि देवगिरीचे यादव या प्रकरणांचे लेखन.

७) **डॉ. मालती महाजन** (३१ मार्च १९२९) : प्राध्यापिका, प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती व पुरातत्व विभाग, नागपूर विद्यापीठ. प्लेस नेम्स सोसायटी ऑफ इंडियामध्ये विशेष योगदान. ४ ग्रंथ प्रकाशित. "बदामीचे चालुक्य ते यादव काळ : सांस्कृतिक इतिहास" या प्रकरणाचे लेखन.

८) **डॉ. अरुणचंद्र शं. पाठक** (१६ सप्टेंबर १९५६) : कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, महाराष्ट्र शासन. यादव पुरातत्व यावर अभ्यास, ३० लेख प्रकाशित. "महाराष्ट्रातील बारव स्थापत्य" हे पुस्तक प्रकाशित. "प्रशासन" या प्रकरणाचे लेखन.

# प्रस्तावना

इतिहास : प्राचीन काळ या ग्रंथाचा पहिला खंड प्रकाशित करीत असताना मनस्वी आनंद होत आहे. यामध्ये प्रागैतिहासिक काळापासून ते यादव काळापर्यंतच्या राजकीय व सांस्कृतिक जीवनाचा आढावा घेतला आहे. ब्रिटिश राजवटीत बॉम्बे प्रेसिडेन्सी अंतर्गत असलेल्या भूभागासाठी ''गॅझेटिअर ऑफ दि बॉम्बे प्रेसिडेन्सी'' चा प्रथम खंड दोन भागात प्रकाशित करण्यात आला (१८९४). याचा भाग–१ हा ''अर्लि हिस्टरी ऑफ दि गुजरात'' शी संबंधित होता,तर भाग-२ हा ''हिस्टरी ऑफ दि कोंकण,'' ''अर्लि हिस्टरी ऑफ दि डेक्कन डाऊन टू दि मोहम्मदन कॉनक्वेस्ट'' आणि ''दि डायनॅस्टीज ऑफ दि कॅनरीज डिस्ट्रीक्टस्'' अशा भागाशी संबंधित होता. यामध्ये पंडित भगवानलाल इंद्रजी, ए. एम. टी. जॅक्शन, रे. अलेक्झांडर, नेर्न, आर. जी. भांडारकर, जे. एफ. फ्लीट या मान्यवरांनी योगदान दिले होते. स्वातंत्र्योत्तर काळात महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर राज्य गॅझेटिअर मालिकेतील हिस्टरी : एन्शंट पिरिअड हा इंग्रजी गॅझेटिअर ग्रंथ सन १९६७ मध्ये प्रकाशित करण्यात आला. सेतू माधवराव पगडी यांनी संपादित केलेल्या या ग्रंथाच्या निर्मितीसाठी प्रथम डॉ. एच. डी. सांकलिया, डॉ. ए. एस. आळतेकर आणि डॉ. एस. सी. नंदीमठ यांची एक समिती स्थापन करण्यात आली होती. हा ग्रंथ अद्ययावत करण्याच्या कामी डॉ. वा. वि. मिराशी यांनी योगदान दिले. आजही प्रमाणभूत असलेल्या या ग्रंथाच्या निर्मितीनंतर गेल्या चार दशकात या क्षेत्रात झालेली विविध गवेषणे, उत्खनने, संशोधने ताम्रशिला शासनाच्या उपलब्धीमुळे कित्येक बाबी नव्याने स्पष्ट झाल्या. इतिहास संशोधन ही एक अव्याहत चालणारी प्रक्रिया असून ठराविक काळानंतर त्याची सुधारित आवृत्ती प्रकाशित करणे आवश्यक ठरते या जाणिवेतून या ग्रंथाची सुधारित मराठी व इंग्रजी आवृत्ती प्रकाशित करण्याविषयीच्या प्रस्तावास शासनाने १९९१ मध्ये मान्यता दिली. राज्य गॅझेटिअर ग्रंथांच्या सुधारित मराठी आवृत्तीमध्ये ''महाराष्ट्र : भूमी व लोक'' हा ग्रंथ प्रकाशित झाला आहे. इतिहास : प्राचीन काळ या ग्रंथाचा भाग पहिला हा राजकीय व सांस्कृतिक इतिहासास, तर भाग दुसरा ''कला व स्थापत्य'' या विषयाला समर्पित आहे. या दोन्ही ग्रंथांच्या मराठी आवृत्तीनंतर लगोलग इंग्रजी आवृत्तीही प्रकाशित करण्याचा मानस आहे.

इतिहास : प्राचीन काळच्या निर्मितीसाठी माजी संपादक मंडळ सदस्य डॉ. म. के. ढवळीकर, डॉ. अ. प्र. जामखेडकर व डॉ. रा. श्री. मोरवंचीकर या तीन तज्ञ सदस्यांची एक उपसमिती गठीत करण्यात आली होती. त्यांनी या ग्रंथनिर्मिती प्रक्रियेत अत्यंत महत्वपूर्ण योगदान दिले आहे हे मी प्रामाणिकपणे नमूद करू इच्छितो.

या ग्रंथाची प्रागैतिहासिक महाराष्ट्र, महाराष्ट्राचा राजकीय इतिहास आणि सांस्कृतिक इतिहास अशी तीन भागात मांडणी करण्यात आली आहे. प्रागैतिहासिक महाराष्ट्र या भागातील महाराष्ट्राचे पुरापर्यावरण या प्रकरणाचे

लेखन डॉ. शं. न. राजगुरू यांनी केले असून महाराष्ट्राचे प्राचीनत्व, आद्य प्लायस्टोसीन कालखंडामधील या भूभागाची स्थिती, तेथील मोसमी हवामान, सह्याद्रीची निर्मिती आणि पूर्ववाहिनी नद्यांचा उगम याविषयीच्या चर्चेबरोबरच उपलब्ध पुरातत्त्वीय पुराव्यांच्या आधारे मानवी अस्तित्वाचा शोध घेतला आहे. कोकणपट्टीच्या निर्मितीबाबत ते म्हणतात. ''तीस हजार वर्षांपूर्वी सागराची पातळी वीस मीटरने खाली गेली असावी. त्यातून हा भूभाग निर्माण झाला असावा.'' अश्मयुगीन महाराष्ट्र या प्रकरणाचे लेखन डॉ. र. सु. पप्पु यांनी केले असून अश्मयुगाचा कालखंड आणि प्राप्त पुरातत्त्वीय अवशेष याची त्यांनी विस्ताराने चर्चा केली आहे. पुरापुराश्मयुग, मध्याश्मयुग आणि नवाश्मयुग या विविध कालखंडाबाबत झालेल्या गवेषणांची नोंद त्यांनी घेतली आहे. महाराष्ट्रातील अश्मयुगीन संशोधनाची सुरुवात वायने यांना गोदावरीकाठी पैठण जवळील मुंगी याठिकाणी सन १८६५ मध्ये मिळालेल्या अगेटच्या हत्यारापासून झाली यासारखे तपशील त्यांनी नोंदविले आहेत. ताम्रपाषाणयुग आणि महापाषाणयुग या विषयावर लेखन करणारे डॉ. म. के. ढवळीकर ज्येष्ठ पुरातत्त्ववेत्ते आहेत. ताम्रपाषाणयुगकालीन सावळदा, उत्तर सिंधु, माळवा आणि पूर्व व उत्तर जोर्वे याबाबतचा तपशील त्यांनी नोंदविला असून तत्कालीन पर्यावरण, वसाहती याची चर्चा केली आहे. आजही महाराष्ट्रात रूढ असलेल्या काही समज व प्रथांचे मूळ प्रागैतिहासिक समाजजीवनात सापडते. ताम्रपाषाणयुगीन आद्य शेतकऱ्यांच्या वसाहतींचा ऱ्हास होण्यास हळूहळू कमी होत गेलेले पर्यन्यमान व सततचे दुष्काळ कारणीभूत होते यासारखे लक्षणीय निष्कर्ष त्यांनी नोंदविले आहेत. महापाषाणयुगीन दफनाबाबतची माहिती देताना ते म्हणतात, ''तथाकथित महापाषाणीय खेडे हे वास्तवात महापाषाणीयांच्या समकालीन म्हणजे लोहयुगीन स्थिर जीवन जगणाऱ्या लोकांची खेडी असावीत.'' विदर्भातील मोठ्या प्रमाणात आढळणाऱ्या स्थळवर्तुळांविषयीची माहिती देताना ''कालौघात विकसित झालेली ही संस्कृती कोणत्याही परकीय आक्रमणाचा परिणाम नव्हे.'' असे मत नोंदवितात. एकूण या गॅझेटिअर ग्रंथामुळे या क्षेत्रातील तज्ज्ञ अभ्यासकांव्यतिरिक्त सर्वसामान्य वाचकास या क्षेत्रात झालेल्या विपुल संशोधनाची माहिती प्रथमच एकत्रितपणे उपलब्ध होत आहे.

राजकीय इतिहास या भागात सातवाहनपासून यादव राजवंशापर्यंतच्या घडामोडींचा साक्षेपाने आढावा घेण्यात आला असून सातवाहन, पश्चिमी क्षत्रप आणि वाकाटक या तीन महत्वपूर्ण राजवंशांबाबत डॉ. अजय मित्र शास्त्री यांनी लेखन केले आहे. डॉ. शास्त्री हे प्रसिद्ध नाणेतज्ञ आणि अभिलेखांचे अभ्यासक आहेत. या क्षेत्रातील त्यांचे योगदान उल्लेखनीय असून पूर्वप्रकाशित साधने व नव्याने उपलब्ध झालेले पुरातत्वीय पुरावे, अभिलेख व नाणे यांच्या आधारे त्यांनी सातवाहन इतिहासाविषयी काही नवीन समीकरणे मांडली आहेत. आजपर्यंतच्या रूढ मतांपेक्षा ती वेगळी आहेत. त्यांच्या लेखनातून सातवाहन इतिहासाचे विविध पैलू प्रथमच स्पष्ट होत आहेत. उदा. सातवाहन राजवंशाचे मूलस्थान, नामोत्पत्ती, त्यांचा

कालानुक्रम, त्यांच्या उपशाखा, विशेषतः त्यांनी स्वीकारलेले लघुकालवादीतत्व या बाबी त्यांच्या व्यासंगाची साक्ष देतात. त्यांनी चष्टन हा शककर्ता असल्याचे स्पष्ट करण्यासाठी दिलेले पुरावे प्रथमच प्रकाशात आले आहेत. अर्थात त्यांची काही मते जशीच्या तशी स्वीकारणे कठीण वाटते. पश्चिमी क्षत्रपांचा इतिहास, त्यांचा कालक्रम, प्रमुख क्षत्रप यांची नोंद घेऊन त्यांनी प्राचीन भारतीय चलन परंपरेतील त्यांचे महत्त्वपूर्ण योगदान स्पष्ट केले आहे. पश्चिमी क्षत्रपांनी बऱ्याच मोठ्या प्रदेशावर सुमारे चारशे वर्षे राज्य केले होते व साहित्य परंपरेमध्येसुद्धा त्यांना मानाचे स्थान प्राप्त झाले होते याकडे त्यांनी लक्ष वेधले आहे. वाकाटक राजवंशाबाबत डॉ. शास्त्री यांनी नव्याने उपलब्ध झालेल्या पुराव्यांचा अचूक वेध घेतला आहे. नवीन संशोधकांचीही त्यांनी नोंद घेतली आहे.

राष्ट्रकूट राजवंश व बदामीचे चालुक्य या विषयांवर लेखन केलेले डॉ. हरिहर ठोसर हे प्रसिद्ध शिलालेखतज्ज्ञ असून जाणकार संशोधक आहेत. त्यांनी डॉ. अ. स. आळतेकरांनी राष्ट्रकुटांच्या इतिहासावर केलेल्या लेखनानंतर आजपर्यंत उपलब्ध झालेल्या नवीन ताम्रशासनांच्या आधारे या काळाचे यथार्थ पुनर्मुल्यांकन केले आहे. राष्ट्रकुटांचे मूळ स्थान वेरूळ (जि. औरंगाबाद) असल्याचे सांगून दख्खन इतिहासातील राष्ट्रकुटांचे स्थान त्यांनी स्पष्ट केले आहे. बदामीच्या चालुक्यांबाबतही त्यांनी कमीतकमी शब्दांत समर्पक आढावा घेतला असून याबाबत डॉ. रमेशन सारख्या अभ्यासकांच्या मतांचे योग्य परिशीलन केले आहे.

कल्याणीचे चालुक्य, शिलाहार आणि यादव राजवंश यांच्याविषयीचे लेखन डॉ. एस. जे. मंगलम् यांनी केले आहे. त्यांनी कल्याणीच्या चालुक्यांच्या इतिहासाचा आढावा घेऊन शिलाहारांच्या संदर्भात डॉ. वा. वि. मिराशी यांनी केलेल्या संशोधनाची यथार्थ नोंद घेतली आहे. यादव वंशाबाबत दक्षिणात्य विद्वानांच्या मतांचा परामर्श घेताना यादव हे कन्नड भाषिक किंवा कन्नड असल्याविषयीच्या मतातील अव्यवहार्यता त्यांनी स्पष्ट केली आहे. यादव हे मूळ महाराष्ट्रीयन असल्याचे स्पष्ट करून व सिन्नर, चांदवड, देवगिरी या त्यांच्या प्रमुख केंद्रांची माहिती देऊन या राजवंशाचा परिपूर्ण इतिहास दिला आहे.

या ग्रंथातील सांस्कृतिक इतिहास या तिसऱ्या भागात तत्कालीन सामाजिक, आर्थिक, धार्मिक जीवनाचा आढावा घेण्यात आला आहे. या भागात प्रशासन या विषयावर डॉ. अ. शं. पाठक यांनी लेखन केले असून प्रारंभिक ऐतिहासिक काळापासून यादव काळापर्यंत विविध प्रशासकीय केंद्राची होत गेलेली निर्मिती व त्यांचे कमीअधिक होत जाणारे क्षेत्र, तत्कालीन अधिकारी वर्ग, राजा व मंत्रिपरिषद या मर्यादित अंगांचा आढावा घेतला आहे. या काळातील शासन व प्रशासनाचा विचार करता ते राजा या केंद्राभोवती फिरणारे व त्याच्या कर्तृत्वानुसार परिवर्तीत होणारे दिसते. केंद्रस्थानी असलेला राजा हा पूर्णतः स्वतंत्र असूनसुद्धा शास्त्रनिर्देश ओलांडताना दिसत नाही.

प्रारंभिक ऐतिहासिक काळापासून ते वाकाटक कालापर्यंतच्या सांस्कृतिक जीवनावर डॉ. अजय मित्र शास्त्री यांनी लेखन केले आहे. प्रारंभिक काळाची नोंद तपासताना ते म्हणतात, सर्वसाधारणपणे ख्रिस्तपूर्व सहावे शतक ते इ. स. च्या सहावे शतक अशा १२०० वर्षांच्या व्यापक कालपटाचा हा आढावा आहे. तत्कालीन प्रस्थापित समाजव्यवस्था, वर्णाश्रम व्यवस्था, मातृनामानुवर्ती नामकरण प्रथा (उदा. गौतमीपुत्र, सातकर्णि, वासिष्ठीपुत्र, पुळुमावि) इत्यादी बाबींची व्यापक चर्चा करून मातृनामानुवर्ती नामकरण ही प्रथा म्हणजे बहुपत्नीत्वाच्या पद्धतीची व्यवहार्य परिणती होय असे ते मानतात. सती प्रथेचे कुठल्याही धर्मग्रंथात समर्थन केलेले नाही किंवा अभिलेखातही याची नोंद मिळत नसल्याचे ते स्पष्ट करतात. याच काळातील प्रतिमागृहे किंवा देवकुलीकांची त्यांनी चर्चा केली आहे. मृत व्यक्तिच्या स्मृतिप्रीत्यर्थ उभारण्यात येणारी प्रतिमागृहे, स्मृतिमंदिरे, छायास्तंभ आणि स्मारकशिळा किंवा स्तंभ याच्या निर्मितीकडे ते लक्ष वेधतात. याविषयीची माहिती या गॅझेटिअरमध्ये प्रथमच एवढ्या तपशिलात उपलब्ध होत आहे. समाजजीवनाला वळण देणाऱ्या आर्थिक स्थितीविषयीचा व्यापक तपशीलही ते नोंदवतात. जमीन, तिची मालकी, जलसिंचन, भूदान, शेतकरी तसेच विविध व्यापार श्रेणी व संघ, चलन व्यवस्था, बाजारभाव याची माहिती देऊन कार्षापण या नावाने रूढ असलेले चांदीचे नाणे व त्याचे तत्कालीन चलनव्यवस्थेमध्ये असलेले स्थान स्पष्ट करतात. महाराष्ट्र, गुजरात, आंध्रप्रदेश येथे इ. स. च्या प्रारंभिक शतकातील वित्तीय स्थिती अत्यंत गुंतागुंतीची होती, कारण सातवाहन, क्षत्रप, इन्डोग्रीक आणि रोमन नाणी एकाचवेळी बाजारात उपलब्ध होती. स्थावर मालमत्तेच्या खरेदी विक्री व्यवहारात चांदीच्या व रोमन नाण्यांचा उपयोग होत असावा असे दिसते. तत्कालीन वैदिक आणि पौराणिक धर्म, यज्ञविधी यांचा परस्पर समन्वय, एकाचवेळी त्यांचे असलेले अस्तित्व याचा त्यांनी शोध घेतला आहे. जैन धर्माविषयी सर्वमान्य असा स्पष्ट अभिलेखीय पुरावा या काळापर्यंत उपलब्ध नाही असे मत ते नोंदवतात. जैनधर्माबरोबरच बौद्ध धर्म व बौद्ध प्रतिष्ठाने याची त्यांनी व्यापक चर्चा केली आहे. पुढील शतकात अशोकाच्या कारकिर्दीपूर्वी बौद्ध अनुयायांची दोन गटांत विभागणी व उपविभागणी होऊन अठरा मुख्य पंथ आणि उपपंथ निर्माण झाले असावेत अशी नोंद बौद्ध पंथांच्या निर्मितीबाबत त्यांनी केली आहे. कोरीव लेखातून संघाच्या प्रशासकीय यंत्रणेबाबत उपयुक्त माहिती मिळते, जी अन्य कुठल्याही संदर्भग्रंथात आढळत नाही असे मत त्यांनी व्यक्त केले आहे.

या ग्रंथातील शेवटचे प्रकरण डॉ. मालती महाजन यांनी लिहिले असून बदामीच्या चालुक्यांपासून यादव काळापर्यंतच्या सांस्कृतिक जीवनाचा त्यांनी व्यापक आढावा घेतला आहे. यासाठी त्यांनी उपलब्ध पुरातत्त्वीय पुरावे. अभिलेख याचबरोबर परदेशी पर्यटकांच्या नोंदींची मोठ्या प्रमाणात दखल घेतली आहे. तत्कालीन समाजजीवन, कुटुंबव्यवस्था, स्त्रीचे समाजातील स्थान, विविध रूढी व परंपरा, आहार–विहार,

सण व उत्सव याबरोबरच तत्कालीन अर्थव्यवस्थेचा मागोवा घेतला आहे. जलाशयनिर्मिती व पूर्तकर्मातून समाजोपयोगी बाबींच्या होणाऱ्या निर्मितीकडे त्या लक्ष वेधतात. त्यांचे लेखन हे एक उत्कृष्ट संकलन ठरावे.

महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाबाबत आजपर्यंत उपलब्ध असलेले गवेषण, उत्खनन व संशोधन अहवाल आणि नवीन दृष्टीने होणारे परीक्षण यांच्या अनुषंगाने या इतिहासाची मांडणी करणे गरजेचे होते. त्यादृष्टीने एकोणीसाव्या व विसाव्या शतकातील समग्र संशोधनाचा एकत्रितपणे वस्तुनिष्ठ आढावा घेऊन व विविध क्षेत्रातील संशोधन कार्याचा परस्पर समन्वय साधून त्या त्या क्षेत्रातील मान्यवर तज्ज्ञांकडून या इतिहासाचे नव्याने लेखन करण्यात आले आहे. या ग्रंथाद्वारे महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाचा यथार्थ परिचय होईल असा विश्वास वाटतो. याच काळातील "स्थापत्य व कला" चा परिचय या ग्रंथाच्या दुसऱ्या भागात करून देण्यात आला आहे.

या गॅझेटिअर ग्रंथामध्ये स्वातंत्र्योत्तर काळात देशात अव्याहतपणे कार्यरत असणाऱ्या विविध शोधपत्रिका आणि शोध प्रतिष्ठाने यांच्या संशोधनाची दखल घेण्यात आली आहे. हा ग्रंथ सर्व अभ्यासक, विद्यार्थी व जिज्ञासू वाचक यांना उपयुक्त ठरेल असा विश्वास वाटतो.

**अरुणचंद्र शं. पाठक**
कार्यकारी संपादक व सचिव

# ऋणनिर्देश

दर्शनिका विभागाकडून राज्य गॅझेटिअर मालिकेमध्ये यापूर्वी इतिहास या विषयावर "हिस्टरी : एन्शंट पिरिअड" हा इंग्रजी ग्रंथ १९६७ मध्ये प्रकाशित करण्यात आला. त्यानंतर "मिडीवल पिरिअड" व "मराठा पिरिअड" या विषयांवर दोन स्वतंत्र राज्य गॅझेटिअर ग्रंथ प्रकाशित करण्यात आले. या शिवाय बॉटनी विषयांतर्गत तीन गॅझेटिअर्स तसेच, "फौना", "बॉटनी अँण्ड फ्लोरा ऑफ महाराष्ट्र", "महाराष्ट्र : लॅण्ड अँण्ड इटस् पिपल" आणि "लँग्वेज अँण्ड लिटरेचर" हे राज्य गॅझेटिअर ग्रंथ प्रकाशित करण्यात आले. तथापि, सर्व विषयांवर गेल्या पाच दशकांत झालेल्या वैशिष्ट्यपूर्ण व सर्वांगीण संशोधनाच्या आधारे या गॅझेटिअर्सच्या सुधारित मराठी आवृत्ती प्रकाशित करण्याची गरज लक्षात घेऊन या विभागाच्या संबंधीत प्रस्तावास शासनाने सन १९९१ मध्ये मान्यता दिली. त्यानुसार या मालिकेतील "महाराष्ट्र : भूमी व लोक" हे मराठी भाषेतील पहिले राज्य गॅझेटिअर प्रकाशित करण्यात आले. प्रस्तुत ग्रंथ या मालिकेतील दुसरे पुष्प होय. या ग्रंथाच्या विषयाचे व्यापक स्वरूप लक्षात घेऊन त्याचे "इतिहास : प्राचीन काळ" आणि "स्थापत्य व कला" असे दोन भाग करण्यात आले आहेत. आज या ग्रंथाचे काम पूर्ण होताना आनंद होत आहे. या दोन्ही ग्रंथांच्या इंग्रजी आवृत्तीही लवकरच प्रकाशित करण्यात येतील. "इतिहास : प्राचीन काळ" या ग्रंथाचे काम सुरू असताना संपादक मंडळावर डॉ. म. के. ढवळीकर, डॉ. अ. प्र. जामखेडकर, डॉ. रा. श्री. मोरवंचीकर, डॉ. श्रीधर गुप्ते, डॉ. भा. ल. भोळे, डॉ. एस. व्ही. खांदेवाले, डॉ. सुधाताई काळदाते, डॉ. उषा देशमुख आणि ज्येष्ठ पत्रकार श्री. माधवराव गडकरी हे मान्यवर कार्यरत होते. या सर्वांचा मी त्यांनी केलेल्या सहकार्याबद्दल ऋणी आहे.

डॉ. कि. का. चौधरी (निवृत्त कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग) यांनी हे काम हाती घेतले होते. त्यांच्या दूरदृष्टीचा मी गौरवाने उल्लेख करू इच्छितो. आता हे गॅझेटिअर प्रकाशित होत असताना नवीन संपादक मंडळ कार्यरत असून त्यात डॉ. जनार्दन वाघमारे, डॉ. श्रीधर गुप्ते, डॉ. जयसिंगराव पवार, डॉ. रामकृष्ण सोळंके, प्रा. राजेंद्र कुंभार, डॉ. यशवंत मनोहर, डॉ. फक्रुद्दिन बेन्नूर, डॉ. कि. का. चौधरी, श्री. मधुकर भावे, डॉ. सुधीर गव्हाणे, डॉ. श्रीनिवास ओमनवार, डॉ. उत्तम रुद्रवार आणि श्रीमती उर्मिला पवार या मान्यवरांचा समावेश आहे. या सर्व मान्यवर सदस्यांचा त्यांच्या सहकार्याबद्दल मी ऋणी आहे. मंडळाचे अध्यक्ष श्री. गोविंद स्वरुप (प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन, सांस्कृतिक कार्य विभाग) यांनी या कामी वेळोवेळी मार्गदर्शनपर प्रोत्साहन दिले. त्यांचा मी आभारी आहे.

"इतिहास : प्राचीन काळ" या राज्य गॅझेटिअरच्या निर्मितीसाठी माजी संपादक मंडळ सदस्य डॉ. म. के. ढवळीकर, डॉ. अ. प्र. जामखेडकर आणि डॉ. रा. श्री. मोरवंचीकर या तीन तज्ज्ञांची एक उपसमिती गठीत करण्यात आली होती. त्यांनी या ग्रंथनिर्मितीसाठी मोठे योगदान दिले आहे हे मी येथे नमूद करतो.

''इतिहास : प्राचीन काळ'' या ग्रंथातील प्रागैतिहासिक काळ या भागाच्या लेखनासाठी डॉ. राजगुरु, डॉ. पप्पू व डॉ. ढवळीकर यांनी योगदान दिले असून राजकीय इतिहासासाठी डॉ. अजय मित्र शास्त्री, डॉ. ठोसर व डॉ. मंगलम् यांचे योगदान लाभले आहे. सांस्कृतिक इतिहास या भागाचे लेखन डॉ. अजय मित्र शास्त्री, डॉ. मालती महाजन व डॉ. अ. शं. पाठक यांनी केले आहे. या सर्वांचा मी ऋणी आहे. या ग्रंथासाठी, विशेषतः प्रागैतिहासिक कालखंडासाठी सर्व आकृत्या व छायाचित्रे ही संबंधित लेखक, उत्खनन अहवाल व डेक्कन कॉलेज, पोस्ट ग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिटयूट, पुणे, यांच्या सौजन्याने प्राप्त झाली आहेत; तर राजकीय इतिहासातील विविध अभिलेखांची छायाचित्रे व ठसे हे डॉ. अजय मित्र शास्त्री व डॉ. वा. वि. मिराशी यांच्या पूर्वप्रकाशित ग्रंथांतून व पुरातत्व विभाग यांच्या सौजन्याने उपलब्ध झाले आहेत. ग्रंथातील नाण्यांची सर्व छायाचित्रे डायरेक्टर, इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ रिसर्च इन न्युमिस्मॅटिक स्टडीज, अंजनेरी, नाशिक यांच्या सौजन्याने उपलब्ध झाली आहेत. सांस्कृतिक इतिहासामधील आकृत्या या अनुक्रमे डॉ. एम. के. ढवळीकर यांच्या ''अजिंठा : अ कल्चरल स्टडी'' आणि डॉ. टी. व्ही. पथी यांच्या ''एलोरा : आर्ट ॲण्ड कल्चर'' या ग्रंथातून साभार उद्धृत केली आहेत. वरील सर्व मान्यवरांचा त्यांनी दिलेल्या सहकार्याबद्दल ऋणी आहे.

विद्यमान ग्रंथाच्या संकलन व प्रकाशन प्रक्रियेत मला ज्यांचे सहाय्य लाभले त्यात श्री. प्र. नि. नारखेडे, सहसंपादक; श्री. नि. रा. पाटील, श्री. रा. र. हनवतकर, श्री. त्रिं. मा. केंद्रे, सर्व संशोधन अधिकारी; सौ. मा. सु. मोदिखाने. श्री. के. झिं. राऊत, श्री. ध. जि. नावडकर, श्री. सु. श्री. गायकवाड, श्री. रा. स. कुंभार, श्री. ग. ना. परब, श्री. शा. का. मर्गज, श्री. अं. रा. पवार, श्री. प्र. रा. गवळी, श्री. तु. भा. सुकाळे हे सर्व सहाय्यक संशोधन अधिकारी, प्रशासनिक अधिकारी श्री. प्र. सा. खोबरेकर, लघुलेखक श्री. द. ज. परब तसेच कार्यालयातील सहाय्यक व विविध स्तरावरील कर्मचारी यांनी केलेल्या सहकार्याचा उल्लेख करणे आवश्यक वाटते. त्या सर्वांचा मी आभारी आहे.

ग्रंथाची छपाई उत्तम व तत्परतेने करून दिल्याबद्दल श्री. प्र. शं. मोरे, संचालक; श्री. प. ज. गोसावी, उपसंचालक, शासन मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशने, मुंबई आणि श्री. न. म. गोटे, व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, कोल्हापूर व त्यांचे सर्व सहकारी यांनी केलेल्या कामाबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार मानतो.

माझ्या विभागाचे मा. ना. श्री. रामकृष्णजी मोरे, (मंत्री, सांस्कृतिक कार्य व शिक्षण) व मा. ना. डॉ. विमलताई मुंदडा (राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य व राजशिष्टाचार विभाग) तसेच या विभागाचे प्रधान सचिव, मा. गोविंद स्वरुप यांचे ऋण व्यक्त करतो.

**अरुणचंद्र शं. पाठक,**
कार्यकारी संपादक व सचिव

मुंबई,
विजयादशमी,
१५ ऑक्टोबर २००२

## प्रकरण १

# महाराष्ट्राचे पुरापर्यावरण *

पृथ्वीचे पर्यावरण (Environment) ही एक अतिशय गुंतागुंतीची बाब असून त्यात सजीव आणि निर्जीव अशा सर्व घटकांचा समावेश होतो. माणसाभोवती आढळणाऱ्या सर्व घटकांचे मिळून पर्यावरण होते. पर्यावरणावर परिणाम करणारे अनेक घटक आहेत. त्यातील काही घटक नैसर्गिक, तर काही अनैसर्गिक किंवा मानवनिर्मित आहेत. नैसर्गिक घटकांमध्ये सूर्य आणि पृथ्वीमधील अंतर, सूर्यावरील डाग[१], पृथ्वीचा अक्ष[२], सौरशक्ती, सागरी पातळीत होणारे बदल, कार्बन डाय ऑक्साईडचे प्रमाण, ओझोन[३] च्या पट्ट्यात होणारे चढउतार, ज्वालामुखींचे उद्रेक, भूकंप अशा अनेक घटकांचा समावेश होतो. मानवनिर्मित घटकात औद्योगिक वसाहतीतील वाढ, भूजलाचे शोषण, अणूबॉंबच्या चाचण्या, खतांचा वापर, लोकसंख्येतील वाढ, युध्दे आणि त्यात होणारा रासायनिक व इतर अस्त्रांचा वापर असे अनेक घटक समाविष्ट होतात. पृथ्वीचा जन्म ४.५ अब्ज वर्षांपूर्वी झालेला असल्याने तिला मोठा भूशास्त्रीय[४] आणि भौगोलिक इतिहास लाभलेला आहे. नैसर्गिक कारणांमुळे पर्यावरणात झालेले बदल भूशास्त्रीय अवसादांच्या स्वरुपात जतन झालेले आढळतात. त्यामुळेच पर्यावरणात सध्या होणाऱ्या बदलांना जर समजावून घ्यावयाचे असेल तर पर्यावरणात पूर्वी झालेल्या बदलांचा अभ्यास करणे आवश्यक ठरते.

कुठल्याही स्थळाच्या पर्यावरणाचा अभ्यास करायचा असेल तर स्थानिक आणि जागतिक अशा दोन्ही घटकांचा विचार करावा लागतो. स्थळाचा विस्तार अधिक असेल तर जागतिक घटकांचा प्रभाव जास्त आढळून येतो. म्हणूनच महाराष्ट्राच्या पर्यावरणात झालेल्या बदलांचा अभ्यास करताना जागतिक बदल लक्षात घ्यावे लागतात. महाराष्ट्र हा भारताचा अविभाज्य भाग आहे आणि भारताने त्याच्या उत्पत्तीच्या दक्षिण गोलार्धातील स्थानापासून सध्याच्या उत्तर गोलार्धातील स्थानापर्यंत बरीच स्थाने बदललेली आहेत. हे बदल होत असताना भूशास्त्रीय घडामोडीही बऱ्याच झालेल्या आहेत. पर्यायाने पर्यावरणात लक्षणीय बदल घडून आलेले आहेत.

पृथ्वीची उत्पत्ती झाल्यानंतर सुरुवातीची भूखंडांची रचना सध्याच्या रचनेपेक्षा खूपच वेगळी होती. सर्व भूखंडे एकाच भूखंडाच्या स्वरुपात सध्याच्या दक्षिण ध्रुवाजवळ एकवटलेली होती.[५] उरलेला भाग पाण्याने व्यापलेला होता. या भूखंडांच्या पुनर्रचनेला १५ कोटी वर्षांपूर्वी सुरुवात झाली. एका भूखंडाचे अनेक तक्त्यांच्या स्वरुपात विभाजन झाले आणि विभाजन झाल्यावर हे तक्ते एकमेकांपासून दूर सरकू

* या प्रकरणाचे लेखन डॉ. शं. न. राजगुरू (डेक्कन कॉलेज, पोस्ट ग्रॅज्यूएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे) यांनी केले आहे. या कामी त्यांना डॉ. सविता घाटे व डॉ. शिला मिश्रा यांनी सहकार्य केले आहे.

लागले. १० कोटी वर्षांपूर्वी म्हणजे मध्यजीवी महाकल्पात (Mesozoic era) भारत आफ्रिकेच्या बऱ्याच जवळ आणि जवळजवळ ३७° दक्षिण अक्षांशात होता. इतर भूखंडांप्रमाणे हा मूळ भूखंड सुभाज (Schist–शिस्ट) आणि पट्टिताष्म (Niche–नीस) या खडकांपासून तयार झालेला आणि तो मोठ्या बेटाच्या स्वरुपात होता. या काळात भारत विषुववृत्ताच्याही दक्षिणेकडे मध्य कटिबंधात असल्याने हवामान अर्थातच ऊबदार, समशितोष्ण प्रकारचे होते. त्यावेळी भूखंडावर वावरणाऱ्या प्राण्यांचे स्वरूपही आजच्या पेक्षा थोडे वेगळे होते. त्यात वैचित्र्यपूर्ण प्राणी "डायनोसोर"[६] हे प्रामुख्याने होते.

**भारताचा तक्ता विषुववृत्तावर असतानाची परिस्थिती :** भारतीय महाद्वीप सात कोटी वर्षांपूर्वी विषुववृत्तावर आले. विषुववृत्त ओलांडत असताना तेथे असलेल्या तप्तबिंदूंमुळे[७] भारतीय तक्त्याच्या पश्चिमी किनाऱ्यालगत भेगीय ज्वालामुखींच्या उद्रेकाला सुरुवात झाली. हा उद्रेक जवळजवळ तीन कोटी वर्षे चालू होता. प्रचंड मोठ्या प्रमाणात तप्त शिलारस पाटाच्या स्वरुपात भूपृष्ठावर ओतला गेला. शिलारसाबरोबरच मोठ्या प्रमाणात कार्बनडाय ऑक्साईड वातावरणात मिसळला जात होता. त्याचप्रमाणे तपमानातही वाढ झाली. भारताच्या मूळ खंडावर सध्याच्या महाराष्ट्राच्या भागात असलेले प्राणी आणि वनस्पती या तप्त शिलारसाखाली सापडून नष्ट झाले. त्याचप्रमाणे वातावरणातील वाढल्या कार्बन डाय ऑक्साईडच्या प्रमाणामुळे प्राणी आणि वनस्पती नष्ट झाल्या. हा पाटाच्या स्वरुपात वर आलेला शिलारस थंड झाल्यामुळे दख्खनच्या पठाराची निर्मिती झाली. पर्यावरणातील प्रदूषणामुळे दख्खनच्या पठाराच्या निर्मितीनंतर पुनः या भागात सजीव सृष्टीचा वावर होण्यासाठी काही काळ जावा लागला असावा.

**जांभा खडकाची निर्मिती :** तीन ते चार कोटी वर्षांपूर्वी म्हणजेच आद्य तृतीयक काळात भारतीय महाद्वीप विषुववृत्ताच्या थोडे उत्तरेकडे सरकलेले होते. म्हणजेच दक्षिण गोलार्धातून आता त्याचा प्रवेश उत्तर गोलार्धात झालेला होता. विषुववृत्ताजवळ असताना भारताचे हवामान उष्ण आणि दमट होते. पावसाचे प्रमाण सध्यापेक्षा खूपच जास्त होते. या काळात तयार झालेले विशिष्ट प्रकारचे खडक, सध्या शुष्क गणल्या जाणाऱ्या भागातसुद्धा आढळून येतात. हे लाल रंगाचे विटेसारखे दिसणारे खडक जांभा खडक किंवा लॅटेराईट म्हणून ओळखले जातात. हे खडक तयार होत असताना दख्खनच्या पठाराची पश्चिमेकडची उंचीही बरीच कमी असावी. एखाद्या सखल पठारी प्रदेशाप्रमाणे हा प्रदेश असावा असे पुरावे आता पुढे येत आहेत. जांभा खडकांमध्ये लोह खनिज आणि ॲल्युमिनियम ऑक्साईडचे प्रमाण अधिक, तर सिलिकाचे प्रमाण कमी असते. या खडकांची रचना स्तरित स्वरुपाची असते. सर्वांत वरचा पृष्ठभाग लोह खनिजयुक्त कठीण कवचाच्या स्वरुपाचा, मध्य भागात लालसर मातीचा थर आणि तळाच्या भागात फिक्या रंगाची केवडी मुरुमासारखी माती असते. हे जांभा खडक किनारी भागात तसेच समुद्र सपाटीपासून १,५०० मी. उंचीपर्यंतच्या पठारी भागात एखाद्या टोपाप्रमाणे तयार झालेले दिसतात. या जांभा खडकांच्या सविस्तर

मापनावरून चारी बाजूंनी मंद उतार असलेल्या घुमटाकार[८] रचनेवर त्यांची निर्मिती झाली असावी असे वाटते. भूचुंबकीय अभ्यासावरून पठारी भागातील जांभा खडक आद्य तृतीयक कालखंडात[९] (सुमारे ५ कोटी वर्षे ईओसीन ते ३ कोटी वर्षे माओसीन) तयार झाला. तो तयार होताना भूजल पातळीत बरेच चढउतार झालेले दिसतात. भूजल पातळी खूप खाली गेल्यामुळे आणि त्याच वेळी या भागाचे उत्थान होत असल्यामुळे जांभा खडकाच्या कवचाची निर्मिती झाली. म्हणूनच महाराष्ट्राच्या पठारी भागातील जांभा खडकांची उंचावरची स्थिती आद्य तृतीयक कालखंडात झालेले उत्थान दर्शविते.

**उत्तर तृतीयक काळातील जांभा खडक :** महाराष्ट्राच्या किनारी भागात आद्य तृतीयक काळाप्रमाणेच उत्तर तृतीयक काळातही जांभा खडक तयार झाल्याचे पुरावे मिळतात. हे जांभा खडक ३०० मी., २०० ते १५० मी., ९० ते ६० मी. आणि ४० ते २० मी. उंचीवर सपाट पृष्ठाच्या स्वरूपात आढळतात. किनारी भूशिरांच्या स्वरूपातही ते समुद्र सपाटीपासून ३ ते २५ मी. उंचीवर आढळतात. देवगड–विजयदुर्ग भागात ८ मी. ते १२ मी. दरम्यान जांभा खडकांचे आवरण चांगल्या प्रकारे तयार झालेले दिसते. देवगड येथे जांभा खडकाच्या पठाराचा उतार सागराच्या दिशेने असून किनाऱ्याजवळ त्याला सागर सपाटीपासून ९ ते १२ मी. उंच उभ्या कड्याचे स्वरूप प्राप्त झाले आहे. सर्जेकोट येथेही १२ मी. उंचीवर असणारा जांभा खडकाचा स्तर सागरापर्यंत जातो. रत्नागिरी येथे जांभा खडकाच्या दोन पार्श्विका[१०] (Laterite profiles) विहिरींमध्ये उघड्या पडल्या असून, त्यातील पहिली पार्श्विका असिताष्म खडकावर आद्य तृतीयक काळात तयार झाली. दुसरी पार्श्विका खाडीच्या अवसादांवर तयार झालेली असून त्यात कार्बनीकरण झालेल्या वनस्पतींचे अवशेष आणि तृणमणी सापडतात. या खाडीच्या अवसादांचा कालमापनानुसार मायोसीन कालखंड[११] ठरविण्यात आला आहे. म्हणूनच यावर तयार झालेले जांभा खडक उत्तर तृतीयक किंवा आद्य चतुर्थक काळातील असावेत.

**रक्त स्तर** (Red Beds) : सांगली जिल्ह्यातील खानापूर येथे आढळणाऱ्या तृतीयक काळातील जांभीय नसलेल्या "रक्त स्तरांना" पुराभूआकार (Palaeogeomorphic), पुराहवामान (Palaeoclimatic) आणि विवर्तनिकीय (Palaeotectonic) अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्व आहे.[१२] या रक्त स्तरांमध्ये ढोबळ स्तरीकरण, क्रमित थर निर्मिती आणि अवसादीकरणाची इतर वैशिष्ट्ये दिसून येतात. या थरांमध्ये मॉंटमोरोलिनाईट, नॅट्रोनाईट, केओलिनाईट, हेमॅटाईट, गोएथाईट आणि अल्कली मृत्तिकांचीही गाढता आढळते. हे स्तर हवामान अर्धशुष्क असताना आद्य तृतीयक जांभा खडकापासून अंशतः आणि नंतर उत्तर तृतीयक काळातील मृदा अवसादन प्रक्रियामुळे तयार झाले असावेत.

**सह्याद्रीची निर्मिती आणि पूर्ववाहिनी नद्यांचा उगम :** सुमारे दोन कोटी वर्षांपूर्वी म्हणजेच चतुर्थक काळाच्या उत्तरार्धात भारतीय महाद्वीप आशिया खंडाला येऊन धडकले. या धडकेमुळे जशी हिमालय पर्वताची[१३] निर्मिती झाली, तशी दक्षिणचे पटार पश्चिमेकडून उचलले जाऊन अतिशय कमी कालावधीत कमी उंचीच्या पटारी प्रदेशावरून सध्याची प्रचंड उंची दक्षिणच्या पटाराला पश्चिमेकडे लाभली. अर्थात यात पश्चिम किनाऱ्यावर झालेल्या विवर्तनिकी[१४] हालचालींमुळे ही प्रक्रिया जलद गतीने झाली. या विवर्तनिकी हालचालींचे पडसाद आपल्याला धबधबे, खोल घळ्या, रांजण खळगे, अवखात सरिसर्पण आणि खूप उंचीवर असणाऱ्या सागरतटीय अवसादाच्या स्वरुपात दिसून येतात. भूआकार विज्ञानाच्या दृष्टीने पश्चिम महाराष्ट्रातील सर्वांत महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे समुद्र सपाटीपासून ६०० मी. ते १,५०० मी. दरम्यान विविध उंचीवर आढळणारे अनाच्छादनीय पृष्ठभाग.[१५] हे पृष्ठभाग तृतीयक काळातील विवर्तनिकी हालचाली आणि हवामानातील बदलांमुळे निर्माण झाले.

पश्चिम घाटाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे ७३° ते ७८° पू. रेखांश यांच्या दरम्यान, उत्तर-आग्नेय ते दक्षिण-वायव्य दिशेत असणारा १,५०० कि. मी. लांबीचा खंडीय विभाजक. घाटाच्या पश्चिमेकडील हा कडा क्षैतिज असिताष्म खडक, तिरके सुभाज आणि पट्टिताष्म आणि चार्नोकाईट खडकांमुळे तयार झालेला आहे.

दख्खनचे पटार पश्चिमेकडून वर उचलले गेल्यामुळे अर्थातच त्याला पूर्वेकडे उतार प्राप्त झाला. ज्या नद्या पूर्वी पश्चिमेकडे वाहत होत्या त्यांची दिशा या घटनेमुळे बदलली आणि त्या पूर्वेकडे वाहू लागल्या या पूर्ववाहिनी नद्या मंद उताराचा बराच मोठा भूप्रदेश पादाक्रांत करीत बंगालच्या उपसागराला मिळू लागल्या. पश्चिमवाहिनी नद्या त्यांच्या उगमानंतर तीव्र उताराच्या प्रदेशातून खाली येत असल्याने त्यांच्यावर धबधब्यांची निर्मिती झाली. अतिशय अरुंद असा किनारी प्रदेश पार करत त्या अरबी समुद्रात मिसळू लागल्या. या सर्व घडामोडी होत असताना भारत ८°३' ते ३५°३' या अक्षांशात सरकलेला होता. त्याचे महाद्वीपाचे स्वरूप संपून त्याला द्वीपकल्पाचे रूप प्राप्त झाले होते. या काळात हिमालयाची निर्मिती झाली असे जरी म्हटले असले तरी त्याला सध्याची उंची सुरुवातीलाच प्राप्त झाली नाही, त्यामुळेच हिमालयाची उंची कमी असतानाचे हवामान सध्याच्या हवामानापेक्षा वेगळे होते. भारतीय तक्ता जवळजवळ सध्याच्या अक्षांशात सरकलेला असल्यामुळे विषुववृत्तीय हवामानाच्या पट्ट्यातून तो बाहेर पडला होता. नैऋत्येकडून येणारे वारे अडवण्यासाठी हिमालयाची पुरेशी उंची नसल्याने हे वारे सरळ उत्तरेकडे चीनच्या दिशेने निघून जात असावेत. तसेच उत्तरेकडून येणारे थंड वारे जवळजवळ दक्षिण भारतापर्यंत आत येत असावेत. याचा परिणाम म्हणजे उन्हाळ्यात कमी पाऊस आणि थंडीत जास्त काळ कमी तपमान

अशी परिस्थिती भारताच्या बऱ्याच भागात असावी. यात महाराष्ट्राचा अर्थातच समावेश होतो. या काळात हवामान बरेच दमट असावे. सध्याच्या अर्धशुष्क हवामानात आढळणारे विशीर्ष खडकसुद्धा तृतीयक कालखंडातील दमट हवामान दर्शवितात.

यानंतरच्या काळातले म्हणजे खिस्तपूर्व १३ लक्ष वर्षे ते ४ लक्ष वर्षातील भूरूपकीय पुरावे दगड-गोट्यांच्या स्वरुपात मिळतात. काही ठिकाणी या दगड-गोट्यांचा पिंडाष्म खडक तयार झालेला दिसतो. हे दगड-गोट्यांचे अवसाद विदारित असिताष्म खडकावर वर्तमान नदीच्या तळापासून ५ मी. ते २० मी. उंचीपर्यंत नेवासे[१६], पैठण[१७] आणि निघोज येथे आढळतात. हे अवसाद (gravels) गोलाष्म, दगड-गोटे, रेती यासारख्या भारापासून तयार झालेले असून त्यांची जाडी २ मी. ते ५ मी. पर्यंत आहे. या थरात गारेचे दगड आणि चर्ट सारखे वालुकामय (silicious) खडक गोट्याच्या स्वरुपात सापडतात. हे दगड-गोटे (पिंडाष्म) गुळगुळीत गोल असून समांगी परंतु स्थानिक असिताष्म खडकांचे (basaltic) नाहीत. यातील पिंडाष्मांचे (matrix) आधारद्रव्य मार्ती आणि कार्बोनेट असून त्यामुळे स्तरीकरणात क्षोभ निर्माण झालेला दिसतो. या पिंडाष्मांमध्ये जरी जीवाष्म किंवा दगडी अवजारे सापडली नसली तरी पैठण येथे अशा पिंडाष्मांच्या थरावर दगडी अवजारे सापडतात नेवासे येथील रेतीच्या थरातील रेतीचे विदारण आणि या थराच्या अवसादन वैशिष्ट्यात आणि चतुर्थक काळातील इतर रेतीच्या थरांमध्ये फरक आढळतो.[१८] या रेतीचे मूळ खडक या भागात आढळत नाहीत. ही रेतीही गुळगुळीत असून समांगी आहे. या सर्वांवरून या रेतीचे समर्थ आणि सक्षम प्रवाहांकडून अवसादन झाले असावे. या रेतीचा उल्लेख उच्च समतल पातळीतील रेती असा केला जातो. या उच्च समतल पातळीतील रेतीच्या अवसादनापासून येथील भूदृष्य आकृतीबंधात बराच फरक पडलेला आहे. या रेतीचे आणि त्याखालील खडकांचे विदारण या रेतीचे अवसादन करणाऱ्या प्रवाहांच्या निर्मितीनंतरच झालेले आहे. या रेतीच्या अवसादाचा काळ नेवासे येथे ४ लाख वर्षापेक्षा अधीक आणि कुकडी नदीवरील बोरी येथे १३ लाख वर्षे म्हणजेच पुरातत्वीय परिभाषेत अॅश्युलियन कालखंडापेक्षा आधीचा आहे.[१९]

**विदारण आणि मृदा निर्मिती :** चतुर्थक कालखंडातील म्हणजेच गेल्या दोन लक्ष वर्षात विदारण प्रक्रिया (Bedrock weathering) फारशी महत्त्वाची नाही. आद्य चतुर्थक काळातील नेवासे आणि बोरी या स्थानांच्या अभ्यासावरून ही बाब स्पष्ट होते. दोन्ही स्थानांवर रेतीचे अवसाद आधार शिलेवर असून या आधार शिलेचे अपक्षरण प्रामुख्याने नादेय कार्यकत्वामुळे झाले आहे. हे विदारण नगण्य प्रमाणात असल्याचे दिसून येते. याचाच अर्थ हे विदारण चतुर्थक काळात झालेले नाही.

नेवासे येथील उच्च समतल पातळीतील रेतीखाली असणारा तळखडक पाच मीटर खोलीपर्यंत विदारित झालेला दिसतो. बोरी येथेही आद्य चतुर्थक काळातील अप्रवाही

संलक्षणी अवसादांखाली असणारा तळखडक अशाच प्रकारे विदारित झालेला दिसतो. यावरूनच हे तळखडकांचे विदारण आद्य तृतीयक काळातील असले पाहिजे. या काळातील हवामान उत्तर तृतीयक किंवा आद्य चतुर्थक काळापेक्षा अधिक दमट होते. अशाच प्रकारे विदारण झालेल्या असिताष्म खडकातील पार्श्विका महाराष्ट्रातील सध्या शुष्क हवामान असणाऱ्या पठारी भागात बऱ्याच ठिकाणी दृष्टिगोचर होतात.

**मोसमी हवामानाची सुरुवात :** आद्य प्लायस्टोसीन कालखंडात हिमालयाने आणि तिबेटच्या पठाराने सध्याची उंची गाठली. हिमालयाची उंची वाढल्याने अर्थातच नैऋत्य वाऱ्यांच्या मार्गात अडथळा निर्माण झाला. तसेच उत्तरेकडून येणारे थंड वारेही अडवले जाऊ लागले. त्यामुळे एका विशिष्ट प्रकारच्या वाऱ्यांची निर्मिती झाली आणि ऋतुमानानुसार बदलणारे वारे अस्तित्वात आले. यानाच आपण मोसमी वारे असे म्हणतो. मोसमी वाऱ्यांचे अंदाजे कालमापन अवसादांवरूनही करता येते. पुणे जिल्ह्यातील कुकडी नदीच्या खोऱ्यात (घोड नदीची उपनदी), पुण्यापासून १०० कि.मी. उत्तरेकडे असलेल्या बोरी गावाच्या आसपास आणि कुकडी नदीच्या पात्रात सुमारे १० कि. मी. च्या पट्ट्यात दक्षिण भारतात यापूर्वी न आढळलेले अवसाद सापडतात. हे अवसाद पांढऱ्या रंगाचे, ज्वालामुखीय राखेचे[२०] आहेत. ही राख म्हणजे ९० टक्के ज्वालामुखीय काचेची भुकटी असून तिच्या खाली आणि वर सारखेच गुणधर्म असणाऱ्या नदीने वाहून आणलेल्या काळ्या मातीचे[२१] थर आहेत. ही ज्वालामुखीय राख दख्खनच्या पठारात आढळणाऱ्या असिताष्म खडकांपेक्षा गुणधर्माने वेगळी असून आम्ल गुणधर्म असलेली आहे. या राखेचे पोटॅशियम/अरगॉन पद्धतीने[२२] काढलेले वयोमान १३ लक्ष वर्षे येते. याचाच अर्थ राखेखाली असलेली काळी माती आणि राखेवरची काळी माती यांच्या खनिज आणि रासायनिक गुणधर्मांच्या साधर्म्यावरून राखेखालची काळी माती तयार होत असतानाचे हवामान सारखेच असावे असे आता म्हणता येईल. काळ्या मातीच्या थरावरून हे मोसमी हवामान कमीत कमी १५ लक्ष वर्षांपूर्वीपासून अस्तित्वात असावे. अदमासे १३ लक्ष वर्षांपूर्वी ज्वालामुखीय राखेचा वर्षाव महाराष्ट्राच्या पठारावर होत असताना हवामानात तात्पुरते बदल झाले असावेत. या राखेच्या वर्षावामुळे पर्यावरणातील इतरही काही घटकांमध्ये बदल घडून आले. त्यावेळी अस्तित्वात असलेल्या वनस्पतींचे आच्छादन या राखेमुळे नष्ट झाले. वनस्पतींच्या नष्ट होण्यामुळे जमिनीची धूप वाढली आणि रेती व दगड-गोट्यांनी युक्त असा भार मोठ्या प्रमाणात नदीच्या पात्रात आला. याचा पुरावा म्हणजे जेथे जेथे ज्वालामुखीय राखेचे थर साचले, तेथे तेथे या राखेला लागून असलेला वरचा थर अशा दगड-गोट्यांचा आहे. काही ठिकाणी राख आणि दगड-गोट्यांचा मिश्र असा थरही सापडतो. या दगड-गोट्यांच्या थरात राखेखाली असलेल्या काळ्या मातीत आणि काळ्या मातीखाली सहा मीटरवर असलेल्या दगड-गोट्यांच्या थरात आद्य पुराश्मयुगीन दगडी अवजारे[२३] सापडतात. याचाच अर्थ १० लक्ष वर्षांपूर्वी राखेचा वर्षाव या भागात होत असताना आणि त्याही आधी काही वर्षे आदिमानवाचा संचार महाराष्ट्र भूमीवर होता.

ज्वालामुखीय राख स्थानिक अग्निजन्य खडकांपेक्षा गुणधर्माने वेगळी आहे हे आधीच नमूद केले आहे. या राखेचे रासायनिक गुणधर्म सुमात्रा बेटावरील "टोबा" या जिवंत ज्वालामुखीच्या राखेच्या गुणधर्माशी साम्य दर्शवितात हे जर मान्य केले, तर १२ लक्ष वर्षांपूर्वी टोबाच्या उद्रेकातून बाहेर फेकली गेलेली राख ३,००० कि. मी. चा प्रवास करून बोरी येथे स्थिरावली असे म्हणावे लागेल. बोरी येथील राखेच्या कणांचे अतिसूक्ष्म आकारमान पाहता हे अशक्य वाटत नाही. अशाच प्रकारची राख आता अकोल्याजवळ पूर्णा नदीच्या काठी आणि मोरगाव जवळही कऱ्हा नदीच्या काठी सापडली आहे.

**जैविक पुराव्यांवरून पर्यावरणाचे अनुमान :** महाराष्ट्रात सापडणारे जैविक पुरावे दख्खनचे पठार निर्माण होतानाच्या काळातील (आंतर ट्रॅपियन)[२४] म्हणजेच ४ कोटी वर्षांपूर्वीचे किंवा प्लायस्टोसीन (३.५ लक्ष वर्षे) कालखंडातील सापडतात. दख्खनच्या पठाराच्या निर्मितीच्या काळात पर्यावरणातील प्रदूषण वाढून पठाराच्या निर्मितीनंतर पर्यावरणात संतुलन निर्माण होण्यासाठी काही काळ गेला. हा काळ नक्की किती होता हे सांगणे कठीण आहे; तरी पण सात कोटी वर्षांपूर्वी ज्वालामुखीय उद्रेक सुरू झाल्यापासून वीस लक्ष वर्षांपूर्वीपर्यंत तरी महाराष्ट्रात भूस्तरीय व भौगोलिक स्थित्यंतरे चालू असावीत असे म्हणता येईल. अनावरणामुळे या काळात अवसादांचे संचयन झालेले दिसून येत नाही. अवसादांच्या अभावामुळे अर्थातच वनस्पती जीवन फारसे नसावे आणि पर्यायाने प्राणी सृष्टीला पोषक असे पर्यावरण त्या काळात नसावे.

आद्य उत्तर चतुर्थक कालखंडातील भूशास्त्रीय नोंदी चांगल्या रीतीने जतन झालेल्या दिसत नाहीत. कृष्णा नदीच्या खोऱ्यात वाईजवळ मिश्र डबरीतील चूर्णीय अवसादांचे थोरियम-युरेनियम पद्धतीने[२५] काढलेले वयोमान आणि मीना नदीवर रांजणी येथे मध्य पुराश्मयुगीन स्थानात जतन झालेल्या तपकिरी मातीवरून[२६] ७० ते ६०,००० वर्षांपूर्वी क्षीण मोसमी वाऱ्यामुळे शुष्क हवामान असावे. याच काळात पृथ्वीचा बराच भाग शेवटच्या हिमयुगाच्या थंड हवामानाच्या प्रभावाखाली होता.

प्लायस्टोसीन कालखंडात मात्र प्राण्यांची रेलचेल झालेली दिसून येते. या कालखंडात प्राण्यांबरोबरच माणसाचे आगमनही महाराष्ट्रात झाले. महाराष्ट्रातील मानवी जीवन २ लक्ष वर्षे जुने आहे अशी समजूत विसाव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंतच होती. परंतु १९८७ मध्ये याआधी उल्लेखिलेल्या कुकडी नदीच्या अवसादात ज्वालामुखीय राखेखालील काळ्या मातीत मानवी अवजारे सापडल्यानंतर या समजुतीला तडा गेला. राखेच्या वयोमानावरून ही हत्यारे १२ लक्ष वर्षांपेक्षा नक्कीच जुनी आहेत हे सिद्ध होते. या काळातील हवामान जवळपास आजच्या सारखेच होते. महाराष्ट्रातील नद्यांच्या स्वरुपावरूनही ही गोष्ट स्पष्ट होते. या नद्या त्यांच्या निर्मितीच्या काळापासून आतापर्यंत त्यांच्या जुन्या पात्रांमधूनच वाहत आहेत. त्यात लक्षणीय बदल झालेला नाही. कृष्णा नदी मात्र याला काहीशी अपवाद आहे. महाराष्ट्र-कर्नाटक सीमेजवळ येडूरवाडी गावाजवळ कृष्णेने आपले पात्र एक ते दीड कि. मी. ने बदललेले आहे. सोडून दिलेल्या पात्रातील झाडांची खोडे चूर्णीय

खडकात रुपांतरित झालेली आहेत. ही खोडे ज्या नादेय अवसादात सापडतात त्यांचे थोरियम-युरेनियम पद्धतीने काढलेले वयोमान ३.५ लक्ष वर्षांपेक्षा अधिक आहे. याच पात्रात बोरी येथे सापडलेल्या हत्यारांशी मिळती जुळती अवजारेही सापडतात. याचाच अर्थ कृष्णेने जेव्हा आपले पात्र बदलले तेव्हा मानवी वस्ती या भागात अस्तित्वात होती. याच काळातील दगडी अवजारे नेवासे येथेही सापडतात. बोरी, शिरगुपी (येडूरवाडी) आणि नेवासे येथे सापडलेल्या अवजारांमध्ये बरेच साम्य आढळते. म्हणूनच महाराष्ट्रातील मानवी वस्ती ३.५ लक्ष वर्षांपेक्षा अधिक प्राचीन आहे असे म्हणता येते.

उत्तर प्लायस्टोसीन कालखंडात म्हणजेच ख्रिस्त पूर्व ४० हजार ते २० हजार वर्षे या काळात महाराष्ट्रात सर्व प्रकारच्या नैसर्गिक पर्यावरणात राहणारे प्राणी सापडतात. यात जंगली हत्ती आणि आधुनिक हत्तीचा पूर्वज (कालेगाव, मांजरा आणि गोदावरी खोऱ्यात), गाय (घोड, मांजरा, कालेगाव, गोदावरी आणि कृष्णा खोऱ्यात), पाणघोडा (घोड आणि मांजरा खोऱ्यात), म्हैस (घोड, मांजरा आणि गोदावरी खोऱ्यात), बाराशिंगा (मांजरा आणि घोड नदीच्या खोऱ्यात), घोडे (मांजरा, गोदावरी, घोड नदीच्या खोऱ्यात) आणि गेंडा कृष्णा नदीच्या खोऱ्यात सापडतो. या प्राण्यांचा काळ कार्बन-१४[२७] पद्धतीने साधारणपणे ४०,००० ते २०,००० वर्षांपूर्वी[२८] पर्यंत मागे जातो. या कालखंडात हे प्राणी महाराष्ट्रात मोठ्या संख्येने होते. प्राण्यांच्या प्रकारावरून तेव्हा विरळ जंगले, गवताळ प्रदेश तसेच पाणवठ्याचे बरेच प्रदेश विपुल प्रमाणात असावेत हे लक्षात येते. भरपूर वनराई आणि प्राणीजीवन असल्यामुळे या कालखंडातील माणूस मुख्यतः शिकारीवर जगत होता.[२९] त्याचे वास्तव्य नदी, नाले किंवा तळ्यांच्या काठी प्रामुख्याने होते. विपुल प्राणिज अवशेषांवरून या काळात पावसाचे एकूण प्रमाण जरी बेताचे असले तरी भूजल भरपूर उपलब्ध होते हे सिद्ध होते. गवताळ प्रदेशाचा विस्तार जास्त असावा याचे कारण उत्तरपुराश्म काळातील सर्व ठिकाणच्या अवशेषात शहामृगाच्या अंड्यांचे अवशेष सापडतात. पाणघोडा, मगरी, कासव यासारखे प्राणी नदीच्या पात्रात निर्माण झालेल्या पाणथळ भागात राहत होते. या काळात नद्या सध्याच्या पातळीपेक्षा थोड्या वरच्या पातळीत वाहत असाव्यात आणि अवसादांचे संचयन मोठ्या प्रमाणात होत असावे. भूजलाची पातळीं आजच्यापेक्षा वर असल्यामुळेच पर्यावरणाच्या दृष्टीने प्राणी आणि वनस्पतींनी समृद्ध असा हा कालखंड होता.

या नंतरचा काही काळ मात्र (२० हजार ते १० हजार वर्षे) महाराष्ट्रात प्राण्यांचे दुर्भिक्ष असलेला काळ म्हणावा लागेल. कारण या काळात मानवी वस्त्यांचे अवशेष जरी सापडत असले तरी प्राण्यांचे अवशेष सापडत नाहीत. याचे कारण शोधण्यासाठी इतरही अनेक शास्त्रांची मदत घ्यावी लागते. यात हवामानशास्त्र, सागरशास्त्र, वनस्पतीशास्त्र, हिमालयाचा अभ्यास, सूक्ष्मजीवशास्त्र यांचा समावेश होतो. या सर्व शास्त्रांच्या अभ्यासावरून हवामानातील बदल हे मुख्य कारण यामागे दिसून येते. शेवटच्या हिमयुगाची[३०] सुरुवात जरी फार पूर्वी झाली असली तरी त्याचा अत्युच्च

बिंदू १८,००० वर्षांपूर्वी गाठला गेला. यावेळी पृथ्वीवरील हिमखंडाची व्याप्ती खूपच वाढलेली होती. उत्तर आणि दक्षिण गोलार्धात ४०° ते ९०° अक्षांशाच्या पट्ट्यातील संपूर्ण भाग बर्फाच्छादित झाला होता. हिमालय आणि नेपाळ भागातील एकूण हिमरेषा खाली आली होती आणि हिमानींची (Glacial) व्याप्तीही वाढली होती. बरेचसे पाणी बर्फाच्या रुपात बंदिस्त झाल्यामुळे सागरी पातळी खाली गेली. बरीचशी सौरऊर्जा परावर्तीत होऊन वातावरणात निघून जात असल्याने भूपृष्टाजवळील तपमानात खूपच फरक पडला. भूपृष्टाचे तपमान २° ते ६° संटिग्रेडने कमी झाले, तर सागरी तपमान २° ते ३° संटिग्रेडने उतरले. याचा परिणाम अर्थातच मोसमी वाऱ्यांच्या प्रबळतेत झाला. ते अतिशय कमकुवत झाले. मोसमी पावसाचे प्रमाण ५० ते ७० टक्क्यांनी कमी झाले. याचाच अर्थ या काळात अतिशय शुष्क असे हवामान महाराष्ट्रात होते. त्यामुळे भूजलाची पातळी बरीच खाली गेली असावी.

१८,००० वर्षांनंतर तपमान पुन्हा हळूहळू वाढू लागले त्यामुळे हिमनग वितळण्यास सुरुवात झाली. प्रारंभी ही प्रक्रिया मंदगतीने होत होती. सागराची पातळीही हळूहळू वाढू लागली. १०,००० वर्षांनंतर मात्र तपमानात वेगाने फरक पडला आणि हिमनद्यांच्या वितळण्याने सागरी पातळी झपाट्याने वाढली. याचा परिणाम अर्थातच वातावरणातील एकूण बाष्पाच्या प्रमाणात झाला आणि ख्रिस्त पूर्व ९,००० ते ६,००० या कालखंडात पावसाचे प्रमाण खूपच वाढले. या कालखंडाला आद्य नूतनतम कालखंड म्हणतात. हा सर्व बदल पृथ्वीच्या आसात[31] आणि अक्षात फरक झाल्याने झाला. पृथ्वी व सूर्य यांच्यातील अंतर[32] कमी झाल्यामुळे एकूण तपमान २° ते ३° संटिग्रेडने वाढले. मोसमी वाऱ्यांची तीव्रता आणि त्यात असलेली आर्द्रता यांचे प्रमाण वाढले. परिणामतः महाराष्ट्रात पावसाच्या प्रमाणात वाढ झाली. ही वाढ ३० ते ५० टक्क्यांनी झाली असावी असा शास्त्रज्ञांचा कयास आहे. या काळात पर्जन्यमान वाढल्यामुळे नदीच्या पहिल्या टप्प्यात खनन कार्य मोठ्या प्रमाणात झालेले दिसून येते. ७,००० वर्षानंतर नदीने दुसऱ्या टप्प्यात संचयनाला सुरुवात केलेली दिसून येते.[33] ४,००० वर्षानंतर हळूहळू हवामानात बदल होत गेला आणि सध्याचे हवामान[34] स्थिरावत गेले. सुमारे २,००० वर्षांपूर्वी महाराष्ट्रात शेती करण्यास सुरुवात झाली.

महाराष्ट्रातील एकूण प्राणिज आणि मानवी पुराव्यावरून असे लक्षात येते की, प्राणिज अवशेष २० हजार वर्षांपूर्वीचे आणि त्यानंतर ५ हजार वर्षांनंतरचे मिळतात, अश्मयुगीन अवजारे मात्र १५ .लक्ष वर्षांपासून सलगपणे मिळतात. महाराष्ट्राच्या पठारी भागात स्थिर जीवन जगणाऱ्या माणसाच्या वस्त्यांचे अवशेष ३.५ हजार वर्षांनंतर मिळायला सुरुवात होते. दायमाबाद आणि इनामगाव ही अशा वस्त्यांची उत्तम उदाहरणे आहेत, तर आद्य पुराश्म युगापासून मराठ्यांच्या काळापर्यंतच्या वस्तीचे सलगपणे पुरावे मिळणारे " नेवासे " हे महाराष्ट्रातील एकमेव उदाहरण आहे. गेल्या ५ हजार वर्षात पर्यावरणाच्या दृष्टीने तीव्र नैसर्गिक बदल असे फारसे झालेले नाहीत. मोसमी पावसाच्या तीव्रतेत चढउतार होतात. या चढउताराला इतर

जागतिक घटकही कारणीभूत असलेले दिसून येतात. दुष्काळी हवामान सर्वसाधारणपणे दर तीन वर्षांनी एकदा महाराष्ट्रातील मध्य भागात असते.[३५] इतिहास काळापासून पर्यावरणातील बरेचसे बदल माणसाने नैसर्गिक घटकांवर आघात करण्यामुळे झालेले आहेत.

**कोकणपट्टीतील बदल :** आतापर्यंतचे सर्व विश्लेषण हे मुख्यतः महाराष्ट्राच्या पठारी भागाचे होते. कोकणपट्टीतील बदलांचे स्वरूप या बदलांपेक्षा थोडे वेगळ्या प्रकारचे असलेले दिसून येते. याचे कारण कोकणपट्टीत होणारे बदल सागरी पातळीत होणाऱ्या बदलांशी जास्त निगडीत आहेत. महाराष्ट्राची किनारपट्टी अतिशय अरूंद असून तिची रुंदी उत्तरेकडे (मुंबईजवळ) सुमारे ७० कि. मी., तर दक्षिणेकडे (रत्नागिरीजवळ) सुमारे ५० कि. मी. आहे. किनारपट्टीचा दक्षिणेकडील भाग मुख्यतः प्री-कॅम्ब्रियन (Pre-cambrian) कालखंडातील कणाश्म, कलादगी आणि धारवाड सिरीजमधील खडक यांचा बनलेला आहे. इतर भागात मुख्यतः असिताष्म खडक (काळा पाषाण) आणि अगदी अलीकडील म्हणजे चतुर्थक कालखंडातील अवसाद सापडतात. महाराष्ट्रातील कोकणपट्टी खूप अलीकडे तयार झाली असे म्हणता येईल. कोकणपट्टीला लागून असलेल्या सागरी पातळीत जागतिक हवामानातील बदलानुसार चढउतार झालेले दिसून येतात. हिमयुगात तपमानात अतिशय घट झाल्यामुळे सागरी जलातील बराचसा भाग आणि वातावरणातील बाष्पही बर्फ आणि हिमाच्या स्वरुपात भूपृष्ठावर जमा होते. परिणामतः सागरी जलाचे प्रमाण कमी होऊन सागर मागे हटतात आणि भूखंडाच्या किनारी भागातील पाण्याखाली असलेला जमिनीच्या उताराचा भाग उघडा पडतो. याउलट प्रक्रिया आंतरहिमयुगीन काळात तपमानात वृद्धी झाल्यामुळे हिमनग वितळून सागरी पातळीत वाढ होते. नजीकच्या भूतकाळातील यापूर्वीचा आंतरहिमयुगीन कालखंड १.२० लक्ष वर्षांपूर्वी होता. त्या काळातील सागरी पातळी सध्याच्या पातळीपेक्षा ६ ते ८ मीटरने वर होती. या उच्च पातळीचे निश्चित पुरावे " करळ " (शिंपले, वाळू यांचा तयार झालेला खडक) खडकाच्या स्वरुपात उत्तर कोकणातील माहीम व उरण येथे सापडतात. सागरी पातळी उच्च स्थितीत असताना हवामानात थोडा बदल झाला असावा. मोसमी वाऱ्यांची तीव्रता आतापेक्षा जास्त असण्याची शक्यता अधिक संभवते.

२० हजार वर्षांपूर्वी सागरी पातळी २० मीटरपेक्षा खाली असावी असे पुरावे सापडतात. हिमयुगाचा उच्च बिंदू १८,००० वर्षांपूर्वी गाठला गेला. या काळात भूखंड मंचाचा[३६] बराच भाग पाणी मागे हटल्याने उघडा पडला. सागर मागे हटल्याने सागरी पातळीशी संतुलन राखण्याच्या प्रयत्नात नद्या स्वतःच्या तळाचे खनन करू लागल्या. यामुळेच या काळात उघड्या पडलेल्या भूखंड मंचावर रेती आणि पिंडाष्मांचे[३७] अवसाद संचयित झालेले दिसून येतात. हे अवसाद सध्याच्या ओहोटीच्या मर्यादेपर्यंत किंवा त्याहूनही अधिक खाली सापडतात. या अवसादांमध्ये दक्षिण कोकणात मालवण जवळील "हाडी" गावाजवळ मध्य पुराश्मयुगातील मानवी अवजारे आढळून आली आहेत.[३८] या कालखंडात सागरी पातळी खाली गेली होती. याचा आणखी एक पुरावा

म्हणजे अरबी सागरात मुंबई किनारपट्टीपासून १०० कि. मी. अंतरावर आणि सागरी पातळीपेक्षा ५० फॅदम[३९] खोलीवर आढळणारे ऊलीटिक चुनखडीच्या खडकांचे अवशेष. हे अवशेष विशिष्ट प्रकारचे असून त्यांचे अवसाद उथळ समुद्रातच होऊ शकते. हा पुरावा गोव्याच्या राष्ट्रीय सागर विज्ञान संस्थेतील शास्त्रज्ञांनी जगासमोर आणला.[४०] ही निम्न पातळी असताना पश्चिमवाहिनी नद्या स्वतःचे पात्र जास्त तीव्रतेने खणत होत्या आणि महाराष्ट्रातील हवामान, मोसमी वारे कमकुवत झाल्याने जास्त शुष्क होत होते.

**गेल्या १० हजार वर्षातील सागरी पातळी :** सागरी पातळी वाढण्यास खऱ्या अर्थाने १८ हजार वर्षांनंतर म्हणजेच शेवटच्या हिमयुगाचा उच्च बिंदु गाठला गेल्यानंतर सुरुवात झाली. १० हजार वर्षांनंतर ही सागरी पातळी झपाट्याने वाढली. सुमारे ६,००० वर्षांपूर्वी सागरी पातळी सध्याच्या पातळीला स्थिर झाल्यासारखी दिसते.[४१] असे म्हणण्याचे कारण म्हणजे त्यानंतरही सागरी पातळीत एक ते दीड मीटर ने चढउतार झाले आहेत.[४२] ही सागरी पातळी वाढत असताना किनारी प्रदेशात बरीच अस्थिर परिस्थिती निर्माण झाली असावी. कारण यानंतर किनारी प्रदेशात मानवी वस्तीच्या खुणा ४,००० वर्षांनंतरच्या काळातील आढळून येतात.[४३] उत्तर कोकणात या कालखंडात तयार झालेला उच्च पातळीचा निदर्शक "करळ" खडक डहाणूपासून श्रीवर्धनपर्यंत विस्तृतपणे आढळतो. सागरी पातळी वाढत असताना पावसाच्या प्रमाणातही वाढ होण्यास सुरुवात झाली. महाराष्ट्रातील इतर पुराव्यांवरून लक्षात येते की, ९,००० ते ६,००० वर्षे हा कालखंड चांगल्या पावसाचा कालखंड होता. २,००० वर्षांनंतर पुन्हा सागरी पातळीत अतिशय मंदगतीने वाढ होत आहे. या वाढीच्या पुरेशा अभ्यासाअभावी त्याबाबतचे निष्कर्ष काढता येत नाहीत.

**काचघर परिणाम :** सध्या काचघर परिणामाची सगळीकडे चर्चा होताना दिसते. या परिणामाबद्दल अजूनही एकमत झालेले दिसत नाही. त्याचा परिणाम महाराष्ट्रातही जाणवणार आहे. पृथ्वीचा एकूण भूशास्त्रीय आणि पर्यावरणाच्या इतिहासाच्या अभ्यासावरून यापूर्वीही पृथ्वीचे तपमान बरेच वाढले होते, पण ते नैसर्गिकरीत्या कमी झाले हे लक्षात येते. अर्थात पर्यावरणाच्या बाबतीत कुठलीही घटना घडून गेल्यानंतर त्याचा परिणाम ती घटना होत असताना फारसा जाणवत नाही तर ती घडून गेल्यानंतर काही वर्षांनी (काही शत किंवा हजार वर्षे) तो जाणवतो. हा कालावधी त्या घटनेच्या आणि घटनेला कारणीभूत असलेल्या घटकांच्या तीव्रतेवर अवलंबून असतो. या परिणामाला पश्चता परिणाम असेही म्हणतात. सध्या चर्चित असलेल्या काचघर परिणामाची सुरुवात गेल्या शतकातच झालेली आहे. या बदलांची पूर्वसूचना किंवा अशाच प्रकारच्या नैसर्गिक घडामोडींच्या नंतर होणाऱ्या परिणामांच्या माहितीची पूर्वकल्पना हवी असेल तर पूर्वी होऊन गेलेले पश्चता परिणाम आणि त्यांना कारणीभूत झालेल्या बदलांची माहिती मिळवणे महत्त्वाचे ठरते आणि ही माहिती मिळवण्यासाठी पुरापर्यावरणाचा अभ्यास करणे आवश्यक ठरते.

———

# तळटिपा

१ सूर्यावरील डाग : सूर्याच्या पृष्ठभागावर चुंबकीय क्षेत्राशी निगडित असलेले काही भाग आहेत. हे भाग काळ्या रंगाचे दिसतात. यातील तीव्र काळ्या रंगाच्या मध्य भागाचे तापमान ४५०० के. आणि त्या भोवतालच्या फिकट काळ्या भागाचे तपमान त्यापेक्षा थोडे जास्त असते. त्यांच्या तीव्रतेत आणि संख्येत सर्वसाधारणपणे दर अकरा वर्षांनी फरक पडतो. सूर्यावरील डाग आणि पृथ्वीवरील हवामान यांचा परस्पर संबंध असल्याचे दिसून येते.

२ पृथ्वीचा अक्ष : पृथ्वी सूर्याभोवती कललेल्या अवस्थेत फिरते. त्यामुळे विषुववृत्ताचा सूर्याशी २३१/२° चा कोन होतो आणि पृथ्वीचा उत्तर ध्रुव काल्पनिक उत्तर-दक्षिण रेषेशी २३१/२° चा कोन करून दक्षिणेच्या दिशेने कलतो. यालाच पृथ्वीचा अक्ष असे म्हणतात. हे प्रमाण धरून पृथ्वीवर काल्पनिक अक्षवृत्ते काढली जातात.

३ ओझोनचा पट्टा : पृथ्वीभोवतालच्या वातावरणात, भूपृष्ठापासून २० ते २२ कि. मी. आणि ५० ते ५५ कि. मी. दरम्यान ओझोन वायूचा पट्टा आढळतो. यात नेहमीप्रमाणे ऑक्सिजनचे दोन अणू एकत्र न येता तीन अणू एकत्र येतात. नेहमीच्या ऑक्सिजनवर अतिनील किरणांची प्रक्रिया होऊन ओझोनची निर्मिती होते.

४ भूशास्त्रीय कालमापन : पृथ्वीच्या उत्पत्तीपासून वर्तमान काळापर्यंत पृथ्वीवर घडलेल्या घडामोडींनुसार आणि हवामानाच्या बदलांनुसार वेगवेगळे कालखंड तयार होतात. प्रत्येक कालखंडाचे नाव व कालावधीही वेगवेगळा आहे.

प्री कॅम्ब्रियन (Pre-cambrian)–४.५ अब्ज ते १ अब्ज वर्षे

पुराजीवी कल्प ( Palaeocozic/Palocozic)–१०० कोटी ते २५ कोटी वर्षे

मध्य जीवी (Mesozoic)–२५ कोटी ते ७ कोटी वर्षे

नूतन जीवी (Cainozoic era)–७ कोटी ते ३० लक्ष वर्षे

आद्य प्लायस्टोसीन (Proto-Pleistocene)–२० लक्ष ते ७ लक्ष वर्षे

मध्य प्लायस्टोसीन (Middle-Pleistocene)–७ लक्ष ते १.३ लक्ष वर्षे

उत्तर प्लायस्टोसीन (Upper Pleistocene) –
(चतुर्थक कालखंड)–१.३ लक्ष ते ३० हजार वर्षे

अंतिम चतुर्थक (Terminal quarternary)–३० हजार ते १० हजार वर्षे

नूतनतम किंवा आधुनिक (Holocene Age)–१० हजार वर्षांनंतर

५ खंडवहनाचा सिद्धांत (Continental drift) : १९१२ मध्ये आल्फ्रेड वेगेनर यांनी प्रथम मांडला. परंतु तो लागलीच मान्य झाला नाही. १९५० मध्ये हा सिद्धांत पुनः पुराव्यानिशी मांडल्यावर त्याला मान्यता मिळाली. १९६० मध्ये सागरी तळांच्या विस्ताराचा जो अभ्यास झाला त्यातून खंडवहनाच्या सिद्धांताला पुष्टी देणारी बरीच माहिती उजेडात आली. विल्सन, जे. टी. (संपा.), फ्रिमन, डब्ल्यू. एच., **कॉन्टिनेंटस् अड्रिफ्ट ॲण्ड कॉन्टिनेंटस् अग्राऊंड,** सॅन फ्रान्सिस्को, १९७६.

६ डायनोसॉर : डायनोसॉर हे पृथ्वीच्या इतिहासात होऊन गेलेले सर्वांत महाकाय असे प्राणी होते. पृथ्वीवर ते ख्रि. पू. ३० कोटी वर्षांपासून ४ कोटी वर्षांपर्यंत संचार करीत होते. ते उभयचर असून पक्ष्यांसारखेही होते. काही शाकाहारी तर काही मांसाहारी होते. पूर्वीच्या गोंडवनभूमीत त्यांचे वास्तव्य होते. साडेपाच कोटी वर्षांपूर्वी ते मोठ्या प्रमाणात नष्ट झाले. त्यांच्या या समूहनाशामागील एक कारण म्हणजे भारतातील दख्खनच्या पठाराची निर्मिती हे मानण्यात येते.

७ तप्तबिंदू : पृथ्वीच्या भूकवचात बरेच खाली काही कमकुवत भाग असतात. या भागांना तप्तबिंदू असे म्हणतात. ज्यावेळी एखादा सरकणारा तक्ता अशा बिंदूवरून जातो तेव्हा होणाऱ्या हालचालींमुळे प्रावरणातील तप्त शिलारस भूपृष्ठावर येतो. तप्तबिंदू एकापुढे एक असल्यास भेगीय स्वरूपात शिलारस भूपृष्ठावर येतो. काही तप्तबिंदू स्थिर स्वरुपाचे आहेत, तर काही तक्त्यांप्रमाणेच सरकताना आढळतात.

८ सहस्रबुद्धे, वाय. एस्. ॲण्ड राजगुरू, एस्. एन., " द लॅटेराईटस् ऑफ द महाराष्ट्र स्टेट ", **बुलेटिन ऑफ द डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिट्यूट,** व्हॉ. ४९, १९९०, प्रो. एच. डी. सांकलिया मेमोरियल व्हॉल्यूम, पृ. ३५७-३६४.

९ अनिल कुमार, "पॅलिओलॅटिट्यूडस् ॲण्ड द एज ऑफ इंडियन लॅटेराईटस", **पॅलिओजिऑग्रफी, पॅलिओक्लायमेटॉलॉजी, पॅलिओइकॉलॉजी,** ५३, १९८६, पृ.२३१-२३७.

१० राजगुरू, एस्. एन्. ॲण्ड मराठे, ए. आर., "निओटेक्टॉनिक ॲक्टिव्हिटी अराऊंड रत्नागिरी, वेस्टर्न इंडिया", **प्रोसीडिंग्ज ऑफ द सिंपोझियम ऑन क्वाटर्नरी एपीसोडस्,** डिपार्टमेंट ऑफ जिऑलॉजी, एम. एस्. युनिव्हर्सिटी, बरोडा, १९८४.

११ फडतरे, एन्. आर. ॲण्ड कुलकर्णी, ए. आर. "पॅलिनॉलॉजिकल इन्व्हेस्टिगेशन ऑफ रत्नागिरी लिग्नाईट : महाराष्ट्र", **जिओफायटॉलॉजी,** १० (२), १९८०, पृ. १५८-१७०.

१२ पाटील, डी. एन्. ॲण्ड सिद्दीक, एम्. ई., **फील्ड गाईड टू द खानापूर, "रेड बेडस्" महाराष्ट्र (इंडिया), फॉर सेमिनार ऑन द वेदरिंग ॲण्ड सॉईल,** २१-२२ सप्टेंबर १९९२, डिपार्टमेंट ऑफ जिऑलॉजी, पूना युनिव्हर्सिटी, पृ. २८.

१३ हिमालय पर्वतराजी : पृथ्वीवरील भूखंड तक्त्यांच्या स्वरुपात असून ते स्थिर नाहीत. ही हालचाल सध्या मंदावली असली तरी आठ कोटी ते दोन कोटी वर्षांपूर्वी ती तीव्र गतीने होत होती. भारताचा तक्ता उत्तरेकडे सरकत जाऊन साधारणपणे दोन कोटी वर्षांपूर्वी युरेशियाच्या स्थिर तक्त्याला सध्याच्या रशियाच्या दक्षिणेकडे धडकला. या धडकेमुळे दोन्ही प्रदेशांदरम्यान असलेल्या टेथिस सागराच्या अवसादांना घड्या पडून हे अवसाद वर उचलले गेले. अशा रीतीने वळ्या असलेल्या स्तरित खडकांची पर्वतराजी जन्मास आली. ही पर्वतराजी म्हणजेच हिमालय.

१४ विवर्तनिकी (Palaeotectography) : भूगर्भातील प्रावरणात होणाऱ्या हालचालींमुळे भूकवचात हालचाल होते. या हालचालींना विवर्तनिकी असे म्हणतात. या हालचाली लंबरूप आणि समकक्ष अशा दोन प्रकारच्या असतात. विवर्तनिकीमुळे खडकांना चिरा जाणे, भेगा पडणे, एखाद्या प्रदेशाचे खचणे किंवा वर येणे, वळी निर्माण होणे अशा अनेक गोष्टी घडतात.

१५ काळे, व्ही. एस्. ॲण्ड राजगुरू, एस. एन्., " मॉर्फोलॉजी ॲण्ड डेन्युडेशनल क्रोनॉलॉजी ऑफ द कोस्टल ॲण्ड अपलँड रिव्हर बेसीन्स ऑफ वेस्टर्न डेक्कन ट्रॅपिअन लँडस्केप (इंडिया) : अ कोलेशन," **झाइस्फ्ट जिओमॉर्फिक,** ३२ (३) : १९८८, पृ. ३११-३२७.

१६ कॉर्वीन्स, गुडसन, **अ सर्व्हे ऑफ द प्रवरा रिव्हर सिस्टिम इन वेस्टर्न महाराष्ट्र, (इंडिया),** व्हॉ. १, युनिव्हर्सिटॅट टुबिंजेन, १९८१.

१७ जोशी, आर. एस्; पप्पू., आर. एस्.; मराठे, ए. आर.; पांडे आर. पी., " एक्स्कॅवेशन ॲट वागोली-वडोली, अ मिडल पॅलिओलिथिक साईट ऑफ द हाय लेव्हल ग्रॅव्हल ऑन द गोदावरी रिव्हर", **बुलेटीन ऑफ द डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिट्यूट,** पुणे-३९, १९८०, पृ. ४७-४९.

१८ मिश्रा, एस. " द एज ऑफ द ॲश्युलियन इन इंडिया ", **करंट ॲंथ्रॉपॉलॉजी-३३,** १९९२, पृ. ३२५-३२७.

१९ कोरीसेट्टर, आर.; मिश्रा, शीला; राजगुरू, एस. एन्.; गोगटे, व्ही. डी.; गंजू, आर. के.; वेंकटेसन, टी. आर.; टंडन, एस्. के.; सोमयाजुलू, बी. एल. के. अँड काळे, व्ही. एस्., " डिस्कव्हरी ऑफ अ टेफ्रा बेड इन द क्वाटर्नरी ॲल्यूव्हिअल सेडिमेंट्स ऑफ पुणे डिस्ट्रिक्ट (महाराष्ट्र), पेनिन्सुलर इंडिया ", **करंट सायन्स** ५८, १९८८, पृ. ५६४-५६७.

२० ज्वालामुखीय राख : भूगर्भातील हालचालींमुळे भूकवचातील कमकुवत भागातून शिलारस ज्वालामुखींच्या स्वरूपात भूपृष्ठावर येतो. या प्रक्रियेत प्रथम पाण्याची वाफ, इतर वायू आणि काचेची भुकटीही बाहेर टाकली जाते. तीव्र उष्णतेमुळे शिलारसात स्फटिक काच विरघळलेल्या स्वरूपात असते. शिलारस बाहेर

पडताना या काचेचे बारीक बुडबुडे फुटतात आणि काचेची भुकटी तयार होते. ही राख शिलारस कुठल्या भागातून येतो आहे यावर अवलंबून असून ती आम्ल किंवा अल्कली गुणधर्म असलेली असते. आकारमानानुसार आणि उद्रेकाच्या तीव्रतेनुसार ती उद्रेकाच्या ठिकाणापासून जवळ किंवा लांब अंतरावर अवसादित होते. तिचा सर्वसाधारण रंग पांढरा असतो. शास्त्रीय भाषेत या राखेला "टेफ्रा" असे म्हणतात.

२१ काळी माती (Black silt) : निमशुष्क हवामानाच्या प्रदेशात अधिकतर असिताष्म खडकांची झीज होऊन काळी माती तयार होते. भारतात मुख्यत्वेकरून महाराष्ट्र, सौराष्ट्र आणि मध्य प्रदेशात ती मोठ्या प्रमाणात आढळते. राजस्थान, उत्तर प्रदेश, आंध्र प्रदेश, मद्रास आणि म्हैसूरच्या काही भागात ही माती आढळते. बोरी येथील पुराव्यांवरून चतुर्थक काळातील भूदृष्ये तयार होण्याच्या आधीच्या काळातच महाराष्ट्रात काळी माती तयार झाली होती हे स्पष्ट होते. काळ्या मातीचे वैशिष्ट्य म्हणजे पावसाळ्यात पाण्यामुळे ती फुगते आणि पाण्याचे प्रमाण कमी झाल्यावर कोरडी झाल्यामुळे तिला भेगा पडतात. त्या भेगा एक मीटरपर्यंत खोल असू शकतात. पाण्यामुळे फुगत असल्यामुळे या मातीत दलदल लवकर तयार होते.

२२ पोटॅशियम-अरगॉन पद्धत (Potassium Argon Dating) : भूशास्त्रीय अवसादांचे वयोमान काढण्याची समप्रोटॉन पद्धत. यात मूळ स्वरूप न बदललेल्या पोटॅशियम संपृक्त खनिजांचा वापर केला जातो. यात मुख्यतः असिताष्म खडक, ऑब्सीडियन यासारख्या ज्वालामुखीय खडकांचा समावेश होतो. या पद्धतीने २० लक्ष वर्षापर्यंत मागे जाता येते.

२३ पुरातत्वीय पुरावे आणि कालमापन : भूशास्त्रीय कालमापनाप्रमाणेच पुरातत्वीय कालमापनही असते.

१. आद्य पुराश्मयुग (Early palaeolithic age) : सुमारे २० लक्ष वर्षापूर्वी–दगडी तासण्या, हातकुऱ्हाड.

२. मध्य पुराश्मयुग (Middle palaeolithic age) : सुमारे १ लक्ष वर्षापूर्वी–तासण्या.

३. उत्तर पुराश्मयुग (Upper palaeolithic age) : ४० हजार ते १० हजार वर्षे–पाती, वेधक.

४. मध्याश्मयुग (Mesolithic age) : १० हजार ते २ हजार वर्षे–सूक्ष्म पाती, भित्तीचित्रे.

५. नवाश्मयुग (Neolithic age) : ४ हजार ते २ हजार वर्षे–दगडी मातीची भांडी, लोखंडी अवजारे, तांब्याची भांडी आणि अवजारे, शेतीची सुरु

६. महापाषाणयुग (Megalithic age) : २ हजार वर्षांपूर्वी–दगडाची वर्तुळे, लोखंडी अवजारे, घोड्यांचे व माणसांचे सांगाडे, मातीची भांडी.

७. ताम्रपाषाणयुग (Chalcolithic age) : ख्रिस्तपूर्व २५०० ते १८ वर्षे–मातीची भांडी, तांब्याच्या, ब्रॉझच्या वस्तू, घरे, माणसांचे व प्राण्यांचे सां

२४ आंतर ट्रॅपियन (Inter trappean) : दख्खनचे पठार तयार होत असत शिलारसाचे एकावर एक थर वर टाकले गेले. काही वेळा एक थर वर आल्या दुसरा थर बऱ्याच कालावधीनंतर वर आला. दरम्यानच्या काळात या थराची झ होऊन तिथे अवसाद निर्माण झाले. शिलारस थंड झाल्यामुळे असिताष्म खडक निर्मिती झाली. दोन असिताष्म खडकांच्या थरात तयार झालेल्या अवसादी खडक आंतर ट्रॅपियन म्हणतात. अशा आंतर ट्रॅपियन खडकात नागपूरजवळ डायनो या प्राण्याचे अवशेष सापडतात.

२५ थोरियम–युरेनियम पद्धत : भूशास्त्रीय अवसादांचे तसेच पुरातत्त्व अवसादांचे वयोमान काढण्याची एक पद्धत. युरेनियम किरणोत्सर्गी असल्याने त्य विदलन होऊन ठराविक काळात थोरियम तयार होते. युरेनियम पाण्यात विरघळ तर थोरियम विरघळू शकत नाही. जेव्हा द्रावणातील कॅल्शियम कार्बोनेट अवक्षेपण होते तेव्हा त्याबरोबर युरेनियमही येते. परंतु थोरियम अवक्षेपित होत नाह थोरियम आणि युरेनियमचे व्यस्त प्रमाण मोजून कॅल्शियम कार्बोनेट अवक्षेपि होण्याचा कालावधी काढता येतो. काळे, व्ही, एस. "टाईम स्केल ऑफ लँडस्के डेव्हलपमेंट इन द डेक्कन प्लॅटो", **ट्रॉपिकल जिओमॉर्फोलॉजी न्यूजलेटर,** १८ १९९०, पृ. ४,५.

२६ मिश्रा, एस. ॲण्ड घाटे, एस. एन., "रांजणी : अ मिडल पॅलिओलिथिक साईट फ्रॉम महाराष्ट्र", **मॅन अँड एनव्हायर्नमेंट,** १५, १९९०, पृ. २३-२७.

२७ कार्बन--१४ पद्धत (Radiocarbon Dating) याला रेडिओ कार्बन पद्धत असेही म्हणतात. १९४९ साली ही पद्धत अस्तित्वात आली. किरणोत्सर्गी कार्बन--१४ चे ठराविक काळात विदलन होते, हे तत्त्व यात वापरले गेले. सुरुवातीला ही पद्धत फक्त लाकूड, कोळसा यासारख्या पदार्थासाठी वापरली गेली. आता या पद्धतीने हाडे, शिंपले, मातीतील कार्बोनेटस् यांचेही वय काढता येते. या पद्धतीने ४०,००० वर्षे मागे जाता येते.

२८ बदाम, जी. एल. **प्लायस्टोसीन फौना ऑफ इंडिया,** डेक्कन कॉलेज, पुणे, १९७९, पृ. २५०. साठे, व्ही. जी., **"क्वाटर्नरी पॅलिअन्टॉलॉजी ॲण्ड प्रीहिस्टॉरिक आर्किऑलॉजी ऑफ द मांजरा व्हॅली, महाराष्ट्र",** पीएच. डी. थेसिस, पूना युनिव्हर्सिटी, १९८९.

२९ जोशी, यू. व्ही., **लेट क्वाटर्नरी फ्लूव्हिअल स्टॅटिग्राफी, मॉर्फोलॉजी ॲण्ड असोसिएटेड जिऑग्राफिक फीचर्स इन द फूट हिल झोन ऑफ वेस्टर्न अपलँड महाराष्ट्र,** पीएच. डी. थेसिस, पूना युनिव्हर्सिटी, १९९२, पृ. १९४. साळी, एस. ए., **अप्पर पॅलिओलिथिक ॲण्ड मेसोलिथिक कल्चर्स ॲट पाटणे,** डेक्कन कॉलेज मोनोग्राफ, डेक्कन कॉलेज, पुणे, १९८९.

३० हिमयुग ( Ice age ) : पृथ्वीच्या भूशास्त्रीय इतिहासात काही कालखंड हे हिमाची व्याप्ती वाढल्यामुळे थंड आणि शुष्क हवामानाचे होते. यालाच हिमयुग असे म्हणतात. प्लायस्टोसीन कालखंडात एकूण १७ वेळा हिमाची व्याप्ती वाढून कॅनडा, उत्तर अमेरिका, उत्तर युरोप, लंडनच्या उत्तरेकडील ब्रिटनचा प्रदेश आणि सायबेरियाच्या ईशान्येकडील भाग वर्फाच्छादित झाला. अंटार्टिका, ग्रीनलँड आणि अंटार्क्टिका या हिमाच्छादित प्रदेशांची हिमरेषा वाढली आणि पर्वतांवरील हिमरेषा खूप खाली आली. सागरी तपमानात घट झाल्याने सागरी बर्फ विषुववृत्ताच्या दिशेने सरकला. वातावरणातील आणि सागरातील प्रवाहांमध्ये फरक पडला आणि संपूर्ण पृथ्वीवर शुष्क हवामान निर्माण झाले. विषुववृत्तीय जंगले काही बेटांपुरती मर्यादित राहिली आणि आयनिक वाळवंटाची व्याप्ती वाढली. उत्तर गोलार्धातील मध्य कटिबंधात वाऱ्याचा वेग वाढला आणि युरोप, चीन व उत्तर अमेरिकेत मोठ्या प्रमाणात "लोएस" चे अवसादन झाले.

३१ पृथ्वीचा आस आणि पृथ्वी व सूर्य यांच्यातील अंतर : पृथ्वीच्या उत्तर आणि दक्षिण ध्रुवांना जोडणाऱ्या काल्पनिक रेषेला पृथ्वीचा आस असे म्हणतात. पृथ्वीचा आस भ्रमण कक्षेच्या पातळीशी $६६\frac{१}{२}^{\circ}$ चा कोन करतो.

३२ पृथ्वीची सुर्याभोवतीची भ्रमण कक्षा लंबगोलाकृती असल्याने सूर्य आणि पृथ्वीमधील अंतर वर्षभर सारखे नसते. तसेच ते कालानुसारही बदललेले दिसून येते.

३३ काजळे, एम. डी.; बदाम, जी. एल. ॲण्ड राजगुरू, एस. एन., "लेट क्वाटर्नरी हिस्टरी ऑफ द घोड व्हॅली, महाराष्ट्र", **जिओफायटॉलॉजी** ६, १९७६, पृ. १२७-१३७.

३४ कराटीनी सी.; निगम, आर.; बेंटालेब आय.; फॉटुग्ने, एम. एम.; खरे, एन.; मोर्झाडिक-केर्फोन, एम. टी.; पास्कल, जे. पी.; टिस्सोट सी. ॲण्ड नायर, आर. आर.; "न्यू एव्हिडंस फॉर अ ड्रायर क्लायमेट फ्रॉम सर्की ३.५ के. थ्रु अ स्टडी ऑफ मरीन कोअर्स ऑफ वेस्ट इंडियन कोस्ट", **इंटरनॅशनल सिंपोझियम ऑन इव्होल्यूशन ऑफ डेझर्ट (ॲब्स्ट्रॅक्ट),** फिजिकल रिसर्च लॅबोरेटरी, अहमदाबाद, १९९२.

३५ अभ्यंकर, एच. जी., **"लेट क्वाटर्नरी पॅलिओक्लायमॅटिक स्टडीज ऑफ वेस्टर्न इंडिया",** पीएच. डी. थेसिस, युनिव्हर्सिटी ऑफ पूना, १९८७.

## तळटिपा

३६ भूखंडमंच : खंडाच्या किनाऱ्यालगतचा सुमारे १५० मी. खोलीपर्यंतचा जमिनीचा भाग. या भागात सर्वसाधारणपणे समुद्र फार खोल नसतो. भूपृष्ठातील पाच टक्के भाग भूखंड मंचानी व्यापलेला आहे. भूखंड मंचाचा उतारा दर कि. मी. ला एक ते तीन मीटर एवढा असतो.

३७ पिंडाष्म : पाण्याने वाहून आणलेल्या दोन मि. मी. पेक्षा अधिक व्यास असलेल्या दगड--गोट्यांचा तयार झालेला खडक. यालाच गुडदाणीचा खडक असेही म्हणतात.

३८ गझदर, एस. जे., **क्वाटर्नरी एनव्हायर्नमेंट ॲण्ड स्टोनएज कल्चर्स ऑफ द कोकण कोस्ट ऑफ महाराष्ट्र,** डेक्कन कॉलेज, पुणे, १९८०, पृ. १०१.

३९ फॅदम : समुद्राची खोली मोजण्याचे प्रमाण, एक फॅदम म्हणजे सहा फूट.

४० हशीर्मी, एन. एच. अॅण्ड नायर, आर. आर., ''क्लायमॅटिक ॲरिडिटी ओव्हर इंडिया ११,००० इयर्स ॲगो : एव्हिडन्स फ्रॉम फेल्डस्पार डिस्ट्रिब्यूशन इन शेल्फ सेडिमेंटस्'' **पॅलिओजिऑग्रफी, पॅलिओक्लायमॅटॉलॉजी, पॅलिओइकॉलॉजी :** ५३, १९८६, पृ. ३०९-३१९.

४१ घाटे, एस. एन., ''सी लेव्हल फ्लक्चुएशन्स ऑफ नॉर्थ कोकण विथ स्पेशल रेफरन्स टु सोपारा'', **करंट सायन्स,** ५७१ (२४), १९८८, पृ. १३१७--१३२०.

४२ कित्ता.

४३ कित्ता.

---

## प्रकरण २

# अश्मयुग *

मानवी इतिहास स्थूलमानाने प्रागैतिहासिक (Pre-historic), इतिहासपूर्व (Proto-historic) व ऐतिहासिक (Historic) अशा तीन कालखंडात विभागला जातो. यातील पहिल्या दोन कालखंडात एखाद्या देशाचा, समाजाचा अथवा लोकसमुहाचा तसेच लेखनकला अवगत होण्यापूर्वीच्या काळात घडलेल्या घटनांचा समावेश होतो. या कालखंडांविषयी आपल्याला परंपरा, साहित्य अथवा आख्यायिका या स्वरुपात पुरावा मिळत नाही. प्रागैतिहासिक कालखंडाचा बराचसा मोठा भाग अश्मयुगाने (Stone age) व्यापला आहे. त्याला अश्मयुग संबोधण्याचे कारण म्हणजे, या काळात मानव त्याला लागणाऱ्या हत्यारांची निर्मिती प्रामुख्याने दगडापासून करीत असे. दगडाव्यतिरिक्त लाकूड किंवा हाडांसारख्या सेंद्रिय वस्तूंचा वापर निश्चितच थोड्याफार प्रमाणात केला असावा, पण या प्रकारच्या वस्तू नाशवंत असल्याने अगदी क्वचितच जतन होऊ शकतात. म्हणून अश्मयुगाविषयी मिळणारा सांस्कृतिक पुरावा दगडी हत्यारांच्या स्वरुपात मुख्यत्वेकरून जतन झालेला आढळतो.

भूशास्त्रीय कालक्रमानुसार अश्मयुगाचा समावेश क्वाटर्नरी (चतुर्थक) या विभागात केला जातो. हा विभाग पृथ्वीच्या भूशास्त्रीय इतिहासामधला शेवटचा विभाग असून त्याचा कालावधी वर्तमानपूर्व (व. पू.) १८ ते २० लाख वर्षे एवढा आहे. हा कालखंड अद्यापही चालू आहे. पृथ्वीच्या उत्पत्तीपासून म्हणजे ४५०० ते ४७०० दशलक्ष वर्षांचा एकूण इतिहास पाहिला असता हा कालखंड अगदीच संक्षिप्त किंवा लहान आहे. क्वाटर्नरी विभागाची प्लायस्टोसीन (नूतन) व होलोसीन (अगदी अलीकडचा) अशी आणखी दोन उपविभागात विभागणी केली जाते. होलोसीन विभागात शेवटच्या दहा हजार वर्षांचा समावेश केला जातो. क्वाटर्नरी विभाग हा आधीच्या इतर भूशास्त्रीय विभागांशी तुलना करता जरी अल्प कालावधीचा असला, तरी तो अपूर्व गणला जातो. कारण याच काळात आदिमानवाची त्याच्या कपीसदृश पूर्वजापासून उत्पत्ती व क्रमशः उत्क्रांती झाली व मानवाला त्याची सध्याची शारीरिक स्थिती प्राप्त झाली.

पुरामानववंशशास्त्र (Palaeoanthropology) या शाखेत गेल्या काही वर्षात झालेल्या संशोधनाधारे मानवाच्या प्राचीनतेचा काल ३५ ते ४० लाख वर्षे (व. पू.) एवढा मागे गेला आहे आणि ऑस्ट्रेलोपिथेकस (Australopithecus) व होमोहॅबिलीस (Homohabilis) या आद्य मानवशाखेची उत्पत्ती २० ते ४० लाख वर्षांपूर्वी प्लायोसीन (Pliocene) या भूशास्त्रीय विभागात आफ्रिका खंडात झाली हे आता सिद्ध झाले आहे.

---

* या प्रकरणाचे लेखन डॉ. र. सु. पप्पु (निवृत्त प्रपाठक, पुरातत्व विभाग, डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्यूएट अँड रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे) यांनी केलेले आहे.

अश्मयुगाचा कालावधी फारच मोठा असल्याने त्याची पुराश्मयुग (Palaeolithic), मध्याश्मयुग (Mesolithic) व नवाश्मयुग (Neoltithic) अशा तीन वर्गात सामान्यतः विभागणी केली जाते. त्यातील पुराश्मयुगाचे आद्य पूर्व (Lower), मध्य (Middle) व उत्तर (Upper) असे आणखी तीन उपविभाग कल्पिले आहेत. ही विभागणी मुख्यतः दगडी हत्यारे बनविण्याच्या तंत्रावर आधारलेली असून प्रत्येक उपविभागातील तंत्रपद्धती व हत्यारप्रकार भिन्न प्रकारचे व वैशिष्ट्यपूर्ण असतात. तसेच ते मानवी सांस्कृतिक विकासातील एक महत्त्वाचा टप्पा दर्शवितात.

आदिमानवाच्या जीवनपद्धतीची पुनर्रचना करण्यासाठी प्रागैतिहासिक तज्ञाला मानवनिर्मित दगड व इतर वस्तूंपासून बनविलेली हत्यारे, वनस्पती, प्राणी व मानवी अवशेष तसेच मानवी व स्थानांत मिळणाऱ्या इतर साधनांचा आधार घ्यावा लागतो. अश्मयुगातील सांस्कृतिक अवशेष या कालखंडाचा एकूण मोठा अवधी पाहता फारच कमी प्रमाणात मिळतात. प्रागैतिहासिक तज्ञांचे मुख्य उद्दिष्ट आदिमानवाच्या कालातील पुरापर्यावरण समजून घेणे हे असते. सध्या युरोप, आफ्रिका व इतर देशात यासाठी भौतिकी, भूशास्त्र व जीवशास्त्र या शाखांमधील विश्लेषण व तंत्रपद्धतींचा अवलंब करण्यात येतो. ही बहुशास्त्रीय प्रणाली पद्धती असून त्याचा मुख्य हेतू आदिमानवाच्या जीवनपद्धतीतील विविध पैलूंचा सविस्तर अभ्यास करणे हे असते. भारतात या प्रकारच्या संशोधनाचा अवलंब गेल्या काही दशकांत अनेक अश्मयुगीन स्थळांच्या अभ्यासासाठी पद्धतशीरपणे केला जात आहे.

## अश्मयुगीन संशोधनाचा आढावा

अश्मयुगीन संशोधनास सुरुवात होऊन आता १०० हून अधिक वर्षे लोटली आहेत. भारतात पहिले अश्मयुगीन हत्यार रॉबर्ट ब्रुस फूट या भूशास्त्रज्ञाला ३० मे १८६३ रोजी मद्रास नजिक पल्लावरम या ठिकाणी सापडले.[१] १९५४ सालापर्यंत अश्मयुगाच्या विविध कालखंडाचा भरभक्कम पुरावा भारतात मिळाला नव्हता. जी थोडीफार माहिती होती, ती आद्य-पुराश्मयुग व मध्याश्मयुग यापुरती मर्यादित होती. १९५४ मध्ये सांकलिया यांना मध्य-पुराश्मयुगीन हत्यारे स्तरीय संदर्भात प्रवरा नदीकाठी, नेवासा (जिल्हा अहमदनगर) या ठिकाणी मिळाली.[२] यावेळी असे गृहीत धरले होते की, भारतात उत्तर-पुराश्मयुग नव्हते व मध्य-पुराश्मयुगाचे रुपांतर एकदम मध्याश्मयुगात झाले. १९६४ च्या सुमारास मूर्ती यांना स्तरीय संदर्भात उत्तर-पुराश्मयुगीन दगडी हत्यारे, पाते व कोरणी समूह (Blade and Burin Industry) आंध्र राज्यात रल्लकल्वा नदीच्या खोऱ्यात (जिल्हा चित्तूर) येथे सापडली.[३] त्यानंतर याच काळातील आणखी हत्यारे भारतातील विविध भागात मिळाली. या प्रकारे भारतात अश्मयुगीन संस्कृतीच्या विविध अवस्थांचे अस्तित्व सिद्ध करण्यासाठी प्रागैतिहासिक तज्ञांना अनेक दशके संशोधन करावे लागले.

गेल्या चाळीस वर्षांत महाराष्ट्रात झालेल्या पुरातत्वीय अन्वेषणात मिळालेल्या पुराव्याधारे अश्मयुगीन संस्कृतीचा आद्य-पुराश्मयुगापासून ते मध्याश्मयुगापर्यंत क्रमबद्ध इतिहास मांडणे आता शक्य झाले आहे. या लेखात अश्मयुगीन कालासंबंधी महाराष्ट्रात झालेल्या संशोधनाचा थोडक्यात परामर्श घेण्यात आला आहे.

महाराष्ट्रात अश्मयुगीन संशोधनाची सुरुवात १८६५ साली वायने या भूगर्भशास्त्रज्ञाला गोदावरीकाठी पैठणजवळ मुंगी येथे, अगेट या दगडापासून काढलेल्या छिलका हत्यारांचा शोध लागल्यापासून झाली.[४] १९०४ च्या सुमारास पिलग्रीम यास नांदुर-मधमेश्वर (जिल्हा नाशिक) येथे प्राचीन हत्तीचे अवशेष स्तरीय संदर्भात[५] मिळाले. या दोन महत्त्वाच्या शोधांखेरीज १९३९ पर्यंत या क्षेत्रात काहीच उल्लेखनीय कामगिरी झाली नव्हती. टॉड यांना १९३९ च्या सुमारास कांदिवली-बोरीवली या मुंबईच्या उपनगरात अश्मयुगाच्या तीनही, तसेच मध्याश्मयुगाच्या अवस्थेची हत्यारे विशिष्ट थरात मिळाली.[६] सर्वात आश्चर्याची गोष्ट म्हणजे ज्यांनी भारतीय प्रागैतिहासिक संशोधनाचा पाया घातला, त्या रॉबर्ट ब्रूस फूट यांना महाराष्ट्र भूमीत आदिमानवासंबंधी काहीच पुरावा आढळला नाही. त्यांच्या मते, आद्य-पुराश्मयुगीन मानव प्रामुख्याने क्वार्टझाईट या खडक प्रकारापासून हत्यारे बनवत होता व महाराष्ट्रात या दगडाचा अभाव असल्याने तसेच या प्रदेशात त्या काळात घनदाट अरण्ये असल्याने अश्मयुगीन संस्कृतीसंबंधी पुरावा मिळण्याची शक्यता कमी होती.[७] तथापि, सांकलिया यांनी नंतरच्या काळात गोदावरी नदीच्या खोऱ्यात संशोधन करून फूट यांचा सिद्धांत चुकीचा आहे हे सिद्ध केले.[८]

## आद्य-पुराश्मयुग

महाराष्ट्रातील मानवी वस्तीचा सर्वात प्राचीन पुरावा आद्य पुराश्मयुगकालीन होय. भारतात या काळातील दोन वैशिष्ट्यपूर्ण परंपरा खालीलप्रमाणे आढळून येतात. गोट्यापासून बनविलेली तोड हत्यारे (Chopper - Chopping tool tradition) आणि द्विपृष्ट संस्कारित हातकुऱ्हाड-फरशी (bifacial or handaxe cleaver tradition) या प्रकारची हत्यारे. भारतीय द्वीपकल्पात मिळणारी आद्य-पुराश्मयुगीन हत्यारे ही दुसऱ्या परंपरेतील आहेत. या परंपरेचे तंत्रपद्धतीवर आधारित ॲबेव्हिलियन व अश्युलियन असे आणखी दोन सांस्कृतिक विभाग पाडले आहेत. ॲबेव्हिलियन व ॲश्युलियन ही स्थळे फ्रान्समध्ये सोम नदीच्या काठी असून या ठिकाणी वरील तंत्राची हत्यारे सर्वप्रथम मिळाली. त्यामुळे या तंत्रपद्धतींना ही स्थळीय नावे दिली गेली. ॲबेव्हिलियन तंत्राची हत्यारे ओबडधोबड असून त्यांच्या काढलेल्या छिलक्यांच्या खुणा मोठ्या व खोलगट, तसेच कडा नागमोडी असतात. ॲश्युलियन हत्यारांवर काढलेल्या छिलक्यांच्या खुणा लहान व पातळ तसेच हत्यारांच्या कडा सरळ व धारदार असतात. ॲश्युलियन पद्धती अधिक प्रगत होती. भारतातील विविध भागात मिळणारे आद्य-पुराश्मयुगीन हत्यार संच ॲश्युलियन तंत्रपद्धतीनुसार बनविलेले आढळतात. ॲबेव्हिलियन तंत्रपद्धती त्यामानाने कमी प्रमाणात अवलंबलेली दिसून येते.

**व्याप्ती :** गेल्या ३० वर्षात झालेल्या संशोधनामुळे महाराष्ट्रातील गोदावरी, प्रवरा, मुळा-मुठा, कृष्णा, भीमा, तापी, मांजरा, घोड इत्यादी नद्यांच्या खोऱ्यांत आद्य पुराश्मयुगकालीन अनेक स्थळे उजेडात आली आहेत[९] (आकृती १). तरीही मिळणारा हा पुरावा शेजारील कर्नाटक, आंध्र, मध्य प्रदेश व गुजरात राज्यात मिळणाऱ्या पुराव्यांशी तुलनेने कमी प्रमाणात आहे. याचे एक प्रमुख कारण म्हणजे आद्य-पुराश्मयुगीन मानवाने हत्यार निर्मितीसाठी प्राधान्य दिलेला क्वार्टझाईट हा दगड महाराष्ट्रातील बऱ्याचशा भागात (८५ ते ९० टक्के) उपलब्ध नाही. दुसरे कारण म्हणजे महाराष्ट्रात अजून बऱ्याच भागात सखोल संशोधन झालेले नाही. या दोन कारणांव्यतिरिक्त आणखी एक कारण शिला मिश्र यांनी मांडले आहे.[१०] त्यांच्या मते महाराष्ट्रात सर्वत्र आढळून येणाऱ्या डेक्कन ट्रॅप बेसाल्ट या खडक प्रकाराचे वातावरणीय प्रक्रियेमुळे त्वरित विघटन होते. या खडकापासून बनवलेली हत्यारे व पर्यायाने ते ॲश्युलियन स्थळ, निक्षेपाने त्वरित गाडले न जाता उघडे राहिले, तर अशा हत्यारांचे कालांतराने विघटन होते. याच कारणाने अनेक ॲश्युलियन स्थळे नष्ट झाली असावीत.

**हत्यारांचे प्रकार :** आद्य-पुराश्मयुगात वापरलेली दगडी हत्यारे मुख्यतः तीन-चार प्रकारची होती. त्यात हातकुऱ्हाड (handaxe), फरशी (cleaver), तोडहत्यारे (chopper) व तासणी (scraper) ही प्रमुख हत्यारे होत (आकृती २). यातील सर्वात महत्त्वाचे हत्यार ज्याला या काळातील प्रातिनिधिक हत्यार म्हणता येईल, ते म्हणजे हातकुऱ्हाड हे होय. हे हत्यार सर्वसाधारणपणे बुडाला जाड असून वरच्या भागात क्रमशः निमुळते होत होत अग्रभागी टोकदार असते. हातकुऱ्हाडी मोठ्या आकाराच्या छिलक्यांपासून, गोट्यांपासून अथवा छिलके काढलेल्या मोठ्या गाभ्यांपासून बनविल्या जात. दोन्ही पृष्ठावर छिलके काढलेले आढळतात. हातकुऱ्हाडी पीअर फळासारखी लंबगोल, अंडाकृती, त्रिकोणी, हृदयाकार, भालाकृती इत्यादी अनेक आकारांत आढळतात. हातकुऱ्हाडी अत्यंत सुबक बनावटीच्या व कलात्मक वाटतात. यावरून ॲश्युलियन मानवाने त्या बनविण्यासाठी बरेच परिश्रम घेतले असावेत व तत्कालीन मानवाला सौंदर्यदृष्टीही होती असे दिसून येते. हातकुऱ्हाडीनंतर दुसरे महत्त्वाचे हत्यार म्हणजे फरशी हे होय. सध्याच्या लोखंडी कुऱ्हाडीसारखी याची कडा रूंद असते. ही कडा सरळ, वाकडी अथवा बहिर्गोल आकाराची दिसून येते. हत्याराची मोठी आस या कडेला काटकोन करते. फरशीमध्ये चौरस, काटकोन चौकोनी अथवा इंग्रजी यू (U) या आकाराप्रमाणे बुड असलेली व टोकदार बुडाची रूंद व इंग्रजी व्ही (V) या आकाराप्रमाणे असलेली असे दोन प्रकार आढळतात. तोड हत्यारे एकपृष्ट अथवा द्विपृष्ट संस्कारित अशा दोन प्रकारात आढळतात. ही हत्यारे आकाराने मोठी व वजनाने जाड असून योग्य आकाराच्या गोट्यांपासून बनविली जात. या हत्यारांच्या कडा नागमोडी असतात. त्या छिलके काढलेल्या हत्यारांवरील खुणांच्या परस्पर छेदनामुळे तयार होतात. तासण्या या तोड हत्यारांसारख्याच पण आकाराने लहान असतात.

**तंत्रपद्धती :** हत्यार निर्मितीसाठी वापरलेले तंत्र युरोप व इतर देशात वापरलेल्या तंत्रासारखे आहे. आद्य पुराश्मयुगात तीन तंत्राचा वापर प्रामुख्याने केला गेला. (१) गोट्यावर गोटा आपटून मोठा छिलका काढण्याचे तंत्र (block-on-block technique), (२) अश्म घण तंत्र (stone hammer technique) व (३) मृदु घण व दण्ड घण तंत्र (soft hammer and cylinder hammer technique). पहिल्या तंत्राचा वापर करून मोठ्या आकाराचा छिलका काढला जाई. या काढलेल्या छिलक्यावर संस्करण करून आणखी लहान आकाराचे छिलके काढले जात व हत्याराची सर्वसाधारण रूपरेषा बनविली जाई. तिसऱ्या तंत्राचा उपयोग करून लहान आकाराचे छिलके काढले जात. यासाठी लाकडी दांडक्याचा अथवा दणकट हाडाच्या दंड्याचा उपयोग केला जाई व पाहिजे त्या आकाराचे हत्यार अंतिम स्वरुपात बनविले जाई. छिलके हे प्रत्यक्ष घणाघात करून क्लॅक्टोनियन (clactonian) तंत्रपद्धतीनुसार काढले जात. काही हत्यारे लव्हाल्वा (lavalloisian) या प्रगत तंत्राचा वापर करून काढलेल्या छिलक्यापासून बनविली जात. या तंत्रात ज्या छिलक्यापासून हत्यार बनवावयाचे त्याची रूपरेषा आधी ठरविलेली असे व योग्य प्रकारचा दाब देऊन योजनाबद्ध छिलका काढला जात असे.

**हत्यार समुहाचे स्वरूप :** युरोपमध्ये अॅश्युलियन संस्कृतीत तीन उत्क्रांतिदर्शक (विकास) टप्पे (आद्य, मध्य व उत्तर अथवा प्रगत अॅश्युलियन) आढळून येतात. भारतात अॅश्युलियन हत्यारे संमिश्र स्थितीत (उत्कृष्ट व निकृष्ट बनावटीची) सर्वत्र आढळतात व इतरत्र आढळणारा उत्क्रांतिदर्शक पुरावा कोठेही मिळत नाही. तंत्रपद्धतीचा अभ्यास करून अॅश्युलियन हत्यारसंचाचे आद्य व उत्तर अशा दोन प्रमुख विभागात वर्गीकरण केले आहे. पहिल्या समुहातील हत्यारे जाड, थोडीफार ओबडधोबड, काढलेल्या छिलक्याच्या खुणा मोठ्या आकाराच्या व खोलगट, छेद अप्रमाणबद्ध व कडा नागमोडी अशा स्वरुपात आढळून येतात. हातकुऱ्हाडीचे आकार पीअर फळ, भाला या आकाराचे असतात. दुसऱ्या समुहातील हत्यारे कमी जाडीची, प्रमाणबद्ध काढलेल्या छिलक्यांच्या खुणा सपाट व लहान आकाराच्या व कडा सरळ अशा स्वरुपात दिसून येतात. हत्यारे मोठ्या छिलक्यांपासून तयार केली जात. चिरकी-नेवासा,[११] भाडणे[१२] व बोरी[१३] येथील हत्यारसंच हा पहिल्या समुहप्रकाराचा व गंगापूर[१४] येथील हत्यारसंच दुसऱ्या समुहप्रकाराचा होय.

**हत्यारांचा उपयोग :** शिकार व कंदमुळांवर उदरनिर्वाह करणाऱ्या सध्याच्या वन्य जमाती हातकुऱ्हाड, फरशी यांसारख्या हत्यारांचा वापर करताना आढळून येत नाहीत. या हत्यारांचा निश्चित उपयोग काय होता हे समजून घेण्यासाठी हत्यारांचा आकार व त्यांच्या कडांच्या आकारांवरून काही प्रयोग करून ठरविले जाते. हातकुऱ्हाडींचा उपयोग निरनिराळ्या कामांसाठी होत असावा. त्यांच्या निमुळत्या टोकाचा उपयोग जमिनीतून कंदमुळे उकरून काढण्यासाठी आणि धारदार कडा असलेल्या बाजूचा

उपयोग मांसाचे तुकडे करण्यासाठी होत असावा. याशिवाय उंच झाडावर खाचा पाडून चढण्याकरिता अथवा तासण्यासाठी केला असावा. सर्व दृष्टीने हातकुऱ्हाड हे हत्यार विविध कार्योपयोगी होते. फरशीचा उपयोग जनावरांचे मांस अथवा झाडाच्या फांद्या तोडण्यासाठी अथवा कातडे सोलण्यासाठी होत असावा. वर उल्लेखिलेले उपयोग हे प्रयोगांती सिद्ध झाले आहेत.

**हत्यारनिर्मितीसाठी वापरलेली कच्ची सामुग्री :** ॲश्युलियन मानवाने क्वार्टझाईट या खडक प्रकाराला हत्यारे बनविण्यासाठी प्राधान्य दिले होते. हा खडक प्रकार महाराष्ट्रात तुरळक प्रमाणात आढळतो. महाराष्ट्र भूमीचा ९० टक्क्यांहून अधिक भाग क्रिटेशिअस इओसिनकालीन डेक्कन ट्रॅप बेसाल्ट या अग्निजन्य लाव्हारसापासून तयार झालेल्या खडक प्रकाराने व्यापला आहे. या बेसाल्ट खडकामध्ये डोलेराईट या खडक प्रकाराच्या भित्ती (dykes) अनेक टिकाणी आढळून येतात. डेक्कन ट्रॅप या खडकामध्ये तीन-चार प्रकार आढळतात. ॲश्युलियन मानवाने हे सर्व खडक प्रकार व डोलेराईट हत्यारनिर्मितीसाठी वापरलेले होते. अर्थात प्राधान्य कठीण व टणक जातीच्या बेसाल्ट व डोलेराईट या खडक प्रकाराला दिले होते. पाहिजे त्या आकाराचा नैसर्गिक स्वरुपातील खडकाचा तुकडा निवडून अथवा नदीने वाहत आणलेल्या विविध आकाराच्या गोट्यांपासून तसेच गुरुत्वाकर्षणामुळे उतारावरून घरंगळत आलेल्या दगडगोट्यांच्या थरांतील घटकांपासून हत्यारे केली जात.

डेक्कन ट्रॅप कक्षेबाहेरील भूभागात स्थानिक उपलब्ध असलेल्या खडक प्रकाराचा उपयोग केला होता. चंद्रपूर जिल्ह्यातील पापामिया टेकडी येथे गोंडवनकालीन शेल, क्वार्टझाईट व अश्मिभूत लाकडांचा उपयोग हत्यारासाठी केला होता.[१५] कोकणात मालवण येथे (जिल्हा सिंधुदुर्ग)[१६] व वेंगरुळ व आजरा (जिल्हा कोल्हापूर) येथे कलादगी प्रस्तर समूहातील क्वार्टझाईट या खडक प्रकारचा उपयोग हत्यारनिर्मितीसाठी केला होता.[१७]

**स्तरीय संदर्भ :** अश्मयुगीन हत्यारे नद्यांच्या खोऱ्यात आढळणाऱ्या निक्षेपाशी म्हणजेच गाळांच्या थराशी निगडित असतात. या निक्षेपाची प्लायस्टोसीनकालीन प्राचीन निक्षेप व होलोसीनकालीन नवनिक्षेप अशी विभागणी केली जाते. नद्यांच्या खोऱ्यांत निक्षेपांचे जे छेद उघडकीला आले आहेत, त्यावरून असे अनुमान काढता येते की, हा निक्षेप नदीच्या संचयन व खनन क्रियेमुळे व दोन ते तीन चक्रांमध्ये (cycles) तयार झालेला आहे. प्रत्येक चक्राची सुरुवात मोठ्या दगडगोट्यांच्या थराने झालेली दिसून येते; तर शेवटचा भाग हा बारीक वाळू अथवा मळीसारख्या लहान आकाराच्या गाळाने बनलेला आहे. पहिल्या चक्राच्या तळाशी जो दगडगोट्यांचा थर आढळतो, त्यात आद्य-पुराश्मयुगीन हत्यारे मिळतात. दुसऱ्या चक्राची सुरुवात मध्यम आकाराच्या दगडगोट्यांच्या थराने होते, तर शेवट बारीक आकाराच्या वाळूने अथवा मळीने होतो. या थरात मध्य-पुराश्मयुगीन हत्यारे मिळतात. उत्तर-पुराश्मयुगीन व

मध्याश्मयुगीन हत्यारे प्राचीन निक्षेपाच्या अखेरच्या वरील भागात आढळतात व त्यावरून या हत्यारांचा काळ अंतिम प्लायस्टोसीन असावा हे सुचवतात. निक्षेपाच्या वरील पृष्टभागाचे रुपांतर वातावरणीय प्रक्रियेमुळे काळ्या मातीत झालेले दिसून येते. सर्वसाधारणपणे नवनिक्षेप हा प्राचीन निक्षेपाच्या पार्श्वभूमीवर रेललेल्या स्थितीत आढळतो.

**स्थळांचे स्वरूप :** आद्य-पुराश्मयुगीन वसतीस्थाने असे सुचवतात की, ॲश्युलियन मानवाने आपले वास्तव्य नदी परिसरात, समुद्रकाठी अथवा डोंगराच्या पायथ्याशी सपाट भूमीवर केले होते. स्थळ निवडतांना बारमाही पाण्याचा सुलभ व मुबलक पुरवठा, अन्न व हत्यारनिर्मितीसाठी आवश्यक असणाऱ्या खडकांची उपलब्धता या बाबी मुख्यतः विचारात घेतल्या होत्या. अश्मयुगीन स्थळे सर्वसाधारणपणे पुढील प्रकारात मोडतात : (१) मूळ वसतीस्थाने, (२) हत्यारनिर्मिती केंद्रे, (३) स्तरीय संदर्भातील उघड्यावरील स्थळे, (४) उताराने आणलेल्या दगडगोट्यांच्या निक्षेपाशी संलग्न असलेली स्थळे आणि (५) उघड्यावरील स्थळे.

पहिल्या प्रकारच्या स्थळात ॲश्युलियन मानव प्रत्यक्ष वास्तव्य करीत असे. तेथूनच त्याचे दैनंदिन व्यवहार चालत. ही स्थळे गाडलेल्या अथवा झाकलेल्या स्वरुपात आढळतात, म्हणून येथे मिळणाऱ्या सांस्कृतिक अवशेषांचे जतन मूळ स्वरुपात झालेले असते. या स्थळांचे वैशिष्ट्य म्हणजे येथे मिळणारी हत्यारे पूर्णावस्थेत व कोरी (न झिजलेली) असतात. कित्येकदा येथे जीवाश्म (fossils) देखील आढळून येतात. याव्यतिरिक्त मनुष्यवस्तीचा इतर सूचक पुरावाही मिळतो. अशा मूळ वसतीस्थानांचा शोध लावून त्या स्थळांचे उत्खनन करणे व परिस्थिती विज्ञान आणि वसाहत रचना यांच्या दृष्टिकोनांतून या स्थळांचे योग्य मूल्यमापन करणे यावर भर दिला जातो. महाराष्ट्रातील वरील प्रकारात मोडणारी व उत्खनन केलेली स्थळे पुढीलप्रमाणे आहेत. गंगापूर (गोदावरी नदी)–जि. नाशिक,[१८] भाडणे (कान नदी)–जि. धुळे,[१९] चिरकी-नेवासा (प्रवरा नदी)–जि. अहमदनगर[२०] व बोरी (कुकडी नदी)–जि. पुणे.[२१]

हत्यार निर्मितीकेंद्र हे सर्वसाधारणपणे जेथे नैसर्गिक स्वरुपात हत्यार बनविण्यास योग्य असा खडक उपलब्ध असतो अशा ठिकाणी आढळते. अशा स्थळांमध्ये अपूर्ण अवस्थेतील हत्यारे, छिलके, गाभे व हत्यारे बनविताना निघालेले लहान आकाराचे छिलके फार मोठ्या प्रमाणात आढळतात. चिरकी-नेवासा हे स्थळ या प्रकारात मोडणारे आहे. हे स्थळ उताराने घरंगळत आलेल्या दगडगोट्यांच्या निक्षेपाशीदेखील निगडित आहे. चिरकी-नेवासा येथील अणकुचीदार दगडगोट्यांचा थर हा ॲश्युलियन उद्योगसमुहाचा स्तर आहे. हा स्तर सध्याच्या नदीच्या पात्रापासून ५ ते २० मीटर उंचीवर आहे. ज्यावेळी ॲश्युलियन मानवाचे या ठिकाणी वास्तव्य होते त्यावेळी प्रवरा नदी ही आतापेक्षा खालच्या पातळीवर वाहत होती. तत्कालीन मानवाने नदीच्या उजव्या काठावर दगडगोट्यांच्या थरानजिक वास्तव्य केले. या थरातील लहानमोठ्या आकाराच्या विविध गोट्यांचा उपयोग त्याने हत्यारनिर्मितीसाठी केला.

दुसऱ्या प्रकारची स्तरीय संदर्भातील स्थळे ही नद्यांच्या परिसराशी निगडित असतात. या ठिकाणी हत्यारे ही नद्यांनी संचयन केलेल्या दगडगोट्यांच्या थरात घट्ट रुतून बसलेल्या स्थितीत आढळतात व असे दर्शवितात की, ती बऱ्याच अंतरावरून पाण्याच्या प्रवाहाबरोबर वाहत आलेली आहेत. भारतात, युरोप व आफ्रिका या देशातील प्रागैतिहासिक संशोधन पद्धतीनुसार सुरुवातीच्या काळात अन्वेषण हे नद्यांच्या परिसरात झाले. या संशोधनामुळे अनेक दुय्यम प्रकारची स्थळे उघडकीस आली. नेवासा, भाडणे, महाड, मालवण इत्यादी स्थळे या वर्गात मोडणारी आहेत. वरील प्रकारच्या स्थळांना आपण मूळ प्राथमिक स्थळे (मूळ वसतीस्थळे) असे संबोधू शकत नाही. असे जरी असले, तरी या स्थळांचा अभ्यास करणे हे अनेकदृष्ट्या इष्ट ठरते. प्रथमतः हत्यारांच्या स्वरुपांवरून मूळ स्थान किती लांब वसले असावे याचा अंदाज बांधता येतो. दुसरे म्हणजे नदीचा संचयन व खनन या स्वरुपातील इतिहास निक्षेपातील थरांद्वारे कळून येतो.

अनेक स्थळे स्तररहित संदर्भात उघड्यावर आढळतात. या स्थळांचा उपयोग पुरापर्यावरण अथवा कालक्रम कळून घेण्यासाठी होत नाही. हत्यारे उघड्यावर, नद्यांच्या मंचकांवर, सध्याच्या नद्यांच्या पात्रात अथवा समुद्र किनाऱ्यावर झिजलेल्या स्वरुपात आढळतात. वरील प्रकारच्या स्थळांना पुरातत्वीय स्थळे म्हणणे बरोबर नाही. यांना हत्यारशोध ठिकाणे असे संबोधणे योग्य टरेल.

**पुरापर्यावरण :** पुरापर्यावरण ही गुंतागुंतीची बिकट समस्या असून ती पुरातनकालीन हवामान, भूमिस्वरूप, खडक व खनिज, मृदा, वनस्पती व प्राणी यांच्याशी संलग्नित आहे. प्राचीन मानवी समाजाचा अभ्यास हा केवळ सांस्कृतिक अवशेषांच्या आधारे करणे योग्य नाही. एखाद्या भागातील आदिमानवाच्या जीवनपद्धतीची विविध दृष्टिकोनातून जर माहिती करून घ्यावयाची असेल तर तत्कालीन भौतिक, वनस्पती व प्राणीजन्य पर्यावरण समजून घेणे हे अत्यंत आवश्यक ठरते.

भारतीय द्वीपकल्पात हिमयुगासारखे थंड प्रकारचे हवामान कधीच नव्हते. आपणास जी भूमिस्वरुपे पाहावयास मिळतात ती नद्यांचे वाहते पाणी, समुद्रलाटा, प्रवाह व वारा या कारणांमुळे घडून येणाऱ्या झीज व भर या प्रक्रियेमुळे तयार झालेली आहेत.

लहानमोठ्या आकाराच्या नद्या महाराष्ट्रातील सर्वच भागात आढळतात. मानवी संस्कृतीच्या इतिहासात या नद्यांना महत्त्वाचे स्थान आहे. अश्मयुगीन काळात तर मानव बारमाही पाणीपुरवटा असणाऱ्या नद्यांच्या काटी रहात होता. म्हणून त्याने बनविलेली हत्यारे नद्यांच्या खोऱ्यात सापडणाऱ्या निक्षेपांत आढळून येतात. प्रागैतिहासिक तज्ञाला नद्यांचा भूशास्त्रीय इतिहास समजून घेणे अत्यंत आवश्यक आहे. कारण हा नद्यांचा इतिहास तत्कालीन मानवी जीवनाशी निगडित आहे.

नद्यांच्या खोऱ्यात आढळणाऱ्या निक्षेपाची प्लायस्टोसीन कालीन प्राचीन निक्षेप व होलोसीन कालीन नवनिक्षेप अशी विभागणी केली जाते. महाराष्ट्रातील नद्यांत आढळणारा निक्षेप हा दोन खळग्यांमध्ये जतन झालेला आहे. पहिल्या खळग्यातील निक्षेपाची जाडी १५ ते २५ मीटर एवढी व दुसऱ्या खळग्यातील निक्षेपाची जाडी १० ते १५ मीटर एवढी आहे. पहिल्या खळग्यातील प्राचीन निक्षेपाच्या पार्श्वभूमीवर नवनिक्षेप रेललेल्या स्थितीत आढळून येतो. निक्षेपाचा विस्तार नद्यांच्या निरनिराळ्या टप्प्यात भिन्न आहे. कृष्णा, भीमा, गोदावरीसारख्या मोठ्या नद्यांच्या मध्य व अंतिम टप्प्यात निक्षेपाचा विस्तार नद्यांच्या दोन्ही काठावर २ ते ३ कि. मी. एवढा आढळून येतो. त्यावेळी या नद्या सध्याच्या नद्यांच्या पात्राच्या तुलनेने वरील (२० मीटर उंच) किंवा खालील (२ ते ३ मीटर खाली) पातळीवर वाहत होत्या.

अश्मयुगीन काळातील हवामान कुठल्या प्रकारचे होते हे समजून घेण्यासाठी प्रयत्न केलेले आहेत. महाराष्ट्रातील काही भागात झालेल्या भूशास्त्रीय संशोधनानुसार उत्तर क्वाटर्नरी काळामध्ये हवामानात बदल झाले होते असे दिसून आले आहे.[२२] तथापि, हवामानातील बदल हे फार तीव्र स्वरुपाचे नव्हते. सध्या महाराष्ट्रात मोसमी प्रकारचे हवामान आहे आणि त्याच प्रकारचे हवामान अश्मयुगीन काळात होते. हवामानातील बदल हे किरकोळ स्वरूपाचे होते. पावसाचे प्रमाण आतापेक्षा थोडेफार (२० ते २५ टक्के) जास्त असावे. पूर वारंवार येत असावेत.

भारतीय द्वीपकल्पाचा बराचसा भाग मायोसीन कालखंडानंतर विवर्तनीयदृष्ट्या स्थिर असावा. गेल्या काही वर्षात राधाकृष्ण[२३], वैद्यनाथन्[२४] व राजगरू[२५] यांनी केलेल्या भूशास्त्रीय संशोधनानुसार दख्खनचे पटार पूर्णपणे स्थिर नसून थोड्याफार प्रमाणात अस्थिर आहे हे आता सिद्ध झाले आहे. या भागात उत्तर टर्शरी व प्लायस्टोसीन काळात भूखंडजनक हालचाली झाल्या. मात्र या हालचाली सौम्य व संथ स्वरुपाच्या होत्या. या हालचालींमुळे महाराष्ट्रातील भूस्वरुपात निश्चितपणे काय बदल घडले हे सांगणे कठीण आहे. सध्या उपलब्ध असलेला पुरावा असे दर्शवितो की, भूमिस्वरूपात विशेष बदल झालेले नाहीत. या भूपृष्ठावर वसलेली पुरातत्वीय स्थळे मूळ स्थितीत जतन झालेली आहेत. त्यावरून गेल्या ४ ते ५ लाख वर्षांच्या कालावधीत (मध्य व उत्तर प्लायस्टोसीन काळात) महाराष्ट्रातील भूस्वरुपात तीव्र स्वरुपाचे बदल झाले नसून भूस्वरूप तौलनिकदृष्ट्या स्थिर आहे.

क्वाटर्नरी कालखंडात समुद्रपातळीत बरेच फेरफार होऊन ती काही काळ आजच्यापेक्षा ५० ते ७० मीटर वर होती, तर काही काळ १५ ते ३० मीटरपर्यंत खाली होती. समुद्रपातळीत जे बदल झाले ते निक्षेप मंचक्रम, सागरी किनाऱ्यानजीक आढळणारे दगडगोट्यांचे थर व करळ या जातीचे समुद्र प्रवाहामुळे तयार झालेले खडकप्रकार यासारख्या भूस्वरुपाद्वारे जतन झालेले आहेत.[२६] या बदलांमुळे मानव-भूमी संबंधावर परिणाम झालेला दिसून येतो. गझदर यांना असे आढळून आले की,

ज्यावेळी मालवण (जिल्हा सिंधुदुर्ग) जवळचा सागरी भाग ॲश्युलियन मानवाने वास्तव्यासाठी १.२५ लाख वर्षांपूर्वी व्यापला होता[२७] त्यावेळी समुद्रपातळी आजच्यापेक्षा १५ ते २० मीटर खाली होती. समुद्रपातळी खाली गेल्यामुळे बराचसा मोठा भूप्रदेश अस्तित्वात आला. पौराणिक वाङ्मयात या घटनेचा उल्लेख आहे. हजारो वर्षांपूर्वी परशुरामान परशूने कोकणातील समुद्र मागे हटवून तेथील भूमी वसाहतीस योग्य केली अशी कथा आहे. या कथेचे शास्त्रीय स्पष्टीकरण वरीलप्रमाणे देता येईल. सध्याच्या पूर-मैदानावर असलेले ॲश्युलियन स्थळ त्याकाळी, तत्कालीन नदीच्या पात्रापेक्षा बऱ्याच उंच मंचकावर होते. सभोवतालच्या अरण्यमय भागात लहान प्राणी व कंदमुळे होती. तेथे गोडे पाणी उपलब्ध होते. ही घटना अंतिम हिमयुगाच्या अत्युच्च कालावधीत घडली. त्यानंतर समुद्रपातळी क्रमशः उंचावत जाऊन सध्याची पातळी ५,५०० वर्षांपूर्वी गाठली. ॲश्युलियन मानव हा वन्यप्राण्यांची शिकार करून व कंदमुळे, फळे गोळा करून त्यावर आपली उपजीविका करत असे. कुठल्याच ॲश्युलियन काळातील स्थळात पुरावनस्पती स्वरुपाचा पुरावा आजपर्यंत मिळालेला नाही. त्यामुळे तत्कालीन निर्वाह पद्धतीविषयी निश्चित स्वरुपाचे अनुमान काढणे कठीण आहे. ॲश्युलियन काळातील रानटी बैल, म्हैस, हत्ती इत्यादी प्राण्यांचे अश्मिभूत स्वरुपातील अवशेष चिरकी-नेवासा (प्रवरा नदी) व गंगापूर (गोदावरी नदी) येथे मिळाले आहेत.[२८]

**कालमापन :** ॲश्युलियन हत्यार समुहाशी निगडित असलेला निक्षेप हा मध्य प्लायस्टोसीन कालीन (७ ते १.२५ लाख वर्षपूर्व) आहे हे या निक्षेपात आढळणाऱ्या बैल व हत्ती यासारख्या तत्कालीन प्रातिनिधिक प्राण्यांच्या अवशेषांवरून ठरविले गेले आहे. मध्य-पुराश्मयुगीन हत्यारांशी निगडित असलेल्या निक्षेपातही वरील प्रकारचेच जीवाश्म आढळतात. कारण हे प्राणी मध्य प्लायस्टोसीन ते होलोसीन कालावधीच्या सुरुवातीपर्यंत अस्तित्वात होते. त्यामुळे या जीवाश्मांचा उपयोग अचूक काल ठरविण्यासाठी होत नाही. गेल्या काही वर्षात भारतातील पुढील ॲश्युलियन स्थळांचा काल पोटॅशियम-अर्गोन, थोरियम-युरेनियम व तप्त-दीपन या निश्चित कालमापन पद्धतीने ठरविण्यात आला आहे. ती स्थळे अशी-- उमरेटी (गुजरात), कलदेवनहळ्ळी, सदाब, तेग्गीहळ्ळी, येडुरवाडी (कर्नाटक), नेवासा (महाराष्ट्र), डीडवाना-16 R (राजस्थान) व सोन नदीचे खोरे (उत्तर प्रदेश).[२९] यावरून ॲश्युलियन संस्कृतीच्या कालावधीची मर्यादा १ ते ४ लाख वर्षे एवढी होती असे समजण्यास हरकत नसावी.

काही वर्षांपूर्वी डेक्कन कॉलेज, पुणे येथील प्रागैतिहासिक तज्ज्ञांनी निक्षेपाशी निगडित असलेले ज्वालामुखीय राखेचे थर बोरी येथे शोधून काढले आहेत. हे ठिकाण पुण्यापासून ईश्यान्येस कुकडी नदीकाठी ११५ कि. मी. अंतरावर आहे. या ठिकाणी ॲश्युलियन हत्यारे दगडगोट्यांच्या थरात आढळतात. या थराखाली व थराच्या वर राखेचे थर आढळून आले आहेत. येथील राखेच्या थराचा काळ पोटॅशियम-अर्गोन

या कालमापन पद्धतीनुसार १४ लाख (व. पू.) वर्षे एवढा काढला आहे.[३०] राखेच्या थराखालील असणाऱ्या थरातील हत्यारे ही १४ लाख वर्षांपेक्षा जुनी (प्राचीन) असण्याची शक्यता आहे. या पुराव्याधारे असे म्हणता येईल की, बोरी हे ॲश्युलियन संस्कृतीचे भारतीय द्वीपकल्पातील सर्वांत प्राचीन स्थळ असावे. वरील ठिकाणी अद्यापही संशोधन चालू आहे.

## महत्त्वाची स्थळे

**गंगापूर :** हे स्थळ नाशिक शहराजवळ गोदावरीच्या उजव्या तीरावर असून येथे मिळणारा ॲश्युलियन संस्कृतीचा पुरावा हा बराचसा मूळ स्वरुपातील आहे. या स्थळाचा शोध सांकलिया[३१] यांनी प्रथम लावला. त्यानंतर जोशी व इतर तज्ज्ञांनी या ठिकाणी उत्खनन केले.[३२] बेसाल्ट या तलस्थ खडकावर लाल रंगाच्या चिकणमातीचा थर प्रथम आढळून येतो. या थरावर दगडगोट्यांचा दुसरा एक थर आहे. त्यावर आणखी एक तपकिरी रंगाचा मळीचा थर आहे. येथे दगडगोट्यांच्या थरामधून कोऱ्या स्थितीतील हातकुऱ्हाडी, फरशा वगैरे प्रगत ॲश्युलियन अवस्थेची हत्यारे व रानटी बैलाचा जबडा मिळाला. हत्यारांची निर्मिती टणक जातीच्या बेसाल्ट व डोलेराईट या खडकांपासून केली आहे. डोलेराईट खडकाच्या भित्ती नदीच्या पात्रात आढळून आल्या व याच उत्तम जातीच्या खडकाचा हत्यारनिर्मितीसाठी ॲश्युलियन मानवाने उपयोग केला.

**भाडणे :** हे गाव धुळे जिल्ह्यात साक्री गावानजीक पांझरा नदीच्या कान या उपनदी काठी असून या स्थळाचा शोध प्रथम डॉ. साळी यांनी लावला.[३३] या ठिकाणी नदीकाठी १२ मीटरपेक्षा जास्त उंचीचा निक्षेपाचा छेद उघडकीस आला आहे. या छेदामध्ये दगडगोट्यांचे ४ व मळीचे ३ थर आढळून आले. ॲश्युलियन उद्योग समुहाची हत्यारे सर्वांत खाली असलेल्या दगडगोट्यांच्या थरात मिळाली. हत्यारे कोऱ्या स्थितीत असून बेसाल्ट व डोलेराईट या दोन्ही खडकांचा हत्यारनिर्मितीसाठी उपयोग केला होता.

**चिरकी-नेवासा :** हे ॲश्युलियन वसतीस्थान चिरकी नाला व प्रवरा नदीच्या संगमानजीक नदीच्या उजव्या काठावर वसलेले आहे. या स्थानाचा शोध प्रथम १९६३ मध्ये जी. ए. कार्वीनस यांनी लावला.[३४] त्यांनी १९६५ ते १९६९ पर्यंत येथे उत्खनन केले. या ठिकाणी पुरातत्वज्ञ अन्सारी,[३५] पप्पू व मूर्ती यांनीही उत्खनन केले.[३६] हे वसतीस्थान झिजेच्या प्रक्रियेने तयार झालेल्या खडक मंचावर असून तेथे उत्खननाद्वारे पुढीलप्रमाणे थरांचे क्रम उघडकीस आले : १) करड्या रंगाचा बेसाल्ट, २) मोठ्या दगडगोट्यांचा थर व ३) लहान दगडगोट्यांचा थर व माती. येथील खडक मंचकाला नदीच्या दिशेने कमी उतार असून आणि सध्याच्या पात्रापासून हा मंचक ६ ते १२ मीटर उंचीवर आहे. या मंचकाच्या निर्मितीनंतर नदीने आपला

प्रवाह बदलला आणि या मंचकावर २० ते २५ सें. मी. जाडीचा मोठे दगडगोटे व वाळूयुक्त घट्ट थर साचला गेला. या थरातील घटक थोड्या उंचीच्या ठिकाणापासून गुरुत्वाकर्षणाने घरंगळत आले व त्याचा थर बनला. या थरात ॲश्युलियन संस्कृतीची हत्यारे मुबलक प्रमाणात आढळली व त्याबरोबर धारदार कडा असलेले विविध आकाराचे असंख्य दगडगोटे मिळाले. त्यानंतर या थरावर दुसऱ्या एका लहान दगडगोट्यांच्या ३ ते ४ मीटर जाडीच्या थराचे संचयन झाले. या थरात मध्यपुराश्मयुगीन हत्यारे बहुसंख्येने आढळून आली. ॲश्युलियन हत्यारे मिळणाऱ्या थरात रानटी बैल, हत्ती, म्हैस इत्यादी प्राण्यांचे जीवाश्म मिळाले. येथे मिळणारी हत्यारे पूर्व व मध्य ॲश्युलियन परंपरेशी मिळतीजुळती आहेत. या वसतीस्थानात अनेक ठिकाणी खड्डे (Trenches) घेण्यात आले व त्याद्वारे ॲश्युलियन हत्यारयुक्त थर उघडकीस आणला गेला. खड्डा क्र. ७ या प्रमुख जागी ७५ चौ. मी. एवढी जागा वसतीस्थानाने व्यापली आहे. या जागेत २४०० पेक्षा अधिक हत्यारे आढळून आली. ही हत्यारे स्थानिक बेसाल्ट व जवळपास आढळून येणाऱ्या डोलेराईट या खडकांपासून बनविलेली आहेत. येथे हातकुऱ्हाडी, फरशा, तोडहत्यारे, तासण्या, वेधण्या, चाकू, छिलके, गाभे इत्यादी हत्यारे मिळाली असून ती बनविण्यासाठी विविध आकारांच्या दगडगोट्यांचा उपयोग करण्यात आला आहे. यातील उत्तम दर्जाची हत्यारे डोलेराईट या टणक जातीच्या खडकापासून बनविली आहेत. येथे जवळपास डोलेराईट खडक भित्तीच्या स्वरुपात उपलब्ध आहे. येथील एका खड्ड्यात बेसाल्टच्या शिळा अर्धवर्तुळाकार स्वरुपात मुद्दाम रचलेल्या स्थितीत आढळल्या. वसतीस्थानास तट अथवा कुंपण घालण्यासाठी योजनापूर्वक या शिळा रचल्या असण्याची शक्यता आहे.

वरील सर्व विवेचनावरून असे म्हणता येईल की, हे ठिकाण केवळ वसतीस्थानच नव्हते, तर हत्यार निर्मितीचे केंद्रही होते. ७५ चौ. मीटरइतक्या लहान क्षेत्रफळाच्या या जागेत २,००० पेक्षा जास्त संख्येने हत्यारे मिळाल्यावरून ही गोष्ट सिद्ध होते. हत्यारे व त्याबरोबरच्या दगडगोट्यांच्या अणकुचीदार व तीक्ष्ण कडा असे दर्शवितात की, या थरातील घटकांवर वाहत्या पाण्याचा परिणाम झालेला नाही. हत्यार संचात मोठ्या प्रमाणात अपूर्ण बनवलेली हत्यारे, लहानमोठ्या आकाराचे छिलके, गाभे व संस्कारित गोटे मिळतात.

## मध्य-पुराश्मयुग

मध्य-पुराश्मयुग ही पूर्व व उत्तर-पुराश्मयुग या दोन्ही सांस्कृतिक अवस्थांना जोडणारी मधली अवस्था आहे. या वैशिष्ट्यपूर्ण अवस्थेचा शोध प्रथम सांकलिया[३७] यांनी १९५४ मध्ये प्रवरा नदीच्या काठी नेवासा (जिल्हा अहमदनगर) येथे लावला. या कालखंडातील हत्यारे ही निराळ्या स्तर संदर्भाची, जीवाश्मांशी निगडित, भिन्न तंत्रपद्धतीची व वेगळ्या दगडप्रकारापासून तयार केलेली आहेत.

**व्याप्ती :** या सांस्कृतिक टप्प्याचा महत्त्वपूर्ण शोध १९५४ मध्ये लागल्यानंतर गेल्या ४० वर्षांत भारतातील विविध भागात अनेक टिकाणी अशी स्थळे उघडकीस आलेली आहेत. यादृष्टीने महाराष्ट्रातील निरनिराळ्या नद्यांच्या खोऱ्यात अन्वेषण करण्यात आले आहे. त्यातून अशी अनेक स्थळे आढळून आली (आकृती ३). या सांस्कृतिक अवस्थेची व्याप्ती आधीच्या ॲश्युलियन अवस्थेपेक्षा विस्तृत असल्याचे दिसून येते. आतापर्यंत शोध लागलेल्या संपूर्ण स्थळांची यादी (जंत्री) देणे कठीण आहे. स्थळांच्या संख्येत वाढ झाल्याने लोकसंख्येतही निश्चित वाढ झाली होती. ज्या प्रदेशात ॲश्युलियन मानव पोहोचू शकला नाही अशा प्रदेशांचीही मध्य-पुराश्मयुगीन मानवाने वास्तव्यासाठी निवड केली.

**हत्यारांचे प्रकार :** या सांस्कृतिक कालखंडात आढळून येणारे हत्यारांचे प्रकार पुढीलप्रमाणे आहेत (आकृती ४) : (१) विविध प्रकारच्या कडा असलेल्या तासण्या (Scrapers) इत्यादी-सरळ, वर्तुळाकार, अंतर्वक्र, बहिर्वक्र; (२) नोक हत्यारे (टोचे) (Point)—एक द्विपृष्ट, संस्कारित, दंडयुक्त; (३) वेधण्या (Borers); (४) वेधणी-तासणी, तासणी-नोक अशा प्रकारची संयुक्त हत्यारे; (५) चाकू, सुऱ्या; (६) दाते असलेली हत्यारे (Denticulates); (७) कोरणी (लहान आकाराची छिन्नी) (Barin) व (८) हातकुऱ्हाड-फरशी व तोंड हत्यारे.

आधीच्या ॲश्युलियन कालखंडात थोड्याफार प्रमाणात जे प्रादेशिक भेद दिसून येत होते ते या कालखंडात आता जास्त ठळकपणे निदर्शनास येतात. तासण्या, नोक हत्यारे (टोचे) व वेधण्या ही या कालखंडातील प्रमुख हत्यारे असून तासणी या सांस्कृतिक टप्प्याचे प्रातिनिधिक हत्यार मानण्यात येते.

**तंत्रपद्धती :** महाराष्ट्रातील विविध भागात मिळालेल्या हत्यार प्रकारांच्या सविस्तर अभ्यासावरून या टप्प्यात हत्यारनिर्मितीसाठी वापरलेल्या तंत्रपद्धतीसंबंधी बरीच माहिती उपलब्ध झाली आहे. बहुसंख्य हत्यारे छिलक्यांपासून बनविली जात असल्याने हा उद्योगसमूह छिलका उद्योगसमूह म्हणून मानला जातो. ॲश्युलियन कालखंडात हत्यारनिर्मितीसाठी ज्या तंत्रपद्धती वापरल्या गेल्या त्या सर्व तंत्रपद्धती या कालखंडातही उपयोगात आणल्या गेल्या आहेत. याशिवाय लव्हाल्वा (Lavalloisian) व मुस्तेरीयन (Mousterian) या दोन नवीन तंत्रपद्धतीचा उपयोग केला होता. या उद्योगसमुहातील काही थोडे छिलके अशा स्वरुपाचे आढळून आले की, त्यांच्या एका पृष्टावर छिलक्यांच्या खुणा एका केंद्रबिंदूपाशी एकवटल्या आहेत असे दिसते. ज्या आकाराचे व जाडीचे हत्यार पाहिजे असेल तेवढा भाग गोट्यापासून छिलके काढून त्याचा गाभा तयार करण्यात येत असे. त्यानंतर लाकडी दांडक्याचा किंवा दणकट हाडाचा उपयोग करून योग्य दाबाचा टोला मारून छिलका काढण्यात येत असे. या उद्योगसमुहात सपाट तबकडीच्या आकाराचे मुस्तेरीयन पद्धतीचे गाभे मिळतात. या तंत्रपद्धतीत सपाट तबकडीच्या आकाराचा गोटा निवडला जाई.

गोट्याच्या कडेकडेने योग्य दाबाचा टोला मारून पाहिजे त्या आका
काढण्यात येत असत. या प्रकारे योग्य आकाराचा व जाडीचा छिलका मिळ
तंत्रपद्धतीत या अवस्थेत बरीच प्रगती झालेली दिसून येते.

क्लॅक्टोनियन (Clactonian), लव्हाल्वा अथवा मुस्तेरीयन तंत्रपद्ध
छिलका काढल्यावर त्यावर हत्यारे बनविण्यासाठी सुसंस्करण (Retouch
जात असे. सूक्ष्म छिलके मोट्या छिलक्याच्या कडेला काढले जात. उ
लाकूड अथवा हाडाच्या सहाय्याने दाबतंत्राने (Pressure technic
सुसंस्करण केले जाई. हत्याराच्या कडेच्या दोन्ही बाजूला सुसंस्करण क
असे. पण एका बाजूने सुसंस्करण करण्यावर भर दिलेला दिसतो.

मध्य-पुराश्मयुगीन संस्कृतीच्या उद्योगसमुहात अनेक कारणाने उल्लेखनी
दिसून येते. पहिले कारण म्हणजे अनेक प्रकारचे दगड हत्यारे बनविण्यासाठी
आहेत. हत्यारांच्या आकारात सुद्धा विविधता आढळून येते. याशिव
समुहातील घटकांचे प्रमाण निरनिराळे आहे. म्हणून भारतातील मध्य-पु
संस्कृती ही अनेक प्रादेशिक फरकानुसार बनलेली आहे. स्थूलमानाने पूर्वमध्यपु
व लाक्षणिक मध्य-पुराश्मयुगीन अशा दोन परंपरा उद्योगसमुहात ओळख
आहेत. या दोन परंपरेतील महत्त्वाचा फरक म्हणजे पहिल्या परंपरेतील ह
आधीच्या ॲश्युलियन अवस्थेतील हातकुऱ्हाड, फरशी, तोडहत्यार यासारखी
मिळतात. ती दुसऱ्या परंपरेतील हत्यार समुहात आढळून येत नाहीत. ।
नेवासा, काळेगाव, बेलपांढरी इत्यादी टिकाणी मिळणारे हत्यारसंच ह
परंपरेतील आहेत. मध्य तापी खोऱ्यात साळी यांना मध्य-पुराश्मयुगीन उ
पूर्व, उत्तर व प्रगत अशा तीन टप्प्यांतील विकास (उत्क्रांती) दर्शक उपअवस्
संदर्भात आढळून आल्या.[३८]

**हत्यारांचा उपयोग :** मध्य-पुराश्मयुगीन उद्योग समुहातील हत्यारे ॲश्युलिय
समुहातील हत्यारांप्रमाणे जड व वजनदार नसल्याने त्यांचा उपयोग शिक
खणण्यासाठी, झाडे तोडण्यासाठी होत नसावा. ही हत्यारे दुय्यम प्रकारच्या
कामासाठी वापरलेली होती. या हत्यारांचा आकार ५ ते ८ सें. मी. एवढ
त्यांचा उपयोग पुढील कामासाठी होत असावा. तासण्या–कातडी साफ करण
झाडाच्या फांद्या तासण्यासाठी; अंतर्वक्र तासण्या–भाले अथवा तीराग्रे ज्या ला
दांडक्यावर बसविली जात तो गुळगुळीत करण्यासाठी; वेधण्या–छिद्रे पाडण
नोक हत्यारे (टोचे)-छिद्रे पाडण्यासाठी व दंडयुक्त नोक हत्यारे–भाल्याची
बाणाची टोके म्हणून शिकारीसाठी वापरली असावी.

**हत्यार निर्मितीसाठी वापरलेले खडक प्रकार :** मध्य-पुराश्मयुगीन उद्योग
प्रमुख महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य म्हणजे हत्यार निर्मितीसाठी वापरलेल्या दगड ।

केलेला बदल होय. हत्यारे बनविण्यासाठी गारगोटी (सिलिका) समुहातील बारीक पोताच्या, जस्पर, अगेट, चाल्सीडोनी, कार्नेलियन, चर्ट यासारख्या दगडप्रकारांची निवड केली होती. चर्ट हा दगड प्रकार महाराष्ट्रात मोठ्या प्रमाणात सापडत नाही. त्यामुळे जस्पर, अगेट व चाल्सीडोनी याप्रकारच्या कठीण, उत्कृष्ट पोताच्या व उत्तम छिलके निघणाऱ्या दगड प्रकारांचा वापर केला गेला. मध्य तापी खोऱ्यात टॅकीलाईट या खडकप्रकाराचा (बेसाल्टचा एक उपप्रकार) उपयोग हत्यारनिर्मितीसाठी केला आहे.[३९] चंद्रपूर जिल्ह्यात पापामिया टेकडी येथे गोंडवन प्रस्तर समुहातील क्वार्टझाईट या खडकप्रकाराला हत्यार निर्मितीसाठी प्राधान्य दिले होते.[४०]

**स्तरीय संदर्भ :** महाराष्ट्रातील नद्यांच्या खोऱ्यात जे निक्षेपांचे थर (गाळांचे थर) मिळतात ते दोन अथवा तीन चक्रांमध्ये तयार झालेले आहेत. यातील दुसऱ्या चक्राच्या भरणक्रियेमुळे तयार झालेल्या निक्षेपाशी मध्य-पुराश्मयुगीन हत्यारसमूह निगडित आहे. दगडगोट्यांचा हा थर ॲश्युलियन हत्यारे असलेल्या दगडगोट्यांच्या थराच्या नंतरच्या काळातील व उत्तर पुराश्मयुगीन हत्यारे असलेल्या दगडगोट्यांच्या थराच्या आधीच्या काळातील आहे. हा थर बारीक वाळू व लहान गोट्यांचा बनलेला असून तो जाड व भरीव दिसून येतो. मध्य तापीच्या खोऱ्यात धुळे व जळगाव जिल्ह्यांत या प्रकारच्या थरांची व्याप्ती बरीच असून जाडी १५ मीटरपेक्षा जास्त आढळून येते.

ॲश्युलियन मानवाप्रमाणेच मध्यपुराश्मयुगीन मानव नद्यांच्या काठी, समुद्रकिनाऱ्यावर अथवा डोंगराच्या पायथ्याशी असलेल्या सपाट प्रदेशात रहात असे. या सांस्कृतिक अवस्थेची स्थळे उघड्यावरील नद्यांच्या परिसरातील स्तरीय संदर्भातील स्थळे, हत्यार निर्मिती-केंद्रे, डोंगरांच्या पायथ्याशी असलेल्या सपाट प्रदेशातील स्थळे व उघड्यावरील स्थळे या प्रकारची आहेत.

पहिल्या प्रकारात मोडणारी स्थळे ही नदीच्या परिसरातील निक्षेपाशी निगडित असून, हत्यारे दगडगोट्यांच्या पक्क्या थरामध्ये रुतून बसलेल्या स्थितीत आढळून येतात. या स्थळातील हत्यारे बऱ्याच अंतरावरून पाण्याच्या प्रवाहाबरोबर वाहून आलेली असल्यामुळे ही स्थळे दुय्यम दर्जाची आहेत. महाराष्ट्रात आढळणारी बहुतांशी स्थळे ही या प्रकारची आहेत.

हत्यार निर्मिति केंद्रे ही ज्या ठिकाणी हत्यारास उपयुक्त असा खडकप्रकार नैसर्गिक स्वरुपात मुबलक प्रमाणात उपलब्ध आहे अशा ठिकाणी आढळून येतात. अनेकदा ही स्थळे नद्यांच्या सध्याच्या पात्रापासून बऱ्याच लांब अंतरावर, पण निवड केलेल्या खडकप्रकारानजीक सापडतात. गारगोटी समूह प्रकारचे खडक डेक्कन ट्रॅप बेसाल्ट या स्थानिक खडकप्रकारात धमन्या अथवा पट्ट्यांच्या (Veins) स्वरुपात सर्वत्र आढळतात. वरील प्रकारची अनेक हत्यारनिर्मिती केंद्रे नदीपासून लांब पण धमन्या असलेल्या म्हणजे नेवासा, बेलपांढरी, काळेगाव इत्यादी ठिकाणी आढळून आलेली आहेत.[४१]

रनाळा आणि रायगड ही तापी खोऱ्यातील दोन महत्त्वाची मध्य-पुराश्मयुगीन हत्यार निर्मिति केंद्रे आहेत.[६२] या टिकाणी टॅकीलाईट या बेसाल्ट जातीच्या उत्कृष्ट पोताच्या लाल रंगाच्या खडकापासून हत्यारे बनविली आहेत. हत्यारे कोऱ्या स्थितीत असून ज्या टिकाणी टॅकीलाईट नैसर्गिक स्वरुपाने आढळून येतो तेथे मोठ्या प्रमाणात विखुरलेली आहेत. आणखी एक महत्त्वाचे हत्यारनिर्मिति केंद्र नांदेड जिल्ह्यातील किवळा हे होय.[६३] या टिकाणी पिवळसर व तपकिरी रंगाचा चर्ट मोठ्या प्रमाणावर एका टेकडीवर आढळून येतो. सर्वत्र चर्ट खडकाभोवती हत्यारे विखुरलेली दिसून येतात. या टिकाणी पूर्ण व अपूर्ण अवस्थेतील हत्यारे, गाभे, लहानमोठे छिलके फारच मोठ्या प्रमाणात मिळतात. या स्थळाचा विस्तार बराच मोटा असून, त्याने अनेक हेक्टर जागा व्यापली आहे. या प्रकाराच्या स्थळांचा उपयोग पाणी व अन्न नजीकच उपलब्ध असल्यास वास्तव्यासाटी केला असण्याची शक्यता आहे.

स्तरीय संदर्भविरहित अशी अनेक स्थळे प्रवरा, गोदावरी, घोड, मुळा-मुटा वगैरे नद्यांच्या खोऱ्यांत आढळतात. या स्थळांचे वैशिष्ट्य म्हणजे डोंगराच्या पायथ्याशी असलेल्या अणकुचीदार दगडगोट्यांशी ही निगडित असतात. डोंगराच्या पायथ्याशी असलेल्या सपाट भागावर ही स्थळे दिसून येतात. ही सुद्धा हत्यारनिर्मिती केंद्रेच म्हणता येतील. कारण डोंगराच्या उतारावरून घरंगळत आलेल्या दगडगोट्यांचा वापर हत्यार निर्मितीसाटी केला होता. वरील टिकाणी पूर्ण व अपूर्ण स्थितीतील हत्यारे, गाभे, छिलके व हत्यार बनविताना निघालेल्या असंख्य चिपा मिळतात.

मध्य-पुराश्मयुगीन हत्यारे उघड्यावर नदीच्या पात्रात अनेक टिकाणी मोठ्या संख्येने आढळून येतात. ही हत्यारे झिजलेल्या व जलजीर्ण स्थितीत असून, धूप झाल्यामुळे दगडगोट्यांच्या थरामधून बाहेर पडून नदीच्या पात्रात आढळून येतात. वरील प्रकारची अनेक स्थळे नद्यांच्या खोऱ्यात उघडकीस आली आहेत. ही स्थळे दुय्यम स्वरुपाची आहेत.

**पुरापर्यावरण :** पूर्व-पुराश्मयुगीन कालखंडाप्रमाणेच मध्य-पुराश्मयुगीन कालखंडातील हवामानात विशेष बदल झालेले नव्हते. हवामान आजच्यासारखेच म्हणजे निमशुष्क मोसमी स्वरुपाचे होते. मध्य-पुराश्मयुगीन हत्यारे ज्या निक्षेपाशी निगडित आहेत त्यात मध्य प्लायस्टोसीन काळातील रानटी बैल, हत्ती इत्यादी प्राण्यांचे अवशेष मिळतात. बहुतांशी याच प्राण्यांचे अवशेष अॅश्युलियन हत्यारे मिळणाऱ्या आधीच्या निक्षेपात आढळतात. काळेगाव (जिल्हा अहमदनगर) येथे गोदावरी नदीकाटी मध्य-पुराश्मयुगीन हत्यारे पक्क्या झालेल्या दगडगोट्यांच्या थरात आढळून आली. येथे उल्लेख करण्यासारखी गोष्ट म्हणजे याच थरात रानटी बैलाचे अवशेष (अश्मास्थी) मिळाले व बैलाच्या कवटी व शिंगामध्ये हत्यारे रुतून बसलेल्या स्थितीत आढळून आली.[६४]

महाराष्ट्रातील प्रवरा, गोदावरी, घोड, मांजरा इत्यादी नद्यांच्या खोऱ्यात बैल, म्हैस, हत्ती, घोडा, पाणघोडा, गेंडा, हरणे इत्यादी प्राण्यांच्या अश्मास्थी आढळून आल्या आहेत.[४५] या अवशेषांच्या अभ्यासावरून तत्कालीन पर्यावरणासंबंधी बरीच माहिती उजेडात आली आहे. नुकतेच घोडनदी खोऱ्यात इनामगाव (जिल्हा पुणे) येथे पाणघोड्याचे अवशेष मिळाले. त्यावरून असे अनुमान काढण्यात आले की, २० ते ३० हजार वर्षांपूर्वी म्हणजे उत्तर प्लायस्टोसीन काळात हा भाग दलदलीचा, दाट गवताचा व काही भाग अरण्यमय प्रदेशाचे पट्टे असलेला असा होता. मुळा नदीवर बांधलेल्या धरणानजीक (जिल्हा अहमदनगर) अर्जुन या वृक्षाचे, अर्धवट जळालेल्या स्थितीतील ओंडके सध्याच्या नदीच्या पात्रापासून १० मीटर खाली असलेल्या दगडगोट्यांच्या थरात मिळाले. मात्र या थरात सांस्कृतिक अवशेष आढळून आले नाहीत.[४६]

**कालमापन :** मध्य-प्लायस्टोसीन कालाचे प्रातिनिधिक म्हणून जे प्राणी मानले जातात, त्या प्राण्यांचे अवशेष मध्य-पुराश्मयुगीन हत्यारे मिळणाऱ्या निक्षेपाच्या थरात आढळतात. याच प्रकारच्या प्राण्यांचे अवशेष ॲश्युलियन हत्यारे मिळणाऱ्या खालच्या भागातील निक्षेपाच्या थरात सापडतात. त्यामुळे प्राण्यांच्या अश्मास्थींवर आधारलेला पुरावा अचूक कालमापन ठरविण्यास उपयोगी पडत नाही. ज्या निक्षेपात मध्य-पुराश्मयुगीन हत्यारे मिळतात, त्या निक्षेपाचा काळ हा त्यात मिळणाऱ्या विविध अवशेषांवर–शिंपले, हाडे व अर्धवट जळालेली हाडे यांच्यावर-रेडिओकार्बन-१४ पद्धतीचा अवलंब करून ठरवला आहे व हा काल साधारणपणे १० ते ४० हजार वर्षे (व. पू.) एवढा आहे.[४७] दिडवाना (राजस्थान) येथे मध्य-पुराश्मयुगीन संस्कृतीला प्राचीनता देणारा पुरावा नुकताच उपलब्ध झाला आहे. या ठिकाणी थोरियम–युरेनियम व तप्तदीपन या निश्चित कालमापन पद्धतीचा अवलंब करून तेथील मध्य-पुराश्मयुगीन अवस्थेचा काल एक ते दीड लक्ष वर्षे (व. पू.) असा सुचविला आहे.[४८] वरील सर्व पुरावा लक्षात घेता असे म्हणता येईल की, मध्य-पुराश्मयुगीन संस्कृतीचा कालावधी दीड लक्ष ते पंचवीस हजार वर्षे (व. पू.) इतका मानण्यास हरकत नाही. भूशास्त्रीय कालमापन पद्धतीनुसार या कालावधीमध्ये मध्य-प्लायस्टोसीनचा अंतिम व उत्तर-प्लायस्टोसीनचा जवळजवळ पूर्ण भाग समाविष्ट होतो.

## महत्त्वाची स्थळे

मागे उल्लेख केल्याप्रमाणे मध्य-पुराश्मयुगीन संस्कृतीचा पुरावा महाराष्ट्रातील बऱ्याच भागात मोठ्या प्रमाणावर मिळालेला आहे. या अवस्थेची हत्यारे दगडगोट्यांच्या थरांमधून, सध्याच्या नद्यांच्या पात्रांतून व हत्यारनिर्मिती केंद्रांमधून गोळा केलेली आहेत. चिरकी–नेवासा, वडोली–वाघोली व पाटणे या मध्य-पुराश्मयुगीन स्थळांचे उत्खनन केले आहे. ज्या स्थळाला मूळ वसतीस्थान म्हणता येईल, असे मध्य-पुराश्मयुगीन स्थळ अजूनपर्यंत उघडकीस आले नाही. काही हत्यारनिर्मिती केंद्रे कदाचित वास्तव्यासाठी उपयोगात आणली जात असावी.

**नेवासा :** मध्य-पुराश्मयुगीन संस्कृतीचे अस्तित्व व अनन्यसाधारण महत्त्व प्रथम नेवासा या ठिकाणी उघडकीस आले. हे स्थळ प्रवरा नदीच्या काठी (जिल्हा अहमदनगर) असून त्याचा शोध १९५४ मध्ये सांकलिया यांनी लावला.[४९] नेवासाच्या परिसरात पाच ठिकाणी या संस्कृतीचा पुरावा आढळून आला. या ठिकाणी जे निक्षेपाचे छेद उघडकीला आले आहेत त्यात दगडगोट्यांचे तीन व मळीचे तीन थर दिसून आले. दगडगोट्यांच्या दोन थरांमध्ये मळीचा थर आढळून येतो. निक्षेपाच्या तळाशी स्थानिक खडक डेक्कन ट्रॅप बेसाल्ट हा आहे. या बेसाल्टवर पहिल्या दगडगोट्यांच्या थराचे संचयन झालेले असून या थरात बेसाल्ट व डोलेराईट या खडकप्रकारांपासून बनवलेली अॅश्युलियन तंत्रपद्धतीची हत्यारे मिळाली. निक्षेपाच्या मधल्या भागात लहान गोटे असलेल्या थरात मध्य-पुराश्मयुगीन हत्यारे सापडली. ही हत्यारे गारगोटी समुहाच्या खडकप्रकारापासून–उदा. चर्ट, अगेट, चाल्सीडोनी व जस्पर या रंगीबेरंगी प्रकारापासून बनविलेली आहेत. अगदी वर आढळून येणाऱ्या वाळूच्या थरात वरील प्रकारचीच, पण पात्यांसारखी बनविलेली काही हत्यारे मिळाली.

**वडोली–वाघोली :** वडोली व वाघोली ही दोन लहान खेडी पैठण (जिल्हा औरंगाबाद) शहराच्या पूर्वेस ५ कि. मी. अंतरावर आहेत. या ठिकाणी सध्याच्या नदीच्या पात्रापासून वरच्या पातळीवर दगडगोट्यांचा थर आढळून आला. या थरात मध्य-पुराश्मयुगीन हत्यारे सापडली आहेत. थराची जाडी १ ते ५ मी. इतकी असून या थराखाली विघटन झालेला स्थानिक खडक बेसाल्ट हा आहे. हा दगडगोट्यांचा थर सध्याच्या नदीच्या पात्रापासून २० मीटर उंचीवर आहे. हा थर प्राचीन गोदावरी नदीचा प्रवाह दर्शवितो. मध्य-पुराश्मयुगीन हत्यारे या थराच्या विघटन झालेल्या पृष्ठभागावर, तसेच थराच्या वरील ३०–४० सें. मी. भागात आढळून आली. थराच्या खालील भागात हत्यारे सापडली नाहीत. हत्यारसमूह हा तासण्या, वेधण्या व नोक हत्यारे (टोचे) यांचा बनलेला असून हत्यारांचा सरासरी आकार ४.५ सें. मी. एवढा म्हणजे या संस्कृतीत सर्वसाधारणपणे मिळणाऱ्या हत्यारांच्या आकारापेक्षा थोडाफार मोठा दिसून येतो. हत्यारे सिलिका समुहातील रंगीबेरंगी प्रकारच्या चर्ट, अगेट, चाल्सीडोनी, जस्पर इत्यादी खडकप्रकारापासून बनविलेली आहेत. या ठिकाणी डेक्कन कॉलेज, पुणे येथील संशोधकांनी लहान प्रमाणात उत्खनन केले.[५०]

नौगाव व बोरगाव ही दोन खेडी पैठणपासून नदीच्या खालच्या टप्प्यात १० कि. मी. अंतरावर आहेत. येथे १० ते १५ मीटर उंचीचा दगडगोट्यांचा थर सध्याच्या नदीच्या पात्राला लागूनच असून तेथे मध्य-पुराश्मयुगीन हत्यारे मोठ्या प्रमाणात मिळाली आहेत. ही हत्यारे दगडगोट्यांच्या थरात, तसेच या थराची धूप झाल्यामुळे बाहेर पडून उघड्यावर नदीच्या पात्रात आढळून येतात. या ठिकाणी देखील गारगोटी समुहातील सर्व खडकप्रकारांचा वापर हत्यारनिर्मितीसाठी केला आहे. तासण्या, नोक हत्यारे व वेधण्या हीच प्रमुख हत्यारे येथेसुद्धा आहेत. वडोली–वाघोली येथील हत्यारांशी तुलना करता या स्थळी हत्यारांची झीज कमी झालेली दिसून येते. येथील

व वडोली–वाघोली या दोन्ही ठिकाणच्या दगडगोट्यांच्या थरांचा अभ्यास केला असता असे निदर्शनास आले आहे की, वडोली–वाघोली येथील थरांचे वातावरणीय विघटन जास्त प्रमाणात झालेले आहे. यावरून तो अधिक प्राचीन आहे असे अनुमान काढता येईल. तसेच वरच्या पातळीवरील थरात मिळणारी हत्यारे (वडोली–वाघोली) ही खालच्या पातळीवरील थरात मिळणाऱ्या हत्यारांपेक्षा आधीच्या काळातील आहेत. कालमापन ठरविण्यास योग्य वस्तूंचा या दोन्ही थरात अभाव असल्याने या थरांचा अचूक काल ठरविता आला नाही. पश्चिम महाराष्ट्रातील नद्यांच्या खोऱ्यांत मिळणारा गाळ हा रेडिओ कार्बन–१४ पद्धतीनुसार १० ते ४० हजार वर्षे (व. पू.) एवढ्या कालमर्यादेचा आहे. तेव्हा वरच्या पातळीवरील थरात मिळणारी ही दगडी हत्यारे निश्चितपणे ४० हजार वर्षांपेक्षा प्राचीन आहेत. याप्रमाणे पैठणच्या परिसरात, स्तरीय संदर्भात व तंत्रपद्धतीच्या आधारे मध्य-पुराश्मयुगीन संस्कृतीतील दोन उप अवस्था आढळून आल्या आहेत.

## उत्तर-पुराश्मयुग

उत्तर-पुराश्मयुग ही पुराश्मयुगाची अंतिम अवस्था आहे. ही अवस्था मध्य-पुराश्मयुगानंतरची व मध्याश्मयुगाआधीची आहे. सध्या ह्या अवस्थेविषयी भारतात जो पुरावा उपलब्ध आहे, त्याआधारे असे म्हणता येईल की, भारतातील या कालखंडाची वैशिष्ट्ये व समकालीन युरोप व पश्चिम आशियातील कालखंडाच्या वैशिष्ट्यांमध्ये साम्य आढळून आले आहे.

**व्याप्ती :** भारतीय उपखंडात उत्तर-पुराश्मयुग हा वैशिष्ट्यपूर्ण कालखंड अगदी अलीकडेच उजेडात आला आहे. त्यामुळे याचा पुरावा कमी प्रमाणात आढळून येतो. १९७२ पर्यंत या कालखंडाच्या अस्तित्वाबद्दल वाद होता. याच्या अस्तित्वाचा पुरावा आता गेल्या २० वर्षांत भारतातील विविध भागात झालेल्या अन्वेषणाधारे अनेक ठिकाणी मिळाला आहे. महाराष्ट्रातही काही ठिकाणी याचा पुरावा मिळाला आहे (आकृती ५). त्यातील जळगाव जिल्ह्यातील पाटणे हे महत्त्वाचे स्थळ आहे. या ठिकाणी हत्यारे विपुल प्रमाणात मिळाली असून ती स्तरीय संदर्भात आढळून आल्याने या अवस्थेची क्रमविकासी उपअवस्था येथे निदर्शनास आली आहे.[५१]

**हत्यार प्रकार :** या कालखंडातील महत्त्वाची हत्यारे म्हणजे विविध प्रकारची पाती, कोरण्या, छिन्नीसदृश कडा असलेली हत्यारे, तासण्या, नोक हत्यारे (टोचे), चाकू, वेधण्या इत्यादी उल्लेखिता येतील (आकृती ६). हत्यारे पाती, छिलके अथवा गाभे यापासून बनविली जात. बहुतांश हत्यारे पात्यांपासून बनविलेली आहेत. त्यामुळे पाते हा उत्तर-पुराश्मयुगीन संस्कृतीचा एक महत्त्वाचा अविभाज्य घटक आहे. दोन्ही कडा समांतर असलेला पातळ व अरुंद प्रकारचा छिलका म्हणजे पाते होय. पाते जरी छिलक्याचा प्रकार असला तरी त्याची तीन महत्त्वपूर्ण वैशिष्ट्ये ओळखली जातात.

प्रथमतः ते पातळ स्वरूपाचे असते, दुसरे–त्याच्या कडा समांतर असतात, तिसरे–त्याची लांबी, रुंदीच्या कमीत कमी दुप्पट अथवा जास्त आढळून येते.

कोरणी (लहान आकाराची छिन्नी) हे या अवस्थेच्या हत्यारसमुहातील सर्वात महत्त्वाचे हत्यार होय. हे बनविण्याचे एक विशिष्ट तंत्र होते. पात्याच्या एका कडेला वरून योग्य दाबाचा टोका देऊन एका बाजूने अथवा दोन्ही बाजूने बारीक छिलके काढले जात. त्यामुळे टोकास अत्यंत लहान, पण छिन्नीसारखी धारदार कडा तयार होत असे. आजकालच्या स्क्रू-ड्रायव्हरशी याचे साम्य आहे. या हत्याराचा उपयोग मुख्यत्वेकरून कोरीव काम करण्यासाठी होत असे. कोरीव काम मऊ जातीचा दगड, लाकूड, हाडे, सांबरशिंग इत्यादींवर केले जाई. या हत्याराचे वीसहून अधिक प्रकार आढळून आले आहेत. कोरणीही या प्रकारे उत्तर-पुराश्मयुगाचे अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण हत्यार मानले जाते. या काळातील मानवाच्या गरजेनुसार प्रगत प्रकारची हत्यारे प्रचलित झाली असावीत.

चाकू अथवा बोथट केलेले पाते हे हत्यार पात्यापासून तयार केले जाई. या हत्याराची एक कडा अतिशय धारदार, तर दुसरी कडा सुसंस्करण करून बोथट बनविली जाई. एक कडा बोथट करण्यामागील हेतू असा की, कडेच्या बाजूने दाब दिला तर बोटाला इजा होऊ नये. हे लहान आकाराचे धारदार चाकू लाकडाच्या दांड्यावरील खाचणीत बसविले जात व संयुक्त हत्यार म्हणून वापरले जाई.

पात्यांवर सुसंस्करण करून अनेक प्रकारच्या तासण्या बनविण्यात येत असत. यामध्ये अंत तासण्या हा प्रमुख प्रकार होय. यामध्ये पात्याच्या एका लहान बाजूचे सुसंस्करण करण्यात येई व त्या बाजूच्या कडेचा उपयोग तासण्यासाठी केला जाई. काही वेळा दोन्ही लहान बाजूंनी सुसंस्करण करण्यात येत असे. या प्रकारच्या हत्याराला "द्वि अंत तासणी" (Double end scrapers) असे म्हणण्यात येते. सर्वसाधारणपणे अंत तासण्या या पात्यापासून तयार करण्यात येत असत. तथापि काही तासण्या छिलके व गाभ्यांपासून बनवलेल्या आढळतात. उत्तर-पुराश्मयुगीन हत्यार संचात काही दंडयुक्त नोक हत्यारे (टोचे) मिळतात. या हत्यारांचा उपयोग बाणाची टोके (तीराग्रे) अथवा लहान भाल्याची टोके म्हणून करीत असत. ही हत्यारे पात्यांपासून बनविली जात. या हत्याराच्या खालच्या भागात एका अथवा दोन्ही बाजूने खाचा काढलेल्या असून त्या टिकाणी हे हत्यार बाणाच्या अथवा भाल्याच्या मोठ्या दांड्याला जोडले जाई. वेधणी हा सुद्धा एक महत्त्वाचा प्रकार आढळून येतो. ती पात्यापासूनच बनविण्यात येत असे. तिच्या पुढील भागात सुसंस्करण करून अणकुचीदार व उटाबदार टोक बनविण्यात येई.

दगडांपासून बनविलेल्या या हत्यारांशिवाय काही हत्यारे हाडे, हस्तिदंत व सांबरशिंग अशा सेंद्रिय वस्तूंपासून बनविली जात. भारतात आंध्र प्रदेशात कर्नूल

जिल्ह्यात मुच्चटला चिंतामनु गवी येथे हाडांपासून बनविलेली बरीच हत्यारे मिळाली आहेत.[५२]

**तंत्रपद्धती :** या आधी उल्लेख केल्याप्रमाणे या अवस्थेची बहुतांश हत्यारे पात्यापासून बनविली जात. पाती तयार करण्यासाठी अप्रत्यक्ष टोला तंत्र, दाब तंत्र व प्रत्यक्ष टोला तंत्र या तंत्रपद्धतींचा वापर केला जाई.

उत्तर-पुराश्मयुगीन हत्यारे आधीच्या काळातील हत्यारांपेक्षा तांत्रिकदृष्ट्या वेगळी, वैशिष्ट्यपूर्ण व प्रगत तंत्रपद्धतीची आहेत. दाब तंत्राचा वापर करून पन्हाळीदार केलेल्या गाभ्यापासून लांब, पातळ व नाजूक पाती काढण्यात येत असत. या पद्धतीत गाभ्यावर प्रत्यक्ष टोका मारला जात नसे. पाते गाभ्यापासून काढण्यासाठी लाकूड, हाड अथवा सांबरशिंगाच्या दांड्याचा उपयोग केला जाई. दांड्याच्या टोकाला अणकुचीदार टणक हाड अथवा दगड असे. दांड्यावर योग्य प्रकारचा दाब देऊन पाते काढले जाई. हा दांडा साधारणपणे ५ ते ८ सें. मी. जाडीचा व १ ते १.५ मी. लांबीचा असे. या तंत्रपद्धतीला अप्रत्यक्ष तंत्र म्हणण्यात येते. एकदा गाभ्यापासून पाती काढल्यावर तोच पन्हाळीदार (Fluted) गाभा परत एकदा पाती काढण्यासाठी उपयोगी पडत असे. या प्रकारे एका गाभ्यापासून अनेक वेळा मोठ्या प्रमाणावर पाती निर्माण करण्यात येत असत. म्हणून हत्यारनिर्मितीसाठी आवश्यक असलेला खडकप्रकार कमी प्रमाणात लागल्यामुळे या थोड्याशा खडकांपासून मोठ्या प्रमाणावर हत्यारनिर्मिती करणे शक्य होई. या अवस्थेची हत्यारे आकाराने लहान असत. हा लहान आकार असे सुचवितो की, ही हत्यारे संयुक्त हत्यारे म्हणून वापरली जात. हत्यारे नैसर्गिक डिंकाच्या सहाय्याने हाडाच्या अथवा लाकडाच्या खोबणीत (खाचेत) पक्की बसवली जात.

**हत्यार समुहाचे स्वरूप :** मध्य-पुराश्मयुगीन संस्कृतीप्रमाणे उत्तर-पुराश्मयुगीन संस्कृतीतही एकजिनसीपणा नसून बऱ्याच प्रमाणात प्रादेशिक भिन्नता दिसून येते. स्थूलमानाने पूर्व उत्तर-पुराश्मयुगीन परंपरा व अंत्य उत्तर-पुराश्मयुगीन परंपरा अशा दोन परंपरा ओळखल्या गेल्या आहेत. या दोन परंपरेतील महत्त्वाचा फरक म्हणजे पहिल्या परंपरेत पाते काढण्यासाठी वापरलेली तंत्रपद्धती पूर्णपणे विकसित झालेली दिसून येत नाही. पाती अप्रमाणबद्ध असून बरीच जाड आहेत. या प्रकारच्या हत्यार संचात (समुहात) साधी पाती, सुसंस्करण केलेली पाती, छिलक्यापासून बनवलेल्या विविध प्रकारच्या तासण्या, नोक हत्यारे (टोचे), वेधण्या इत्यादी दिसून येतात. कोरण्या व बोथट केलेली पाती फारच अल्प प्रमाणात मिळतात. वरील प्रकारचे हत्यार- संच भोकर,[५३] भाडणे[५४] व पाटणे[५५] (अवस्था II-A आणि अवस्था II-B) याठिकाणी आढळून आले आहेत. अंत्य उत्तर-पुराश्मयुगीन परंपरेत पाती काढण्याची तंत्रपद्धती पूर्णपणे विकसित झालेली दिसून येते. या परंपरेतील हत्यारसमुहात उत्कृष्ट दर्जाची, प्रमाणबद्ध, पातळ व नाजूक पाती व पात्यापासून बनविलेली अनेक हत्यारे

व कोरण्या सापडतात. हत्यारांचा आकारही लहान झालेला दिसून येतो. पाटणे येथील II-C, D, व E अवस्था या परंपरेत मोडणाऱ्या आहेत.

हत्यारांचा प्रत्यक्ष उपयोग काय असावा हे समजून घेण्यासाठी काही प्रयोग केले आहेत. त्याआधारे काही उपयोग सुचले आहेत. या अवस्थेतील हत्यारे संयुक्त हत्यारे म्हणून वापरली जात याचा उल्लेख याआधी केला आहेच. पाती व पात्यापासून बनविलेली हत्यारे लाकडाच्या अथवा हाडाच्या तुकड्यात खाच करून बसवत व विळे, चाकू, मत्स्यबाण (harpoon) व भाले या प्रकारची मोठ्या आकाराची संयुक्त हत्यारे तयार केली जात. त्यांचा उपयोग शिकारीसाठी व मासे मारण्यासाठी केला जाई. दंडयुक्त नोक हत्यारे (टोचे) बाणाची टोके म्हणून वापरली जात. विविध प्रकारच्या तासण्यांचा उपयोग लाकूड अथवा हाडापासून मोठी हत्यारे (धनुष्यबाण, भाले इत्यादी) बनवण्यासाठी केला जात असावा. कोरण्या (लहान आकाराच्या छिन्न्या) या लाकूड अथवा हाडामध्ये खाच पाडण्यासाठी वापरल्या जात असाव्यात.

महाराष्ट्रात डेक्कन ट्रॅप बेसाल्ट खडक प्रकारात लहान मोठ्या आकाराच्या धमन्या अथवा पट्टे आढळून येतात. या धमन्या गारगोटी समुहाच्या जास्पर, चाल्सीडोनी, अगेट, क्वार्ट्झ् इत्यादी खडकप्रकारांच्या असतात. हत्यार निर्मितीसाठी या गारगोटी प्रकारच्या खडक प्रकाराला उत्तर पुराश्मयुगीन मानवाने आधीच्या अवस्थेतील मानवाप्रमाणे प्राधान्य दिले होते. महाराष्ट्रातील बऱ्याच मोठ्या भागात बेसाल्टमध्ये मुबलक प्रमाणात धमन्या उपलब्ध असल्याने त्यांचा वापर प्रामुख्याने केला आहे. झारपट खोऱ्यांतील पापामिया टेकडी (जि. चंद्रपूर) येथे गोंडवन प्रस्तर समुहातील क्वार्टझाईट या खडक प्रकाराचा वापर हत्यार निर्मितीसाठी केला आहे.[५६]

**स्तरीय संदर्भ :** उत्तर-पुराश्मयुगीन हत्यारसमूह प्राचीन निक्षेपाशी निगडित आहे. या निक्षेपाच्या वरील (अखेरच्या) भागात म्हणजे भूशास्त्रीय अंत्य प्लायस्टोसीनकालीन निक्षेपाच्या थरात या अवस्थेची हत्यारे आढळून येतात. हा निक्षेप, बारीक वाळू, मळी, लहान गोटे व जाड वाळूचा बनलेला दिसून येतो.

**स्थळांचे स्वरूप :** उत्तर-पुराश्मयुगीन मानवाने नदीपरिसर, समुद्रकिनारा आणि डोंगर उतारावरील सपाट प्रदेश वास्तव्यासाठी निवडला होता. महाराष्ट्रात अद्याप गुहा अथवा शिलाश्रयाचा वास्तव्यासाठी उपयोग केल्याचा पुरावा आढळून येत नाही. आधीच्या पूर्व-पुराश्मयुग व मध्य-पुराश्मयुग अवस्थांप्रमाणे महाराष्ट्रात आढळून येणारी स्थळे ही उघड्यावरील स्तरीय संदर्भातील स्थळे, हत्यारनिर्मिती केंद्र, डोंगर उताराशी निगडित असलेली स्थळे व उघड्यावरील स्थळे या प्रकारची आहेत.

मुंबईनजिकचे कांदिवली, प्रवराकाटचे नेवासा (जिल्हा अहमदनगर), गोदावरी काटचे बेलपांढरी (जिल्हा नाशिक), घोडकाटचे इनामगाव (जिल्हा पुणे), झारपट

नाला (वर्धा खोरे), पाटणे (जिल्हा जळगाव), भाडणे (जिल्हा धुळे) इत्यादी अनेक स्थळे पहिल्या प्रकारातील आहेत.[५७]

भोकर हे स्थळ दुसऱ्या प्रकारचे म्हणजे हत्यारनिर्मिती केंद्र आहे. हे ठिकाण नांदेडपासून पूर्वेला २० कि. मी. अंतरावर असून येथे चर्ट या गारगोटी प्रकारचा उपयोग हत्यारनिर्मितीसाठी केला आहे. या ठिकाणी चर्ट हा खडक विपुल प्रमाणात नैसर्गिक अवस्थेत आढळून येतो.[५८]

**पुरापर्यावरण :** गेल्या २० वर्षांत भारतातील विविध भागात झालेल्या बहुशास्त्रप्रणालीवर आधारित संशोधनामुळे आता अंतिम प्लायस्टोसीनकालीन पर्यावरणाविषयी बरीच नवीन माहिती उजेडात आली आहे. या कालखंडात विषुववृत्तापासून लांब असलेला भूप्रदेश बर्फाच्छादित होता. भारतीय द्वीपकल्पात त्या काळात शुष्क प्रकारचे हवामान होते. नद्यांनी व उतारांनी आणलेल्या क्वाटर्नरी अवसादाचे कालमापन रेडिओ कार्बन-१४ व युरेनियम-थोरीयम या कालमापन पद्धतीने ठरविण्यात आले आहे व यावरून त्या काळातील भूमिस्वरूपाविषयी माहिती मिळते. अंतिम प्लायस्टोसीन काळात वनस्पतीचे आच्छादन बऱ्याच भागात तुरळक होते. पावसाचे प्रमाण कमी झाल्याने व वनस्पतीचे आच्छादन कमी झाल्याने उतारांनी आणलेल्या अवसादांच्या प्रमाणात कृष्णा, भीमा, गोदावरी इत्यादी नद्यांच्या खोऱ्यांत बरीच वाढ झाली. अवसादांचे प्रमाण एकदम वाढल्याने व पाण्याचे प्रवाहमान कमी झाल्याने संचयन (भरण) क्रियेस मोठ्या प्रमाणावर चालना मिळाली व वेगळ्या पद्धतीची जलनिःसारण रचना नद्यांच्या खोऱ्यात निर्माण झाली. अंतिम प्लायस्टोसीन काळात नैऋत्य मोसमी वारे क्षीण झाले होते व समुद्राची पातळी आताच्या पातळीपेक्षा कितीतरी मीटर खाली होती.[५९]

अंतिम प्लायस्टोसीनकालीन प्राणीजीवनासंबंधी बरीच उपयुक्त माहिती आता उपलब्ध झाली आहे. महाराष्ट्रातील गोदावरी, भीमा, मांजरा, घोड, प्रवरा नद्यांच्या खोऱ्यांत हत्ती, रानडुक्कर, घोडा, काळवीट, म्हैस, बैल, हरीण इत्यादी प्राण्यांचे अवशेष विपुल प्रमाणात मिळाले आहेत. मराठवाड्यातील मांजरा नदीच्या खोऱ्यात मिळालेल्या प्राण्यांच्या अवशेषांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे, कारण भारतीय द्वीपकल्पात इतक्या मोठ्या प्रमाणावर जीवाश्म फक्त मध्य भारतात नर्मदा नदीच्या खोऱ्यात आढळून आले आहेत. या प्राण्यांच्या अवशेषांवरून त्या काळात नद्यांच्या खोऱ्यांत काही भागात गवताळ प्रदेश, तर काही भागात अरण्यमय पट्टे व काही भागात दलदलीचा प्रदेश असण्याची शक्यता आहे.[६०] शहामृगाच्या अंड्याच्या कवचाचे काही तुकडे जळगाव जिल्ह्यातील पाटणे या ठिकाणी स्तरीय संदर्भात मिळाले. शहामृग हा शुष्क प्रकारच्या हवामान असलेल्या प्रदेशात आढळून येणारा पक्षी महाराष्ट्रातील बऱ्याच भागात त्या काळी अस्तित्वात असावा असे दिसते.[६१]

**कालमापन :** महाराष्ट्रातील अनेक नद्यांच्या खोऱ्यात स्तरीय संदर्भात आढळून आलेल्या उत्तर-पुराश्मयुगीन हत्यारसमुहावरून ही अवस्था मध्य-पुराश्मयुग व

मध्याश्मयुगामधील आहे हे आता सिद्ध झाले आहे. गेल्या काही वर्षात शिंपले, शहामृगाच्या अंड्याच्या कवचाचे तुकडे व हाडे या वस्तूंवरून रेडिओकार्बन-१४ कालमापन पद्धतीने टरविलेल्या काही तारखा उपलब्ध झाल्या आहेत. या पुराव्यांवरून उत्तर-पुराश्मयुगाची कालमर्यादा ३० हजार ते १० हजार वर्षे (व. पू.) एवढी समजण्यात येते.[६२] भूशास्त्रीयदृष्ट्या हा अंतिम प्लायस्टोसीन काल आहे. या कालमापनास पुष्टी देणारा पुरावा कर्नूल (आंध्र प्रदेश)[६३] व इनामगाव (जिल्हा पुणे, महाराष्ट्र)[६४] येथे आढळून आला आहे. या टिकाणी अंतिम प्लायस्टोसीन कालीन प्रातिनिधिक प्राण्यांचे अवशेष उत्तर-पुराश्मयुगीन हत्यार समुहाबरोबर मिळाले आहेत.

## महत्त्वाची स्थळे

**पाटणे :** हे उत्तर-पुराश्मयुगीन अत्यंत महत्त्वाचे स्थळ असून येथे मिळालेल्या पुराव्यांवरून ते मूळ वसतीस्थान होते असे दिसून येते. येथे मध्य-पुराश्मयुग, उत्तर-पुराश्मयुग व मध्याश्मयुग या तीनही अवस्थांचा पुरावा स्तरीय संदर्भात आढळून येतो. हे टिकाण जळगाव जिल्ह्यात चाळीसगाव शहरापासून दक्षिणेला १३ कि. मी. वर असून अजिंटा पर्वतसमुहाच्या पायथ्याशी अर्धवर्तुळाकृती नदी खोऱ्यात वसलेले आहे. येथे एस. ए. साळी यांनी १९७१ ते १९७६ मध्ये उत्खनन केले.[६५] येथील खोऱ्यांतील खळगा हा १० ते २० मी. जाडीच्या निक्षेपाने (लहान दगडगोट्यांचा थर, जाड व बारीक वाळू, मळी व चिकणमाती) भरलेला आहे. उत्खननात एकूण १३ थर उघडकीस आले आहेत. खालचा १३ क्रमांकाचा थर मध्य-पुराश्मयुगीन आहे. त्यानंतर ५ ते १२ क्रमांकांचे थर उत्तर-पुराश्मयुगीन, तर १ ते ४ क्रमांकांचे थर मध्याश्मयुगीन आहेत. उत्तर-पुराश्मयुगीन थरांची एकूण जाडी ५.५ मी. एवढी आहे. थर क्रमांक ५ व ७ यांमध्ये हत्यारे विपुल प्रमाणात मिळतात. थर क्रमांक ५ मध्ये ११,७८८ व थर क्रमांक ७ मध्ये १२,२०१ हत्यारे आढळून आली. साळी यांनी या टिकाणी उत्तर-पुराश्मयुगीन स्तरीय संदर्भातील पाच क्रमविकासी उपअवस्था (ए ते ई) प्रस्थापित केल्या आहेत. रेडिओकार्बन-१४ पद्धतीनुसार डी कालमापन २५,००० वर्षे (व. पू.) उपलब्ध आहे.

या टिकाणी शहामृगाच्या अंड्यांच्या कवचांचे १७० हून अधिक तुकडे मध्य व उत्तर-पुराश्मयुगीन अवस्थेच्या थरांत मिळाले. यातील तीन तुकड्यांवर नक्षी कोरलेली आढळून आली. तसेच येथे तबकडीच्या आकाराचे तीन मणी, शहामृगाच्या अंड्याच्या कवचापासून तयार केलेले मणी व एक सागरी शिंपल्यापासून बनविलेला मणी मिळाला. या अवस्थेचे वैशिष्ट्य म्हणजे भारतात प्राचीन कलेसंबंधी व आभूषणाविषयी मिळणारा हा पहिलाच पुरावा होय.

मध्य-पुराश्मयुगीन पुरावा प्रगत छिलकानिर्मिती तंत्रपद्धती दर्शविणारा आहे. (उपअवस्था I), उत्तर-पुराश्मयुगीन अवस्थेच्या पाच क्रमविकासी उपअवस्था

(उपअवस्था II-ए ते ई) असून ए आणि बी या उपअवस्थेत मिळणारी हत्यारे जास्पर या खडकप्रकारापासून बनविलेली आहेत. तर II-सी ते ई या उपअवस्थेतील हत्यारे चाल्सीडोनी या खडकप्रकारापासून तयार केलेली आहेत. याशिवाय दुसऱ्या अवस्थेत (उपअवस्था II-सी ते ई) भौमितिक प्रकारची हत्यारे, उदा. चंद्रकोर, समांतर द्विभुज चौकोन व त्रिकोणी आकाराची हत्यारे मिळतात. पाटणे या स्थळाचे अनन्यसाधारण महत्त्व म्हणजे या ठिकाणी उत्तर-पुराश्मयुगीन व मध्याश्मयुगीन हत्यारसमुहात स्तरीय संदर्भात विकासदर्शन (उत्क्रांतीदर्शक) पुरावा आढळून आलेला आहे.

**भोकर :** नांदेडपासून पूर्वेला ४० कि. मी. वरील या उत्तर-पुराश्मयुगीन स्थळाचा विस्तार मोठा असून येथे हत्यारे विपुल प्रमाणात मिळतात. जवळपास कुठलीही नदी आढळून येत नाही. येथे असलेल्या लहान टेकडीवर करड्या रंगाच्या चर्ट या खडक प्रकाराच्या अनेक धमन्या (पट्टे) आहेत. टेकडीच्या उतारावर, पायथ्याजवळ व जवळपासच्या शेतात या अवस्थेची हत्यारे मोठ्या प्रमाणात सापडतात. या ठिकाणच्या हत्यारसमुहांच्या अभ्यासावरून[५६] त्यांची अशी वैशिष्ट्ये सांगता येतील की, ही हत्यारे छिलके, छिलके-पाती व पात्यांपासून बनविलेली आहेत. येथे नैसर्गिक स्वरुपात हत्यारनिर्मितीसाठी आवश्यक असलेली सामग्री (खडकप्रकार) उपलब्ध असल्यामुळे या स्थळाला हत्यारनिर्मिती केंद्र असे म्हणता येईल. येथील हत्यारसंचात सर्वसाधारणपणे भारतीय उत्तर-पुराश्मयुगीन हत्यारसंचात मिळणारे सर्व हत्यारप्रकार उदा. पाती, कोरण्या, तासण्या, टोचे इत्यादी आढळून येतात. येथे आढळून येणाऱ्या हत्यारांचा आकार या अवस्थेच्या महाराष्ट्रातील इतरत्र स्थळांमध्ये मिळणाऱ्या हत्यारांच्या आकारापेक्षा (पाटणे, इनामगाव इत्यादी) मोठा आहे हे विशेष.

## मध्याश्मयुग (Mesolithic)

मध्याश्मयुग हा पुराश्मयुग व नवाश्मयुग या दरम्यानचा वैशिष्ट्यपूर्ण कालखंड असून तो काही हजार वर्षांचे प्रतिनिधित्व करतो. जरी या अवस्थेचा कालावधी अल्प असला, तरी मानवी संस्कृतीतील विकासात या अवस्थेने फार मोलाची भर घातली आहे. या काळातील मानवाची जीवनपद्धती पुराश्मयुगीन मानवापेक्षा फारशी भिन्न नव्हती. शिकार, मासेमारी व अन्नसंकलन ही उपजीविकेची मुख्य साधने होती. ज्यावेळी नवाश्मयुगात मानवाला शेतीचे ज्ञान प्राप्त झाले व त्याच्या जीवनाला स्थैर्य प्राप्त झाले, त्यावेळी शिकार-अन्नसंकलन जीवनपद्धतीची समाप्ती झाली. नवाश्मयुगात मानवी जीवनाच्या अनेक बाबींमध्ये क्रांतिकारक बदल झाला. मध्याश्मयुग याप्रकारे शिकार-अन्नसंकलन व अन्नोत्पादन या दोन जीवनपद्धतींच्या मधली संक्रमणावस्था आहे असे म्हणता येईल.

भारतात मध्याश्मयुगीन अवशेषांचे जतन चांगल्या प्रकारे झालेले असून या काळातील पुरावा मोठ्या प्रमाणात अनेक ठिकाणी उपलब्ध आहे. याचे कारण

मध्याश्मयुगीन मानवाने वास्तव्य केल्यानंतर भूस्वरुपात फारसा बदल झालेला नाही. तसेच मध्याश्मयुगीन काल हा सध्याच्या काळाला नजीकच असल्याने सेंद्रिय पदार्थांपासून बनविलेले अवशेष अनेक टिकाणी मूळ स्थितीत जतन झालेले आहेत. या अवशेषांच्या अभ्यासावरून तत्कालीन निर्वाहपद्धती, पुरापर्यावरण, तंत्रविद्या व आभूषणे याविषयीची बरीच महत्त्वाची माहिती उजेडात आली आहे.

**व्याप्ती :** या काळातील मानवाचे अस्तित्व हे बऱ्याच विस्तृत क्षेत्रात होते. पुराश्मयुगीन मानव हा सर्वसाधारणपणे नदीच्या परिसरात तर मध्याश्मयुगीन मानव नदीपासून दूरच्या क्षेत्रात राहत होता. या काळातील स्थळे विविध भौगोलिक परिस्थितीच्या संदर्भात खालीलप्रमाणे आढळतात. उदा. डोंगरमाथा, डोंगरउतार, नदीकिनारे, सागरकिनारे, तळ्यांच्या काठी, गुहा, शिलाश्रये, वालुकाटेकाडे इत्यादी. महाराष्ट्रात या काळातील स्थळे विपुल प्रमाणात सर्वत्र आढळून येतात (आकृती ७). अशा स्थळांची संख्या आणि घनता ही आधीच्या स्थळांपेक्षा जास्त आहे.

**हत्यार प्रकार :** मध्याश्मयुगीन मानवाने बनविलेल्या दगडी हत्यारांना लघु-अश्म हत्यारे (क्षुद्रास्त्र) (Microliths) असे संबोधण्यात येते. Microliths या शब्दाचा अर्थ "लहान दगड" असा होतो. दगडापासून बनविलेल्या लहान हत्यारांना लघु-अश्म हत्यारे संबोधण्यात येते. मध्याश्मयुगीन अवस्थेत अभौमितिक हत्यारसंच व भौमितिक हत्यारसंच (आकृती ८ व ९) अशा दोन उपअवस्था ओळखल्या गेल्या आहेत. या व याआधीच्या उत्तर-पुराश्मयुगीन हत्यारसंचातील महत्त्वाचा फरक म्हणजे हत्यार संचात असलेल्या भौमितिक आकाराच्या हत्यारांची उपस्थिती व हत्यारांचा लहान आकार होय. लघु-अश्म हत्यारांचा आकार सर्वसाधारणपणे १० ते १५ मी. मी. एवढा असतो. पूर्व-पुराश्मयुगापासून ते मध्याश्मयुगापर्यंत हत्यारांचा आकार क्रमशः लहान होत गेला आहे. लघु-अश्म हत्यारे ही या तांत्रिक उत्क्रांतीची अखेरची अवस्था होय.

अभौमितिक हत्यारसंचात पुढील हत्यारप्रकारांचा समावेश होतो :— समांतर कडा असलेली पाती, बोथट कडा असलेली पाती, संस्कारित कडा केलेली पाती, एक व द्विपृष्ट संस्कारित दंडयुक्त नोक हत्यारे, विविध प्रकारच्या तासण्या, लहान तोंड हत्यारे इत्यादी. भौमितिक हत्यारसंचातील हत्यारे त्रिकोण (Triangles), समांतरद्विभुज चौकोन (Trapeze), चंद्रकोर (Lunate) या प्रकारातील होत.

**तंत्र पद्धती :** उत्तर-पुराश्मयुगीन अवस्थेतील पाती काढण्याच्या तंत्रपद्धतीचाच वापर या अवस्थेतही केला असून लहान पात्यांची मोठ्या प्रमाणावर निर्मिती केली गेली. ही पाती पन्हाळीदार गाभ्यापासून दाबतंत्राचा अवलंब करून काढली जात. बरीचशी पाती काहीही संस्करण न करता जशीच्या तशी वापरली जात. तर काही पात्यांच्या कडांवर संस्करण करून अथवा ती बोथट करून विविध प्रकारची हत्यारे बनविली जात.

लहान हत्यारे लाकडी दांडक्यात अथवा हाडांत खाच (खोबणी) पाडून, त्यात एकाशेजारी एक बसवून चाकू, विळे, मत्स्यबाण, तीराग्रे, खुरपी इत्यादिंसारखी मोठी हत्यारे बनविली जात. ही हत्यारे संयुक्तरित्या वापरली जात असत. अनेक स्थळांमध्ये ही हत्यारे मोठ्या प्रमाणावर आढळून येतात. यावरून असे दिसून येथे की, अशी हत्यारे अगदी सुलभरित्या बनविली जात व दांडक्यात एखादे पाते खराब झाल्यास त्या जागी दुसरे पाते त्वरित बसविले जाई.

**हत्यारसमुहाचे स्वरूप :** पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे भारतात या अवस्थेतील हत्यार-समुहांचे स्थूलमानाने अभौमितिक व भौमितिक हत्यारसमूह असे दोन प्रकार ओळखले गेले आहेत. हत्यारसमुहांची विभागणी मृद्भांडी अस्तित्वात येण्यापूर्वीची अभौमितिक लघुअश्म हत्यारसमूह, मृद्‌भांडी अस्तित्वात येण्यापूर्वीची भौमितिक लघु-अश्म हत्यार-समूह, मृद्‌भांड्यांसहित भौमितिक लघु-अश्म हत्यारसमूह व मृद्‌भांड्यांसहित व अतिसूक्ष्म आकाराचा लघु-अश्म हत्यारसमूह अशा आणखी चार उपअवस्थेत केली आहे.

पाटणे येथील तिसरा टप्पा हा मध्याश्मयुगकालीन असून त्याची आणखी तीन उपअवस्थेत ए, बी, सी, अशी उपविभागणी केली आहे. या ठिकाणी हत्यार-समुहातील उत्क्रांतीचे पुरावे स्तरीय संदर्भात मिळतात.[६७]

**हत्यारांचा उपयोग :** पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे हत्यारे लाकडाच्या अथवा हाडाच्या खाचेत बसवून संयुक्त हत्यारे म्हणून वापरली जात. सुऱ्या, तीराग्रे, भाल्यांची टोके, विळे, मत्स्यबाण इत्यादी प्रमुख हत्यारे होती. संयुक्त हत्यारांचा उपयोग केला गेल्याने शिकार, मासेमारी व अन्नसंकलन पद्धतीत क्रांतिकारक बदल झाले. धनुष्यबाण, काटेरी भाले आणि काठ्या प्राण्यांच्या शिकारीसाठी वापरल्या जात. मासेमारीसाठी टोकदार काठ्या, काटेरी मत्स्यबाण, धनुष्यबाण आणि काठ्या उपयोगात आणल्या होत्या. विळे व सुऱ्यांचा उपयोग कंदमुळे व फळे गोळा करण्यासाठी होत असावा. गोळा केलेले धान्य पाटा व वरवंट्याच्या सहाय्याने बारीक केले जाई. खणण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या काठीला वजन म्हणून मोठी छिद्रे असलेले गोल आकाराचे दगड उपयोगात आणले जात असत.

**हत्यारनिर्मितीसाठी वापरलेली सामग्री :** मध्याश्मयुगीन मानवाने गारगोटी समुहातील चाल्सीडोनी, चर्ट, अगेट, जास्पर या खडकप्रकारांना हत्यारनिर्मितीसाठी प्राधान्य दिले होते. हे खडकप्रकार धमन्या अथवा पट्ट्यांच्या स्वरुपात डेक्कन ट्रॅप बेसाल्टमध्ये महाराष्ट्रात मोठ्या प्रमाणावर मिळतात.

**स्तरीय संदर्भ :** मध्याश्मयुगीन हत्यारे जेव्हा स्तरीय संदर्भात मिळतात, तेव्हा ती प्राचीन निक्षेपाच्या वरील (शेवटच्या) भागात आढळून येतात. उत्तर-पुराश्मयुगीन हत्यारे मिळणाऱ्या निक्षेपांच्या नंतरच्या काळात तयार झालेला हा निक्षेप होय. मध्याश्मयुगीन हत्यारे मिळणारा निक्षेप हा नवाश्मयुग व ताम्रपाषाणयुगीन थरांच्या आधीचा निक्षेप होय.

**स्थळांचे स्वरूप :** या अवस्थेतील स्थळांची विभागणी उघड्यावरील नदी परिसरातील स्तरीय संदर्भातील स्थळे, हत्यारनिर्मिती केंद्र, उताराशी संलग्न असलेली स्थळे, गुहा व शिलाश्रय आणि उघड्यावरील स्थळे अशी केली जाते.

इनामगाव, कांदिवली, पाटणे व भाडणे ही पहिल्या प्रकारची स्थळे होत. बारीक वाळू, मलई व चिकणमाती यांनी बनलेल्या निक्षेपाच्या वरील भागात या अवस्थेची हत्यारे मिळतात.[६८] जेथे नैसर्गिक स्वरुपात आवश्यक असलेला खडकप्रकार आढळतो, अशा ठिकाणी हत्यारनिर्मिती केंद्रे आढळून येतात. या वर्गात मोडणारी महाराष्ट्रातील असंख्य स्थळे उजेडात आली असून ती डोंगराच्या पठारावर, उतरणीवर आणि सपाट खडकाळ प्रदेशातील आहेत. सागरी किनारी प्रदेशात पाचाड व हातखंबा येथे असलेल्या नैसर्गिक गुहांचा मध्याश्मयुगीन मानवाने वास्तव्यासाठी उपयोग केल्याचा पुरावा उपलब्ध आहे.[६९]

**पुरापर्यावरण :** भारतातील निरनिराळ्या प्रदेशात मध्याश्मयुगीन काळात हवामान वेगवेगळ्या प्रकारचे होते. अंतिम प्लायस्टोसीन काळात शुष्क प्रकारचे हवामान, तर पूर्व होलोसीन काळात आर्द्र प्रकारचे हवामान होते याचा पुरावा भारतीय द्वीपकल्पात सर्वत्र मिळतो. महाराष्ट्रात मध्याश्मयुगीन संस्कृती प्रामुख्याने पूर्व व मध्य होलोसीन काळात भरभराटीस आली, तरी या अवस्थेचा पुरावा मात्र अंतिम प्लायस्टोसीन काळापासून मिळतो. राजस्थान येथे पराग विश्लेषण पद्धतीवर आधारित हवामानात बदल दर्शविणारा पुरावा उपलब्ध झाला आहे. तो शुष्क व आर्द्र या स्वरुपातील असून खालीलप्रमाणे क्रम सुचवितो.

१०,००० वर्षापूर्वी (व. पू.) – अतिशुष्क हवामान

१०,०००–९५०० वर्षे (व. पू.) – आर्द्र हवामान

९५००–५००० वर्षे (व. पू.) – निमशुष्क हवामान

५०००–३७०० वर्षे (व. पू.) – आर्द्र हवामानात एकदम वाढ

३७००–३५०० वर्षे (व. पू.) – शुष्क हवामान

३५००–३००० वर्षे (व. पू.) – आर्द्र हवामान

३०००–२५०० वर्षे (व. पू.) – अतिशुष्क हवामान[७०]

वरील हवामान बदलाचा क्रम जरी राजस्थान येथील असला तरी थोड्याफार प्रमाणात तो समकालीन महाराष्ट्रातील हवामान प्रकाराला लागू होत असला पाहिजे. मध्याश्मयुगीन मानवाला ५००० ते ३७०० वर्षापूर्वी वनस्पती व प्राणी या स्वरुपात विपुल प्रमाणात अन्न उपलब्ध होते. या काळात लोकसंख्याही वाढली असावी. कारण या अवस्थेची स्थळे भारतात सर्वत्र विखुरलेली आढळून येतात. मध्य-पुराश्मयुगीन निर्वाह (आहार) पद्धतीविषयीची आपली माहिती ही प्राण्यांच्या तसेच वनस्पतींच्या

अवशेषांवर आधारित असते. महाराष्ट्रात अजूनपर्यंत मध्याश्मयुगीन प्राण्यांचे अवशेष असणारी स्थळे उघडकीस आली नाहीत. भारतात इतरत्र उत्खनन केलेल्या या अवस्थेच्या स्थळांत मोठ्या प्रमाणात गाय, बैल, म्हैस, डुक्कर, चितळ, निलगाय, कोल्हा, विविध प्रकारची हरणे इत्यादी प्राण्यांची हाडे मिळतात. स्वाभाविकपणे यांचे मांस ते खात असावेत. या अवस्थेतील मानव विविध प्रकारच्या रानटी जनावरांची शिकार करीत होता. काही स्थळांमध्ये गेंडा व हत्ती यांसारख्या मोठ्या प्राण्यांचे अवशेष मिळतात, तर काही ठिकाणी मासे व कासव यांचे अवशेष मिळाले आहेत. या अवस्थेतील मानवाचा उदरनिर्वाह बराचसा वनस्पतीजन्य कंदमुळे व फळे यावर आधारित होता. यासंबंधी काही पुरावा जरी जतन झालेला नसला, तरी बऱ्याच स्थळांमध्ये पाटे व वरवंटे मिळाले आहेत. यांचा उपयोग अन्न बारीक करण्यासाठी नक्कीच केला असावा.

**कालमापन :** भारतातील मध्याश्मयुगीन अवस्थेचा काल निश्चित करण्यास उपयुक्त असा पुरावा रेडिओकार्बन–१४ तारखांच्या स्वरुपात बऱ्याच ठिकाणी उपलब्ध आहे. इनामगाव येथील मध्याश्मयुगीन उद्योगसमुहाचा काल रेडिओ-कार्बन–१४ तारखांच्या आधारे ठरविला गेला आहे. येथील उद्योगसमूह हा उत्तर पुराश्मयुग व मध्याश्मयुग यामधील अवस्थेचा आहे. या उद्योगसमुहाची हत्यारे प्राचीन निक्षेपाच्या वरील अखेरच्या भागात मिळतात. निक्षेपाच्या वरील भागात मिळणाऱ्या शिंपल्यांच्या आधारे काढलेला रेडिओकार्बन–१४ हा काळ ११,७०० ± १५० वर्षे (व. पू.)[७१] असा आहे. हा पुरावा अतिशय महत्त्वाचा मानला जातो. कारण या पुराव्याच्या आधारे मध्याश्मयुगाला भारतात प्राचीनता मिळाली आहे. भारतात अन्यत्र रेडिओकार्बन–१४ कालमापन पद्धतीचा उपयोग करून अनेक तारखा उपलब्ध झाल्या आहेत व त्या आधारे मध्याश्मयुगाचा कालावधी १०,००० ते २,५०० वर्षे (व. पू.) (पूर्व व मध्य होलोसीन)[७२] एवढा मानण्यास हरकत नसावी. सध्या उपलब्ध असलेल्या पुराव्यांआधारे असे म्हणता येईल की, मध्याश्मयुगीन अवस्थेची सुरुवात १२--१३ हजार वर्षांपूर्वी अंतिम प्लायस्टोसीन काळात झाली असावी व ही अवस्था ऐतिहासिक कालापर्यंत अस्तित्वात होती.

## महत्त्वाची स्थळे

**पाटणे :** येथे काल III मध्याश्मयुगीन[७३] कालखंड दर्शविणारा आहे. हा काल III-A, III-B, III-C अशा तीन टप्प्यात विभागला आहे. III-A हा पूर्व मध्याश्मयुगीन, तर III-B व III-C हे उत्तर-मध्याश्मयुगीन टप्पे आहेत. या तीन अवस्थांची सांस्कृतिक वैशिष्ट्ये खालीलप्रमाणे आहेत.

III-A या टप्प्यातील हत्यारे लहान आकाराच्या दगडगोट्यांच्या थरात मिळतात. यातील आणि आधीच्या II-E या टप्प्यातील हत्यारप्रकार, तंत्रपद्धती व हत्यार बनविण्यासाठी वापरलेली सामग्री (खडकप्रकार) यात फारसा फरक आढळत नाही.

फक्त कोरण्यांचे प्रमाण कमी झालेले, तर भौमितिक हत्यारांचे प्रमाण वाढलेले दिसून येते. हत्यारांमध्ये विविध प्रकारची पाती, चंद्रकोर, त्रिकोण व समांतर द्विभुज चौकोनी आकाराची हत्यारे व थोड्या प्रमाणात कोरण्यांचा समावेश आहे. III-B या टप्प्यात हवामानात बदल झाल्याचा पुरावा आढळतो. वाऱ्याने वाहून आलेल्या वाळूच्या थरात (loess) या टप्प्यातील हत्यारे मिळतात. बारीक वाळूचे थर या काळात शुष्क प्रकारचे हवामान असल्याचे सुचवितात. या आणि आधीच्या III-A या टप्प्यातील हत्यार-प्रकार जवळजवळ सारखेच आहेत. या बारीक वाळूच्या थरात आढळणारा पुरावा फार महत्त्वाचा आहे. कारण या थरात कोळशाचे तुकडे, जळालेल्या चिकणमातीची ढेकळे, चुलीचे अवशेष, झोपडी शाकारण्यासाठी केलेले वर्तुळाकार खड्डे व विटकरी लालसर रंगाचे भूमिपृष्ठ आढळून आले आहेत. III-C या अवस्थेची हत्यारे निकृष्ट तंत्रपद्धतीने बनविलेली आहेत. वर उल्लेखिलेला पुरावा असे दर्शवितो की, मानव हळुहळू स्थिर जीवनाकडे वाटचाल करू लागला होता.

**पाचाड :** कोकणातील पाचाड व हातखंबा या ठिकाणी मध्याश्मयुगीन मानवाने गुहा व शिलाश्रयांचा वास्तव्यासाठी उपयोग केला होता. पाचाड येथील नैसर्गिक गुहा रायगड किल्ल्याच्या पायथ्याशी (जिल्हा रायगड) असून येथे मध्याश्मयुगाचा[७४] पुरावा मिळतो. गुहेत आढळून येणाऱ्या प्राचीन अवशेषयुक्त थरात आर. व्ही. जोशी व बी. पी. बोपर्डीकर यांनी उत्खनन केले. ही गुहा डेक्कन ट्रॅप बेसाल्ट या खडक-प्रकारात तयार झाली आहे. या ठिकाणी गुहेतील प्राचीन अवशेषयुक्त थरात दोन चाचणी खड्डे घेण्यात आले. खड्ड्यांत तपकिरी रंगाची ठिसूळ माती ५ सें. मी पर्यंत, राखाडी रंगाची माती १५ सें. मी. पर्यंत व अणकुचीदार मातीयुक्त दगडगोट्यांचा थर-१.५ सें. मी. पर्यंत असा स्तरक्रम आढळून आला. हत्यारे तीनही थरांत मिळतात. त्यात पाती, चंद्रकोर आकाराची हत्यारे, टोचे आणि गाभे यांचा समावेश आहे. या ठिकाणी चाल्सीडोनी हा खडकप्रकार हत्यारनिर्मितीसाठी वापरलेला आहे. भौमितिक आकाराची हत्यारे वरच्या थरात मिळतात. ती खालच्या थरात आढळून येत नाहीत. थोड्याफार प्रमाणात कोरण्यादेखील मिळतात. हत्यारांबरोबर या थरात पक्षांची हाडे तसेच खापराचे तुकडे मिळतात. या ठिकाणी मिळणारी हत्यारे प्रगत तंत्रपद्धतीची वाटतात.

**हातखंबा :** रत्नागिरी शहरापासून १६ कि. मी. अंतरावर राष्ट्रीय महामार्गावर हातखंबा येथे नैसर्गिक स्वरुपात, जांभा या खडकप्रकारात गुहा आढळून येतात. या गुहा एका कमी उंचीच्या टेकडीच्या पायथ्याशी आहेत. येथे उत्खनन करण्यात आल्यावर सुट्या खडकांची तुकडेयुक्त तपकिरी माती, जांभ्यापासून तयार झालेली पिवळी चिकणमाती, सुटी पिवळसर चिकणमाती आणि जांभा खडक असा स्तरक्रम आढळून आला.[७५]

गुहेत आढळून येणारा प्राचीन अवशेषयुक्त थर ३ मीटर जाडीचा आहे. पूर्ण व अपूर्ण अवस्थेतील बरीचशी हत्यारे तसेच छिलके व चाल्सीडोनीचे तुकडे वरील

तीनही थरांत आढळून आले. पाती, संस्करण केलेली लहान मोठी पाती, नोक हत्यारे (टोचे), वेधण्या, तासण्या व चंद्रकोर आकाराची हत्यारे असे हत्यारप्रकार येथे आढळले. चाल्सीडोनी, चर्ट व क्वार्टझाईट हे खडकप्रकार हत्यारनिर्मितीसाठी वापरले आहेत.

**इनामगाव :** हे स्थळ पुणे जिल्ह्यातील शिरूर तालुक्यातील असून पुणे शहरापासून पूर्वेला ९० कि. मी. वर आहे. या टिकाणी पुराश्मयुगापासून ते ताम्रपाषाणयुगापर्यंतचा सलग पुरावा मिळतो. हे स्थळ घोड नदीकाठी असून नदीच्या उजव्या किनाऱ्यावर स्तरीय संदर्भात मध्याश्मयुगीन अवस्थेचा पुरावा मिळतो. हे स्थळ ताम्रपाषाणयुगीन स्थळापासून वायव्येला १.५ कि. मी. अंतरावर आहे. येथे अंतिम प्लायस्टोसीनकालीन प्राचीन निक्षेपाचा थर, लहान दगडगोटे व वाळूयुक्त थराच्या स्वरुपात आढळून येतो. हा थर सध्याच्या नदीच्या पात्रापासून ६ ते ७ मी. उंचीवर आहे. येथे आढळून येणारा थर हा चुनखडीयुक्त असून त्याखाली ०.५० ते ०.७० मीटर जाडीचा दगडगोट्यांचा थर आहे. सन १९७९ व १९८२ मध्ये हत्यारयुक्त दगडगोट्यांच्या थरांत येथे चाचणी खड्डे घेण्यात आले. त्यात मोठ्या प्रमाणावर हत्यारे व शिंपले मिळाले. येथील उद्योगसमूह हा उत्तर पुराश्मयुगीन व मध्याश्मयुगीन या दोन्ही अवस्थेमधला आहे.[७६]

येथे पाती अनेक प्रकारांमध्ये व मोठ्या प्रमाणात मिळतात. त्यांचे प्रमुख प्रकार पुढीलप्रमाणे :– संस्करण न केलेली साधी पाती, एक अथवा दोन्ही कडा संस्करण केलेली पाती, बोथट केलेली पाती, खाचा असलेली पाती व तिरके टोक असलेली पाती. या टिकाणी विविध प्रकारच्या तासण्या, नोक हत्यारे (टोचे), वेधण्या, भौमितिक आकाराची हत्यारे तसेच छिलके व गाभेही आढळून येतात.

हत्यारसमूह पात्यांपासून बनविलेला आहे. ही हत्यारे उत्तर-पुराश्मयुगीन हत्यारांपेक्षा भिन्न असून ती पातळ व लहान आकाराची आहेत. हत्यारे चाल्सीडोनी या खडकप्रकारापासून बनविली आहेत. पूर्ण स्थितीतील हत्यारांबरोबर मोठ्या प्रमाणात हत्यारे बनविताना निघालेले लहान छिलक्यांचे तुकडे व अपूर्ण अवस्थेतील हत्यारे येथे मिळतात. यावरून या स्थळाला हत्यारनिर्मिती केंद्र म्हणता येईल. या टिकाणी शिंपल्यावर आधारित रेडिओकार्बन–१४ तारीख उपलब्ध आहे. येथील या उद्योगसमुहाचा काल ११,७०० ± १५० वर्षे (व. पू.) हा आहे. हे कालमापन महत्त्वाचे आहे. कारण या पुराव्यांआधारे मध्याश्मयुगीन अवस्थेला प्राचीनता मिळाली आहे. ही अवस्था भूशास्त्रीयदृष्ट्या अंतिम प्लायस्टोसीनकालीन आहे.

## नवाश्मयुग

नवाश्मयुग हा अश्मयुगाचा अंतिम सांस्कृतिक टप्पा होय. या काळात मानवी जीवनात क्रांतिकारक बदल घडून आले. मानवाने अन्नसंकलनाच्या अवस्थेतून अन्नोत्पादनाच्या अवस्थेत पदार्पण केले. आता मानव शेती करू लागल्याने व ती

करण्यासाठी आणि पाळीव प्राण्यांची निपज करण्यासाठी त्याला भटके जीवन सो: एका ठिकाणी राहणे प्राप्त झाले. तो आता मातीची भांडी व दगडाची घोटून-घार गुळगुळीत व चमकदार केलेली धारदार हत्यारे बनवू लागला. या अवस्थेचा मोठ प्रमाणात पुरावा काश्मीर, कर्नाटक, आंध्र प्रदेश, आसाम, बिहार वगैरे ठिकाणी मिळत या सांस्कृतिक अवस्थेच्या निर्भेळ वसाहतीचे अवशेष अद्याप महाराष्ट्रात मिळाले नाहीत. जे काही थोडेफार अवशेष उपलब्ध होतात ते ताम्रपाषाणयुगीन अवस्थेच अवषेशांबरोबर संमिश्र स्वरुपात आढळतात. पश्चिम महाराष्ट्रातील इनामगाव, नेवार इत्यादी ताम्रपाषाणयुगीन उत्खनित स्थळांमध्ये नवाश्मयुगीन संस्कृतीचे काही घट आढळून आले आहेत.[७७]

**समालोचन :** महाराष्ट्रात अश्मयुगीन संस्कृतीसंबंधी आतापर्यंत जे सर्वेक्षण व संशोधन झाले त्याचा थोडक्यात आढावा या प्रकरणात घेण्यात आला आहे. सध्य उपलब्ध असलेल्या पुराव्यांधारे आद्य पुराश्मयुगापासून ते मध्याश्मयुगापर्यंत महाराष्ट्राचा सलग क्रमबद्ध सांस्कृतिक इतिहास मांडणे आता शक्य झाले आहे.

पुराश्मयुगीन स्थळे विविध भौगोलिक परिस्थितीच्या संदर्भात आढळून येतात. उदा. नदीचा परिसर, समुद्र किनारा, गुहा व शिलाश्रये, डोंगराचा उतारा इत्यादी. बहुसंख्य स्थळे ही नदीच्या परिसराशी संलग्नित आहेत. अॅश्युलियन मानवाने बारमाही पाणीपुरवठा असलेल्या नद्यांकाठी वास्तव केले होते. हत्यारे बनविण्यासाठी लागणारी साधनसामग्री (खडकप्रकार) जेथे नैसर्गिक स्वरुपात अथवा नदीच्या पात्रात दगडगोट्यांच्या स्वरुपात मुबलक प्रमाणात उपलब्ध आहे अशा ठिकाणाची निवड त्याने केली होती. चिरकी–नेवासे, गंगापूर व भाडणे येथे मिळणारा पुरावा बराचसा मूळ स्थितीतला आहे. महाराष्ट्रात आद्य पुराश्मयुगाचा मिळणारा पुरावा सभोवतालच्या गुजरात, मध्य प्रदेश, कर्नाटक व आंध्र प्रदेश राज्यांत मिळणाऱ्या पुराव्यांशी तुलना करता कमी प्रमाणात आहे. महाराष्ट्राच्या बऱ्याचशा भागात आद्य पुराश्मयुगीन मानवाने हत्यारनिर्मितीसाठी प्राधान्य दिलेला क्वार्टझाईट हा खडकप्रकार उपलब्ध नाही. कदाचित त्यामुळे पुरावा कमी प्रमाणात मिळत असावा.

महाराष्ट्रात मध्य-पुराश्मयुगीन कालखंडातील बहुसंख्य स्थळे उघडकीस आली असून राज्याच्या विविध भागात विस्तृत प्रमाणावर पुरावा आढळून आला आहे. या काळात मानवाने गारगोटी समुहातील चाल्सीडोनी, चर्ट, जास्पर, अगेट इत्यादी खडकप्रकारांचा हत्यारनिर्मितीसाठी वापर केला होता. हे सर्व गारगोटीचे प्रकार डेक्कन ट्रॅप बेसाल्टमध्ये धमन्यांच्या स्वरुपात आढळून येतात. या अवस्थेची स्थळे अॅश्युलियन अवस्थेपेक्षा विविध भौगोलिक परिस्थितीच्या संदर्भात मिळतात. अॅश्युलियन मानव ज्या प्रदेशात प्रतिकूल परिस्थितीमुळे वास्तव्य करू शकला नव्हता अशा ठिकाणी देखील मध्य-पुराश्मयुगीन मानवाने प्रतिकूल परिस्थितीला यशस्वीप्रकारे तोंड देऊन वास्तव्य केले होते.

महाराष्ट्रात उत्तर-पुराश्मयुगीन कालखंडातील थोडीफार स्थळे उघडकीस आली आहेत. स्थळांची संख्या कमी वाटते; कारण या अवस्थेचा शोध नुकताच म्हणजे ३०--४० वर्षांपूर्वी लागला आहे. या कालखंडाविषयी ज्या प्रमाणात अन्वेषण व्हावयास पाहिजे तेवढे अद्याप झालेले नाही.

मध्याश्मयुगीन कालखंडाचा पुरावा विस्तृत प्रमाणात महाराष्ट्रातील विविध भागात, या अवस्थेच्या स्थळांच्या स्वरुपात मिळतो. अशी स्थळे शेकड्यांनी उघडकीस आली आहेत, व असे दिसून येते की, या काळात लोकसंख्येत वाढ झाली असावी. हत्यार बनविण्याच्या तंत्रपद्धतीत बरीच प्रगती झाल्याने या सुधारित हत्यारप्रकारांच्या सहाय्याने मानव आवश्यक असलेल्या नैसर्गिक साधनसंपत्तीचा प्रभावीपणे उपयोग करून घेऊ लागला. हत्यारांचा आकार व प्रकार यावरून तत्कालीन समाजाच्या गरजा व आर्थिक पातळी कळून येते. हत्यार बनविण्याच्या तंत्रपद्धतीत झालेली प्रगती, मानवाच्या जीवन पद्धतीतदेखील उल्लेखनीय प्रगती झाल्याचे दर्शविते. मध्याश्मयुगीन काळात मानवाने संयुक्त हत्यारांचा उपयोग केल्याने शिकार, मासेमारी व अन्नसंकलन पद्धतीत क्रांतिकारक बदल झाले. अश्मयुगाच्या सर्व अवस्थांमध्ये मध्याश्मयुगाला विशेष महत्त्व आहे. ती प्रगत सांस्कृतिक अवस्था होती हे आता सिद्ध झाले आहे. याच अवस्थेत मानवाने थोड्याफार प्रमाणात स्थिर जीवनाकडे वाटचाल केली. मानव अग्नीचा उपयोग करू लागला, पशुपालनास सुरुवात झाली. मातीची भांडी तयार करण्यात येऊ लागली. मृत व्यक्तींचे दफन अत्यंत काळजीपूर्वक करण्यात येऊ लागले. गुहांच्या भिंतींवर, छतावर व इतर भागांवर चित्रकाम करण्यास सुरुवात झाली.

अश्मयुगीन मानव वन्यप्राण्याची शिकार करून व कंदमुळे, फळे गोळा करून त्यावर आपली उपजीविका करत असे. तत्कालीन मानवाच्या निर्वाहपद्धतीविषयी कुठल्याच प्रकारचा प्रत्यक्ष पुरावा अद्याप उपलब्ध नसल्याने निश्चित काहीच सांगता येत नाही. काही स्थळांमध्ये दगडी हत्यारांबरोबर शिकार केलेल्या प्राण्यांचे अवशेष मिळतात. यावरून एवढेच म्हणता येईल की, मानव विविध जंगली जनावरांची शिकार करत असे. आतापर्यंत असे गृहीत धरले गेले आहे की, अश्मयुगीन मानव हा मुख्यत्वेकरून शिकारी होता. प्राण्यांचे मांस हा त्याच्या अन्नाचा एक प्रमुख घटक होता व अल्प प्रमाणात पूरक अन्न म्हणून वनस्पतीजन्य कंदमुळे, फळे यांचा उपयोग करीत होता. शिकार व अन्नसंकलन जीवनपद्धती अवलंबिणाऱ्या आफ्रिकेतील सध्याच्या काही वन्य जमातींच्या जीवनपद्धतींचा अभ्यास करण्यात आला आहे व त्यावरून असे दिसून आले आहे की, या जमातींच्या आहारामध्ये वनस्पतीजन्य कंदमुळे व फळे यांचे प्रमाण ७० ते ८० टक्के एवढे असते व प्राण्यांच्या शिकारीला दुय्यम स्थान दिले जाते.[७८] दुर्दैवाने भारतात अश्मयुगीन जीवनाच्या निर्वाहपद्धतीविषयी पुरावा फारच अल्पप्रमाणात मिळतो. याला कारण म्हणजे फारच थोड्या अश्मयुगीन् मूळ वसतीस्थानांचे उत्खनन झालेले आहे आणि दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे भारतातील उष्ण प्रदेशीय हवामानामुळे व काही ठिकाणच्या आम्लयुक्त मातीमुळे सेंद्रिय पदार्थ लवकर नष्ट होतात.

युरोप व पश्चिम आशियातील अनेक अश्मयुगीन स्थळांमध्ये मानवी दफने आढळून येतात. त्याशिवाय काही टिकाणी गुहांमध्ये अश्मयुगीन कलेचा पुरावा चित्रकलेच्या स्वरुपात मिळतो. या पुराव्याआधारे तत्कालीन समाजव्यवस्थेसंबंधी थोडीफार कल्पना येते. भारतात वरील प्रकारचा पुरावा उपलब्ध नसल्याने आपल्याला अश्मयुगीन सामाजिक जीवनाविषयी ठामपणे अनुमाने काढता येत नाहीत.

आधी उल्लेख केल्याप्रमाणे मध्याश्मयुगीन स्थळे महाराष्ट्रात विविध भौगोलिक परिस्थितीच्या संदर्भात सर्वत्र आढळून येतात. पुराश्मयुगीन स्थळे मात्र काही ठराविक प्रदेशांत एकवटली आहेत. मध्य-पुराश्मयुगीन स्थळे सध्याच्या निमशुष्क भागात तसेच तापी, गोदावरी, भीमा, कृष्णा, वर्धा, वैनगंगा वगैरे नद्यांच्या खोऱ्यात आणि महाराष्ट्राच्या देशावरील पठारावर केंद्रित झाली आहेत. जास्त पाऊस असलेल्या प्रदेशांत अश्मयुगीन स्थळांचे प्रमाण कमी आहे. डोंगराच्या माथ्यावर व उतारावर फारच थोडी स्थळे मिळतात. यावरून एक गोष्ट स्पष्ट होते की, निमशुष्क हवामान, सौम्य जंगले व सौम्य उताराच्या सपाट पठारी प्रदेशाला मानवाने वास्तव्यासाठी प्राधान्य दिले होते. भारतातील इतर राज्यांतसुद्धा जवळजवळ याच प्रकारचा पुरावा आढळून येतो.[७९] अश्मयुगीन मानवाने वसाहतीसाठी स्थळांची निवड करताना स्थळांच्या परिसरातील भूरचना, बारमाही पाणीपुरवठा, हत्यारांसाठी लागणाऱ्या खडकप्रकारांची उपलब्धता, शिकारीस योग्य प्राणी असलेली ठिकाणे या सर्व बाबींचा निश्चित विचार केलेला दिसतो. या प्रकारे अश्मयुगीन वसाहतीची निवड ही अनेक भौगोलिक घटकांवर अवलंबून असते. कुठलीही वसाहत एकाच प्रमुख भौगोलिक घटकावर अवलंबून नसून भौगोलिक परिस्थितीचे एक किंवा दोन घटक अनुकूल असल्यास वसाहतीसाठी योग्य पर्यावरणीय पार्श्वभूमी तयार होते व अशा ठिकाणी वास्तव्य केले जाते.

शिकार व अन्नसंकलन पद्धती अवलंबिलेल्या अश्मयुगीन समाजाविषयी गेल्या ४०--५० वर्षांत अन्वेषण व उत्खनन याद्वारे जे संशोधन झाले, त्याचाही थोडक्यात परामर्श या प्रकरणात घेण्यात आला आहे. या अभ्यासामुळे आदिमानवाच्या जीवन पद्धतीसंबंधी बरीच नवीन माहिती उजेडात आली आहे. महाराष्ट्रात ५००००० ते ५००० वर्षे (व. पू.) या कालावधीत अश्मयुगीन मानवाचे अस्तित्व होते. याचा पुरावा अश्मयुगाच्या विविध अवस्थांच्या वसाहतींच्या स्वरुपात जतन झालेला आहे. आद्य-पुराश्मयुगापासून ते मध्याश्मयुगापर्यंत हत्यार बनविण्याच्या तंत्रपद्धतीत प्रगती होत गेली. प्रगत हत्यारसंचामुळे नैसर्गिक साधनसंपत्तीचा उपयोग जीवनासाठी सुलभरित्या करता येऊ लागला. वसाहतींचा विस्तार क्रमशः होत गेला. पर्यावरणातही बदल झाले व तत्कालीन प्राणी व वनस्पती जीवनावर त्याचा परिणाम झाला. हवामानात जे बदल झाले ते तीव्र स्वरुपाचे नव्हते. आदिमानवाची जीवनपद्धती समजून घेण्यासाठी केलेल्या संशोधनात बरीच प्रगती झाली असली तरी सध्या यासंबंधी जी माहिती उपलब्ध आहे त्यात सांस्कृतिक, पर्यावरण व कालमापन याबाबतीत अद्यापही बऱ्याच उणीवा आहेत. यासाठी महाराष्ट्र भूमीवर शास्त्रीय दृष्टिकोनातून सखोल अभ्यास होणे अत्यंत आवश्यक असून त्यामुळे अश्मयुगीन जीवनपद्धतीविषयी असलेल्या अनेक समस्यांची उकल होणे सोयीचे होईल.

---

## तळटिपा

१ फूट, आर. बी., **दि फूटस् कलेक्शन ऑफ इंडियन प्रिहिस्टॉरिक ॲण्ड प्रोटोहिस्टॉरिक ॲन्टिक्विटीज, नोटस् ऑन देअर एजेस ॲण्ड डिस्ट्रीब्युशन,** मद्रास, १९१६, पृ. ४.

२ सांकलिया, एच. डी., "ॲनिमल फॉसिल्स ॲण्ड पॅलिओलिथिक इंडस्ट्रीज फ्रॉम दि प्रवरा बेसिन ॲट नेवासा, डिस्ट्रिक्ट अहमदनगर", **एन्शन्ट इंडिया,** खंड १२, १९५६, पृ. ३-५२.

३ मूर्ती, एम. एल. के., "ब्लेड ॲण्ड ब्युरीन इंडस्ट्रीज नियर रेणीगुटा ऑन दि साऊथ इस्ट कोस्ट ऑफ इंडिया", **प्रोसीडिंग्ज ऑफ प्रिहिस्टॉरिक सोसायटी,** खंड २८, १९६८, पृ. ८३-१०१.

४ ओल्डहॅम, टी., "ऑन दि अगेट फ्लेक फाऊंड बाय मि. वायन इन दि प्लायोसीन डिपॉझिटस् ऑफ दि अप्पर गोदावरी", **रेकॉर्डस् ऑफ दि जिऑलॉजिकल सर्वे ऑफ इंडिया,** खंड १, १८६८, पृ. ६५-६९.

५ पिल्ग्रीम, जी. इ., "ऑन दि ऑकरन्स ऑफ दि एलेफस् ॲन्टिक्स् इन दि गोदावरी ॲल्युव्हियम विथ दि मार्कस् ऑन दि स्पेसिज, इटस् डिस्ट्रिब्युशन ॲण्ड एज ऑफ दि इंडियन असोसिएटेड डिपॉझिटस्," **रेकॉर्डस् ऑफ दि जिऑलॉजिकल सर्वे ऑफ इंडिया,** खंड ३२, १९०५, पृ. १९९-२१८.

६ टॉड, के. यु. आर., "पॅलिओलिथिक इंडस्ट्रीज ऑफ बॉम्बे" **जर्नल ऑफ दि रॉयल ॲन्थ्रॉपॉलॉजिकल इन्स्टिटयूट,** खंड ६९, १९३९, पृ. २५७-२७२.

७ फूट, आर. बी., पूर्वोक्त, १९१६, पृ. ३६.

८ सांकलिया, एच. डी., **दि गोदावरी पॅलिओलिथिक इंडस्ट्री,** डेक्कन कॉलेज पोस्ट-ग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिटयूट, पुणे, १९५२.

९ सांकलिया, एच. डी., **प्रिहिस्टरी ॲण्ड प्रोटोहिस्टरी ऑफ इंडिया ॲण्ड पाकिस्तान** (दुसरी आवृत्ती), डेक्कन कॉलेज, पुणे, १९७४, पृ. ७४-८९.

१० मिश्र, शीला, "ऑन दि इफेक्टस् ऑफ बेसाल्ट वेदरिंग ऑन दि डिस्ट्रिब्युशन ऑफ लोअर पॅलिओलिथिक साइटस् इन दि डेक्कन" **बुलेटिन,** डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिटयूट, पुणे, १९८६, खंड ४१, पृ. १०७--११५.

११ कॉर्वीनस, जी. ए., **ए सर्व्हे ऑफ दि प्रवरा रिव्हर सिस्टिम इन वेस्टर्न महाराष्ट्र, इंडिया,** खंड १, १९८१ व खंड २, १९८३.

१२ साळी, एस. ए., "क्वाटर्नरी स्ट्रॅटीग्राफी इन दि कान बेसीन ॲट भाडणे ॲण्ड येसर, रिझल्टस् ऑफ प्रिलिमिनरी एक्सप्लोरेशन्स", **जर्नल ऑफ रॉयल एशियाटिक सोसायटी,** खंड ३९-४०, मुंबई, १९६७, पृ. १५७-१६७.

१३ कोरीसेट्टर, आर. ॲण्ड अदर्स "एज ऑफ दि बोरी व्होल्कॅनिक ॲश ॲण्ड लोअर पॅलिओलिथिक कल्चर ऑफ दि कुकडी व्हॅली, महाराष्ट्र", **बुलेटिन**, डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिटयूट, पुणे, खंड ४७-४८, १९८९, पृ. १३५-१३७.

१४ जोशी, आर. व्ही. ॲण्ड अदर्स "ॲनिमल फॉसिल्स ॲण्ड अर्ली स्टोन एज टूल्स फ्रॉम गंगापूर ऑन दि गोदावरी रिव्हर", **करंट सायन्स,** खंड ३५, १९६६, पृ. ३४४.

१५ सांकलिया, एच. डी., पूर्वोक्त, १९७४, पृ. ७६-७७.

१६ गझदर, एस्., **क्वाटर्नरी एनव्हायरनमेंट अँड स्टोन एज कल्चर्स ऑफ दि कोस्टल कोकण : महाराष्ट्र,** डेक्कन कॉलेज, पुणे, १९८०, पृ. ४२.

१७ देव, एस. जी., **जिओमॉरफिक स्टडी ऑफ पॅलिओलिथिक सेटलमेंटस् इन दि घटप्रभा बेसिन,** पीएच्. डी. थेसिस (अप्रकाशित), पुणे विद्यापीठ, १९९१, पृ. ११३.

१८ जोशी, आर. व्ही. ॲण्ड अदर्स, पूर्वोक्त, १९६६ पृ. ३४४.

१९ साळी, एस. ए., पूर्वोक्त, १९६७, पृ. १५७-१६७.

२० कॉर्वीनस, जी. ए., पूर्वोक्त, १९८१, १९८३.

२१ कोरीसेट्टर, आर. ॲण्ड अदर्स, पूर्वोक्त, १९८९, पृ. १३५-१३७.

२२ राजगुरू, एस. एन्., "ऑन दि प्रॉब्लेम ऑफ दि लेट प्लायस्टोसीन क्लायमॅटिक चेंजेस इन वेस्टर्न महाराष्ट्र", **रेडिओकार्बन ॲण्ड इंडियन आर्किऑलॉजी,** टाटा इन्स्टिट्यूट ऑफ फंडामेंटल रिसर्च, मुंबई, १९७३, पृ. ८०-८४.

२३ राधाकृष्ण, बी. पी., "दि मायसोर प्लेटो : इटस् स्ट्रक्चरल ॲण्ड फिजिओग्राफीक इव्होल्यूशन", **बुलेटिन,** मायसोर जिऑलॉजिकल असोसिएशन, खंड ३, १९५२, पृ. १-५६.

२४ वैद्यनाथन्, आर., "रिसेंट ॲडव्हान्सेस इन जिओमॉर्फीक स्टडीज इन दि पेनिनसुलर इंडिया : ए रिव्ह्यू," **इंडियन जर्नल ऑफ अर्थ सायन्स,** १९७७, पृ. १३-३५.

२५ राजगुरू, एस. एन., "ऑन दि लेट प्लायस्टोसीन ऑफ दि डेक्कन इंडिया," **क्वाटर्नरीया,** खंड ११, १९६९, पृ. २४१-२५३.

२६ राजगुरू, एस. एन. ॲण्ड एस. गझदर, "ए रिव्ह्यू ऑफ दि रिसर्च ऑन क्वाटर्नरी सी लेव्हल चेंजेस ॲण्ड आर्किऑलॉजिकल साइटस् इन इंडिया," **बुलेटिन,** डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिटयुट, पुणे, खंड ३३, १९७३, पृ. १९३-२००.

२७ गझदर, एस., पूर्वोक्त, १९८०, पृ. ८७.

२८ बदाम, जी. एल., **प्लायस्टोसीन फौना ऑफ इंडिया,** डेक्कन कॉलेज, रिसर्च इन्स्टिट्युट पुणे, १९७९, पृ. १९५.

२९ मिश्र, शीला, " दि एज ऑफ ॲश्युलियन कल्चर इन इंडिया, न्यू एव्हिडन्स", **करंट ॲन्थ्रॉपॉलॉजी,** खंड ३३, १९९२, पृ. ३२५-३२८.

३० कोरीसेट्टर, आर. ॲण्ड अदर्स, १९८९, पूर्वोक्त, पृ. १३५--१३७.

३१ सांकलिया, एच. डी., पूर्वोक्त, १९५२.

३२ जोशी, आर. व्ही., ॲण्ड अदर्स, पूर्वोक्त, १९६६, पृ. ३४४.

३३ साळी, एस. ए., पूर्वोक्त, १९६७, पृ. १५७-१६७.

३४ कार्वीनस, जी. ए., पूर्वोक्त, १९८१, १९८३.

३५ अन्सारी, झेड. डी. ॲण्ड पप्पु, आर. एस., "सम ऑब्झर्वेशन्स ऑन दि एक्सकॅव्हेशन्स ॲट ॲश्युलियन साईट : चिरकी-नेवासा, डिस्ट्रिक्ट अहमदनगर, महाराष्ट्र", **बुलेटिन,** डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे, खंड ३५, १९७५, पृ. १-८.

३६ अन्सारी, झेड. डी., मूर्ती, एम. एल. के. ॲण्ड पप्पु, आर. एस.,"दि ॲश्युलियन होरायझन ॲट चिरकी-नेवासा ॲण्ड इटस् क्रोनॉलॉजिकल इंप्लीकेशन्स", **बुलेटिन,** डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे, खंड ३६, १९७६, पृ. ८-१४.

३७ सांकलिया, एच. डी., पूर्वोक्त, १९५६, पृ. ३५-५३.

३८ साळी, एस. ए., **स्टोन एज इंडिया,** शंकर पब्लिशर्स, औरंगाबाद, १९९०, पृ. १८०-१८९.

३९ जोशी, आर. व्ही. ॲण्ड साळी, एस. ए., "मिडल स्टोन एज फॅक्टरी साइटस् इन वेस्टर्न इंडिया", **ॲंथ्रोपॉस,** खंड ६३/६४, १९६९, पृ. ८१८-८२७.

४० सांकलिया, एच. डी., पूर्वोक्त, १९७४, पृ. ७६-७७.

४१ कित्ता, पृ. ७६-७७.

४२ जोशी, आर. व्ही. ॲण्ड साळी, एस. ए., पूर्वोक्त, १९६९, पृ. ८१८-८२०.

४३ पप्पु, र. सु., "ॲश्युलियन महाराष्ट्र--नवे संशोधन", **भारत इतिहास संशोधन मंडळ,** त्रैमासिक, पुणे, खंड ६२, १९८४, पृ. ४५-५७.

४४ सांकलिया, एच. डी., पूर्वोक्त, १९७४, पृ. १४६.

४५ बदाम, जी. एल., पूर्वोक्त, १९७९, पृ. १८९-२०६.

४६ सांकलिया, एच. डी., पूर्वोक्त, १९७४, पृ. १४६.

४७ पोसेल, जी. एल., ''रेडिओकार्बन डेटस् फ्रॉम साऊथ एशिया'', **मॅन ॲण्ड एनव्हायरनमेंट,** खंड १२, १९८८, पृ. १६९-१९६.

४८ मिश्र, व्ही. एन., ''स्टोन एज इंडिया--ॲन इकॉलॉजिकल परस्पेक्टिव्ह'', **मॅन ॲण्ड एनव्हायरनमेंट,** खंड १४, १९८९, पृ. १७--६४.

४९ सांकलिया, एच. डी., पूर्वोक्त, १९५६, पृ. ३५--५३.

५० जोशी, आर. व्ही. ॲण्ड अदर्स, ''एक्सकॅव्हेशन्स ॲट वडोली--वाघोली : ए मिडल पॅलिओलिथिक साइट ऑन दि हाय लेव्हल ग्रॅव्हल ऑफ दि गोदावरी रिव्हर'', **बुलेटिन,** डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे, खंड ४०, १९८०, पृ. ४७-५९.

५१ साळी, एस. ए., ''दि अपर पॅलिओलिथिक कल्चर ॲट पाटणे, डिस्ट्रिक्ट जळगाव, महाराष्ट्र'', **रिसेंट ॲडव्हान्सेस इन इंडो पॅसिफिक प्रिहिस्टरी,** १९८५, पृ. १३९-१४५; **दि अपर पॅलिओलिथिक ॲण्ड मेसोलिथिक कल्चर्स ऑफ महाराष्ट्र,** डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्युट, पुणे, १९८९.

५२ मूर्ती, एम. एल. के., ''ए लेट प्लायस्टोसीन केव्ह साइट इन सदर्न इंडिया'' **प्रोसिडिंग्ज ऑफ अमेरिकन फिलॉसॉफिकल सोसायटी,** खंड ११८ (२), १९७४, पृ. १९६-२३०.

५३ जोशी, आर. व्ही ॲण्ड पप्पु, आर. एस., ''भोकर : ॲन अपर पॅलिओलिथिक फॅक्टरी साइट फ्रॉम सेंट्रल गोदावरी बेसीन, महाराष्ट्र'', **मॅन ॲण्ड एनव्हायरनमेंट,** खंड ३, १९७९, पृ. ८६-९१.

५४ साळी, एस. ए., पूर्वोक्त, १९६७, पृ. ३९-४०.

५५ साळी, एस. ए., पूर्वोक्त, १९८५, पृ. १३७-१४६.

५६ सांकलिया, एच. डी., पूर्वोक्त, १९७४, पृ. ७६-७७.

५७ कित्ता, पृ. २२६-२२९.

५८ जोशी, आर. व्ही. ॲण्ड पप्पु आर. एस., पूर्वोक्त, १९७९, पृ. ८६-९१.

५९ काळे, व्ही. एस. ॲण्ड राजगुरु, एस. एन., "लेट क्वाटर्नरी ॲल्युव्हियल हिस्टरी ऑफ दि नॉर्थ वेस्टर्न डेक्कन अपलँड रिजन", **नेचर,** खंड ३२५, १९८७, पृ. ६१२-६१४; राजगुरु, एस. एन. ॲण्ड कोरीसेट्टर, आर., "क्वाटर्नरी जिओमॉर्फिक एनव्हायरनमेंट ॲण्ड कल्चरल सक्सेशन इन वेस्टर्न इंडिया", **जर्नल ऑफ अर्थ सायन्सेस,** खंड १४ (३-४), १९८७, पृ. ३४९-३६१.

६० बदाम, जी. एल., पूर्वोक्त, १९७९, पृ. १९७-१९९.

६१ साळी, एस. ए., पूर्वोक्त, १९८५, पृ. १३७-१४६ आणि पूर्वोक्त, १९८९ पृ. ८६.

६२ पोसेल, जी. एल., पूर्वोक्त, १९८८, पृ. १६९-१९६.

६३ मूर्ती, एम. एल. के., पूर्वोक्त, १९७४, पृ. १९६-२३०.

६४ काजळे, एम. डी., बदाम, जी. एल. ॲण्ड राजगुरू, एस. एन., "लेट क्वाटर्नरी हिस्टरी ऑफ दि घोड व्हॅली, महाराष्ट्र", **जिओफायटॉलॉजी,** खंड ६ (१), १९७६, पृ. १२२-१३२.

६५ साळी, एस. ए., पूर्वोक्त, १९८५, पृ. १३७-१४६ व पूर्वोक्त, १९८९.

६६ जोशी, आर. व्ही. ॲण्ड पप्पु., आर. एस., पूर्वोक्त, १९७९, पृ. ८६-९१.

६७ साळी, एस. ए., पूर्वोक्त, १९८५, पृ. १३७-१४६ व पूर्वोक्त, १९८९, पृ. ८९.

६८ सांकलिया, एच. डी., पूर्वोक्त, १९७४, पृ. २४६-२४९.

६९ जोशी, आर. व्ही. ॲण्ड बोपर्डीकर, बी. पी. "स्टोन एज कल्चर्स ऑफ कोकण", : **आर्किऑलॉजिकल काँग्रेस ॲण्ड सेमिनार पेपर्स,** नागपूर विद्यापीठ, नागपूर, १९७२, पृ. ४७-५३.

७० कृष्णमूर्ती, आर. व्ही. ॲण्ड अदर्स, " पॅलिओक्लायमॅटिक इन्फ्लुएन्सेस फ्रॉम दि बिहेविअर ऑफ रेडिओकार्बन डेटस् ऑफ कार्बोनेटस फ्रॉम सँड ड्यून्स ऑफ राजस्थान", **प्रोसिडींग्ज ऑफ इंडियन अकॅडेमी सायन्सेस,** खंड ९०, १९८१, पृ. १५५-१६०.

७१ राजगुरू, एस. एन. ॲण्ड अदर्स, " दि टर्मिनल प्लायस्टोसीन मायक्रोलिथिक इंडस्ट्री ऑफ इनामगाव, महाराष्ट्र ", **बुलेटिन,** डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे, खंड ४०, १९८०, पृ. १५०-१५९; पप्पु, आर. एस., " क्वाटर्नरी स्टॅटीग्राफी ऑफ स्टोन एज इंडस्ट्रीज", **एक्सकॅवेशन्स ॲट इनामगाव,** खंड १, १९८८, पृ. १५-३१.

## तळटिपा

७२ पोसेल, जी. एल., पूर्वोक्त, १९८८, पृ. १६९-१९६.

७३ साळी, एस. ए., पूर्वोक्त, १९८५, पृ. १३७-१४६ आणि १९८९, पृ. ८९.

७४ जोशी, आर. व्ही. ॲण्ड बोपर्डीकर, बी. पी., पूर्वोक्त, १९७२, पृ. ४७-६१.

७५ कित्ता, पृ. ४७-५१.

७६ राजगुरू, एस. एन. ॲण्ड अदर्स, पूर्वोक्त, १९८०, पृ. १५०-१५९.

७७ सांकलिया, एच. डी., पूर्वोक्त, १९७४, पृ. ४७३-५१३.

७८ ली, आर. बी., " कुंग बुशमन सबसिस्टन्स : ॲन इंपॉर्टंट आऊटपूट ॲनालिसिस", **एनव्हायरनमेंट ॲण्ड कल्चरल बिहेविअर,** नॅचरल हिस्टरी प्रेस, न्यूयॉर्क, १९६९, पृ. ४७-७९.

७९ पप्पु, आर. एस., " दि जिओमार्फिक सेटींग ऑफ ॲश्युलियन साइटस् इन पेनिन्सुलर इंडिया", **रिसेंट ॲडव्हान्सेस इन इंडो पॅसिफिक प्रिहिस्टरी,** १९८५, पृ. ९-१२; " क्वाटर्नरी एनव्हायरनमेंट ॲण्ड पॅलिओलिथिक कल्चर्स ऑफ दि घटप्रभा बेसीन, कर्नाटक", **आर्किऑलॉजी इन कर्नाटक,** १९९०, पृ. १७-२२ व देव, एस. जी., पूर्वोक्त, १९९१.

---

## प्रकरण ३

# ताम्रपाषाणयुग *

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक अस्मितेचा उगम केव्हा व कसा झाला हे अजूनही निश्चितपणे ज्ञात नाही. साधारणपणे इसवी सनाच्या चौथ्या-पाचव्या शतकाच्या सुमारास या प्रदेशास महाराष्ट्र हे नामाभिधान प्राप्त झाले असावे असे मत प्रचलित आहे. "महावंश" (७१-७४) या सिलोनी बौद्ध ग्रंथात या मतास दुजोरा देणारा पुरावा प्रथम मिळत असला तरी चालुक्य सम्राट दुसरा पुलकेशी याच्या इ. स. ६३४ च्या ऐहोळे येथील कोरीव लेखात अधिक ठोस पुरावा मिळतो.[1] अशा तऱ्हेने उपलब्ध असलेले प्रत्यक्ष पुरावे "महाराष्ट्र" या नावाचा निर्देश इसवी सनाच्या चौथ्या-पाचव्या शतकापासून करीत असले तरी इसवी सनाच्या सुरुवातीपासूनच हे नाव प्रचलित झाले असण्याची दाट शक्यता आहे. येथे प्रचारात असणाऱ्या प्राकृत भाषेला "महाराष्ट्री" म्हणत असत. यावरूनही वरील अनुमानास पुष्टीच मिळते. वराहमिहिराच्या "बृहत्संहितेत" महाराष्ट्रातील लोकांना "महाराष्ट्राः" असे म्हटलेले आहे; तर वात्स्यायनाने त्यांचा उल्लेख "महाराष्ट्रकाणाम" किंवा "महाराष्ट्रीक्याः" असा केलेला आहे.

एक निश्चित की, इसवी सनाच्या सुरुवातीच्या आधीच काही शतके म्हणजे सातवाहन राजांच्या कारकिर्दीतच महाराष्ट्राची स्वतंत्र सांस्कृतिक प्रतिमा निर्माण झालेली होती. विदर्भ आणि कोकणचा किनारी प्रदेश यांचा अपवाद सोडल्यास ख्रिस्तपूर्व दोन हजार वर्षांपूर्वीच्या काळात महाराष्ट्रात सर्वत्र आद्य शेतकऱ्यांच्या वसाहती विखुरलेल्या होत्या याचा पुरातत्वीय पुरावा मिळतो. अलीकडे केलेल्या अशा वसाहतींच्या उत्खननाद्वारे महाराष्ट्रातील या वसाहतींची निश्चित स्वरुपाची एकात्मक सांस्कृतिक रूपरेखा होती असे दिसून येते (आकृती १). विशिष्ट प्रकारचे पर्यावरण या एकात्मकतेस कारणीभूत असावे.

साधारणपणे ख्रिस्तपूर्व तिसऱ्या सहस्रकाच्या शेवटी किंवा दुसऱ्या सहस्रकाच्या सुरुवातीस महाराष्ट्रात स्थिर वसाहती उदयाला आल्या. या वसाहती किंवा गावे पुरातत्वीय पद्धतीनुसार विविध सांस्कृतिक गटांमध्ये विभागली जातात.

### सावळदा संस्कृती (ख्रिस्तपूर्व सुमारे २०००-१८००)

सावळदा या नावाने ओळखली जाणारी ही संस्कृती तापी नदीच्या खोऱ्यात उदयास आली. महाराष्ट्रातील स्थिर जीवनांची सुरुवात या संस्कृतीबरोबर जोडलेली आहे. जिथे या संस्कृतीच्या खाणाखुणा प्रथम आढळल्या व म्हणून ज्याचे नाव या संस्कृतीला दिले गेले ते सावळदा तापी नदीच्या उजव्या तीरावर (जिल्हा-नंदुरबार) वसलेले आहे. इथे सापडलेल्या विशिष्ट धर्तीच्या मातीच्या भांड्यांवरून, खापरांवरून सावळदा संस्कृतीची ओळख पटते. या भांड्यांचा रंग लाल असून त्यावर काळ्या रंगात प्राणी, पक्षी व माशांची नक्षी चितारलेली आहे. भांड्यांमध्ये प्रामुख्याने वाडगे, थाळ्या, हंडे आणि गाड्यांचा समावेश आहे.

---

* या प्रकरणाचे लेखन डॉ. म. के. ढवळीकर ( निवृत्त संचालक, पुरातत्व विभाग, डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट ॲण्ड रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे) यांनी केले आहे.

सावळदा संस्कृतीचा विस्तार ज्या काळात नंदुरबार जिल्ह्याच्या उत्तर विभागात होत होता, त्याच काळात त्याच जिल्ह्याच्या दक्षिण विभागात वेगळ्या प्रकारची भांडी घडविणारे व वापरणारे लोक राहत होते. ही लाल रंगीत भांडी पक्की भाजलेली असल्याने खणखणीत असतात. पोताचा विचार करता ती काही अंशी सिंधू संस्कृतीच्या भांड्यांशी साधर्म्य दर्शविणारी वाटली तरी त्यांचे आकार मात्र स्वतंत्र घाटणीचे आहेत. कावठे (तालुका साक्री, जिल्हा धुळे)[२] येथील उत्खननात अशा प्रकारची भांडी मिळालेली आहेत. कावठे येथील संस्कृतीचा आणखीही एक महत्त्वाचा फरक असा की, महाराष्ट्रातील आद्य शेतकऱ्यांच्या इतर वसाहतीत दगडाची व तांब्याची हत्यारे मिळतात, तर कावठे येथे फक्त हाडांपासून बनविलेली हत्यारे मोठ्या प्रमाणात मिळालेली आहेत.

सावळदा संस्कृतीचा विस्तार प्रामुख्याने तापी नदीच्या खोऱ्यात झालेला असला तरी दायमाबाद येथील पुराव्यांवरून दक्षिणेकडे ती प्रवरेच्या खोऱ्यापर्यंत पोचलेली असावी. सावळदा संस्कृतीचा काळ साधारणपणे ख्रिस्तपूर्व २०००-१८०० वर्षे असा ठरविण्यात आलेला असला, तरी कर्ब-१४ तारखांच्या सुधारित कोष्टकावरून (MASCA) तो ख्रिस्तपूर्व तिसरे सहस्त्रक संपण्याच्या आधीपर्यंत मागे नेता येणे शक्य आहे.

## उत्तर सिंधू संस्कृती (ख्रिस्तपूर्व सुमारे १८००-१६०० वर्षे)

सिंधू संस्कृती उतरणीला लागल्यानंतर त्या संस्कृतीच्या गुजरातमधील लोकांनी तापीच्या खोऱ्यातून महाराष्ट्रात स्थलांतर करण्यास सुरुवात केली. सिंधू संस्कृतीचे लोक गुजरात, विशेषतः सौराष्ट्रात ख्रिस्तपूर्व २३०० पासून पाच शतके नांदत होते. तिथे भरभराटीला आलेल्या त्यांच्या वसाहतींना ख्रिस्तपूर्व १८०० पासून मात्र उतरती कळा लागली. याचे कारण मुख्यत्वेकरून पश्चिम आशियाशी असलेल्या व्यापाराशी निगडित आहे. या व्यापाराला ओहोटी लागल्याचे पुरावे पश्चिम आशियातील इसिन-लार्सा काळात (ख्रिस्तपूर्व १९००) स्पष्टपणे मिळतात. व्यापार मंदावल्यामुळे सिंधू संस्कृतीच्या लोकांना सौराष्ट्रात शेजारच्याच तापी खोऱ्यात स्थलांतर करणे भाग पडले असावे. तापी खोऱ्यात शिरण्याचे आणखी एक कारण म्हणजे पर्यावरणाच्या दृष्टीनेही हा प्रदेश त्यांना जवळचा वाटला असावा. ते बहुधा सुरतमार्गे सोनगड खिंडीतून महाराष्ट्रात उतरले. तापीच्या खोऱ्यातील प्रचंड प्रमाणात पसरलेली काळी कपाशीची जमीन हे त्यांच्यासाठी प्रमुख आकर्षण ठरले असावे. नंतरच्या ऐतिहासिक काळातही या काळ्या जमिनीच्या आकर्षणापायी या प्रदेशावर आक्रमणे झाली. सिंधू संस्कृतीच्या लोकांनी तापीच्या तसेच तिच्या उपनद्यांच्या काठांवरही वसाहती स्थापन केल्या. त्यांच्या संस्कृतीला उत्तर सिंधू संस्कृती असे म्हटले जाते. या संस्कृतीच्या आजवर सुमारे पन्नास वसाहती महाराष्ट्रात उजेडात आल्या आहेत. सिंधू संस्कृतीचे नागरी वैभव केव्हाच लयाला गेले होते आणि या लोकांच्या वसाहती म्हणजे त्यांच्या पूर्वजांच्या दीनवाण्या पडछाया होत याची जाणीव त्यांच्याजवळील साधनसामग्रीच्या

अवशेषांवरून येते. त्यांचे जीवन आता पूर्णतः शेती, पशुपालन, शिकार व मच्छीमारी यावर निर्भर होते. कालांतराने हे लोक हळूहळू प्रवरा नदीच्या खोऱ्यापर्यंत पसरले हे दायमाबाद उत्खननातील पुराव्याच्या आधारे स्पष्ट होते.[३] तेथे या संस्कृतीचा काळ इ.स.पू. २०००-१८०० असा निश्चित केलेला असून त्यानंतरच्या काळात दायमाबाद संस्कृतीचे (इ.स.पू. १८००-१६००) अवशेष सापडले आहेत.

## **माळवा संस्कृती** (ख्रिस्तपूर्व सुमारे १६००-१४००)

माळव्यामध्ये जिचा प्रसार मोठ्या प्रमाणावर झाला तिला स्वाभाविकपणे "माळवा संस्कृती" हे नाव मिळाले. मध्य प्रदेशातील निमाड जिल्ह्यात नर्मदेच्या तीरावर वसलेले अहिल्याबाई होळकरांचे महेश्वर प्रसिद्ध आहे. महेश्वर व समोरच्याच तीरावरील नावडातोली येथे करण्यात आलेल्या उत्खननात माळवा संस्कृतीचे अवशेष प्रथम हाती आले. माळवा संस्कृतीच्या बऱ्याचशा वसाहती शोधून काढण्याचे श्रेय कै. डॉ. विष्णू श्रीधर वाकणकर यांच्याकडे जाते.

माळवा संस्कृतीची ओळख मुख्यत्वाने त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण भांड्यांवरून पटते. ही मातीची भांडी प्रथम फिकट पिवळ्या रंगाच्या द्रावणात बुडवून काढलेली असतात व मग त्यावर गडद तपकिरी रंगाची नक्षी काढलेली असते. नक्षीचे नमुने अनेक प्रकारचे आहेत. तसेच भांड्यांचे आकारही विविध आहेत.

माळवा संस्कृतीचे लोक ख्रिस्तपूर्व १६०० च्या सुमारास शेतजमिनींच्या शोधार्थ हळूहळू महाराष्ट्रात आले. त्यांच्या तापीच्या खोऱ्यातील वसाहतींवरून अनुमान बांधायचे म्हटले, तर या लोकांच्या मोठ्या टोळ्या इथे आल्या असाव्यात. फारच थोड्या अवधीत या लोकांनी गोदावरीही पार करून भीमेच्या खोऱ्यात प्रवेश केला. महाराष्ट्रामध्ये प्रकाशे (जिल्हा धुळे), दायमाबाद (जिल्हा अहमदनगर) आणि इनामगाव (जिल्हा पुणे) या माळवा लोकांच्या सर्वांत मोठ्या व विस्तीर्ण वसाहती होत्या.

## **पूर्व जोर्वे संस्कृती** (ख्रिस्तपूर्व सुमारे १४००-१०००)

अहमदनगर जिल्ह्यात संगमनेर तालुक्यातील जोर्वे या गावी प्रथम उजेडात आलेल्या या संस्कृतीस "जोर्वे संस्कृती" असे म्हणतात. कोकणचा किनारी पट्टा व विदर्भ सोडल्यास या संस्कृतीच्या खाणाखुणा महाराष्ट्रभर मिळतात. जोर्वे संस्कृतीच्या महाराष्ट्रातील अनेक वसाहतींपैकी काहींचा विस्तार लक्षणीय आहे. त्यामध्ये प्रकाशे, दायमाबाद व इनामगाव या अत्यंत महत्त्वाच्या वसाहतींचा आवर्जून उल्लेख करणे आवश्यक आहे.

या संस्कृतीचीही स्वतःची वैशिष्ट्यपूर्ण मृदभांडी मिळतात. अंगच्या लाल रंगावर काळ्या रंगातील नक्षीने सुशोभित केलेल्या या भांड्यांचे काही आकारही खास वेगळे आहेत. त्यामध्ये संपूर्ण आडव्या कंगोऱ्याची बैठक असलेले वाडगे, तोटीचे लोटे आणि

लांब गळ्याची फुगीर भांडी यांचा समावेश आहे. अतिशय कणखर पोताची ही भांडी जलद गतीने फिरणाऱ्या चाकावर बनवित असत; इतकेच नव्हे तर ही भांडी भाजताना प्रथमपासून शेवटपर्यंत अत्यंत तीव्र व एकसारखी धग भट्टीमध्ये कायम ठेवण्यात येई. त्यामुळे भांडी आतून--बाहेरून पूर्णपणे लाल भाजली जात. भांड्यांवरील नक्षींमध्ये फक्त रेषात्मक आणि भौमितिक नमुनेच आढळतात. क्वचित पक्षी, प्राणी चितारलेले दिसतात. मनुष्याकृती तर अगदीच दुर्मिळ आढळतात.

आधीच्या माळवाप्रमाणेच जोर्वे संस्कृतीचे स्वरूपही ताम्रपाषाणयुगीन आहे. पाषाण व तांबे या दोन्हींपासून बनविलेली हत्यारे लोकांच्या वापरात होती. त्यामध्ये मुख्यत्वे गारेच्या दगडांची विविध आकाराची पाती समाविष्ट आहेत. दगडाच्या घासून गुळगुळीत केलेल्या काही कुऱ्हाडीही मिळतात. तांब्याच्या दुर्मिळतेमुळे त्याचा कुऱ्हाडी, गळ तसेच बांगड्या, मणी इत्यादींसाठी काटकसरीने वापर करीत. निर्वाहासाठी पुरेसे होईल इतके धान्योत्पादन हे लोक करीत आणि त्यास पशुपालन, शिकार व मच्छीमारी यांची जोड देत.

## उत्तर जोर्वे संस्कृती (ख्रिस्तपूर्व सुमारे १०००-७००)

ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्रकाच्या शेवटी शेवटी जोर्वे संस्कृती हळूहळू उतरणीला लागून शेवटास तिचे जे क्षीण रूप शिल्लक राहिले त्याला उत्तर जोर्वे संस्कृती असे म्हटले जाते. आजवर उत्तर जोर्वे संस्कृतीचे अवशेष फक्त भीमेच्या खोऱ्यातच मिळालेले आहेत. या संस्कृतीच्या लोकांच्या वापरातील भांडी भरड्या पोताची असून त्यामध्ये गोल वाडगे, पन्हाळीचे वाडगे व तोटीचे लोटे मिळतात. काळाच्या ओघात भांड्यांना रंगीत नक्षीने सुशोभित करण्याची परंपराही नाहीशी होते. लोकांना पत्करावे लागलेले निमभटके जीवनच या सांस्कृतिक अधोगतीस कारणीभूत ठरले असावे. हे सर्व इसवी सनापूर्वीचे आठवे शतक संपता संपता घडून आलेले दिसते.

**पर्यावरण :** महाराष्ट्रातील पर्यावरणाची सर्वांत लक्षणीय विशेषता म्हणजे निमशुष्क मोसमी हवामान, उथळ पात्रांच्या प्रवाहांनी बनलेली खोरी आणि बऱ्याच अंशी सपाट असलेले पटार याचा उल्लेख करावा लागेल.

उत्तर-दक्षिण पसरलेल्या सह्याद्रीच्या रांगांमुळे कोकणचा किनारी पट्टा समुद्रसपाटीपासून साधारण १००० मीटर उंचीवर असलेल्या ''देश'' पासून आपोआपच अलग झालेला आहे. देशावरही पश्चिमेकडून पूर्वेकडे जाणाऱ्या रांगा येथील नद्यांची खोरी विभाजित करणाऱ्या सीमारेषा बनलेल्या आहेत. जसे-अजिंठ्याच्या रांगा तापी आणि गोदावरीच्या खोऱ्यांना, बालाघाटच्या रांगा गोदावरी आणि भीमेच्या खोऱ्यांना, तसेच महादेव पर्वताच्या रांगा भीमा आणि कृष्णेच्या खोऱ्यांना एकमेकापासून वेगळे करतात. पर्वतांच्या रांगा व उपरांगांमुळे होणाऱ्या या भौगोलिक विभाजनामुळे येथील पर्जन्यमानावरही परिणाम होतो. नैऋत्येकडील मोसमी वाऱ्यांमुळे पडणारा पाऊस हा जून ते ऑक्टोबर या काळात पडतो. घाटमाथ्यावर तो दरवर्षी सरासरी ५००० ते

७००० मि. मी. इतका असतो, तर पूर्वेकडे पर्जन्यछायेमध्ये मोडणाऱ्या प्रदेशात तो दरवर्षी सरासरी फक्त ४००-७०० मि. मी. इतका कमी असतो. असे असले तरी अगदी पूर्वेच्या प्रदेशात मात्र बंगालच्या उपसागरात निर्माण होणाऱ्या कमी दाबाच्या हवेच्या पट्ट्यामुळे हेच पर्जन्यमान सरासरी सुमारे ८००-१००० मि. मी. इतके वाढते. हिवाळी पाऊस क्वचितच पडतो. व हिवाळ्यातील तपमान ४° ते ५° सेल्सिअसच्या खाली अगदी डिसेंबर किंवा जानेवारी या कडक थंडीच्या महिन्यातही जात नाही. पाणी गोटण्याइतके तपमान कधीच खाली उतरत नसले तरी नोव्हेंबर ते फेब्रुवारीच्या काळात दव मात्र साचते. उन्हाळ्यातील तपमान ३५° ते ४०° सेल्सिअस इतके वाढण्याची शक्यता असते. उन्हाळ्यातील उष्म्यापासून थोडीशी सुटका होते ती मार्च ते जून या महिन्यांमध्ये कधीकधी अचानक कोसळणाऱ्या वळवाच्या सरींमुळे. या सर्वांमध्ये लोकजीवनाचा गाडा ज्यावर अवलंबून असतो अशी सर्वाधिक महत्त्वाची बाब म्हणजे दरवर्षी नेमाने येणारा पावसाळा, कारण तो नेमाने यावा असे गृहीत धरलेले असले तरी त्या नित्यनेमामागची अनिश्चितता वर्तविण्यापलीकडची असते. दुष्काळ पडणे हेही नित्यनेमाचे आहे.

वर वर्णन केलेल्या भूशास्त्रीय, भूपृष्ठीय व हवामानासंबंधीच्या वैशिष्ट्यांमुळे येथील बहुतेक ठिकाणची अल्कली गुणधर्मांनी युक्त अशी काळी कपाशीची जमीन घडलेली आहे. ज्या प्रदेशात ग्रॅनाईटचे खडक मोठ्या प्रमाणावर आहेत तेथील माती मात्र रंगाने लालसर असते व जिथे पाऊस फार मोठ्या प्रमाणावर पडतो अशा घाटमाथ्यावरील प्रदेशातील लाल जमिनी काही अंशी आम्लधर्मी असतात. कपाशीच्या काळ्या जमिनीचे एक वैशिष्ट्य म्हणजे त्यातील विशिष्ट खनिजांमुळे (Mont-Morillonite) पाणी शोषून घेण्याची व धरून टेवण्याची क्षमता तिच्यामध्ये असते. निमशुष्क प्रदेशात जेथे फक्त जिराईत शेतीच शक्य असते तेथे काळ्या जमिनीचे हे वैशिष्ट्य एक वरदानच टरते.

महाराष्ट्रातील काही नद्या या पश्चिमेकडे तर काही पूर्वेकडे वाहत जाणाऱ्या आहेत. जसे तापी नदी पश्चिमेकडे वाहत जाऊन अरबी समुद्रास मिळते, तर कृष्णा, गोदावरी पूर्वेकडे वाहत जाऊन बंगालच्या उपसागरास मिळतात. परंतु या मोठ्या नद्यांचा अपवाद सोडल्यास इतर छोट्या नद्या या बारमाही वाहणाऱ्या नद्या नाहीत. पात्रातील वाळूच्या पट्ट्यांमुळे ज्या ज्या टिकाणी पाणी साचून रहाते, तेवढेच पाणी वर्षभर टिकते. अशा नद्यांची पात्रे सरळ किंवा वळणावळणांची असतात व इतर निमशुष्क प्रदेशातील नद्यांप्रमाणेच पाण्याचा झिरपा हा पात्रापासून फार दूरपर्यंत होऊ शकत नाही. एक तापी नदी तेवढी भूपृष्ठीय घडामोडींमुळे निर्माण झालेल्या खोलगट भागातून वाहत असल्यामुळे तिची पूरमैदाने लांबवर पसरलेली आहेत. इतर नद्यांची पूरमैदाने मात्र अधिकात अधिक २.४ कि. मी. पेक्षा लांबवर पसरलेली आढळत नाहीत.

नदीने काठावर टाकलेल्या गाळामुळे तयार झालेल्या सोपानपर्वांमध्ये (Terraces) साधारणपणे दोन प्रकार आढळतात. अधिक उंचीवर असलेले ते आधी तयार झालेले जुने सोपानपर्व, तर जे अजूनही पावसाळ्यात नदीच्या पुराच्या पाण्याखाली जाते ते कमी उंचीवरचे नवे सोपानपर्व. दोनही प्रकारातील सोपानपर्व सहसा ५ ते २० मीटर उंचीचे आढळतात. पुराचा धोका जुन्या सोपानपर्वावर फारच कमी म्हणजे साठ-सत्तर वर्षांमध्ये एखाद्याच वेळेला उत्पन्न होऊ शकणारा असतो. त्यामुळे मानवी वसाहती या जुन्या सोपानपर्वांवरच झालेल्या आढळतात. सिंधू-गंगा नद्यांच्या खोऱ्यांच्या तुलनेत दख्खनच्या पठारावरील वसाहतींवर नद्यांचे महापूर, बदलणारी पात्रे व नद्यांचे काठ फोडून आत घुसणे यासारख्या आपत्तींना तोंड देण्याची वेळ क्वचितच येते. मानवी जीवित व वित्त यांच्या दृष्टीने ही स्थिती अत्यंत सुरक्षित म्हणून फायद्याची असली तरी तिचा एक तोटाही आहे. दरवर्षी नद्यांनी वाहून आणलेल्या गाळाची भर पडून अधिकाधिक सुपीक होत जाणाऱ्या मातीचे वरदान इथल्या शेतीला लाभत नाही. मुळातच दख्खनचा शेतकरी पर्जन्यदेवतेच्या मर्जीवर अवलंबून असतो. १९६१ आणि १९७२ प्रमाणे जर लागोपाट दोन-तीन वर्षे पाऊसच झाला नाही, तर लोकांचे आर्थिक, सामाजिक व पर्यायाने राजकीय जीवन मोठ्या प्रमाणावर विस्कळीत होते. हीच परिस्थिती प्राचीन काळापासून चालत आलेली असली पाहिजे.

## वसाहत रचना

महाराष्ट्रात केली गेलेली बहुतेक उत्खनने फक्त विविध संस्कृतींचा कालानुक्रम समजण्याच्या उद्देशाने केलेली व म्हणून उदग्र (Vertical) पद्धतीची होती. साहजिकच प्राचीन वसाहतींच्या रचनापद्धतीवर ती फारसा प्रभाव टाकू शकली नाहीत. फक्त कावठे, इनामगाव व दायमाबाद या स्थळांची उत्खनने मात्र आयताकृती (Horizontal) पद्धतीने केलेली असल्यामुळे त्यामधून वसाहत रचनेसंबंधाने अधिक पुरावा हाती आलेला आहे. महाराष्ट्रातील आद्य वसाहतकार म्हणजे सावळदा संस्कृतीचे लोक छोट्या आयताकृती घरांमध्ये राहत असत. या घरांच्या भिंती कुडाच्या व छपरे गवताने शाकारलेली असत. बहुतेक घरे एकदालनीय असली तरी दायमाबाद येथील उत्खननात दोन व तीन खोल्यांची घरेही मिळाली.[८] सावळदा संस्कृतीच्या लोकांचे समकालीन (४००० वर्षांपूर्वी) इतर ठिकाणचे लोक मात्र गर्तावासांमधून (Pit dwellings) राहत असत (चित्र १). अशी घरे बनविण्यासाठी केलेले खड्डे हे वर्तुळाकृती किंवा लंबवर्तुळाकृती असत. गरजेप्रमाणे व कुवतीप्रमाणे ते लहान-मोठे असत. पण ते सर्वसाधारणपणे ३० सें. मी. पेक्षा अधिक खोल नसत. एक घर-एक चूल हे तत्त्व प्रमाण मानले तर अशा गर्तावासांचे समूह बनतात, ज्यामध्ये कुठल्यातरी एकाच झोपडीत चूल असते. अर्थातच झोपड्यांचा एक समूह म्हणजे एक कुटुंब असे समीकरण मांडता येते. त्यामध्येही मोठे खड्डे हे राहत्या झोपड्यांसाठी खणलेले असतात, तर छोटे खड्डे हे साठवणीसाठी होते असे दिसते. सर्वात छोटे म्हणजे एक मीटर किंवा त्याहूनही लहान व्यासाचे गोलाकार खड्डे रात्रीच्या वेळी कोंबड्यांना

ठेवण्यासाठी वापरत असावेत. आजही कोंबड्यांना रात्रीच्या वेळी अशा खड्ड्यांमध्ये ठेऊन त्यावर टोपल्या पालथ्या घालतात.

उत्तर सिंधू संस्कृतीच्या लोकांची घरे मात्र अधिक टिकाऊ स्वरुपाची होती. ती माती अथवा कच्च्या विटांनी बांधलेली आयताकृती असत. विटांचा आकार ४:२:१ अशा प्रमाणात व ठराविक मोजमापाच्याच (३२ x १६ x ८ सें. मी., २८ x १४ x ७ सें. मी.)[५] असत. महाराष्ट्रात सिंधू संस्कृतीच्या फारच थोड्या वसाहती उजेडात आलेल्या आहेत. प्रत्येक खेड्याची लोकसंख्या १००-२०० लोकांचीच असावी. परंतु ख्रिस्तपूर्व १७०० च्या सुमारास माळवा संस्कृतीच्या आगमनाबरोबरच हे चित्र पालटलेले दिसते. फारच थोड्या अवधीत ते तापी खोरे व्यापून गोदावरीचेही खोरे ओलांडून भीमेच्या खोऱ्यापर्यंत पोचलेले दिसतात.

माळवा संस्कृतीच्या प्रकाशे, दायमाबाद, इनामगाव यासारख्या काही वसाहती खूप विस्तीर्ण होत्या. इतकेच नव्हे तर उपलब्ध पुराव्यांनुसार त्यांची आखणी पूर्वनियोजित होती असे स्पष्ट दिसते. इनामगाव येथील उत्खननात मिळालेली अदमासे वीस घरे साधारणपणे पश्चिमाभिमुख आणि दोन घरांमध्ये १-२ मीटरचेच अंतर राहील इतकी जवळजवळ बांधलेली होती. दोन घरांमधील या मोकळ्या जागेचा वापर वहिवाटीसाठी होत असावा. ही घरे झोपड्या म्हणण्याजोगी छोटी मुळीच नसत. ती चौकोनी (७ x ५ मी.) असून यात मध्ये एक पडदीची भिंत घालून दोन खोल्या केलेल्या असत. घरांच्या भिंती अगदी बुटक्या व त्यावर टेकणारे उतरते छप्पर असे. आतील बाजूस एका लंबगोलाकार खळग्यात अग्नी प्रज्वलित केलेला असे. या खळग्याच्या कडा लिंपून उंचावलेल्या असत, ज्यायोगे ठिणग्यांना आळा घातला जाई. धान्य साठवणीसाठी खोल बळदे (खड्डे) खणली (एक मी. व्यास व एक मी. खोल) जात. घरांमध्ये वर्तुळाकृती कट्टे बांधून त्यावर कुडाच्या उंच कणगी धान्य साठवणीसाठी उभारल्या जात. वसाहतीतील गरीब लोकांची घरे मात्र वर्तुळाकृती झोपडीवजा असत. ते गावात कदाचित बारमाही वस्तीला थांबणारे नसावेत. गरीवात गरीबांची वस्ती गर्तावासांमध्येच दिसते.

माळवा संस्कृतीपेक्षा नंतरच्या जोर्वे संस्कृतीच्या वसाहत रचनेसंबंधी अधिक माहिती उपलब्ध आहे. जोर्वे संस्कृतीची दोनशेहून अधिक स्थळे आज ज्ञात असली तरी प्रत्येक स्थळाच्या वसाहतीच्या व्याप्तीचा अचूक अंदाज बांधता येणे, विशेषतः एकाहून अधिक संस्कृतीचे अवशेष उपस्थित असल्यास कठीण असते. जोर्वे संस्कृतीच्या वसाहतींच्या वैशिष्ट्यपूर्ण साखळीचा विचार करता प्रत्येक विभागाचे एक केंद्र होते असे लक्षात येते. उदा. तापीच्या खोऱ्यातील प्रकाशे, गोदावरीच्या खोऱ्यातील दायमाबाद तर भीमेच्या खोऱ्यातील इनामगाव ही विभागीय केंद्रे होती. यामध्ये ३० हेक्टर व्याप्तीचे दायमाबाद सर्वांत मोठे, तर प्रकाशे व इनामगाव यांची व्याप्ती सुमारे पाच हेक्टर इतकी होती. हेक्टरी २०० लोक असा अगदी कमीतकमी अंदाज केला तरी दायमाबादची लोकसंख्या सुमारे ६,००० तर उरलेल्या दोन्ही विभागीय केंद्रांची लोकसंख्या प्रत्येकी सुमारे २,००० होती असे अनुमान बांधता येते. दायमाबाद

हे सर्वांत प्रमुख विभागीय केंद्र असावे, या निष्कर्षास अधिक पुष्टी देणाऱ्या, धर्मसंकल्पनांशी निगडित असणाऱ्या काशाच्या काही मूर्ती येथे मिळालेल्या आहेत. प्रकाशे व इनामगाव या विभागीय केंद्रांचा दर्जा समान असावा. इनामगाव येथील उत्खननात गावाभोवती दगडी राड्यारोड्यांनी बांधून काढलेल्या बुरूजांसह मातीची तटबंदी व बाजूने खंदकाचे अवशेष मिळाले. दायमाबाद व इनामगाव या दोन्ही ठिकाणी गावाचे पुरापासून संरक्षण व्हावे म्हणून नदीला बंधारा घातला होता. तसेच इनामगाव येथे गावाच्या पश्चिम सीमेवर एक छोटासा कालवा खणून पुराच्या पाण्याला वाट काढून दिलेली होती.

जोर्वे संस्कृतीच्या बहुतेक वसाहतींची गणना खेड्यांमध्येच होते. त्यांची व्याप्ती बहुधा एक ते तीन हेक्टर व लोकसंख्या २०० ते ६०० इतकी असावी. नेवासा व बहाळ येथील वसाहती मात्र थोड्या मोठ्या व ५००-१,००० लोकसंख्येच्या असाव्यात. यापैकी सोनगाव, चांडोली आणि आपेगाव अशा काही थोड्याच स्थळांचे उत्खनन झालेले आहे. अगदी थोड्या घराच्या वाड्यावस्त्या तर अर्धा ते एक हेक्टर इतक्याच व्याप्तीच्या होत्या. तापी व गोदावरीच्या खोऱ्यांना जोडणाऱ्या बागलाणच्या इतिहासप्रसिद्ध खिंडीतच असलेल्या पिंपळदर (जिल्हा नाशिक) येथील जोर्वे वसाहत हे याचे उत्तम उदाहरण होय. ही वसाहत म्हणजे छोटे व्यापारी ठाणे असावे. या ठिकाणी पूर्ण भांडी मोठ्या प्रमाणावर मिळाली. यातील बहुतेक वसाहती लहान लहान वस्त्यांच्या स्वरुपाच्या, तर तापी खोऱ्यातील काही वस्त्या या शेतवाड्यांच्या स्वरुपाच्या होत्या. या वाड्या विस्ताराने अगदी लहान म्हणजे अर्धा ते एक हेक्टर इतक्याच आणि मूळ गावापासून जवळ दोन ते तीन कि. मी. च्या परिसरात असत. आजही महाराष्ट्रात गावापासून जवळच अशा प्रकारच्या वाड्या वसलेल्या असतात. शेतीची हंगामातील कामे सोयीची व्हावीत म्हणून अशा वाड्यांवर रहायला जातात. या वाड्यांवर बहुधा गावातील मोजकीच कुटुंबे, किंबहुना एखादेच एकत्र कुटुंब व त्यांच्या विस्तारीत शाखा वस्तीला असाव्यात. इनामगावच्या प्राचीन वसाहतीपासून दक्षिणेस सुमारे तीन कि. मी. वर अशीच एक अर्ध्या हेक्टरचीच वाडी होती. शेतीच्या हंगामापुरतीच इथे वस्ती करून उन्हाळ्याच्या दिवसात येथील कुटुंबे गावाकडे परत जात असावीत. रायगड किल्ल्याच्या पायथ्याशी असलेली पाचाडची गुंफा वसाहत ही देश आणि कोकणच्या लोकांच्या गाठीभेटी घडवून आणणारे केंद्र असावे.

महाराष्ट्रातील ताम्रपाषाणयुगीन वसाहतींच्या नकाशाकडे सहज नजर टाकल्यास या वसाहतींचे एकमेकांपासूनचे अंतर, त्यांची विस्तारपद्धती आणि एकमेकांशी असलेला संपर्क यांची व्यवस्थित कल्पना येते. तापीच्या खोऱ्यातील वसाहती संख्येने अधिक, एकमेकांपासून जवळजवळ वसलेल्या दिसतात. प्रवरा-गोदावरीच्या खोऱ्यात त्या संख्येने घटलेल्या व दोन वसाहतींमधील अंतर वाढलेले दिसते. भीमेच्या खोऱ्यात त्या अगदीच तुरळकपणे वसलेल्यां दिसतात. जसजसे उत्तरेकडून दक्षिणेकडे यावे तसतसे वसाहतींच्या कमी होत जाणाऱ्या संख्येस त्या त्या नदीच्या खोऱ्यातील बदलते

पर्यावरणच कारणीभूत असावे. पर्यावरणाचा मानवी वस्त्यांवर होणाऱ्या परिणामाशी साधनसंपत्तीचे अधिकीकरण व पर्यायाने कष्टांचे न्यूनीकरण हे सूत्र बांधलेले असते. विस्तृतपणे पसरलेल्या काळ्या कपाशीच्या जमिनीमुळे तापी खोरे हा महाराष्ट्रातील सर्वाधिक सुपीक प्रदेश आहे. तापीमुळे पाण्याचीही विपुलता आहे. पण आश्चर्याची गोष्ट अशी की, बहुतेक ताम्रपाषाणयुगीन वसाहती तापीच्या किनाऱ्याच्या आधाराने न वसता तिच्या उपनद्यांच्या तीरावर वसलेल्या होत्या. आजही हीच स्थिती दिसते. भूगोलतज्ञ डॉ. सी. डी. देशपांडे यांनी म्हटल्याप्रमाणे[६] तापी नदीचे खोरे मानवी वसाहतीस फारसे अनुकूल नाही, कारण तिच्या काठावरील जमिनीची वेगाने होणारी सततची धूप व त्यामुळे तयार होणाऱ्या उंचसखल प्रदेशामुळे शेतीचे काम महादुष्कर होते. त्यामुळे उपनद्यांच्या काठावर वस्ती करणे अधिक श्रेयस्कर ठरते. हीच परिस्थिती प्रागैतिहासिक मानवाच्याही वाट्याला आली असावी.

प्रवरा-गोदावरीच्या खोऱ्यातील वरच्या भागातही सपाट सलग जमिनीची उपलब्धता येथील उंचसखल प्रदेशामुळे कमीच आहे. त्यामुळे तेथे ताम्रपाषाणयुगीन शेतकऱ्यांच्या तुरळक वसाहती होत्या. परंतु खालच्या भागात काळ्या कसदार व सुपीक जमिनीमुळे तेथील वसाहतींची संख्या मोठी होती. पुन्हा भीमेच्या खोऱ्यात त्यांची संख्या कमी झालेली दिसते. कारण हा निमदुष्काळी प्रदेश आहे. येथील वार्षिक सरासरी पर्जन्यमान ४००-७०० मि. मी. इतके असून समुद्रसपाटीपासून कमी उंचीवरील प्रदेश काळ्या सुपीक जमिनीने व्यापलेला असला, तरी घाटमाथ्यावरील प्रदेशातील जमिनी मात्र अधिक मुरमाड आहेत. जेथे जेथे उपजाऊ जमिनीचे पट्टे उपलब्ध आहेत अशा चांडोली, सोनगाव, वाळकी आणि इनामगाव यासारख्या ठिकाणांचीच निवड ताम्रपाषाणयुगीन शेतकऱ्यांनी वसाहतीसाठी केली.

वसाहतींच्या अंतर्गत रचनापद्धतीचे फारच उत्कृष्ट पुरावे इनामगाव येथील उत्खननात दिसून आले आहेत. या उत्खननात सुमारे १३० हून अधिक घरांचे वेगवेगळ्या सांस्कृतिक टप्प्यातील अवशेष उजेडात आले. पूर्व जोर्वे (सांस्कृतिक टप्पा) काळातील घरे मोठी व आयताकृती असत. या घरांच्या मातीच्या भिंती कमी उंचीच्या (साधारणपणे ३० से. मी.) असत. त्यांच्या आधाराने वर कुडाच्या सारवलेल्या भिंती उभारत. वरचे गवताने शाकारलेले छप्पर बहुधा शंखाकृती असावे. वसाहतीची उभारणी पूर्वनियोजित व ठराविक स्वरुपाची असे. घरांची उभारणी पूर्व-पश्चिम अक्षावर आडव्या ओळीत केलेली असे. दोन घरांच्या मध्ये मोकळी जागा (सुमारे १.५ मी. रुंद) सोडलेली असे. त्याचा उपयोग रस्त्यासारखा होत असावा. या रस्त्याला पक्केपणा आणण्यासाठी दगडगोटे व खापरे चोपून बसविलेली असत असे दायमाबाद येथील पुराव्यावरून दिसते.

इनामगाव येथील घरे लहानमोठ्या आकाराची (५ x ३ मी. पासून ७ x ५ मी. पर्यंत) होती. मोठी घरे बहुधा पडदींच्या भिंतीने दोन खोल्यांत विभागलेली असत. घराच्या आतील बाजूस लंबवर्तुळाकृती खड्डा करून त्यात अग्नी ठेवत.

वाऱ्यामुळे विझू नये म्हणून कधीकधी कडेने उंच लिंपण करीत. घरातील खड्ड्याप्रमाणेच, पण मोटा (१ x ०.५ मी.) असा लंबवर्तुळाकृती चर बहुतेक घरांच्या अंगणात केलेला असे. आगीसाटी केलेल्या अशा प्रत्येक खड्ड्याच्या मध्यभागी तळाशी एक चपटा दगड मातीने लिंपून बसविलेला असे. ही सोय स्वयंपाकाचे भांडे अग्नीवर ठेवण्यासाटी केलेली असे. बहुतेक टिकाणी घराच्या आतील बाजूस व क्वचित एखाद्या टिकाणी घराच्या बाहेरील बाजूस धान्यासाटी बळद (खड्डा) खोदलेले असे. या बळदाच्या व्यासाइतकीच त्याची खोली (१ ते २ मी.) असे. बळदाचे विशेष म्हणजे धान्यास कीड लागू नये म्हणून आतील बाजूस ते चुन्याने सारवलेले असे. याखेरीज घरामध्ये सर्वसाधारणपणे १.५ मी. व्यासाचा व १० से. मी. उंचीचा एक गोलाकार कट्टाही असे (चित्र क्र. २). त्यावर धान्याची कणगी उभारत. बारीक वाळू, रेती व चिकणमाती एकत्र कालवून घराची जमीन तयार केलेली असे व ती चोपूनचोपून एकसारखी गुळगुळीत केलेली असे. अंगणातली जमीनही घरातल्याप्रमाणेच तयार करीत. मातीचे रासायनिक पृथक्करण केल्यानंतर त्यात आढळून आलेल्या नत्रवायूच्या प्रमाणावरून असे निश्चित सांगता येते की, शेळ्या, मेंढ्या, गायी, म्हशी अंगणात बांधत असत.

उत्तर जोर्वे काळात म्हणजे साधारण ख्रिस्तपूर्व १००० च्या सुमारास परिस्थितीत वेगाने बदल घडून येऊ लागला. पर्जन्यमान कमी झाल्यामुळे शेतीवर अनिष्ट परिणाम घडून आला. त्यामुळे निर्माण झालेले दारिद्र्य हे घरांच्या बांधणीत व निकृष्ट दर्जाच्या भांड्यांमध्ये प्रतिबिंबित होते. मोठ्या आयताकृती घरांची जागा लहान लहान गोल झोपड्यांच्या समुहांनी (आकृती २), तर जमिनीतल्या बळदांची जागा मातीच्या चौपायी रांजणांनी घेतलेली दिसते. हे चौपायी रांजण चार चपट्या दगडांवर उभे केलेले असत. या झोपड्यांना भिंत ही जवळजवळ नसेच. पावसाचे पाणी आत शिरू नये म्हणून फक्त १० ते १५ सें. मी. उंचीचा मातीचा गोलाकार कट्टा बांधून घेत. शाकारलेले छत व वर कुडाच्या भिंती असत. उत्तर जोर्वे संस्कृतीचा कालखंड संपता संपता साधारण ख्रिस्तपूर्व ८०० च्या सुमारास या झोपड्यांना फारच जीर्णशीर्ण स्वरूप आलेले दिसते. इतकेच नव्हे, तर त्यांचा आकारही वेडावाकडा झाला होता. जमिनी पूर्वीसारख्या चोपून व सारवून तयार केलेल्या दिसत नाहीत. कुडाच्या भिंती उभ्या न करता एक बसके छप्परच सरळ जमिनीवर उभे करीत.

पूर्व जोर्वे कालखंडातील (ख्रिस्तपूर्व सुमारे १४००–१००० वर्षे) आयताकृती घरे जाऊन उत्तर जोर्वे कालखंडात (ख्रिस्तपूर्व सुमारे १०००–७०० वर्षे) सर्वत्र गोल झोपड्या उभारल्या जाणे ही बाब ताम्रपाषाणयुगातील सांस्कृतिक, आर्थिक व सामाजिक अभ्यासासाटी अत्यंत लक्षणीय आहे. आधुनिक काळातील उदाहरणे घेऊन अशा बदलांचा अभ्यास केल्यास असे लक्षात येते की, या टिकाणी अवनती येण्यास केवळ आर्थिक परिस्थितीच कारणीभूत नाही, तर पर्यावरणही तेवढेच जबाबदार आहे. आंध्रमध्ये नेहमीच येणाऱ्या समुद्रकिनाऱ्यावरील चक्री वादळांच्या तडाख्यातही उभे राहू शकणाऱ्या घराचा अभ्यास करणाऱ्या शास्त्रज्ञांना असे आढळून आले की, फक्त

वर्तुळाकार घरेच जोरदार वाऱ्याच्या माऱ्यास समर्थपणे तोंड देऊ शकतात. ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्रकाच्या अखेरीस मध्य व पश्चिम भारतातील हवामानात मोठ्या प्रमाणावर बदल घडून आल्याचे निरीक्षणात आढळून आलेले आहे.[७] हवामान अधिकाधिक शुष्क होत गेल्याने लोकांनी हळूहळू निमभटके जीवन पत्करले. शुष्क हवामान व जोरदार वादळी वारे यांचा एकमेकांशी अन्योन्य संबंध आहे. शुष्क हवामानासोबत अपरिहार्यपणे येणारे हे वादळी वारेच उत्तर जोर्वे संस्कृतीच्या गोलाकार झोपड्यांमागील कारण असावे.

वाळकी (तालुका दौंड, जिल्हा पुणे) येथील उत्खननात उजेडात आलेले झोपड्यांचे आलेख लक्षात घेण्याजोगे आहेत. येथील झोपड्या सुट्या सुट्या न उभारता गटाने उभारलेल्या होत्या. एकेका गटात पाच--सहा झोपड्यांचे रिंगण असे. या झोपड्या वर्तुळाकार, लंबवर्तुळाकार किंवा कधी कधी वेड्यावाकड्या असत. त्यांची जमीन पक्की बनविलेली नसल्यामुळे त्यांची बाह्यसीमा निश्चित करणे नेहमीच शक्य नसे. त्यांना भिंतीही नसाव्यात. बाजूच्या भुसभुशीत मातीपेक्षा किंचित टणक व पांढरट असलेल्या जमिनीची एकच खूण येथे झोपडी होती याची साक्ष देते. काही प्रसंगी झोपडीच्या कडेने खांब रोवल्यामुळे झालेले खळगे होते. प्रत्येक गटाच्या मधल्या मोकळ्या जागेत चूल होती. यातील मोठ्या झोपड्यांचा अर्थातच राहण्यासाठी व लहान झोपड्यांचा जनावरांना बांधण्यासाठी उपयोग केला जाई. धान्याच्या कोठीसाठी बांधलेला प्रत्येक गटामधील गोलाकार कट्टा (१ मी. व्यास व १० सें. मी. उंची) इनामगावप्रमाणेच चोपूनचोपून पक्का बनविलेला असे. या कट्ट्यांप्रमाणेच परंतु आकाराने मोठा (दोन मीटर अधिक मोठ्या व्यासाचा) असा जमिनीचा एक गोलाकार तुकडाही खूप चोपून तयार केलेला होता. येथे बहुधा धान्यमळणीचे खळे असावे.

वाळकी येथील घरांची तकलादू अवस्था लक्षात घेता तेथील वसाहत कायमस्वरूपी नसून हंगामी वसतीसाठी वापरण्यात येणारी ताम्रपाषाणयुगातील एक शेतवाडी असावी असा निष्कर्ष निघतो. वाळकीपासून पश्चिमेला ३० कि. मी. वरील प्रमुख वसाहत ही इनामगाव येथील लोकांचीच असावी. फक्त हिवाळी हंगामातच इनामगावचे लोक सातू पिकविण्यासाठी येथे येऊन रहात असावेत. आजही वाळकीच्या परिसरातील ऊसमळ्यात काम करण्यासाठी दरवर्षी येणारे मजूर ऑक्टोबर ते मार्च या काळात गोल झोपड्या बांधूनच राहतात. त्यांची या झोपड्या उभारण्याची पद्धतही पाच ते सहा झोपड्यांच्या गटाचे एक रिंगण व प्रत्येक गटाच्या मधल्या मोकळ्या जागेत एकेक चूल अशीच असते. त्यातील एखाद्या झोपडीचा उपयोग राहण्यासाठी व इतर झोपड्यांचा उपयोग रात्री जनावरांना बांधण्यासाठी केला जातो. घरांच्या जमिनी सारवलेल्या असतात. झोपडीला आधारासाठी खांबही नसतात. बसक्या आकाराच्या या झोपड्या उभारण्याची पद्धत अगदीच साधी असते. काठ्यांचा गठ्ठा वरच्या बाजूस बांधून तो खालच्या बाजूस पंख्यासारखा पसरवायचा की झाला झोपडीचा सांगाडा तयार. वरच्या बाजूने एखादा तट्टा ताणला की, झोपडी पूर्ण झाली. वाळकीच्या ताम्रपाषाणयुगीन झोपड्या याहून फारशा वेगळ्या नसाव्यात.

इनामगावच्या पूर्व व उत्तर या दोन्ही कालखंडातील वसाहत रचनेचे एक वैशिष्ट्य म्हणजे मुख्य वसाहतीच्या पश्चिम सीमारेषेवरील भागात सर्व प्रकारच्या कारागिरांची उदा. कुंभार, सोनार, लोणारी, मणीकार, हस्तीदंतावर कुसर करणारे इत्यादींची वस्ती होती. तसेच वसाहतीच्या मध्यभागी प्रतिष्ठित शेतकऱ्यांची घरे होती. वस्तीच्या नायकाचे घर पूर्व जोर्वे काळात वस्तीच्या मध्यभागी, तर उत्तर जोर्वे काळात वस्तीच्या पूर्वेकडे नदीच्या बाजूला होते. महाराष्ट्रातील वर्तमान खेड्यांची रचनाही काही प्रमाणात याच प्रकारची असते. वेशीतून आत शिरल्या शिरल्या सर्व मजुरांची घरे व भर मध्यवस्तीत पाटलाचे घर अशा प्रकारची रचना तशी आपल्या परिचयाची आहे. इनामगावच्या एकूण पाच उपवस्त्यांपैकी सर्वांत मोठे टेकाड कारागिरांच्या व प्रतिष्ठित लोकांच्या तसेच वसाहतीच्या नायकाच्या वस्तीचे होते. इतर टेकाडे मात्र (INM-III व IV) गरीब शेतकरी व (INM-V) मजुरांच्या वस्तीची होती. शेतीच्या पाण्याच्या उपशासाठी बांधलेला बंधारा व कालव्याच्या निगराणी व डागडुजीसाठी या मजुरांना तेथे ठेवलेले असावे. यावरून जोर्वे समाज हा वर्गरचनेवर आधारित होता हे दिसून येते.

## उदरनिर्वाह

ताम्रपाषाणयुगीन काळातील आद्य शेतकरी निर्वाहासाठी शेती, पशुपालन आणि शिकार व मच्छिमारीवर अवलंबून होते. ते शेळ्या, मेंढ्या, गायी, म्हशी व डुकरे पाळत होते. त्यांच्या मांसाचा अन्नासाठी उपयोग केला जाई. तसेच महाराष्ट्र हा निमदुष्काळी (सरासरी ४००-१००० मि. मी. वार्षिक पर्जन्यमान) प्रदेश असल्यामुळे ते फक्त जिराईत शेतीवरच अवलंबून होते. निसर्गाच्या प्रतिकूलतेवर मात करण्यासाठी कृत्रिम पाणीपुरवठ्याची व्यवस्थाही त्यांनी केली होती असे इनामगावच्या उदाहरणावरून दिसून येते. काळी जमीन सुपीकतेसाठी कितीही प्रसिद्ध असली तरी प्राचीन काळीही केवळ शेतीवर निर्वाहासाठी अवलंबून रहाणे हे अनियमित पावसामुळे आपत्तीकारकच होते. आजही दर तिसरे वर्ष अपुऱ्या पावसाचे व दर चौथे वर्ष दुष्काळी असते.

काळी जमीन नांगरणीला खूप कठीण असते. त्यामुळे प्राचीन काळी जेव्हा लोखंडी नांगर अस्तित्वात नव्हते तेव्हा ती खरोखरच लागवडीखाली होती का याबद्दल काही विद्वानांनी शंका व्यक्त केल्या आहेत. या दृष्टीने महाराष्ट्रातील शेतकऱ्यांमध्ये प्रचलित असलेली " काळी जमीन स्वतःची नांगरणी स्वतःच करते " या म्हणीचा प्रत्यय येतो. उन्हाळ्यात काळ्या जमिनीत पडणाऱ्या खूप खोल व रुंद भेगांमुळे नांगरणीचे निम्म्याहून अधिक काम निसर्गतःच होते. उर्वरित कामासाठी ताम्रपाषाणयुगीन शेतकऱ्यांनी लाकडी नांगराचा उपयोग केला असावा. गुरांच्या खांद्याच्या हाडाचा बनविलेला नांगराचा फाळ वाळकी (जिल्हा पुणे)[८] येथील उत्खननात मिळाला.

इनामगाव आणि दायमाबाद येथील उत्खननातील माती चाळून काढली असता मोठ्या प्रमाणावर जळके धान्यकण मिळाले. त्यावरून प्राचीन शेतीसंबंधाने बरीच माहिती मिळते. प्रमुख पीक सातूचे होते. परंतु इनामगावसारख्या ठिकाणी जिथे कृत्रिम

पाणीपुरवठ्याची सोय होती, तिथे गहूही पिकविला जाई. गहू हे मुख्यतः हिवाळी पीक आहे. पण महाराष्ट्रात हिवाळ्यात पाऊस पडत नाही. त्यामुळे आजही महाराष्ट्रात जेथे कालवा किंवा विहिरीद्वारे पाणीपुरवठ्याची सोय आहे, तेथेच थोड्याफार प्रमाणात गहू पिकविला जातो. कालव्याद्वारे पाणीपुरवठ्याच्या सोयीसाठी प्राचीन काळी सांघिक प्रयत्नांची आवश्यकता फार मोठ्या प्रमाणावर भासली असावी. जोर्वे संस्कृतीच्या लोकांना हे साध्य झाले होते. इनामगावच्या पहिल्या सांस्कृतिक कालखंडात (माळवा) गहू अभावानेच मिळतो, त्याचप्रमाणे शेवटच्या उत्तर जोर्वे कालखंडातही तो मिळत नाही. मात्र तो पूर्व जोर्वे कालखंडात भरपूर प्रमाणात सापडला, हे केवळ योगायोगामुळे घडलेले नसून कृत्रिम पाणीपुरवठ्याची सोय अगर अभाव असणे यामुळेच घडलेले असावे. माळवा कालखंडात कालवा व बंधारा बांधलेलाच नव्हता. तिसऱ्या उत्तर जोर्वे कालखंडात हवामान निमशुष्क होऊन पावसाचे प्रमाण कमी झाल्यामुळे दुसऱ्या पूर्व जोर्वे कालखंडात खोदलेला कालवा पूर्णपणे गाळाने भरून गेला. काही ठिकाणी नदी अगर विहिरीतील पाण्याद्वारे गहू पिकविला असण्याचीही शक्यता आहे. जोर्वे कालखंडात इनामगाव व दायमाबाद या दोन्ही ठिकाणी ज्वारी मिळालेली आहे, तर तांदूळ फक्त इनामगाव येथेच मिळाला. आजच्याप्रमाणेच तेव्हाही लहान लहान खाचरांमध्ये भात पिकवित असावेत. कावठ्याला बाजरी सापडलेली असली तरी तेथील प्राचीन टेकाड पूर्णपणे लागवडीखाली आणलेले नसल्यामुळे तेथील बाजरीचा पुरावा ग्राह्य धरता येत नाही. असे असले तरी कावठ्याचे प्राचीन शेतकरी बाजरी पिकवित असण्याची शक्यताही नाकारता येत नाही. कारण रंगपूर (गुजरात) येथेही ताम्रपाषाणयुगीन कालखंडातून बाजरीचा पुरावा पुढे आलेला आहे. ज्वारी व बाजरी ही दोन्ही धान्ये आफ्रिकेमध्ये सर्वप्रथम आढळली. तेथूनच ती पश्चिम भारतात प्रथम आणली गेली असावीत. या सर्वांच्या जोडीला ताम्रपाषाणयुगीन शेतकरी कुळथाचे (हुलगे) पीकही घेत असत.

वरील तृणधान्यांखेरीज ताम्रपाषाणयुगीन शेतकरी हरभरा, मसूर, वाटाणा या कडधान्यांचे पीकही काढीत असत. उडीद, लारती डाळ हेही फार थोड्या प्रमाणात मिळाले, त्यामुळे त्यांचे पीक मुद्दाम काढत असत असे म्हणता येणार नाही. याखेरीज शिंदी, बोर, जांभूळ व बेहडा यांच्या बियाही मिळाल्या. जांभूळ व बेहडा ही फळे अधिक पावसाच्या प्रदेशात होतात. त्यामुळे इनामगावच्या लोकांचे बाहेरील प्रदेशांशी व्यापारी संबंध होते हे लक्षात येते. इनामगावच्या घरातील जमिनीचे नमुने सूक्ष्मदर्शकाखाली तपासले असता त्यातही काही वनस्पतींचे अवशेष आढळून आलेत. घराची जमीन तयार करताना तिचा टणकपणा वाढावा म्हणून कदाचित रानटी वनस्पती भिजवून मग त्यासह जमीन चोपून बनवत. यामुळे वनस्पतीची साले, गाभा व तंतू यांचे अवशेष सूक्ष्मदर्शकाखाली आढळले.

दायमाबाद येथे मिळालेल्या दोन वनस्पतींचे अवशेष विशेष महत्त्वाचे आहेत. जिच्यापासून हीना अत्तर बनवितात ती सुगंधबेला मुळी तर येथे मिळालीच, पण

त्याखेरीज आणखीही एक सुगंधी मुळी येथे मिळाली. ही वनस्पती शिवालीक टेकड्यांपासून ते बिहार, बंगाल आणि आसाम तसेच अंदमान, निकोबार बेटांवर सापडते. एरंडाच्या पानांऐवजी या वनस्पतीची पाने आसाममध्ये रेशमाच्या किड्यांचे खाद्य म्हणून वापरतात. दख्खनमधल्या ताम्रपाषाणयुगीन शेतकऱ्यांपर्यंत ही वनस्पती कशी पोहोचली असेल याचे उत्तर देणे मात्र कठीण आहे.

वर उल्लेखिलेल्या बहुतेक वनस्पती या त्यांच्या जळक्या बिया अगर धान्यकणांची सूक्ष्मदर्शकाखाली परीक्षा केली असता ओळखणे शक्य होते; परंतु त्यासाठी त्या जळलेल्या असणे आवश्यक असते. कारण उष्ण व दमट हवामानात कोणतेही धान्यकण अगर बिया हजारो वर्षांपर्यंत जशाच्या तशा टिकून रहाणे अशक्य असते. तेच जळक्या धान्यकणांच्या व बियांच्या बाबतीत आतील सत्व जळून जाते व वरचे उरलेले टरफल कोळशाच्या रुपात टिकून रहाते. अशा वेळी त्यांच्या विशिष्ट प्रकारच्या बाह्य आकारावरून त्यांची सहज ओळख पटते. तथापि, प्रश्न निर्माण होतो की, मुळातच धान्य अगर बिया जळतीलच कशा? याचे उत्तर आदिम तसेच आजच्या खेड्यातील जमातींच्या जीवनपद्धतीच्या अभ्यासात मिळू शकते. प्राचीन शेतकऱ्यांकडे धान्याचे पीठ करण्यासाठी फक्त पाटा व वरवंटा एवढेच साधन होते. धान्य भरडून पीठ करणे सोपे जावे म्हणून ते भाजून घेणे आवश्यक असे. धान्य भाजताना त्यातील जे जळलेले दाणे फेकून देत तेच आज उत्खननात मिळतात. व तेही बहुधा घराबाहेरील जागेतच मिळतात. हे येथे लक्षात घेणे आवश्यक आहे.

साधारणपणे असे दिसते की, हे लोक सातू, गहू, ज्वारी किंवा बाजरीच्या पिठाची रोटी बनवित. ती भाजण्यासाठी चुलीच्या मध्यभागी एक मातीचा लहान खुंट करून त्यावर मातीचाच तवा लिंपलेला असे. इनामगाव येथील उत्खननात मिळालेल्या खापरतव्यासारखे तवे आजही महाराष्ट्रात वापरले जातात.

इनामगाव येथील उत्खननातून पुढे आलेला पुरावा केवळ लक्षवेधीच नव्हे, तर अत्यंत महत्त्वाचाही आहे. मिळालेल्या धान्यांवरून स्पष्ट होते की, इनामगावचे प्राचीन शेतकरी खरीप व रब्बी दोन्ही हंगामातील पिके घेत आणि हे केवळ दुसऱ्या कालखंडातील लोकांनी विकसित केलेल्या कृत्रिम पाणीपुरवठ्याच्या तंत्रामुळे शक्य झाले होते. नदीचे पाणी वळविण्यासाठी त्यांनी खणलेला चर हा ११८ मी. लांब, ३.५० मी. खोल व ४ मी. रुंद होता. त्याचबरोबर नदीवरील बंधारा २.४० मी. रुंद व २४० मी. लांबीचा होता. चराला समांतर असणारा बंधारा दगडी राडारोडा मातीत लिंपून बांधलेला होता. चरातून वाहून येणारे पाणी ६ मी. रुंद व १२० मी. लांब असलेल्या कालव्यात सोडलेले होते. या कालव्याचा शोध इनामगाव येथील पुरातन स्थळाच्या हवाई छायाचित्रांमुळे लागला. इनामगावच्या प्राचीन शेतकऱ्यांनी नदीच्या पुराचे पाणी वळविण्यासाठी चर खोदताना ते सहजपणे वाहून जावे म्हणून विशेष काळजी घेतलेली दिसते. पाण्याच्या स्रोताची दिशा गुरुत्वाकर्षणाच्या शक्तीवर अवलंबून राहील हा नियम लक्षात घेऊन त्यांनी पाणी पश्चिमेकडे वळविले होते.

आजमितीला ही जमीन लागवडीखाली आलेली आहे. पुराचे पाणी साठविण्यासाठीही त्या लोकांनी एक विशेष युक्ती योजली होती असे दिसते. चर खोदताना त्याच्या मधोमध चराची खोली त्यांनी वाढविली. त्यामुळे जादा पाणी तेथे साठून राही. हा मधला खड्डा खाली खडक लागेपर्यंत खणत असल्यामुळे पाणी जमिनीत जिरण्याचीही भीती नसे. त्यामुळे उन्हाळ्यातही पाण्याचे दुर्भिक्ष जाणवत नसावे.

**प्राणी :** उत्खननात प्राप्त होणाऱ्या प्राण्यांच्या हाडांच्या चिकित्सेकडे यापूर्वीच्या उत्खननांमधून विशेष लक्ष दिले गेले नव्हते. अलीकडच्या उत्खननांमधून मात्र प्राण्यांची हाडे फार मोठ्या प्रमाणावर प्राप्त झालेली आहेत. त्यामध्ये वन्य व पाळीव अशा दोन्ही प्राण्यांच्या विविध जातींचा समावेश आहे. पाळीव प्राण्यांमध्ये कुत्रा (canis famílaris), हत्ती (elephas maximus), घोडा (eqqus caballus), डुक्कर (sus-scrofa/cristatus), वशिंडवाला बैल (bos indicus), मेंढी (dvis orientalis vignei) व शेळी (capra hircus); तर वन्यप्राण्यांमध्ये एकशिंगी गेंडा (rhinoceros unicornis), काळवीट (antilope cervicapra), चौसिंगा (tetracerus quadricornis), नीलगाय (boselaphus tragocamelus), म्हैस (bubalus bubalis), चितळ (axis axis), सांबर (cervis unicolor) आणि बारसिंगा (cervus durauceli) यांचा समावेश आहे. उंदीरवर्गातील प्राण्यांची व पाणकोंबडीचीही हाडे थोड्या प्रमाणात मिळाली.

यामध्ये शेळी/मेंढी व गायीगुरांच्या हाडांचे प्रमाण सर्वाधिक आहे. अर्थातच अन्नासाठी या प्राण्यांचा उपयोग होत असावा. दातांच्या व पायांच्या हाडांच्या पुराव्यांवरून प्राण्याची कत्तल वयाच्या तीन महिने ते दोन वर्षांच्या आतच केली जात असावी असे लक्षात येते. उत्खननात सापडलेल्या हाडांच्या प्रचंड प्रमाणावरून ताम्रपाषाणयुगीन लोक प्रामुख्याने मांसाहारी होते असे स्पष्ट दिसते; इतकेच नव्हे तर त्यातही प्राण्याच्या शरीराच्या कोणत्या भागाचा समावेश आहारात करावयाचा याबद्दलही त्यांची विशेष पसंती होती असे इनामगाव येथील घरांमधील पुराव्याच्या अभ्यासावरून दिसते. पाठीचे मणके, पायाची हाडे, कमरेची हाडे, जबड्यांची हाडे यांचाच समावेश मिळालेल्या हाडांमध्ये आहे. इतर हाडांचा नाही. यावरून उत्तम प्रतीचे मांस खाण्यावरच या लोकांचा भर होता असे दिसते. इनामगाव येथील पूर्व जोर्वे काळातील एका घरात (क्र. ५२) सर्वाधिक म्हणजे जवळजवळ सहा किलो हाडे मिळाली. यावरून कुटुंबातील माणसांची संख्या व मारलेल्या जनावरांची संख्या याबद्दल कल्पना येऊ शकते. ज्या पद्धतीने ही हाडे जळलेली आहेत त्यावरून मांस उघड्या जाळावर भाजले जात असे हे लक्षात येते. इनामगावच्या घरातील अंगणात आढळणाऱ्या लंबगोल खड्ड्यांमध्ये या कारणासाठीच जाळ करत असावेत.

मासे हाही ताम्रपाषाणयुगीन लोकांच्या आहारातील महत्त्वाचा हिस्सा होता. मिळालेल्या पुराव्यात माशांच्या हाडांच्या बरोबरीने मासेमारीचे गळ तसेच भांड्यांवरील माशांची नक्षी यांचाही विचार करावा लागेल. सावळदा संस्कृतीच्या भांड्यांवरील

जलचर प्राण्यांच्या नक्षीचा यादृष्टीने विशेष उल्लेख केला पाहिजे. त्याहीपेक्षा इनामगावच्या उत्खननात प्राप्त झालेल्या माशांच्या हाडांचा पुरावा अधिकच उल्लेखनीय आहे. माशांच्या या विशिष्ट जाती सागरी असून त्या कल्याण किंवा महाडच्या खाडीतील असाव्यात. ही बंदरे इनामगावहून पश्चिमेला किमान २०० कि. मी. अंतरावर आहेत. अन्न मिळविण्याचे साधन म्हणून शिकारीलाही महत्त्व होते. ताम्रपाषाणयुगीन लोकांना हरिणाचे मांस अत्यंत आवडत होते. रानडुकराची हाडेही मिळालेली आहेत. गायीगुरेही अन्नासाठी मारली जात होती. परंतु दुधाचा समावेश आहारात केला जात होता किंवा नाही याबद्दल निश्चित काही सांगता येणार नाही. आदिम जमातींच्या अभ्यासाद्वारे पुढे आलेल्या उदाहरणाचा विचार केल्यास ताम्रपाषाणयुगातील आद्य शेतकऱ्यांनी जनावरांचे दूध काढले नसावे असे वाटते. बस्तरच्या गोंड जमातीतील लोक आजही दुभत्या जनावराचे दूध त्याच्या बछड्यासाठी असते या श्रद्धेपोटी स्वतःच्या आहारात दुधाचा समावेश करीत नाहीत.

## कला व हस्तव्यवसाय

मृत्तिकापात्रे बनविण्याच्या कलेमध्ये या आद्य शेतकऱ्यांनी कौशल्य संपादन केलेले होते. त्यांची मृत्तिकापात्रे चाकावर घडविलेली, उत्तम भाजलेली व रंगीत असत. आतापर्यंत मृत्तिकापात्रे भाजण्याच्या इनामगाव येथे दोन व दायमाबाद येथे दोन भट्ट्या सापडल्या आहेत. दायमाबादच्या दोन्ही भट्ट्या जोर्वे काळातील, तर इनामगावच्या भट्ट्यांमधील एक पूर्व जोर्वे काळातील व दुसरी माळवा काळातील आहे. या दोन्ही भट्ट्यांमध्ये त्यांच्या आकारातील फरक सोडल्यास सारखेपणा आहे. जोर्वे काळातील भट्टी आकाराने मोठी व दगडी पायावर उभारलेली होती (चित्र ३). ही भट्टी म्हणजे जणू एखादी मातीची मोठी कढईच होय. १.७५ मीटर व्यास असलेल्या या कढईच्या तळाशी बाजूने पन्हळी व त्याखाली जळण ठेवण्यासाठी खोलगट जागा ठेवलेली आहे. या खोलगट जागेचे तोंड लांबट चौफुल्याच्या आकाराच्या व मधोमध छिद्र असलेल्या मातीच्या चपट्या उशा ठेवून बंद केलेले असे. या उशा एकास एक लावून ठेवल्या की, त्याच्या चौफुल्याच्या आकारामुळे व मध्यभागी असलेल्या छिद्रामुळे भट्टीतील उष्ण वायू निघून जाण्यास आपोआपच जागा तयार होई. माळवा कालखंडातील भट्टीची रचना याप्रमाणेच असली, तरी ती आकाराने लहान आहे (व्यास १.३५ मी.). उत्तर जोर्वे कालखंडातील कुंभाराचा एक आवा इनामगाव येथेच मिळालेला आहे. तो आजच्या कुंभाराच्या उघड्यावरील आव्याप्रमाणेच उथळ खड्डा खणून त्यात रचला जात असे.

## विविध भट्ट्या

दायमाबादच्या कुंभारांच्या भट्ट्यांची रचना इनामगाव भट्ट्यांहून साधी आहे. दोन्ही भट्ट्या एकाच पद्धतीच्या असल्या तरी त्यातील एकाच भट्टीचे उत्खनन पूर्णपणे केले गेले. पूर्व जोर्वे काळातील (इ. स. पू. सुमारे १४०० ते १००० वर्षे) ही भट्टी इनामगावच्या भट्ट्यांइतकी प्रगत नसली तरी उघड्यावरील आव्यापेक्षा बरीच सुधारित

आहे. मातीच्या एका कड्यावर (उंची २५ सें. मी.) साधारण दुहेरी कड बांधून ही भट्टी उभारलेली होती. भट्टीचा आकार चौरसाकृती असून (५ x ५ मी.) कोपरे वळविलेले आहेत. बाहेरील कड कच्च्या मातीची, तर आतील कड मातीचीच परंतु पक्की भाजली गेलेली आहे. दोन्हींच्या मधल्या जागेत राख ठासलेली होती. त्याचप्रमाणे बाहेरील कड तळाशी ५० सें. मी. इतक्या जाडीची असून वर पातळ होत जाऊन तोंडाशी १५ सें. मी. इतक्या जाडीची आहे. मध्ये भरलेल्या राखेचा उष्णतारोधक म्हणून उपयोग होत असला पाहिजे. आतील कड ५ ते १० सें. मी. इतक्या जाडीची होती. भट्टीला दुभागणारी आणखी एक कड (जाडी ३ ते ५ सें. मी.) उत्तर-दक्षिण दिशेने बांधलेली होती. त्यामुळे भट्टीचे पूर्वेकडील व पश्चिमेकडील असे दोन भाग तयार झालेले होते. भट्टीचे आतल्या बाजूने क्षेत्रफळ ३.५० चौ. मीटर असून तिची जमीन वेळोवेळी चिकणमातीने सारविलेली होती. त्यात इंधन घालण्यासाठी उत्तरेकडे दोन लांबट गोल तोंडे ठेवलेली होती. आग्नेयेकडील बाजूस भट्टीच्या आतील भागात उतरण्यासाठी एक मोठा दगड रोवून बसविलेला होता. भट्टीच्या आतील बाजूस पूर्ण वा अर्धवट जळालेले बरेच लाकडी ओंडके व मोठ्या प्रमाणावर भाजून लाल झालेली वाळू मिळाली. पूर्वेकडील भागात असंख्य खापरे, तर पश्चिमेकडील भागात फुटलेली पंधरा भांडी मिळाली.

सध्या महाराष्ट्रातील खेड्यांमधून वापरात असणाऱ्या भट्ट्यांशी साधर्म्य दर्शविणारी अशीच या भट्टीचीही रचना होती. एकावर एक भांडी रचून मधल्या पोकळ्यांमधून वाळू व इंधन भरले जाई. भिंतीत ठेवलेल्या लांबट गोल तोंडांचा उपयोग हवा खेळण्यासाठी तसेच आग पेटविण्यासाठी होई. इंधनासाठी वापरण्याचे लाकडी ओंडके भट्टीमध्ये उभे रचले जात असावेत. परंतु त्यास पुष्टीकारक पुरावा मिळत नाही. किंबहुना भट्टीच्या उंच भिंतीला लाकडी टेकू वापरले असावेत हे टेकू रोवलेल्या खड्ड्यांवरून स्पष्ट होते. पोकळ्यांमधून भरलेली वाळू भट्टीच्या आतील उष्णता बराच काळ टिकवून धरत असावी. भांडी पूर्ण रचल्यानंतर राख व चिखल कालवून त्या मिश्रणाने भट्टी वरून लिंपून टाकत असावेत.

" काळी आणि तांबडी भांडी " हे नाव ही भांडी भाजण्याच्या पद्धतीवरून पडलेले आहे. भांड्याच्या ज्या भागास भाजले जाताना प्राणवायूचा पुरवठा कमी होई तो भाग काळा व बाकीचा लाल भाजला जाई. जोर्वे संस्कृतीची भांडी ७००° फॅ. इतक्या उच्च तपमानाला भाजली जात, तर माळवा संस्कृतीची भांडी ५००°–६००° फॅ. इतक्या तपमानाला भाजली जात. काळ्या आणि तांबड्या भांड्यांवर बऱ्याचदा पांढऱ्या रंगात नक्षी चितारलेली असे. त्यामुळे ही भांडी दुरंगी वाटतात. त्यासाठी ही भांडी दोनदा भाजली जात असावीत. अशा रीतीने रंगविलेल्या भांड्यांची संख्या एकूण भांड्यांच्या जवळजवळ निम्मी आहे. या भांड्यांच्या जोडीने मिळणारी, रोजच्या वापरासाठी उपयोगात आणली जाणारी लालसर/करड्या रंगाची भांडी जाड पोताची व हाताने बनविलेली असत.

## तांब्याचा उपयोग

ताम्रपाषाणयुगीन लोकांचे धातू घडविण्याचे ज्ञान प्रथमावस्थेतीलच होते. कुऱ्हाडी, छिन्न्या, मणी, मासेमारीचे गळ यासारख्या तांब्याच्या बहुतेक वस्तू टोकून बनविलेल्या असत. सर्वसाधारणपणे असे ग्राह्य मानले जाते की, सर्व ताम्रपाषाणयुगीन केद्रांना कच्च्या तांब्याचा पुरवठा राजस्थानातील खेत्री या एकाच ठिकाणच्या खाणीतून होत होता. असे असले तरी गुजरातमधील अमरेली जिल्ह्यातून उपलब्ध होणारे तांब्याचे खनिजही उपयोगात आणले जात असावे. पूर्व जोर्वे काळातील इनामगावमधील एक छोटी भट्टी बहुधा तांबे शुद्ध करण्यासाठी वापरली असावी आणि येथील उत्खननातून प्राप्त झालेल्या दोन मुशी कदाचित याच कामासाठी वापरत असावेत. युरोपातील प्रथेप्रमाणे येथेही शुद्ध स्वरुपातले तांबे साठविण्यासाठी त्याची कडी बनवत असावेत.

धातू विज्ञानाच्या दृष्टीने दायमाबाद येथून मिळालेल्या काशाच्या वस्तू विशेष उल्लेखनीय आहेत. या वस्तू उत्तर सिंधू काळातील असल्याचा आतापर्यंतचा निष्कर्ष तंत्रज्ञानाच्या दृष्टीतून काही विद्वानांना चुकीचा वाटतो. त्यांच्या मते या वस्तू अधिक अलीकडच्या असाव्यात. त्यामध्ये एक रथ, एक हत्ती, एक रेडा आणि एक गेंडा यांचा समावेश असून धातूच्या मिश्रणात आर्सेनिकचा अंश आहे.

**सुवर्णालंकार :** जोर्वे संस्कृतीच्या काळात सोने दुर्मिळ असले तरी त्याचा पूर्ण अभावही नव्हता. दायमाबाद येथे सोन्याचे एक कर्णभूषण मिळालेले आहे. गुलबर्गा जिल्ह्यातील (कर्नाटक) हट्टी हे तेव्हाचे सोने प्राप्त करण्याचे सर्वांत जवळचे ठिकाण होते. इनामगाव येथील विविध कारागिरांमध्ये सोनाराची उपस्थिती तेथे मिळालेल्या मुशी व तांब्याच्या चिमट्यांनी सुचित होते. इनामगाव येथूनच मूल्यवान खड्यांच्या मण्यांना छिद्रे पाडण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या सारेच्या दगडाच्या अऱ्या आणि हस्तीदंती मण्यांसाठी तांब्याच्या अऱ्या मिळालेल्या आहेत.

## चुन्याचा वापर

चुनखडीच्या दगडापासून चुना बनविण्याचे काम जोर्वे संस्कृतीच्या दोन्ही कालखंडात फार मोठ्या प्रमाणात इनामगाव येथे चालत असे. इनामगावच्या उत्तर जोर्वे कालखंडातील एक चुनाभट्टी दगडी डबर वापरून बांधलेली होती. या भट्टीपाशीच तयार केलेले चुन्याचे लहान–मोठ्या आकाराचे अनेक गोळेही मिळाले. शिंपल्यांपासूनही थोड्या प्रमाणावर चुना बनवित असावेत. घराच्या भिंती, जमिनी तसेच जमिनीखालची बळदे सारविण्यासाठी चुन्याचा उपयोग करीत होतेच, पण कातडी कमावण्यासाठीही चुन्याचा वापर फार मोठ्या प्रमाणावर केला जात असला पाहिजे. अजूनही खेड्यांमधून चुन्याचा या गोष्टीसाठी उपयोग केला जातो. त्यासाठी साफ केलेली कातडी चुन्याची निवळी भरलेल्या खड्ड्यात टाकून खूप दिवस भिजविली जातात. अशाप्रकारे भिजविलेल्या कातड्यावरील केस काढून ती साफ करणे सहज शक्य होते. उत्तर जोर्वे कालखंडातील लोकांचे मांसाहारावरील अवलंबित्व वाढले होते

या गोष्टीस या कालखंडात मिळणाऱ्या असंख्य चुन्याच्या गोळ्यांवरूनही अप्रत्यक्षरित्या पुष्टी मिळते. कत्तल केल्या जाणाऱ्या जनावरांची संख्या वाढल्याने कातडी कमाविण्याच्या उद्योगात वाढ झाली असल्याचा निर्देशच जणू चुन्याच्या वाढत्या गरजेवरून होतो.

## विनिमय

ताम्रपाषाणयुगीन लोक त्यांच्या समकालीन, परंतु भिन्न संस्कृतीच्या लोकांशी वस्तूंच्या देवाणघेवाणीच्या स्वरूपात व्यापार करीत होते हे सिद्ध करण्यास पुरावा उपलब्ध असला, तरी त्याचा आजवर फारसा अभ्यास झालेला नव्हता. ज्या काही थोड्या स्थळांचे उत्खनन झालेले आहे, त्यामधून स्थानिक उत्पादन नसणाऱ्या काही वस्तू मिळालेल्या आहेत. असे असले तरी, प्रगत शासनव्यवस्थेच्या आधारे चालणाऱ्या व्यापाराशी या देवाणघेवाणीची तुलना करता येणार नाही. अशा प्रकारच्या परस्पर देवाणघेवाणीवर नायकशाहीतील व्यवस्था अवलंबून असते.[१०] अनेक वसाहतींमधून विविध वस्तूंच्या विनिमय व्यवस्थेचे एक जाळेच निर्माण होते आणि या जाळ्याचा विस्तार हा आंतरविभागीय स्तरावरून आंतरप्रदेशीय स्तरापर्यंत होताना दिसतो. ताम्रपाषाणयुगीन काळामध्ये अशा विनिमयाची केंद्रेच निर्माण झाली होती. प्रकाशे, दायमाबाद व इनामगाव या नजीकच्या वसाहती त्यांच्या भोवतालच्या प्रदेशातील विनिमयावर तसेच येणाऱ्या वस्तूंच्या पुरवठ्यावर नियंत्रण ठेवणारी केंद्रेच बनली होती.[११] याखेरीज दूरवर पसरलेल्या प्रदेशांमधील उदा. मध्य प्रदेशातील नावडातोली, नागदा, कायथा, गुजरातमधील प्रभास पाटण, रंगपूर, राजस्थानातील आहार, गिलुंड आणि कर्नाटकातील मस्की आणि ब्रह्मगिरी ही केंद्रेही या विनिमयाच्या जाळ्यातील फार महत्त्वाचे बिंदू होत.

अशा तऱ्हेच्या विनिमयात शिकार व कंदमुळे गोळा करून निर्वाह करणाऱ्या भटक्या लोकांचाही अंतर्भाव होता. ताम्रपाषाणयुगीन लोक कर्नाटकातून सोने, हस्तिदंत व राजस्थानातून माळवामार्गे तांबे आणत होते. गुजरातमधील जामनगर जिल्ह्यातील नागेश्वर येथे नुकतेच शंखाच्या बांगड्या तयार करण्याचे प्राचीन केंद्र उजेडात आले आहे. कदाचित शंखाच्या बांगड्या सौराष्ट्रातूनच पुरविल्या जात असाव्यात. सौराष्ट्राचा किनारा हे वसतीचे व बांगड्यांसाठी शंख मिळण्याचे प्रमुख ठिकाण होते. तेथे प्रभास संस्कृतीच्या लोकांची वसती होती. शंखाबरोबरच गुजरातमधून (राजपिपला) ॲमेझोनाइट हा दगडही आणला जात होता. महाराष्ट्रातल्या महाराष्ट्रात कोकणातून लाल रंगासाठी गेरू, सागरी मासे तसेच माळा बनविण्यासाठी सागरी शंखशिंपले व घोड नदीच्या उगमाकडील भागातून वाल उपलब्ध होत होते. कोकण व घोड नदीचा हा परिसर ताम्रपाषाणयुगीन शेतकऱ्यांच्या वसाहतीखाली आलेला नव्हता. अजूनही तेथे शिकार व कंदमुळे गोळा करून उपजीविका करणाऱ्या लोकांचाच वावर होता. या लोकांना त्यांच्याकडील वस्तूंच्या मोबदल्यात ताम्रपाषाणयुगीन शेतकऱ्यांनी कदाचित मणी व मातीची भांडी देऊ केली असावीत. त्यांच्यात्यांच्यातही

चांडोलीसारख्या छोट्या वस्तीला इनामगाव, दायमाबाद यांसारख्या मोठ्या केंद्राहून मातीच्या भांड्यांचा पुरवठा झाला असावा.

ज्याप्रमाणे आहारचे कारागीर मध्य भारतातील समकालीनांना तांब्याच्या वस्तू पुरवित होते, त्याचप्रमाणे महाराष्ट्रातील जोर्वे संस्कृतीच्या लोकांना तांब्याच्या वस्तू उत्तर सिंधू संस्कृतीच्या लोकांनी पुरविल्या असाव्यात. इ. स. पू. १८०० पर्यंत उत्तर सिंधू संस्कृतीच्या लोकांनी तापी नदीच्या खोऱ्यात आपल्या वसाहती स्थापन केलेल्या होत्या हे दायमाबाद येथील पुराव्यांवरून स्पष्ट होते. तेथून मिळालेल्या कास्य वस्तूंच्या समूहाचे सिंधू संस्कृतीच्या वस्तूंच्या जडणघडणीशी साधर्म्य आहे. इनामगावला सापडलेली तांब्याची काटेरी तीराग्रे निःसंशयपणे सिंधू संस्कृतीच्या लोकांकडून आलेली आहेत. एवढेच नव्हे तर इनामगाव येथेच मिळालेल्या केसांचे सर्पिल चापही सिंधू संस्कृतीच्या बनावटीच्या चापांची आठवण करून देणारे आहेत. या सर्व वस्तूंच्या मोबदल्यात नवाश्मयुगीन कर्नाटकातील लोकांना त्यांनी कदाचित तांबे व मातीची भांडी देऊ केली असावीत असे दिसते. म्हैसूरजवळील टी. नसरीपूर येथे उत्खननात जोर्वे संस्कृतीची मातीची भांडी सापडली आहेत. दायमाबाद व टेक्कलकोटा या दोन ठिकाणांहून मिळालेली सोन्याची सर्पिल कुंडले इतकी एकसारखी आहेत की, जणू ती एकाच सोनाराच्या हातून घडलेली असावीत. समकालीन अरण्यवासीयांनाही त्यांनी आणलेल्या वस्तूंची किंमत म्हणून जोर्वे लोकांनी तांब्याची आयुधे व दागिने दिले असतील; परंतु माळवा आणि गुजरातमधील लोकांशी ते कोणत्या वस्तूंच्याद्वारे विनियम साधत होते हे पुराव्यांअभावी सांगता येत नाही. याबाबत एकच शक्यता व्यक्त करता येते, ती म्हणजे त्यांनी विनिमयासाठी धान्याचा उपयोग केला असण्याची.

एका प्रदेशातून दुसऱ्या प्रदेशातील व्यापारासाठी एका नदीच्या खोऱ्याशी दुसऱ्या नदीचे खोरे ज्या मार्गांनी जोडले जाते त्या मार्गाचा अवलंब ताम्रपाषाणयुगातही केला जात असावा. मेवाडचे पठार आणि माळवा-खांडवा-अजमेर यामध्ये गंभीरी नदीच्या खोऱ्यातून जाणारे लोहमार्ग हे दळणवळणाचे एकच माध्यम आजही आहे आणि ताम्रपाषाणयुगातही लोक याच मार्गे जात येत असावेत. त्याचप्रामणे माळवा संस्कृतीच्या लोकांनीही बऱ्हाणपूर मार्गेच माळव्यातून महाराष्ट्रात स्थलांतर केले असावे हे निश्चित. असे असले तरी माळवा आणि गुजरात या दोन प्रदेशांमध्ये काही देवाणघेवाण झाल्याचे दिसत नाही. याचे कारणही अगदी उघड आहे. गुजरात आणि माळव्याच्या सीमेवरील नर्मदेचे पात्र अत्यंत खोल व कुठेही पायउतार नसलेले असल्यामुळे ते ओलांडणे अशक्य होते. परंतु महाराष्ट्र व गुजरातमध्ये दळणवळण साधण्यासाठी सोनगड खिंडीतून निघणारा मार्ग अत्यंत सोयीचा आहे. हे जसे महत्त्वाचे तसेच भीमेच्या खोऱ्यातून कर्नाटकाकडे जाणाऱ्या मार्गावरच जोर्वे संस्कृतीची बरीचशी स्थळे आहेत ही वस्तुस्थितीही लक्षणीय आहे. एका प्रदेशातून दुसऱ्या प्रदेशात जाण्यासाठी ताम्रपाषाणयुगीन लोकांजवळ कोणती साधने होती याचीही कल्पना मातीच्या भांड्यांवरील नक्षीमुळे येऊ शकते. नद्यांमार्गे होणाऱ्या दळणवळणासाठी

कदाचित वल्ह्यांच्या छोट्या छोट्या होड्या त्यांनी उपयोगात आणल्या असाव्यात. अशा होड्यांची चित्रे जोर्वे संस्कृतीच्या रंगीत भांड्यांवर बऱ्याचदा रंगविलेली असतात. परंतु याच भांड्यांवरील नक्षीत आढळणाऱ्या बिनअऱ्यांची चाके असणाऱ्या गाड्या मात्र दूरच्या दळणवळणासाठी नसाव्यात हे स्पष्ट आहे.

## धार्मिक समजुती

ताम्रपाषाणयुगातील आद्य शेतकऱ्यांच्या श्रद्धांबद्दल उत्खनित पुराव्यांच्या आधारे थोडीफार कल्पना करता येते. त्यांच्या धर्मजीवनात काही देवदेवतांच्या बरोबरीने विशिष्ट प्राण्यांनाही महत्त्वाचे स्थान होते.

**मातृदेवता :** जोर्वे संस्कृतीच्या (इ. स. पू. सुमारे १४००--१०००) विविध स्थळांहून कच्च्या व भाजलेल्या मातीच्या मातृका मिळालेल्या आहेत. इनामगाव येथील पुराव्यांमुळे या मातृकांचे पूजन केले जात असे हे सिद्ध होते. मातृदेवतांचे प्रतीक म्हणून पूजल्या जाणाऱ्या या प्रतिमाही दोन प्रकारच्या होत्या. त्यातील पहिल्या प्रकारच्या मातृका या शिरासह, तर दुसऱ्या प्रकारच्या मातृका या मुळातच शिरविरहीत तयार करीत. पहिल्या प्रकारच्या अनेक प्रतिमा मिळालेल्या आहेत. त्यातील सर्वांत मोठी प्रतिमा नेवासा येथील उत्खननात खालच्या थरामध्ये मिळाली व त्या आधारे ती इ. स. पूर्वीच्या दुसऱ्या सहस्रकात घडविलेली असावी असे म्हणता येते. या काळातील मातृकांची घडण ही नंतरच्या ऐतिहासिक काळातील मातृकांशी साधर्म्य दर्शविणारी, फारशी सुबकता नसणारी असते. मातीचा एक उभट दांडक्यासारखा दिसणारा मुटका करून त्याचाच वरचा भाग थोडासा चिमटून डोक्याचा आभास निर्माण केलेला असतो. हाताच्या जागी दोन तोकडे आडवे दांडे तसेच उरोभागही चिमटूनच तयार केलेला असे त्यांचे स्वरूप असते. बाजू थोड्याशा उतरत्या करून त्यांची बैठक केलेली असते. सुफलनाचे आराध्य दैवत म्हणून या प्रतिमांचे पूजन केले असण्याची शक्यता आहे.

इनामगाव येथूनही काही मातृका मिळालेल्या आहेत. त्याही इतक्या ओबडधोबड आहेत की, केवळ स्त्रीत्वदर्शक उरोभागामुळे त्या मातृका आहेत असे म्हणता येते. अन्यथा कोणतीही शारीरिक वैशिष्ट्ये वेगळेपणाने दर्शविलेली नाहीत. येथील सर्व प्रतिमा पक्क्या भाजलेल्या आहेत. एका प्रतिमेच्या गळ्यात व छातीवर माळांची नक्षी असून या माळांवर गळा व उरोभागाच्या ठिकाणी छिद्राछिद्रांची नक्षी आहे. एक प्रतिमा रक्तचंदनाच्या बाहुलीसारखी चपटी आहे. दोन प्रतिमा लठ्ठपणा दर्शविणाऱ्या व म्हणून निश्चितच सुफलनाच्या संकल्पनेशी नाते सांगणाऱ्या आहेत. एकीचे हात वळलेले व तोकडे आहेत. या सर्व ओबडधोबड प्रतिमांमध्ये व नंतरच्या ऐतिहासिक काळाच्या सुरुवातीच्या (सुमारे इ. स. पू. ७००) प्रतिमांमध्ये लक्षणीय साम्य आहे.

इनामगाव येथे मिळालेल्या प्रतिमांमधील दोन प्रतिमा तर प्रागैतिहासिक धर्मश्रद्धांच्या अभ्यासाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाच्या आहेत (चित्र ४). ज्या पद्धतीने त्या पूर्व जोर्वे काळातील (इ. स. पू. सुमारे ३०० वर्षे) एका घरातील कोपऱ्यात जमिनीखाली पुरल्या होत्या, त्यावरून त्यांचे महत्त्व निश्चितपणे लक्षात येते. या घराची जमीन साफ करीत असता कोपऱ्यात एक खळगा आढळला. या खळग्यात मातीच्याच एका लंबगोलाकार डबीत मातीची एक मातृका बंद करून ठेवलेली आढळली. याच डबीच्या झाकणावर आणखी एक शिरोविहीन मातृका व एका बैलाची प्रतिमा ठेवलेली होती. या वस्तू निश्चितच विशिष्ट पद्धतीने हेतूपुरस्सर पुरलेल्या होत्या.

विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे या वस्तुसमुहातील दोन्ही मातृका, बैल व डबी या सर्व कच्च्याच मातीच्या आहेत, भाजलेल्या नाहीत. त्यावरून असे अनुमान करता येते की, त्या पूर्णतः नैमित्तिक असून पुन्हा पुन्हा वापरण्यासाठी बनविलेल्या नव्हत्या व वापरानंतर त्या ज्याप्रमाणे उत्सवातील मूर्तीचे विसर्जन केले जाते त्याप्रमाणे खळगा खणून जमिनीखाली पुरून टाकल्या होत्या. डबीच्या आत ठेवलेली प्रतिमा तिच्या मातृत्वदर्शक विशाल उरोभागामुळे सुफलनाची देवता होती असे मानता येईल. डबीच्या बाहेर झाकणावर ठेवलेली प्रतिमा शिरोविहीन व कमरेपर्यंतच घडविलेली होती. महाभारतात "विशिरा" नावाच्या देवीचे वर्णन आलेले असून लहान मुलांची मान अवघडली असल्यास तिचे आवाहन करणे आवश्यक असल्याचे म्हटलेले आहे. तसेच लहान मुलांच्या कल्याणाशी निगडित देवतांना बालग्रह असे म्हटलेले आहे.

या शिरोविहीन प्रतिमेच्या बेंबीपाशी एक छिद्र असून तसेच एक छिद्र बैलाच्या पाठीवरही आहे. या दोन्ही छिद्रांमध्ये एक काडी उभी केल्यास असे दिसते की, ही देवता वृषभाच्या पाठीवर बसलेली आहे असे दर्शविण्याचा हेतू होता. यावरून या काळातच विविध देवतांशी विशिष्ट प्राणी त्यांचे वाहन म्हणून निगडित असण्याच्या संकल्पनेचे बीज रुजण्यास सुरुवात झाली असावी असे दिसते.

नंतरच्या ऐतिहासिक काळातही (इ. स. पू. सुमारे २ रे शतक ते इ. स. ६ वे शतक) महाकूट, आलमपूर आणि इतर अनेक ठिकाणांहून नग्न व शिरोविहीन देवीच्या प्रतिमा मिळालेल्या आहेत. इनामगावची विशिरा आणि ही देवी या फारशा भिन्न नसाव्यात. ऐतिहासिक काळातील प्रतिमा बहुधा "शाकंभरी" देवीच्या असाव्यात. शाकंभरी ही वनस्पतींच्या सुफलनाची अधिष्ठात्री देवता[१२] "स्कंदपुराणा"त (४.७२.१२) तिचे वर्णन छिन्नमस्ता असे केलेले आहे. "देवीमाहात्म्या"त (९१ : ४३--४४) वर्णिल्यानुसार दुष्काळ पडू नये म्हणून शाकंभरीची पूजा करण्यात येई. यामध्ये लक्षात घेण्याजोगी गोष्ट अशी की, शाकंभरीचे शाब्दिक वर्णन इ. स. पू २ रे शतक ते इ. स. ६ वे शतक कालखंडातील ग्रंथांमध्येच आढळते व त्या वर्णनाशी जुळणाऱ्या नग्न, शिरोविहीन देवीप्रतिमा याच कालखंडात घडविल्या गेलेल्या आहेत. याच देवीप्रतिमा लज्जागौरीच्या आहेत असे अलीकडे प्रतिपादन केले गेलेले आहे.[१३] निःसंतान स्त्रिया अपत्य प्राप्तीसाठी तिचे पूजन करीत.

याच संदर्भात आणखीही एक पुरावा लक्षात घेणे आवश्यक आहे. मुंबईजवळ ठाणे जिल्ह्यातील वारली जमातीचे लोक "पालघट" नावाच्या देवीची पूजा करतात. वारल्यांपैकी अलीकडे नावारुपाला आलेल्या काही कलाकारांनी या देवीच्या काही अत्युत्तम चित्राकृती रंगविलेल्या आहेत. त्यापैकी दोन वा तीन आकृत्या वारंवार काढल्या जातात असे दिसते. तलासरी या गावातील एका कलाकाराने रेखाटलेल्या चित्रात पालघट देवी नुसत्या बाह्यरेषांनी रंगविलेली आहे. ती शिरोविहीन असून तिचे हात आणि पाय दोन्हीही वरच्या बाजूकडे वळलेले आहेत. एकमेकांना जोडलेल्या उलट्या त्रिकोणांनी मधले धड बनलेले असून त्या त्रिकोणांमधील मोकळ्या जागेत दोन प्राणी रेखाटलेले आहेत. त्यावर हळद आणि कुंकवाचे छोटे छोटे टिपके आहेत. त्रिकोणातील दोन प्राणी म्हणजे वधूवरांसाठी सजवलेले दोन घोडे समजायचे. घोड्यांवर वधूवर आणि करवली असे तिघे बसलेले आहेत. वरच्या त्रिकोणातील घोड्याला एक माणूस धरून नेत आहे. संपूर्ण दृश्य हे लग्नानंतर वरगृही निघालेल्या वरातीचे आहे.

या देवीचे "पालघट" हे नाव लक्षणीय आहे. संस्कृत "घट-पल्लवाशी" नाते सांगणारे! भारतात प्राचीन काळापासून घट-पल्लव हे समृद्धी व सुफलनाचे प्रतीक मानले गेलेले आहे. असे असले तरी वारली लोक मात्र पालघट नावाची फोड वेगळ्या तऱ्हेने करतात. त्यांच्या दृष्टीने पालघट म्हणजे मांडी घातलेली स्थिती. श्रीमती यशोधरा डालमिया यांनी वारली जमातीवर बरेच संशोधन केलेले आहे. त्यांच्या मते पालघट शब्द ज्याअर्थी पायांच्या विशिष्ट स्थितीवर आधारलेला आहे त्याअर्थी त्याचे मूळ समागमाच्या वेळी व अपत्य जन्माच्या क्षणी पायांच्या असणाऱ्या स्थितीमध्ये असावे. याचाच अर्थ ती सुफलनाची अधिष्टात्री देवी आहे. वारली लोकांच्या सांगण्यानुसार पालघट देवीच्या पूजनाचा अधिकार फक्त स्त्रियांनाच असतो आणि कोणताही विवाह तिच्या अधिष्ठानाखेरीज पूर्ण होत नाही. याच कारणाने विवाहसमयी तिच्या प्रतिमेचे रेखाटन व पूजन अत्यावश्यक असते. यावरूनही प्राचीन काळातील शिरोविहीन देवीप्रतिमाही सुफलनाच्या संकल्पनेशी निगडित होत्या हे स्पष्टपणे दिसून येते.

इनामगावच्या घरातील कोपऱ्यात मिळालेल्या सशिर व शिरोविहीन देवीमूर्ती कदाचित नवजात बालकावरील इडापिडा टळाव्यात म्हणून करावयाच्या विधींमध्ये वापरल्या गेल्या असाव्यात. आजही खेडेगावातून बाळंतिणीच्या खोलीतील पाणी बाहेर जाऊन त्यामुळे काही बाधा होईल या भीतीपोटी खोलीतल्या खोलीतच एक खड्डा करून त्यात पाणी जिरू देतात. तसाच काहीसा हेतू या मूर्ती त्यांचे काम झाल्यानंतर घरातल्या घरात पुरण्यामागे असावा.

**पुरुषदेवता :** महाराष्ट्रातील ताम्रपाषाणयुगीन स्थळांहून प्राप्त झालेल्या मातृदेवतेच्या प्रतिमांच्या तुलनेत पुरुषदेवतांच्या प्रतिमा क्वचितच मिळालेल्या आहेत. इतकेच नव्हे तर मृद्‌भांड्यावरील नक्षीतही पुरुषाकृतींचा फारसा वापर केलेला आढळत नाही.

अशा दुर्मिळ उदाहरणांपैकी पुरुषाकृती रंगविलेले एक मातीचे भांडे दायमाबाद येथील उत्खननात माळवा संस्कृतीच्या सुरुवातीच्या (इ. स. पू. सुमारे १६००) थरामध्ये मिळाले. या भांड्यावरील दृश्य दोन आडव्या पट्ट्यांमध्ये विभागलेले आहे. त्यातील वरच्या पट्ट्यात कमरेभोवती पाने नेसलेल्या एका मनुष्याकृतीचे चित्र रंगविलेले असून तिच्या दोहोबाजूस काळवीट, हरणे, मोर इत्यादी प्राण्यांची सांकेतिक शैलीतील चित्रे आहेत. चित्रांकडे पहाताना हे प्राणी मधल्या मनुष्याकृतीपुढे जणू नतमस्तक झालेले असावेत असे वाटते. खालच्या आडव्या पट्ट्यामध्ये तशाच सांकेतिक शैलीत रेखाटलेले उसळणारे वाघ आहेत. संपूर्ण भांड्यावरील अगदी तपशीलवार व विपुल नक्षी पहाता हे भांडे एखाद्या धार्मिक विधीसाठी मुद्दाम घडविलेले असावे असे वाटते. अशाच प्रकारचे प्राणी प्रकाशे येथे मिळालेल्या माळवा संस्कृतीच्या मृत्तिकापात्राच्या एका तुकड्यावरही रंगविलेले आढळले.

महाराष्ट्रातील आद्य शेतकऱ्यांच्या धर्मश्रद्धांवर अधिक प्रकाश टाकणारा पुरावा दायमाबाद येथे उजेडात आला. तांबे किंवा कांशाच्या या वस्तुसमुहात, ज्यावर एक पुरुष स्वार आहे असा बैलांनी ओढलेला रथ, चाके असलेल्या हत्ती, गेंडा व रानगेंडा यांच्या मूर्ती आहेत (चित्र ५). या वस्तू ज्या थरातून मिळाल्या त्याचा विचार करता त्या सिंधू संस्कृतीच्या काळातील म्हणजे इ. स. पू. सुमारे २०००--१८०० च्या सुमाराच्या आहेत. सर्व वस्तू आकाराने मोठ्या व इतक्या जड आहेत की, खेळणे म्हणून त्यांची संभावना करता येणे शक्यच नाही आणि खेळणी तांब्याची किंवा काशाची बनवावीत[१४] इतके तांबे दख्खनच्या प्रदेशात कधीच सहजपणे उपलब्ध नव्हते. सर्व शक्याशक्यतांचा विचार करता असे वाटते की, त्याकाळचा दायमाबादचा जो कोणी प्रमुख/धर्मप्रमुख असेल, त्याने या वस्तू खास बनवून घेतल्या असाव्यात व सर्व रहिवाशांकडून त्याचे मूल्य वसूल केले गेले असावे. ज्यामध्ये सर्वांच्याच धर्मश्रद्धा गुंतलेल्या आहेत अशाच वस्तूंच्या बाबतीत अशा तऱ्हेने वसुली करता येणे शक्य आहे. मिरवणुकीने नेण्यासाठी म्हणूनच या सर्व वस्तूंना चाके लावलेली असावीत. मोहेंजोदडो येथील एका मुद्रेवर अशाच तऱ्हेच्या मिरवणुकीचे चित्र पहावयास मिळते.[१५] मुद्रेवरील ओळीत उभ्या असणाऱ्या प्राण्यांत एक हत्ती, एक गेंडा व एक वाघ आहे. चौथा प्राणी स्पष्ट ओळखू येत नाही. मोहेंजोदडोच्याच दुसऱ्या एका ताईतावरील मुद्रेत मध्यभागी सुसर, तिच्या दोन्ही बाजूस वृषभ व खाली डावीकडे हत्ती आणि उजवीकडे वाघ असे प्राणी आहेत.[१६] यावरून एक गोष्ट स्पष्ट होते की, हत्ती, गेंडा, वृषभ, महिष, वाघ या प्राण्यांना सिंधू संस्कृतीच्या लोकांच्या धर्मश्रद्धांमध्येही अत्यंत महत्त्वाचे स्थान होते. तीच परंपरा उत्तर सिंधू संस्कृतीद्वारा ताम्रपाषाणयुगीन संस्कृतीपर्यंत पोचली असे दायमाबाद येथील माळवा संस्कृतीच्या मृत्तिकापात्रामुळे स्पष्ट दिसते.

इनामगावच्या दोन कच्च्या मातीच्या पुरुषाकृतीही देवप्रतिमा असणे शक्य आहे. उत्तर जोर्वे संस्कृतीच्या (इ. स. पू. सुमारे १०००--७००) थरांमध्ये या प्रतिमा

मिळाल्या. प्रतिमा चपट्या व ओबडधोबडच आहेत. चेहऱ्यावर नाकडोळे वेगळेपणाने दाखविलेले नाहीत. पाय खुंटांसारखे, हात छोटे व खाली वळलेले आहेत. नैमित्तिक वापरासाठी घडविल्यामुळे साहजिकच त्या भाजलेल्या नाहीत. एका वर्तुळाकार झोपडीच्या अंगणातील चुलीजवळ या दोन्ही प्रतिमा मिळाल्या. इनामगावच्या परिसरात केलेल्या पाहणीत असे आढळले की, तेथील लोक गावजेवणाच्या वेळी अशाच तऱ्हेच्या कणकेच्या प्रतिमा बनवितात. त्यांना "गणेश" म्हणतात. हाती घेतलेले कार्य निर्विघ्नपणे पार पडावे म्हणून त्यांची पूजा करतात. या प्रतिमा व इनामगावच्या इतिहासपूर्व काळातील मातीच्या प्रतिमा यामध्ये कमालीचे साम्य आढळते. कदाचित दोहोमागच्या उद्देशात एकाच जातीच्या धर्मश्रद्धा गुंतलेल्या असतील. अशाच प्रकारची पण व्यवस्थितरित्या भाजलेली एक मातीची देवप्रतिमा मिळालेली आहे. फक्त तिच्या जाड पायांना तळाशी चपटा आकार दिलेला आहे. त्यामुळे ती जमिनीवर उभी करणे शक्य होते.

## दफने

महाराष्ट्रातील प्राचीन संस्कृतीमध्ये जोर्वे संस्कृतीच्या लोकांमधील मृत व्यक्तींवरील संस्काराची माहिती अधिक स्पष्टपणे प्राप्त झालेली आहे. मृत व्यक्तींना ते विधीपूर्वक पुरत असत. अशी विधीपूर्वक केलेली दफने बहुसंख्येने मिळालेली आहेत. इतर संस्कृतीच्या स्थळांहून मात्र अगदी त्रोटक पुरावा हाती आलेला आहे. कावठे येथे मिळालेल्या चार दफनांपैकी दोन प्रौढ व्यक्तींची व दोन शिशूंची होती. ही दफने अगदी साधी व कोणत्याही सामानाविरहीत होती. दफनात मृताचे डोके उत्तरेकडे व पाय दक्षिणेकडे केलेले होते. दायमाबाद येथे उत्तर सिंधू संस्कृतीच्या उत्तर काळातील मिळालेल्या एकमेव दफनासाठी खणलेल्या खड्ड्याच्या तळाशी कच्च्या विटा व विटांचे तुकडे व्यवस्थित चोपून बसविलेले होते. त्यावर शव ठेवल्यानंतर माती व विटांचे लहान तुकडे लोटून खड्डा बुजवून टाकलेला होता. खड्डा बुजवून झालेल्या टेकाडावर डोके जिथे येईल त्या जागी एक दगड बसवून टाकलेला होता. खड्ड्याच्या तळाशी जमीन तयार करण्यासाठी विटांचा वापर करण्याच्या येथील पद्धतीमुळे कालीबंगन येथील सिंधू संस्कृतीच्या दफनांशी थोडेसे साम्य जाणवते. दायमाबाद येथेच उत्तर सिंधू संस्कृतीच्या नंतरच्या माळवा संस्कृतीच्या थरांतूनही प्रौढ व्यक्तीचे एक दफन मिळाले. या उदाहरणातही मृत व्यक्तीसाठी म्हणून कसलेही सामान ठेवलेले नव्हते. शव उत्तर-दक्षिण दिशेने पुरलेले होते. माळवा संस्कृतीची काही शिशुदफने इनामगाव येथे मिळालेली आहेत. छोटे मूल मृत झाल्यास माळवा संस्कृतीचे लोक त्याला दोन मडक्यांमध्ये ठेवून ती मडकी तोंडाला तोंड लावून ठेवून पुरत असत. त्यासाठी वापरलेली मडकी रंगविलेली किंवा साधी असत. मुलाचे डोके उत्तरेकडे असे. छोट्या मुलास मृत्यूनंतर अशा विशिष्ट रीतीने पुरण्याची माळवाकालीन प्रथा त्यानंतर आलेल्या जोर्वे संस्कृतीतही कायम राहिली.

जोर्वे संस्कृतीतील अनेक दफने सापडलेली आहेत. प्रौढ व्यक्तीचा मृत्यू झाल्यास तिला सहसा आडवे पुरत असत (चित्र ६) व लहान मुलास लालसर करड्या रंगाची कमी दर्जाच्या पोताची दोन भांडी घेऊन त्यात पुरत असत (चित्र ७). दोन्ही प्रकारच्या दफनांसाठी लागणारा खड्डा बहुधा राहत्या घराच्या आतील बाजूस खणत असत. फारच क्वचित तो अंगणात खणत असत. प्रिय व्यक्तीच्या मृत्यूनंतरही तिने घरापासून दूर जाऊ नये हा हेतू कदाचित मृत व्यक्तीचे घरातच दफन करण्यामागे असावा. इतकेच नव्हे तर प्रौढ व्यक्तींची घोट्याखालील पाऊले दफनाआधी छाटून टाकीत असत. यामागेसुद्धा त्यांनी दूर जाऊ नये हीच इच्छा असावी. हेही शक्य आहे की, मृत व्यक्तीचा आत्मा भूतयोनीत जाऊन त्याने जीवित व्यक्तींना त्रास देऊ नये म्हणून अशा प्रकारची खबरदारी घेतली गेली असावी.

प्रौढ तसेच लहान मृत व्यक्तीला पुरताना उत्तर-दक्षिण दिशेने म्हणजेच डोके उत्तरेला व पाय दक्षिणेकडे करीत असत. या संदर्भात एक लक्षात घेण्यासारखे असे की, अजूनही सर्वसाधारण भारतीय दक्षिणेकडे पाय करून कधीही झोपत नाहीत. मृत व्यक्तीसाठी खाण्यापिण्याची व्यवस्थाही केली जाई. त्यामुळे दफनाच्या खड्ड्यात सांगाड्याबरोबर सहसा दोन भांडी मिळतात. त्यातील एक आडवा कंगोरा असलेला कटोरा व एक नळीचे भांडे असते. कधीकधी दोनपेक्षा अधिक भांडीही ठेवलेली असत, तर कधी एकही भांडे नसे. कदाचित मृत व्यक्ती ज्या कुटुंबातील असे त्या कुटुंबाची आर्थिक परिस्थिती यामध्ये प्रतिबिंबित होत असावी. इतकेच काय, काही कुटुंबे इतकी विपन्नावस्थेतील असावीत की, छोट्या मुलाच्या दफनासाठी लागणारे दोन कुंभ न मिळाल्यामुळे अगदी कमी दर्जाच्या पोताच्या लाल/करड्या रंगाच्या एकाच कुंभावर काम भागविलेले दिसते. अशा दोन दफनांपैकी एक कुंभ खड्ड्यात दक्षिणेकडे तोंड करून आडवा ठेवलेला होता व त्यासोबत आडव्या कंगोऱ्याचे दोन छोटे छोटे कटोरे ठेवलेले होते. उत्तर जोर्वे काळातील एका दफनामध्ये आडव्याऐवजी हाच कुंभ उभा ठेवलेला आढळला. अहमदनगर जिल्ह्यातील नेवासे येथे मात्र पूर्व जोर्वे काळातीलच एका दफनाचा कुंभ अशा रीतीने उभा ठेवलेला होता. अर्थातच प्रत्येक वेळी मृत बालकाच्या पालकांच्या गरिबीमुळेच दोनऐवजी एक कुंभ वापरावा लागला असेल असे कदाचित म्हणता येणार नाही. हेही शक्य आहे की, एकाच कुंभाचा वापर ही बाब सुद्धा जमातीतील एखाद्या उपसमुहाच्या स्वतंत्र प्रथेचे निदर्शक असावी.

मृताच्या शरीरावरील अलंकार हे मात्र निश्चितपणे त्याच्या कुटुंबियांच्या सांपत्तिक स्थितीचे निदर्शक आहे असे म्हणण्यास हरकत नाही. उत्तर जोर्वे काळातील एका प्रौढ व्यक्तीस तिच्या गळ्यातील चंद्रकोरीच्या आकाराच्या एका तांब्याच्या दागिन्यासह पुरलेले आढळले, तर त्याच काळातील एका मृत बालकाच्या गळ्यात दफनाच्या वेळीही तशीच राहू दिलेली तांबे व अकीक (Jesper) यांच्या मण्यांची एक माळ मिळाली. या माळेत एकूण बारा मणी होते.

वर वर्णन केलेल्या सर्वसाधारण दफनांखेरीज इनामगावच्या उत्तर जोर्वे कालखंडातील एका दफनात एकाच खड्ड्यात चार कुंभ दक्षिणोत्तर दिशेने ठेवलेले होते. प्रत्यक्षात दोन बालकांना दोन-दोन कुंभांमध्ये पुरल्यामुळे ही संख्या चार झालेली होती. एकाच खड्ड्यात दोन्ही बालकांना पुरले याचा अर्थ त्यांचा मृत्यू एकाच दिवशी झाला. देवीसारख्या एखाद्या साथीच्या रोगाने एकाच दिवशी एकाच कुटुंबातील एकाहून अधिकांचा मृत्यू ही घटना भारतात अगदी अलीकडील काळापर्यंत अकल्पित वाटण्यासारखी नाही. असाच प्रकार ताम्रपाषाणयुगातील कुटुंबामध्येही घडत असावा.

ज्याप्रमाणे दहा वर्षांहून कमी वयाची मुले मृत झाल्यास त्यांना पुरण्यासाठी दोन कुंभांचा वापर केला जात असे, त्याप्रमाणेच त्याहून थोडी मोठी मुले मृत झाल्यास त्यांची वाढलेली उंची लक्षात घेऊन दोनापेक्षा अधिक कुंभांचा वापर करण्यात येई. इनामगावला उत्तर जोर्वे काळातील अशा प्रकारचे तांबड्या–करड्या रंगाचे तीन कुंभ वापरून केलेले दफन मिळालेले आहे. यातील दोन कुंभांची तोंडे एकास एक जोडलेली व तिसरा कुंभ उत्तरेकडील कुंभाचा तळ फोडून त्यास त्याचे तोंड जोडून ठेवलेला होता. दायमाबाद येथील पूर्व जोर्वे काळातले अशा प्रकारचे तीन कुंभ वापरून केलेले दफन, तर नेवासा येथून पाच कुंभ वापरून केलेले दफन, कच्च्या मातीचे एक पूर्ण व दुसरे अर्धे भांडे अशा रीतीने हेतुपुरस्सर पुरण्याचे अन्यथा समर्थनीय असे दुसरे काहीच कारण दिसत नाही. हे सांकेतिक दफन असावे असे वाटते. जमातीतील सर्वोच्च अधिकार ज्याच्याकडे होते अशा व्यक्तीसाठी हा सांकेतिक दफनविधी पार पाडला असावा. कदाचित ती व्यक्ती जमातीचा नायक-धर्मगुरू असावी. अपघाती किंवा युद्धप्रसंगी मृत्यू पावल्यामुळे त्याचे शव हाती लागले नसावे आणि म्हणूनच केवळ सांकेतिक दफनविधी पार पाडण्याची वेळ आली असावी.

चार पायांच्या उदराकृती भांड्यातील ही दोन्ही दफने एकाच परिसरातील, परंतु कालांतराने केली गेलेली आहेत. दोहोंच्या मध्ये २५ सें. मी इतका जाड मातीचा थर होता. वरील सांकेतिक दफन आधीचे म्हणजे पूर्व जोर्वे कालखंडाच्या शेवटच्या टप्प्यातले (इ. स. पू. सुमारे ११०० वर्षे), तर सांगाड्यासह मिळालेले दफन हे तोच कालखंड संपता संपता म्हणजे इ. स. पू. १००० च्या सुमाराचे आहे. एकाच पद्धतीचे संस्कार झालेल्या या दोन मृत व्यक्तींमध्ये जवळचे नाते असल्याची शक्यता यातून व्यक्त होते. दोहोंमधला कालावधी ५० वर्षांचा धरल्यास आजोबा व नातू किंवा पिता व पुत्र अशा दोघांचीही दफने असण्याची शक्यता आहे; इतकेच नव्हे तर त्यांच्याच बाजूला उजेडात आलेले दोन वर्षांच्या मुलीचे दफनही याच कुटुंबातील असले पाहिजे. या मुलीच्या गळ्यात तांबे व अकीकाच्या मण्यांची माळ मिळालेली आहे.

कावठ्याचा अपवाद वगळल्यास तापी नदीच्या खोऱ्यातील ताम्रपाषाणयुगीन स्थळी दफनविधीचा फारसा पुरावा मिळालेला नाही. तापीची उपनदी गिरणाच्या काठावरील टेकवाडे येथे मात्र वस्तीपासून दूर असलेल्या स्मशानभूमीत दोन वेगवेगळ्या टप्प्यातील दफने उजेडात आलेली आहेत.

इनामगाव येथील स्वतःचे खास वैशिष्ट्य असणारे व सर्वात महत्त्वाचे दफन पूर्व जोर्वे कालखंडाच्या शेवटच्या टप्प्यातले (इ. स. पू. सुमारे ११०० वर्षे) आहे. अशा प्रकारे मृत व्यक्तीस पुरल्याचा पुरावा ताम्रपाषाणयुगीनच नव्हे, तर इतर कुठल्याही संस्कृतीच्या ठिकाणाहून प्राप्त झालेला नाही. या उदाहरणात मृत व्यक्तीस पुरण्यासाठी एक चार पायांचे कच्च्या मातीचे मानवी आकृतीसदृश भांडे वापरले होते. बारकाईने पाहिल्यास त्यावर कमरेभोवती गुंडाळलेल्या वस्त्राच्या खुणाही लक्षात येतात. एकंदरीत त्याचा आकार जाडजूड मानवी पोट व मांड्या यांच्यासारखा दिसतो व हा आकार हेतुपुरस्सर साधलेला आहे याबद्दल शंका उरत नाही. या भांड्याची उंची ८० सें. मी. (२ फूट ७.५ इंच) व रुंदी ५० सें. मी. (१ फूट ८ इंच), तसेच जाडी ३ सें. मी. (१ इंच) आहे. तोंडाकडचा मोडलेला एक तुकडा सोडल्यास हे भांडे बहुतांशी पूर्ण अवस्थेत होते. भांड्याचे तोंड रुंद व बिनकाठाचे आहे. भांड्यावरील माती हळूहळू मोकळी केल्यानंतर आत एका ३० ते ४० वर्षे वयाच्या पुरुषाचा सांगाडा मिळाला. त्यावरून पुरतेसमयी त्यास बसलेल्या अवस्थेत भांड्यात ठेवले होते हे दिसते. ज्या स्थितीत त्यास बसविले होते ती स्थितीही लक्षणीय आहे. गुडघे पोटाजवळ ओढून व मान खाली वाकविलेल्या म्हणजेच मातेच्या उदरातील गर्भाप्रमाणे त्यास बसविलेले होते. सांगाड्यातील कवटी व इतर सर्व हाडे अगदी पायांच्या बोटांसकट उत्तम अवस्थेत सापडलेली आहेत. याचाच अर्थ नेहमीच्या सर्वसामान्यांसाठी असणाऱ्या नियमाप्रमाणे या व्यक्तीची पाऊले मृत्यूनंतर छाटलेली नव्हती. त्याच्या बाजूला रंगीत तोटीचे भांडे व आडव्या कंगोऱ्याचा कटोराही भांड्यात ठेवलेला होता. तोटीच्या भांड्यावर लांब वल्ह्यांची होडी चितारलेली होती. अशाच प्रकारची होडीचे चित्र असणारी तोटीची दोन भांडी यापूर्वीही पूर्व जोर्वे कालखंडातील दफनांमध्येही मिळालेली होती. या संदर्भात आजही प्रचलित असलेली, ''मृतात्म्याला स्वर्गात पोचण्यापूर्वी नदी पार करून जावे लागते'', ही हिंदूमधील श्रद्धा महत्त्वाची वाटते.

मानवी आकाराशी साधर्म्य दर्शविणारे हे भांडे कदाचित मृत व्यक्तीचेच प्रतिमास्वरूप असावे असे जर म्हटले तर ते पूर्ण चुकीचे ठरणार नाही. अशा तऱ्हेचा अपवादात्मक दर्जा प्राप्त झालेल्या व्यक्तीचे सामाजिक स्थान काय असावे असा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो. सर्वसामान्यांपेक्षा वेगळा दर्जा मृत्यूनंतरही ज्यास प्राप्त होतो व सर्वसाधारण नियम ज्यास लागू केले जात नाहीत, त्या व्यक्तीचे समाजातले स्थान अत्यंत महत्त्वाचे, किंबहुना सर्वोच्च मानाचे असावे असा केलेला तर्क बरोबरच म्हणावा लागेल आणि मग ती व्यक्ती म्हणजे ताम्रपाषाणयुगीन इनामगावची प्रमुख अधिकारी व्यक्ती होती या अनुमानास पुष्टी मिळते.

पूर्व जोर्वे कालखंडातील एका घरातील अंगणातही अशीच चार पायांची दोन भांडी एका खड्ड्यात पुरलेली आढळली. दोन्ही भांडी कच्च्या मातीची असून बुटके खुंटसदृश चार पाय असलेली व ढेरपोट्या आकाराची आहेत. यातील उत्तरेकडचे भांडे दुसऱ्याहून किंचित उंच (४५ सें. मी.) आहे. दक्षिणेकडील भांड्याची उंची ३० सें. मी. आहे.

हे भांडे एका बाजूने उभे कापलेले होते व फक्त डाव्या बाजूचा अर्धा भाग दुसऱ्या पूर्ण भांड्यास दक्षिणेच्या बाजूस जोडून उभा केला होता. मात्र कोणत्याच भांड्यात अस्थी नव्हत्या. फक्त उत्तरेकडच्या पूर्ण भांड्याच्या आत जोर्वेचे एक गाडगे गोळ्याच्या आकाराची मूट असलेल्या झाकणासह सापडले. या भांड्यातही अस्थी वगैरे काहीच नव्हते. मात्र त्याखाली बैलाचे एक हाड सापडले. जरी माणसाच्या अस्थी यामध्ये मिळाल्या नसल्या तरी हे सांकेतिक दफन असावे अशा तर्कास दुसरा पर्याय आता तरी दिसत नाही. दफने उजेडात आलेली जागा बहाळ येथील लोकांची स्मशानभूमी असावी. आधीच्या टप्प्यात मृत व्यक्तीस एका खड्ड्यात डोके उत्तरेकडे करून पाठीवर झोपवलेले होते, तर नंतरच्या टप्प्यात छोटी भांडी व अस्थी मातीच्या एका मोठ्या कोठीत घालून पुरलेले होते. या थरात जोर्वे भांड्यांच्या बरोबरीने मातीची तांबडी आणि काळी भांडीही मिळतात. यावरून त्याचा काळ इ. स. पू. १००० नंतरचा असावा हे स्पष्ट होते. भीमेच्या खोऱ्यातही या काळानंतरच जोर्वेच्या बरोबरीने तांबडी आणि काळी मृद्‌भांडी मिळू लागतात. त्याचबरोबर वसाहतीपासून स्मशानभूमी दूर असण्याची कल्पना घरात किंवा अंगणात मृतांना पुरण्याच्या तुलनेत अगदीच अनोखी आहे. त्यावरूनही टेकवाड्याची ही स्मशानभूमी काहीशी नंतरच्या काळातील असावी या निष्कर्षास अनुमोदन मिळते.

दोन कुंभांमधील दफन हे जोर्वे संस्कृतीचे खास वैशिष्ट्य! प्ररंतु दख्खनच्या दक्षिणेकडे, विशेषतः कृष्णा नदीच्या वरच्या पट्ट्यातील काही नवाश्मयुगीन वसाहतींमध्येसुद्धा अशा प्रकारची दफने आढळलेली आहेत. यामध्ये जोर्वे संस्कृतीचा प्रभाव निश्चितपणे दिसतो. याचे कारण असे की, कर्नाटकातील नवाश्मयुगीन शेतकऱ्यांमध्ये मृत व्यक्तींना पुरण्याची परंपरा इ. स. पू. सुमारे २००० वर्षांइतकी प्राचीन असली तरी द्वैकुंभिक दफने मात्र इ. स. पू. सुमारे १४००-१०५० वर्षांपूर्वीच्या कालखंडातच म्हणजे नवाश्मयुगाच्या तिसऱ्या टप्प्यात आढळतात.

आधीची परंपरा नसलेल्या अशा द्वैकुंभिक दफनांच्या प्रथेस कुठून व कशी सुरुवात झाली याचे स्पष्टीकरण देणे त्यामुळेच कठीण होते. कुंभ हे सुफलनाचे व पुनःनिर्मितीचे प्रतीक आहे व यजुर्वेदाच्या वाजसेनयी संहितेत कुंभाची तुलना मातेच्या उदराशी केलेली आहे याची आठवण होते. ऋग्वेदातही (I १६४, ३३) अशाच प्रकारे दोन कुंभांचे–एक नर व एक मादी–वर्णन येते तेही विशेष लक्षात घेण्याजोगे आहे. द्वैकुंभिक दफनामागेही याच तत्वांशी मिळतीजुळती मानसिकता दडलेली असणे असंभवनीय नाही.

## संस्कृतीचा उगम व उद्‌गाते

महाराष्ट्रात सापडलेल्या ताम्रपाषाणयुगीन संस्कृतींपैकी सावळदा संस्कृती सर्वाधिक प्राचीन, सर्वथा स्थानिक व इथेच उत्क्रांत झालेली आहे. तिच्याशी साधर्म्य दर्शविणारी सांस्कृतिक वैशिष्ट्ये इतरत्र कुठेच आढळलेली नाहीत. कावठे येथेही

स्थानिक वैशिष्ट्येच अधिक प्रमाणात परंतु त्यासोबत गुजरातमधील सिंधू संस्कृतीची प्रभावदर्शक लक्षणेही आढळतात. उत्तर सिंधू संस्कृतीचे लोक गुजरातमधून तापीच्या खोऱ्यात उतरले असावेत व नंतरही त्यांच्या काही वसाहती काही टराविक ठिकाणी टिकून राहिल्या असाव्यात असे दिसते. माळवा संस्कृतीचा उगम माळव्यात झाला. जोर्वे संस्कृतीच्या विकासात तिचा बराच मोठा वाटा होता. उत्तर जोर्वे संस्कृती हे पूर्व जोर्वेचेच अधोगत स्वरूप आहे.

या संस्कृतींच्या प्राप्त पुराव्यांच्या आधारे तत्कालीन लोक कोणत्या मानववंशाचे होते हे सांगणे फारच अवघड आहे. कावठ्याहून मिळालेल्या सांगाड्यांवरून तत्कालीन लोकांमध्ये प्रोटोऑस्ट्रलॉईड व मेडिटरेनियन वंशाचे मिश्रण आढळते व त्यांचा संबंध नेवासे येथून प्राप्त झालेल्या सांगाड्यांशी अधिक जवळचा आहे असे वाटते. नेवासे येथील सांगाड्यांमध्ये प्रोटोऑस्ट्रलॉईड वंशाची वैशिष्ट्ये अधिक प्रकर्षाने तर इनामगाव येथील सांगाड्यांमध्ये मेडिटरेनियन लक्षणे अधिक ठळकपणे आढळतात. उत्तर जोर्वे संस्कृतीतील लोक अधिक दणकट असावेत असे दिसते. कदाचित त्या काळात शेतीचे उत्पादन बेताचेच असल्यामुळे मांसाहारावरील भर वाढलेला असावा, म्हणून तत्कालीन लोक शरीराने दणकट झाले असावेत. असे असले तरी या काळात लोक कुपोषणाने पिडले होते असेही दिसते. मुलांमध्ये मुडदुसाचे प्रमाणही मोठ्या प्रमाणावर होते. वारंवार पडणारे दुष्काळ व त्यामुळे जीवनसत्वांची कमतरता हेच याचे कारण असावे. कवटीच्या हाडांची जाडी वाजवीपेक्षा अधिक असणे हे लक्षण हिवतापामुळे निर्माण होते. त्यावरून तत्कालीन लोक हिवतापाचेही शिकार झाले असावेत असे दिसते. लोहाच्या कमतरतेमुळे निर्माण होणारा रक्तक्षयही कवटीची हाडे जाड होण्याचे कारण असू शकते, परंतु येथे मात्र हिवतापाची शक्यताच अधिक वाटते. फार वजनाची ओझी वाहिल्यामुळे जडणारा सांधेदुखीचा विकारही काही उदाहरणांमध्ये आढळला. सर्वसाधारणपणे दातांचे आरोग्य बऱ्यापैकी होते.

## समारोप

ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्रकात नांदलेली जोर्वे संस्कृती सोडल्यास इतर सर्व ताम्रपाषाणयुगीन संस्कृती ख्रिस्तपूर्व १००० वर्षाच्या सुमारास पूर्णपणे लयाला गेलेल्या दिसतात. बहुधा हवामानातील वाढती शुष्कता हेच त्याचे कारण असावे. तापी व गोदावरीच्या खोऱ्यातील कित्येक ताम्रपाषाणयुगीन वसाहती या सुमारास उजाड झाल्या, त्या पुन्हा ऐतिहासिक काळात घडून आलेल्या नागरीकरणाच्या वेळीच म्हणजे पाच ते सहा शतकांचा कालावधी लोटल्यानंतर ख्रिस्तपूर्व ५ व्या ते ४ थ्या शतकातच वसविल्या गेलेल्या दिसतात. प्रकाशे, नेवासा, नाशिक इत्यादी स्थळांच्या उत्खननातील मधला खंड दर्शविणारा जो थर आहे त्यातील मातीच्या विश्लेषणावरूनही हेच सिद्ध होते. नेवासा येथील स्तरलेखातील मातीच्या नमुन्यांचे रासायनिक विश्लेषण केले असताना घटत गेलेल्या पर्जन्यमानाच्या निष्कर्षास पुष्टी मिळते. राजस्थानमधील

तळ्यांच्या गाळातील पराग विश्लेषण गुरुदीपसिंग यांनी केले असता त्यांनीही ख्रिस्तपूर्व १२०० च्या सुमारास शुष्क हवामानाचा काळ सुरू होत असल्याचाच निष्कर्ष काढलेला आहे.[१७] याच सुमारास म्हणजे ख्रिस्तपूर्व १००० वर्षापासून युरोपमध्ये अतिशीत हवामान सुरू झाल्याचा पुरावा आहे. पुराहवामान शास्त्रज्ञांमध्ये ख्रिस्तपूर्व दुसरे सहस्रक शुष्क हवामानाचे होते व ते संपतासंपता या शुष्कतेची तीव्रता प्रचंड प्रमाणात वाढली, या निष्कर्षास बहुमान्यता मिळालेली दिसते. पुरातत्वीय पुरावाही यास अनुमोदकच आहे. खझानोव्ह[१८] या विद्वानाच्या मते पुरातत्वीय व लिखित पुरावा यांच्या आधारे भटक्या जीवनाची सुरुवात मानवी इतिहासात ज्या सुमारास सुरू होताना दिसते तो काळ व शुष्क हवामानास सुरुवात झाली तो काळ यांची सांगड तंतोतंत जुळते. या वस्तुस्थितीस निव्वळ योगायोग म्हणता येणार नाही. शुष्क हवामान हा शेतीवर आधारित जीवन कायमचे त्यागून पूर्णतः भटके जीवन स्वीकारण्यास भाग पाडण्यामधील अंतिम महत्त्वाचा घटक असला पाहिजे.

अशा तऱ्हेने ताम्रपाषाणयुगीन आद्य शेतकऱ्यांच्या वसाहती निर्मनुष्य होण्यास हळूहळू कमी होत गेलेले पर्जन्यमान व सततचे दुष्काळ हेच कारणीभूत होते. इनामगाव येथे मात्र ख्रिस्तपूर्व ८०० वर्षापर्यंत लोक कसेबसे तग धरून राहिले होते असे दिसते. त्यानंतर मात्र शेळ्यामेंढ्याचे कळप घेऊन त्यांनीही वर्षातील काही काळ भटके जीवन स्वीकारले. थोड्याच अवधीनंतर दक्षिणेकडून आलेल्या महापाषाणयुगीन संस्कृतीच्या लोकांनी ताम्रपाषाणयुगीन भटक्यांची उरलीसुरली पाळेमुळेही उखडून काढली व ताम्रपाषाणयुगीन संस्कृती कायमची नामशेष झाली.

------

# तळटिपा

१ **इंडियन अँटिक्वरी,** खंड ५, पृ. ६७.

२ ढवळीकर, एम. के.; शिंदे, वसंत अॅण्ड अत्रे, शुभांगना, **एक्सकॅवेशन ॲट कावटे,** पुणे, १९९०.

३ साळी, एस. ए., **एक्सकॅवेशन ॲट दायमाबाद,** न्यू दिल्ली, १९८६.

४ कित्ता, चित्र ९, पृ. ८२-८३.

५ कित्ता, पृ. ८८.

६ **वेस्टर्न इंडिया–ए रिजनल जॉग्रफी,** धारवाड, १९४८, पृ. १४९.

७ काळे, व्ही. एस्. अॅण्ड राजगुरू, एस. एन., " लेट क्वाटर्नरी अॅल्युव्हियल हिस्टरी ऑफ द नॉर्थवेस्टर्न डेक्कन अपलॅण्ड ", **नेचर,** ३२५, १९८७, पृ. ६१२-१४.

८ ढवळीकर, एम. के.; शिंदे, वसंत अॅण्ड अत्रे, शुभांगना, "स्मॉल साईट आर्किऑलॉजी : एक्सकॅव्हेशन ॲट वाळकी ", **बुलेटिन ऑफ दि डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूट,** पुणे, खंड-५०, १९९०.

९ मजुमदार, जी. जी., " दि प्रॉब्लेम ऑफ ब्लॅक अॅण्ड रेड वेअर : ए टेक्नॉलॉजिकल ॲप्रोच ", नारायण, ए. के. (संपा.), **सेमिनार पेपर्स ऑन दि प्रॉब्लेम ऑफ मेगॅलिथ इन इंडिया,** वाराणशी, १९६९, पृ. ९०-९३.

१० सर्व्हिस, एलमन आर., **प्रिमिटिव्ह सोशल ऑर्गनायझेशन ॲन इव्होल्युशनरी परस्पेक्टिव्ह,** न्यूयार्क, १९७२, पृ. १३६.

११ कित्ता, पृ. १४४.

१२ ढवळीकर, एम. के., " शाकंभरी : दि हेडलेस गॉडेस ", **ॲनल्स ऑफ दि भांडारकर ओरिएण्टल रिसर्च इन्स्टिट्यूट,** पुणे, खंड ६८, १९८७, पृ. २९१-९३.

१३ ढेरे, रा. चिं., **लज्जागौरी,** पुणे, १९७८.

१४ बॅरट, डग्लस, " ॲन अर्ली इंडियन टॉय ", **ओरिएण्टल आर्ट,** खंड ४, १९५८.

१५ मार्शल, जॉन, **मोहेंजोदारो अॅण्ड दि इंडस् सिव्हिलायझेशन,** लंडन, १९३१, खंड २, पृ. ३६५; खंड ३, चित्र ११६, १४ आणि ११८, १०.

१६ मॅकाय, अर्नेस्ट, **फर्दर एक्स्कॅवेशन ॲट मोहेंजोदारो,** दिल्ली, १९३८, खंड १, पृ. ३५७, खंड २, चित्र ९१, १३ आणि १९.

१७ " इंडस् व्हॅली कल्चर ॲज सीन इन दि कॉन्टेक्स्ट ऑफ पोस्टग्लेशियल क्लायमॅटिक ॲण्ड इकॉलॉजिकल स्टडिज इन नॉर्थवेस्ट इंडिया ", **आर्किऑलॉजी ॲण्ड फिजिकल ॲन्थ्रॉपॉलॉजी इन ओशेयानिया,** खंड ६, १९७१, पृ. १७७-८९.

१८ खझानोव्ह, ए. एम्., **नोमॅडिझन ॲण्ड आऊटसाईट वर्ल्ड,** केंब्रिज, १९८६, पृ. ९५.

---

## प्रकरण ४

# महापाषाणयुग *

**म**हापाषाणयुग हा शब्द सकृतदर्शनी पूर्व पाषाणयुग, मध्य पाषाणयुग व उत्तर पाषाणयुग यांच्याच वर्गातला वाटत असला, तरी त्यांची उपपत्ती मात्र एकमेकांहून भिन्न आहे. मूळ "पाषाणयुग" ही संज्ञा व विभागशः कालानुक्रम दर्शविणाऱ्या "पूर्व", "मध्य" व "उत्तर" या विशेषणात्मक संज्ञांचा संबंध विशेषत्वाने आदिम मानवाच्या संस्कृतीशी अधिक आहे. त्याने उपयोगात आणलेल्या दगडी हत्यारांच्या वर्गीकरणाची माहिती त्यामधून मिळते. महापाषाणयुगाचा अर्थ मात्र कालानुक्रम व तंत्रज्ञान यापेक्षा प्राचीन मानवी संस्कृतीच्या दुसऱ्याच एका ठळक वैशिष्ट्याशी निगडित आहे. Megalith या इंग्रजी शब्दाचा महापाषाण हा शब्दशः अर्थ होय. Megas म्हणजे मोठा, Lithos म्हणजे पाषाण. ज्या महापाषाणांवरून महापाषाणयुगीन असे नाव या विशिष्ट संस्कृतीला दिले गेले, ते महापाषाण मृत व्यक्तींच्या थडग्यांवर त्यांच्या स्मरणार्थ उभे केलेले आढळतात. असे असले तरी, केवळ मोटमोठे दगड वापरून उभी केलेली स्मारके एवढ्यापुरताच "महापाषाणीय" या संज्ञेचा अर्थ मर्यादित नाही. या संज्ञेने एका विशिष्ट संस्कृतीचा निर्देश केला जातो. अन्यथा इजिप्तच्या पिरॅमिडसूची गणनाही "महापाषाणीय" स्मारकांमध्ये करावी लागली असती.

महापाषाणीय स्मारके युरोप आणि आशिया खंडांमध्ये अनेक ठिकाणी निदर्शनास आलेली आहेत. विशेषतः पश्चिम व मध्य युरोप, इराण, पाकिस्तान, भारत, आग्नेय आशियातील देश; इतकेच काय, जपानमध्येही या प्रकारची स्मारके आहेत. यातील सर्वाधिक प्राचीन स्मारके पश्चिम युरोपमध्ये आहेत. इंग्लंडमधील महापाषाणीय स्मारकांचा काळ ख्रिस्तपूर्व चौथ्या सहस्रकाइतका प्राचीन आहे, तर जपानमधील स्मारके ख्रिस्ताब्दाच्या सुरुवातीनंतरच्या शतकातील आहेत. ख्रिस्ताब्दाच्या सातव्या शतकात काढण्यात आलेल्या एका राजाज्ञेनुसार महापाषाणीय स्मारके उभारण्यासाठी होणारा आर्थिक व वेळेचा अपव्यय लक्षात घेऊन त्यावर बंदी घालण्यात आली.

भारतामध्येही अनेक ठिकाणी महापाषाणीय स्मारके विखुरलेली आहेत. तरीही मध्य व दक्षिण भारतातील त्यांची संख्या अधिक आहे. उत्तर भारतातील, विशेषतः उत्तर प्रदेशातील महापाषाणीय स्मारके ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्रकाइतकी प्राचीन व ताम्रपाषाणयुगाशी समकालीन आहेत. मध्य व दक्षिण भारतात ती लोहयुगीन संस्कृतीशी निगडित असून ख्रिस्तपूर्व पहिल्या सहस्रकातील आहेत.

महापाषाणीय स्मारकांसंबंधीचे भारतातील संशोधनकार्य इ. स. १८२३ मध्ये सुरू झाले. त्याचे सर्वप्रथम श्रेय बॅबिंग्टन यांनी "ट्रॅन्झॅक्शन्स् ऑफ दि लिटररी सोसायटी

---

* या प्रकरणाचे लेखन डॉ. म. के. ढवळीकर, (निवृत्त संचालक, पुरातत्व विभाग, डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे) यांनी केलेले आहे.

ऑफ बॉम्बे'' या ग्रंथात प्रसिद्ध केलेल्या ''दि पांडू कुलीज ऑफ मलबार'' या लेखास जाते. त्यानंतर महापाषाणीय स्मारकांसंबंधी फार मोठ्या प्रमाणावर लिखाण केले गेले. गेल्या दीड शतकाच्या अवधीत १,५०० हून अधिक महापाषाणीय स्थळे उजेडात आली. दक्षिण भारतातील त्यांची संख्या फार मोठी आहे. मात्र यातील विचित्र बाब अशी की, या स्थळांच्या जवळपास गावे किंवा वसती होती याचा पुरावा मात्र केवळ अशा ३५ ठिकाणीच मिळतो. महाराष्ट्रात विदर्भामध्ये, विशेषतः नागपूर, चंद्रपूर व भंडारा या जिल्ह्यांत महापाषाणीय स्मारके आढळलेली आहेत (आकृती १). विदर्भामध्ये एकूण ९१ स्थळे आतापर्यंत मिळालेली असून फक्त चारच वसाहतींच्या बाबतीत त्यांच्या परिसरातील महापाषाणीय स्मारकांशी त्या सांस्कृतिकदृष्ट्या संलग्न होत्या असे म्हणता येते. इतर जिल्ह्यांमध्ये ती क्वचितच दिसतात. इनामगाव व भोसरी, रांजळा (जिल्हा धुळे) येथील महापाषाणीय स्मारकांचा त्यामध्ये उल्लेख करावा लागेल. इनामगाव वगैरे ठिकाणच्या महापाषाणीय स्मारकांच्या उत्खननात महापाषाणीय संस्कृतीचे वैशिष्ट्य मानली जाणारी काळी आणि तांबडी मृद्‌भांडी मिळाली. विदर्भातील नागपूर जिल्ह्यामधील एकट्या खैरवाड्याहून १,४९६ महापाषाणीय स्मारकांची नोंद झालेली आहे.

दक्षिण भारतात महापाषाणीय स्मारकांची अनेक स्थळे शोधून काढण्यात आली होती. परंतु त्यांचा समग्र अभ्यास मात्र व्ही. डी. कृष्णस्वामींनी प्रथम केला.[१] त्यांनी खालील प्रकारांमध्ये त्यांची वर्गवारी केली.

१. अस्थिकुंभ .............................. (Urn burials)
२. खड्ड्यातील दफन .................... (Pit circles)
३. सिस्ट–पेटिका (जमिनीखालील) ...... (Cists)
४. डॉलमेन–पेटिका (जमिनीवरील) ... (Dolmens)
५. गुंफा .................................. (Rock–cut chembers)
६. टोपीकल .............................. (Topikal orhood–stones)
७. मेनहिर ................................ (Menhirs)
८. शिळावर्तुळ ............................ (Stone–circles)
९. शव पेटिका .......................... (Sarcophage)

अधिक पहाणीनंतर असे लक्षात आलेले आहे की, टराविक भागात टराविक प्रकारची स्मारके अधिकांशाने आढळतात.

महाराष्ट्रात विदर्भामध्ये फक्त शिळावर्तुळेच आढळतात (आकृती २). यामध्ये मूळ थडग्याभोवती मोटमोठ्या अवघड शिळावर्तुळाकृती रचलेल्या असतात. अशा प्रकारे तयार केलेल्या वर्तुळाचा व्यास १० ते ३० मी. इतका कमी--अधिक असतो. वर्तुळाची मधली जागा मृत व्यक्तीचे अवशेष पुरण्याकरिता वापरलेली असते. अशा दफनांची

सहसा आढळणारी रीत अशी–मृत व्यक्तीस किंवा तिच्या अस्थी व इतर वस्तू पुरण्यासाठी पुरेसा होईल एवढाच खोल खड्डा खणण्यात येई. खड्ड्यात मृत शरीर किंवा अस्थिकुंभ व त्यासोबत बरीच मृत्तिकापात्रे ठेवण्यात येत. या पात्रांमधून बहुधा मृतात्म्यासाठी अन्नपाणी ठेवत असावेत. याखेरीज कुऱ्हाडी, तलवारी, खंजिर, भालाग्रे, घोड्याचे अलंकार यासारख्या लोखंडी वस्तूही ठेवल्या जात. अशा रीतीने पूर्ण सामग्री ठेऊन झाली की, खड्डा मातीने बुजविला जाई व त्यावर दगडधोंडे, माती यांचा एक ढिगारा रचला जाई आणि त्याच्या भोवती थडग्याची जागा आखण्यासाठी शिळावर्तुळ उभे केले जाई.

विदर्भातील अशा काही स्थळांचे शास्त्रपूर्ण उत्खनन करण्यात आलेले आहे. त्यामध्ये टाकळघाट, खापा, माहुरझरी, नायकुंड, भागी-मारी, रायपूर इत्यादी स्थळांचा उल्लेख करावा लागेल. इनामगाव येथेही एका शिळावर्तुळाचे उत्खनन केले गेले. महाराष्ट्रातील आद्य शेतकऱ्यांच्या ऱ्हासानंतर आलेल्या, किंबहुना त्यांच्या ऱ्हासास काही अंशी कारणीभूत झालेल्या लोहयुगीन संस्कृतीच्या लोकजीवनावर या उत्खननांमुळे बराच प्रकाश पडलेला आहे.

खड्ड्यामध्ये मृत व्यक्तीस नेमके कोणत्या दिशेने ठेवावे याबाबत काही निश्चित संकेत नसावा. फारच थोड्या उदाहरणांमध्ये माहुरझरीसारख्या ठिकाणी पूर्व--पश्चिम दिशेत मृत शरीर पुरलेले आढळले. काही वेळेस एकाच खड्ड्यात एकापेक्षा अधिक सांगाडे मिळाले. माहुरझरी येथे अशा प्रकारच्या तीन खड्ड्यांमध्ये दोन--दोन मृत व्यक्तींना पुरल्याचे दिसून आले. असे असले तरी, दोन्ही व्यक्ती एकाच वेळेस की कालांतराने पुरल्या गेल्या याबाबत काही सांगता येत नाही. एकाच खड्ड्यात, परंतु कालांतराने त्या दोन व्यक्तींना मृत्यूनंतर पुरण्यात आले असेल, तर त्या दोन्ही व्यक्ती एकाच कुटुंबातील होत्या असे म्हणण्यास काही प्रत्यवाय नाही. माहुरझरी येथील महापाषाणीय दफनविधीमधील विशेष उल्लेखनीय गोष्ट म्हणजे मृत व्यक्तीच्या शरीरावर व खड्ड्यामध्ये त्यांच्या आसपास लाल माती हेतुपुरस्सर पसरलेली आढळली.

माहुरझरीच्याच महापाषाणीय स्मारकांबद्दल आणखी सांगायचे, तर मृतांबरोबर पुरल्या गेलेल्या सामग्रीच्या दृष्टीने ती विदर्भातील सर्वाधिक समृद्ध दफने होत. त्यामध्ये सुवर्णालंकारांचा समावेश तर होताच, परंतु मृत व्यक्तींसोबत घोडाही पुरत असत याची साक्ष मिळते. नागपूर जिल्ह्यातील बोरगाव येथेही मानवी हाडांसोबत घोड्याची हाडे मिळाली. विशेष म्हणजे ही हाडे दगडातून कोरून काढलेल्या एका प्रचंड डोणीमध्ये सापडली. वर्धा जिल्ह्यातील खैरवाडा येथे थडग्यांमध्ये मिळालेल्या मृत्तिकापात्रांच्या विश्लेषणाच्या आधारे महापाषाणीय संस्कृतीची पूर्व व उत्तर अशी कालविभागणी करणारा पुरावाही पुढे आलेला आहे.

नागपूर जिल्ह्यातील भागी--मारी येथील एका महापाषाणीय स्मारकाच्या उभारणीमध्ये डबर वापरून केलेल्या विशेष रचनेचा अवलंब केलेला आढळला. एका उदाहरणात प्रत्येकी तीन चौरस मीटर क्षेत्रफळाच्या दोन खोल्या व पूर्व-पश्चिम दिशेने एक मार्ग

बांधलेला होता. मध्यभागी एक मीटर व्यासाचे दक्षिणेकडे उघडणारे एक शिळावर्तुळ होते. रायपूर येथे मिळालेल्या हौदासारख्या रचनेची ही नांदी असावी. रायपूर येथे एका शिळावर्तुळाच्या मध्यभागी एका हौदाची रचना आढळते. अशा एका उदाहरणात एका हौदात तीन मृत व्यक्तींचे अवशेष मिळाले. रायपूर येथेच एका शिळावर्तुळाच्या मध्यभागी मोठमोठ्या शिळांच्या आधारे १४० सें. मी. लांबीची, १२५ सें. मी. रुंदीची व १६० सें. मी. खोलीची एखाद्या बंद खोलीसारखी रचना केलेली होती. या शिळांच्या आतल्या बाजूचा खडबडीतपणा टाकी मारून काढून टाकलेला होता; मात्र खोलीच्या आत काहीही मिळाले नाही. बऱ्याच ठिकाणी, उदाहरणार्थ जुनापाणी व रायपूर येथील शिळांवर वाडग्यांच्या आकाराचे छप्पे कोरलेले आढळले. त्यांचा अन्वयार्थ लागणे कठीण असले, तरी युरोपमधील महापाषाणीय स्मारकांसाठी वापरलेल्या शिळांवरही असे छप्पे आढळलेले आहेत या गोष्टीचा इथे आवर्जून उल्लेख करावयास हवा.

## संस्कृतीच्या वसाहती

सुरुवातीला एक गोष्ट स्पष्ट करणे आवश्यक आहे की, महापाषाणीय स्मारकांशी संबंधित लोकांच्या वसाहतींची स्थळे मात्र तुलनेने फारच कमी आहेत. त्यामुळे महापाषाणीय लोकांच्या जीवनपद्धतीबद्दल ते कशा प्रकारचे जीवन जगत होते असा प्रश्न निर्माण होतो. त्यांच्या वसाहती सर्वत्र आढळत नसल्याने ते निमभटके जीवन जगत असावेत असा निष्कर्ष काढला तर ते वर्षातील काही काळ आपला तळ कोठे ठोकत असावेत याचे उत्तर शोधणे क्रमप्राप्त होते. विदर्भामधील ९१ महापाषाणीय स्थळांमध्ये फक्त चार ठिकाणी वसाहतीचा पुरावा मिळालेला आहे. याचा उल्लेख पूर्वी केलेला आहेच; त्यामुळे या समस्येवर अधिक संशोधन होणे आवश्यक आहे.

टाकळघाट, नायकुंड, भागी--मारी आणि रायपूर या चार ठिकाणच्या शास्त्रीय उत्खननात मुद्दाम तयार केलेल्या जमिनींसह राहत्या घरांचे पुरावे मिळाले असले, तरी फक्त नायकुंड येथेच घराचा पूर्ण आलेख उजेडात आलेला आहे. या घरांच्या जमिनी पिवळसर माती चांगली चोपून बनविलेल्या व चुन्याने सारविलेल्या असत. नायकुंड येथील पुराव्यांवरून ही घरे म्हणजे आयताकृती व गोल झोपड्या असाव्यात असे दिसते. उत्खननात एका घराची जमीन अंशतः (६.५ x ४ मी.) अनावृत्त करता आली. त्यावरून ते आयताकृती होते असे दिसते. दुसऱ्या एका गोल (४.९ मी. व्यास) झोपडीचा भू-आलेख उत्खननाद्वारे स्पष्ट झाला. या झोपडीच्या परिघाभोवती आधारासाठी रोवलेल्या खांबांचे खळगे होते. त्यापैकी काहींमध्ये तर लाकडी खांबांचे अवशेषही मिळाले. परिघाच्या बाहेरच्या खळग्यांबरोबरच परिघाच्या आतील बाजूसही तसेच खळगे होते. उत्खनकाच्या मते[२] झोपडी उभारल्यानंतर कालांतराने खांब बदलण्याची गरज निर्माण होत असली पाहिजे. अशा वेळेस झोपडी सावरून धरण्यासाठी आतील बाजूस खांब रोवून मगच बाहेरचे खांब काढत असावेत किंवा छप्पर खाली खचू लागल्यास त्याला वाढीव आधार देण्यासाठी मूळ खांबांच्या जवळच, पण भिंतीच्या आतील बाजूने खांब रोवत असावेत.

नायकुंड येथील गोल झोपडीमध्ये वरवंटे व मध्यभागी जांळ पेटविण्यासाठी तयार केलेला खड्डा होता. हा खड्डा अंडाकृती (७० x ३० सें. मी.) व राखेने पुरेपूर भरलेला होता. झोपडीच्या आतल्या बाजूस आणखी दोन खड्डे होते. त्यात गुरे, शेळ्यामेंढ्या, हरिण व डुकराची हाडे होती. काही हाडे अर्धवट जळालेली होती. तिथेच टोकाशी थोडासा फुगीर असलेला एक दगडी बत्ता व गव्हाचे थोडे जळके दाणे पडलेले होते. भागी-मारी येथे एक नालाकृती चूल मिळाली. धान्याच्या साठवणीसाठी मातीच्या बनविलेल्या कणग्याही येथे मिळाल्या.

या पुराव्यांवरून असे दिसते की, महापाषाणीय लोक आयताकृती व गोल झोपड्यांमधून रहात असत. या संदर्भात मानववंश शास्त्रज्ञांचे एक निरीक्षण लक्षात घेण्याजोगे आहे. असे आढळून आलेले आहे की, सहसा स्थिर जीवन जगणाऱ्या लोकांची प्रवृत्ती आयताकृती घरे बांधण्याकडे असते, त्याउलट निमभटके लोक मात्र गोल झोपड्या बांधतात.[३]

या महापाषाणीयांच्या वसाहती अगदीच छोट्या नव्हत्या हेही विशेष महत्त्वाचे आहे. टाकळघाटच्या महापाषाणीय वसाहतीचा विस्तार २२,५०० चौं. मी., तर नायकुंडचा १,००,००० चौं. मी., खैरवाड्याचा १,०७,००० चौं. मी. व भागी--मारीचा ८२,००० चौं. मी. इतका होता. या चार स्थळांखेरीज इतर ठिकाणी वसाहतींच्या जागा सापडलेल्या नसल्या तरी निव्वळ स्मशानभूमीच सापडलेली आहे अशी आणखी ९१ स्थळे आहेत. महापाषाणीय कालखंडाच्या प्राचीनत्वाचा विचार केल्यास या वसाहती तुलनेने फारच मोठ्या होत्या असे म्हणावे लागेल. या वसाहतींमधील लोकसंख्येबद्दल अंदाज बांधण्याच्या काही शास्त्रीय पद्धती आहेत. त्यानुसार टाकळघाटची लोकसंख्या सुमारे ६००, नायकुंडची २,५००, खैरवाड्याची २,५०० व भागी--मारीची २,००० होती असे अनुमान करता येते. सर्वसाधारणपणे एका एकरास १०० माणसे याप्रमाणे हे अनुमान बांधलेले आहे.[४] नायकुंड व खैरवाडा ही गावे त्या काळाच्या मानाने फारच मोठी असली पाहिजेत. विद्वानांच्या प्रचलित मतानुसार महापाषाणीय लोक जर भटके जीवन जगणारे होते, तर त्यांची एवढी कमी व आकाराने मोठी खेडी कशी प्रस्थापित होऊ शकली असा मोठाच प्रश्न निर्माण होतो. त्यामुळे असे म्हणावे लागेल की, तथाकथित महापाषाणीय खेडी ही वास्तवात महापाषाणीयांच्या समकालीन लोहयुगीन, परंतु स्थिर जीवन जगणाऱ्या लोकांची असण्याची दाट शक्यता आहे. खेड्यांमधील मूळ रहिवाशांबरोबर निमभटक्या महापाषाणीय लोकांचे परस्परावलंबी संबंध निर्माण होऊन वर्षातील काही काळ त्यांचे तळ या खेड्यांमध्ये पडत असावेत.

विदर्भ आणि आंध्र प्रदेशातील कोलाम लोकांचे उदाहरण या संदर्भात लक्षणीय ठरेल,[५] कोलाम ही शिकार व जुजबी शेती यावर उदरनिर्वाह करणाऱ्या निमभटक्या लोकांची जमात आहे. ज्या खेड्यात काही काळ मुक्काम ठोकायचा त्याच्या प्रमुखाकडे

जाऊन कोलाम मंडळी जागेची विचारणा करतात. सहसा त्यांना गावापासून थोडे दूर टेकडीच्या उतारावरची किंवा माळरानाची जागा वस्तीसाठी दिली जाते. हेतू हा की, लागवडीखालची जमीन कमी होऊ नये. गावाकडून मिळालेल्या जागेवर कोलाम आपली खोपटी उभी करतात व एका जागी ४–५ वर्षांसाठी स्थिरावतात. त्यांच्या जवळची साधनसामग्री बेताचीच म्हणजे काही ताटल्या, भांडी यापुरतीच मर्यादित असते. ४–५ वर्षांच्या वास्तव्यानंतर त्यांची वस्ती उठली की, थोड्याच अवधीत तिथल्या खाणाखुणा पुसल्या जातात. परंतु जोपर्यंत वस्ती उभी असते तोपर्यंत गावातल्या लोकांशी त्यांची देवाणघेवाण सुरू असते. महापाषाणीय काळात असेच काहीसे घडले असावे. महापाषाणीय संस्कृतीचे लोक कुशल लोहार होते. ते गावातील लोकांना लोखंडी हत्यारे पुरवित असावेत व त्या बदल्यात गावातील लोकांकडून त्यांना मातीची भांडी मिळत असावीत. हीच भांडी त्यांनी दैनंदिन व्यवहारासाठी व मृतांच्या दफनसमयी वापरली. असेच घडले असल्यास गाव व महापाषाणीय थडग्यांच्या उत्खननातून मिळणाऱ्या मृत्तिकापात्रांच्या एकसारखेपणाचे कोडे आपोआपच उलगडते. तथापि, नेमके काय घडले हे समजण्यासाठी महापाषाणीय थडगी व वसाहती या दोहोंवर अधिक संशोधन होणे आवश्यक आहे.

**आहार :** महापाषाणीय लोक फक्त पावसाळ्यापुरते एका ठिकाणी वस्ती करून राहत. उरलेल्या आठ महिन्यात मात्र भटके जीवन जगत असावेत, कारण उदरनिर्वाहासाठी ते पशुपालन व मेंढपालनावर अवलंबून होते. ते अन्नासाठी स्वतःजवळच्या कळपातील गायीगुरे, म्हशी, शेळ्या-मेंढ्यांची गरजेनुसार कत्तल करीत हे दर्शविणारा पुरावा उपलब्ध आहे. पण त्याचबरोबर शिकार करून आणलेल्या प्राण्यांचा आहारासाठी मोठ्या प्रमाणावर वापर करीत. या प्राण्यांमध्ये हरिण, रानडुक्कर, ससे इत्यादींचा समावेश होता, हे त्यांच्या मिळालेल्या अस्थी-अवशेषांवरून सांगता येते. मासेमारीचाही पुरावा मिळालेला आहे.

महापाषाणीय लोकांनी थोड्या प्रमाणात शेतीचाही अवलंब केला. वाटाणा, उडीद, गहू, कुळीथ, यांचे जळके दाणे व बोराच्या बिया नायकुंड येथे, तर सातू, उडीद, कुळीथ भागी-मारी येथे मिळाले. भागी-मारी येथे मिळालेल्या भाताच्या दाण्याबद्दल मात्र निश्चित काही सांगता येत नाही. धान्यकणांखेरीज या ठिकाणांच्या उत्खननातून भिन्न प्रकारांचे व आकारांचे वरवंटेही प्राप्त झालेले आहेत. येथे मिळालेले धान्यकण जळालेले का आहेत याचे थोडे स्पष्टीकरण देणे आवश्यक आहे. या काळात लोकांना जात्याच्या उपयोगाचे ज्ञान नसल्यामुळे धान्य भरडून बारीक करण्यासाठी त्यांना ते वरवंट्याने रगडणे एवढेच करण्यासारखे होते. धान्य भाजून घेतल्यास त्यातील पाण्याचा अंश कमी होऊन ते रगडून बारीक करणे सोपे होते. असे करताना धान्यातील जे दाणे जळले ते वेचून बाजूला फेकले गेले. प्राचीन स्थळांच्या उत्खननात जळालेले धान्यकण मिळतात ते त्यामुळेच. जळलेले धान्य अर्थातच यातील पाण्याचा अंश पूर्ण नष्ट झालेला असल्यामुळे न सडता टिकून राहते.

**पशुधन :** विदर्भातील काही महापाषाणीय थडग्यांमधून घोड्यांची हाडे मिळाली; तर टाकळघाट, नायकुंड यासारख्या वसाहतींच्या ठिकाणांहून गार्यीगुरे (Bos-Indicus), म्हशी (Babalns bubalis), मेंढ्या (Ovis vignei), शेळ्या (Capra hircus), कुत्री (Canis familiaris), डुकरे (Sus serofa व Cristatus) इत्यादी पाळीव प्राण्यांची हाडे मिळाली. याखेरीज उंदीर-घूस (Rattus rattus) व कोंबड्यांचीही हाडे मिळालेली आहेत. रानटी प्राण्यांमध्ये चितळ (Axis-axis), सांबर (Cervus Unicolor), रानडुक्कर व शेळ्या-मेंढ्यांच्या काही रानटी जातींचा समावेश आहे. महत्त्वाची बाब अशी की, मिळालेल्या अस्थींमध्ये फक्त सस्तन प्राण्यांचा समावेश असून ते फक्त मांसासाठीच मारले गेलेले आहेत याबद्दल फारशी शंका नाही. कारण बहुतेक सर्व प्राण्यांवर सुरीच्या खुणा आहेत. एवढेच नव्हे, तर त्यातील काही अर्धवट जळालेली हाडे या जनावरांचे मांस शिजवले गेल्याचा पुरावा देतात. काही हाडे फोडून आतला मगजही खाल्ल्याच्या खुणा मिळतात. काही हाडे चांगल्या प्रकारे उकळून, चावून फोडलेली असावीत. काहीजण फक्त दुभागलेली हाडेच फोडून, भाजून मांस खाणे पसंत करीत. लांब हाडाचे टोकाकडचे जाळीदार भाग यात आहेत. शिंपल्यांसारख्या सागरी अन्नाचाही त्यांच्या आहारात समावेश होता.

महापाषाणीय स्थळांमधून मिळालेल्या पुराव्यांनुसार तत्कालीन प्राणीसंपत्तीमध्ये गार्यीगुरांचा समावेश सर्वाधिक होता. एकूण प्राणीसंख्येत त्यांचे प्रमाण दोनतृतीयांश होते. यामध्ये फक्त मोठी झालेली जनावरेच अन्नासाठी मारत होते. बैल शेतकामासाठी अवजारांना जुंपले गेले असले तरी अशा बैलांना होणाऱ्या अस्थी विकारांच्या खुणा महापाषाणयुगीन बैलांच्या हाडांवर आढळल्या नाहीत. साधारण दोन-तीन वर्षांच्या शेळ्या-मेंढ्या मारल्या जात. म्हशींच्या हाडांच्या प्रमाणावरून त्यांचे छोटे कळप पाळले जात होते असे दिसते. पण त्यांचे मांस खाल्ले जात होते असे दिसत नाही. कारण त्यांच्या हाडांवर छाटल्याच्या खुणा नाहीत. कदाचित त्यांचा उपयोग छोटी-मोठी ओझी ओढण्यासाठी केला गेला असेल. विशेष गोष्ट अशी की, प्राण्यांच्या हाडांमध्ये रोगट जनावरांची हाडे अजिबात नाहीत.

विदर्भातील महापाषाणीय स्मारकांचे एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांच्या मधील काहींमध्ये पाळीव घोड्यांची हाडे (Eqqus caballus Linn) मिळाली; एवढेच नव्हे तर खापासारख्या ठिकाणी घोड्याचे अलंकारही मिळाले. परंतु ही गोष्ट सरसकट प्रत्येक शिळावर्तुळात आढळणारी नाही. खापा येथेसुद्धा फक्त एकाच थडग्यात घोड्याच्या अस्थी मिळाल्या. हे शिळावर्तुळ खापा येथील शिळावर्तुळांमध्ये सर्वात मोठे आहे. नायकुंड व माहुरझरी येथेही अशीच स्थिती आढळली. माहुरझरीच्या उत्खनन केलेल्या एकूण १२ शिळावर्तुळांपैकी फक्त चारमध्येच घोड्याचे अवशेष होते. यावरून असे दिसते की, फक्त जमातीचा नायक किंवा दुसरी एखादी अतिशय महत्त्वाची व्यक्ती असेल, त्यांनाच घोडा बाळगणे व त्या व्यक्तींच्या मृत्यूनंतर त्यांचा बळी देणे शक्य होत असेल. पी. के. थॉमस यांनी घोड्यांच्या या अवशेषांची पहाणी

केली तेव्हा त्यांना असे आढळले की, बहुतेक उदाहरणांमध्ये घोड्याच्या डोक्याकडच्या भागाखेरीज इतर हाडे गायब होती. अशी शक्यता आहे की, या इतर हाडांवरचे मांस खाऊन उरलेली हाडे इतरत्र फेकून दिली गेली असावीत.

खापा येथील काही उदाहरणांमध्ये थडग्याच्या आत फक्त प्राण्यांची हाडेच मिळाली. त्यामुळे असे सुचविले गेले की, या थडग्यांमधून फक्त मृत प्राण्यांचेच दफन केलेले असावे. पण अशा ठिकाणी सांकेतिक दफनाची शक्यता अधिक वाटते. एखादी व्यक्ती लढाईत वा हिंस्त्र श्वापदास बळी पडल्याने त्याचे शव मिळविता येणे अशक्य झाल्याने, परंतु ती जमातीतील महत्त्वाची व्यक्ती असल्यास व दफनविधी पार पाडणे आवश्यक असल्यास, काही सांकेतिक विधी पार पाडत असावेत. अशा थडग्यांमध्ये प्रत्यक्ष मृत व्यक्तीचे अवशेष नसले तरी त्याच्याशी संबंधित वस्तू, प्राणी पुरले गेले असल्याची शक्यता नाकारता येत नाही.

## मृत्तिकापात्रे

**काळी आणि तांबडी भांडी** (Megalithic Black and Red Ware) : महापाषाणीय थडग्यांमध्ये वैशिष्ट्यपूर्ण मृत्तिकापात्रे (मृद् भांडी) मिळालेली आहेत. त्यामध्ये मातीची काळी आणि तांबडी भांडी विशेष लक्षणीय आहेत. पूर्वी या प्रकारची भांडी फक्त दक्षिण भारतातील महापाषाणीय स्मारकांशीच संबंधित असल्याचा समज होता; पण आता हे पक्के ज्ञात झालेले आहे की, देशाच्या इतर भागातही ही भांडी मिळतात; इतकेच नव्हे तर ख्रिस्तपूर्व तिसऱ्या सहस्रकातही म्हणजे सिंधू संस्कृतीच्या काळापासून ती प्रचलित होती. असे असले तरी महापाषाणीय काळातील काळी आणि तांबडी भांडी पोत, आकार व भांड्यांची बाहेरील बाजू या सर्व दृष्टीने इतर ठिकाणच्या व इतर काळातील काळ्या आणि तांबड्या भांड्यांहून भिन्न, स्वतःचे वैशिष्ट्य असलेली व सहज ओळखण्याजोगी असतात. त्यांचा पोत उत्तम व पृष्ठभाग व्यवस्थित घासून गुळगुळीत केलेला असतो. बऱ्याचदा त्यावर बाहेरील बाजूने चिरा गेलेल्या आढळतात. त्या बहुधा मीठाच्या सहाय्याने चकाकी आणण्याच्या प्रक्रियेमुळे पडत असाव्यात. भांडी फिरत्या, गतिमान चक्रावर बनविलेली व उत्तम तऱ्हेने भाजलेली आणि भाजून झाल्यावर चमक येण्यासाठी घासलेली दिसतात. सहसा त्यांच्यावर रंगीत नक्षी किंवा कसलीच सजावट नसते. क्वचितच भांड्याच्या गळ्यावर किंवा त्याखाली कळत नकळत सरळ रेषेत खांचा ओढलेल्या असतात, तेवढाच काय तो सजावटीचा प्रयत्न. यास अपवाद फक्त दक्षिण भारतातील काही महापाषाणीय स्मारकांचा असून येथील भांड्यांवर पांढऱ्या रंगाचे नक्षिकाम आहे.

महापाषाणीय काळी आणि तांबडी भांडी अनेक आकारांमध्ये घडविलेली असून त्यामध्ये अधिक प्रमाणात विविध प्रकारचे वाडगे, ताटल्या, थाळ्या यांचा समावेश आहे. फुगीर अंगाची गाडगी किंवा उथळ भांडी अल्प प्रमाणात आढळतात. भांडी

ठेवण्यासाठी डमरुसारख्या आकाराच्या बसक्या किंवा उभट टाणवयांची (स्टँड) संख्या बरीच आढळते. क्वचितच अर्धवट उमललेल्या कमलकळीच्या आकाराची भांडी, नरसाळ्याच्या आकाराची झाकणे व चार पायाच्या साठवणीच्या कोठ्या यांचाही समावेश आहे. वर वर्णन केलेली ही दुर्मिळ आकाराची भांडी विशिष्ट प्रदेशातील विशिष्ट प्रकारच्या थडग्यांशीच निगडित आहेत. याचाच अर्थ असा की, महापाषाणीय संस्कृतीच्या लोकांमध्येही त्यांच्यातील भिन्न समुहाच्या वापरात स्वतःचे वैशिष्ट्य दर्शविणारे भांड्यांचे स्वतंत्र आकार प्रचलित होते. प्रत्येक समुहाच्या स्वतंत्र रीती होत्या. हे नीलगिरी प्रदेशातील महापाषाणीय स्मारकांमधील काळ्या आणि तांबड्या भांड्यांच्या असलेल्या संपूर्ण अभावावरून दिसून येते. दक्षिण भारताच्या तुलनेत विदर्भातील महापाषाणीय स्मारकांमधून मिळणारी काळी आणि तांबडी मृत्तिकापात्रे अधिक भरड पोताची व कमी सुबक आढळतात.

**काळी आणि तांबडी मृत्तिकापात्रे घडविण्याचे तंत्र :** काळी आणि तांबडी मृत्तिकापात्रे घडविताना त्यात विशिष्ट प्रकारचा रंग कसा उतरविला जातो, यासंबंधी जो महत्त्वाचा वाद आहे, तो त्याच्या तंत्राबाबतचा. बऱ्याच वर्षापूर्वी गॉर्डन चाईल्ड[६] या विद्वानाने मांडलेल्या मतानुसार ही भांडी विशिष्ट पद्धतीने भाजण्यात आलेली असल्यामुळे त्यांची आतील बाजू व काठाचा रंग काळा, व उर्वरित बाहेरच्या भागाचा रंग लाल दिसतो. भाजतांना भांडी भट्टीमध्ये पालथी रचलेली असल्यास ज्या भागास प्राणवायू पुरेसा मिळत नाही तो काळा होतो व जेथे तो पुरेसा मिळतो तो भाग चांगला लाल भाजला जातो. गॉर्डन चाईल्डचे हे मत भारतातील विद्वानांनी जसेच्या तसे गृहीत धरले. परंतु ल्युकसने प्रयोग व प्रयोगशाळेतील इतर चाचण्यांद्वारे हे मत अमान्य केले. त्याच्या मते काळ्या आणि तांबड्या भांड्यांचा वैशिष्ट्यपूर्ण रंग निव्वळ भांडी पालथी रचून भाजली म्हणून येऊ शकणार नाही. त्यासाठी ज्या भागाचा रंग काळा हवा तो भांड्याचा भाग शेण किंवा भाताचे तूस यासारख्या पदार्थांनी लिंपणे जरुरीचे आहे.[७] गो. गं. मुजुमदार यांनी ही भांडी दोनदा भाजण्याचे तंत्र (एकदा पालथे व एकदा सरळ) अवलंबून काळ्या आणि तांबड्या रंगाची भांडी बनविता येतात असे म्हटले आहे. गॉर्डन चाईल्ड[८] यांच्या आणखीही एका निरीक्षणाचा येथे उल्लेख केला पाहिजे. भट्टीच्या तपमानात घट करत जावून गडद काळा रंग साध्य करण्याचे जे तंत्र आहे, त्यामध्ये त्याच्या मते सुरुवातीस भट्टीचे तपमान खूपच वरचे असणे अत्यावश्यक असते. त्या दृष्टीने मस्की येथील भांड्याचा एस्. परमशिवन् यांनी केलेला अभ्यास अत्यंत महत्त्वाचा आहे. त्यांच्या निष्कर्षानुसार ही भांडी ६००°-७००° सेल्सिअस इतक्या तपमानाला भाजली गेली होती.[९] अर्थातच यास फार उच्च तपमान समजता येणार नाही. दुसरे म्हणजे महापाषाण युगातील काळी आणि तांबडी भांडी कोणत्याही प्रकारच्या लाल द्रावणात बुडविलेली नव्हती. त्यावरून असे दिसते की, आधी भांडे पूर्ण लाल भाजून मगच ठराविक भाग काळा करण्याची पद्धत ल्युकसने

सुचविल्याप्रमाणे या संदर्भात लागू पडत नाही. त्यामुळे या भांड्यांचा काळा आणि लाल रंग भाजण्याच्या एकाच टप्प्यात साध्य करून घेतला होता, असे समजणे क्रमप्राप्त आहे.

**तांबडी मृत्तिकापात्रे** : उत्खननात मिळणारी मृत्तिकापात्रे व खापरांच्या एकूण संख्येत एकरंगी तांबड्या भांड्यांची व खापरांची संख्या एकतृतीयांश आहे. त्यासाठी वापरलेल्या मातीत अभ्रकाचे चमकणारे कण फार मोठ्या प्रमाणात असल्यामुळे या भांड्यांना अभ्रकयुक्त तांबडी भांडी (Micaceous Red Ware) असे म्हटले जाते. अभ्रकाच्या कणांमुळे मातीची लवचिकता फारच कमी होते. तसेच भांड्यांसाठी माती कालवत असताना फार मोठ्या प्रमाणावर त्यामध्ये रेती व धान्याची तुसे मिसळली असल्याने भांड्यांचा पोत अत्यंत भरडा असतो. भांड्यांचा कच्चा गाभा पाहिल्यानंतर आणखी असे दृष्टीस येते की, ही भांडी उत्तम प्रकारे भाजलेलीही नसतात. त्यामुळे ती अत्यंत ठिसूळ असतात. या भांड्यांमध्ये मुख्यत: फुगीर, तसराळ्यासारख्या पसरट तोंडाची भांडी व पसरट तसराळी बनविली जात. विदर्भातील महापाषाणीय वसाहती व स्मारके या दोहोंमध्ये, तसेच आंध्र प्रदेशातही मोठ्या प्रमाणावर मृत्तिकापात्रे व त्यांची खापरे मिळतात.

यातील फारच थोड्या भांड्यांवर काळ्या रंगात नक्षिकाम आढळते. नायकुंड येथे अशी नक्षिकाम केलेली भांडी मिळालेली आहेत. नक्षीतील सजावट फक्त सरळ रेषांद्वारे साधलेली असते. त्यात चित्राकृती नसते. अभ्रकयुक्त खडबडीत पृष्ठभागामुळे सजावटीचे नमुने मात्र स्पष्ट होऊ शकत नाहीत.

**काळी चमकदार मृत्तिकापात्रे** (Black Burnished Ware) : ही भांडी आकार व पोत यांच्या दृष्टीने काळ्या आणि तांबड्या भांड्यांशी अधिक साम्य दर्शवितात. ती आतून--बाहेरून संपूर्ण काळी असतात. भांड्यांच्या बाहेरील पृष्ठभागास घासून घासून एक प्रकारचा चमकदारपणा आणलेला असतो. बहुधा आताप्रमाणेच अकीकासारख्या दगडांच्या मण्याच्या माळेने घासून ही चकाकीही आणत असावेत. दक्षिण भारतातील महापाषाणीय थडग्यांमधून अशा प्रकारची भांडी सहसा अधिक सापडतात व त्यावरील चमकीमुळे ती विदर्भात मिळणाऱ्या भांड्यांपेक्षा अधिक सुबक दिसतात. ती कधीकधी इतकी चकाकीदार दिसतात की, उत्तर भारतात मिळणाऱ्या काळ्या चकाकीदार भांड्यांप्रमाणेच (Northern Black Polished Ware) वाटतात. उत्तर भारतातील काळी चकाकीदार भांडी साधारणपणे ख्रिस्तपूर्व ६०० ते २०० वर्षांच्या काळातील गंगेच्या खोऱ्यातील ऐतिहासिक स्थळांमधून सापडतात. सकृतदर्शनी साम्य आढळले, तरी महापाषाणीय कालखंडातील काळ्या चमकदार भांड्यांचा पोत उत्तर भारतातील काळ्या चकाकीदार भांड्यांपेक्षा खूपच भरड असतो. त्यांच्यावर काळ्या रंगाचा लेप चढविलेला स्पष्ट दिसत नाही. कदाचित ती काळ्या रंगाच्या पातळ द्रावणात बुडवून काढत असावेत. लंडनच्या ब्रिटिश संग्रहालयातील

रसायनशास्त्रज्ञांनी याबाबतीत केलेल्या चाचण्यांवरून काढलेला निष्कर्ष इथे नमूद करावयास हवा. त्यांच्या मते या भांड्यांवर काळ्या मातीच्या अल्कली गुणधर्माचा लेप दिला असावा व उच्च तपमानावर ही माती भाजली जात असताना तो लेप भांड्यांच्या मूळ मातीत एकजीव होऊन जात असावा. त्यानंतर पृष्टभाग घासल्यामुळे त्याला चमक प्राप्त होत असावी.[१०]

या भांड्यांचे टाकळघाट व खापा येथील उदाहरणांवरून जाड व पातळ पोताचे असे दोन वर्ग करता येतात. नायकुंड येथील अशा भांड्यांच्या एकूण संख्येपैकी फक्त ११ टक्के भांडी पातळ पोताची होती. काळी चमकदार भांडी घडविणारा कारागिर विविध प्रकारचे वाडगे, तसराळी, कमलकळीच्या आकाराची भांडी, झाकण्या व क्वचित फुगीर अंगाची गाडगी घडवित असे. भांडे घडविण्याचे तंत्र काळ्या आणि तांबड्या भांड्यांप्रमाणेच होते.

**काळ्या रंगीत नक्षीची तांबडी मृत्तिकापात्रे** : महापाषाणीय थडग्यांतून रंगीत नक्षीची भांडी अभावानेच आढळतात. अपवाद म्हणून जुनापाणी येथील शिळावर्तुळात सापडलेला तोटीदार तांबडा वाडगा होय. त्यावर काळ्या तिरक्या रेषांची सजावट होती. सहसा अशा प्रकारची भांडी वसाहतींमध्ये मिळतात. त्यामुळे जुनापाणी व रायपूर यांचा अपवाद सोडता ती थडग्यांमध्येही मिळू नयेत याचे कोडे वाटते.

काळ्या रंगीत नक्षीच्या या भांड्यांचा मूळ पृष्टभाग कायम तांबडा असतो. टाकळघाट येथील उत्खननात या भांड्यांचे चार प्रकारचे पोत असल्याचे आढळलेले असले तरी, कोणकोणत्या आकारात ही भांडी घडविली जात हे अजून स्पष्ट झालेले नाही. भांड्यांची माती अभ्रकयुक्त नसली तरी पृष्टभागावरील द्रावणात अभ्रक असल्याचे दिसून आलेले आहे. भांडी चाकावर घडविल्याच्या खुणा स्पष्ट दिसतात. त्यांवर बाहेरील बाजूस मंद लाल रंगाचा लेप चढविलेला असतो. कधीकधी आतल्या बाजूसही हा लेप लावलेला दिसतो. उत्तम भाजलेली ही भांडी मध्यम पोताची असतात. सर्व प्रकारच्या भांड्यांत यांचे प्रमाण फक्त दोन टक्केच आहे. म्हणजेच ही भांडी खास टेवर्णातील असावीत. ती जरी थोड्याच संख्येने मिळत असली तरी त्यांचे आकार मात्र विविध असतात. त्यामध्ये टाणवया, फुगीर भांडी, वाडगे व पसरट तोंडाची भांडी इत्यादींचा समावेश आहे. रंगीत नक्षिकाम मात्र अगदी साध्या तिरक्या, समांतर रेषांनी किंवा जाळीदार त्रिकोण, चौकोन इत्यादींचे आहे.

पवनार[११] व कौंडिण्यपूर[१२] ही स्थळे महापाषाणीय नसून समकालीन लोहयुगीन संस्कृतीची आहेत. विशेष म्हणजे तेथेही काळ्या नक्षीची तांबडी भांडी मिळालेली आहेत. त्यामुळे कदाचित कौंडिण्यपूरच्या पहिल्या कालखंडास उत्खनकाने महापाषाणीय म्हटले आहे. या भांड्यांचे तशाच प्रकारच्या परंतु ताम्रपाषाणयुगीन जोर्वे भांड्यांशी मात्र काहीही साम्य आढळत नाही.

महापाषाणीय संस्कृतीशी निगडित असलेल्या भांड्यांच्या इतर गटांमध्ये लाल भांडी, डाग असलेली करड्या रंगाची भांडी अगदी थोड्या प्रमाणात आढळतात.

## लोखंडी हत्यारे व साधने

महापाषाणीय स्मारके उभारणाऱ्यांची अनेक हत्यारे व साधने लोखंडाची होती. तांब्याची काही हत्यारे त्यांच्याकडे असत. विदर्भातील महापाषाणीय स्मारके बहुधा ताम्र--कांस्ययुग यांच्यामधील संक्रमणकाळात उभारली गेली असावीत. कधी कधी तर एखाद्या वस्तूचा काही भाग तांब्याचा व काही भाग लोखंडाचा बनविलेला आढळतो. उदाहरणार्थ माहुरझरी येथे मिळालेला खंजीर होय. या खंजिराची मूठ तांब्याची व पाते लोखंडाचे आहे. यावरून असे दिसते की, लोहयुगाच्या प्रारंभानंतरसुद्धा तांब्याचा वापर पूर्णपणे बंद झाला नाही. कोणत्याही परंपरेचा प्रवाह पूर्णतः खंडित होत नाही हेच यावरून सिद्ध होते.

महापाषाणीय लोकांच्या वापरातील लोखंडाच्या वस्तूंमध्ये विविध प्रकारची हत्यारे, शस्त्रे, धार्मिक विधींसाठीच्या तसेच दैनंदिन व्यवहारातील वस्तूंचा समावेश आहे. शस्त्रांमध्ये तलवारी, खंजीर, भाले व तीराग्रे, पट्टेवाल्या कुऱ्हाडी असे अनेक प्रकार पहावयास मिळतात. काही खंजिरांना मुठीच्या जागी पुढे आलेली टोके आहेत, तर काही तीराग्रांनासुद्धा काटे आहेत. खापा येथे मिळालेल्या खंजिरांची पाती सरळ, टोकदार असून त्यांच्या मुठीच्या जागी पकडीसाठी पुढे आलेली टोके आहेत. माहुरझरी येथील खंजिराची मूठ तांब्याची असली तरी काही खंजिरांच्या मुठी दक्षिण भारतात सापडलेल्या खंजिरांप्रमाणे लाकडाच्या असणे शक्य आहे. क्वचितच सापडणारा त्रिशूळ फक्त धार्मिक विधींसाठीच वापरत असावेत. घोड्याची रिकिब लोखंडाची घडवीत (चित्र १). एकूण वस्तूंमधील काही निश्चितपणे सुताराची हत्यारे असावीत. त्यामध्ये विशेषतः कुऱ्हाडी व छिन्न्यांचा समावेश करता येईल. खिळे, डाव, दिवे, उथळ कढया व थाळ्या या निश्चितच घरगुती गरजा भागविणाऱ्या वस्तू होत. सुताराच्या हत्यारांमध्ये छिन्न्यांची संख्या बरीच असल्यामुळे तत्कालीन स्थापत्यात लाकडाचा उपयोग करण्यात कारागीर फारच वाकबगार असावेत अशा स्वरूपाच्या निष्कर्षात[१३] फारसे तथ्य दिसत नाही. कारण मुळातच कायमस्वरूपी महापाषाणीय वसाहतींचे अस्तित्व अजून शंकास्पद आहे. त्यामुळे त्यांनी उभारलेल्या टिकावू घरांचा प्रश्नच उद्‌भवत नाही. भटके जीवन जगणाऱ्या महापाषाणीय लोकांना वर्षातील काही काळ जेथे मुक्काम टोकायचा तेथे प्रत्येक वेळी नव्याने राहण्यासाठीची जागा बांधून घ्यावी लागत असावी आणि त्यामुळे छिन्नीसारख्या हत्याराची गरज मोठ्या प्रमाणात भासत असावी अशी शक्यता यामागे दिसते.

इतर हत्यारांच्या तुलनेत शेतीसाठी लागणारी हत्यारे मात्र कमी आढळतात. त्यातही कुळवाचे दाते संख्येने अधिक आहेत मात्र विळ्यासारखी हत्यारे क्वचित आढळतात.

माहुरझरी येथे मिळालेल्या कुळवाच्या दात्यांवरून ते एखाद्या बाकदार दांड्यात ठोकून बसविले जात असावेत असे दिसते. नांगराचे फाळसुद्धा दुर्मिळच आहेत. बोरगाव येथील चार शिळावर्तुळांच्या उत्खननात प्राप्त झालेल्या ४४ लोखंडी वस्तूंपैकी पाच कुळवाचे दाते व एक विळा होता. यावरून महापाषाणीय लोकांच्या शेतिविषयक प्राथमिक ज्ञानाविषयीची व ते करीत असलेल्या जुजबी शेतीसंबंधीची सहज कल्पना येऊ शकते. " सर्व पुराव्यांच्या आधारे असा निष्कर्ष निघतो की, महापाषाणीय लोक वृत्तीने स्थिर जीवन जगणारे शेतकरी नव्हते." हा शां. भा. देवांचा निष्कर्ष[१४] योग्य असल्याचे पटते.

**लोहविज्ञान** : महापाषाणीय स्मारकांच्या उत्खननातून मिळालेल्या लोखंडी वस्तूंची संख्या मोठी आहे. त्यासाठी वापरलेल्या धातूच्या शास्त्रीय विश्लेषणावरून महापाषाणीय लोक कुशल लोहार होते हे स्पष्ट आहे. त्यांनी नागपूरच्या सभोवताली उपलब्ध असणाऱ्या उच्च प्रतीच्या खनिजाचा वापर केला. त्यातून त्यांनी गाळलेले लोखंड शुद्ध (९९ टक्के) दर्जाचे आहे. मात्र मूळ खनिजापासून कोणत्या प्रक्रियेने लोखंड शुद्ध करीत असत हे पुरातत्वज्ञांच्या दृष्टीने दुर्दैवाने दक्षिण भारतातील न सुटणारे कोडे आहे. उत्खनन झालेल्या कोणत्याच स्थळाहून याबाबतची कल्पना देणारा पुरावा प्राप्त झाला नाही. विदर्भातील नायकुंड येथे मात्र लोखंड शुद्ध करण्याच्या भट्टीचा उत्तम पुरावा मिळालेला आहे. या भट्टीचा शोध विजेच्या उपकरणाद्वारे केल्या जाणाऱ्या अत्याधुनिक " रेझिस्टिव्हिटी " चाचणीमुळे लागू शकला.

पुण्याच्या डेक्कन कॉलेजचे विश्वास गोगटे यांनी नायकुंड येथे "रेझिस्टिव्हिटी" चाचणीद्वारे पहाणी केली.[१५] पाश्चिमात्य जगात या चाचणीचा उपयोग फार वर्षांपूर्वीपासून केला जात आहे. मातीतील वेगवेगळ्या द्रव्यांची विजेच्या प्रवाहास प्रतिकार करण्याची क्षमता ही त्यातील पाण्याच्या अंशानुसार कमीअधिक असते. ही क्षमता एखादी पुरातन वास्तू किंवा बांधकामाचे अवशेष जमिनीखाली गाडले गेले असतील तर त्यांच्या भोवतालच्या मातीमध्ये नोंदवल्या जाणाऱ्या प्रतिकारक्षमतेपेक्षा भिन्न असते. हे करण्यासाठी जेथे पहाणी करायची, तो प्रदेश चौरस आकाराच्या तुकड्यात विभागला जातो. या पाहणीसाठी वापरल्या जाणाऱ्या उपकरणास तीन शोधक व एक वीजमापक जोडलेला असतो. मोजणीसाठी जो चौरस निवडला असेल त्या चौरसात एक मध्यबिंदू कल्पून त्याच्या त्रिजेच्या रेषांमध्ये मोजणी केली जाते. गोगटेंनी AJCO इलेक्ट्रॉनिक्स या कंपनीचे १.५ वॅटसूच्या १२ बॅटरींवर चालणारे उपकरण वापरले. यामध्ये दोन वीजवाहक जमिनीखाली रोवले जातात व त्यातून आळीपाळीने वीजप्रवाह सोडला जातो आणि त्याचवेळेस विजेचा दाब मोजला जातो. अशा पद्धतीने जेव्हा विविध बिंदूंजवळचा दाब मोजला गेला तेव्हा असे लक्षात आले की, कल्पित मध्यबिंदूच्या आसपास विजेचा दाब वाढलेला होता. त्यानंतर या मध्यबिंदूच्या आसपास उत्खनन करण्यात आले. तेव्हा तेथून महापाषाणीय

मृत्तिकापात्रांचे अवशेष, प्राण्यांची हाडे आणि खनिजातून शुद्ध लोखंड गाळल्यानंतर उरणारा गाळ मिळाला. तसेच १.२५ मीटर खोल गेल्यानंतर लोखंड शुद्ध करण्याची भट्टी मिळाली. ही भट्टी चार सें. मी. जाडीच्या बाकदार विटांची बांधलेली होती. भट्टीचा व्यास ३० सें. मी. व उंची २५ सें. मी. होती. भट्टीच्या आतील बाजू सततच्या जाळामुळे काळी झालेली होती. बाहेरील पृष्ठभाग मात्र लाल होता. शुद्ध लोखंडाचा रस खनिजापासून वेगळा झाल्यानंतर उरणारा गाळ काढून घेण्यासाठी तळाशी तोंड ठेवलेले होते व त्यामुळे भट्टीच्या तळाच्या विटांवर अशा गाळाचा व काळ्या राखेचा एकत्रित थर पक्का जमून विटा एकजीव झाल्या होत्या.

भट्टीतील जाळ प्रज्वलित ठेवण्यासाठी भात्याच्या बोगद्यासारख्या दोन मातीच्या नळ्यांचे बांधकामही केलेले आढळले. यातील एक सततच्या आंचेमुळे काचेसारखी चकाकीदार झालेली होती. या नळीची लांबी १६ सें. मी. व व्यास २.५ सें. मी., तर दुसऱ्या नळीचा व्यास ३.६ सें. मी. होता. परंतु ही दुसरी नळी पूर्णपणे भंगलेली होती. दोन्ही नळ्यांसाठी गारगोटीचा भरपूर भुगा असलेली चिकण माती वापरलेली होती. भात्याच्या फुग्यातील हवा भट्टीपर्यंत पोचविण्याचे काम या नळ्या करीत. उत्खननात ४० किलो वजनाचा एकत्रित गाळ व राख मिळाली.

यात लक्षात घेण्यासारखे असे की, ज्या ठिकाणी ही भट्टी सापडली तेथून लोखंडाचे उत्तम प्रकारचे खनिज उपलब्ध होण्याचे ठिकाणही फारसे दूर नाही. साधारणपणे एक कि. मी. अंतरावर एका नाल्यात अशा खनिजाचे दगड आढळले. डॉ. गोगटेंच्या अंदाजानुसार एक किलो वजनाच्या अशा दगडापासून साधारण ३५० ग्रॅम वजनाचे शुद्ध लोखंड मिळू शकते. भट्टीच्या अगदी नजीक ६.३ किलो गाळ मिळाला. त्यावरून असा अंदाज बांधता येतो की, महापाषाणीय लोहार भट्टीच्या एका आवर्तनात १० ते १२ किलो खनिज गाळून तीन किलो शुद्ध लोखंड प्राप्त करीत होता.

**ताम्र/कांस्य वस्तू** : महापाषाणीय लोकांनी तांब्याचा उपयोग हत्यारे किंवा उपकरणे बनविण्यापेक्षा अलंकारांसाठीच अधिक केलेला दिसतो. अलंकारांमध्ये तांब्याच्या बांगड्या मिळतात. त्याचबरोबर मृत्तिकापात्रांची नक्कल करून फक्त धार्मिक विधींसाठी बनविलेल्या बशा व ज्यांवर कळ्या, पक्षी इत्यादींचे अलंकरण असते अशा झाकण्यांही मिळतात. अशा बशा व त्यांवरच्या झाकण्या खापा व नायकुंड येथे मिळाल्या आहेत. घोड्यांच्या गळ्यातील घंटाही तांब्याच्या व त्यांच्या कड्या लोखंडी होत्या. खापा व माहुरझरी येथील शिळावर्तुळांमधून प्राप्त झालेले घोड्यांचे अलंकार संपूर्ण भारतीय उपखंडात इतरत्र कोठेच मिळालेले नाहीत (चित्र २). त्यामध्ये घोड्याच्या तोंडावर बसविण्याचा एक अलंकार तांब्याच्या पातळ पत्र्यापासून बनविलेला आहे. त्याचा वरचा भाग चंद्रकोरीच्या आकाराचा, तर खालचा भाग वर्तुळाकार आहे. पत्र्यावर तांब्याच्या टोकदार मुदी ठोकून बसविलेल्या होत्या व

मागील बाजूस लोखंडी खिळ्यांनी पक्क्या केल्या होत्या. त्याखेरीज दोन्ही टोकांना तांब्याच्या बारीक नळ्या शोभेसाठी लावलेल्या होत्या. घोड्यासाठी इतकी कारागिरी असलेला दागिना या प्राण्याचे महापाषाणीय लोकांच्या जीवनातील महत्त्व दर्शवितो.

आधीच्या ताम्रपाषाण युगातील पद्धतीप्रमाणेच महापाषाणीय कालखंडातही तांब्याची कडी अलंकरणापेक्षा धातू साठविण्याच्या दृष्टीने बनवित असावेत. विविध आकाराची एकमेकात गुंतविलेली कडी खापा येथे मिळाली. खापा येथेच मिळालेला दांड्याचा प्यालाही इतरत्र कोठे मिळालेला नाही. लोखंडी रिवेट मारलेला तांब्याचा एक दांडूही या ठिकाणाहूनच मिळालेला आहे, परंतु त्याचा नक्की उपयोग मात्र समजत नाही.

**मणी** : विदर्भातील फारच थोड्या महापाषाणीय स्थळांचे उत्खनन केले गेले असले तरी त्यातून प्राप्त झालेले विविध अलंकार लक्षणीय आहेत. गारेच्या वर्गातील चाल्सीडोनी व अकीकासारख्या मौल्यवान खड्यांचे विविध प्रकार यामध्ये दिसतात. त्याचबरोबर पोवळी, शंख, लॅपिस, लॅझुली, स्फटिक इत्यादींपासूनही मणी बनविले जात (चित्र ३). या सर्वांमध्ये अकीकावर कोरीव नक्षी केलेले मणी हे अतिशय लक्षणीय व महापाषाणीय संस्कृतीचे खास वैशिष्ट्य ठरणारे आहेत (चित्र ४). उत्खनित स्थळांमध्ये माहुरझरी हे या विविध प्रकारच्या मण्यांचे उत्पादन केंद्र असावे. तेथून पूर्ण व अर्धवट तयार झालेले शेकडो मणी मिळालेले आहेत.

महापाषाणीय स्थळी मिळालेल्या कोरीव नक्षीच्या अकीकाच्या मण्यांचा विशेष अभ्यास कै. मोरेश्वर दीक्षित यांनी केला होता.[१५] त्यांच्या मते पुढील प्रकारची नक्षी ही महापाषाणीय मण्यांचे वैशिष्ट्य दर्शविणारी आहे. (१) अकीकाचे चपटे मणी-ज्यावर कडेने ठिपके असतात. (२) कडेने तिरक्या रेषा व मध्यभागी आडवी रेषा किंवा चौरस किंवा ठिपका असतो. (३) नळीच्या आकाराचे मणी-ज्यावर मध्यभागी कंगोरेदार नागमोडी वळणांच्या दोन रेषा व कडेने आडव्या पट्ट्यांच्या मध्ये त्रिकोण असतो. (४) किंवा बाजूंच्या दोन उभ्या पट्ट्यांमध्ये तिरक्या रेषांची रांग असते.

अकीकाच्या कोरीव मण्यांची भारतीय परंपरा तशी प्राचीन आहे. सिंधू संस्कृतीच्या हडप्पा-मोहेंजोदारो या पाच हजार वर्षांपूर्वीच्या शहरांतूनही अशा प्रकारचे मणी मिळालेले आहेत. भारतीय मणिकारागिरांनी हे मणी बनविण्याच्या तंत्रावर प्रभुत्व प्राप्त केले होते यात काहीच शंका नाही. गेल्या शतकापर्यंत सिंधमध्ये हे मणी बनविण्याचे काम चालत असल्याची नोंद एका ब्रिटिशाने करून ठेवलेली आहे. मण्यांवरील नक्षी कोरण्याची रीत त्याने फार उत्तम प्रकारे वर्णिलेली आहे. मण्यांना छिद्र पाडण्याआधीच त्यावरील नक्षिकाम पूर्ण होत असे. कोरून काढलेल्या खाचेत भरण्यासाठी पोटॅश, व्हाईट लेड आणि किरार (Copris aphylla) नावाच्या झुडपी

वनस्पतीच्या रसाचे मिश्रण वापरले जाई. त्यानंतर हे मणी निखाऱ्यात ठेवून भाजले जात. मणी फुटला तरी अशा तऱ्हेने तयार झालेल्या नक्षीतील रंग उडत नसे.[१७]

अकीकाच्या मण्यांखेरीज इतर प्रकारच्या मण्यांमध्ये लॅपिस व काचेच्या मण्यांचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे. लॅपिसची विशेषता म्हणजे ते अफगाणिस्तानातील बदक्षान येथील खाणींमध्येच मिळते. त्यामुळे महापाषाणीय लोकांनी अफगाणिस्तानातून लॅपिस आयात केला असावा असे सुरुवातीस समजले गेले. परंतु महापाषाणीय लोकांना त्यांच्या भटक्या जीवनात हे कितपत शक्य होते याबद्दल शंका वाटते. या संदर्भात राजस्थानमधील अजमेरच्या आसपास थोड्या प्रमाणात लॅपिस मिळते हे लक्षात घ्यायला हवे. महापाषाणीय लोकांनी राजस्थानमधून लॅपिस आणले असणे शक्य आहे, माहुरझरी व खापा येथील महापाषाणीय स्मारकांमधून काचेचे मणी मिळाल्यामुळे ख्रिस्तपूर्व सातव्या शतकात भारतीयांना काचेचे तंत्रज्ञान अवगत होते असे स्पष्ट होते. काचेच्या मण्यांमध्ये दोन निळे व एक अपारदर्शक पांढऱ्या रंगाचा आहे. यातील दोन्ही निळे मणी वेटोळेदार असून ते तारांच्या गुंडाळ्यांवर बनविलेले होते.

**अलंकार** : भारतातील प्राचीन स्थळांच्या उत्खननात सुवर्णालंकार मिळण्याचे प्रमाण अत्यंत कमी आहे. त्या पार्श्वभूमीवर महापाषाणीय लोकांच्या दफनांमधून सुवर्णालंकार लक्षात घेण्याजोग्या संख्येने मिळावेत हे विशेष समजले पाहिजे (चित्र ५). जुनापाणी येथे सोन्याच्या बांगड्या व वेढणी तसेच माहुरझरी येथून वेढणी व एक सुंदर असे वेढ्यांचेच कर्णभूषणही मिळाले. माहुरझरीच्या या अनोख्या कर्णभूषणासोबत एक हस्तभूषणही मिळाले. सोन्याच्या पट्ट्यांवर एक पर्णाकृती पदक असलेले हे हस्तभूषण माहुरझरीस, तर छोट्या चपट्या मण्यांचे हस्तभूषण जुनापाणी येथून मिळाले. सुवर्णालंकारांबरोबरच चांदीचेही अलंकार मिळाले. जुनापाणी येथून चांदीचे बुंदके मिळाले. नायकुंड येथील दोन आभूषणात एक सोन्याचे वेढे होते. दुसऱ्या आभूषणाची खूपच मोडतोड झाली होती. या महापाषाणीय सुवर्णालंकारामध्येही चांदीचे मिश्रण फार मोठ्या प्रमाणावर आढळले. जुनापाणी येथील दागिन्यांमध्ये चांदीचे प्रमाण ५१ टक्के आहे. हे मिश्रण हेतुपुरस्सर केलेले व महापाषाणीय सुवर्णकारांचे कौशल्य दर्शविणारे आहे. विदर्भातील सोने मिळण्याचे ठिकाण म्हणजे भंडारा जिल्हा. महापाषाणीय स्मारके उभारणाऱ्यांनी याच सोन्याचा उपयोग केला असण्याची शक्यता आहे.

**प्रसाधन** : प्रसाधनासाठी उपयुक्त असणाऱ्या उदा. नखे कापण्याचे उपकरण, फणी, आरसा इत्यादी वस्तू महापाषाणीय थडग्यांच्या उत्खननात मिळाल्या. यामध्ये नखे कापण्याची उपकरणे अधिक असून व त्यातीलही बरीचशी माहुरझरी येथील उत्खननात मिळालेली आहेत. ही उपकरणे बारीक सळ्या वाकवून तयार केलेली आहेत. सळीचे एक टोक चपटे, रुंद व किंचित गोलाकार असते व दुसरे निमुळते

होत गेलेले असते. अजूनही ग्रामीण भागातील न्हावी अशाच प्रकारची उपकरणे वापरतात. खापा येथील पुरावा फण्या वापरात होत्या हे दर्शवितो. टिकावासारख्या एका हत्यारावर फणीचा ठसा उमटलेला आढळला. ही फणी मृत व्यक्तीसोबत तिच्या आवश्यक वस्तू पुरतांना टिकावावरच ठेवली गेली असावी व काळाच्या ओघात लाकडी फळी कुजून नष्ट झाली तरी गंजलेल्या टिकावावर तिचा कायमचा ठसा उमटला असावा असा उत्खनकांचा अंदाज आहे. आजच्या वापरातील फणीहून ती फणी काही फारशी वेगळी नव्हती. तिची लांबी साधारणपणे सहा सें. मी. व रुंदी दोन सें. मी. होती. उल्लेख करणे आवश्यक आहे की, ताम्रपाषाणयुगीन महाराष्ट्रात मातीच्या फण्या वापरात होत्या. अंदमान, निकोबार बेटांतील आदिवासी शिंपल्यांचा उपयोग फणी व वस्तऱ्यासारखा करतात अशी नोंद मानववंश शास्त्रज्ञांनी केलेली आहे. दक्षिण भारतातील महापाषाणीय थडग्यांमधून आरसे व वस्तरे मिळालेले आहेत, परंतु विदर्भात मात्र ते मिळाले नाहीत.

**धर्मश्रध्दा** : तामिळनाडूतील मोत्तूर[१८] या गावाप्रमाणे विदर्भातील महापाषाणीय लोकांच्या देवता व त्यांच्या प्रतिमांचा पुरावा मात्र मिळालेला नाही. त्यांच्या थडग्यांवरून फार तर मरणोत्तर जीवनावर त्यांचा विश्वास होता एवढेच दिसते. शिळावर्तुळांच्या उत्खननात मिळालेल्या मोजक्याच मानवी अस्थींच्या पुराव्यांच्या आधारे असे दिसते की, बहुधा मृतदेह काही काळ तसाच उघड्यावर ठेवत असावेत व कालांतराने उरल्या सुरल्या अस्थी गोळा करून त्यांचे शिळावर्तुळात विधीपूर्वक दफन केले जात असावे. मरणोत्तर जीवनावरील विश्वास हा मृतासाठी त्याच्याबरोबर पुरण्यात आलेल्या त्याच्या वैयक्तिक व जीवनोपयोगी वस्तूंद्वारा प्रकट होतो. या वस्तूंमध्ये अन्नपाण्यासाठी मृत्तिकापात्रे व धातूची पात्रे, विविध प्रकारची लोखंडी साधने व हत्यारे, सोन्याचांदीचे व मौल्यवान खड्यांपासून बनविलेल्या मण्यांचे अलंकार, प्रसाधनाची साधने या सर्वांचा समावेश असे. निश्चितच इहलोकाप्रमाणेच परलोकामध्येही मृतात्म्याच्या सर्व गरजा पुऱ्या व्हाव्यात या श्रद्धेपायीच महापाषाणीय लोकांनी हा सारा खटाटोप केला असावा.

खापा व माहुरझरी येथे कुंभांमध्ये अस्थी ठेवलेल्या मिळाल्या. या कुंभांवर बहुधा झाकणे ठेवलेली असावीत. या झाकणांची विशेषता म्हणजे त्यांच्या शिरोभागी पक्षी बसविलेले होते. बहुधा हे पक्षी म्हणजे अतिप्राचीन काळापासून मातृदेवतेशी संबंधित असलेली कबुतरे असावीत. मृत व्यक्ती मृत्यूनंतर पुन्हा त्याच मातेच्या उदरी जन्म घेते ही श्रद्धा या दफनांच्या मुळाशी असावी.

ज्यामध्ये मृत व्यक्तीच्या बरोबर त्याचा घोडाही पुरला होता ते दफन लक्षणीय आहे. परंतु त्याचबरोबर एक स्पष्ट करणे आवश्यक आहे की, घोड्याची हाडे सर्वच दफनांमध्ये मिळत नाहीत. एकूण दफनांपैकी फक्त १/४ दफनांमध्येच ती मिळाली. याचे

कारण अगदी साधे व उघड आहे. कुटुंबातील व्यक्ती मृत झाल्यास घोड्याचा बळी देणे प्रत्येक कुटुंबास परवडणारे नसावे. एक गोष्ट अशीही निरीक्षणात आलेली आहे की, सहसा मोठ्या घोड्यापेक्षा एखादे छोटे शिंगरू बळी देण्यासाठी निवडले जाई. घोड्याचा बळी देण्याचा हा विधी खूप महत्त्वाचा असला पाहिजे. ज्या दफनांमधून घोड्यांच्या सांगाड्यांचे अवशेष मिळालेले आहेत त्यामधील अलंकार, भांड्यांची संख्या लक्षात घेतल्यास ते दफन जमातीतील अत्यंत श्रीमंत कुटुंबातील व्यक्तींचे किंवा कदाचित जमातीच्या प्रमुखाचेच असण्याची शक्यता आहे. बळी देण्यात आलेला घोडाही तांब्याच्या विविध अलंकारांनी उत्तम प्रकारे सजविलेला असे. घोड्याच्या दफनात मिळालेल्या हाडांवरून बळी दिलेल्या घोड्याचे मांस धर्मविधीचा एक भाग म्हणून लोकांनी खाल्ले असावे असे दिसते. इतर प्राण्यांचेही बळी दिले जात. नायकुंड येथील पुराव्यांवरून त्यात बैल व डुक्कर यांचा समावेश असल्याचे दिसते.

**कालानुक्रम** : कर्नाटकातील ब्रह्मगिरी येथील महापाषाणीय स्मारकांचे उत्खनन सर मॉर्टिमर व्हीलर यांनी करण्याआधी या स्मारकांच्या कालानुक्रमाबाबत माहिती उपलब्ध नव्हती. व्हीलर यांनी संशोधनाअंती दक्षिण भारतातील महापाषाणीय कालखंड ख्रिस्तपूर्व ३०० ते ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकापर्यंत असल्याचे ठरविले. पय्यमपळ्ळी येथील नमुन्यांवरून ठरविण्यात आलेले कर्ब-१४ कालमापनांक या निष्कर्षास पुष्टी देणारे ठरले. हे कालमापनांक ख्रिस्तपूर्व ३१५-१०० वर्षाच्या दरम्यानचे होते. कर्नाटकातील हल्लूर येथील पुराव्यामुळे महापाषाणीय कालखंडाची सुरुवात अधिक प्राचीन होती असे म्हणता येणे शक्य झाले. कारण येथील कालमापनांक ख्रिस्तपूर्व ९५५ वर्षे व ख्रिस्तपूर्व ११०५ वर्षे असे आहेत.[१४] असे असले तरी हे कालमापनांक नवाश्मयुग व महापाषाणीय कालखंड यांच्यामधील संक्रमणकाल दर्शविणारे आहेत. अलीकडेच हाताशी आलेले काही कालमापनांक तर महापाषाणीय कालखंड हा ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्रकाइतका प्राचीन असल्याचे दर्शविणारे आहेत.

विदर्भातील महापाषाणीय संस्कृतीचा कालानुक्रम दर्शविणाऱ्या कालमापनांकांची मालिकाच आता उपलब्ध आहे. टाकळघाट येथील महापाषाणीय वसाहतीचे ख्रिस्तपूर्व ५०५ व ख्रिस्तपूर्व ६०५ असे दोन कालमापनांक आहेत. हे कालमापनांक वसाहतीचा मधला टप्पा दर्शविणारे आहेत. त्यामुळे वसाहतीची सुरुवात ख्रिस्तपूर्व ७०० च्या आसपास सुरू झाली असावी असे समजण्यास हरकत नाही. नायकुंड येथून प्राप्त झालेल्या कालमापनांकांमुळे हा कालानुक्रम अधिकच पक्का होतो.[१५] यातील दोन कालमापनांक शिळावर्तुळातील नमुन्यांवरून व चौदा वसाहतीतील नमुन्यांवरून प्राप्त झालेले आहेत. यातील आधीचे दोन कालमापनांक प्रत्यक्ष दफनांशी संबंधित असल्यामुळे अधिक महत्त्वाचे आहेत. ख्रिस्तपूर्व ५०५ ± १०० वर्षे व ख्रिस्तपूर्व ५४५ ± १०५ वर्षे असे हे दोन कालमापनांक आहेत. वसाहतीतील नमुन्यांपासून मिळालेला सर्वाधिक प्राचीन कालमापनांक ख्रिस्तपूर्व ६९० ± ११० असा आहे.

महापाषाणीय संस्कृतीचा अस्त दर्शविणारा कालमापनांक ख्रिस्तपूर्व ३०० ± १०० असा आहे. या सर्व कालमापनांकांच्या आधारे विदर्भातील महापाषाणीय संस्कृतीचा काळ ख्रिस्तपूर्व सुमारे ७०० ते ३०० इतका ठरविता येतो. टाकळघाट येथील कालमापनांकही वरील कालमापनांकांशी जुळणारे असेच आहेत.

**उगम आणि उद्गाते :** निरनिराळ्या विद्वानांनी महापाषाणीय संस्कृतीचा उगम कसा झाला असावा या संदर्भात विविध सिद्धांत मांडलेले आहेत. संशोधनाच्या अगदी सुरुवातीच्या काळातील एक विद्वान कर्नल मेडोज टेलर यांनी महापाषाणीय स्मारकांना सेल्ट-ड्रुईड व शक वंशाच्या लोकांची स्मारके म्हटले आहे. जे डब्ल्यू. ब्रीकस् या विद्वानास मात्र निलगिरी प्रदेशातील काही जमातींच्या उदाहरणामुळे ही स्मारके स्थानिक स्वरूपाचीच आहेत असे वाटले. व्हीं. गॉर्डन चाईल्ड यांनी महापाषाणीय स्मारके व त्यातही विशेष करून जमिनीखालील पेटिका या प्रकारात मोडणारी स्मारके पश्चिमेकडे इंग्लंडपासून ते पूर्वेकडे भारतापर्यंत जगाच्या मोठ्या भागात कशी पसरलेली आहेत हे दाखवून दिले व या स्मारकांचा उगम पश्चिमेकडील देशांमध्येच झाला असावा असे मोघमपणे सुचविले. हैमेनिडॉर्फ यांचेही मत असेच आहे. जी. एस. घुर्ये व बी. बी. लाल या दोघांनी मात्र महापाषाणीय स्मारकांची तुलना इजिप्तमधील प्राचीन थडग्यांशी केली. बी. बी. लाल यांचे मत काळ्या आणि तांबड्या मृत्तिकापात्रांच्या न्यूबिया येथील शिरोभागी काळा रंग असलेल्या मृत्तिकापात्रांशी व त्यावर कोरलेल्या अक्षरांशी केलेल्या तुलनेवर आधारित होते.

दिवसेंदिवस या वादात भरच पडत आहे. याचे मुख्य कारण म्हणजे या संस्कृतीचे जनकत्व जिच्याकडे जाईल अशी संस्कृती अजूनपर्यंत भारतात उजेडात आलेली नाही. तसेच महापाषाणीय स्मारकांचे विविध प्रकार कसे विकसित झाले याबाबतही काही थांगपत्ता लागत नाही. भारतामध्ये महापाषाणीय परंपरा तिच्या पूर्ण विकसित स्वरुपातच दृष्टोत्पत्तीस येते. महापाषाणीय संस्कृतीच्या उगमाबद्दल मतमतांतरे असली तरी तिच्या उद्गात्यांबद्दल विद्वानांमध्ये एकमत असल्याचे दिसते. त्यांच्या मते महापाषाणीय स्मारके उभारणारे लोक द्रविडी बोली बोलणारे होते.

काही जीवमानववंश शास्त्रज्ञांनी दक्षिण भारतातील महापाषाणीय थडग्यांमधील मानवी अस्थींचा अभ्यास केला. आदिचन्नलूर येथील महापाषाणीय लोक भारतीय उपखंडाबाहेरचे होते असे मत झुकरमनने[२२] मांडले. फादर हेरास[२३] यांचे मत याच प्रकारचे परंतु अधिक निश्चित होते. त्यांच्या मते हे लोक भूमध्य वंशाचे होते. व्हॉन फ्यूहरर हैमेनडॉर्फ[२४] यांच्या मते महापाषाणीय लोक द्रविडांची उत्पत्ती ज्या वंशापासून झाली त्या वंशाचे (Proto Dravidians) होते व ते समुद्रमार्गे भारतात आले. चाईल्डचे[२५] मत असेच आहे. व्हीलर[२६] यांनी असे सांगितले की, काही विद्वानांच्या मते भारतीय व कॅस्पियन यांच्या मिश्र वंशाच्या लोकांनी अचानक केलेल्या आक्रमणातून महापाषाणीय संस्कृती भारतात पसरली.

या संपूर्ण समस्येचा अभ्यास के. ए. आर. केनेडी यांनी पुन्हा एकदा नव्याने केला. त्यांच्या निष्कर्षानुसार पुरातत्वीय पुरावा गृहीत धरता, महापाषाणीय संस्कृती काळाच्या ओघात भारतातच विकसित झाली. कोणाही परकीयांच्या आक्रमणाचा तो परिपाक नव्हे.[२६]

दुर्दैवाने विदर्भातील उत्खननांमधून संपूर्ण मानवी सांगाडा आजतागायत उपलब्ध झालेला नाही. जे काही मिळाले ते तुरळक अस्थींचे अवशेष. बऱ्याचशा प्रसंगी तेही अगदी ठिसूळ झालेल्या स्वरुपात मिळाले. हात लावला की त्यांचा भुगा होतो. अशा परिस्थितीत त्यांचा अभ्यास करून वंश कोणता हे ठरविणे हे जवळजवळ अशक्यप्राय आहे. दक्षिण भारतातसुद्धा संपूर्ण सांगाडा हस्तगत होण्याचे उदाहरण क्वचितच आहे. फक्त मस्की (कर्नाटक) व यल्लेश्वरम् (आंध्र प्रदेश) येथेच संपूर्ण सांगाडे हाती लागले आहेत. बऱ्याच मानववंश शास्त्रज्ञांच्या मते महापाषाणीय मानव व आजचे द्रविड यांच्यात कमालीचे साधर्म्य आहे. त्यामुळे साहजिकच महापाषाणीय लोक द्रविड वंशाचे होते असा निष्कर्ष अटळ आहे. असे असले तरी मुळातच "द्रविड" व त्याच्याच बरोबरीने "आर्य" या दोन्ही संज्ञा वंशवाचक असण्यापेक्षा भाषावाचक अधिक आहेत. एवढेच नव्हे, तर अलीकडे मुळातच "वंश" या संकल्पनेच्या यथार्थतेबद्दल खुद्द मानववंश शास्त्रज्ञांमध्येच शंका निर्माण झालेली आहे व त्यामुळे "द्रविड" काय किंवा "आर्य" काय, या संज्ञा आता निरर्थक ठरू पहात आहेत.

काही असले तरी विदर्भातील महापाषाणीय स्थळांमधून मिळालेल्या मानवी अस्थींच्या आधारे जीवमानववंश शास्त्रज्ञांनी काही निष्कर्ष काढलेले आहेत व त्यावरून महापाषाणीय लोकांबद्दल महत्त्वाची माहिती मिळते. केनेडींच्या[२७] निरीक्षणावरून असे दिसते की, या लोकांमध्ये दातांच्या अपुऱ्या वाढीची व मांडीची हाडे वाकून पाय कमानीप्रमाणे फेंगडे झाल्याची उदाहरणे आढळतात. हाडांची वाढ खुंटल्याची ही लक्षणे "ड" जीवनसत्वाचा अभाव, मुडदूस, सूर्यप्रकाशाचा अभाव यासारख्या कारणांपेक्षाही पूरक आहार न मिळाल्याची होत. केनेडींच्या निरीक्षणाप्रमाणे दाढांचा मोठा आकार मिश्र आहार दर्शवितात असे निदर्शनास आलेले आहे. शिकार व कंदमुळे आणि वनस्पती गोळा करून निर्वाह करणाऱ्यांचे दात शाकाहारी लोकांपेक्षा मोठे असतात. ल्युकसचे मत याहून भिन्न असले तरीसुद्धा केनेडींच्या मतात तथ्य असावे असे दिसते, कारण उत्खननात मिळालेल्या प्राण्यांची हाडे व जळलेले धान्यकण यांच्या पुराव्यांवरून महापाषाणीय लोकांचा आहार मिश्र होता हेच सिद्ध होते.

माहुरझरी येथे मिळालेल्या मानवी हाडांच्या आधारे केनेडी यांनी विविध वयोगटातील व्यक्तींची संख्या पुढीलप्रमाणे ठरविली आहे. (१) १२ ते १५ वर्षे–१, (२) १६ ते २२ वर्षे–८, (३) २३ ते ३२ वर्षे–४ व (४) वय निश्चित न करता

येण्यायोग्य प्रौढ व्यक्ती-३. यात एकूण १७ ते २१ व्यक्तींच्या अस्थींचे अवशेष आहेत.

केनेडींच्या अभ्यासाप्रमाणे असे निदर्शनास आले आहे की, २२ ते ३२ वर्षांच्या वयोगटातील व्यक्तींमध्ये पुरुषांची संख्या अधिक आहे, तर १६ ते २२ वर्षांच्या वयोगटात स्त्रियांची संख्या अधिक आहे. एका दफनामध्ये दोन, तर दुसऱ्या एका दफनात तीन व्यक्तींच्या अस्थींचे अवशेष होते. दोन उदाहरणांमध्ये घोड्यावर सतत बसणाऱ्यांमध्ये ज्या विकृती आढळतात तशा प्रकारच्या खुणा मांडीच्या हाडांवर आढळल्या.

महापाषाणीय दफनांमध्ये जरी अद्याप लहान मुलाचे दफन आढळले नसले तरी छोट्या मुलाच्या जवड्याचे एक हाड मिळाले. केनेडींच्या[१८] मतानुसार हे मूल साधारण सात वर्षांचे असावे.

———

# तळटिपा

१ कृष्णस्वामी, व्ही. डी., " मेगालिथिक टाईप्स ऑफ साऊथ इंडिया", **एन्शंट इंडिया,** खंड ५, १९४९, पृ. ३५-४५.

२. देव, एस. बी. ॲण्ड जामखेडकर, ए. पी., **नैकुंड एक्सकॅवेशन्स : १९७८-८०,** मुंबई, १९८५, पृ. ९.

३ फ्लॅनरी, केंट. व्ही., " दि ओरिजिन ऑफ दि व्हिलेज ॲज ए सेटलमेंट टाईप इन मेसोअमेरिका ॲण्ड दि निअर ईस्ट ", **मॅन, सेटलमेंट ॲण्ड अरबॅनिझम,** पीटर युको ॲण्ड अदर्स, लंडन, १९७२, पृ. २३-२४.

४ अधिक विवेचनासाठी पहा—ढवळीकर, एम. के. ॲण्ड पोसल ग्रेगरी, " सबसिस्टन्स पॅटर्न ऑफ ॲन अर्ली फार्मिंग कम्युनिटी ऑफ वेस्टर्न इंडिया", **आर्किऑलॉजी,** खंड ७, १९७३, पृ. ३९-४९.

५ मांडवकर, भाऊ, **कोलाम,** नागपूर, १९६६, पृ. ७७-७९.

६ " ऑन दि कॉजेस ऑफ ग्रे ॲण्ड ब्लॅक कलरेशन इन प्रिहिस्टॉरिक पॉटरी ", **मॅन,** खंड-३७, लेख ५५, पृ. ४३-४४.

७ ल्युकस, ए., "**एन्शंट इजिप्शियन मटेरियल्स ॲण्ड इंडस्ट्रिज,** लंडन, १९४८, पृ. ४३४--४३६.

८ कित्ता.

९ मार्टिन, लेव्ही (संपा.), "इन्व्हेस्टिगेशन ऑन एन्शंट पॉटरी फ्रॉम मस्की", **आर्किऑलॉजिकल केमिस्ट्री- ए सिंपोझियम,** फिलाडेल्फिया, १९६७, पृ. २३१--५२.

१० देव, एस. बी., **प्रॉब्लेम ऑफ साऊथ इंडियन मेगॅलिथ्स,** धारवाड, १९७३, पृ. २९.

११ देव, एस. बी. ॲण्ड ढवळीकर, एम. के., **पवनार एक्सकॅवेशन-१९६७,** नागपूर युनिव्हर्सिटी, नागपूर, १९६८

१२ दीक्षित, एम. जी., **एक्सकॅवेशन ॲट कौंडिण्यपूर,** मुंबई, १९६८, पृ. ७२-७३.

१३ देव, एस. बी., पूर्वोक्त.

१४ देव, एस. बी. ॲण्ड पदय्या, के. (संपा.) "मेगॅलिथ्स : देअर इकॉलॉजी, इकॉनॉमी ॲण्ड टेक्नॉलॉजी". **रिसेन्ट ॲडव्हान्सेस इन इंडियन आर्किऑलॉजी,** पुणे, १९८५, पृ. ११.

१५ गोगटे, विश्वास, **एक्सकॅवेशन ॲट नैकुंड : १९७८-८०,** पृ. ५२-५९.

१६ दीक्षित, एम. जी., **इच्ड बीडस् इन इंडिया,** पुणे, १९४९.

१७ कित्ता.

१८ नरसिम्हैया, बी., **निओलिथिक ॲण्ड मेगॅलिथिक कल्चर्स ऑफ तामिळनाडू,** दिल्ली, १९८०, चित्र--१० अ.

१९ नागराजराव, एम. एस., **प्रोटोहिस्टॉरिक कल्चर्स ऑफ दि तुंगभद्रा व्हॅली,** धारवाड, १९७१, पृ. १४-१५.

२० देव, एस. बी. अॅण्ड जामखेडकर, ए. पी., **नैकुंड एक्सकॅवेशन १९७८–८०,** मुंबई, १९८५, पृ. ७, ८.

२१ ''दि आदिचन्नलूर स्कल्स'', **मद्रास गव्हर्नमेंट बुलेटिन,** खंड-२, १९३०, पृ. १--२४.

२२ ''मोहेंजोदारो : दि मोस्ट इंपॉर्टंट आर्केऑलॉजिकल साईट इन इंडिया'', **जर्नल ऑफ इंडियन हिस्टरी,** खंड ६, १९३७, पृ. १-१२.

२३ ''न्यू आस्पेक्टस् ऑफ दि द्रविडीयन प्रॉब्लेम'', **तामिळ कल्चर,** खंड-२, १९५३, पृ. १२७-३५.

२४ चाइल्ड, गॉर्डन व्ही., ''मेगॅलिथ्स'', **एन्शंट इंडिया,** खंड-४, १९४८, पृ.५-१३.

२५ ''ह्यूमन स्केलेटल रिमेन्स फ्रॉम ब्रह्मगिरी'', **बुलेटिन ऑफ दि डिपार्टमेंट ऑफ ॲन्थ्रॉपॉलॉजी,** खंड-९, कलकत्ता, १९६०, पृ. ५--२६.

२६ **दि फिजिकल ॲन्थ्रॉपॉलॉजी ऑफ मेगॅलिथ बिल्डर्स ऑफ साऊथ इंडिया ॲण्ड श्रीलंका,** कॅनबेरा, १९७५, पृ. ७६.

२७ देव, एस. बी. अँड जामखेडकर, ए. पी., **माहुरझरी एक्सकॅवेशन : १९७०-७२,** मुंबई, १९७३.

२८ केनेडी, के. ए. आर., ''नोट ऑन दि ह्युमन स्केलेटल स्पेसिमेन फ्रॉम नायकुंड'', **नैकुंड एक्सकॅवेशन,** पृ. ४९-५१.

---




प्रकरण-२ **अश्मयुग** (आकृती १) : **आद्य पुराश्मयुगीन महत्त्वाची स्थळे**

(१) भाडणे, जि. धुळे
(२) गंगापूर, जि. नाशिक
(३) मानेगाव, जि. जळगाव
(४) पापा-मिया टेकडी, जि. चंद्रपूर
(५) नेवासा, जि. अहमदनगर
(६) बोरी, जि. पुणे
(७) महाड, जि. रायगड
(८) मालवण, जि. सिंधुदुर्ग

**फलक क्र. एक**




प्रकरण-२ **अश्मयुग** (आकृती २) : **आद्य पुराश्मयुगीन हत्यारे**
हातकुऱ्हाडी - १, ४, ५  फरशी - २, ३  तबकडी - ६
(डॉ. सांकलिया, नेवासा, १९७४)

**फलक क्र. दोन**




प्रकरण-२ **अश्मयुग** (आकृती ३) : **प्रमुख मध्य पुराश्मयुगीन स्थळे**

(१) रनाळा व रायगड, जि. धुळे
(२) पाटणे, जि. जळगाव
(३) भागीमारी, जि. नागपूर
(४) माहुरझरी, जि. नागपूर
(५) नायकुंड, जि. नागपूर
(६) पवनी, जि. भंडारा
(७) पापा-मिया टेकडी, जि. चंद्रपूर
(८) बेलपांढरी, जि. नाशिक
(९) कालेगाव, जि. नाशिक
(१०) नांदूर मधमेश्वर, जि. नाशिक
(११) वडोली-वाघोली, जि. औरंगाबाद
(१२) नेवासा, जि. अहमदनगर
(१३) किवळा, जि. नांदेड
(१४) भोकर, जि. नांदेड
(१५) बोरिवली-कांदिवली, जि. मुंबई उपनगर
(१६) महाड, जि. रायगड
(१७) दत्तवाडी (पुणे), जि. पुणे
(१८) इनामगाव, जि. पुणे
(१९) टेंभू, जि. सातारा
(२०) वाळवे, जि. सांगली
(२१) मालवण, जि. सिंधुदुर्ग

**फलक क्र. तीन**




प्रकरण-२ **अश्मयुग** (आकृती ४) : **मध्य पुराश्मयुगीन हत्यारे :**
(१) तासण्या - २, ३, ७, १०, ११, १२ (२) वेधण्या - ४, ६ (३) नोकहत्यारे - १, ५, ८, ९
(डॉ. सांकलिया, नेवासा १९७४)

**फलक क्र. चार**




प्रकरण-२ **अश्मयुग** (आकृती ५) : **प्रमुख उत्तर पुराश्मयुगीन स्थळे :**

(१) भाडणे, जि. धुळे
(२) बेलपांढरी, जि. नाशिक
(३) पाटणे, जि. जळगाव
(४) पितळखोरा, जि. औरंगाबाद
(५) नेवासा, जि. अहमदनगर
(६) पापा-मिया टेकडी, जि. चंद्रपूर
(७) भोकर, जि. नांदेड
(८) बोरिवली-कांदिवली, जि. मुंबई उपनगर
(९) इनामगाव, जि. पुणे

**फलक क्र. पाच**




प्रकरण-२ **अश्मयुग** (आकृती ६) : **उत्तर पुराश्मयुगीन हत्यारे**

(१) पाती - १ ते ७ (२) तासण्या - ८ ते १३ (३) कोरणी - १४ (४) छिलके - १५, १६

(डॉ. पप्पू, इनामगाव, १९८८)

**फलक क्र. सहा**




प्रकरण-२ **अश्मयुग** (आकृती ७) : **प्रमुख मध्याश्मयुगीन स्थळे**

| | |
|---|---|
| (१) भाडणे, जि. धुळे | (१०) पुणे, जि. पुणे |
| (२) पाटणे, जि. जळगाव | (११) इनामगाव, जि. पुणे |
| (३) नागपूर, जि. नागपूर | (१२) पाचगणी, जि. सातारा |
| (४) पवनी, जि. भंडारा | (१३) माहुली, जि. सातारा |
| (५) पापा-मिया टेकडी, जि. चंद्रपूर | (१४) हरीपूर, जि. सांगली |
| (६) भोकर, जि. नांदेड | (१५) पाचाड, जि. रायगड |
| (७) वेरूळ, जि. औरंगाबाद | (१६) हातखंबा, जि. रत्नागिरी |
| (८) नेवासा, जि. अहमदनगर | (१७) मालवण, जि. सिंधुदुर्ग |
| (९) बोरिवली-कांदिवली, जि. मुंबई उपनगर | |

**फलक क्र. सात**
















































प्रकरण-२ **अश्मयुग** (आकृती ८) : **मध्याश्मयुगीन हत्यारे (अ)** : पाती १ ते २२

**फलक क्र. आठ**




प्रकरण-२ **अश्मयुग** (आकृती ९) : **मध्याश्मयुगीन हत्यारे (ब)**

(१) तासण्या-२३ ते ३२ (४) चंद्रकोरी- ३६ ते ४२

(२) नोक हत्यारं (टोंचे)- ३३, ३४ (५) गाभे- ४३ ते ४७

(३) वेधणी- ३५ (डॉ. पप्पू, इनामगाव. १९८८)

**फलक क्र. नऊ**




प्रकरण-३ ताम्रपाषाणयुग (आकृती १) : महाराष्ट्रातील ताम्रपाषाणयुगीन स्थळे

फलक क्र. दहा



प्रकरण-३ ताम्रपाषाणयुग (आकृती २) : इनामगाव उत्खननात सापडलेल्या गोलाकार झोपड्या.
उत्तर जोर्वे संस्कृती (इ. स. पू. १०००-७००)

**फलक क्र. अकरा**



प्रकरण-३ ताम्रपाषाणयुग (छायाचित्र १) : गर्तावास कावठे (इ. स. पू. २०००-१८००)



प्रकरण-३ ताम्रपाषाणयुग (छायाचित्र २) : माळवा संस्कृतीचे घर, इनामगाव
(इ. स. पू. १६००-१४००)

**फलक क्र. बारा**



प्रकरण-३ ताम्रपाषाणयुग (छायाचित्र ३) : कुंभाराची भट्टी, इनामगाव
(इ. स. पू. १४००-१०००)



प्रकरण-३ ताम्रपाषाणयुग (छायाचित्र ४) : मातृदेवता, बैल आणि मातीची डबी, इनामगाव
(इ. स. पू. १४००-१०००)

**फलक क्र. तेरा**



प्रकरण-३ ताम्रपाषाणयुग (छायाचित्र ५) : ब्राँझचा रथ, दायमाबाद (इ. स. पू. २०००-१८००)



प्रकरण-३ ताम्रपाषाणयुग (छायाचित्र ६) : प्रौढाचे दफन, इनामगाव
(इ. स. पू. १४००-१०००)

फलक क्र. चौदा



प्रकरण-३ ताम्रपाषाणयुग (छायाचित्र ७) : बालकाचे दफन, इनामगाव
(इ. स. पू. १०००-७००)



प्रकरण-४ महापाषाणयुग (छायाचित्र १) : घोड्याचा लगाम, महापाषाणीय संस्कृती

फलक क्र. पंधरा



प्रकरण-४ (छायाचित्र २) : घोड्याचे मुखालंकार, महापाषाणीय संस्कृती



प्रकरण-४ (छायाचित्र ३) : मणी, महापाषाणीय संस्कृती

**फलक क्र. सोळा**



प्रकरण-४ (छायाचित्र ४) : कोरीव नक्षी केलेले मणी, महापाषाणीय संस्कृती



प्रकरण-४ (छायाचित्र ५) : सोन्याचे अलंकार, महापाषाणीय संस्कृती

**फलक क्र. सतरा**




प्रकरण-४ **महापाषाणयुग** (आकृती १) : **विदर्भातील महापाषाणीय संस्कृतीची स्थळे**

(१) टाकळघाट (२) माहुरझरी (३) नायकुंड (४) भागीमारी (५) रायपूर

**फलक क्र. अठरा**




प्रकरण-४ **महापाषाणयुग** (आकृती २) : **शिलावर्तुळाचा आलेख**

**फलक क्र. एकोणीस**

## प्रकरण ५

# सातवाहन राजवंश *

सातवाहन राजवंशाचा उल्लेख पुराणांनी अन्ध्र किंवा अन्ध्रजातीय असा केला आहे. भारतीय उपखंडाच्या इतिहासामध्ये त्यांना अनन्यसाधारण असे स्थान लाभले आहे.[१] दक्षिण भारताच्या विविध भागावर प्रारंभी काही स्थानिक शासक राज्य करीत होते. सातवाहनांनी जवळजवळ पूर्ण दक्षिण भारतावर इ. स. पहिले शतक ते इ. स. तिसऱ्या शतकाच्या मध्यापर्यंत म्हणजे सुमारे तीन शतके व काही भागात यापेक्षाही जास्त काळ निर्विवादपणे राज्य केले.[२] सातवाहनांच्या विविध भागातील उपलब्ध नाण्यांवरून या साम्राज्य सत्तेचा विस्तार झपाट्याने झाल्याचे दिसते.[३] त्याच्या राज्यात संपूर्ण महाराष्ट्र व आन्ध्र प्रदेश तसेच मध्य प्रदेशाचा काही भाग, गुजरातच्या सौराष्ट्राचा प्रदेश हे भाग दीर्घकाळ नियंत्रणात होते. सातवाहनांच्यावेळी दक्षिण भारतीय द्वीपकल्पाच्या इतिहासात या प्रदेशास प्रथमच मोठ्या प्रमाणामध्ये राजकीय स्थैर्य लाभले व यातूनच आर्थिक विकास व समृद्धी निर्माण झाली. स्वाभाविकपणे ललितकला, साहित्य विशेषतः प्राकृत साहित्याची मोठी परंपरा निर्माण झाली. सातवाहन राजे पौराणिक धर्माचे पुरस्कर्ते होते. त्यांनी अनेक श्रौतयाग केले. त्यांच्या सहिष्णु वृत्तीमुळे बौद्ध धर्माला उदार आश्रय लाभला. एकूण मानवी संस्कृतीशी संबंधित असलेल्या सर्वच क्षेत्रात अभूतपूर्व प्रगती झाल्याचे दिसते.

सातवाहनांचे मूळ स्थान, वंशनाम, उदयाचे निश्चित वर्ष, वारसानुक्रम, राज्यविस्तार याबाबत अनेक कूट प्रश्न असून निश्चित उपलब्ध साधनाअभावी इतिहासतज्ज्ञांनी परस्परविरोधी निष्कर्ष काढल्याचे दिसतात.

## साधने

सातवाहनांचे उत्कीर्ण लेख मोठ्या प्रमाणात उपलब्ध आहेत. तसेच पुराणांनी दिलेले विविध वंशानुक्रम, राजांभोवती केंद्रित झालेल्या उत्तरकालीन वाङ्मयीन दंतकथा व आख्यायिका इत्यादी इतिहास अभ्यासाची प्रमुख साधने आहेत. अर्थात निश्चित कालोल्लेखाअभावी केवळ अक्षरवटिकेवरून अभिलेखांचा काळ ठरविणे किंवा समान नावाच्या एकापेक्षा जास्त राजांच्या उपलब्ध नाण्यांचा काळ निश्चित करताना निर्माण होणाऱ्या अडचणींमुळे अभ्यासकांनी वेगवेगळी मते व्यक्त केली आहेत. विशेषतः विविध पुराणांतून मिळणारे भिन्न वंशानुक्रम व चरित्रे यामुळे परस्पर छेद देणारी मते अभ्यासक नोंदवतात. प्राचीन ग्रंथांमधील वात्स्यायनाचे ''कामसूत्र'',

* या प्रकरणाचे मूळ इंग्रजी लेखन डॉ. अजय मित्र शास्त्री (निवृत्त इतिहास विभाग प्रमुख व ज्येष्ठ नाणे संशोधक, नागपूर विद्यापीठ, नागपूर) यांनी केलेले असून त्याचा हा मराठी भाषेतील अनुवाद डॉ. मालती महाजन (निवृत्त प्राध्यापिका, नागपूर विद्यापीठ) यांनी केलेला आहे.

बाणभट्टाचे "हर्षचरित्र" ही साधने बरीच विश्वासार्ह माहिती पुरवितात. यानंतरच्या काळातील लेखकांमध्ये गुणाढ्याच्या "बृहत्कथे" चे रुपांतर, सोमेदेवाचे "कथासरितसागर", जिनप्रभसुरीचा "कल्पप्रदीप" हे ग्रंथ किंवा एखाद्या घटनेची आश्चर्यकारक नोंद करणारी "लिलावई-कहा" (संस्कृत : "लिलावती-कथा") यांच्या नोंदीतून नवीन प्रश्न उत्पन्न होतात. अर्थात या साधनाचा अभ्यास निर्विकारवृत्तीने करून योग्य निष्कर्षाप्रत येणे शक्य आहे व तसा प्रयत्न येथे केला आहे.

## मूल स्थान आणि नाम

पुराणांमध्ये या राजवंशाचा उल्लेख अन्ध्र किंवा आन्ध्र[४] असा केला असून या वंशाचा संस्थापक सिमुक[५] याचे नाव हस्तलिखितांमध्ये वेगवेगळ्या प्रकारे नोंदविलेले आढळते. त्याचे वर्णन आन्ध्र किंवा आन्ध्रजातीय[६] असे केलेले आहे. उलट कोरीव लेखांमध्ये या वंशाचा उल्लेख नेहमी सातवाहन कुल[७] त्याचप्रमाणे सातवाहन[८] असा केलेला आहे. पुराणे या वंशाचा उल्लेख कुटेही सातवाहन किंवा अशा एखाद्या तत्सम नावाने करीत नाहीत. त्याचप्रमाणे कोरीव लेखांमध्ये आन्ध्र किंवा आन्ध्रजातीय या नावाने या वंशाचा उल्लेख कुटेही केलेला नाही. परंतु राजांच्या वैयक्तिक नाम साधर्म्यावरून पुराणांत उल्लेखिलेले आन्ध्र व कोरीव लेखांमधील सातवाहन हे एकच असावेत याबद्दल शंका वाटत नाही. या राजवंशाबद्दल असलेल्या या स्पष्ट विरोधी परंपरामुळे या वंशाचे मूलस्थान व नामकरण (Nomenclature) याबद्दल बरेच वाद निर्माण झाले आहेत. सातवाहनांचा अभ्यास करणाऱ्या आधीच्या लेखकांनी पौराणिक परंपरा समोर ठेवून, त्याचप्रमाणे आन्ध्रांचे सध्याचे वसतीस्थान आणि आन्ध्र देश या नावातील गर्भितार्थ लक्षात घेऊन या वंशाच्या सत्तेचा उदय प्रथम आन्ध्र प्रदेशामध्ये झाला असे मत व्यक्त केले. असे मत व्यक्त करणाऱ्यांपैकी व्ही. ए. स्मिथ यांच्या मते या वंशाचा संस्थापक सिमुक याच्या राज्यांत कृष्णा–गोदावरीच्या दोआबाचा समावेश होत होता व कृष्णा नदीच्या खालच्या प्रवाहावर असलेले श्रीकाकुलम हे त्याच्या राजधानीचे[९] ठिकाण होते. इ. जे. रॅपसन हे स्मिथच्या मताशी सहमत आहेत. परंतु त्यांच्या मते विदर्भावर आक्रमण करतेवेळी आन्ध्र सत्तेचा विस्तार पूर्व किनाऱ्यापासून[१०] पूर्ण दक्षिण भारतामध्ये झाला होता. एल. डी. बार्नेट यांच्या मते श्रीकाकुलम ही आरंभीच्या काळातील राजधानी होती. त्यानंतर आन्ध्र प्रदेशातील गुंटूर जिल्ह्यातील धानकटक (वर्तमान धरणीकोट) व महाराष्ट्रातील[११] औरंगाबाद जिल्ह्यातील प्रतिष्ठान (वर्तमान पैठण) ही अनुक्रमे राजधानीची ठिकाणे होती. ते पुढे असे म्हणतात की, सातवाहन अथवा सातकर्णि वंशाने तेलगु देशावर[१२] राज्य केले. रा. गो. भांडारकर असे मत व्यक्त करतात की, सातवाहन साम्राज्याच्या दोन राजधान्या होत्या. ज्येष्ठ शासक, जो संपूर्ण साम्राज्याचा स्वामी होता त्याची राजधानी धानकटक[१३] येथे होती. कनिष्ट शासकाने पैटणहून राज्य केले व तीच त्याची राजधानी होती.[१४] जे. एस. बर्जेस म्हणतात की, आन्ध्रांची श्रीकाकुलम

ही आधीची किंवा आरंभीची राजधानी होती आणि परंपरेप्रमाणे हिची स्थापना श्रेष्ठ राजा सुमति, (प्रथम आन्ध्र सातवाहन राजा सिमुक) याने केली होती.[१५] डी. आर. भांडारकर[१५] आणि गुर्टी वेंकटराव[१७] यांच्या मताप्रमाणे आन्ध्र सातवाहनांच्या मूलस्थानामध्ये विशाखापट्टनम् जिल्ह्यासह जुन्या मध्य प्रदेशाच्या दक्षिण भागांचा समावेश होत असावा. ओ. रामचंद्रैया[१८] आणि इतर बऱ्याच विद्वानांनी आन्ध्र हे त्यांचे मूळस्थान असावे हे मत काहीही जास्तीची पुस्ती न जोडता मान्य केले आहे.

परंतु या वंशाचे आरंभीचे सर्व लेख उत्तर महाराष्ट्रात (नाशिक-पुणे) सापडणे व या वंशाच्या सभासदांच्या शिलालेखांमध्ये त्यांचा आन्ध्र म्हणून उल्लेख नसणे या गोष्टी या मताच्या विरोधात जातात. परिणामतः बऱ्याच इतिहासकारांचे असे मत आहे की, सातवाहनांनी महाराष्ट्रात राज्य करावयास प्रारंभ केला व गौतमीपुत्र सातकर्णीनंतर त्यांनी आपल्या सत्तेचा आन्ध्र प्रदेशात विस्तार केला आणि त्यांना आन्ध्र हे नामभिधान प्राप्त झाले. पुराणातील ऐतिहासिक वृत्तांताची रचना करण्याच्या अगदी थोड्या काळापूर्वी त्यांची सत्ता आन्ध्र प्रदेशापुरतीच सिमीत होती आणि पुराणकारांना याची माहिती होती. म्हणून त्यांनी या वंशाचा उल्लेख केवळ आन्ध्र किंवा आन्ध्रजातीय असा केला असे मत व्ही. एस. बखले,[१९] अ. स. आळतेकर,[२०] वा. वि. मिराशी[२१] आणि एच. सी. रायचौधरी,[२२] यांनी व्यक्त केले आहे. के. गोपालाचारी यांनी पौराणिक परंपरा व कोरीव लेख यातील स्पष्ट दिसणारी विसंगती जरा वेगळ्या रीतीने दूर केलेली आहे. प्रथम त्यांनी असे प्रतिपादन केले आहे की, उपलब्ध प्राचीन शिलालेखीय व नाणकशास्त्रीय पुरावा आरंभीच्या सातवाहन राजांच्या सत्तेचा केंद्रबिंदू पश्चिम-दक्षिण भारतात होता एवढेच निर्विवादपणे दाखवितो असे नाही, तर आरंभीच्या सातवाहनांनी आन्ध्र प्रदेशावर[२३] राज्य केले नाही असेही दर्शवितो. ह्या मताची पुराणातील सातवाहनांचे आन्ध्र किंवा आंध्रजातीय या वर्णनाशी सांगड घालण्याकरीता ते असे म्हणतात की, आपत्तीच्या काळात त्यांनी मौर्य सत्तेचे शासक (नोकर) म्हणून काम केले असावे व या नात्याने ते पश्चिम-दक्षिण भारतामध्ये मौर्यांचे राज्यपाल म्हणून गेले असावेत. त्यामुळेच त्यांना पुराणांमध्ये आन्ध्रभृत्य[२४] ही संज्ञा दिली असावी.

वाङ्मयीन व पुरातत्वीय माहितीचा मेळ घालून काही निष्कर्ष काढावयाचे असतील तर उपलब्ध पुराव्याचे निर्विकार मनाने योग्य परीक्षण करणे आवश्यक आहे. तेव्हा प्रथमतः जर राजवंशाचे कोरीव लेख[२५] व इतर लेख सापडलेली ठिकाणे हीच विशिष्ट प्रदेशाचा सातवाहन राज्यात समावेश होत होता हे ठरविण्याचे मुख्य गमक किंवा कसोटी लावण्याची साधने असतील तर सातवाहन राज्यात फक्त नाशिक व नाणेघाट (पुणे) या प्रदेशांचाच समावेश करावा लागेल. दुसरे असे की, पुराव्यांच्या आधारे पुराणांतील राजवंश विभागाच्या रचनाकारांना आंध्र मूलस्थानाच्या वस्तुस्थितीविषयी अज्ञान असेल म्हणून दोषी धरता येत नाही, कारण सातवाहनांचे राज्य या

राजवंशाच्या फक्त शेवटच्या कालखंडात आन्ध्र प्रदेशापुरते मर्यादित होते. नंतरच्या सातवाहनांनी महाराष्ट्रावरील राज्य गमावले होते हे वादापुर[25] जरी मान्य केले तरी त्यांचे शासन आन्ध्र देशापुरते[26] सिमित होते. "मत्स्यपुराणा" तील ज्याची रचना यज्ञ सातकर्णीच्या काळात झाली तो वृत्तांत यज्ञ सातकर्णिपर्यंत उपलब्ध आहे. पुराणांमधील वृत्तांत हे भविष्यात्मक स्वरूपाचे असतात. परंतु याठिकाणी मात्र वर्तमानकाळ वापरला असून हा राजा नवव्या शासन वर्षी राज्य करीत होता असे म्हटले आहे. नव वर्षानी यज्ञश्री:सातकर्णीकः[27] या ओळीवरून हे सिद्ध होते की, पुराणातील या वृत्तांताची रचना प्रथमतः यज्ञच्या नवव्या शासनवर्षी संपली होती आणि यज्ञच्या वेळेस सातवाहन राज्य आन्ध्र प्रदेशाइतके मर्यादित असण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. इतरत्र दाखविल्याप्रमाणे सातवाहन वंश त्याची इतर प्रांतातील सत्ता नष्ट झाल्यावरही काही दशके आन्ध्र देशावर नव्हे तर विदर्भावर राज्य करीत होता. तेव्हा पुराणकारास उत्तरकाळात प्रत्यक्ष स्वामित्व असलेल्या प्रदेशान्वये नोंद करावयाची असती तर आन्ध्राऐवजी ती वैदर्भीय अशी केली असती. या वंशाचा तिसरा राजा म्हणजे सातकर्णीपासून[28] या घराण्याच्या राजांना दक्षिणापथपति, दक्षिणापथस्वामी[29] अशी नावे देण्यात आली आहेत. ही नावे विशाल अर्थाने तामिळ प्रदेश सोडून पूर्ण दक्षिण भारताचा निर्देश करतात. काही वेळा दक्षिणापथ या नावाने फक्त महाराष्ट्राचा निर्देश केला आहे.[30] तथापि हा निर्देश केवळ महाराष्ट्रापुरता मर्यादित नाही. "पेरिप्लस ऑफ दि एरिथ्रीयन सी" या पुस्तकाचा निनावी लेखकसुद्धा दच्छिनबेडस हे नाव विशाल अर्थाने वापरतो व लिमरिके-तमिळ देशापासून[31] हा प्रदेश वेगळा काढतो. जर एखाद्याचा काही विद्वानांप्रमाणे[32] तेलगु देशाचा सातवाहन राज्यात फक्त वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या वेळेपासूनच अंतर्भाव करण्यात आला असा विश्वास असेल, तर त्याचा पिता गौतमीपुत्र सातकर्णि याने केलेल्या त्याचे वाहनांनी तीन समुद्राचे पाणी प्याले होते (ति-समुद्र-तोय-पीत-वाहनस)[33] ह्या दाव्याचे स्पष्टीकरण देणे कठीण होईल. आरंभी सातवाहनांचा तेलगु देशाशी संबंध दर्शविणारा पुरातत्वीय पुरावा उपलब्ध नव्हता. परंतु अलीकडे या वंशाचा संस्थापक सिमुक किंवा छिमुक याची नाणी आन्ध्र प्रदेशात[34] करीमनगर[35] आणि संगरेड्डी येथे सापडली आहेत. त्यामुळे तेलगु देशाचा अंतर्भाव सातवाहन राज्यामध्ये या वंशाच्या संस्थापकाच्या वेळेपासूनच होत होता याबद्दल संशय राहू नये.

सातवाहन नाव असलेली नाणीसुद्धा समकालीन असली पाहिजेत. तसेच संस्थापकापासून चौथ्या पिढीत असलेला सातवाहन राजपुत्र शक्तिकुमार याचेही नाणे आन्ध्र प्रदेशात[36] कर्नुल जिल्ह्यात सातनीकोटा येथील उत्खननात विशिष्ट थरात (Stratified Find) सापडले आहे. सातवाहन राजांमध्ये पुलुमावि[37] हे फार प्रिय नाव आहे. या नावाची वेगवेगळी रूपे जसे-पुलुमावि, पुदुमावि, पुलहमावि आणि पुलुमायि[38] वगैरे आढळतात. खरं म्हणजे या नावामध्ये दोन शब्द, पुलु + मावी हे आहेत. तेलगु भाषेत पुलु म्हणजे गवत आणि हा शब्द आजही प्रचलित आहे व

या शब्दापासून तयार झालेला पुल्लारी वा संयुक्त शब्दाचा अर्थ होतो चराई कर. मावी म्हणजे जन्मापूर्वी मूल मातेच्या उदरात ज्या पातळ, मऊ आच्छादनात राहते ते आच्छादन. आपल्या माहितीप्रमाणे स्कंदाने गवताच्या आच्छादनामधून जन्म घेतला म्हणून त्याला सर-जन्मन हे नाव प्राप्त झाले. म्हणून पुलुमावि म्हणजे तेलगुमध्ये सर-जन्मन किंवा स्कंद-कार्तिकेय[३९] होय. पुराण रचनाकारांनी या शुद्ध तेलगु[४०] नावाचे संस्कृत रूप तयार करताना अनुभवलेल्या कित्येक अडचणीमुळे याचे विविध उच्चार केलेले दिसतात. उदा. पुलोमावी,[४१] पुलोमावीद, पुलोमावीर, पदुमावीर, पतुमावीर, पत्रमावीर, शतुमावीर, शदुमावीर शदुमावी, पुलोमा, पतुमान, पद्युमान, वतमान, अतमान, अथमान, अम्दमान, अर्दमान, रचमान,[४२] पुलोमा,[४३] सुलोमा, पुलिमान, पुरीमान, पुत्रिमान,[४४] पुलीमाची, पुलोमार्चि, पुलोमादी, अनुलोमावी, सलोमादी, मलोमादी[४५] इत्यादी. सातवाहनांनी गौतमीपुत्र सातकर्णीच्या[४६] शासनकालाच्या शेवटी किंवा त्याचा पुत्र व वारस वाशिष्ठीपुत्र पुलुमावीच्या[४७] शासनकालाच्या आरंभी चांदीची प्रतिमायुक्त द्विभाषिक लेखयुक्त नाणी पाडली. याच नाण्यांच्या मागच्या बाजूवर द्रविड भाषेचा उपयोग केला. यावरून असे दिसून येईल की, त्यांचे मूलस्थान दक्षिण भारतात होते आणि जेव्हा इतर पुरावा ते आन्ध्र प्रदेशात होते असे दर्शवितो तेव्हा त्यांचे मूलस्थान आन्ध्र प्रदेशात होते याबद्दल संशय राहू नये. अलीकडेच आन्ध्र प्रदेशात करीमनगर जिल्ह्यामध्ये कोटलिंगाल व संगरेड्डी येथे सापडलेली आरंभीच्या सातवाहनांची नाणी सातवाहनांच्या राजकीय सत्तेचे मूळ केंद्रस्थान असलेल्या प्रदेशाचा निर्देश करतात. आन्ध्र हे नाव या प्रदेशातील कृष्णा, गोदावरी दुआबासाठी केवळ नसून ते तेलगू भाषीय किंवा आन्ध्र लोकांची वसाहत असलेल्या प्रदेशाचा निर्देश करण्यासाठी उपयोगात आणले असावे. बौद्ध पाली साहित्यानुसार मज्झिम देशाच्या दक्षिणेला अगदी जवळच आन्ध्र राहत असण्याचा संभव आहे आणि मज्झिम देशाच्या दक्षिण सीमेवर[४८] असलेले ''सेतकन्निक'' या शहराचा कदाचित सातवाहनाशी संबंध असावा. ऐतरेय ब्राह्मणांमध्ये (सात, ९२.१८) आन्ध्रांचा आर्य प्रदेशाच्या दक्षिणेला राहत असलेल्या पुण्ड्र, शबर, पुलिंद आणि पुतिब या लोकांबरोबर उल्लेख आहे. आन्ध्र हे विन्ध्य पर्वताच्या दक्षिणेला राहत होते. आन्ध्र प्रदेशातील तेलंगना विभागात सातवाहन सत्तेचे मूळ केंद्र होते असे समजण्यात स्वाभाविकतः काही अडचण नाही.[४९] सातवाहनांचा संबंध अशोकाच्या लेखातील सतियपुत्राशी जोडण्याचा प्रयत्न केला आहे. सातवाहन सतियपुत्रांचे वंशज[५०] किंवा प्रतिनिधी म्हणून सांगण्याचा काही विद्वानांनी केलेला प्रयत्न स्वीकारार्ह नाही.[५१] सातवाहन हे आन्ध्र प्रदेशातून आले म्हणून पुराणांमध्ये त्यांना आन्ध्र किंवा आन्ध्रजातीय असे म्हटले आहे. सातवाहनांचा आन्ध्र हा मूळ प्रदेश असून ते आन्ध्रवंशीय होते. सातवाहन किंवा सादवाहन हे त्यांचे कुलनाम होते.[५२] आन्ध्रातील अन्य लोकांपासून स्वतःचे वेगळेपण स्पष्ट व्हावे या हेतूने त्यांनी सातवाहन हे नाव धारण केले होते. त्यांच्या कोरीव लेखातून सातवाहन अशी नोंद मिळते.

**आन्ध्रभृत्य :** पुराणांमध्ये सातवाहनांचा निर्देश आन्ध्रभृत्य वा आन्ध्र या शब्दांनी केला आहे असे मत आहे त्याकडे वळू. आर. जी. भांडारकरांनी प्रथम ही कल्पना प्रसृत केली. त्यांना असे वाटले की, या शब्दांचा उपयोग पुराणांमध्ये सातवाहन हे नोकर किंवा परावलंबी होते[५३] असे सांगण्यासाठी केला आहे. हा कर्मधारेय समास ठरतो, तर व्ही. एस. सुकथनकरांनी हा शब्द तत्पुरुष समासाने घेऊन त्याचा अर्थ आन्ध्रांचे नोकर असा घेतला. ह्याप्रमाणे त्यांच्या मते सातवाहन हे स्वतः आन्ध्र नव्हते तर आन्ध्रांचे सामंत[५४] होते. आर. जी. भांडारकरांची कल्पना के. गोपालाचारी यांनी पुन्हा पुढे मांडली. त्यांनी संबंधित शब्दाचा अर्थ "आन्ध्र नोकर" असा घेतला कारण त्यांच्या मते सातवाहन हे मूळचे आन्ध्र होते आणि पश्चिम भारतामध्ये[५५] नियुक्त केलेले मौर्यांचे अधिकारी किंवा शासक होते. जी. व्ही. राव यांनी भांडारकर व गोपालाचारी यांची मते ग्राह्य मानून आन्ध्रभृत्य व आन्ध्र जातीय यांची अदलाबदल होऊ शकते असे समजून त्यांना एकत्र घेऊन सातवाहन हे आन्ध्र समाजाचे होते व त्यांनी कोणत्यातरी सार्वभौम सत्तेचे नोकर म्हणून सत्ता प्राप्त केली होती असा अर्थ लावला.[५६]

तथापि, ही सर्व स्पष्टीकरणे निरर्थक व अनावश्यक आहेत. कारण पुराणकारांनी आन्ध्रभृत्य या शब्दाचा उपयोग सातवाहनांसाठी[५७] केला नसून त्यांच्यानंतर राज्यावर येणाऱ्या सामंत लोकांसाठी केला आहे.[५८] हा शब्दसमुह सुकथनकरांनी दिल्याप्रमाणे तत्पुरुष समास म्हणूनच घेतला पाहिजे. परंतु त्याचा उपयोग सातवाहनानंतरच्या येणाऱ्या राजांसाठी केला आहे.

## सातवाहन कुल

सातवाहन हे कुळाचे (clan) नाव होते व सातकर्णि हे घराण्याचे[५९] नाव होते. वा. वि. मिराशीसुद्धा असे म्हणतात की, तिसरा सातवाहन राजा सातकर्णि याच्या राजवटीनंतर हे घराणे या राजाच्या नावावरून सातकर्णि कुल या नावाने प्रसिद्धीस आले व त्यामुळे पूर्वीचे सातवाहन कुल हे नाव मागे पडले.[६०] विशेष म्हणजे पौराणिक यादीमध्ये सातकर्णिनंतर व गौतमीपुत्र सातकर्णीच्या आधी ह्या नावाचा जो राजा आहे तो म्हणजे सातकर्णि दुसरा होय. तो आपल्यासारखे नाव असणाऱ्या आधीच्या राजापासून फक्त एका पिढीने वेगळा झालेला आहे. वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या एकोणीसाव्या शासन वर्षीच्या लेखातसुद्धा या घराण्याचा उल्लेख सातवाहन कुल असा आहे आणि गौतमीपुत्र सातकर्णीची सातवाहन कुलाची[६१] प्रतिष्ठा स्थापन करणारा म्हणून प्रशंसा केलेली आहे. गौतमीपुत्र सातकर्णीनंतरच हे घराणे सातकर्णि या नावाने प्रसिद्ध झाले. तरीही सातकर्णि हे व्यक्तिनाम म्हणूनही प्रचारात होते ही गोष्ट नाण्यांवर ती नाणे पाडणाऱ्या व्यक्तीच्या नावामागे सन्मानदर्शक सिरी (श्री) हा शब्द असलेल्या लेखांचे वर्गीकरण केल्यास स्पष्ट होईल. याप्रमाणे वासिष्ठीपुत्र पुलुमावीचे वैयक्तिक नाव सातकर्णि होते. परंतु बहुतेक वेळा हे घराण्याचे आडनाव म्हणून वापरलेले दिसते आणि स्कंद, यज्ञ, विजय, कुम्भ, कर्ण

आणि सक या राजांनी आपल्या व्यक्तिगत नावासमोर हे नाव आडनावाप्रमाणे जोडले होते. परंतु नंतरच्या काळात हे या राजघराण्याचे नाव म्हणून इतके प्रसिद्ध झाले की, या काळातील राजवंशांनी या घराण्याचा उल्लेख सातकर्णि[६२] म्हणून केला आहे. तथापि, उपलब्ध पुराव्यानुसार या कुळाचा उल्लेख या राजघराण्याच्या अंतापर्यंत सातवाहन या नावानेच केलेला आहे याबद्दल संशय नाही. हे निश्चितच फार लोकप्रिय नाव[६३] होते. काही वेळेस हे राजघराण्याचे नाव दन्तमूलीय वर्णाप्रमाणे (सातवाहन) आणि काही वेळेस तालव्य (Palatal sibilant) वर्णाप्रमाणे (शातवाहन) असे लिहिलेले आढळते. तथापि, आधीच्या बहुतेक ग्रंथ निर्देशांमध्ये सातवाहन याच रुपाचा स्वीकार केलेला आढळतो आणि हेच बरोबर असले पाहिजे. बाण (हर्षचरित), राजशेखर (काव्य मिमांसा), सोमदेव (कथासरितसागर), हेमचंद्र (अभिधान-चिन्तामणि आणि अनेकार्थ-कोश) यांनी तसेच बौद्ध ग्रंथाचा (आर्य–मंजुश्री-कल्प) लेखक इत्यादी प्राचीन लेखकांनी या नावाचा प्रारंभ दन्तवर्णांनी[६४] केलेला आहे. प्राचीन ग्रंथांपैकी फक्त वात्स्यायनाचे कामसूत्र हाच एक ग्रंथ असा आहे की, यामध्ये या नावाचा प्रारंभ ''शा'' या तालव्य वर्णाने[६५] केला आहे. परंतु बहुसंख्य प्राचीन भारतीय ग्रंथकारांनी या नावाचा प्रारंभ ''सा'' या शब्दाने केला आहे हे लक्षात घेता शेवटी उल्लेखिलेल्या ग्रंथामध्ये या नावाचा उच्चार कदाचित नक्कल उतरविण्याच्या चुकीमुळे अशुद्ध लिहिला गेला असावा असे म्हणावे लागेल. याप्रमाणे या राजघराण्याची नाणी व कोरीव लेख यामध्ये आढळणारे या नावाचे ''सा'' या शब्दाने सुरू होणारे मूळ रूपच बरोबर आहे असे ग्राह्य धरून काही इतिहासकारांनी[६६] ''शा'' या वर्णानी सुरू केलेल्या (शातवाहन) नावाचा उपयोग संयुक्तिक वाटत नाही.

सातवाहन या नावाची उत्पत्ती व गर्भितार्थ हे मध्ययुगीन भारतीय ग्रंथकार तसेच संशोधक व भाषातज्ञ यांना पडलेले एक कोडे आहे. हे नाव का पडले असावे याविषयी अनेक तर्क केले आहेत व कल्पनारम्य उत्पत्ती दिल्या आहेत. ''कथासरित-सागर'' या ग्रंथाचा लेखक सोमदेव (इ. स. १२ वे शतक) हा अशी गोष्ट सांगतो की, सात नावाचा एक यक्ष होता. तो स्वतः सिंहाचे रूप धारण करून एका मुलाला पाठीवर बसवून नेत असे. एकदा तो असाच जात असताना त्याला जंगलामध्ये शिकार करण्यास आलेला पुत्रहीन राजा दीपकर्ण याने पाहिले. त्याने त्याला आपल्या राजधानीत नेले व त्याचा पुत्र व वारस म्हणून स्वीकार करून त्याला सातवाहन[६७] हे अर्थपूर्ण नाव दिले. या नावाचा अर्थ स्पष्ट करण्याच्या दृष्टीने इतकीच सुंदर कथा जैन लेखक जीनप्रभ सुरी याने आपल्या ''कल्प-प्रदीप'' या ग्रंथात सांगितली आहे. या कथेप्रमाणे एका ब्राह्मण विधवेस नागराज शेष ाच्याशी झालेल्या राक्षस विवाहानंतर पुत्र झाला. त्यानंतर नागराज तिला जेव्हा जी मदत लागेल ती देण्याचे वचन देऊन निघून गेला. तो मुलगा नंतर कुंभाराच्या घरात वाढला. इतर मुलांबरोबर खेळताना तो राजाप्रमाणे वागे आणि मुलांमध्ये मातीचे केलेले रथ, घोडे, हत्ती व इतर वाहने वाटून देई. तो वाहने वाटत असे म्हणून त्याला सातवाहन हे नाव पडले.

यातील सात हा शब्द सान म्हणजे देणे (to give) या मूळ रुपातून आलेला आहे व वाहन हा शब्द याबरोबर जोडला म्हणजे "ज्याने वाहने दिली तो"[६८] असा अर्थ होतो. या मध्यकालीन परंपरांवरून असे दिसते की, वरवर अर्थहीन दिसणाऱ्या या नावाचे खरे महत्त्व मागे पडून त्याचे स्पष्टीकरण देण्याच्या अथवा अर्थ लावण्याच्या इच्छेतून अशी उपाख्याने निर्माण झाली.

जे. प्रिझलुक्सी, एल. डी. बार्नेट, ए. एस. जोगळेकर, के. गोपालचारी, डी. डी. कोसंबी, पी. बी. देसाई, आय. के. सर्मा, टी. जी. अर्वमूथन, के. पी. जायस्वाल, अ. स. आळतेकर, वि. का. राजवाडे वगैरे विद्वानांनी याबाबत विविध प्रकारची मते व्यक्त केली आहेत. जे. प्रिझलुक्सी यांनी या नावाचा मुण्ड भाषेशी संबंध लावण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या मताप्रमाणे सदाम,[६९] सादम[७०] आणि सादाम[७१] या शब्दांचा मुण्ड कुलीन भाषांमध्ये "घोडा" असा अर्थ होतो आणि हन आणि हपन या शब्दांवरून मुलाचा बोध होतो. या शब्दांचे संस्कृतिकरण करून सातवाहन या नावात एकत्र आणले तर सातवाहन या शब्दाचा अर्थ "घोड्याचा पुत्र" असा होतो. सातवाहन हे नाव प्राप्त होण्याचे कारण म्हणजे सातवाहन स्वतःला अश्वमेध यज्ञप्रसंगी[७२] घोडे व पट्टराण्या यांच्या धार्मिक विधीद्वारे जन्माला आलेले पुत्र समजतात. हे स्पष्टीकरण अतिशय अव्यवहार्य वाटते, असे थोडक्यात म्हणावे लागेल. सातवाहन घराण्याच्या तिसऱ्या राजाने अश्वमेध यज्ञ केला होता आणि हे घराणे तर प्रारंभापासून सातवाहन या नावाने ज्ञात होते. याशिवाय सातवाहन हे प्राकृतचे आश्रयदाते व वैदिक धर्माचे पालन करणारे होते. त्यामुळे त्यांनी मुण्ड भाषिक नाव, आडनाव धारण केले असेल हे विश्वसनीय वाटत नाही. कारण या अर्थामुळे ज्यांनी अश्वमेध यज्ञ केले आहेत त्या सर्वच राजघराण्यांनी स्वतः या नावाप्रमाणेच नावे धारण करावयास हवीत. परंतु अशा प्रकारचे एकही नाव आपल्याला उपलब्ध नाही. एल. डी. बार्नेट यांच्या मते सातवाहन आणि सतियपुत्र[७३] हे एकच आहेत आणि सातवाहन हे विशेषनाम व सामान्य नामाचे संयुक्त रूप आहे. सात हे विशेषनाम होते, आणि वाहन हे कन्नड भाषेतील मागन या शब्दाचे संस्कृत रूप आहे. त्याचे वागन असे रुपांतर होऊ शकते. जेंव्हा संयुक्त शब्दामध्ये हा दुसरा शब्द असतो तेव्हा त्याचा अर्थ "पुत्र" असा होईल. याप्रमाणे मूळ सातवाहनाचे रूप सातवा वंशज असा होईल. नंतरच्या काळात याचे सातवाहन हे संस्कृत रूप अस्तित्वात आले.[७४] परंतु नावाचे हे स्पष्टीकरण बऱ्याच कारणांमुळे फारच काल्पनिक वाटते. यापैकी मुख्य कारणे अशी आहेत :– (१) जेव्हा सातवाहनांनी चांदीची द्विभाषिक लेखयुक्त प्रतिमा छाप नाणी पाडण्यास प्रारंभ केला तेव्हा नाण्याच्या मागील बाजूवर मातेच्या गोत्रनामानंतर[७५] द्राविडियन भाषेतील माकन हा (माकन–पुत्र या अर्थी आलेला शब्द) शब्द घातला आणि यज्ञ सातकर्णीच्या काळात त्याचे प्राकृत/संस्कृत रूप "पुत" घेतले. जर वाहन या शब्दाचे संस्कृत रूप आधीच प्रचारात असते तर दुसरा शब्द तयार करण्याऐवजी तोच शब्द (संस्कृत रूप) नक्कीच वापरला असता. (२) त्यांनी नाण्यांवर

सातवाहन किंवा सातकर्णि या शब्दाचे संक्षिप्त रूप "सात" हे वापरलेले दिसते, त्याचप्रमाणे ते सातकर्णि हा "सात" आणि "कन्या" हे दोन शब्द मिळून तयार झालेला संयुक्त शब्द आहे असे समजतात. शिवाय त्यांच्या मते "कन्य" हे "कन्या" (मुलगी) या शब्दाचे पुल्लिंगी रुप आहे. याप्रमाणे सातकन्य, जे सातकर्णि या नावाचे मूळ रूप असावे, त्याचासुद्धा अर्थ सात नामक व्यक्तीचा पुत्र किंवा वंशज असाच होईल. हे स्पष्टीकरण सातवाहन आणि सातकर्णि ही दोन्ही नावे समानार्थी आहेत असे सुचविते. यापैकी एक नाव कानडी मागन या शब्दाचे संस्कृत रूप सात हा शब्द घेऊन तयार झालेले आहे तर दुसरे नाव सातच्या पुढे पुत्र या शब्दाचा निर्देश करण्यासाठी "कन्या" या शब्दाचे पुल्लिंगी रूप असलेला "कन्य" हा शब्द जोडून तयार झाले आहे. हे मत जे. प्रिझलुक्सी च्या मताप्रमाणेच वर दिलेल्या कारणांमुळे पटण्यासारखे नाही. त्याचप्रमाणे कोठेही "कन्या," "मुलगी" या शब्दाचे पुल्लिंगी रूप दिलेले नसताना त्याच्या अस्तित्वाची कल्पना करणे समर्थनीय टरत नाही. त्यामुळे या मताचा गंभीरपणे विचार करणे शक्य नाही. के. गोपालाचारी यांचे आधी असे मत होते की, आन्ध्र हे मौर्यांचे लष्करी अधिकारी होते. मौर्यांकडून त्यांना त्यांच्या लक्षणीय कामगिरीबद्दल वाहन मिळाले. त्याचा परिणाम म्हणून त्यांना सातवाहन, "वाहन घेणारा"[७६] हे नाव प्राप्त झाले. अ. स. जोगळेकर यांना असे वाटले की, प्राचीन भारतीय परंपरेप्रमाणे जो सूर्य सात घोडे जोडलेल्या रथामध्ये आरुढ होतो त्या सूर्याचे हे परम उपासक होते म्हणून त्यांना सातवाहन म्हणतात. सात हे संस्कृत सप्त या शब्दाचे प्राकृत रूप आहे. याप्रमाणे सातवाहन म्हणजे ज्याला त्याच्या सात अश्वयुक्त रथामुळे[७७] सातवाहन किंवा सप्तवाहन अशी पदवी देता येईल तो सूर्य. नंतर गोपालाचारींनाही हे मत पटले होते. विष्णुसहस्रनामामध्ये विष्णुच्या हजार नामांपैकी सप्तवाहन हे एक नाव आहे आणि विष्णु व सूर्य यांचा संबंध सर्वज्ञात[७८] आहे. भाष्यकार सप्तवाहन या शब्दाचा अर्थ एकतर त्याच्याजवळ सात घोडे होते किंवा सप्त[७९] नावाचा एकच घोडा होता असा लावतात. "स्कंद पुराणा" तील काशी खंडातही सूर्याकरता सप्तवाहन हे विशेषनाम वापरलेले आहे. याप्रमाणे सूर्य आणि विष्णु या दोघांनाही सप्तवाहन ही संज्ञा दिलेली आहे. गोपालाचारींनी ही उत्पत्ती सातवाहन सूर्यवंशी क्षत्रिय होते.[८०] या त्यांच्या सिद्धांताला पूरक आहे असे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. डी. डी. कोसंबी यांच्या मते सात हा शब्द संस्कृत शब्द सप्ति म्हणजे अधविशेषत्वाने भगवान सूर्याचा अध या शब्दाचे अशुद्ध रूप आहे. या नावाचे शुद्ध रूप सप्तिवाहन हे आहे असे सांगतात.[८१] पी. बी. देसाई यांचे मते सात हे संस्कृत "शात" चुणचुणीत, रोड, चपळ अथवा देखणा या शब्दाचे चुकीचे रूप आहे. आणि वहन म्हणजे वाहन. याप्रमाणे सातवाहन म्हणजे चपळ अश्वावर आरुढ होतो तो.[८२] कोसंबी प्रमाणेच आय. के. सर्मा यांचा असा विश्वास आहे की, या घराण्याच्या नावाचे शुद्ध रूप सप्तिवाहन असे आहे आणि ते सातवाहनांच्या वैष्णव धर्माकडे असलेल्या ओढीचाही उल्लेख करतात.[८३] काही इतर विद्वान या नावाचा संबंध सातवाहनांच्या प्रबळ लढाऊ जहाजांचा ताफा किंवा आरमाराशी जोडतात.

टी. जी. अर्वमूथन यांच्या मते वाहन आणि कर्णिन या दोन्ही शब्दांचा अर्थ वल्हे असा होतो आणि सातवाहनांच्या मालकीच्या शंभर वल्ले[८४] असलेल्या बऱ्याच नावा होत्या म्हणून त्यांना सातवाहन (संस्कृत शुद्ध रूप शतवाहन) हे नाव दिले गेले. के. पी. जायस्वाल यांना असे वाटले की, सात हे स्वाति म्हणजे तलवार या शब्दाचे चुकीचे रूप आहे आणि त्यांनी सातवाहन हे नाव ''तलवार धारण करणारा'' या अर्थाने घेतले.[८५] तथापि अ. स. आळतेकर[८६] यांच्या म्हणण्याप्रमाणे स्वाति या शब्दाचा 'अर्थ जरा विलक्षणच आहे आणि जर या नावाचा हा अर्थ अभिप्रेत असेल तर हे नाव सातवाही असे हवे. सातवाहन[८७] असे नको. वि. का. राजवाडे यांनीही सातवाहन किंवा नंतरच्या काळात या नावाचे चुकीचे किंवा अतिवर्णीत संस्कृत रूप घेतलेला शालिवाहन या नावाचा अर्थ वेगवेगळ्या कल्पनारम्य रितीने सांगण्याचा प्रयत्न केला आहे.[८८] अर्थात तो स्वीकारार्ह नाही.

या सर्व आणि इतर सिद्धांतांमधील मुख्य दोष असा आहे की, हे सर्व सिद्धान्त सातवाहन हे नाव कोणत्यातरी संस्कृत नावाचे सुधारित किंवा चुकीचे रुपांतर आहे या तत्त्वावर आधारलेले आहेत. वर उल्लेखिलेल्या सर्व संस्कृत ग्रंथातील संदर्भावरून असे निश्चित प्रतित होते की, हेच रूप बरोबर आहे अथवा हेच खरे नाव आहे आणि परिणामतः याचे मूळ शोधण्याची काहीच गरज नाही. आपण ते जसे आहे त्याचाच अर्थ लावला पाहिजे आणि सातवाहनांचे लेख व नाणी यामध्ये हे नाव जसे आहे तसे घेऊन त्याचा समाधानकारक अर्थ लावणे शक्य आहे. सातवाहन आणि सादवाहन[८९] अशी जी दोन नावे लेख व नाणी यावर मिळतात त्यातील ''त'' आणि ''द'' ही अक्षरे प्राकृतमध्ये एकमेकांची जागा घेऊ शकतात. म्हणून आपण सातवाहन-सादवाहन ही नावे, त्यांचे कोणतेही दुसरे स्वरुप न कल्पिता जशी आहेत तशीच घेऊन त्यांचा अर्थ स्पष्ट केला पाहिजे. सादवाहन याचा अर्थ ''घोडेस्वार'', ''अश्वारोही'' असा घेतला पाहिजे. साद म्हणजे घोडा आणि वाहन म्हणजे स्वार होणे. हा अर्थ अमरसिंहाच्या ''नाम-लिंगअनुशासन'' किंवा ''अमरकोश[९०]'' आणि ''मदिनीकोश[९१]'' यामध्ये दिलेल्या सादिन या शब्दाच्या अर्थाशी जुळेल किंवा त्या अर्थासारखा होईल. प्रत्यक्ष साद हा शब्द या अर्थाने खूप आधी म्हणजे ऋग्वेदात वापरला आहे, तर महाभारतात[९२] सादिन हा शुब्द याच्या समानार्थाने वापरला आहे. सातवाहनांचे घोडदळ चांगले बलिष्ठ होते आणि पहिला सातवाहन राजा सिमुक किंवा छिमुक जो सातवाहन किंवा सादवाहन ह्या नावानेही ज्ञात होता, त्याच्या झंझावाती यशाचे रहस्य बव्हंशी त्याच्या उत्कृष्ट घोडदळामध्ये असावे. नावाचे मूळ स्वरुप कायम ठेवून हे स्पष्टीकरण देता येते हे विशेष.

अशाच प्रकारे सातकर्णि या नावाची उत्पत्ती शोधण्याचा प्रयत्न टी. जी. अर्वमूथन, वि. का. राजवाडे यासारख्या विद्वानांनी केला. टी. जी. अर्वमूथन संगम साहित्यात उल्लेखिलेला कन्नड राजा नुल्लुवर याचे सातवाहन राजाशी नुल्लुवर या नावाच्या अर्थाच्या आधारे तादात्म्य कल्पितात, पहा–नुल्लु-सात, कर्णि-कर्ण=वल्हे,[९३]

वि. का. राजवाडे यांच्या मते सातकर्णि हे नाव सातकर्ण या नावापासून शतकर्णचा पुत्र या अर्थाने आले आहे. शतकर्ण म्हणजे ज्याच्या बैलांच्या कानामध्ये शंभर हा आकडा लिहिला आहे तो. या घराण्याच्या नावाचे मूळचे पूर्ण स्वरूप सातकर्ण-वाहन असे असले पाहिजे. या नावातील मधला कर्ण हा शब्द नाहीसा झाल्यावर त्याचे सातवाहन असे संक्षिप्त रूप तयार झाले.[९४] ही सर्व स्पष्टीकरणे सातकर्णि हे चुकीचे किंवा अशुद्ध रूप आहे किंवा एखाद्या संस्कृत शब्दाचे प्राकृत रूप आहे. या गृहीत तत्त्वावर आधारलेली असल्यामुळे असमर्थनीय आहेत. तथापि सातकर्णि हेच शुद्ध संस्कृत रूप आहे असे कालिदासाच्या ''रघुवंशा'' मध्ये (१३.३८.४०) सातकर्णि म्हणून दिलेल्या साधूच्या नावावरून खात्रीपूर्वक म्हणता येते. भाष्यकारांनी या नावाचा अर्थ कर्ण म्हणजे कानाचे सुख भोगणारा असा दिला आहे.[९५] या नावामध्ये कुठलाही बदल न करता त्याचे उपलब्ध मूळ स्वरूप लक्षात घेऊन त्याचा अर्थ पाहिला पाहिजे. 'सातकर्णाचा पुत्र'' हा अगदी संभाव्य शब्द असून त्याचा अर्थ घोड्याच्या कर्णाचा असा होतो. जरा विचित्र वाटणारे हे नाव प्रत्यक्षात प्रचलित होते. जसे जातुकर्ण्य=जातुकर्णाचा पुत्र=लांखेच्या कानाचा. सातकर्णि आणि सातवाहन या नावाच्या अर्थाबाबत दिलेले स्पष्टीकरण मात्र काहीसे तर्कावरच आधारित आहे. अर्थात मूळ नाव विचारात घेऊन दिल्यामुळे वास्तवाशी जास्त जवळचे ठरते.

वा वि. मिराशी यांनी म्हटल्याप्रमाणे सातवाहन वंशनामाच्या इतर व्युत्पत्ती केवळ काल्पनिक आहेत. अलीकडे सापडलेल्या नाण्यांवरून हे व्यक्तिनाव होते हे सिद्ध झाले आहे, मग त्याची व्युत्पत्ती काहीही असो. हेच नाव पुढे त्यांच्यापासून झालेल्या वंशाला मिळाले. हीच बाब सातकर्णि या नावाबद्दलही सांगता येते.

## वर्ण आणि धर्म

वासिष्ठीपुत्र पुलुमावि याच्या एकोणीसाव्या शासन वर्षीच्या नाशिक शिलालेखामध्ये पुलुमावीने आपला पिता गौतमीपुत्र सातकर्णीचे वर्णन एकबम्हण आणि खतियदपमानमदन[९६] असे केले आहे. या वर्णनाचा अर्थ साधारणपणे गौतमीपुत्र सातकर्णि हा अनुपम किंवा अद्वितीय ब्राह्मण होता व त्याने क्षत्रियांचा गर्व व अभिमान यांचे दमन केले होते असा घेतला जातो. जर आपण हा अर्थ स्वीकारला तर सातवाहन हे ब्राह्मण वर्णाचे होते व गौतमीपुत्राने परंपरेनुसार एकवीस वेळा क्षत्रियांचा नाश करणाऱ्या परशुरामाची बरोबरी केली होती असे मानावयास हवे. या विधानाला याच लेखातील गौतमीपुत्राने तो ''आगमांचे निवासस्थान'' होता (आगमान निलय)[९७] असे वर्णन व त्याची परशुरामाशी[९८] केलेली तुलना यांचा दुजोरा मिळतो. वर वर्णन केलेल्या जीनप्रभ सुरी यांनी सांगितलेल्या कथेवरूनही सातवाहनांचे नागांशी रक्त संबंध होते असे दिसून येते. आरंभीच्या सातवाहन राजांचा नाग लोकांशी संबंध होता हे तिसरा सातवाहन राजा याच्या राणीच्या नायनिका[९९] अथवा नागवरदायीनी[१००] या नावावरूनही स्पष्ट होते. आर. जी. भांडारकर[१०१] आणि डी. आर. भांडारकर[१०२] यांनी

एकबम्हण या शब्दसमूहाचा अर्थ अनुपम ब्राह्मण असा न घेता तो ब्राह्मणांचा एकमेव संरक्षणकर्ता असा घेतला आहे. डी. आर. भांडारकर शिलालेखांत उल्लेखिलेले खतिय म्हणजे क्षत्रिय वर्ण असे न मानता त्यांचे तादात्म्य ज्यांनी आपले प्रतिनिधी अलेक्झांडरकडे देणग्या घेऊन पाठविले त्या क्षत्रॉय (xathroi) लोकांशी करतात. त्यांच्या मते वर्तमान खत्री लोक त्या (xathroi) लोकांचे वंशज[१०३] आहेत. याप्रमाणे गौतमीपुत्र सातकर्णीने क्षत्रॉय (xathroi) लोकांचा उच्छेद केला व ब्राम्हणांना उदार आश्रय दिला असे सुचविले जाते. के. गोपालाचारी[१०४] या स्पष्टीकरणांशी पूर्णपणे सहमत आहेत. याशिवाय ते आपले लक्ष वीरवर्मन व विष्णुकुंडिन राजा माधववर्मन दुसरा जनाश्रय यांनी दिलेल्या अनुक्रमे पिकारा व पोलपुरु या लेखातील दान देणाऱ्या[१०५] राजांसाठी वापरलेल्या एक बह्मण या पदवीकडे वेधतात. ही पदवी येथे ब्राह्मणांप्रत निष्ठावान असलेल्या एकमात्र व्यक्तीचा निर्देश करते असा अर्थ निघू शकतो. या पदवीचे ते सातवाहन लेखांत आलेल्या एक बह्मण या विशेषणाशी समीकरण करतात. के. गोपालाचारी यांना त्यांनी या घराण्याच्या नावाचा लावलेला अर्थ[१०६] व त्यांच्या वासिष्टीपुत्र पुलुमावि[१०७] याच्या नासिक शिलालेखातील राजमाता बलश्री हिचे वर्णन राजर्षिवधू असे करण्यापेक्षा ब्रम्हर्षि वधू-ब्राम्हणश्री असे करणे योग्य ठरले असते. या प्रतिपादनावरून असे दिसते की, सातवाहन स्वतःला सूर्यवंशीय समजतात असे त्यांना वाटते. "विष्णु पुराणा" च्या आधारे ते देवर्षि, ब्रह्मर्षि आणि राजर्षि यांच्यामध्ये फरक करतात. परंतु सातवाहनांच्या बाबतीत राजन हा शब्द राजाचा निर्देश करतो, क्षत्रियांचा नाही आणि राणीने स्वतःचे वर्णन स्वतःच ब्रह्मर्षि वधू असे करणे उचित दिसले नसते. सातवाहनांनी अश्वमेध यज्ञ केले हे कारणही ते ब्राह्मण नव्हते हे ठरविण्याच्या दृष्टीने उपयुक्त नाही. कारण ह्या वेळेपावेतो अश्वमेध यज्ञाला राजकीय विधीचे स्वरूप प्राप्त झाले होते आणि शुंग राजघराण्याचा संस्थापक पुष्यमित्र व गुप्त घराण्याचे दोन राजे म्हणजे समुद्रगुप्त व कुमारगुप्त पहिला (हे ब्राह्मण[१०८] होते) त्याचप्रमाणे मुण्डपुत्र घराण्याच्या राजांनीही, ते ब्राह्मण[१०९] असूनसुद्धा अश्वमेध यज्ञ केले होते. मौर्य सत्तेच्या अस्तानंतरचा काळ उत्तर व दक्षिण भारतामध्ये बऱ्याच ब्राह्मण राजवंशांच्या झालेल्या उदयामुळे लक्षणीय ठरला आहे. त्यामुळे दक्षिण भारतामध्येही ह्या काळात ब्राह्मण राजवंश सत्तेवर आला म्हणून आश्चर्य वाटावयास नको. सातवाहनानंतरच्या काळातही दक्षिणेत ब्राह्मण राजवंश उदयाला आले. पल्लव, वाकाटक, कदंब आणि मुण्डपुत्र ही सर्व ब्राह्मण घराणीच होती. शेवटी सर्व दोषांचे पूर्ण निराकरण करून असे ठामपणे म्हणता येते की, सातवाहन हे ब्राह्मण असून या ब्राह्मण घराण्याचे नागवंशीयांशी शरीरसंबंध प्रस्थापित झाले होते.

सातवाहन राजे वैदिक-पौराणिक धर्माचे कट्टर पुरस्कर्ते होते. ही बाब कृष्ण, पुलुमावि, स्कंद, यज्ञ, शिवश्री यासारख्या राजांच्या नावावरून तसेच सातकर्णि व राणीनागानिका यांनी अनेक श्रौत यज्ञ केल्याचे व त्यासमयी दिलेल्या मौल्यवान

देणग्यांचे अतिशय सविस्तरपणे नागनिकेच्या नाणेघाट लेखात जे वर्णन दिले आहे त्यावरूनही हे सिद्ध होते. ते बौद्ध धर्माचेही आश्रयदाते होते हे त्यांनी असंख्य बौद्धस्थानांना दिलेल्या उदार देणग्यांवरून दिसून येते. इ. स. च्या प्रारंभीच्या शतकांमध्ये दक्षिण भारतामध्ये बौद्ध धर्माचा प्रसार व भरभराट होण्याचे श्रेय सातवाहनांच्या उदार मनोवृत्ती व धर्म सहिष्णुतेच्या धोरणाला द्यावे लागेल.

## कालक्रम

कालक्रम हा सातवाहन इतिहासाचा दुसरा अतिशय कुतुहलजन्य प्रश्न आहे. सातवाहन सत्तेचा उदयाचा काळ किंवा उदयाची तिथी हासुद्धा प्राचीन भारतीय इतिहासातील अजूनही अनिर्णित असलेला असा फार मोठा वादग्रस्त प्रश्न आहे. वा. वि. मिराशींसारख्या काही इतिहासकारांचा ही घटना अगदी लवकर म्हणजे अशोकानंतर[११०] लगेचच इ. स. पू. तिसऱ्या शतकाच्या द्वितीय पादामध्ये ठेवण्याकडे कल आहे, तर काही इतिहासकार ही घटना इ. स. पू. पहिल्या शतकाच्या मध्यकालात किंवा द्वितीय पादात[१११] नेऊन ठेवतात. अन्य काही संशोधक सातवाहन सत्तेच्या उदयाचा काळ इ. स. पू. तिसऱ्या शतकामध्ये व सिमुकाच्या राजवटीत गमावलेल्या स्वातंत्र्यांची इ. स. पू. पहिल्या शतकाच्या[११२] द्वितीय पादात कल्पित पुनर्स्थापना असे सातवाहन इतिहासाचे दोन भाग करणे पसंत करतात.

या मुद्यावर अशा प्रकारची फार मोठी तफावत असलेली मते प्रचलित असण्याचे मुख्य कारण म्हणजे पुराणांमध्ये ज्यांचे वर्णन त्यांनी आन्ध्र किंवा आन्ध्रजातीय राजे असे केले आहे त्या राजांची एकूण संख्या व त्यांचा पूर्ण राज्यकाल याविषयी असलेली परस्परविरोधी विधाने हे होय. "वायु, ब्रह्माण्ड, भागवत" आणि "विष्णु" ही पुराणे हे राजे तीस[११३] होते असे सर्वसामान्य विधान करतात. परंतु प्रत्यक्षात त्यांनी दिलेल्या नावांची संख्या सतरापासून पंचवीसपर्यंत[११४] बदललेली दिसते. या उलट "मत्स्य पुराण" राजांची एकूण संख्या एकोणीस[११५] देते. परंतु काही हस्तलिखिते प्रत्यक्षात तीस नावे देतात, तर काही हस्तलिखितांमध्ये दिलेली नावांची संख्या एकवीस ते अठ्ठावीस[११६] या दरम्यान बदलतांना दिसते. हाच प्रकार त्यांच्या राजवटीच्या एकूण कालमर्यादेच्या बाबतीत आढळतो. याविषयी चर्चा करणारी बहुतेक पुराणे आन्ध्र राजांनी चारशे वर्षांपेक्षा अधिक राज्य केले हे मान्य करतात. परंतु त्यांनी प्रत्यक्षात पुरवलेल्या वर्षसंख्या थोड्या वर्षांच्या[११७] फरकाने. वेगवेगळ्या आढळतात. "वायु पुराणात" दिलेल्या दुसऱ्या परंपरेप्रमाणे आन्ध्रांनी तीनशे वर्षे[११८] राज्य केले असे समजते. याउलट निरनिराळ्या राजांच्या वैयक्तिक राजवटीच्या वर्षांच्या बेरीज "मत्स्यपुराणा" प्रमाणे ४४८$^{१}/_{२}$ वर्षे येते आणि "वायु पुराणा" प्रमाणे[११९] २७२$^{१}/_{२}$ वर्षे येते. यावरून असे दिसते की, या मुद्यासंबंधी दोन वेगवेगळ्या परंपरा प्रचलित होत्या. यापैकी एका परंपरेप्रमाणे या राजांची एकूण संख्या तीस होती व त्यांनी चार शतकांपेक्षा जास्त काळ राज्य केले, तर दुसऱ्या परंपरेप्रमाणे

हे एकोणीस राजे होते व त्यांनी तीन शतके किंवा त्यापेक्षा थोडी कमी वर्षे राज्य केले. सातवाहन सत्तेचा अंत इ. स. च्या दुसऱ्या शतकाच्या अखेरीस किंवा तिसऱ्या शतकाच्या प्रारंभी झाला हे लक्षात घेऊन पहिल्या परंपरेचे समर्थक सातवाहन सत्तेचा उदयाची तिथी इ. स. पू. तिसऱ्या शतकाच्या द्वितीयार्धात[१२०] किंवा दुसऱ्या शतकाच्या आरंभी ठेवतात.

दुसऱ्या परंपरेच्या समर्थकांचा कल ह्या घटनेची तिथी इ. स. पू. पहिल्या शतकात ठेवण्याकडे आहे. जरी पौराणिक परंपरांमध्ये आन्ध्र सातवाहन राजांच्या एकूण संख्येबद्दल आणि त्यांच्या राजवटीच्या निश्चित कालखंडाबद्दल बरीच तफावत असली तरी सर्व पुराणांमध्ये दुसऱ्या परंपरेबद्दल, ती प्रसंगोचित असल्यामुळे पूर्णपणे एकवाक्यता आहे. या परंपरेप्रमाणे पौराणिक सूचीमध्ये सर्व प्रथम उल्लेखिलेला आन्ध्र राजा सिमुक[१२१] याने शेवटचा काण्वायन राजा सुशर्मन[१२२] याचा उच्छेद करून राज्य मिळविले. सातवाहन सत्तेच्या उदय कालाबद्दल प्रचलित असलेल्या दुसऱ्या मताला ही परंपरा पुष्टीकारक आहे. पुराणांमध्ये असलेल्या मतभेदांमुळे विद्वानांनी या प्रश्नाचा दुसऱ्या दृष्टिकोनातून विचार करण्याचा प्रयत्न केला. या संदर्भात पुराणांमध्ये उल्लेखिलेला तिसरा आन्ध्र सातवाहन राजा सातकर्णि पहिला[१२३] याची पत्नी राणी नागनिका हिच्या नाणेघाट येथील प्रशस्ती व यज्ञविषयक लेखाचा[१२४] आणि याच टिकाणी[१२५] असलेल्या लहान नामफलकाचा उल्लेख करणे आवश्यक आहे. जी. बुल्हेर आणि त्यांचेशी सहमत असणारे काही इतर विद्वान[१२६] यांचा या लेखांची तिथी इ. स. पू. दुसऱ्या शतकाच्या प्रथमार्धात ठेवण्याकडे कल आहे. खारवेलच्या हाथीगुंफा शिलालेखामध्ये मौर्यकालाच्या[१२७] १६५ व्या वर्षाचा व नंदराजानंतरच्या १०३ व्या[१२८] वर्षाचा उल्लेख आहे असे विद्वानांचे अनुमान आहे. या अनुमानीत उल्लेखांच्या आधारे या शिलालेखातील कलिंग राजाने सातकर्णीची[१२९] पर्वा न करता आपले सैन्य पश्चिमेकडे पाठविले या वर्णनाचा नाणेघाट[१३०] शिलालेखाची आधीची तिथी टरविण्याकरीता पुष्टीकारक म्हणून उपयोग केला आहे. इतर विद्वानांचा या मताला पूर्ण विरोध आहे. ते या लेखांची तिथी इ. स. पू. पहिल्या शतकाच्या शेवटी पण फार आधी घेत नाहीत. हाथीगुंफा लेखामध्ये मौर्य कालाचा संदर्भ आहे हे त्यांना मान्य नाही. तसेच नंदराज-ति-वस-सत, यासंबंधित शब्दसमूह नंदराजानंतर[१३१] ३०० वर्षे या अर्थाने घेतात. या संदर्भात हे नमूद करणे आवश्यक आहे की, बुल्हेर नाणेघाट लेखाची तिथी इ. स. पू. पहिल्या शतकाच्या प्रथमार्धात ठेवतात. ते म्हणतात की, नाणेघाट लेखाची अक्षरवटिका गौतमीपुत्र सातकर्णि पहिला आणि त्याचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुलुमावि[१३२] यांच्या लेखांच्या अक्षरवटिकेच्या सुमारे शंभर वर्षांपूर्वी आहे. आपल्या मताच्या पुष्टीकरणार्थ ते पुढे असे म्हणतात की, गौतमीपुत्र सातकर्णीचे लेख व नाणेघाट यातील अक्षरवटिकेमध्ये असे फरक आहेत की, या लेखांमध्ये शंभर वर्षांपेक्षा[१३३] जास्त अंतर ठेवणे शक्य नाही. त्यांच्या मते नाणेघाट लेख व पुराणामध्ये ज्याचा आन्ध्र सातवाहन घराण्याचा दुसरा राजा म्हणून उल्लेख केला आहे तो कण्ह (कृष्ण)

व त्याचा लेख यांची तिथी इ. स. पू. दुसऱ्या शतकाच्या प्रथमार्धात ठेवता येईल,[१३४] कारण त्यांचा विश्वास होता की, गौतमीपुत्र सातकर्णि हा इ. स. पू. पहिल्या शतकाच्या[१३५] मध्यकालाच्या थोडा पूर्वी झाला असावा. परंतु आता कोणीही गौतमीपुत्र सातकर्णि याला इ. स. च्या पहिल्या शतकाच्या[१३६] मध्यकालाच्या आधी ठेवत नाहीत. त्याचप्रमाणे बुल्हेरच्या मताप्रमाणे नाणेघाट लेख इ. स. पूर्व पहिल्या शतकाच्या मध्यकालाच्या पूर्वीचा असणे शक्य नाही. या ठिकाणी घेतलेल्या कालक्रमानुसार या लेखांची तिथी इ. स. पू. पहिल्या शतकाच्या शेवटी किंवा इ. स. च्या पहिल्या शतकाच्या मध्यकाळात ठेवावी लागेल. ही तिथी पुराणांनी मान्य केलेल्या सिमुका राज्य प्राप्तीविषयीच्या परंपरेशी जुळेल. या परंपरेप्रमाणे पहिला आन्ध्र सातवाहन राजा सिमुक याला पूर्ण भारतभर मान्यता मिळविण्यापूर्वी शेवटचा काण्वायन राजा सुशर्मन याचा नाश करावा लागला. या संदर्भात हे लक्षणीय आहे की, बुल्हेरचा आन्ध्र सातवाहनांनी चारशे वर्षांच्यावर राज्य केले यावर विश्वास नाही. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे सिमुक याचे सिप्रकाचे घराणे चारशे पन्नास वर्षे राज्य करीत होते याबद्दल किंवा सिमुक सिप्रकने गौतमीपुत्र सातकर्णीपूर्वी ३५० किंवा ३६० वर्षे अगोदर राज्य केले,[१३७] याबद्दल खात्रीपूर्वक काहीच सांगता येत नाही. जे काही विद्वान सातवाहनांचा उदयकाल इ. स. पू. तिसऱ्या शतकाच्या द्वितीय पादात ठेवतात ते नाणेघाट शिलालेख व गौतमीपुत्र सातकर्णि व वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या लेखांच्या अक्षरवटिकेतील फरकाबद्दल आणि हा फरक घडून येण्यास लागणाऱ्या कालावधीबद्दल बुल्हेरने केलेल्या विधानाकडे सोयीस्करपणे दुर्लक्ष करतात आणि लेखांच्या दोन संचांमध्ये तीनशे वर्षांचे अथवा तीन शतकांचे अंतर ठेवतात.

केवळ अक्षरवटिकेच्या आधारे काळ निश्चित करणे पुरेसे ठरत नाही. ही गोष्ट सातवाहनांच्या एकाच लेखात अभ्यासकांनी दिलेल्या वेगवेगळ्या तिथींमध्येही स्पष्ट होते. या तिथींमध्ये काळाच्या बाबतीत बरीच तफावत दिसते. काही प्रसंगी निव्वळ अक्षरवटिकेच्या पुराव्याच्या मदतीने निश्चित केलेल्या तिथींमध्ये दशकांचाच नव्हे तर शतकांचा फरक पडतो हे सिद्ध झालेले आहे. उदा. वाकाटक[१३८] व पाण्डुवंशाचे[१३९] जे लेख आधीच्या बूल्हेर व जे. एफ. फ्लिट यासारख्या पुराभिलेख तज्ज्ञानी इ. स. ८०० मध्ये ठेवले होते त्या लेखांची तिथी आता काही शतके आधीची आहे हे सिद्ध झाले आहे. हीच गोष्ट त्रिपुरीच्या[१४०] कलचुरी वंशाचा ज्ञात असलेला पहिला राजा वापराजदेव याच्या सागर कोरीव लेखाला आणि इतर असंख्य लेखानांही[१४१] लागू पडते.

**उत्खनन अहवाल :** महाराष्ट्रात अहमदनगर जिल्ह्यात गोदावरी नदीची उपनदी प्रवरा हिच्या काठावर वसलेल्या नेवासे येथील उत्खननामध्ये सातवाहनांचा आरंभीचा कालखंड निश्चित करण्याच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण पुरावा प्राप्त झाला आहे. या उत्खननामध्ये मानवी वसतीचे सहा कालखंड उजेडात आले. त्यापैकी शेवटचे तीन

ऐतिहासिक काळाशी संबंधित आहेत. चौथा कालखंड इतिहासपूर्व कालखंड व पाचवा इन्डो-रोमन काळाशी संबंधित आहे. हे कालखंड सातवाहनाच्या इतिहासाच्या अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण आहेत. चौथ्या कालखंडाच्या स्तरामध्ये आरंभीच्या दोन सातवाहन राजांची म्हणजे सिरि सातकर्णि आणि सातवाहन यांची नाणी, तर पाचव्या कालखंडाच्या स्तरांमध्ये नंतरच्या सातवाहन राजांची नाणी प्राप्त झाली आहेत. म्हणून या कालखंडाच्या विशेषतः चौथ्या कालखंडाच्या कालक्रम मर्यादा निश्चित केल्यास त्याचा सातवाहन राजवटीतील महत्त्वाच्या कालखंडाबाबत असलेल्या गुंतागुंतीच्या कोड्याची उकल करण्याच्या दृष्टीने उपयोग होईल. लोखंडाच्या वस्तू, काळी–तांबडी व खडबडीत लाल मृद्‌भांडी आणि थोडी पोलादी निळसर रंगाची चमक असलेली उत्कृष्ट बनावटीची मृद्‌भांडी ही चौथ्या कालखंडाची वैशिष्ट्ये आहेत. याबरोबरच या कालखंडाच्या निरनिराळ्या थरांमध्ये सापडलेल्या आधीच्या सातवाहन राजांच्या नाण्यांमुळे उत्खनकांनी या कालंखडाचा आरंभ इ. स. पू. दुसऱ्या शतकाच्या प्रथमार्धात[१४२] ठेवला आहे. या कालखंडाचा शेवट प्रथम उत्खनकांनी इ. स. पू. ५० मध्ये घेतला होता, परंतु नंतर तो इ. स. च्या पहिल्या शतकाच्या[१४३] आरंभीच्या वर्षापर्यंत खाली आणला. पाचव्या कालखंडाच्या सांस्कृतिक साधनांमध्ये मेगॅरियन रुलेटेड सारखी लाल रंगाची सुबक बनावटीची भांडी, ॲम्फोरा, मद्यकुंभ, आन्ध्र चित्रित मृद्‌भांडी याबरोबरच गौतमीपुत्र सातकर्णि आणि गौतमीपुत्र यज्ञ सातकर्णि या नंतरच्या सातवाहन राजांची नाणी यांचा समावेश होतो. पुरातत्ववेत्त्यांच्या मताप्रमाणे अरिकामेडू व शिशुपाल गड येथे रुलेटेड मृद्‌भांडी इ. स. पू. पहिले शतक ते इ. स. चे पहिले--दुसरे शतक या कालातील थरांमध्ये मिळाली. ब्रह्मगिरी व चंद्रवल्ली येथे ही भांडी इ. स. चे पहिले शतक ते इ. स. चे तिसरे शतक या कालातील थरात मिळाली. तक्षिला येथे मद्य कुंभ किंवा ॲम्फोरा इ. स. पू. पहिल्या शतकामध्ये, तर अरिकामेडू येथे मिळालेला ॲम्फोरा इ. स. च्या पहिल्या शतकाशी संबंधित थरातील आहे. मेगॅरियन प्रमाणे अलंकृत मृद्‌भांडी ही याच कालखंडातील आहेत. नेवासे येथे मिळालेली आन्ध्र क्रिस क्रॉस वेअर अथवा चित्रित मृद्‌भांडी पोत आणि नक्षिकाम याबाबतीत ब्रह्मगिरी येथे मिळालेल्या या प्रकारच्या मृद्‌भांड्यांशी साम्य दर्शवितात. ही इ. स. च्या पहिल्या शतकाच्या आधीची नसावीत. या पुराव्याच्या मदतीने येथील पाचव्या कालखंडाची इ. स. पू. पहिले शतक आणि इ. स. चे दुसरे–तिसरे शतक[१४४] ही कालमर्यादा ठरविण्यात आली आहे.

संबंधित पुराव्याचे बारकाईने अवलोकन केल्यास वरील कालमर्यादांसंबंधी एक प्रश्न निर्माण होतो. उत्खनकांनी घेतलेला कोणताही पुरावा या कालखंडांना निश्चित कालमर्यादेत ठेवण्याच्या दृष्टीने भक्कम असा आधार देऊ शकत नाही. ह. धी. सांकलिया यांनी कबूल केल्याप्रमाणे एन. बी. पी. मृद्‌भांडी दक्षिण भारतात उत्तर भारताप्रमाणे (इ. स. पू. ५ वे किंवा ४ थे शतक) लवकर आली नाहीत. दक्षिण भारतात त्यांची तिथी त्यांच्याबरोबर सापडलेल्या नाण्यांसारख्या वस्तूंच्या

परिस्थितिजन्य पुराव्याच्या मदतीने ठरवावी लागेल किंवा ठरविता येऊ शकेल. विशेष म्हणजे एन. बी. पी. मृदभांड्याची खापरे चौथ्या कालखंडाच्या अगदी वरच्या थरामध्येसुद्धा मिळाली आहेत आणि प्रत्यक्ष उत्खनकांच्या मताप्रमाणे ती इ. स. च्या[१४५] प्रारंभाच्या फार आधी ठेवता येत नाहीत. चौथ्या कालखंडाच्या वरच्या थरामध्ये[१४६] चांदीचे पाणी दिलेली तांब्याची आहत नाणी (पंचमार्क नाणी) सुद्धा मिळाली आहेत आणि त्यांची तिथी इ. स. च्या पहिल्या शतकाच्या[१४७] प्रारंभाच्या फार आधी असू शकत नाही. उत्खनन अहवालात नाण्यांवर विस्तृत प्रकरण लिहिणारे शां. भा. देव चौथ्या कालखंडाच्या वेगवेगळ्या थरात मिळालेल्या आधीच्या सातवाहन राजांच्या नाण्यांचा आधार एका बाजूने या कालखंडाची कालमर्यादा निश्चित करण्यासाठी व दुसऱ्या बाजूने सातवाहन सत्तेच्या आरंभीची तिथी निश्चित करण्यासाठी घेताना दिसतात. एका ठिकाणी ते असे सांगतात की, गौतमीपुत्र सातकर्णीची नाणी ज्या थरांत मिळाली त्या थरांच्या आधीच्या थरांत सिरि सातवाहन असा लेख असलेली पाच नाणी नव्यानेच प्राप्त झाली आहेत आणि या पाच नाण्यांचा संच चौथ्या कालखंडाच्या स्तरांची तिथी इ. स. पू. दुसऱ्या शतकात[१४८] ठेवण्यास मदत करतो. ते पुढे असे लिहतात की, सातवाहनांचा उदयकाल काही विद्वानांनी प्रतिपादन केल्याप्रमाणे[१४९] इ. स. पू. पहिल्या शतकामध्ये न ठेवता तो इ. स. पू. तिसऱ्या–दुसऱ्या शतकापर्यंत मागे नेणे चुकीचे होणार नाही. या प्रतिपादनाचे पुनःपरिक्षण करणे आवश्यक ठरते. प्रथमतः प्रत्यक्ष सातवाहन सत्तेच्या उदयकालाबद्दलच तीव्र मतभेद आहेत. त्यामुळे उत्खननात सापडलेली नाणी संबंधित स्तरांचा काळ ठरविण्यास उपयुक्त ठरत नाहीत. दुसरे असे की, ज्या सातवाहन राजांची नाणी स्थरनिबद्ध उत्खननात सापडली आहेत त्या राजांच्या राजवटीचा काळ ती नाणी सापडलेले थर ज्या सांस्कृतिक कालखंडाशी संबंधीत आहेत त्याच्या आधारे न ठरविता ज्या विशिष्ट थरात ती मिळाली आहेत त्याच्या मदतीने ठरवावा. सातवाहन राजांची सर्व नाणी चौथ्या कालखंडाच्या अगदी वरच्या थरात मिळाली, आणि उत्खनक स्वतःच या थराचा काळ इ. स. च्या पहिल्या शतकाच्या[१५०] फार आधी ठेवत नाहीत. याशिवाय ती नाणी तांबड्या पॉलीशयुक्त मृद्भांड्यांच्या पूर्वीच्या थरात मिळाली असे विधान करणेही बरोबर होणार नाही. नेवासे येथील उत्खनीत स्तरांचा अनुक्रम आणि त्यांचे आपापसातील संबंध दाखविणाऱ्या तक्त्याचे निरीक्षण केल्यास स्पष्ट होते की, सातवाहन राजांची नाणी "आय," "एक्स" आणि "वाय" या खड्ड्यामध्ये (trenches) तिसऱ्या थरात व "इ" खड्ड्यामध्ये आठव्या थरात मिळाली. हे थर "सी" खड्ड्यामधील ॲम्फोरा व मेगॅरियन सारखी लाल व पॉलीश असलेली मृद्भांडी मिळालेल्या पाचव्या थराच्या समकालीन आहेत. याशिवाय ॲम्फोरा "वाय" खड्ड्यामधील चौथ्या थरातही प्राप्त झाले आहेत. या चौथ्या थराच्या खालच्या थरात सातवाहन राजांची नाणी सापडली आहेत.[१५१] आपण आधीच पाहिल्याप्रमाणे लाल रंगाची, पॉलीशयुक्त मृद्भांडी इ. स. च्या तीन शतकापर्यंत उपयोगात राहिली. यावरून असे दिसून येते की, चौथ्या कालखंडाच्या स्तरात मिळालेली कोणतीही वस्तू

सातवाहन युगारंभ इ. स. पू. तिसऱ्या-दुसऱ्या शतकात झाला हे सिद्ध करण्यास उपयुक्त ठरू शकत नाही. दुसरे असे की, चौथ्या कालखंडाचा शेवट व पाचव्या कालखंडाचा प्रारंभ उत्खनकांनी म्हटल्याप्रमाणे इ. स. पू. ५० मध्ये किंवा इ. स. च्या पहिल्या शतकाच्या प्रारंभी झाला नाही तर बऱ्याच उशीरा झाला अशी खात्री करणारा पुरावा आहे. लाल पॉलीशयुक्त मृद्‌भांडी इ. स. च्या तिसऱ्या किंवा चौथ्या शतकापर्यंत उपयोगात होती. त्यामुळे पाचव्या कालखंडाच्या कालमर्यादा ठरविण्यासाठी त्यांचा उपयोग होऊ शकत नाही. पाचव्या कालखंडाच्या कालानुक्रम मर्यादा ठरविण्यासाठी भक्कम पुरावा म्हणजे नंतरच्या सातवाहन राजाची नाणी व पल्लवांची[१५२] म्हणून वर्णिलेली नाणी हाच फक्त होऊ शकतो. गौतमीपुत्र सातकर्णि व गौतमीपुत्र यज्ञ सातकर्णि यांची नाणी या कालखंडाच्या प्रारंभीची शेवटची मर्यादा इ. स. च्या पहिल्या शतकाच्या अंताच्या[१५३] फार आधी नेत नाहीत. ज्या नाण्यांचे, पल्लव नाणी असे वर्णन केले आहे ती वास्तवात विष्णुकुण्डिन नाणी प्रकारची आहेत. या प्रकारची विष्णुकुण्डिन नाणी सर्व महाराष्ट्रात[१५४] विखुरलेल्या अनेक प्राचीन महत्त्वाच्या ठिकाणी सापडली आहेत. विदर्भामध्ये वर्धा जिल्ह्यात पवनार येथे अशी तीन नाणी मिळाली. ती प्रसिद्ध झालेली असून वर्तमान लेखकाने[१५५] ती प्रथमच विष्णुकुण्डिनांची आहेत असे म्हटले आहे. नंतर पवनार उत्खनन अहवालासह अन्य अभ्यासकांनी या मतास मान्यता दिली आहे. विष्णुकुण्डिन सत्तेचा उदयकाल इ. स. च्या पाचव्या शतकाच्या आधी येऊ शकत नाही आणि विष्णुकुण्डिन छापाची नाणी पाचव्या कालखंडाच्या सर्वात वरच्या थरात मिळाली, त्यामुळे या पाचव्या कालखंडाचा शेवट साहजिकच इ. स. च्या पाचव्या शतकाच्या शेवटी किंवा सहाव्या शतकाच्या प्रारंभी येतो. यामुळे प्रस्तुत लेखक पाचव्या कालखंडाची कालमर्यादा इ. स. च्या पहिल्या शतकाच्या शेवटी ते इ. स. चे पाचवे ते सहावे शतक अशी सुचवितो. परिणामतः चौथ्या कालखंडाचीही कालक्रम मर्यादा एका शतकाने खाली आणावी लागेल आणि ती इ. स. पू. पहिल्या शतकाचे शेवटचे चतुर्थक किंवा इ. स. च्या पहिल्या शतकाचा प्रारंभ ते इ. स. च्या पहिल्या शतकाचा अस्त किंवा दुसऱ्या शतकाचा आरंभ या काळात ठेवावी लागेल. आधीच्या सातवाहनांची चौथ्या कालखंडाच्या स्तरात प्राप्त झालेली नाणी सातवाहन सत्तेचा उदय इ. स. पू. पहिल्या शतकाच्या[१५६] मध्यकालात (Middle) केव्हा तरी झाला या सिद्धान्ताला पुष्टी देतात. खरे म्हणजे आधीच्या सातवाहन नाण्यांची या कालखंडात झालेली प्राप्ती सातवाहन सत्तेचा उदय इ. स. पू. पहिल्या शतकाच्या मध्य भागात ठेवण्याच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण आहे.

या संदर्भात आन्ध्र प्रदेशाच्या[१५७] कर्नूल जिल्ह्यात नंदिकोटकुर तालुक्यात सातनीकोटा येथील उत्खननात प्राप्त झालेले राजपुत्र शक्तिकुमारचे नाणे ज्या महत्त्वपूर्ण स्तरात मिळाले त्याचा उल्लेख करणे आवश्यक आहे. ह्या शक्तिकुमारचे[१५८] आम्ही इतरत्र दाखविल्याप्रमाणे साधारणपणे नाणेघाटातील विस्तृत शिलालेखात

उल्लेखिलेल्या सतिसिरिशी (संस्कृत शक्तिश्री) तादात्म्य केले आहे. तो बहुतेक सातवाहन घराण्याचा चौथा राजा होता. हे नाणें दुसऱ्या कालखंडाच्या आधीच्या थरात सापडले आहे. या नाण्याबरोबर सापडलेल्या इतर वस्तु--पुराव्याच्या आधारे या थराचा काळ इ. स. पू. पहिले शतक ते इ.स. चे तिसरे शतक असा येतो. नाण्यांबरोबर सापडलेल्या मृद्‌भांड्यांमध्ये ज्याचा कालखंड दुसऱ्या कालखंडाच्या कालमर्यादेशी[१५९] जुळता आहे त्यात रसेट कोटेड पेन्टेड वेअर्सचा अंतर्भाव करावा लागेल. येथे मिळालेल्या विटांचा आकार पेद्दबंकूर, नेवासा आणि शालिहण्डम येथील उत्खननातील समकालीन थरांमध्ये मिळालेल्या विटाप्रमाणेच आहे. तसेच दोन छिद्रयुक्त कौले भोकरदन, ब्रह्मपुरी आणि इतर बऱ्याच ठिकाणी सापडलेल्या कौलांप्रमाणे (tiles) आहेत. नाण्याबरोबर सापडलेल्या छोट्या वस्तूंमध्ये तक्षिला येथे इ. स. पू. पहिल्या शतकाच्या थरामध्ये आणि अहिच्छत्र, कोण्डापूर आणि मस्की येथे इ. स. च्या पहिल्या शतकाच्या फार आधी ठेवता येणार नाही अशा थरात मिळालेले अगेटचे व नळीच्या आकाराचे (tubelar) मणी आणि कौण्डिण्यपूर, भोकरदन येथे मिळालेल्या कासवाच्या आकाराच्या मण्यांप्रमाणे कासवाच्या आकाराचा लोलक यांचा समावेश करावा लागेल. यापैकी एकाही मण्याची तिथी इ. स. पू. पहिल्या शतकाच्या आधीची नाही. या थरात मिळालेली आणखी एक वस्तू म्हणजे भाजक्या मातीची दुहेरी साच्याने तयार केलेली एकुलती एक स्त्री प्रतिमा. दुहेरी साच्याने वस्तू तयार करण्याचे तंत्रज्ञान बहुतेक इ. स. च्या पहिल्या शतकाच्या सुमारास रोमन लोकांकडून प्राप्त केले असावे.स्तर संदर्भात हे नाणे दुसऱ्या कालखंडाच्या पहिल्या वस्तीच्या अवशेषाच्या सुमारे पंधरा ते वीस फूट उंचीवर चांगल्या तयार केलेल्या जमिनीवर प्राप्त झाली. या नाण्याची तिथी नाण्याच्या अंतर्गत पुराव्याकडे[१६०] विशेष लक्ष न देता, इ. स. च्या पहिल्या प्रारंभाच्या आधी ठेवणे शक्य नाही. कर्नुल जिल्ह्यात वीरपुरम येथे प्राप्त झालेल्या शिशाच्या रोमन नाण्याच्या प्रतिकृती (Roman lead bulla) चा उल्लेख करणे आवश्यक वाटते. उत्खनकांनी हे सातवाहन राजा हकुसिरी व रोमन बादशाहं टायबेरीयस यांनी संयुक्तपणे पाडलेले नाणे आहे असे प्रतिपादन केले आहे. हे खरे असते तर सातवाहन राजसत्तेचा[१६१] उदय इ. स. पू. पहिल्या शतकाच्या मध्यावधीत किंवा द्वितीय पादात झाला हे दाखविणारा स्तरनिबद्ध पुरावा उपलब्ध झाला असता, परंतु हे संयुक्तपणे पाडलेले चलनी नाणे नाही.[१६२] टायबेरीयसच्या नाण्याचा उपयोग लोलकासारखा करीत असत[१६३] व वीरपुरम येथे या लोलक म्हणून उपयोगात येणाऱ्या नाण्याची केवळ प्रतिकृती मिळाली व यामुळे वर्तमान संदर्भात त्यास महत्त्व राहत नाही.

**साहित्य :** कालिदासाच्या ''मालविकाग्निमित्र'' या नाटकातील पुरावा सातवाहन राजसत्तेचा उदय मौर्य सत्तेच्या अस्तानंतर लगेच झाला या सिद्धान्ताविरूद्ध जात असल्यामुळे त्याचाही येथे ह्या दृष्टीकोनातून विचार होणे आवश्यक आहे. हे नाटक ऐतिहासिक घटनांवर आधारित आहे.

या नाटकात वर्णन केलेल्या घटनेप्रमाणे विदर्भाचा स्वतंत्र राज्य म्हणून उदय शेवटच्या मौर्य राजाच्या मंत्र्याचा निकटचा नातेवाईक यज्ञसेन याच्या नेतृत्वाखाली झाला. हा यज्ञसेन शुंग घराण्याचा एकाएकी पुढे आलेला पुष्यमित्र (इ. स. पू. १८७-१५१) व त्याचा पुत्र अग्निमित्र यांचा विरोधक होता. अग्निमित्रचा मित्र व यज्ञसेनचा चुलतभाऊ माधवसेन याला, यज्ञसेनाच्या सरहद्द संरक्षक अधिकाऱ्याने तो अग्निमित्राचे मुख्य स्थान विदिशा येथे जात असतांना अटक केली. जेव्हा त्याला मुक्त करण्यास सांगितले तेव्हा यज्ञसेनाने प्रथम अग्निमित्राने मौर्याच्या मंत्र्याची मुक्तता करावी अशी मागणी केली. यावर संतापून जाऊन अग्निमित्राने आपला शालक वीरसेन याला विदर्भावर आक्रमण करण्यास पाठविले. झालेल्या युद्धात यज्ञसेनाचा पराभव झाला व माधवसेनाची मुक्तता झाली. विदर्भ राज्याची यज्ञसेन व माधवसेन यांच्यामध्ये विभागणी झाली आणि त्या दोघांनीही पुष्यमित्राचे अधिराज्य मान्य केले. यावरून असे दिसते की, पुष्यमित्राच्या राजवटीमध्ये विदर्भ प्रथम स्वतंत्र राज्य होते. नंतर त्याची पुष्यमित्र शुंगाची अधिसत्ता मान्य असलेल्या यज्ञसेन व माधवसेन यांच्यामध्ये दोन भागात विभागणी झाली आणि परिणामतः विदर्भात अशी दोन पराधीन राज्ये अस्तित्वात आली. विदर्भाच्या वर्धा जिल्ह्यात अलिकडेच पौनी येथे सातकर्णीची पोटीनची दोन नाणी मिळाली. पौनी हे विदर्भाच्या भंडारा जिल्ह्यात असलेले प्राचीन ठिकाण आहे. या ठिकाणी मिळालेल्या पोटीनच्या दोन नाण्यांपैकी एक नाणे जमिनीच्या वरील थरात मिळाले आहे, तर एक पुरातत्वीय उत्खननात[१६४] मिळाले आहे.ही नाणी हिणकस धातूची असल्यामुळे फार दूरवरच्या प्रदेशातून येणे शक्य नाही किंवा येण्याची शक्यता फार कमी आहे. या नाण्याच्या येथे झालेल्या प्राप्तीवरून असे दिसते की, विदर्भ प्रदेश सातवाहन घराण्याचा तिसरा राजा सातकर्णि याच्या राज्याचा भाग होता. जे विद्वान सातवाहन सत्तेचा उदयकाल इ. स. पू. तिसऱ्या शतकाच्या द्वितीय पादात ठेवतात त्यांच्या मते पुष्यमित्र शुंग व सातकर्णि एकतर समकालीन असावेत किंवा सातकर्णि हा पुष्य मित्रापेक्षा थोडा आधी उदयास आला असावा. या ठिकाणचे दुसरे मत जर स्वीकारले तर कालिदासाने विदर्भाच्या संदर्भात सातकर्णिचा उल्लेख का केला नाही याचाही विचार करावा लागेल. पुष्यमित्राच्या राजवटीत त्याच्या वर्चस्वाखाली असलेल्या यज्ञसेन व त्याचा चुलतभाऊ माधवसेन यांच्या अमलाखालील विदर्भाशी सातवाहनांचा काहीही संबंध नव्हता. खरे म्हणजे "मालविकाग्निमित्र" या नाटकावरून असे दिसते की, मौर्य सत्तेच्या अस्तानंतर लगेचच यज्ञसेनाने आपली सत्ता विदर्भावर स्थापन केली. जर पहिले मत ग्राह्य मानले तर आपल्याला सातकर्णि, यज्ञसेन व माधवसेन या तिघांची सत्ता एकाच प्रदेशावर जवळपास एकाच वेळी होती असे म्हणावे लागेल आणि असे ग्राह्य धरणे योग्य ठरत नाही. यावरून असे अनुमान करता येईल की, "मालविकाग्निमित्र" नाटकातील पुरावा सातवाहन सत्तेचा आरंभ इ. स. पू. पहिल्या शतकात झाला या मताला पुष्टी देतो.

काही दशकापूर्वी जेव्हा मौर्य व दक्षिण भारतामध्ये सातवाहन यांच्या राजवटींच्या मधल्या काळाबद्दल माहिती देणारा पुरातत्वीय आणि विशेषतः नाणकशास्त्रीय पुरावा उपलब्ध नव्हता तेव्हा सातवाहन घराणे अशोकानंतर इ. स. पू. तिसऱ्या शतकाच्या द्वितीय पादात अथवा मौर्य सत्तेच्या ऱ्हासानंतर इ. स. पू. दुसऱ्या शतकाच्या आरंभी राज्यावर आले ह्या तर्काचे कदाचित थोडे तरी समर्थन करता आले असते. परंतु अलीकडेच शिस्तबद्ध पुरातत्वीय उत्खनने व समन्वेषणे यांच्याद्वारे या दोन राजवटींमधील अंतर भरून काढणारा बराच नाणकशास्त्रीय पुरावा उपलब्ध झाला आहे आणि तंत्रदृष्ट्या पूर्ण भारतीय उपखंडातील नाणकशास्त्राचा इतिहास सारखाच आहे असे दाखविणारा ठाम किंवा भक्कम पुरावाही आपल्याजवळ आहे. साधारणपणे असे म्हणता येईल की, क्षुल्लक प्रादेशिक फरक सोडल्यास मौर्य आहत नाणी, त्यांच्या नंतर लेखरहीत तांब्याची ओतीव नाणी आणि नंतर लेखरहित व लेखयुक्त (die struck coins) या क्रमाने नाणी अस्तित्वात आली. यापैकी तांब्याची लेखरहित ओतीव नाणी काही काळ आहत नाण्यांबरोबर प्रचारात होती किंवा असेही म्हणता येईल की, ही नाणी आहत नाण्यांची अल्पवयीन समकालीन नाणी होती. नंतरच्या काळात हा सर्व प्रदेश सातवाहन अंमलाखाली आला. या सर्व प्रदेशात अशोकानंतर सुमारे दोन शतकांचा कालावधी भरून निघेल इतक्या मोठ्या प्रमाणात नाणी अलीकडेच प्राप्त झाली आहेत. ह्या ठिकाणी आपण आन्ध्र प्रदेश, उत्तर कर्नाटक, महाराष्ट्र आणि दक्षिण मध्य प्रदेश या प्रदेशांमध्ये मोठ्या प्रमाणावर प्राप्त झालेल्या लेखरहित ओतीव आणि अन्य लेखरहित नाण्यांची सविस्तर चर्चा करू शकत नाही. कारण ती कोणाची[१६५] आहेत हे निश्चित करणे कटीण आहे. या नाणे प्रकारानंतर अस्तित्वात आलेल्या लेखयुक्त नाण्यांच्या बाबतीत असे म्हणता येईल की, या प्रदेशात प्राप्त झालेल्या या प्रकारच्या नाण्यांनी सातवाहनांपूर्वी या प्रदेशांवर राज्य करणाऱ्या काही राजघराण्यांना व काही राजांना नव्याने उजेडात आणले. सातवाहन सत्तेचे मूळ केंद्रस्थान असलेल्या आन्ध्र प्रदेशातील तेलंगना विभागात कंवाय, (?) समगोप आणि गोभद्र यांची नाणी मोठ्या संख्येत[१६६] सापडली. विदर्भ प्रदेशात प्राप्त झालेल्या नाण्यांवरील राजांच्या नावाच्या शेवटी मित्र व भद्र अशी अक्षरे आहेत. यावरून या नाण्यांना मित्र नाणी व भद्र नाणी अशी नावे दिली आहेत किंवा मिळाली आहेत. या प्रकारची नाणी येथे मोठ्या संख्येत मिळाली आहेत. या नाण्यांमुळे सातवाहनांच्या[१६७] पूर्वी या प्रदेशावर राज्य करणाऱ्या तीन मित्र राज्यांची (भूमीमित्र, कण्हमित्र व सूर्यमित्र) आणि चार भद्र राजांची (दामभद्र, धर्मभद्र, सर्वभद्र अथवा शर्वभद्र आणि सत्यभद्र) नावे ज्ञात झाली. ही गोष्ट सातकर्णीने[१६८] सूर्यमित्रचे नाणे पुन्हा छाप (आपला) मारून प्रचारात ठेवले यावरूनही सिद्ध होते. त्याचप्रमाणे माळवा प्रदेशात दामभद्र आणि नारायण मित्र ह्यांची नाणी, तर प्राचीन दाहल[१६९] भागात त्रिपुरी येथे दत्त राजांची नाणी प्राप्त झाली आहेत. विदर्भाच्या नागपूर जिल्ह्यात ॲडम ह्या ठिकाणी झालेल्या पुरातत्वीय उत्खननात प्राचीन वस्तुअवशेष फार मोठ्या प्रमाणावर उपलब्ध झाले आहेत. आपल्या दृष्टीने महत्त्वाची गोष्ट म्हणजे इ. स. पू. १५० ते

इ. स. २५० या कालमर्यादा दाखवणाऱ्या पाचव्या कालखंडातील सातवाहन पूर्व स्तरामध्ये भद्र नाणी सापडणे ही होय. सातवाहनांपूर्वी भद्र राजे या प्रदेशावर राज्य करीत होते हे सिद्ध करणारा हा अतिशय महत्त्वाचा बळकट, स्तरबद्ध पुरावा आहे. सातकर्णीने सूर्यमित्राचे नाणे आपला छाप मारून प्रचलित ठेवणे या घटनेमुळे या आधीच स्थापित झालेल्या वस्तुस्थितीला यामुळे जास्त बळकटी प्राप्त झाली. या राजांनी लेखरहित ओतीव नाणी प्रचारातून गेल्यानंतर सुमारे एक शतक राज्य केले असावे. यामुळे सातवाहन युगारंभ इ. स. पू. पहिल्या शतकाच्या मध्यावधीत झाला याबद्दल शंका राहू नये. आधीच्या नाण्यांवरील लेखांच्या विकासाचा विचार केल्यासही आपण याच निष्कर्षाप्रत पोहचतो. ह्या प्रश्नावर थोडे मतभेद आहेत. आरंभीच्या काळातील भारतीय आहत नाणी व काही ओतीव नाणी[150] लेखयुक्त नाहीत. लेखयुक्त नाणी भारतीय नाणक शास्त्राच्या इतिहासात बऱ्याच उशीरा आली. काही विद्वानांच्या मते नाण्यांवर लेख कोरण्याचा प्रारंभ म्हणजे भारताने स्वतंत्रपणे साध्य केलेली प्रगती आहे, तर काही विद्वानांच्या मते हा अखंड भारतावर[151] राज्य करणाऱ्या ग्रीक शासकांच्या नाण्यांचा प्रभाव आहे. असे म्हणता येते की, स्वदेशातील नाणी पाडण्याच्या तंत्रात हळूहळू झालेल्या प्रगतीचा परिणाम म्हणून नाण्यांवर लेख अस्तित्वात आले; तर सातवाहन नाण्यांप्रमाणे नाण्यांवर, नाणे पाडणाऱ्या व्यक्तीचे नाव त्याच्या राजकीय हुद्यासहित देण्याची प्रेरणा इंडोग्रीक नाण्यांमुळे मिळाली असण्याची शक्यता आहे. ही भारतीय नाण्यांच्या स्वरूपात बदल घडवून आणणारी प्रगती इ. स. पू. पहिल्या शतकाच्या[152] आधी झाली नसावी.

अलीकडे असे मत मांडण्यात येऊ लागले आहे की, इ. स. पू. पहिल्या शतकाच्या पूर्वी सातवाहनांनी आहत नाण्यांसारखी लेखरहित नाणी पाडली असावी[153] पण ह्या ठिकाणी हा प्रश्न महत्त्वाचा नसून आधीच्या सातवाहन राजांनी पाडलेल्या लेखयुक्त नाण्यांची तिथी ठरविणे हा आहे आणि ही नाणी इ. स. पू. पहिल्या शतकाच्या मध्यावधीच्या फार आधीची आहेत असे म्हणता येत नाही.

ज्या विद्वानांमध्ये सातवाहन सत्तेचा उदय शुंग व काण्व यांच्या अस्तानंतर इ. स. पू. पहिल्या शतकामध्ये झाला ह्याबद्दल मतैक्य आहे त्यांच्यामध्येसुद्धा अतिशय महत्त्वाच्या मुद्यावर मतभेद आहेत. या पक्षाचे जवळजवळ सर्व इतिहासकार सर्वसंमत पौराणिक परंपरेप्रमाणे मौर्यांच्या एकशे सदतीस वर्षांच्या राजवटीनंतर शुंगांनी एकशे बारा वर्षे राज्य केले व त्यांच्या अस्तानंतर काण्वायनांनी पंचेचाळीस वर्षे राज्य केल्यानंतर इ.स.पू. पहिल्या शतकाच्या द्वितीय पादात सातवाहनांचा उदय झाला हे मान्य करतात. पुराणांतील वर्णनाप्रमाणे आन्ध्रांच्या पूर्वी मौर्य, शुंग, काण्व या तीन घराण्यांनी एकूण २९४ वर्षे राज्य केले हे ग्राह्य धरल्यास सातवाहन राज्याचा संस्थापक सिमुक याची तिथी इ. स. पू. ३० किंवा २८ अशी येते. परंतु आर. जी. भांडारकर[154] आणि डी. आर. भांडारकर[155] यांना असे वाटते की, शुंगाच्या

राजवटीच्या ११२ वर्षांमध्ये काण्वांच्या ४५ वर्षांच्या अमलाचाही समावेश होतो. परिणामतः पहिला आन्ध्र सातवाहन राजा सिमुक हा इ. स. पू. ७८ मध्ये गादीवर आला असावा. जर शुंगांनी ११२ वर्षे राज्य केल्यानंतर काण्वायनांनी स्वतंत्रपणे ४५ वर्षे राज्य केले असे मान्य केले तर सिमुक सातवाहन इ. स. पू. २८ मध्ये गादीवर आला असे म्हणावे लागेल. आर. डी. भांडारकर यांच्या मताप्रमाणे जेव्हा शुंग घराण्याचे दुर्बल राजे गादीवर आले तेव्हा काण्वांनी याचा फायदा घेऊन सर्व सत्ता काबीज केली. परंतु आपल्या स्वामीच्या घराण्याचे निर्मूलन न करता त्यांना नाममात्र सर्वसत्ताधीश टेवून त्यांनी पेशव्यांप्रमाणे राज्य केले असे दिसते. याप्रमाणे शुंग व काण्व ही घराणी समकालीन होती आणि म्हणून पौराणिक परंपरेने शुंगांना दिलेल्या ११२ वर्षांच्या राजवटीत काण्वांच्या ४५ वर्षांच्या कारकिर्दीचाही अंतर्भाव होतो. या शुंग-काण्व सत्तेचा उच्छेद करून आन्ध्रभृत्य[१७६] घराणे इ. स. पू. ७३[१७७] मध्ये सत्तेवर आले. डी. आर. भांडारकर यांचे हेच मत आहे. ते म्हणतात की, पेशव्यांप्रमाणे काण्वांनी त्यांच्या स्वामीची म्हणजे शुंगांची सत्ता बळकावली आणि शिशुकाने (सिमुकाने) काण्वांना हुसकावून लावले, त्याबरोबरच शुंगांनाही हाकलले.[१७८] तरी पण त्यांनी सातवाहनांच्या सत्तेचा उदय इ. स. पू. ७५[१७९] मध्ये ठेवला आहे.

याठिकाणी शुंग आणि मराठे तसेच काण्व आणि पेशवे यांची तुलना करणे योग्य होणार नाही. कारण पेशवे हे जरी प्रत्यक्षात सत्ताधीश असले तरी त्यांनी मराठ्यांच्या राजाचे कायदेशीर स्वामित्व मान्य केले होते. शुंगाची आणि काण्वांची अशी परिस्थिती नव्हती. आपल्याला यासंबंधी माहिती पुरवणारे एकमात्र साधन म्हणजे पुराणे. काण्व हे शुंगानंतर आले आणि शुंगाच्या काही वंशजांनी कदाचित काण्वांचे मांडलिक म्हणून काण्वांच्या ४५ वर्षांच्या राजवटीत राज्य केले व काण्व घराण्याचा शेवटचा राजा सुशर्मन बरोबर त्यांचाही पूर्णपणे निःपात केला असे स्पष्टपणे पुराणे सांगतात. पुराणातील वर्णनाप्रमाणे दहा शुंग राजांनी ११२ वर्षे राज्य केल्यानंतर त्यांची जागा काण्वायनांनी घेतली. काण्वांचा पहिला राजा वासुदेव हा शेवटचा शुंग राजा देवभूमी याचा अमात्य होता. देवभूमी बालपणापासून दुर्गुणी अथवा कुकर्मी होता. वासुदेवाने कुकर्मी देवभूमीचा उच्छेद केला व स्वतः राज्यपद घेतले.

पौराणिक नोंदीप्रमाणे वासुदेवाने स्थापन केलेल्या घराण्याच्या त्याच्यासह चार राजांनी एकूण ४५ वर्षे राज्य केले. या कालखंडाच्या शेवटी काण्वायन घराण्याचा शेवटचा राजा सुशर्मन यास त्याचा आन्ध्र नोकर किंवा भृत्य सिमुक[१८०] याने जबरदस्तीने काढून टाकले होते. तसेच उरल्या सुरल्या शुंग सत्तेचाही त्याने नाश केला असे सांगितले जाते. पुराणांच्या मूळ संहितेतील चुकीमुळे काही पुराणांनी काण्वायन घराण्याचा पहिला राजा वासुदेव, ज्याने शुंगांच्या सार्वभौम सत्तेचा नाश केला, त्याचे शुंग[१८१] म्हणून वर्णन केलेले आहे.

या टिकाणी आपल्याला व्ही. ए. स्मिथ यांनी आन्ध्र, शुंग व काण्वायन यांच्या सत्तेच्या एकूण कालावधीसंबंधी पुराणांत दिलेल्या विधानांचे स्पष्टीकरण लक्षात घेतले पाहिजे. स्मिथ स्वतः दीर्घ कालावधीचे[१८२] पुरस्कर्ते आहेत. त्यांना असे वाटते की, सातवाहनांनी चारशे सत्तावन्न वर्षे राज्य केले (पुराणांमध्ये दिलेला हा दीर्घ कालावधी आहे). आणि जर आपण यातून शुंग आणि काण्वायन सत्ताकालाची एकशे सत्तावन्न वर्षे वजा केली तर हा काल तीनशे वर्षे असा येतो (पुराणांनी दिलेला हा अल्प कालावधी आहे) सातवाहनांनी उत्तर भारतावर फार अल्पकाळ राज्य केले आणि पौराणिक परंपराकारांना त्यांच्याबद्दल विशेष माहिती उपलब्ध नव्हती, त्यामुळे काही पुराणांनी त्यांच्या सत्तेचा अल्पकाळ दिला आहे. त्याचप्रमाणे त्यांनी दिलेली सातवाहन राजांची पूर्ण यादी ग्राह्य धरून त्यांच्या सत्तेचा दीर्घ कालावधी मान्य केला आहे. जी वेंकटराव[१८३] आणि ए. एस. आळतेकर[१८४] ह्या मताचा पुरस्कार करताना दिसतात. तरीही उत्तर भारतीय पौराणिक परंपराकारांना त्यांच्या अज्ञानाबद्दल दोषी धरणे योग्य होणार नाही. कारण फक्त त्यांनीच राजांच्या नावांची दीर्घ सूची, दीर्घ कालावधी, परंपरा तसेच राजांच्या नावांची लहान यादी व अल्प कालावधी परंपरा या दोहोंचाही उल्लेख केलेला आहे. बऱ्याच वेळा एकाच पुराणात ह्या दोन्ही परंपराची माहिती मिळते. परंतु या सर्व पुराणांमध्ये पहिला आन्ध्र राजा काण्व राजांचा मांडलिक होता व जेव्हा त्याने शेवटचा काण्व राजा सुशर्मन याचा नाश केला तेव्हा आन्ध्र सत्तेवर आले याबाबतीत मतैक्य आहे.

जेव्हा पुराण रचनाकार आन्ध्र राजांची संख्या ३० होती व त्यांनी साडेचारशे वर्षांपेक्षा थोडा जास्त काळपर्यंत राज्य केले असे विधान करतात तेव्हा त्यांनी राजांची संख्या व त्यांच्या सत्तेचा कालखंडही वाढवून सांगितला म्हणून त्यांना दोष देणे योग्य होणार नाही.

हे अगदी शक्य आहे की, ज्या सातवाहनांनी साडेचारशे वर्षांपेक्षा थोडा जास्त काळ राज्य केले त्यांच्या राजांची संख्या तीस वगैरे अशीच असावी.[१८५] परंतु ही संख्या सार्वभौम राजघराण्यातील राजांची घेण्याची काही गरज नाही. सार्वभौम राजघराण्याचे वीसपेक्षाही कमी राजे होते आणि त्यांनी तीन शतकांपेक्षाही थोडे कमीच काळ राज्य केले. या तीस राजांपैकी निदान काही राजे तरी या घराण्याच्या प्रादेशिक शाखांचे वंशज असावेत असे दाखविणारा पुरावा उपलब्ध आहे. के. गोपालाचारी असे सुचवितात की, ''मत्स्यपुराणा'' तील आन्ध्र राजांच्या सूचीमध्ये उल्लेखिलेला पाचवा राजा स्कंद स्तम्भि हा केवळ काल्पनिक[१८६] आहे. याशिवाय काही बाबीमुळे असे दर्शविण्यात येते की, पुराणांतील आन्ध्र राजांच्या यादीमध्ये प्रादेशिक शाखेच्या राजांचा समावेश केला आहे. या यादीतील आठवा राजा आपिलक याची नाणी फक्त दक्षिण कोसल प्रदेशात सापडली आहेत आणि ती मध्य प्रदेशातील बिलासपूर जिल्ह्यातील मल्लार येथील टांकसाळीत काढलेली दिसतात.[१८७] सुमारे सात दशकांपूर्वी

याचे पहिले नाणे सापडले. त्यानंतर आतापर्यंत त्याची फक्त दोन नाणी सापडली आहेत. तीसुद्धा दक्षिण कोसलमध्येच मिळाली आणि ती त्याच टांकसाळीत[१८८] काढलेली आणि त्याच प्रकारची आहेत. या वस्तुस्थितीमुळे तो सार्वभौम राजघराण्यातील राजा नसून त्या घराण्याच्या कोसल शाखेतील राजा असावा असे आपल्याला म्हणणे भाग पडते. हीच गोष्ट "मत्स्यपुराणात" उल्लेख केलेल्या कुंतल स्वातिकर्ण या १३ नंबरच्या राजाची आहे. वात्स्यायनाच्या "कामसूत्रा" तील त्याच्या उल्लेखावरून त्याच्या अस्तित्वाचे प्रमाण मिळते.[१८९] त्याच्या नावाच्या पूर्वी असलेल्या कुंतल ह्या नावावरुन तो स्थानिक राजा असावा असे दिसते. "मत्स्यपुराणा" च्या यादीमध्ये एकविसावा आन्ध्र राजा चकोर स्वातिकर्ण हा सुद्धा स्थानिक राजाच असावा असे त्याच्या नावाच्या पहिल्या भागातील "चकोर" ह्या शब्दावरून दिसते. कारण चकोर हे वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या १९ व्या वर्षीच्या नासिक शैलगृहातील कोरीव लेखानुसार गौतमीपुत्र सातकर्णि[१९०] याच्या राज्यात असलेल्या एका पर्वताचे नाव आहे.

या शिवाय असे काही राजे आहेत की, त्यांची नावे पुराणांमध्ये दिलेली नाहीत. परंतु सातवाहन राजांचे लेख व नाणी यांच्यावरून त्यांची नावे मिळतात. सातकर्णि आणि नागनिका यांचे दोन पुत्र वेदिश्री[१९१] आणि शक्तिश्री हे असे दोन राजे आहेत. आर. जी. भांडारकर यांच्या मते "मत्स्यपुराणा" तील यादीमध्ये या घराण्याच्या सर्व शाखांच्या राजपुत्रांची नावे एकत्र दिली आहेत. आणि त्यामुळे त्यांची संख्या तीस[१९२] झाली आहे. हे मत योग्य वाटते. "वायुपुराणा" तील लहान सूचीमध्ये ज्यांच्या बद्दल भक्कम पुरावा उपलब्ध आहे अशा गौतमीपुत्र सातकर्णीनंतर[१९३] झालेल्या राजांची नावे गाळली आहेत. परंतु या सूचीमध्ये सुद्धा आपिलक[१९४] (नं.४) व चकोर (नं.११) ही नावे आहेत. यावरून असे दिसते की, या पुराणातील सूचीमध्येही फक्त मुख्य घराण्याच्या राजपुत्रांचीच नावे आहेत असे नाही तर घराण्याच्या शाखांच्या राजपुत्रांचीही नावे आहेत. म्हणजे कोणतीही सूची पूर्ण नाही. तसेच पूर्णपणे बरोबर आणि पूर्णपणे विश्वसनीय नाही. त्यातल्या त्यात "वायुपुराणा" तील सूची अधिक बरी दिसते. ह्या संदर्भात एक महत्त्वाचा मुद्दा लक्षात घेणे आवश्यक आहे. जरी आपल्याला आन्ध्र सातवाहनांच्या दीड शतकाच्या नाण्यांबद्दल ज्ञान असले तरी बऱ्याच राजांची नावे फक्त काही पुराणांमध्येच दिलेली आहेत. ही गोष्ट प्रामुख्याने गौतमीपुत्र सातकर्णीच्या आधीच्या कालखंडाला जास्त लागू पडते. परंतु गौतमीपुत्र सातकर्णीपासून पुढे घराण्याच्या सर्व राजांचे लेख व नाणी उपलब्ध आहेत. त्यामुळे ज्या आधीच्या राजांची नावे नाणी व लेख यांच्याद्वारे प्राप्त झालेली नाहीत त्यांच्या अस्तित्वाबद्दल शंका वाटते म्हणून या क्षणापुरते तरी त्यांना अनैतिहासिक समजले आहे.

गौतमीपुत्र सातकर्णीने क्षहरात राजा नहपान याचा उच्छेद केला हे आपल्याला कोरीव लेख आणि नाणी यांनी पुरविलेल्या खात्रीलायक पुराव्यांवरून ज्ञात आहे. नहपानाचा उदय बहुतांश विद्वानांच्या मते इ. स. च्या पहिल्या शतकाच्या शेवटच्या

पादात झाला. त्यांचे हे मत सबळ पुराव्यावर आधारित आहे. सातवाहन घराण्याची स्थापना व गौतमीपुत्र सातकर्णीचा कालखंड यामध्ये फक्त सव्वाशे वर्षांपेक्षा थोडे कमी अंतर आहे आणि हा कालावधी पुराणातील दीर्घ सूचीमध्ये दिलेल्या गौतमीपुत्राच्या पूर्वीच्या बावीस राजांच्या राजवटीला अगदीच अपुरा आहे. तथापि, काही सबळ नाणकशास्त्रीय पुराव्यांवरून असे दिसते की, तिसरा आन्ध्रराजा सातकर्णि आणि गौतमीपुत्राने पराभूत केलेला नहपान यांच्यामध्ये फार काळ गेला नसावा. यामुळे बऱ्याच राजांची राजवट अल्पकालीन असावी ह्या मताला आधार मिळतो. महाराष्ट्रामध्ये पुणे जिल्ह्यात जुन्नर येथे सातकर्णि व नहपान यांची हिणकस धातूची नाणी मिळाली आहेत. या सर्व नाण्यांची दर्शनी बाजू अगदी सारखी आहे. या नाण्यांच्या मागच्या बाजूवर वेगवेगळीं चिन्हे आहेत. सातवाहन नाण्यांवर उज्जैन चिन्ह आहे तर नहपानाच्या नाण्यांवर वर टोक केलेला बाण व दोरी लावलेले धनुष्य आहे आणि त्याच्या चांदीच्या नाण्यांप्रमाणे वज्र आहे.[१९५] या ठिकाणी हेही नमूद केले पाहिजे की, सातवाहनाची सुद्धा काही नाणी मिळाली आहेत.[१९६] हा सातवाहन म्हणजे सिमुक (छिमुक) सातवाहनच असावा. ही नाणी अल्पकालीन (पुराणातील) कालक्रमाला पूरक आहेत.

थोडक्यात असे म्हणावे लागेल की, पुराणांमध्ये दिलेली आन्ध्र सातवाहन राजांची लहान यादी व या राजांची अल्पकाळ राजवट ही सत्यस्थिती आहे. पुराणांत दिलेली दीर्घ सूची व दीर्घकालीन राजवट ही बरोबर आहे, परंतु ह्यामध्ये या घराण्याच्या वेगवेगळ्या शाखांच्या सर्व किंवा बहुतेक राजांचा समावेश केला आहे. सातवाहन घराण्याचा उदय इ. स. पू. ५० मध्ये या घराण्याचा संस्थापक सिमुक (छिमुक) याच्या अधिपत्याखाली झाला असावा. उपलब्ध असलेल्या साहित्यिक आणि पुरातत्त्वीय पुराव्याच्या[१९७] चर्चात्मक आणि तुलनात्मक विश्लेषणावरून हाच निष्कर्ष काढणे योग्य होईल.

## ऐतिहासिक रूपरेषा

या भागात सातवाहनांच्या राजकीय जीवनाचा आढावा घेण्यात आलेला आहे.

**सिमुक सातवाहन :** या घराण्याच्या संस्थापकाचे नाव सिमुक असे होते. परंतु पुराणांमध्ये[१९८] हे नाव वेगवेगळ्या प्रकारे लिहिले आहे. तो स्वतःला छिमुक म्हणतो आणि समकालीन राजांमध्ये तो छिमुक (छिमुक) सातवाहन[१९९] म्हणून ज्ञात होता. काहीशा नंतरच्या लेखांमध्ये त्याचा सिमुक सातवाहन[२००] म्हणून उल्लेख आहे. त्याकाळी आन्ध्र देशात प्रचलित असलेल्या प्राकृत बोलीमध्ये वर्ण उच्चारात होणारे बदल पाहता छिमुक आणि सिमुक[२०१] ही वेगवेगळी नावे नसून एकाच नावाचीं फक्त दोन रूपे आहेत असे दिसते. सिमुकचे संस्कृत रूप श्रीमुख[२०२] असावे.

ज्या सिमुकाने आयुष्यामध्ये एवढे मोठे साम्राज्य स्थापन केले, आपल्या तेजस्वी राजकीय कर्तृत्वाने घराण्याच्या सार्वभौम कारकिर्दीला प्रारंभ करून दिला त्या बुद्धिमान माणसाचे माता--पिता किंवा त्याचे बालपण याविषयी आपणास काहीही माहिती नाही. पुराणांमध्ये वर्णिल्याप्रमाणे तो अखेरचा काण्व राजा सुशर्मन ह्याचा नाममात्र तरी सेवक (भृत्य) असावा. त्याच्या दुर्बलतेचा फायदा घेऊन त्याने आपले स्वतंत्र राज्य स्थापन केले. त्याने आपल्या राजकीय जीवनाचा प्रारंभ तेलंगण व त्याला लागून असलेल्या प्रदेशामध्ये केला. याच प्रदेशात त्याची नाणी मोठ्या संख्येत[२०३] मिळाली आहेत. येथून त्याने आपल्या सत्तेचा प्रसार महाराष्ट्रातील विदर्भ प्रदेशापर्यंत केला असे दिसते. त्याची नाणी वर्धा जिल्ह्यात पवनार[२०४] येथे अलीकडेच मिळाली आहेत. सातवाहन किंवा सादवाहन हे नाव असलेली हिणकस धातूची नाणी कोणाची हा नाणक शास्त्रज्ञांमध्ये दीर्घ काळ चाललेला चर्चेचा विषय आहे. या चर्चेचा परिणाम इतिहासाच्या पुनर्रचनेवरही झाला आहे. काही नाणक शास्त्रज्ञ त्याला सिमुकाच्या काही पिढ्या[२०५] आधी झालेला या घराण्याचा संस्थापक समजतात तर इतर काहीजण त्याचे नाणेघाट शीर्षक लेखात उल्लेखिलेल्या कुमार सातवाहन या सातकर्णि व नागनिका[२०६] यांच्या पुत्राशी तादात्म्य दर्शवितात. तथापि, या दोनही मतांस आधार नाही. छिमुक किंवा सिमुक सातवाहन याच्या आधी सातवाहन नामक राजाचे अस्तित्व दर्शविणारा किंवा असा राजा होऊन गेला असे दर्शविणारा काहीही पुरावा उपलब्ध नाही. याउलट सातवाहन घराण्यात नंतर झालेल्या सातवाहन या व्यक्तीचे अस्तित्व दर्शविणारा निश्चित पुरावा आहे, परंतु हा सातवाहन गादीवर आला असे दाखविणारा काहीच पुरावा नाही. एवढेच नव्हे तर तो कधीच राजा झाला नाही व त्याने नाणीही पाडली नाहीत असे म्हणता येईल. नाणेघाट येथील सातवाहन घराण्यातील अथवा सातवाहन घराण्याशी[२०७] संबंधित असलेल्या इतर काही व्यक्तींच्या प्रतिमांबरोबर त्याच्याही प्रतिमा असून त्यावर नाव आहे. पुतळ्यावर लेबल[२०८] आहे. याप्रमाणे हे आरंभीच्या सातवाहनाचे प्रतिमागृह आहे. या सर्व प्रतिमा राणी नागनिका[२०९] हिने एकाच वेळी कोरविल्या असे काही वेळेस म्हटले जाते. कुशाणांचेही मथुरेचे उपनगर माट येथे प्रतिमागृह किंवा देवकुल होते. कालिदासापूर्वी होऊन गेलेला प्रख्यात नाटककार भास ह्याचे प्रसिद्ध "प्रतिमा--नाटक" याची आपणास हा प्रश्न सोडविण्यास मदत होते. नाटकाचा विषय व ज्यावरून नाटकाला "प्रतिमा--नाटक" हे नाव प्राप्त झाले आहे ते अर्थपूर्ण आहे. नाटकाच्या विषयाप्रमाणे भरत तातडीच्या बोलावण्यानुसार त्याच्या मामाच्या घरून अयोध्येला परत आला तेव्हा शहराबाहेर काही काळ विश्रांतीसाठी थांबला. तेथे त्याला प्रतिमागृहातील त्याच्या तीन पूर्वजांबरोबर ठेवलेल्या दशरथाच्या प्रतिमेवरून त्याच्या पित्याच्या दुःखद मृत्यूचे वर्तमान कळते. यापुढे असेही सांगितले आहे की, येथे फक्त दिवंगत राजांचेच पुतळे उभारले होते.[२१०] नाणेघाट प्रतिमागृह तयार करण्यामागे हाच उद्देश असावा व तेथे फक्त मृत व्यक्तींच्याच प्रतिमा कोरल्या असाव्यात. हे सिमुकच्या मृत्यूनंतर किंवा कदाचित नंतरच्या काळात तयार केले असावे. कुमार सातवाहनाच्या पुतळ्याचे या प्रतिमागृहातील अस्तित्व हा सातवाहन

त्याच्या लहान वयात किंवा तो कुमार असतानाच मृत्यू पावला असे दर्शविते. माता नागनिका हिने त्याची प्रतिमा तयार करून घेतली असावी. त्यामुळे तो राजसिंहासनावर येण्याचा आणि नाणी पाडण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. ह्यावरून असे म्हणता येईल की, सिमुक सातवाहनाने त्याच्या राजवटीच्या शेवटच्या काळात[२११] फक्त सातवाहन असा उल्लेख करणारी नाणी स्वतःच पाडली. सातवाहन हे नाव असलेली नाणी आन्ध्र प्रदेशात करीमनगर जिल्ह्यात कोटलिंगल, संगरेड्डी, मेदक जिल्ह्यात कोण्डापूर, अहमदनगर जिल्ह्यात नेवासे, पुणे जिल्ह्यात जुन्नर, विदर्भात अकोला जिल्ह्यात अकोला येथे, त्याचप्रमाणे महाराष्ट्रातील मराठवाडा प्रदेशात व अलीकडेच कर्नाटकातील गुलबर्गा जिल्ह्यात सन्नती[२१२] येथे मिळाली आहेत. निरनिराळ्या ठिकाणी सापडलेली ही नाणी सिमुक सातवाहनाने[२१३] अविश्रांत परिश्रम करून लष्करी सामर्थ्याला व्यवहार चातुर्याची जोड देऊन विदर्भासह महाराष्ट्राचा बराच मोठा प्रदेश, उत्तर कर्नाटक, आन्ध्र प्रदेश व त्याला लागून असलेला तेलंगणाचा बहुतांश प्रदेश यांचा अंतर्भाव करणारे विशाल साम्राज्य स्थापन केले होते याची साक्ष देतात. अन्यथा ही नाणी तांबे, शिसे व पोटीन ह्यासारख्या हलक्या धातूंची असल्यामुळे ती दूरदूरच्या प्रदेशांतील चलनामध्ये जाणे शक्य नाही.

कदाचित तो मध्य प्रदेशात विदिशा येथून राज्य करणाऱ्या काण्व घराण्याची नाममात्र अधिसत्ता मानीत असावा आणि विदर्भामध्ये सापडलेली नाणी त्याने विदिशावर शेवटचा काण्व राजा सुशर्मन याच्याशी युद्ध करून त्याची नाममात्र अधिसत्ता नष्ट करण्यासाठी केलेल्या आक्रमणाचा मार्ग सुचवितात. काही इतिहासकार पुराणातील अशा अर्थाच्या विधानाच्या ऐतिहासिकत्वाबद्दल अविश्वास प्रगट करतात. कारण त्यांच्या मते सिमुक हा लहान प्रदेशावर सत्ता चालवणाऱ्या घराण्याचा पहिला राजा होता आणि काण्व घराणे बिहारसारख्या दूरच्या प्रदेशात पाटलीपुत्र येथून राज्य करीत होते. त्यामुळे सिमुकाला काण्वांबरोबर युद्ध करून त्यांचा उच्छेद करणे शारीरिकदृष्ट्या अशक्य होते. बहुतांश विद्वान दीर्घ कालक्रमावर विश्वास ठेवतात. या कालक्रमानुसार सिमुक काण्वांचा समकालीन नसून त्या आधीच होऊन गेला. सातवाहन घराण्याच्या नंतरच्या राजाने हा पराक्रम केला असावा. परंतु पुराण रचनाकारांनी तो चुकून सिमुकाच्या[२१४] नावावर टाकला. यापैकी काही विद्वानांनी असे अद्वितीय यश मिळविणारा सातवाहन राजा कोण असावा हे शोधण्याचे प्रयत्न केले आहेत. त्यांच्या मते तो "मत्स्यपुराणाने" दिलेल्या सूचीमधील[२१५] पंधरा नंबरचा पुलुमावि पहिला किंवा स्वातिकर्ण[२१६] किंवा ज्याचे नाव पुराण रचनाकारांनी[२१७] गाळले आहे तो दुसरा सिमुक असावा. प्रस्तुत लेखकाने सुचविलेला अल्प कालक्रम (shorter chronology) आणि पुराणकारांचे लक्ष शुंग राजवटीच्या नंतरच्या काळात पाटलीपुत्र सोडून विदिशावर केंद्रित झाले होते ही वस्तुस्थिती लक्षात घेतल्यास पुराणातील विधानांचे महत्त्व व अर्थ स्पष्ट होतो. ज्याची सत्ता आधीच डळमळीत झाली होती अशा सुशर्मनची नाममात्र अधिराज्यसत्ता सिमुकाने उलथून टाकणे सहज शक्य होते.

या महत्त्वपूर्ण यशामुळे सातवाहनांना दक्षिण आणि मध्य भारतात फार महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आणि त्याच्या मागून गादीवर आलेला त्याचा धाकटा भाऊ कृष्ण आणि त्याचे वारस त्याच्याबद्दल वाटणाऱ्या कृतज्ञतेमुळे सातवाहन अथवा सादवाहन[२१८] हे त्याचे नाव पुढे रुढ झाले.

सिमुक ह्याने तेवीस वर्षे[२१९] राज्य केले याबद्दल सर्व पुराणांचे एकमत आहे. बहुतेक त्याच्या राजवटीच्या शेवटी शेवटी त्याने काण्वायन घराण्याच्या सुशर्मन[२२०] या शेवटच्या राजाची अधिसत्ता आणि शुंगाचीही सत्ता नष्ट केली. त्याला दिलेल्या तेवीस वर्षांच्या राजवटीमध्ये त्याच्या काण्वसत्तेचा नाश करण्यापूर्वीच्या जीवनाच्या बहुतांश भागाचा अंतर्भाव होतो. चंद्रगुप्त मौर्य इ. स. पू. ३२४ मध्ये गादीवर आला हे गृहीत धरून व पौराणिक परंपरेप्रमाणे मौर्य, शुंग, काण्व यांनी अनुक्रमे १३७, ११२ व ४५ वर्षे राज्य केले हे मान्य केले तर सिमुक हा इ. स. पू. ५२ मध्ये गादीवर आला, इ. स. पू. ३० मध्ये त्याने सुशर्मनचा उच्छेद केला[२२१] व त्यानंतर लवकरच त्याच्या राजवटीचा शेवट झाला असे म्हणता येईल.

आपल्या घराण्याची आपल्या तेजस्वी कारकिर्दीच्या भरभक्कम पायावर प्रतिष्ठापना करून सिमुकाने दक्षिण आणि दक्षिण भारताच्या इतिहासाच्या एका नवीन पर्वास प्रारंभ केला. आतापर्यंत ह्या प्रदेशाचा बहुतांश भाग या प्रदेशाच्या बाहेरील एखाद्या सत्तेच्या अधिपत्याखाली होता आणि या प्रदेशातील (autoch thonous) घराण्याची सत्ता येथे स्थापन करणारा सिमुक हाच पहिला राजा आहे. या घराण्याने येथे सुमारे तीन शतके राज्य केले, येथे शांतता, स्थिरता स्थापन केली. ती या प्रदेशाच्या समृद्धीस आणि सांस्कृतिक व साहित्यिक पुनरुज्जीवनास कारणीभूत टरली.

**कृष्ण :** सिमुकाला बहुतेक पुत्र नव्हता म्हणून त्याच्या मागून त्याचा धाकटा भाऊ कृष्ण हा राजा झाला. "मत्स्य, वायु" आणि "ब्रह्मांड पुराणांत" दिल्याप्रमाणे त्याने अठरा वर्षे राज्य केले,[२२२] तर "विष्णु" आणि "भविष्य पुराणां" प्रमाणे त्याने दहा वर्षे राज्य केले. विविध मतमतांतरांनुसार त्याने इ. स. पू. ३०-१२[२२३] या कालखंडात राज्य केले असे म्हणता येईल.

त्याच्याबद्दलची माहिती नाशिक येथील शैलगृह क्र.९ मधील दोन ओळींच्या लेखावरूनही मिळते. या लेखाप्रमाणे जेव्हा कण्ह[२२४] राज्य करीत होता तेव्हा नाशिकच्या समण महामात्राने हे लेणे तयार केले. समण महामात्र या नावाच्या अर्थाविषयी बरेच मतभेद आहेत. महामात अथवा महामात्र हा हल्लीच्या आय. ए. एस. प्रमाणे अधिकाऱ्याचा हुद्दा आहे याबद्दल संशय नाही. याचा उल्लेख अशोकाच्या कोरीव लेखांमध्ये बऱ्याच वेळा आलेला आहे आणि त्याचा सातवाहन लेखातील उल्लेख मौर्य शासन व्यवस्थेची परंपरा सातवाहन काळामध्ये अस्तित्वात होती याची आठवण करून देतो. परंतु येथे त्याच्याबरोबर असलेल्या समण (संस्कृत श्रमण) ह्या

शब्दामुळे मोठा वादग्रस्त प्रश्न निर्माण झाला आहे. इ. सेनार्टने समणानाम हा शब्द चुकून समणंन असा लिहिला आहे असे गृहीत धरून त्याचा अर्थ श्रमणांची[२२५] व्यवस्था पहाणारा अधिकारी असा लावला आहे. परंतु हा अर्थ अनुमानीत[२२६] आहे आणि हे त्यांनाही मान्य आहे. ए. एस. आळतेकर यांनी याचे समणानां महामात (श्रमणानां महामात्र) असे वाचन केले असून अशोकाचा धर्ममहामात्र ज्याप्रमाणे बौद्ध संस्थांची देखरेख व त्यांच्या गरजांची[२२७] पूर्ति करणारा अधिकारी होता त्याचप्रमाणे हा अधिकारी असावा असे ते समजतात. के. गोपालाचारी[२२८] आणि जी. व्यंकटराव[२२९] यांनी या शब्दाचा अर्थ श्रमणांची व्यवस्था पहाणारा महामात्र असा घेतला आहे. जी. व्यंकटराव हे कृष्ण हा त्याचा भाऊ व त्याच्यापूर्वीचा राजा सिमुक प्रमाणे अशोकाचा सामंत किंवा मांडलिक होता आणि त्याने मौर्य सम्राटाच्या मृत्यूनंतरच सहा वर्षे[२३०] स्वतंत्रपणे राज्य केले या विधानाला हा शब्दसमूह पुष्टीकारक म्हणून घेतात. येथील लेखामधील समण (श्रमण)[२३१] हा शब्द व्यक्तिनाम म्हणून घेतला पाहिजे हे मिराशींचे मत ग्राह्य धरणे विद्वान जास्त पसंत करतात.

कृष्ण यास आपला भाऊ सिमुक ह्याच्याबद्दल अतिशय प्रेम व आदर वाटत होता. त्यामुळे त्याने आपल्या घराण्याला त्याच्यामागे सातवाहनकुल असे नाव दिले. त्याची प्रतिमा त्याने स्थापन[२३२] केलेल्या आपल्या घराण्याच्या प्रतिमागृहात उभारली. त्याने आपल्या भावाच्या लष्करी मोहिमांमध्ये भाग घेतला असावा व गादीवर आल्यावर त्याने स्वतः सिमुकाच्या साम्राज्य विस्ताराच्या धोरणाचा अवलंब केला असावा. परंतु आपल्याला त्याच्या इतर कार्याविषयी काहीच माहिती नाही. तो वैदिक–पौराणिक धर्माचा अनुयायी होता. त्याच्या काळच्या नाशिक शैलगृहातील कोरीव लेखांवरून असे दिसते की, त्याने बौद्धांना उदार आश्रय दिला होता.

या घराण्याची राजधानी या वेळी महाराष्ट्रातील पुणे जिल्ह्यात जुन्नर या महत्त्वपूर्ण ठिकाणी होती असे जवळच असलेल्या नाणेघाट शैलगृहात निर्माण केलेल्या घराण्याच्या प्रतिमागृहावरून वाटते. घराण्याची प्रारंभीची राजधानी आन्ध्र प्रदेशात तेलंगणा विभागात बहुतेक कोटलिंगाल किंवा कोण्डापूर[२३३] येथे कोठेतरी असली पाहिजे. कदाचित, सिमुकाने स्वतः त्याच्या अमदानीत झालेला राज्य विस्तार लक्षात घेऊन त्याच्या राजवटीच्या अखेरच्या काळात जुन्नर येथे राजधानी नेली असावी. नागनिकाच्या नाणेघाट विस्तृत लेखात त्याला दक्षिणापथपति ही पदवी दिलेली आहे.[२३४]

**सातकर्णि :** या घराण्याचे पहिले दोन राजे म्हणजे सिमुक आणि कृष्ण. या दोघांच्याही बाबतीत सर्व पुराणांमध्ये एकवाक्यता आहे. परंतु कृष्ण नंतरची वंशावळ व कालक्रम याविषयी मात्र पुराणे त्याचप्रमाणे आधुनिक इतिहासकार या दोहोंमध्येही फार मतभेद आहेत. पुराणांमध्ये दिल्याप्रमाणे कृष्ण नंतर सातकर्णि गादीवर आला.

परंतु बहुतांश पुराणे त्याच्यापासून दोन पिढ्यांनी दूर असलेल्या याच नावाच्या दुसऱ्या राजाचा उल्लेख करतात. पहिल्या राजाचा शासनकाल दहा वर्षे[२३५] आहे तर दुसऱ्या राजाने छप्पन वर्षे[२३६] राज्य केले. "वायुपुराणा" च्या बऱ्याच हस्तलिखितांमध्ये पहिल्या सातकर्णीचे[२३७] नाव पूर्णपणे गाळून दुसऱ्या सातकर्णीचा उल्लेख कृष्णचा त्याच्यानंतर लगेच आलेला वारस म्हणून करतात असा तर्क रा. गो. भांडारकरांनी[२३८] दिलेल्या सूचीवरून करता येतो. शिवाय पहिल्या सातकर्णीला दिलेला अटरा वर्षांचा[२३९] शासनकाल व नाणेघाट येथील शिलालेखात ज्याच्या कामगिरीचे सविस्तर वर्णन केले आहे तो सातकर्णि हे एकच असतील तर मिराशींनी[२४०] म्हटल्याप्रमाणे त्याच्या अतिशय महत्त्वपूर्ण कार्याच्या दृष्टीने हा शासनकाल फारच अपुरा आहे. यातील नोंदीप्रमाणे गौतमीपुत्र सातकर्णि हा क्षहरात वंशीय महाक्षत्रप नहपान याचा समकालीन शत्रू होता. इ. स. च्या पहिल्या शतकाच्या ६०–८० या कालावधीत लिहिल्या गेलेल्या "पेरिप्लस मारीस इरिथ्रई" (Periplus Maris Erythraei) या ग्रीक ग्रंथाचा अनामिक लेखक नहपानाला ओळखतो.[२४१] जर नहपान हा इ. स. च्या पहिल्या शतकात झाला असेल तर त्याचा शत्रू व स्पर्धक गौतमीपुत्र सातकर्णि हाही इ. स. च्या पहिल्या शतकाच्या तिसऱ्या चतुर्थकात किंवा शेवटच्या चतुर्थकाच्या प्रारंभी उदयाला आला असला पाहिजे. पश्चिम किनाऱ्यावरील कल्याणसह व्यापारपेठयुक्त बंदराच्या संदर्भात पेरिप्लस म्हणतो की, थोरल्या सॅरेगानसच्या काळी कल्लिअण (कल्याण) या बंदराला नियमित व्यापारपेठेचा दर्जा प्राप्त झाला होता. परंतु नंतर सँदनस काळी येथील व्यापारावर कडक निर्बंध घालण्यात आले. येथे चुकून आलेल्या जहाजांनादेखील तेथून बॅरिगाझा[२४२] (भडोच) येथे जाण्याकरता संरक्षकाची गरज पडत असे. थोरला सॅरेगानस, ज्याने कल्याण बंदर सुरक्षित केले आणि ज्याच्या कारकिर्दीत व्यापार विस्कळीत झाला होता त्या सँदनसचा येथील उल्लेख ऐतिहासिकदृष्ट्या फार महत्त्वपूर्ण आहे किंवा ऐतिहासिक संभवनीयतांच्या दृष्टीने अर्थपूर्ण आहे असे म्हणणे जास्त योग्य टरेल. "थोरला सॅरेगानसचा" येथील उल्लेख लहान सॅरेगानसचे अस्तित्व सुचवितो. सॅरेगानस हे प्राकृत साडगन्ना[२४३] सारख्या एखाद्या नावापासून निघालेल्या सातकर्णि ह्या शब्दाचे भ्रष्ट ग्रीक रूप आहे. आता जर एकमेकापासून दोन पिढ्यांनी दूर असलेल्या दोन सातकर्णींचे अस्तित्व व त्यांना दोघांना मिळून दिलेला ३६ वर्षांचा राज्यकाल[२४४] मान्य करावयाचा असेल तर ज्याच्या ५६ वर्षांच्या दीर्घ कारकिर्दीबद्दल सर्व पौराणिक परंपरांमध्ये एकवाक्यता आहे त्या सातकर्णीची, जरी या दोघांमधील इतर ज्या राजांच्या अस्तित्वाबद्दल चांगला पुरावा उपलब्ध आहे, त्यांना वगळले तरीही ह्या ग्रंथरचनेच्या काळापर्यंत अर्धी कारकिर्द होऊन जाते. प्रत्यक्ष पेरिप्लसलासुद्धा ज्याची राजवट अपवादात्मकरित्या अल्प होती[२४५] आणि ज्याच्या दुर्बल कारकिर्दीमध्ये कल्याण बंदर ग्रीक जहाजांसाठी असुरक्षित झाले होते त्या सँदनस किंवा "भागवतात[२४६]" उल्लेखिलेल्या सुनंदन किंवा सुंदर[२४७] या राजांपैकी निदान एक तरी राजा माहीत होता. त्यामुळे असे म्हणावेसे वाटते की, पहिला राजा सातकर्णि व त्याच्यामागून येणारे त्याचे दोन वारस राजे यांचा प्रमुख सातवाहन घराण्याशी काही संबंध नव्हता.

तसेच थोरला सेरैगानस व पुराणांमध्ये वर्णिलेला याच नावाचा दुसरा राजा या एकच व्यक्ति होत्या. थोरला ह्या शब्दाने सुचविलेला सेरैगानस म्हणजे आपल्या समकालीन नहपानाबरोबर जो युद्ध करण्यात गुंतला होता तो सामर्थ्यशाली गौतमीपुत्र सातकर्णि असावा. त्यामुळे ज्या सातकर्णीची कारकीर्द[१४८] चित्रविचित्र आणि महत्त्वपूर्ण घटनांनी परिपूर्ण आहे त्या सातकर्णीने दीर्घ काळ राज्य केले हे सिद्ध होते. जुन्नर येथे मिळालेला नाणकशास्त्रीय पुरावाही हेच सुचवितो. येथे मिळालेली दर्शनी बाजू एकाच प्रकारची असलेली (छिमुक) सातवाहन, सातकर्णि व नहपान यांची नाणी[१४९] आधी वर्णिल्याप्रमाणे सातवाहन राजे व नहपान यांच्यामध्ये काळाचे फार अंतर नसावे असे सुचवितात. खरे म्हणजे वयाने फार लहान असलेल्या नहपानाने पूर्ण सेहेचाळीस[१५०] वर्षे राज्य केले. तो या सातकर्णीचा समकालीन होता. म्हणून कृष्ण नंतर सातकर्णि नावाचा दुसरा राजा गादीवर आला असावा.

सर्व पुराणांनी एकमताने सांगितल्याप्रमाणे ह्या सातकर्णीने ५६ वर्षे राज्य केले. त्याची राजवट आपण इ. स. पू. १२ ते इ. स. ४४ या कालखंडात ठेवू शकतो. या घराण्यातील इतर व्यक्तींशी त्याचे काय संबंध होते हे आपणास माहीत नाही. शक्य आहे की, कृष्णाच्या मृत्यूनंतर काही वर्षे छिमुक सातवाहनाने स्थापन केलेले व कृष्णाने नावारूपास आणलेले हे विशाल साम्राज्य या घराण्याच्या काही सभासदांमध्ये वाटले गेल्यामुळे निस्तेज झाले होते आणि सातकर्णीला ते पुन्हा एकसंघ करण्याचे कार्य करावे लागले.

सिमुक सातवाहनाने आन्ध्र--महाराष्ट्र प्रदेशात स्वतंत्र राज्य स्थापन केले त्याच सुमारास कलिंगमध्ये महामेघवन नामक राजवंशाची स्थापना झाली. या घराण्याच्या तिसऱ्या पिढीत सामर्थ्यवान व महत्त्वाकांक्षी राजा खारवेल याचा उदय झाला. त्याने सातकर्णीशी युद्ध केले. त्याच्या प्रसिद्ध हाथीगुंफा कोरीव लेखावरून[१५१] आपल्याला त्याच्या या आक्रमणाची माहिती मिळते. या लेखानुसार खारवेलाने त्याच्या दुसऱ्या शासनवर्षी आपले अश्वदल, गजदल, पायदल व रथदलयुक्त सैन्य सातकर्णीची पर्वा न करता पश्चिमेकडे पाठविले. त्याची सेना जेव्हा कन्हवेणा जवळ पोहोचली तेव्हा असिक नगर भयग्रस्त झाले.[१५२] कन्हवेणा नदीची ओळख साधारणतः आन्ध्र प्रदेशातील कृष्णा नदीशी पटविण्यात येते. तथापि, कृष्णा नदी कलिंगच्या दक्षिणेला आहे, पश्चिमेला नव्हे. याउलट विदर्भातून वाहणाऱ्या कनहान नदीचाही प्राचीन भारतीय साहित्यामध्ये कृष्णा ह्या नावाने उल्लेख केलेला आहे. ही नागपूरच्या उत्तर-पूर्वेला सतरा कि. मी. अंतरावर वाहते व वेणा (वैनगंगा) नदीला मिळते. नद्यांच्या या संयुक्त प्रवाहाला कन्हबेणा म्हणत असत. (संस्कृत-कृष्णवेणा) आणि बहुतेक ह्या संयुक्त प्रवाहाचाच कन्हबेणा[१५३] असा उल्लेख हाथीगुंफा येथील खारवेलाच्या लेखात केलेला आहे. नुकत्याच नागपूर जिल्ह्यात अॅडम या ठिकाणी झालेल्या पुरातत्त्वीय उत्खननात असिक जनपद[१५४] नाव असलेली मुद्रा (sealing)

प्राप्त झाली. या जनपदामध्ये अॅडम भोवतालच्या प्रदेशाचा समावेश होत असावा व प्रत्यक्ष अॅडम हे या जनपदाचे मुख्य ठिकाण म्हणजे असिकनगर असावे.[२५५] यावरून असे म्हणता येईल की, विदर्भ हा सातकर्णीच्या राजवटीत सातवाहनांच्या राज्याचा महत्त्वाचा भाग होता. खारवेलाने आक्रमण करून हा भाग आपल्या राज्याला जोडला होता किंवा नाही याबद्दल निश्चित काही सांगता येत नाही. कोरीव लेखातील वर्णनाप्रमाणे हा केवळ घाईघाईने केलेला हल्ला होता. त्याचे कायम स्वरुपाचे राजकीय परिणाम झाले नसावेत. खारवेलाने त्याच्या चौथ्या शासन वर्षी अशा प्रकारचे आणखी एक आक्रमण केले आणि सातकर्णीच्या रठिक आणि भोजक ह्या दोन मांडलिकांना शरण येण्यास भाग पाडले.[२५६] सातकर्णीच्या राज्यात विदर्भाचा समावेश होत होता हे पौनी [२५७] येथे झालेल्या पुरातत्वीय उत्खननात मिळालेल्या सातकर्णीच्या नाण्यांवरून व त्याने आपला छाप[२५८] मारून पुन्हा चलनात ठेवलेल्या सूर्यमित्राच्या नाण्यांवरून दिसते. विदर्भावर राज्य करणाऱ्या मित्र राजाचे सातकर्णीने आपला छाप मारून पाडलेले हे नाणे या मित्र राजाचे बंड मोडून हा प्रदेश परत आपल्या राज्यात आणला ह्या विजयाचे प्रतिक असावे, अशी शक्यता नाकारता येत नाही. विदर्भ प्रदेश मुळात सातवाहन राज्यामध्ये या घराण्याच्या संस्थापकाच्या वेळेपासूनच होता.

सांची येथील मुख्य स्तूपाच्या दक्षिणेकडील प्रवेशद्वाराच्या सर्वात वरच्या कमानीच्या आतल्या बाजूवर राजा सातकर्णीचा[२५९] प्रधान कर्मचारी वासिष्ठीपुत्र (वासिष्ट गोत्री स्त्रीचा पुत्र) आनंद याच्या देणगीची नोंद करणारा लेख आहे. या छोट्या नवसफेडीच्या (Votive) लेखाला अवास्तव आणि अनावश्यक महत्त्व दिले गेले आहे. जरी कोरीव लेखाच्या स्वरुपात पुरातत्त्वीय पुरावा उपलब्ध नसला तरी आपण आधी पाहिल्याप्रमाणे विदिशाचा प्रदेश या वंशाचा पहिला राजा सिमुक याने स्वतःच आपल्या राज्याला जोडला होता. माळवा पोताची शिशे आणि पोटीनाची[२६०] राञोसिरिसतस असा लेख असलेली नाणी कदाचित सिमुकची असावीत. आनंद हा बहुतेक सांचीला बौद्ध यात्रेकरू म्हणून गेला असावा. हा लेख राजकीयदृष्ट्या महत्त्वाचा नसला तरी हे शक्य आहे की, मध्यंतरीच्या काळात काही नाराज सरदारांनी केलेले बंड मोडून सातकर्णीला पूर्व माळव्यावर आपली सत्ता पुन्हा स्थापन करावी लागली असावी. त्याच्या कारकिर्दीत डाहल प्रदेश (त्रिपुरी भोवतालचा प्रदेश-वर्तमान तेवर, जबलपूर जिल्हा, मध्य प्रदेश) सातवाहन साम्राज्यात[२६१] अंतर्भूत होता असे दिसते. सातकर्णीची नाणी आंध्र प्रदेशात तेलंगण, जवळ जवळ पूर्ण महाराष्ट्र आणि मध्य प्रदेशाचे जबलपूर व विदिशा हे जिल्हे यासारख्या विस्तीर्ण प्रदेशात सापडली. त्यावरून हे प्रदेश सातकर्णीच्या शासनकालात सातवाहनाच्या साम्राज्यात सातत्याने होते असे दिसून येते.

सातकर्णीच्या अमदानीत सातवाहन राज्यामध्ये नवीन प्रदेशाची भर पडली असावी असे कोल्हापूरच्या ब्रह्मपुरी[२६२] येथे उत्खननात मिळालेल्या स्तरनिबद्ध पुराव्याच्या

वर्गीकरणांवरून दिसते. येथे आधीच्या थरात ज्यांचे वर्णन लेखरहित असे करता येईल अशी शिशाची नाणी, त्यानंतर कुर इत्यादी महारठिंची नाणी आणि नंतर सातकर्णि गौतमीपुत्र सातकर्णि व यज्ञ सातकर्णि[२६३] या क्रमाने सातवाहनांची नाणी मिळाली; पण नंतर मिळालेल्या नाणे प्रकारांशी येथे आपला संबंध नाही. या स्तरनिबद्ध पुराव्यांवरून असे दिसते की, महाराष्ट्रातील कोल्हापूर भागावर सर्वांत आधीचे किंवा आरंभीचे ज्ञात असलेले राजे महारठि होते. यांच्यामध्ये सातवाहन राजा सातकर्णि याने पराभूत केलेल्या कुर राजाचाही समावेश होतो. इ. जे. रॅप्सन[२६४] यांच्या मताप्रमाणे कुर राजांचे तादात्म्य काही सातवाहन राजांशी करता येत नाही. परंतु काही महारठि घराणी सातवाहनांबरोबर मैत्रीचे संबंध ठेवून होती. सातवाहन घराण्याच्या प्रतिमागृहात समाविष्ट असलेल्या महारठि त्रणकयिर याच्या प्रतिमेवरून असे दिसते की, काही महारठिंशी त्यांचे जवळचे नातेसंबंधही होते.

सातकर्णि म्हणजे पेरिप्लसने उल्लेखिलेला थोरला सॅरॅगानसच होय. त्याने व्यापार व व्यापारी दळणवळण, विशेषतः दुसऱ्या देशाशी व्यापार-दळणवळण आणि त्याकरता आवश्यक असलेले बंदरांचे संरक्षण व व्यवस्था याकडे विशेष लक्ष दिलेले दिसते. पेरिप्लसमध्ये सांगितल्याप्रमाणे त्याच्या कारकिर्दीत कल्याण बंदराला नियमित व्यापारी पेठेचा[२६५] दर्जा प्राप्त झाला होता. आंतरराष्ट्रीय व्यापाराच्या प्रगतीसाठी त्याला वाटत असलेल्या तीव्र कळकळीचे हे एक उदाहरण आहे. नाणेघाट येथील विशाल लेखात वर्णिलेल्या, त्याने आपली पत्नी नागनिका हिच्यासह केलेल्या श्रौत यज्ञसमयी त्याने दिलेल्या मौल्यवान देणग्या या व्यापारामुळे व औद्योगिक प्रगतीमुळे झालेल्या समृद्धीच्या द्योतकच आहेत.

त्याचा विवाह नागनिका अथवा नागवरदायिनी नावाच्या स्त्रीशी झाला होता असे या शाही दंपतीने त्यांच्या संयुक्त नावाने काढलेल्या चांदीच्या वैशिष्ट्यपूर्ण नाण्यांवरून दिसते. या नाण्याचे वजन ६.५ ग्रॅम असून ते गोल आकाराचे आहे. याच्या दर्शनी बाजूवर खाली डावीकडे घोड्याची अपूर्ण आकृति आणि ब्राह्मी लेख रञो सिरिसत (क)न्द, त्याच्याखाली लांबसर चौकोनामध्ये नागनिकाय असा लेख आहे. नाण्याच्या मागील बाजूवर प्रत्येक वर्तुळामध्ये स्वस्तिक व प्रत्येक दोन वर्तुळांच्या मध्ये बिंदु असलेले उज्जैन चिन्ह, याच्या उजव्या बाजूला नऊ आणि अकरा या आकड्यांच्या कर्णरेषेच्या (diagonally) दिशेने कोरलेली व चक्रयंत्रावर तयार केलेल्या मुठींनीयुक्त व दांडीवर दोन ठिकाणी फुगवटा असलेली भाल्यासारखी वस्तू आहे.[२६६] यावरील घोड्याच्या आकृतीवरून त्याची राणी नागनिका हिच्या अतिशय खंडित झालेल्या नाणेघाटातील विस्तृत लेखामध्ये[२६७] वर्णिलेल्या दोन अश्वमेध यज्ञांपैकी एका अश्वमेध यज्ञप्रसंगी हे नाणे पाडले होते असे दिसते. राजा व राणी यांनी संयुक्तपणे पाडलेले हे पहिलेच भारतीय नाणे आहे. एवढेच नव्हे तर राणीचे[२६८] नाव असलेलेही हे पहिलेच नाणे आहे. गुप्त सम्राट समुद्रगुप्त आणि कुमारगुप्त पहिला[२६९] यांनी

काढलेल्या अश्वमेध छाप नाण्याची हे नाणे पूर्वकल्पना देते. या नाण्यामुळे नागनिका ही सातकर्णीची पत्नी[२७०] होती हे स्पष्ट झाले. या नाण्यांचा या घराण्यातील नंतरच्या राजांनी पाडलेल्या चांदीच्या नाण्यांशी काही संबंध नाही.

नाणेघाट येथील विशाल शिलालेख[२७१] त्याची राणी नागनिका हिने पतीच्या मृत्यूनंतर कोरविला आहे. त्यामध्ये तिने आपल्या नवऱ्यासह केलेल्या असंख्य वैदिक यज्ञांची नोंद केली आहे. दुर्दैवाने हा लेख अतिशय खंडित झाला आहे त्यामुळे त्यातील ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वाची माहिती नष्ट झाली आहे. या कारणामुळे विद्वानांनी त्यासाठी काही निश्चित उपांदबलक पुरावा उपलब्ध नाही अशा कल्पना मांडल्या आहेत. ज्या ठिकाणी काही महत्त्वाची नावे दिली होती तो महत्त्वाचा भाग खंडित झाला आहे. त्यामध्ये सिमुक, सातकर्णी आणि जो राणी नागनिकाचा पिता असावा असा समज असलेला अंगिय कुलाचा महारटि या सगळ्यांची नावे नष्ट झाली आहेत. त्यामुळे विशिष्ट वर्णन कोणाला लागू होते हे ठरविणे अशक्य जरी नसले तरी कठीण झाले आहे.[२७२] ह्या लेखाच्या प्रारंभी वैदिक पौराणिक देवता, प्रजापति, धर्म,[२७३] इंद्र, संकर्षण, वासुदेव, चंद्र-सूर्य, चार लोकपाल, यम, वरुण, कुबेर, वासव आणि कुमारवर म्हणजे स्कंद कार्तिकेय यांना वंदन केले आहे. नंतर या लेखात राजा वेदिश्रीचा[२७४] उल्लेख आहे. त्यानंतर काही मोठ्या किंवा महान व्यक्तींची वर्णने आहेत. ज्याला दक्षिणापथाचा स्वामी म्हटले आहे तो या घराण्याचा संस्थापक[२७५] सिमुक असावा, अंगिय कुलाचा महारटि[२७६] हा राणीचा पिता असावा आणि नाव नष्ट झाले आहे तो बलाढ्य राजा सातकर्णि असावा असे साधारणपणे मत आहे. नंतर त्याची राणी आणि राज्य करीत असलेले राजे वेदिश्री व शक्तिश्री यांची माता (सति-सिरिमत) नागवरदायिनी म्हणजे नागनिका हिचे थोडे सविस्तर वर्णन आले आहे. नंतर श्रौत यज्ञांचे व त्यासमयी ब्राह्मणांना दिलेल्या मौल्यवान देणग्या (दक्षिणा) यांची नोंद आहे. अग्न्याधेय, अन्वारंभणीय, अंगारिक, राजसूय, दुसरा अश्वमेध, सप्तदशतिरात्र, भगालदशरात्र, गर्गातिरात्र, गवामयन, शतातिरात्र, आंगिरसातिरात्र, छंदोमपवमानतिरात्र, अंगिरसामयन (सहा वर्षे चालणारा), त्रयोदशातिरात्र आणि दशरात्र हे यज्ञ केले. जरी हे यज्ञ राणीने केले असे वर्णन असले तरी तिने ते आपल्या पतीच्या दीर्घ राजवटीत त्याच्याबरोबर जोडीने केले असावेत.

**वेदिश्री :** नाणेघाटातील लेख कोरला तेव्हा सातकर्णि मृत्यू पावला होता व त्याचा पुत्र वेदिश्री राज्य करीत होता. पुराणांमध्ये त्याचा पिता व गौतमीपुत्र सातकर्णि यांच्यामध्ये कितीतरी राजांची नावे दिली आहेत. परंतु वेदिश्रीचा मात्र उल्लेख नाही. पुराणांनी त्याचा उल्लेख दुसऱ्या कोणत्यातरी नावाने केला असेल, परंतु यांची ओळख पटविणे असंभव आहे.

नाणेघाट येथे एक दुसरा कोरीव लेखांचा संच आहे. यातील लेख आता अस्तित्वात नसलेल्या प्रतिमांच्या वरच्या बाजूला कोरले असून त्यांना नामफलक असे म्हणता

येईल. या नामफलकांतील आता दोन नष्ट झाले आहेत व उरलेले सहा खाली कोणाच्या प्रतिमा होत्या हे जाणण्यास मदत करण्याइतपत चांगल्या अवस्थेत आहेत. हे प्रतिमागृह कृष्ण याने स्थापन केले व त्यामध्ये त्याचा भाऊ व त्याच्या आधी राज्य करणारा व घराण्याचा संस्थापक सिमुक याच्या प्रतिमेची स्थापना केली. अन्य प्रतिमांची स्थापना सातकर्णि[२७७] नंतर आलेल्या वेदिश्रीने केली असावी. त्याने आपल्या मातापित्यांच्या म्हणजे सातकर्णि व नागनिका यांच्या प्रतिमांची स्थापना केली, परंतु त्याने आपल्या मातेला जास्त मान दिला. कारण पित्याच्या मृत्यूनंतर त्याच्यासाठी सिंहासन हस्तगत करण्यामध्ये तिची महत्त्वपूर्ण भूमिका असली पाहिजे, शिवाय राजदरबारात तिचा चांगलाच दरारा असावा. त्यामुळे तिच्या प्रतिमेची येथे स्थापना[२७८] व तीसुद्धा तिचा पती सातकर्णि याच्या आधी केली गेली.[२७९] इतर प्रतिमांच्या बाबतीत निश्चितपणे एवढेच म्हणता येईल की, ते सर्व या घराण्याचे निकटचे नातेवाईक होते असे दिसते. यातील तीन व्यक्ती म्हणजे कुमार भाय (नं.६), कुमार हकुसिरि (नं.८) आणि कुमार सातवाहन (नं.९).[२८०] हे सातकर्णि आणि नागनिका यांचे पुत्र होते का याबद्दल निश्चित काही सांगता येत नसले तरी तशी शक्यता नाकारता येत नाही. कदाचित ह्या घराण्याशी जवळचे संबंध असलेल्या त्या व्यक्ती असू शकतील. एक गोष्ट नक्की सांगता येईल की, या प्रतिमा संबंधित व्यक्तींच्या मृत्यूनंतर कोरल्या असल्यामुळे या तीन व्यक्ती लहान वयातच मृत्यू पावल्या आणि त्यामुळे गादीवर येऊ शकल्या नाहीत. नेवासा येथील उत्खननामध्ये सातकर्णीची नाणी ज्या स्तरात मिळाली त्याच्या माथ्याच्या थरात सातवाहन नावाची नाणी मिळाली. याचे कारण असे आहे की, घराण्याच्या संस्थापकांनी पाडलेली नाणी नंतरच्या काळातही चलनात राहिली. असा प्रकार प्राचीन भारतामध्ये[२८१] नवीन नव्हता. त्यामुळे वेदश्रीचा भाऊ म्हणून विशाल नाणेघाट लेखात उल्लेख केलेल्या सतिसिरिशी आणि स्वतःची नाणी पाडली होती त्या जैन परंपरेत उल्लेखिलेल्या शक्तिकुमारशी[२८२] (शक्तिश्री) कुमार हकुसिरिचे तादात्म्य करता येत नाही. याशिवाय हे तादात्म्य मान्य करण्याच्या मार्गात भाषिक अडचणीही आहेत.[२८३] त्याचप्रमाणे महारटि त्रनकयिर याचे व विशाल नाणेघाट लेखात उल्लेखिलेला "अंगिय कुलोत्पन्न गिरिसमुद्रवलयांकित पृथ्वीवरील वीर श्रेष्ठ महारटि"[२८४] यांचे समीकरण निव्वळ तर्कावर आधारित आहे. त्रनकयिर हा नागनिकेचा पिता व सातकर्णीचा सासरा होता या विश्वासाच्या बाबतीतही असेच म्हणावे लागेल. दोन नष्ट झालेल्या नामफलकाविषयी केलेली वेगवेगळी अनुमाने याच वर्गात येतील त्यामुळे त्यांना जास्त महत्त्व देण्याची गरज नाही.

विशाल नाणेघाट लेखामध्ये तिथि उपलब्ध नाही तसेच त्याच्या शासनकालाविषयी पुराणांमध्ये उल्लेख नसल्यामुळे वेदिश्रीने किती वर्षे राज्य केले हे ठरविता येत नाही. परंतु त्याने त्याच्या पित्याप्रमाणे (५६ वर्षे) दीर्घ काळ राज्य केले नसावे. त्याने आपल्या मातापित्यांच्या आणि काही जवळच्या नातेवाईकांच्या प्रतिमा स्थापन केल्या

असे दिसते.[२८५] त्याची माता नागनिका राजप्रतिनिधी नसली तरी तिने पतीच्या मृत्यूनंतर त्याच्यातर्फे फार महत्त्वपूर्ण भूमिका बजावली.[२८६] त्यामुळे त्याला तिच्याबद्दल फार आदर वाटत होता हे त्याने घराण्याच्या प्रतिमागृहामध्ये तिची प्रतिमा स्थापन करताना पित्यापेक्षाही जास्त मान देऊन प्रथम तिची प्रतिमा स्थापन केली यावरून दिसून येते.

सतिसिरि किंवा शक्तिश्री याचा उल्लेख नाणेघाट लेखामध्ये वेदिश्रीच्या नंतर केलेला आहे. यावरून तो वेदिश्रीचा भाऊ होता व त्याला राज्यशासनामध्ये महत्त्वाचे स्थान होते असे दिसते. कर्नुल जिल्ह्यात सातनीकोटा[२८७] येथील उत्खननामध्ये सापडलेल्या नाण्यांवरून असे दिसते की, तो आन्ध्र प्रदेशातील कर्नुल विभागाचा राजपुत्र असतानासुद्धा शासक होता. नंतर तो मध्यभारतात गेला व तेथे त्याने सति[२८८] नावाची नाणी पाडली. यावरून असे दिसते की, सातवाहन राज्याचे दोन भागात विभाजन झाले होते. वेदिश्री दक्षिण भागावर तर सतिसिरि (शक्तिश्री) उत्तर भागावर राज्य करीत होता. तथापि, वेदिश्रीचे शासन दर्शविणारी नाणी किंवा इतर काही पुरावा उत्तर भागात अजूनपर्यंत प्राप्त झाला नाही.

## गौतमीपुत्र सातकर्णीच्या पूर्वीची परिस्थिती

पुराणांमध्ये गौतमीपुत्र सातकर्णीच्या पूर्वी झालेल्या बऱ्याच राजांची नावे दिलेली आहेत.[२८९] परंतु त्यांचे अस्तित्व दर्शविणारा स्वतंत्र पुरावा उपलब्ध नाही. तथापि, त्यांच्यापैकी काहींची माहिती इतर काही साधनांद्वारे प्राप्त झाल्यामुळे त्यांचे ऐतिहासिकत्व मान्य केले पाहिजे. या राजांमध्ये आपिलक, कुन्तल, हाल, सुनन्दन आणि शिवस्वाति यांचा समावेश होतो. आपिलक हा मत्स्य पुराणात दिलेल्या यादीतील नंबर आठचा राजा आहे. तो लंबोदरचा पुत्र आहे. त्याने बारा वर्षे राज्य केले. मध्य प्रदेशाच्या बिलासपूर जिल्ह्यात मल्लार येथे सापडलेली त्याची तीन नाणी त्याचे अस्तित्व सिद्ध करतात. विशेष म्हणजे ही नाणी आधी पाहिल्याप्रमाणे मल्लार[२९०] या प्राचीन शहरातील टांकसाळीत पाडलेली होती. कोसलच्या मद्य राजांची या प्रकारची नाणीही याच टांकसाळीत पाडली होती. त्याची नाणी किंवा लेख आणखी इतर कोठे सापडली नाहीत त्यावरून तो कोसलचा स्थानिक शासक असावा. या कोसल शाखेची स्थापना केव्हा झाली याविषयीचा पुरावा उपलब्ध नाही. परंतु आपिलकच्या राजवटीत हा प्रदेश त्याच्या सत्तेखाली होता.

कुंतल हा केवळ पुराणातील उल्लेखांवरून ज्ञात आहे असे नाही तर नंतरच्या काळातील वात्स्यायनाच्या ''कामसूत्र'' ह्या ग्रंथातही त्याचा उल्लेख मिळतो. ''कामसूत्रा'' मध्ये त्याचा शृंगारिक वृत्तीच्या संदर्भात उल्लेख आहे. यशोधराने आपल्या जयमंगला टीकाग्रंथात कुंतलाचे नाव व जन्मस्थानाचा जाणीवपूर्वक उल्लेख केलेला आहे. कुंतल

प्रदेशात महाराष्ट्राचा दक्षिण भाग आणि लगतचा उत्तर कर्नाटकाचा भाग यांचा समावेश होत होता. या भागावर राज्य करणारा हा कुंतल विलासी वृत्तीचा होता.

हाल हा पुराणात दिलेल्या आन्ध्र राजांच्या यादीतील सतरावा राजा आहे. हा त्याच्या राजकीय कार्यक्षमतेपेक्षा साहित्यिक कर्तबगारीसाठी जास्त प्रसिद्ध आहे. त्याने महाराष्ट्री प्राकृतमध्ये असलेल्या एक कोटी गाथांमधून आर्यवृत्तातील सातशे गाथांची निवड करून काव्यसंग्रह तयार केला. हा ग्रंथ आता ''गाथासत्तसई'' (संस्कृतःगाथा-सप्तशती) म्हणून प्रसिद्ध आहे. परंतु आरंभी याला कोश=श्लोकांचा किंवा गाथांचा संग्रह असे म्हणत. बाण, उद्योतन सूरी, अभिनंद यासारख्या प्राचीन ग्रंथकारांनी तसेच प्रत्यक्ष ''गाथासप्तशती'' च्या गाथांमध्ये (colophon) मध्ये व पीताम्बराच्या[२०१] आणि गंगाधराच्या टीका ग्रंथामध्ये[२०२] या ग्रंथाला कोश असे म्हटले आहे. त्याने या गाथांची निवड करताना बरीच काळजी घेतली आहे. या गाथांमध्ये तत्कालीन जीवनाचे, विशेषतः शृंगारिक बाजूचे चित्र रेखाटले आहे. सांस्कृतिक जीवनाबद्दल माहिती पुरविणारी तर ही एक खाणच आहे. ह्यामध्ये वेळोवेळी बऱ्याच नवीन गाथा घालण्यात आल्या तरी त्यांची सातशे ही मूळसंख्या कायम ठेवण्याची काळजी घेतलेली आहे. जेवढ्या गाथा गाळल्या तेवढ्याच नवीन त्यांच्या जागी घातल्या. नंतरच्या काळातील ''लीलावई'' या प्राकृत ग्रंथामध्ये त्याच्या जीवनातील रम्य पण अविश्वसनीय अशा घटना सांगितल्या आहेत. हालने त्याच्या सेनापतीकडून (commander-in-chief) सिलोनचा राजा शीलामेघ याची कन्या राजकन्या लीलावती हिच्याबद्दल ऐकल्यानंतर सप्तगोदावरीच्या काठावर वसलेल्या भीमम ह्या ठिकाणावर आक्रमण कसे केले, तेथल्या राक्षसांचा वध कसा केला, राजकन्येशी विवाह कसा केला, सिंहलदीप बेटाच्या राजाला भेट कशी दिली व आपल्या राजधानीला विजयी होऊन परत कसा आला या सर्व घटनांचा सुरस वृत्तांत यात येथे सांगितलेला आहे.[२०३] मात्र हा ''हाल'' प्रमुख राज घराण्याशी संबंधित होता का? याबद्दल शंका आहे. तो कुंतल प्रमाणे कुंतल शाखेचा[२०४] असण्याचीही शक्यता आहे. त्याने पाच वर्षे[२०५] राज्य केले असे म्हणतात.

सुंदर नावाच्या राजाच्या अस्तित्वाचा पुरावा आपल्याला ''पेरिप्लस मारीस इरिथ्रई'' या ग्रंथातही मिळतो. वर पाहिल्याप्रमाणे हा राजा दुर्बल असावा कारण तो कल्याण बंदराच्या संरक्षणाची व्यवस्था राखू शकला नाही. पुराणांतील वर्णनाप्रमाणे त्याने फारच कमी म्हणजे एकच वर्ष[२०६] राज्य केले. चकोर नामक राजा त्याच्या नावावरून चकोर पर्वतीय प्रदेशाचा राजा असावा असे दिसते. शिवसद हे कदाचित गौतमीपुत्र सातकर्णीच्या पित्याच्या शिवस्वाति ह्या नावाचे रूप असावे. महाराष्ट्रात औरंगाबाद जिल्ह्यात भोकरदन येथील उत्खननात मिळालेल्या नाण्यावरील लेखाचे शिवसद असे साशंक वाचन केले गेले आहे.[२०७] येथे अनुसरलेल्या कालक्रमाप्रमाणे, गौतमीपुत्र सातकर्णि हा इ. स. च्या पहिल्या शतकाच्या ६० व्या वर्षी गादीवर आला असावा.

सातकर्णीच्या राजवटीचा अस्त व गौतमीपुत्र सातकर्णीच्या कारकिर्दीचा प्रारंभ यामधील अंतर १६ वर्षांच्या वर असणे शक्य नाही. आधी नमूद केल्याप्रमाणे पुराणांनी या दोघांच्या शासनकालाच्या मध्ये सोळा राजवटी ठेवल्या आहेत. पण सर्वांना १६ वर्षांच्या कालावधीत ठेवणे अशक्य आहे. आधी उल्लेखिल्याप्रमाणे यापैकी निदान काही राजे तरी या घराण्याच्या स्थानिक शाखांचे राजे असले पाहिजेत असे दाखविणारा पुरावा उपलब्ध आहे. तसेच इतर बरेच राजे याप्रमाणेच स्थानिक शाखांशी संबंधित असावेत. अद्योप त्या प्रकारचा पुरावा आपल्याला उपलब्ध नसला तरी असे मानावे लागते. या सर्वच राजांनी फारच कमी काळ म्हणजे एक वर्ष अथवा सहा महिने राज्य केलेले दिसते. अशा छोट्या राजवटी अस्थिर राजकीय परिस्थितीचे अस्तित्व दर्शवितात आणि याबद्दल आधी नमूद केल्याप्रमाणे सँदनस किंवा सुनन्दन याच्या अल्प कारकिर्दीत पश्चिम भारतीय बंदराच्या झालेल्या दयनीय अवस्थेची पेरिप्लसने केलेल्या वर्णनावरून खात्री पटते. ही संकटकारक परिस्थिती सातवाहन लेखात ज्यांचा उल्लेख खखरात असा केला आहे त्या क्षहरातांच्या आक्रमणामुळे निर्माण झाली असावी हे उघड आहे. या आक्रमणामुळे वारसा हक्काबद्दल व अगदी सर्व महत्त्वाच्या प्रश्नाबद्दल परस्परविघातक अशी भांडणे ह्या घराण्यात चालू झाली असली पाहिजेत. यामुळे सातवाहन साम्राज्यात सर्वत्र गोंधळ व अव्यवस्था निर्माण झाली होती. या घराण्याला आता धाडसी व साहसी राजाची गरज होती. गौतमीपुत्र सातकर्णि या परिस्थितीत अगदी योग्य राजा ठरला.

**गौतमीपुत्र सातकर्णि :** गौतमीपुत्र सातकर्णि गादीवर केव्हा आला याबद्दल तीव्र मतभेद आहेत. मात्र तो क्षहरात महाक्षत्रप नहपान याच्या समकालीन होता व त्याने नहपानाचा उच्छेद केला याबाबत सर्वांचे एकमत आहे. त्यामुळे नहपान व गौतमीपुत्र सातकर्णि या दोघांच्याही तिथीबद्दलचे प्रश्न एकमेकांशी निगडित असे आहेत. नहपानाच्या तिथीबद्दल माहिती पुरविणारे त्याचा जावई उषभदात (संस्कृत ऋषभदत्त) याचा नाशिक लेख ४१ ते ४५ व्या वर्षांचा आहे आणि त्याचा मंत्री अयम याचा जुन्नर लेख ४६ व्या वर्षीचा[२९८] आहे. ही वर्षे एखाद्या संवताची आहेत की, त्याच्या शासनाची आहेत याचा विद्वानांना नेहमीच प्रश्न पडला आहे. याबाबतची अधिक माहिती या प्रकरणाच्या दुसऱ्या भागात दिली आहे. त्याप्रमाणे नहपानाने दिलेली ही वर्षे त्याच्या राजवटीची आहेत हे दाखविणारा भक्कम पुरावा उपलब्ध आहे. ''पेरिप्लस मारीस एरिथ्रई'' मध्ये अरिअके (अपरान्त) आणि बॅरिगाझा (वर्तमान भडोच, गुजरात) येथील नम्बानुस अथवा मॅम्बरस असे नाव असलेला राजा फार बलशाली आहे असे वर्णन आहे.[२९९] नहपानाशिवाय दुसऱ्या कोणत्याही भारतीय राजाचा[३००] ह्या संदर्भात विचार करणे शक्य नसल्यामुळे पेरिप्लसचा नम्बानॉस म्हणजे नहपानच असावा असे सामान्यपणे समजतात. पेरिप्लसने केलेल्या आफ्रिका व दक्षिण अरेबियाच्या काही राजांच्या उल्लेखांवरून व आणखी काही कारणांसाठी सर्वानुमते पेरिप्लसची तिथी इ. स. च्या पहिल्या शतकाच्या ६०-७५ या वर्षांच्या

दरम्यान ठेवली आहे. या कालखंडात नहपान हा पूर्ण सामर्थ्यासह राज्य करीत होता व गौतमीपुत्राने त्याचा पराभव करून वध केला नव्हता हे उघड आहे. यामुळे नहपानाचा नाश किंचित नंतर म्हणजे इ. स. च्या पहिल्या शतकाच्या ७५ ते ८० या वर्षाच्या दरम्यान झाला असावा असे दिसते. ही घटना इ. स. ७८ च्या आधीच घडली असावी, कारण चष्टन इ. स. ७८ मध्ये गादीवर आला व त्याने शक संवत चालू केला. यामुळे ही घटना इ. स. ७५ ते ७८ या दरम्यान ठेवावी लागते. डॉ. मिराशी व काही विद्वानांनी नहपानाच्या कालातील लेखांची वर्षे इ. स. ७८ मध्ये चालू होणाऱ्या शक संवताची धरून त्यांचे समीकरण इ. स. ११९-१२४ या वर्षांशी केलेले आहे. परंतु त्यांच्या या समीकरणाला उपोद्बलक पुरावा नाही. त्यांच्या मते गौतमीपुत्र सातकर्णीने त्याच्या शासनाच्या अठराव्या वर्षी नहपानाचा उच्छेद केला त्याअर्थी तो नहपानाच्या शेवटच्या ज्ञात म्हणजे इ. स. १२४ या वर्षाच्या १८ वर्षे आधीच गादीवर आला असावा. याप्रमाणे या विद्वानांनी त्याचे सिंहासनारोहण इ. स. १०६[३०१] मध्ये ठेवले आहे. या अभ्यासकांनी पुढे अशीही कल्पना मांडली आहे की, क्षहरात आणि कार्दमक (चष्टन वंश) कनिष्काच्या कुषाण राजघराण्याचे मांडलिक होते (Sub-ordinate) आणि त्यामुळे त्यांच्या राज्यकर्त्यांच्या संवताचा उपयोग करणे हे त्यांचे कर्तव्यच होते. कुषाण लेखात कनिष्क प्रथम याच्या वेळेपासून उपयोगात असलेला संवत् व क्षत्रपांच्या लेखातील संवत् एकच आहेत. याप्रमाणे त्यांच्या मते शक संवताचा प्रारंभ कनिष्काच्या राज्यारोहणापासून झाला किंवा कनिष्क ह्या संवताचा संस्थापक होता. पण या मतास पुरेसा आधार नाही. याउलट शक संवत् शक महाक्षत्रप चष्टन याने स्थापन केला किंवा त्याच्या राज्यारोहणापासून अस्तित्वात आला तसेच चष्टन व नहपान हे कुशाणांचे मांडलिक नव्हते तर स्वतंत्र राजे होते आणि उषमदात व अयम हे नहपानाचे अनुक्रमे जावई व मंत्री होते, त्यांचे लेख त्यांचा राजा नहपान याच्या राजवटीच्या वर्षाचे आहेत या विधानांना उपोद्बलक व विश्वसनीय असा पुरावा उपलब्ध आहे. शेवटी आपण असे म्हणू शकतो की, पेरिप्लसमध्ये उल्लेखिलेला नम्बानुस अथवा मंम्बरस हा दुसरा कोणी नसून ज्याचा गौतमीपुत्र सातकर्णीने चष्टनाच्या इ. स. ७८ मध्ये झालेल्या राज्यरोहणाच्या थोड्या आधी नाश केला तो नहपानच होय. या प्रमाणे गौतमीपुत्र सातकर्णीची राज्यावर येण्याची तिथी इ. स. ६०[३०२] नंतरची ठेवता येत नाही (not later than 60 A. D.). तथापि, जरी वादासाठी आपण मान्य केले की, पेरिप्लसमध्ये नहपानाचा उल्लेख नसला तरीही जर आपण इ. स. ७८ मध्ये चालू होणाऱ्या शक संवताचा प्रारंभ चष्टनाने केला याबद्दल साशंक नाही हे मान्य केले तर गौतमीपुत्र सातकर्णीचे राज्यारोहण या सुमारास झाले हे ठरविण्यात काहीही अडचण येत नाही.[३०३] सर्व इतिहासकारांना चष्टन हा नहपानानंतर आला हे मान्य आहे. त्याची नंतरची तिथी त्याच्या प्राप्त असलेल्या नाण्यांवरूनही दिसून येते. ही नाणी नाणकशास्त्राची प्रगती दर्शवितात. आता जर नहपानाचा उच्छेद गौतमीपुत्राने त्याच्या अठराव्या शासन वर्षापूर्वी केव्हातरी केला हे ग्राह्य धरले तर त्याचे

राज्यारोहण इ. स. च्या पहिल्या शतकाच्या ६० वर्षानंतर कोणत्याही परिस्थितीत ठेवता येणार नाही. त्याच्या राजवटीच्या कालावधीबद्दल विचार केला तर असे दिसते की, पुराणांमध्ये त्याच्या राजवटीची एकवीस वर्षे[३०४] दिली आहेत. परंतु हे विधान चुकीचे आहे असे त्याच्या चोविसाव्या वर्षीच्या[३०५] कोरीव लेखावरून सिद्ध झाले आहे. त्याची कारकीर्द थोडी जास्त वर्षे राहिली असण्याची शक्यता आहे. म्हणून त्याला तीन दशकांची राजवट देता येईल आणि त्याप्रमाणे त्याच्या सत्तेचा शेवट इ. स. ९०[३०६] मध्ये झाला असावा.

जेव्हा गौतमीपुत्र सातकर्णि गादीवर आला तेव्हा या घराण्याची परिस्थिती फार वाईट होती. खरे म्हणजे सातकर्णीच्या अमदानीच्या नंतरच्या काळात उत्तरेकडून झालेल्या सिथियन्सच्या आक्रमणामुळे सातवाहनांच्या सत्तेखालील मध्यभारत व दक्षिण भारतातील बराच प्रदेश कमी झाला होता. अंतर्गत संघर्ष व सिंहासनावर हक्क सांगणाऱ्या मोठ्या संख्येत असणाऱ्या उमेदवारांमध्ये वारसा हक्काबद्दल चालू असलेले संघर्ष यामुळे आक्रमण करणाऱ्यांना चांगलेच सोयीचे झाले. त्याच्या कारकिर्दीच्या प्रारंभी तर परिस्थिती फारच गंभीर होती. परंतु त्याने खंबीरपणाने परिस्थिती हाताळून तावडतोब स्वातंत्र्य प्राप्तीसाठी तयारी सुरू केली.

सातवाहनांना त्यांच्या सत्तेखाली असलेल्या जवळजवळ सर्व प्रदेशातून हुसकावून लावण्यात क्षहरात यशस्वी ठरले. पश्चिम भारताच्या क्षहरातांपैकी आपल्याला दोन राजे माहीत आहेत ते म्हणजे भूमक व नहपान. यापैकी भूमक हा महाराष्ट्रातील एखाद्या प्रदेशावर राज्य करीत होता हे दर्शविणारा निश्चित पुरावा उपलब्ध नाही. याउलट सातवाहनाचा जवळजवळ सर्व प्रदेश नहपानाच्या सत्तेखाली होता. याबाबत बरीच भक्कम गमके प्राप्त झाली आहेत. त्याच्या नाशिक, कार्ले आणि जुन्नर येथे मिळालेल्या कोरीव लेखांवरून त्याच्या राज्यामध्ये नाशिक-पुणे प्रदेशाचा अंतर्भाव होत होता हे स्पष्ट होते. जोगलथंबी (नाशिक जिल्हा) येथे सापडलेल्या नहपानाच्या चांदीच्या नाण्यांच्या[३०७] संचयातील दोन्ही गौतमीपुत्राने आपला छाप मारलेली व छाप न मारलेली नाणी नाशिक जिल्हा त्याच्या ताब्यात होता या विधानाला दुजोरा देतात. भोकरदन येथील उत्खननात प्राप्त झालेली त्याची तांब्याची मोठ्या प्रमाणातील नाणी त्याच्या ताब्यात मराठवाडा प्रदेश होता याची ग्वाहीच देतात.[३०८] पौनी येथे महाक्षत्रप कुमार रुपिअम्म[३०९] याचा शिलालेख मिळाला म्हणून काही विद्वान विदर्भ प्रदेशही शक क्षत्रपांच्या अंमलाखाली होता असे समजतात. तथापि, हा लेख राजकीयदृष्ट्या महत्त्वपूर्ण नाही. कारण यामध्ये महाक्षत्रपाच्या फक्त राजपुत्राचा उल्लेख आहे आणि तो काही स्वतः महाक्षत्रप नव्हता. येथे सापडलेल्या काही प्रचंड स्तूपांच्या[३१०] अवशेषांमुळे हे प्रामुख्याने बौद्ध लोकांचे महत्त्वाचे धार्मिक केंद्र होते असे दिसते. कुमार रुपिअम्म हा पौनीला यात्रेकरू म्हणून आला असावा. ऋषभदत्ताच्या लेखामध्ये उल्लेखिलेल्या स्थल नामावरून असे दिसते की, सातवाहनांच्या सत्तेखाली

असलेल्या मध्यभारतातील प्रदेशांचेही हस्तांतर झाले होते. याचा अर्थ असा की, गौतमीपुत्र सातकर्णि जेव्हा गादीवर आला तेव्हा सातवाहनांच्या राज्यात फक्त आंध्र प्रदेश (तेलंगणा व निकटचा प्रदेश), उत्तर कर्नाटक, विदर्भ आणि दक्षिण महाराष्ट्र हेच प्रदेश होते. या प्रदेशांना आपला मुख्य आधार समजून गौतमीपुत्र दृढनिश्चयपूर्वक नहपानाने त्याचे जिंकलेले प्रदेश मुक्त करण्याच्या तयारीला लागला. त्याच्या या कार्यामध्ये तो त्याच्या शासनवर्षाच्या अठराव्या वर्षी किंवा अठराव्या वर्षापर्यंत यशस्वी झाला. हे त्याच्या अठराव्या वर्षीच्या नाशिक आणि कार्ले लेखांवरून[३११] (बहुधा त्याच वर्षीच्या)[३१२] स्पष्ट होते. हे यश प्राप्त करण्याकरता त्याला बरीच वर्षे प्रयत्न करावे लागले असतील आणि बहुधा त्याचे पडसाद आवश्यक सूत्रावरील जिनदासगणि यांच्या टीकाग्रंथात (चूर्णि) वर्णिलेल्या जैन परंपरेतही उटलेले दिसतात. ही परंपरा प्रबळ सैन्य जवळ असलेल्या राजा सातवाहनाला दोन वर्षांच्या वेढ्यानंतरही नहपानचा पराभव कसा करता आला नाही आणि शेवटी त्याने युक्ति लढवून ही जबाबदारी कशी पार पाडली याचे वर्णन करते.[३१३] दीर्घकाळ चाललेल्या या संघर्षामध्ये यश नेहमी एकाच बाजूला मिळू शकत नाही तर दुसरी बाजूही कधी कधी यश प्राप्त करू शकते याचे प्रमाण आपल्याला नहपानाने गौतमीपुत्र सातकर्णीच्या आपला छाप मारून पाडलेल्या जोगलथंबी येथील पुन्हा रूढ केलेल्या नाण्यांद्वारे मिळते. या संघर्षाच्या शेवटी गौतमीपुत्र सातकर्णीने अखेरचे यश प्राप्त केले. नहपान व त्याचा जावई ऋषभदत्त यांचा गौतमीपुत्र सातकर्णीने पूर्ण निःपात केला याचे प्रमाण आपल्याला गौतमी बलश्रीने याबाबतच्या त्याच्या (खखरात-वस-निरवसेस-कर)[३१४] केलेल्या वर्णनात तर मिळतेच त्याचबरोबरच काही इतर गोष्टींमुळेही मिळते. गौतमीपुत्र सातकर्णीच्या अठराव्या शासनवर्षाचा नाशिक लेख, जो त्याचा पहिलाच लेख असून तो गोवर्धन येथील विजयी सेनेच्या शिबिरातून काढला आहे. त्याचा उद्देश गौतमीपुत्राने आतापर्यंत उषभदातच्या (ऋषभदत्ताच्या) मालकीचे असलेल्या शेतातील जमीन बौद्ध भिक्षूंना दान दिली याची नोंद करणे हा होता.[३१५] ही आज्ञा गोवर्धन येथील अमात्य विष्णुपालित यास उद्देशून काढली होती आणि दानकर्त्याला या ठिकाणी बेनाकटक स्वामी असे संबोधले आहे. हे बेनाकटक गोवर्धन जवळ असलेले महत्त्वाचे शासनकेंद्र होते.[३१६] काही आठवड्यानंतर बहुतेक त्याच वर्षी त्याने पुणे प्रदेश स्वतंत्र केला असे त्याच्या कार्ले शैलगृहातील लेखावरून वाटते. या लेखानुसार गौतमीपुत्राने वलुरक लेण्यात[३१७] वास्तव्य करणाऱ्या महासंघिक निकायाच्या (संघाच्या) बौद्ध भिक्षूंना काही जमीन दान दिल्याचे समजते. गौतमीपुत्राने नहपानाचा उच्छेद केल्यानंतर त्याच्या चांदीच्या नाण्यांवर स्वतःची चिन्हे व लेख यांचा छाप मारून ती नाणी चलनात ठेवली. नाशिक जिल्ह्यात जोगलथंबी येथे अशा नाण्यांचा मोठा संचय सापडला आहे. या संचयामध्ये संचय प्राप्त झाला तेव्हा चौदा हजार नाणी असावीत. परंतु जेव्हा त्याचे वृत्त मिळाले तेव्हा त्यात सुमारे तेरा हजार दोनशे पन्नास नाणी होती आणि त्यापैकी जास्तीत जास्त म्हणजे सुमारे ९,२७० नाणी विजेत्याने आपले छाप (Counter Marked) मारलेली होती. काही विद्वानांनी असे मत व्यक्त

केले आहे की, या संचयातील पुन्हा छाप मारलेल्या नाण्यांसही सर्व नाण्यांचे बारकाईने निरीक्षण केल्यास असे आढळते की, त्यावरील राजांचे चेहरे वेगळे वेगळे आहेत व त्यावरील ग्रीको-रोमन लेखांचा दर्जाही हळूहळू कमी झालेला आहे. यावरून असे दिसते की, ही नाणी फक्त नहपानाचीच आहेत असे नव्हे, तर त्याच्यानंतर येणाऱ्या अनेक क्षत्रपांनी ती पाडली असावीत. परंतु हे मत फारसे संयुक्तिक वाटत नाही. याऐवजी असे दिसते की, विजेत्याने फक्त नहपानाचाच नाश केला असे नाही तर त्याच्या पूर्ण वंशाचाच नाश केला असावा. त्याने शक, यवन आणि पहलव यांचा उच्छेद केला असे वर्णन आढळते. हे शक्य आहे की, यापैकी काही परकीय लोकांनी नहपानाला मदत केली, पण त्यांचा पराभव झाला.

त्याला मिळालेल्या या विजयामुळे त्याच्या साम्राज्याचा बराच विस्तार झाला. त्यामध्ये आधी सातवाहनांनी गमावलेल्या सर्व प्रदेशांचा व त्याचप्रमाणे इतर काही प्रदेशांचाही समावेश झाला होता. आपल्याला त्याच्या साम्राज्य विस्ताराचा काहीसा अतिरंजीत परंतु विश्वसनीय पुरावा वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या एकोणीसाव्या शासन वर्षीच्या नाशिक लेखामध्ये मिळतो. असे सांगतात की, त्याच्या राज्यात असिक[३१८] (विदर्भातील नागपूर जिल्ह्यात कुही तालुक्यात), अश्मक (निरनिराळ्या विद्वानांच्या मताप्रमाणे अहमदनगर किंवा नांदेड निझामाबाद प्रदेश), मूलक (औरंगाबाद जिल्ह्यातील पैठण भोवतालचा प्रदेश), सुराष्ट्र (दक्षिण काठियावाड, गुजरात), कुकुर (उत्तर काठियावाड), अपरान्त (उत्तर कोकण), अनूप (इंदोर आणि नेमाड जिल्हा, मध्य प्रदेश), विदर्भ आणि आकरावन्ती (पूर्व आणि पश्चिम माळवा प्रदेश, मध्य प्रदेश) हे प्रदेश होते. यापैकी सुराष्ट्र, कुकुर, अपरान्त आणि अनूप हे प्रदेश निश्चितच होते व मूलक कदाचित नहपानाकडून जिंकून घेतले असावे. या राज्यामध्ये विंध्य (नर्मदेच्या उत्तरेला असलेला विंध्य पर्वत), ऋक्षवत (नर्मदेच्या दक्षिणेला असलेला सातपुडा), पारियात्र (अरवली पर्वत), सह्य (पश्चिम घाट), कण्हगिरी (कृष्णगिरी, कान्हेरी), मच (अद्याप ओळख पटली नाही). सिरिटन-श्रीस्तन (श्री शैलभ, आंध्र प्रदेश), मलय (निलगिरीच्या रांगा), महेंद्र (पूर्व घाट), सेटगिरी-श्वेतगिरी (श्वेतगिरी टेकड्या, नागार्जूनकोंड) आणि चकोर (अद्याप ओळख पटली नाही) हे पर्वत होते. गौतमीपुत्र सातकर्णीची वाहने (घोडे) तीन समुद्रांचे पाणी प्यायली होती असे वर्णन मिळते (ति-समुद्र-तोय-पीत-वाहन). या वर्णनामध्ये तो पूर्ण दक्षिण द्वीपकल्पाचा स्वामी होता असा संदिग्ध अर्थ ध्वनित होतो. कर्नाटक प्रांतात गुलबर्गा जिल्ह्यात सन्नति येथे नुकत्याच सापडलेल्या अर्धवट लेखातही खखरात कुलाचा नाश करणारा, बऱ्याच राजांचा पराभव करणारा, असंख्य युद्धांमध्ये विजय प्राप्त करणारा आणि बेनाकट, विदर्भ, उपगिरी, अपरान्त, अश्मक, मूलक आणि चकोर पर्वताचा स्वामी होता[३१९] असे त्याचे वर्णन आहे. हा लेख कोणाचा हे मात्र सांगता येत नाही. थोडक्यात म्हणजे त्याच्या राज्यात आंध्र प्रदेश आणि महाराष्ट्र ही वर्तमान राज्ये व मध्य प्रदेश व गुजरात या राज्यांचे निकटचे प्रदेश यांचा समावेश होत होता. तो स्वतःला संपूर्ण दक्षिण द्वीपकल्पाचा एकमात्र सम्राट समजत होता.

रा. गो. भांडारकर व दे. रा. भांडारकर या दोघांच्याही मते गौतमीपुत्र सातकर्णि आणि त्याचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुलुमावि यांनी संयुक्तपणे राज्य केले. यापैकी गौतमीपुत्र सातकर्णीने दक्षिणेतील राजधानी धरणीकोटा येथून व वासिष्ठीपुत्र पुलुमावीने त्याची राजधानी प्रतिष्ठान येथून राज्य केले.[३२०] हे मत, जे मुख्यतः बेनाकटक स्वामिन, असे सर्वसंमत वाचन आहे. त्याऐवजी धेनाकटक स्वामिन अशा वाचनावर आधारित आहे आणि जे सातवाहनांच्या संयुक्त शासनाचे अस्तित्व गृहीत धरते त्याचा स्वीकार करता येत नाही. या मताला दुजोरा देणारा पुरावा उपलब्ध नाही; एवढेच नाही, तर गौतमीपुत्र सातकर्णीने सर्व नाशिक लेख स्वतंत्रपणे देणे, वासिष्ठीपुत्र पुलुमावीने नाशिक, कार्ले, अमरावती हे सर्व लेख त्याचा ज्येष्ठ शासक गौतमीपुत्र सातकर्णीचा उल्लेख न करता स्वतंत्रपणे देणे आणि टॉलेमीने फक्त पुलुमावीचा पैठणचा राजा म्हणून उल्लेख करणे या सर्व गोष्टी या मताविरुद्ध जातात. त्यामुळे भांडारकरांचा सातवाहनांच्या संयुक्त शासनाचा सिद्धांत बहुतेक इतिहासकारांनी मान्य केला नाही.

बऱ्याच वेळा असे विधान केले जाते की, गौतमीपुत्र सातकर्णीने नहपानाकडून जे काही प्रदेश जिंकून घेतले होते ते सर्व रुद्रदामन पहिला[३२१] याने त्याच्याकडून परत घेतले. पण हे सांगणारा पुरावा उपलब्ध नाही. तथापि, अजून एक शक्यता आहे की, टॉलेमीने वर्णन केल्याप्रमाणे उज्जैनी ही चष्टनाची राजधानी होती आणि गौतमीपुत्र सातकर्णीच्या अमदानीच्या शेवटच्या कालखंडात किंवा त्याचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या राजवटीच्या प्रारंभी पश्चिम माळवा चष्टनाच्या ताब्यात गेला असावा. पुलुमावि चष्टनाचा समकालीन होता.

नाशिक प्रशस्तीमध्ये आपल्याला त्याच्या यशस्वी कारकिर्दीबद्दल व व्यक्तिमत्वाबद्दल जितकी माहिती मिळते तितकी इतर कोणत्याही सातवाहन राजाबद्दल मिळत नाही. या वर्णनाप्रमाणे तो हिमालय, मेरू आणि मंदार या पर्वताप्रमाणे सामर्थ्यवान होता. त्याने क्षत्रियांचा गर्व आणि अभिमान यांचे दमन केले होते. तो राम (दशरथ पुत्र), केशव, अर्जून आणि भीमसेन यांच्याप्रमाणे पराक्रमी होता. तो नाभाग, नहुष, जनमेजय, सगर, ययाति, राम (परशुराम) व अंबरीष यांच्याप्रमाणे तेजःपुंज होता. त्याने अनेक शत्रुसंघांचा पराभव केला, सर्व राजे त्याच्या आज्ञांचे पालन करीत होत. त्याच्या चरणांना सर्व राजमंडळे अभिवादन करीत होती. त्याने बऱ्याच युद्धांमध्ये असंख्य शत्रूंवर विजय मिळविला होता.

त्याच्या ठिकाणी शारीरिक सौंदर्य पूर्णपणे एकवटले होते. त्याचे वदन सूर्याच्या किरणांनी उमललेल्या कमलाप्रमाणे विमल होते आणि मुख पूर्ण चंद्रमंडलाप्रमाणे आल्हाददायक होते. त्याची चालण्याची ढब उत्कृष्ट हत्तीच्या चालीप्रमाणे होती. त्याचे बाहू शेषाच्या शरीराप्रमाणे पिळदार, पुष्ट, लांब आणि सुंदर होते. ज्याने सातवाहन

कुलाला प्रतिष्ठा मिळवून दिली होती तो आपल्या जीवित (अ-विपन्न) मातेची शुश्रुषा करीत असे. त्याची माता महादेवी गौतमी बलश्रीचे वर्णन गौतमीपुत्र सातकर्णीची माता व दुसऱ्या महाराजाची (वासिष्ठीपुत्र पुलुमावि) आजी असे केले आहे. ती सत्यवचन, दान, क्षमा, अहिंसा, तपश्चर्या, दम, नियम, उपवास यांच्या अनुष्टानात सदैव मग्न असते असेही म्हटले आहे.[३२२]

गौतमीपुत्र सातकर्णीची माता व वासिष्ठीपुत्र पुलुमावीची पितामही गौतमी बलश्री स्वाभाविकपणेच बरीच वृद्ध होती, तिला आदरयुक्त स्थान होते याबद्दल काही संशय नाही. तरीही ती सातकर्णीच्या कारकिर्दीच्या शेवटी तिच्या पुत्राची प्रकृती ठीक नव्हती म्हणून राज्यकारभार पहात होती[३२३] या काही विद्वानांनी केलेल्या विधानाला उपोद्बलक पुरावा उपलब्ध नाही.

या घराण्याची प्रारंभीची राजधानी जुन्नर येथे होती हे आपण पाहिलेच आहे. अशांततेच्या काळात ती सुरक्षिततेच्या दृष्टीने महाराष्ट्रात कोल्हापूर–सातारा विभाग, उत्तर कर्नाटकात कोठेतरी, बहुधा गुलबर्गा जिल्ह्यात सन्नती किंवा आन्ध्र प्रदेशात तेलंगणा विभागात कोठेतरी तात्पुरती हालवली असावी असे दिसते. ती विदर्भामध्येही असू शकते. भक्कम पुराव्याच्या अभावी याबद्दल निश्चित काहीच सांगता येत नाही. टॉलेमीने पुलुमावीची राजधानी म्हणून उल्लेखिलेल्या प्रतिष्टानला (हल्लीचे पैठण) हा मान गौतमीपुत्र सातकर्णीने त्याच्या अठराव्या शासनवर्षी नहपानावर विजय मिळविण्यापूर्वी मिळणे शक्य नाही. त्याने नहपानावर त्याच्या अठराव्या शासनवर्षी विजय प्राप्त केला हे भोकरदन येथील उत्खननात नहपानाची हीन धातूची असंख्य नाणी मिळाली त्यावरूनही सिद्ध होते. ह्या नाण्यांचा संदर्भ वर आलेलाच आहे. राजधानी प्रतिष्टान येथे एकतर गौतमीपुत्राच्या कारकिर्दीच्या शेवटच्या कालखंडात किंवा वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या अमदानीच्या प्रारंभी नेली असावी.

गौतमीपुत्र सातकर्णि हा सातवाहन राजांपैकी मातृगोत्र निदर्शक नाव धारण करणारा पहिला राजा आहे. हे मातृगोत्रदर्शक नाव भारतामध्ये फार पूर्वीपासून म्हणजे निदान वैदिक काळापासून प्रचलित असलेल्या बहुपत्नीकत्वाच्या पद्धतीचा परिणाम दर्शविते. बहुपत्नीत्वाची पद्धती अस्तित्वात असलेल्या समाजात विशिष्ट राणीपासून झालेली मुले, दुसरी राणी अथवा राण्यांना झालेल्या मुलांपासून वेगळी अशी ओळखता यावीत म्हणून त्या मुलांना मातृगोत्र निदर्शक नाव देण्याची परंपरा होती. ही पद्धती फक्त राजघराण्यातच प्रचलित होती असे नाही तर सामान्य जनतेमध्येही अस्तित्वात होती. या घराण्याच्या आधीच्या राजांनीही अशी नावे धारण केली असण्याची शक्यता आहे. परंतु त्यांचे कोरीव लेख फार थोडे उपलब्ध असल्यामुळे आपल्याला त्याबद्दल काही ज्ञान नाही. या प्रकारच्या नावामुळे दक्षिण भारतामध्ये मातृसत्ताक पद्धति प्रचलित होती असे समजणेही चुकीचे आहे. कारण अशा प्रकारची मातृगोत्रनिदर्शक

नावे उत्तर भारतात ज्या ठिकाणी मातृसत्ताक पद्धति नव्हती तिथेही उपयोगात होती. केवळ सातवाहनांनी ही प्रथा त्यांचा माळवा सारख्या प्रदेशाशी संबंध आल्यावर अवलंबिली असे समजणेही चुकीचे होईल.[३२४]

या घराण्याचा गौतमीपुत्र सातकर्णि हा सर्वश्रेष्ठ राजा होता याबद्दल संशय नाही. तो गादीवर आला तेव्हा परकीय आक्रमणांमुळे या घराण्यात उत्पन्न झालेल्या अराजकतेमुळे किंवा अव्यवस्थेमुळे या घराण्याचे अस्तित्वच धोक्यात आले होते. पण त्याच्याकडे असलेल्या असामान्य दूरदर्शीत्व, शौर्य, धैर्य या गुणांच्या आधारे त्याने आपल्या घराण्याचे पुनरुत्थान केले. त्याच्या या महान देणगीची या घराण्याने कृतज्ञतापूर्वक आठवण ठेवली. गौतमीपुत्र सातकर्णीच्या मृत्यूनंतर दिलेल्या वासिष्ठपुत्र पुलुमावीच्या एकोणिसाव्या वर्षीच्या नाशिक कोरीव लेखात वर्णिल्याप्रमाणे तो खरोखरच सातवाहन घराण्याच्या कीर्तीचा संस्थापक होता. (सातवाहन-कुल-यश पतिथापन कर).

**गौतमीपुत्र सातकर्णीचे वारस :** गौतमीपुत्राचा इ. स. ९० च्या सुमारास मृत्यू झाला. त्याला त्याच्या वासिष्ठ गोत्री पट्टराणीपासून झालेले चार पुत्र होते. ते सर्व स्वाभाविकपणेच वासिष्ठीपुत्र म्हणून ख्यात होते. ते असे– पुलुमावि, सातकर्णि, शिवश्री पुलुमावि आणि स्कंद सातकर्णि.[३२५] यापैकी पुराणांमध्ये उल्लेखिलेला पुलुमावि हा सर्वांत मोठा असल्यामुळे पित्यानंतर तो गादीवर आला. पुराणांनी त्याला अठ्ठावीस वर्षाचा[३२६] शासन काल दिला आहे. तसेच त्याचे कोरीव लेख त्याच्या शासनवर्षीच्या चोविसाव्या वर्षापर्यंत उपलब्ध आहेत. यावरून त्याने २८ वर्षे राज्य केले असावे.[३२७]

पुलुमावि हा कार्दमक महाक्षत्रप चष्टन याचा त्याच्यापेक्षा वयाने लहान असलेला समकालीन होता. चष्टन हा इ. स. ७८ मध्ये गादीवर आला. त्याने निदान इ. स. १३० पर्यंत तरी राज्य केले. या काळात आरंभी तो त्याचा मुलगा जयदामन व नंतरच्या काळात जयदामनचा मुलगा रुद्रदामन पहिला यांच्याबरोबर संयुक्तपणे राज्य करीत होता. क्लॉडिअस टॉलेमस (Cladius Ptolemaus) किंवा टॉलेमी म्हणून जो इतिहासकारांना ज्ञात आहे तो आपल्या भूगोलविषयक ग्रंथात बैठण (हल्लीचे पैठण) येथून राज्य करणाऱ्या टोलेमाओस किंवा पोलेमैआस व ओझेन[३२८] (उज्जैन) या राजधानीच्या ठिकाणाहून राज्य करणाऱ्या तिअस्तनेस या राजांचा उल्लेख करतो. यापैकी पहिला राजा म्हणजे पुलुमावि होय व दुसऱ्या राजाचे तादात्म्य चष्टनशी केलेले आहे. ऑलिम्पीओडोरसच्या माहितीप्रमाणे टॉलेमी इ. स. १४७ मध्ये कॅनोपा येथे होता आणि त्याच्यापूर्वी ४० वर्षांपासूनच त्याने खगोल विद्येच्या अध्ययनास प्रारंभ केला होता. यामुळे टॉलेमीने केलेले उल्लेख इ. स. १०४[३२९] नंतरच्या कोणत्याही काळातील राजवटीला लागू होतात. यावरून असे दिसते की, गौतमीपुत्र सातकर्णीने

नहपानावर विजय प्राप्त केल्यानंतर त्याच्या राज्यात समाविष्ट केलेल्या अवंती प्रदेशाचा ताबा त्याच्या कारकिर्दीच्या अखेरीस किंवा त्याचा मुलगा वासिष्ठीपुत्र पुलुमाविच्या शासन कालाच्या प्रारंभी दुसऱ्या शक क्षत्रपाकडे गेला होता. त्याचप्रमाणे जे काही काळ वगळता गौतमीपुत्राच्या वेळी या घराण्याच्या सत्तेखाली असलेले सातवाहन राज्यातील उत्तरेकडील प्रदेशही पुलुमावीने गमावले होते. रुद्रदामन पहिला याच्या इ. स. १५० मध्ये दिलेल्या गिरनार प्रशस्तीवरून असे कळते की, त्याने सातकर्णीच्या युद्धामध्ये दोन वेळा पराभव केला, परंतु जवळचा नातेसंबंध असल्यामुळे त्याचा नाश केला नाही यामुळे त्याला कीर्ती प्राप्त झाली.[३३०] या सातकर्णीचे नेहमी वासिष्ठीपुत्र पुलुमावीशी तादात्म्य करण्यात येते. असे विधान केले जाते की पुलुमावीचाही उल्लेख सातकर्णि म्हणून करता येतो कारण सातकर्णि हे सातकर्णि पहिला[३३१] याच्या वेळेपासून कुलनाम झाले होते. रुद्रदामन पहिला याने त्याच्या शत्रूचा उल्लेख तो त्याचा जवळचा नातेवाईक असल्यामुळे वैयक्तिक नावाने न करता जे त्याला ज्ञात होते त्या घराण्याच्या नावाने करणे अशक्य होते. या शिवाय सातकर्णि या नावाला कधी घराण्याच्या नावाचे स्वरूप प्राप्तच झाले नाही. शेवटपर्यंत ते व्यक्तिनाम म्हणूनच प्रचलित राहिले.

आधी पाहिल्याप्रमाणे सातवाहन साम्राज्याचे उत्तरेकडील प्रदेश पुलुमावीच्या कारकिर्दीच्या काही वर्षे पूर्वी किंवा त्याच्या कारकिर्दीमध्ये चष्टनाने जिंकले होते. परंतु राज्याचा दक्षिणेकडे झालेला विस्तार व एकत्रीकरण यामुळे हे नुकसान भरून निघाले होते. कोरीव लेख व नाण्यांद्वारे प्राप्त झालेल्या पुराव्यांनुसार असे दिसते की, पुलुमावीच्या पूर्वी गुंटूर प्रदेश "सद" अंत्यपदयुक्त नाव असलेल्या घराण्याच्या सत्तेखाली होता. गुण्टुपल्लि येथे "सद" नावाने ज्ञात असलेल्या राजाच्या लेखाच्या चार प्रती प्राप्त झाल्या आहेत. या लेखामध्ये राजा सदचा तो महामेघवाहनाचा वंशज असल्याचा उल्लेख असून तो कलिंग व माहिषकचा राजा होता असे वर्णन आहे. याच जिल्ह्यामध्ये वेलपुरू येथे राजा महासद याचा स्तंभलेख मिळाला आहे. अमरावती (गुंटूर जिल्हा, आन्ध्र प्रदेश) त्याच्या प्राचीनत्वाबद्दल प्रसिद्ध असून तेथे सिवमक सद याचा अर्धवट लेख प्राप्त झाला आहे. या सिवमक सद राजाचे बऱ्याच वेळा सातवाहन राजाशी[३३२] समीकरण केलेले आहे. परंतु हा स्वतंत्र असा "सद" राजा होता हे आता सिद्ध झाले आहे. वड्डमानु येथील उत्खननात बऱ्याच सद सरदारांची (Chiefs) हलक्या धातूची नाणी स्तरबद्ध निक्षेपात (stratified context) मिळाली आहेत. तसेच आन्ध्र प्रदेशाच्या किनारी प्रदेशातील श्रीकाकुलम, गोदावरी, कृष्णा, गुंटूर आणि नेल्लोर जिल्ह्यांमध्ये समन्वेषणात तसेच पृष्ठभागावरही "सद" नाणी मोठ्या प्रमाणावर मिळाली आहेत. यावरून हे स्पष्ट होते की, कलिंगच्या महामेघवाहन घराण्याचे वंशज असलेले सद राजे हे आन्ध्र प्रदेशाच्या किनारी प्रदेशावर स्वतंत्रपणे किंवा सातवाहनांचे मांडलिक म्हणून वासिष्ठीपुत्र पुलुमावीने हा प्रदेश कायमचा आपल्या राज्याला जोडेपर्यंत म्हणजे जवळ जवळ एक

शतकपर्यंत राज्य करीत होते. वासिष्ठीपुत्र पुलुमावीचा अमरावती येथे मिळालेला कोरीव लेख आणि त्याची व त्याच्या वारसाची आन्ध्र प्रदेशाच्या[३३३] कोरोमण्डल किनाऱ्यावर मिळालेली नाणीही हेच सांगतात.

पुलुमावीचे कोरीव लेख महाराष्ट्रात नाशिक व कार्ले आणि आन्ध्र प्रदेशात अमरावती येथे, तर नाणी आन्ध्र प्रदेश व महाराष्ट्र तसेच इतिहासकारांना कुंतल या नावाने ज्ञात असलेल्या उत्तर कर्नाटक प्रदेशात मिळाली आहेत. यावरून त्याच्या अमदानीत सातवाहन साम्राज्याचा साधारणपणे या प्रदेशाइतका विस्तार झाला होता असे म्हणता येईल. त्यामुळे त्याच्या एकोणीसाव्या शासनवर्षीच्या नाशिक लेखात[३३४] त्याचे वर्णन दक्षिणापथस्वामी असे केले आहे ते अगदी सार्थच आहे. त्याच्या एकोणीस व बावीस वर्षांच्या[३३५] नाशिक लेखांमध्ये त्याचा नवनगरस्वामिन् असा उल्लेख आहे. हे नवनर म्हणजे नवनगर असे वाचन केले असून त्याने या नव्या नगराची स्थापना केली असावी अशी समजूत आहे. हे नवनगर[३३६] म्हणजे क्षत्रपांनी जिंकून नष्ट केलेली व पुलुमावीने पुन्हा स्थापन केलेली सातवाहनांची परंपरागत राजधानी प्रतिष्ठान किंवा वर्तमान पैठण असावे असे विद्वानांचे मत आहे. पुलुमावीने त्याच्या कारकिर्दीच्या प्रारंभापासून धारण केलेली स्वामी[३३७] ही पदवी शकांचा जबरदस्त प्रभाव दर्शविते. दर्शनी बाजूवर राजाची प्रतिमा, टेकडी, चंद्र, सूर्य व इतर चिन्हे आणि द्विभाषिक लेख (दर्शनी बाजूवर प्राकृत आणि मागील बाजूवर द्राविड प्राकृत) असलेली प्रतिमाछाप चांदीची नाणी पाडण्यास प्रारंभ करण्याचे श्रेय कदाचित त्यालाच द्यावे लागेल. या नाण्यावर त्याच्या वेगवेगळ्या वयातील प्रतिमा चित्रित केलेल्या आढळतात.[३३८] भाजक्या मातीच्या नमुन्याच्या स्वरुपात नुकताच प्राप्त झालेला या राजाच्या प्रतिमाछाप नाण्याची मागील बाजू दर्शविणारा पुरावा (Proof Piece) या राजधानीच्या ठिकाणी त्याची चांदीची प्रतिमाछाप नाणी पाडणाऱ्या सरकारी टांकसाळीचे अस्तित्व दर्शवितो.[३३९]

**वासिष्ठीपुत्र सातकर्णि :** वासिष्ठीपुत्र पुलुमावीनंतर त्याचा सख्खा धाकटा भाऊ सातकर्णि इ. स. ११९ मध्ये गादीवर आला. याचा उल्लेख फक्त ''वायुपुराणा''च्या हस्तलिखितामध्ये आढळतो. येथे त्याला एकोणतीस वर्षांची[३४०] राजवट दिली आहे. त्याचे लेख व नाणी यावरून केवळ एका हस्तलिखितातील उपलब्ध माहिती बरोबर असल्याचे स्पष्ट होते. त्याचे लेख महाराष्ट्रात कान्हेरी[३४१] (प्राचीन कृष्णगिरी), कर्नाटकात गुलबर्गा जिल्ह्यात सन्नती[३४२] येथे, तर नाणी बऱ्याच मोठ्या प्रदेशात मिळाली आहेत. तऱ्हाळा येथे प्राप्त झालेल्या नाणक संचयामध्ये त्याची पोटीनची नाणी मोठ्या संख्येत आहेत. शिवाय चांदीची नाणीही मिळाली आहेत.[३४३] महाक्षत्रप रुद्रदामन पहिला याने ज्याचा दोन वेळा पराभव केला परंतु जवळचा नातेसंबंध असल्यामुळे उच्छेद केला नाही, तोच हा दक्षिणापथपति सातकर्णि होय. ह्या जवळच्या नातेसंबंधाचा स्पष्ट उलगडा त्याची कार्दमक वंशात जन्मलेली, जिच्या

पित्याचे नाव "रु" ह्या अक्षराने सुरू होते. ज्याचे समीकरण रुद्रदामन पहिला याच्याशी केले जाते, त्या महाक्षत्रपाची कन्या असलेल्या राणीचा विश्वासू अमात्य सतेरक याने पाण्याचे टाके दान दिल्याची नोंद करणाऱ्या कान्हेरी येथील अपूर्ण लेखावरून होतो. सातकर्णि हा कार्दमक महाक्षत्रप रुद्रदामन पहिला[३४४] याचा जावई होता. रुद्रदामनच्या अनामिक कन्येशी झालेला हा विवाह चष्टनाने सातवाहनांच्या राज्याचा उत्तरेकडील प्रदेश काबीज केल्यामुळे चष्टनाशी उत्पन्न झालेले शत्रुत्व नष्ट झाल्यावर तह पक्का करण्याच्या हेतूने त्यांच्या बंधूच्या राजवटीच्या आरंभीच्या काळात बहुधा झाला असावा. कान्हेरी लेखावरून असे दिसते की, त्याच्या या अनामिक राणीचा इतका दरारा होता की, तो तिचा स्वतःचा विश्वासू अमात्य म्हणून कार्यरत होता. या लेखासंबंधी आणखी एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे ती म्हणजे सातवाहनांच्या सर्व लेखांपैकी हा एकच लेख शुद्ध संस्कृतमध्ये लिहिलेला आहे. बाकीचे लेख त्यांनी स्वीकारलेल्या व लोकप्रिय केलेल्या प्राकृत भाषेत आहेत. परंतु याचा अर्थ असा नाही की, हा लेख दिला तेव्हा तो रुद्रदामन पहिला याचा मांडलिक (Vassal) होता. परंतु दुरदर्शीपणाने तो त्याच्याशी दुय्यम मित्राचे नाते टेवून वागला असावा. सातकर्णीने त्याच्या राजवटीच्या नंतरच्या काळात स्वतःचे स्वतंत्र अस्तित्व सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आणि त्यामुळे त्याचा सासरा रुद्रदामन प्रथम नाराज झाला. त्यातूनच त्याच्या गिरनार प्रशस्तीमध्ये वर्णिल्याप्रमाणे शत्रुत्व उत्पन्न झालेले दिसते. या संघर्षाचा परिणाम म्हणूनच बहुधा अपरान्त प्रदेश सातवाहनांच्या हातातून गेला. परंतु हे नुकसान फार अल्पकाळ टिकले असावे असे यज्ञश्री सातकर्णीच्या कान्हेरी येथील लेखाच्या अस्तित्वामुळे वाटते. बऱ्याच वेळा त्याचे तादात्म्य नाणेघाट लेखामध्ये उल्लेखिलेल्या चतरपण सातकर्णीशी करतात आणि अशी कल्पना आहे की, त्याचे राज्य पश्चिम भारतापुरतेच मर्यादित होते म्हणून त्याचा बहुतेक पुराणांमध्ये उल्लेख नाही.[३४५] पुराणांमध्ये त्याचे नाव नसल्यामुळे काहीचे असे मत आहे की, तो सातवाहन गादीवर[३४६] आलाच नाही; पण असे मानणे योग्य टरत नाही.

**वासिष्ठीपुत्र शिवश्री पुलुमावि :** वासिष्ठीपुत्र सातकर्णीनंतर त्याचा धाकटा भाऊ शिवश्री पुलुमावि हा गादीवर आला. एकाच कुळातील असल्यामुळे तोसुद्धा वासिष्ठीपुत्र म्हणून ख्यात आहे. तो इ. स. १४८ च्या सुमारास गादीवर आला. पुराणे त्याचा शिवश्री पुलेमा असा उल्लेख करतात व त्याला सात वर्षांचा शासन-काल देतात (इ. स. १५५).[३४७] कर्नाटकात उत्तर कानडा जिल्ह्यात वनवासी येथे मिळालेल्या लेखामध्ये त्याच्या पट्टराणीचा छाया प्रस्तर उभारल्याची नोंद आहे. तिचा येथे मृत्यू झाला असावा.[३४८] कर्नाटकात गुलबर्गा जिल्ह्यात सन्नती. येथे मिळालेल्या लेखामध्ये कोणा खाजगी व्यक्तीने दिलेल्या दानाची नोंद केली आहे. या ठिकाणी त्याचे नाव पुलु[३४९] ऐवजी पुदु या अक्षरांनी सुरू झाले आहे. त्याची हलक्या धातूची नाणी महाराष्ट्रात वाटेगाव (सांगली जिल्हा),[३५०] ब्रह्मपुरी (चंद्रपूर जिल्हा),[३५१] तऱ्हाळा

(अकोला जिल्हा) येथील संचयामध्ये[३५२] तसेच आन्ध्र प्रदेशात[३५३] कृष्णा-गोदावरी विभागात प्राप्त झाली आहेत. त्याची चांदीची द्विभाषिक प्रतिमाछाप नाणी आन्ध्र प्रदेशात करीमनगर जिल्ह्यात धुलीकट्ट येथील उत्खननात मिळाली आहेत.[३५४] ती मध्य प्रदेशात इंदोर येथे खाजगी संग्रहात पहावयास मिळतात. ही नाणीसुद्धा एखाद्या सातवाहन कालीन पुरातत्त्व गर्भ क्षेत्रात[३५५] (Site) मिळाली असावीत. आन्ध्र प्रदेशात मेदक जिल्ह्यात कोंडापूर येथील उत्खननात त्याच्या चांदीच्या प्रतिमाछाप नाण्याची मागील बाजू दाखविणारा भाजक्या मातीचा एक नमुना (Terracotta Proof Piece) प्राप्त झाला आहे. त्याच्या नुकत्याच झालेल्या समीकरणानुसार कोण्डापूर येथे शिवश्री पुलुमावीची चांदीची नाणी पाडणारी टांकसाळ[३५६] होती असे सिद्ध झाले आहे. या पुराव्यावरून शिवश्री पुलुमावीच्या कारकीर्दीत सातवाहन साम्राज्यात महाराष्ट्र, आन्ध्र प्रदेश व कर्नाटकाच्या बऱ्याच मोठ्या प्रदेशाचा अंतर्भाव होता असे दिसते.

वा. वि. मिराशींच्या मते शिवश्री ही नुसती सन्मानदर्शक पदवी आहे आणि "वासिष्ठीपुतस सिवसिरि-पुलमाविस" असा लेख असलेली नाणी वासिष्ठीपुत्र पुलुमावीची समजली पाहिजेत. त्याने आपल्या इच्छेनुसार सन्मानदर्शक शिवश्री या पदवीसह किंवा या पदवीरहित[३५७] अशा प्रकारची नाणी पाडली. आधी यांनीच या नाण्यांचा अभ्यास करून ही नाणी शिवश्री पुलुमावीची आहेत असे मत व्यक्त केले होते. परंतु नंतर वाटेगाव नाणकसंचय प्रसिद्ध करतेवेळी त्यांनी आपले मत बदलले व ही नाणी अस्तित्वात नसलेल्या शिवश्री पुलुमावीची घेण्यापेक्षा वासिष्ठीपुत्र पुलुमावीचीच घेणे योग्य आहे असे मत व्यक्त केले. ह्या नावांमुळे सातवाहन राजांची जी तीस संख्या ग्राह्य धरली आहे व जी त्यांच्यामते पुज्य[३५८] आहे, ती एकतीस होते. ही पूज्यतेची किंवा पावित्र्याची भावना त्यांना नाणेघाट येथील सविस्तर लेखामध्ये उल्लेखिलेल्या परंतु पुराणात न उल्लेखिलेल्या वेदिश्री व शक्तिश्री यांचे ऐतिहासिकत्व मानताना किंवा मान्य करताना अडवू शकली नाही. शिवश्री यांच्या चांदीच्या प्रतिमाछापयुक्त नाण्यांद्वारे स्पष्ट होते की, तो व त्याचा वडील भाऊ वासिष्ठीपुत्र पुलुमावि यांचे तादात्म्य असू शकत नाही. कारण हे दोन स्वतंत्र राजे होते.[३५९]

**वासिष्ठीपुत्र स्कंद सातकर्णि :** शिवश्रीनंतर त्यांचा भाऊ, कदाचित धाकटा स्कंद सातकर्णि हा राजा झाला असावा. याचा पुराणांमध्ये शिवस्कंध (बरोबर नाव शिवस्कंद) सातकर्णि असा उल्लेख आहे. त्याच्या मातृगोत्र निदर्शक नावाचा विचार केल्यास तो नक्कीच शिवश्रीचा[३६०] भाऊ असला पाहिजे. पार्जिटरचेही हेच मत आहे. त्यांनी "मत्स्य पुराणाती"ल संबंधित भागाचे वाचन "भावी तस्मात त्रयो सिक समा:"[३६१] असे करण्यासाठी सुचविले आहे. परंतु त्याला दिलेला केवळ तीन वर्षांचा शासनकाल त्याच्यासाठी फार अल्प वाटतो. त्याने सुमारे पंधरा वर्षे राज्य केले असावे. (इ. स. १५६-१७०). त्याची हलक्या धातूची नाणी आधी तऱ्हाळा[३६२] संचयात आणि नंतर वाटेगाव[३६३] संचयात मिळाली. या दोन्ही संचयात मिळालेल्या

त्याच्या नाण्यांवर त्याचे नाव ''खद'' असे दिले आहे. परंतु तऱ्हाळा संचयात खद असे फक्त वैयक्तिक नाव आहे, तर वाटेगाव संचयामधील नाण्यांवर खदच्या आधी मातृगोत्र निदर्शक वासिष्ठीपुत्र हेही नाव आलेले आहे. याशिवाय या ठिकाणी या राजाच्या नावाच्या आधी ''शिव'' हा शब्द सन्मानदर्शक अर्थाने वापरलेला दिसतो. नुकत्याच नागपूर जिल्ह्यात ॲडम येथे झालेल्या उत्खननामध्ये या राजाचे एक शिशाचे वैशिष्ट्यपूर्ण असे नाणे प्राप्त झाले आहे. याच्या दर्शनी बाजूवर लोंबती सोंड असलेला उभा हत्ती उजव्या बाजूला आणि मागच्या बाजूवर चंद्रकोर युक्त सहा सुळक्यांची टेकडी, प्रत्येक गोलामध्ये लहान गोळा असलेले उज्जैन चिन्ह, नंदीपद, सूर्य आणि नदीचिन्ह आहे. दर्शनी बाजूवर राजाचे 'वासिष्ठीपुत्र खद (स्कंद) सातकर्णि'[३६४] असे नाव असलेला लेख आहे. त्याची चांदीची प्रतिमायुक्त नाणीही मिळाली आहेत. यापैकी नाशिक येथे मिळालेल्या एका नाण्यावरील प्रतिमा वयानुसार पडलेला फरक दर्शविते. त्यावरून असे दिसते की, त्याने निदान पंधरा वर्षे[३६५] तरी राज्य केले असावे. शेवटच्या तीन राजांची नाणी सापडलेल्या निरनिराळ्या ठिकाणांच्या आधारे विद्वानांनी साम्राज्याच्या विभाजनासंबंधी[३६६] तर्क केले आहेत. परंतु ते समर्थनीय नाहीत. तऱ्हाळा संचयात त्याची नाणी सापडण्यापूर्वी स्कंद सातकर्णीची माहिती फक्त पुराणातील संदर्भावरूनच कळत होती. परंतु ही पोकळी आता बरीच भरून निघाली आहे. भविष्य काळाबद्दल काही सांगता येत नसल्यामुळे गौतमीपुत्र सातकर्णीचे पुराणांद्वारे माहिती असलेले सर्व वारस या साम्राज्याचे सम्राट होते असे सध्यापुरते तरी ग्राह्य धरणे हेच उत्तम.

**गौतमीपुत्र यज्ञ सातकर्णि :** स्कंदनंतर इ. स. १७० मध्ये यज्ञ सातकर्णि गादीवर आला. याचा उल्लेख पुराणांमध्ये यज्ञ सातकर्णिक असा केला आहे किंवा सातकर्णि असा आहे. त्याचे स्कंदशी असलेले नाते माहीत नाही. त्याचप्रमाणे पुराणांमध्ये त्याच्या राजवटीचा काळ एकोणतीस व एकोणीस असा वेगवेगळा दिल्यामुळे त्याबद्दलही निश्चितता नाही. प्रस्तुत लेखक त्याला एकोणतीस वर्षांची कारकीर्द देणे पसंत करतात. त्याला इ. स. १७१-१९९ या कालखंडामध्ये ठेवता येईल. या कालखंडाला त्याच्या लेखांचाही दुजोरा मिळतो. त्याचा शेवटचा लेख २७ व्या वर्षीचा[३६७] आहे. त्याचे लेख नाशिक (वर्ष ७), कान्हेरी (एक १६ व्या वर्षीचा व एक तिथीरहीत), आणि आंध्र प्रदेशात[३६८] (वर्ष २७) येथे प्राप्त झाले आहेत. त्याचप्रमाणे त्याची नाणी आंध्र प्रदेशातील किनारी प्रदेश किंवा तेलंगण जिल्हा आणि इतर प्रदेश आणि महाराष्ट्र, गुजरात व कर्नाटक राज्यात तसेच प्रतिमायुक्त नाणी सर्व ठिकाणच्या नाणे संग्रहकाकडे पहावयास मिळतात. जी जहाजछाप नाणी त्याचा पूर्वज वासिष्ठीपुत्र पुलुमावि याची आहेत असा आधी समज होता ती वास्तवात यज्ञ सातकर्णीची[३६९] आहेत. या प्रकारच्या नाण्यांवर एक शिड किंवा जास्त शिडांनी युक्त जहाजे चित्रित केली आहेत. ही कोरोमंडल किनाऱ्यावर सापडलेली नाणी रोमन साम्राज्याबरोबर संपन्न समुद्र व्यापाराचे अस्तित्व दर्शवितात.

त्याच्या नाण्यांच्या प्रसारावरून आपण त्याच्या साम्राज्यात संपूर्ण महाराष्ट्र, आंध्र प्रदेश आणि कर्नाटकाचा बराच मोठा भाग तसेच गुजरात व मध्य प्रदेशाच्या काही प्रदेशांचा अंतर्भाव असावा असे म्हणू शकतो. त्याच्या कान्हेरी येथे मिळालेल्या लेखामुळे रुद्रदामन पहिला याने पूर्वी जिंकलेला अपरान्त प्रदेश त्याच्या राज्याचा अविभाज्य घटक होता असे दिसते. हा प्रदेश त्याने किंवा त्याच्या एखाद्या पूर्वजाने परत मिळविला हे सांगणे कठीण आहे. आधी जेव्हा त्याची फक्त चांदीची प्रतिमाछाप नाणी उपलब्ध होती तेव्हा विद्वानांना असे वाटत होते की, यज्ञने शकांना अपरान्त तसेच पश्चिम भारत व नर्मदेचे खोरे[३७०] या प्रदेशामधून हुसकावून लावले आणि मिळालेल्या त्या विजयाचे प्रतीक म्हणून ही नाणी पाडली. परंतु आता आपल्या माहितीप्रमाणे चांदीची याच प्रकारची प्रतिमायुक्त नाणी पाडण्यास प्रारंभ गौतमीपुत्र सातकर्णीच्या राजवटीच्या शेवटी किंवा वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या कारकिर्दीच्या प्रारंभी झाला होता. तसेच यज्ञ सातकर्णीच्या पूर्वीच्या व त्याच्यानंतर येणाऱ्या अशा कितीतरी राजांनी अशी नाणी पाडली होती.

यज्ञ सातकर्णीचे काही वेळा बौद्ध शिक्षक नागार्जुन याच्या सातवाहन मित्राशी तादात्म्य केले जाते. बाणाच्या ''हर्षचरिता''च्या शेवटच्या प्रकरणामध्ये (Uchchhava) बौद्ध शिक्षक नागार्जुन याचा तीन समुद्रांचा अधिपती असलेल्या (त्रि-समुद्र-अधिपति) व ज्याला त्याने विषावर उतारा म्हणून मोत्यांची माला दिली होती त्या सातवाहन राजाचा मित्र म्हणून उल्लेख आहे. त्याने मित्राला लिहिलेला (सुहृलेख) उपदेश (जो आता फक्त चिनी भाषांतरामध्ये उपलब्ध आहे) या राजाला उद्देशून असावा. फाहियान, सांगतो की, या राजाने नागार्जूनाकरिता श्रीपर्वतावर पाच मजली विहार बांधला होता. युवानच्वांगच्या माहितीप्रमाणे नागार्जून पूस हा ज्याने त्याच्याकरता कोसलच्या राजधानीच्या दक्षिण–पश्चिम दिशेला ४८० कि. मी. अंतरावर असलेल्या पो-लो-मो-लो-की-लो ह्या पर्वतावर मठ खोदविला होता त्या सातवाहन राजाच्या समकालीन होता. तिबेट परंपरेप्रमाणे नागार्जूनाने धान्यकटक म्हणजेच हल्लीचे अमरावती[३७१] येथील स्तूपाच्या भोवती कठडा बांधला होता. हा सातवाहन राजा म्हणजे एक तर यज्ञ सातकर्णि किंवा त्याच्यानंतर येणारा विजय सातकर्णि असावा. नागार्जून या राजांच्या समकालीन होता. ह्या दृष्टीने विचार केला तर असे आढळते की, यापैकी कोणाचेही तीन समुद्रांचा अधिपति असे वर्णन मिळत नाही. सातवाहन लेखांमध्ये ही पदवी फक्त गौतमीपुत्र सातकर्णीसाठी वापरलेली आहे. या दोन्ही राजांच्या राज्यात अमरावतीचा समावेश मात्र होत होता.

यज्ञ सातकर्णीच्या लेखांची संख्या, प्रसार व नाणी पाहता असे दिसते की, या घराण्याच्या अनेक सामर्थ्यशाली राजांपैकी यज्ञ सातकर्णि हा शेवटचा राजा होता आणि त्याच्या कारकिर्दीच्या अखेरपर्यंत सातवाहन साम्राज्याचा मूळचा प्रादेशिक विस्तार पूर्णपणे कायम राहिला.

**गौतमीपुत्र विजय सातकर्णि :** पुराणांमध्ये विजय सातकर्णीचा उल्लेख यज्ञ सातकर्णीचा वारस म्हणून आला असून त्याने सहा वर्षे[३७२] राज्य केले असे पुराणे सांगतात. म्हणजे त्याने इ. स. १९१-९६ या कालखंडात राज्य केले असावे. पुराणे त्यांच्यामधील नात्याबद्दल काही माहिती देत नाहीत. परंतु त्यांच्या नावाच्या आधी असलेले मातृगोत्र निदर्शक म्हणजे गौतमीपुत्र या नावावरून ते कदाचित भाऊ असावेत असे दिसते आणि विजय हा दोघांमध्ये लहान होता. आन्ध्र प्रदेशात[३७३] नागार्जूनकोण्ड येथे मिळालेला सहाव्या वर्षीचा लेख हा त्याचा ज्ञात असलेला एकमेव लेख आहे. त्याची पोटीनची नाणी पूर्व दख्खन आणि विदर्भात[३७४] मिळाली. त्याचा लेख व नाणी आन्ध्र प्रदेश व विदर्भात प्राप्त झाली. यावरून आन्ध्र प्रदेश व विदर्भ हे प्रदेश तर नक्कीच त्याच्या राज्यात होते. त्याचबरोबर पुराणांमध्ये वर्णिलेल्या शेवटच्या सातवाहन राजाच्या कारकिर्दीत कर्नाटकचा मोठा प्रदेश व लागूनच असलेला दक्षिण व मध्य महाराष्ट्र हे प्रदेशही सातवाहन राज्यात समाविष्ट होते. त्याने विजयपुरी या शहराची स्थापना केली. त्याने पैठण येथील राजधानी येथे आणली किंवा नाही याबद्दल निश्चित माहिती उपलब्ध नाही. पुढे पूर्व व दक्षिण भारतात सातवाहनानंतर उदयाला आलेल्या इक्ष्वाकु घराण्याची राजधानी मात्र विजयपुरी येथे होती. या विजयाशिवाय दुसरा एक विजय सातकर्णि त्याच्या चांदीच्या प्रतिमा छाप[३७५] नाण्यांमुळे माहीत आहे. परंतु तो वासिष्ठीपुत्र होय. त्याचे गौतमीपुत्र विजयशी असलेले नाते ज्ञात नाही.

**चण्ड सातकर्णि :** विजय नंतर त्याचा पुत्र चण्ड हा गादीवर आला. पुराणांमध्ये त्याच्या राजवटीच्या वर्षांची संख्या वेगवेगळी म्हणजे दहा किंवा तीन[३७६] अशी दिलेली आहे. या राजाचा वासिष्ठीपुत्र चण्डसति असे नाव देणारा एक लहान शिलालेख आंध्र प्रदेशाच्या किनारी प्रदेशात पिटापुरम (प्राचीन पिष्टपुरम) जवळ कोडवली या ठिकाणी प्राप्त झाला आहे. परंतु दुर्दैवाने या लेखाचा वर्ष दिलेला भाग स्पष्ट नाही. एच. कृष्ण शास्त्री[३७७] यांनी याचे वाचन दोन वर्षे असे केले आहे; तर वा. वि. मिराशी[३७८] यांनी ते कदाचित अकरा असे केले आहे. पुराणांच्या आधारे त्याला इ. स. १९७-२०६ असा दहा वर्षांचा राज्यकाल लाभला असावा. त्याची हलक्या धातूची नाणी आंध्र प्रदेशाचा किनारी भाग व महाराष्ट्रात[३७९] विदर्भ भागात सापडली आहेत. त्याच्याही राज्यात उत्तर कर्नाटक व त्याला लागून असलेला दक्षिण महाराष्ट्र हे प्रदेश असावेत. ज्या विजयने मातृगोत्र-निदर्शक वासिष्ठीपुत्र हे नाव धारण केले आणि जो त्याच्या चांदीच्या प्रतिमाछाप नाण्यांमुळे ज्ञात आहे तो, पुराणात उल्लेख नसला तरी याचा भाऊ असावा.

**वासिष्ठीपुत्र विजय सातकर्णि :** हा राजा फक्त चांदीच्या एका प्रतिमायुक्त नाण्याद्वारे ज्ञात आहे. ह्या नाण्याचा उल्लेख गौतमीपुत्र विजय सातकर्णीच्या संदर्भात केलेला आहे. त्याच्या वासिष्ठीपुत्र मातृगोत्र निदर्शक नावावरून तो बहुधा चण्ड

सातकर्णीचा कदाचित लहान भाऊ असावा. त्याने पाडलेल्या चांदीच्या प्रतिमायुक्त नाण्यामुळे तो नक्कीच राज्य करीत असावा. पुराणांमध्ये त्याचे नाव नसल्यामुळे आपल्याला त्याच्या अमदानीचा कालखंड ज्ञात नाही. कदाचित त्याने इ. स. २०७–२११ या काळात राज्य केले असावे.

**पुलुमावि :** पुराणांमध्ये दिलेला शेवटचा आन्ध्र राजा पुलोमावि हा आहे. त्याला पुराणांनी सात वर्षांचा शासन काल[३८०] दिलेला आहे. त्याप्रमाणे त्याची कारकीर्द इ. स. २१२ ते २१८ पर्यंत अशी येते. या राजाचे दोन लेख कर्नाटकात सापडले आहेत. एक लेख आधीच बेल्लारी जिल्ह्यात[३८१] अडोणी येथे मिळाला होता. दुसरा धारवाड[३८२] जिल्ह्यात वासन किंवा हळे--वासन येथे मिळाला. यापैकी पहिला लेख सहाव्या[३८३] वर्षाचा आहे, तर दुसऱ्या लेखातील चारही ओळीतील सुरुवातीचा भाग नष्ट झाल्यामुळे त्याची वर्ष संख्या उपलब्ध नाही. पहिल्या लेखामध्ये राजाचा उल्लेख सातवाहन राजा पुलुमावि[३८४] असा आहे, तर दुसऱ्या लेखात तो वासिष्ठीपुत्र असल्याचे सांगितले आहे. या मातृगोत्रदर्शक नावावरून कदाचित चण्ड व विजय सातकर्णीचा सगळ्यात धाकटा भाऊ असू शकतो. त्याची नाणी विदर्भात तऱ्हाळा येथे व कर्नाटकाच्या चितळदुर्ग जिल्ह्यात चंद्रवल्ली[३८५] येथे उत्खननात मिळाली आहेत. त्याचे लेख व नाणी यावरून महाराष्ट्राचा विदर्भ प्रदेश व कर्नाटकाचा बराच मोठा भाग, त्याचप्रमाणे लागून असलेला दक्षिण व मध्य महाराष्ट्र ह्या प्रदेशांचा त्याच्या राज्यात अंतर्भाव होत होता असे दिसते. पुराणामध्ये वर्णन केलेल्या या आन्ध्र राजवंशाचा इ. स. २१८ च्या सुमारास वा २२० मध्ये अस्त झाला.

## केवळ नाणी व लेख यांच्याद्वारे ज्ञात असलेले नंतरचे सातवाहन राजे

पुराणांमध्ये ज्यांचा उल्लेख नाही परंतु कोणत्या तरी तऱ्हेने सातवाहनांशी संबंधीत आहेत अशा बऱ्याच राजांची आपल्याला लेख व नाणी यांच्याद्वारे माहिती मिळते. अशा राजांमध्ये चतुरपण सातकर्णि,[३८६] कौसिकीपुत्र सातकर्णि[३८७] आणि चुटुकलानंद सातकर्णि[३८८] यांचा समावेश होतो. यापैकी पहिल्याच्या नावाचे वाचन अनिश्चित आहे. शेवटचा राजा यज्ञ सातकर्णि नंतर कर्नाटकात मडवल्ली व शिकारपूर भागात कोठेतरी स्थायिक झाला असण्याची शक्यता असलेल्या चुटु घराण्याचा सभासद असावा व सातवाहनांचे नाममात्र सार्वभौमत्व मानत असावा. कौसिकीपुत्र हा बंडखोर असावा. पण कान्हेरी[३८९] येथील दोन लेखांवरून ज्ञात असलेला माठरीपुत्र शकसेन हा सातवाहन असावा असे वाटत नाही. परंतु इतिहासकार त्याला सातवाहन राजा[३९०] समजतात.

तऱ्हाळा नाणकसंचयावरून असे दिसते की, सातवाहन घराण्याची विदर्भावर तीनशे वर्षे सत्ता होती. या संचयामध्ये वासिष्ठीपुत्र पुलुमावि ते पुराणात दिलेला शेवटचा

आन्ध्र राजा पुलुमाविपर्यंत सर्व सातवाहन राजांची पोटीनची नाणी आहेत. याशिवाय यामध्ये आणखी तीन म्हणजे सक, कर्ण (किंवा कन्ह) आणि कुंभ राजांची नाणी आहेत. ह्या राजांच्या नावाच्या शेवटी सातकर्णि हे नाव आहे. त्यापुढे हे राजे सातवाहन घराण्याच्या अस्तानंतर कोठेतरी उदयाला आले असावेत आणि वाकाटक प्रवरसेन पहिला याने त्यांचा इ. स. च्या तिसऱ्या शतकाच्या अंतापर्यंत पराभव करीपर्यंत ते राज्य करीत असावेत. याप्रमाणे सातवाहनांचे विदर्भावर[३९१] शेवटपर्यंत राज्य होते.

**सातवाहनांचे मांडलिक व वारस :** सातवाहनांचे मांडलिक व सातवाहन साम्राज्याच्या नाशानंतर पुढे आलेल्या राज्यांचा थोडक्यात परामर्श पुढीलप्रमाणे घेता येईल. कर्नाटकाच्या चितळदुर्ग जिल्ह्यात[३९२] प्राप्त झालेल्या शिशाच्या नाण्यांवरून ज्ञात झालेला सदकण, कळलाय महारठि हा सातवाहनांचा कर्नाटकाच्या या भागातील मांडलिक असावा. सातकर्णि हे नाव किंवा आडनाव सातवाहनांमध्ये फार प्रिय होते. नाण्यावरील सदणक (सातकर्णीपासून निघालेले) हे नाव या व्यक्तीचा सातवाहनांशी रक्तसंबंध दर्शविते. काही विद्वानांच्या मते त्याचे नाव नाणेघाट विशाल लेखात[३९३] होते, तरीही या टिकाणी लेख खंडित झाला असल्यामुळे याबद्दल निश्चित सांगणे कठीण आहे. तो व त्याचप्रमाणे मलवल्ली,[३९४] वनसावी[३९५] व कारवार[३९६] भागात मिळालेली नाणी व लेख याद्वारे ज्ञात झालेला चुटुकलानद तसेच कर्नाटकाच्या कारवार[३९७] प्रदेशात प्राप्त झालेल्या नाण्यांमुळे माहीत झालेला मुडानंद हे नक्कीच सातवाहनांचे कर्नाटकातील सामंत किंवा मांडलिक असावेत. यापैकी चुटुकलानंदने बहुधा त्याची सत्ता उत्तर कोकणावर स्थापित केली होती असे त्याच्या कान्हेरी[३९८] येथे मिळालेल्या लेखामुळे वाटते. यज्ञ सातकर्णीनंतर सातवाहन राज्याला उतरती कळा लागली. तेव्हा हे सामंत सामर्थ्यशाली बनले व सातवाहन सत्तेचा पूर्ण अस्त झाल्यावर ते पूर्ण स्वतंत्र झाले. कोल्हापूर प्रदेशातील ज्या कुरुना गौतमीपुत्र सातकर्णीने सातवाहन सत्तेखाली आणले त्यांचे तादात्म्य इ. जे. रॅप्सन यांनी काही सातवाहन राजांबरोबर[३९९] केले आहे. परंतु हे सर्वस्वी अशक्य[४००] असल्यामुळे या मताशी विद्वान फार काळ सहमत राहू शकले नाहीत. काही अभ्यासकांच्या मते ते सातवाहनांचे सामंत[४०१] होते. पण ते आधी सातवाहनांचे दुय्यम दर्जाचे दोस्त (sub-ordinate allies) असले पाहिजेत आणि त्यांचे या घराण्याशी[४०२] काही नाते असण्याची शक्यता आहे.

आन्ध्र प्रदेश, कर्नाटक, महाराष्ट्र या राज्यात (हल्लीच्या) इ. स. च्या तिसऱ्या शतकाच्या दुसऱ्या दशकामध्ये सातवाहनांची सत्ता त्यांच्या मांडलिकांनी हस्तगत केली. आन्ध्र प्रदेशात विजयपुरी व नागार्जूनकोण्ड प्रदेशात पुराणांमध्ये[४०३] ज्यांचे वर्णन आन्ध्रभृत्य म्हणून केले आहे त्या श्रीपर्वतीय किंवा इक्ष्वाकु वंशानी सातवाहन सत्ता काबीज केली. त्यांची राजधानी विजयपुरी (हल्लीचे नागार्जूनकोण्ड) येथे होती.

दक्षिणेत पल्लव वंश[४०४] सत्तेवर आला. पश्चिम महाराष्ट्रात सातवाहनांनी आपले स्थान अभिरांना दिले. नाशिक कोरीव लेखामध्ये[४०५] उल्लेखिलेला ईश्वरसेन हा आभिर राजा होता. त्यांचे कर्नाटकातील सामंत चुटु हे तेथे स्वतंत्र झाले तर कदंबांनी वनवासी येथे स्वतंत्र राज्य स्थापन केले. मल्हार ताम्रपटामुळे माहीत झालेल्या मुण्ड वंशाचा आदित्यराज हा या वंशाचा शेवटचा राजा होता. हे मुण्डवंशीय राजे सातवाहन सत्तेचे विदर्भातील[४०६] वारस आहेत अशी काही काळपर्यंत समजूत होती. तथापि, मल्हारा ताम्रपट[४०७] वाकाटकानंतर इ. स. च्या सहाव्या–सातव्या शतकातला असला पाहिजे. आधी दाखविल्याप्रमाणे सातवाहनांनी या प्रदेशावर इ. स. च्या तिसऱ्या शतकाच्या अखेरीपर्यंत म्हणजे विदर्भामध्ये वाकाटक वंशाचा उदय होईपर्यंत राज्य केले.

---

**संपादकीय टीप :** (१) सातवाहन राजा गौतमीपुत्रपर्यंतच्या सर्वच राजांची कारकीर्द प्रामुख्याने पश्चिम महाराष्ट्रात झाली. नागाणिकेचा नाणेघाटातील लेख व अन्य प्रतिमा लेख, कृष्ण व गौतमीपुत्र सातकर्णि यांचा नाशिक लेण्यातील लेख तसेच पश्चिम महाराष्ट्रात उपलब्ध झालेले त्यांचे ७५ पेक्षा जास्त लेख पाहता सातवाहनांच्या मूळ स्थानांबाबत वाद असला तरी त्यांना आन्ध्रभृत्य म्हणणे किंवा मुलतः आन्ध्रातील मानणे योग्य ठरत नाही. यासाठी आन्ध्रामध्ये कोटलिंगल येथे सिमुकाचे नाणे सापडले हा पुरावा ग्राह्य मानता येत नाही. नाणे किंवा नाणेसंचय कितीही दूरपर्यंत जाऊ शकतात. अशी नाणी जुन्नर जवळही आढळली आहेत. यावरून ते महाराष्ट्रीयन होते हे स्पष्ट आहे. (२) इ. स. १५० नंतर सातवाहनांच्या सर्व हालचाली प्रामुख्याने आन्ध्रात झाल्या. इ. स. च्या ४ थ्या-५ व्या शतकात पुराणांची निर्मिती होत असताना सातवाहनांचा आंध्राशी असलेला संबंध पुराणकारांपुढे स्पष्टपणे असल्यामुळे त्यांनी त्यांना आंध्रभृत्य संबोधले. सर्वच पुराणांनी सातवाहनांना ४५० वर्षांची कारकीर्द दिली आहे. अगदी **वायु पुराणा**तही या घराण्याची कारकीर्द हीच दिली आहे. त्यामुळे त्याकडे दुर्लक्ष करून केवळ वायु पुराणातील १७ राजे घेऊन त्यांचा २६० वर्षांचा कालावधी ठरविणे तर्कसंगत ठरत नाही. याचप्रमाणे पुराणांनी कण्व राजे ४५ वर्षे राज्य करतील व त्यानंतर पुन्हा आंध्र राजे राज्य करतील अशी नोंद केली आहे. सातवाहनाच्या लघुकालवादी कारकिर्दीचे पुरस्कर्ते या उदाहरणाकडे दुर्लक्ष करतात. (३) **मत्स्यपुराणानं** यज्ञश्रीपर्यंतचा वर्तमान कालदर्शक इतिहास दिला आहे. यावरून **मत्स्यपुराण** यज्ञश्रीच्या वेळी तयार झाले असे मानले आहे. तथापि, ही संकलनकर्त्याने अनवधानाने केलेली नोंद असावी. यज्ञश्रीचा कोणत्याही शिलालेखात किंवा नाण्यावर आंध्र किंवा आंध्रजातीय असा उल्लेख नाही. वास्तवात पुराणे ही नंतरच्या कालखंडात लिहिली गेली हे स्पष्ट आहे. (४) सातवाहनांचा कुठल्याही शिलालेखात किंवा नाण्यावर आंध्र असा उल्लेख नाही. त्यांनी स्वतःची नोंद सातवाहन अशी केली असून सातवाहन नावाचे नाणे उपलब्ध आहे यावरून तो या घराण्याचा संस्थापक असावा. पुढे गुप्त घराण्याने "गुप्त" या नावावरून आपले नाव धारण केले, तसे सातवाहनावरून या राजवंशाला नाव पडले असावे. (५) भद्र राजे विदर्भामध्ये (इ. स. १५० ते इ. स. २५०) राज्य करीत होते. त्यांची पश्चिम महाराष्ट्रात सत्ता नव्हती याचा अर्थ सातवाहनांची पश्चिम महाराष्ट्रात सत्ता नव्हती असा होत नाही. कनिष्काला शककर्ता संबोधले जाते. त्याने इ. स. ७८ मध्ये शक सुरू केला. यावरून गौतमीपुत्राचा कालखंड इ. स. १०६ ते १३० ठरतो.

डॉ. अजय मित्र शास्त्री यांनी आपल्या संशोधनाद्वारे काही नवीन समीकरणे मांडली असून ती सर्व मान्य होतील असे नाही असे मत या ग्रंथाच्या संपादनासाठी गटीत केलेल्या संपादक मंडळ सदस्यांच्या उपसमितीने नोंदविले आहे.

----

## तळटिपा

१ काश्मीरच्या लोहारा वंशालाही सातवाहन कुल असे म्हणतात (**राजतरंगिणी,** ६, ३६७; ७, १२८३ आणि १७३२).

२ आन्ध्र प्रदेशात गुंटूर जिल्ह्यातील भट्टिप्रोलु येथील उत्किर्ण लेखावरून ज्ञात झालेला राजा खुबीरक व महाराष्ट्राच्या विदर्भ प्रदेशात, आन्ध्र प्रदेशात तेलंगण विभागात आणि मध्य प्रदेशाच्या माळवा आणि महाकोसल प्रदेशात सापडलेल्या काही नाण्यांवरून ज्ञात झालेले मित्र व भद्र राजे नंतरच्या काळात उदयाला आलेल्या सातवाहन साम्राज्यातील निरनिराळ्या भागांवर राज्य करीत होते.

३ बऱ्याच मोठ्या संख्येने सापडलेल्या नाण्यांवरून ज्ञात झालेला सातवाहन व त्याच्या नावाने ख्यात झालेल्या राजवंशाचा संस्थापक सिमुक सातवाहन हे एकच आहेत असे स्पष्ट होते.

४ पार्जिटर, एफ. इ., **डी. के. ए.,** ऑक्सफोर्ड, १९१३, पृ. ३५ मधील नोंदीप्रमाणे काण्व किंवा काण्वायन राजांच्या वर्णनानंतर पृथ्वी आन्ध्राकडे जाईल किंवा आन्ध्र तिचे स्वामी असतील असे पुराणे सांगतात.

५ मिराशी, व्ही. व्ही., **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** मुंबई, १९८१, पृ. २०, नं. ४. नावाचे अचूक रूप नाणेघाट नाम फलकावरून निश्चित करून घेतले आहे. दुसरे छिमुक हे नाण्यांवर असलेले शुद्ध रूप कदाचित आरंभीच्या काळात आन्ध्र प्रदेशात प्रचलित असावे.

६ **डी. के. ए.,** ऑक्सफोर्ड, १९१३, पृ. ३८, **शिसुको–ध्रः स-जातीयः** आणि **सिन्धुकोः–अन्ध्र-जातीयः** हे दोन पार्जिटरने दिलेले पाठ आहेत. आधीच्या पाठात राजाचा असलेला आन्ध्र स–जातीय असा उल्लेख हा नंतरच्या वाचनातील आन्ध्र-जातीय चे चुकीचे रूप असावे.

७ कण्हचा नाशिक शिलालेख, **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. २, ओळ १, वासिष्ठीपुत्र पुलुमावीचा १९ व्या शासन वर्षीचा नाशिक शिलालेख, उपरोक्त, पृ. ४५, ओळ ६.

८ पुलुमावि तृतीय याच्या आठव्या शासन वर्षीच्या अडोणी शिलालेखात राजाचा उल्लेख सातवाहन वंशातील राजा असा आहे. राञो सातवाहनानं, पूर्वोक्त, **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**

९ **अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया,** पृष्ट २१७-२१९; **ऑक्सफोर्ड हिस्टरी ऑफ इंडिया,** पृ. ११९.

१० रॅप्सन, इ. जे., **केम्ब्रिज हिस्टरी ऑफ इंडिया,** १ ली आवृत्ती, केम्ब्रिज, १९२२, पृ. ५१९.

११ कित्ता, पृ. ५४२.

१२ कित्ता, पृ. ५४३.

१३ हे गौतमीपुत्र सातकर्णीच्या अठराव्या शासन वर्षीच्या शिलालेखातील धानकटक-स्वामी या वाचनावर आधारित होते. आता या शब्दांचे बेनाकट स्वामी असे वाचन मान्य झाले आहे. **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. २६.

१४ **इ. एच. डी.**, कलेक्टेड वर्क्स ऑफ सर आर. जी. भांडारकर, ३, भांडारकर ओरिएन्टल रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे, १९२६, पृ. २८-२९.

१५ **बुद्धिस्ट स्तूपाज ऑफ अमरावती**, जगय्यपेट, लंडन, १८८७, पृ. ३-४.

१६ "डेक्कन ऑफ द सातवाहन पिरियड", **आय. ए.**, १९१८, पृ. ७१, **अशोक**, ३ री आवृत्ती, कलकत्ता, १९५५, पृ. ३१-३२. त्यांनी अशोक कालीन आन्ध्र देशाची व्याख्या केली असून त्यात तेलंगण प्रदेशाचा अंतर्भाव होत असावा असे त्यांना वाटते.

१७ याझदानी, जी. (संपा.), **इ. एच. डी.**, १-४, ऑक्सफोर्ड, १९६०, पृ. ७६-७७.

१८ "सातवाहनाज अॅन्ड देअर सक्सेसर्स", **जर्नल ऑफ मद्रास युनिव्हर्सिटी**, एल (२), १९७८, पृ. ३.

१९ "सातवाहनाज अॅन्ड द कॉन्टेम्परररी क्षत्रपाज", **जे. बी. बी., आर. एस.**, न्यू सिरीज, ३, १९२८, पृ. ५१-५२.

२० **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर, हिस्टरी : एन्शंट पिरियड**, मुंबई, १९६७, पृ. ६८-६९, ७१.

२१ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ९-१२ आणि ४४-४५, सातवाहनांचे मूळ स्थान विदर्भात होते असे यांचे आधी मत होते. नंतर यांचे मत बदलले.

२२ **पोलिटिकल हिस्टरी ऑफ एन्शंट इंडिया**, ६ वी आवृत्ती, कलकत्ता, १९५३, पृ. ४१२-४१३.

२३ **इ. एच. ए. सी.**, "द सातवाहन एम्पायर", मद्रास, १९४१, पृ. १५-१६; **सी. एच. आय.**, २, दुसरी नवीन आवृत्ती, न्यू दिल्ली, १९८७, पृ. २९६-९७.

२४ **इ. एच. ए. सी.**, पृ. २६; **सी. एच. आय.**, २, पृ. २९८. पुराणांमध्ये सातवाहनांना आन्ध्रभृत्य हे नाव दिलेले आहे अशी रा. गो. भांडारकरांनी केलेली व नंतरच्या कित्येक इतिहासकारांनी ग्राह्य धरलेली ही समजूत चुकीची आहे.

२५ नाणी, विशेषतः चांदीची व नाण्यांचे संचय सापडलेली ठिकाणे ही नाणी पाडणाऱ्या राजाच्या राज्यातच वसलेली होती असे म्हणणे शक्य होणार नाही. कारण ती नाणी त्या ठिकाणी निरनिराळ्या कारणांनी व तऱ्हेने पोहोचली असण्याची शक्यता आहे.

२६ बखले, व्ही. एस., **जे. बी. बी. आर. ए. एस.**, पृ. ४८३-८४. यांच्यामते रुद्रदामन प्रथम याने इ. स. १५० पूर्वी सातवाहनांना महाराष्ट्र व अपरान्त या प्रदेशाबाहेर काढले. ते पुढे असा तर्क करतात की, (पृ. ८२-८३) पुराणांनी

वासिष्ठीपुत्र सातकर्णीकडे दुर्लक्ष केले, कारण तो पश्चिमेचा राजा होता (म्हणजे महाराष्ट्र व अपरांतावर शासन करीत होता) आणि पुराणे शिवश्रीचा उल्लेख करतात कारण तो आन्ध्र प्रदेशावर शासन करीत होता. **इ. एच. डी. पी. पी.**, दिल्ली, १९८७, पृ. २५-३७ मध्ये दाखविल्याप्रमाणे पुराणांना वासिष्ठीपुत्र सातकर्णी माहीत होता. पहा–उपरोक्त, पृ. १३, तळटीप-१.

२७ **डी. के. ए.**, पृ. ४३, तळटीप-८.

२८ हे विधान नाणेघाट शिलालेख या वंशातील तिसरा राजा सातकर्णि याची राणी नागनिका हिच्या शासन कालात कोरलेला आहे या धारणेवर आधारित आहे. परंतु काही विद्वान या लेखातील सातकर्णि व याच टिकाणी असलेल्या नामफलकातील सातकर्णि यांचे समीकरण याच नावाच्या दुसऱ्या राजाशी करतात. तो पहिल्या सातकर्णीचा नातू होता. जी. वेंकटराव, **इ. एच. डी. वाय.**, पृ. ८७-८८; ए. एस. आळतेकर, **एम. एस. जी. एच.**, १, पृ. ६३.

२९ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ११.

३० आर. जी. भांडारकर, यांनी आपल्या **अर्ली हिस्टरी ऑफ डेक्कन** या ग्रंथातील चौथ्या भागाला "पोलिटिकल हिस्टरी ऑफ दि डेक्कन ऑफ महाराष्ट्र" असे शीर्षक दिले आहे. पृ. २१. के. गोपालचारी हे सुद्धा हे नाव पश्चिम-दक्षिण भारत किंवा महाराष्ट्र याच अर्थाने घेतात. **इ. एच. ए. सी.**, पृ. २०; **सी. एच. आय.** २, पृ. २९७.

३१ मजुमदार, आर. सी. (संपा.) **सी. ए. आय.**, कलकत्ता, १९६०, पृ. ३०४, परिशिष्टे ५०-५१. समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद स्तंभ लेखामध्ये हा शब्द शक्य तेवढ्या विशाल अर्थाने वापरला आहे, आणि ज्या बहुतेक प्राचीन भारतीय लेखकांना भारतीय द्वीपकल्पाचे उत्तर व दक्षिण भाग स्पष्टपणे वेगळे दाखवायचे होते त्यांचाही हाच हेतू असावा.

३२ बखले, व्ही. एस., **जे. बी. बी. आर. ए. एस.**, न्यू सिरीज ३, पृ. ८३-८४ आणि एच. सी. रायचौधरी, **पी. एच. ए. आय.**, पृ. ४९६.

३३ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ४५.

३४ परब्रह्मशास्त्री, पी. व्ही., "अननोन कॉइन्स ऑफ सातवाहनाज ॲण्ड देअर प्रीडिसेसर्स", **एन. डी.**, २, पृ. १०-२१; "सम मोर कॉइन्स फ्रॉम कोटलिंगाल", उपरोक्त, ३, पृ. १७-२८; पी. एल. गुप्त, "कोटलिंगाल फाईन्ड ऑफ पोस्ट-मौर्यन कॉइन्स", उपरोक्त २, पृ. २४-३३; डी. राजरेड्डी ॲण्ड पी. सूर्यनारायण रेड्डी, "अनपब्लिशड सातवाहन कॉइन्स फ्रॉम कोटलिंगाल ॲण्ड संगरेड्डी", **एन. एस.**, १, पृ. ४५-५२; "सम मोअर न्यू सातवाहन कॉइन्स", उपरोक्त, २, पृ. ६९-८०.

३५ हे नाव किल्ल्याचा निर्देश करते.

३६ शास्त्री, अजय मित्र, "सातवाहन प्रिन्स शक्तिकुमार : न्यूमिसमॅटिक

एव्हिडन्स'', **कुसुमांजलि : न्यू इंटरप्रिटेशन ऑफ इंडियन आर्ट ॲण्ड कल्चर,** एम. एस. नागराजराव (संपा.). **सी. शिवराममूर्ती कॉमेमोरेशन व्हॉल्यूम,** दिल्ली, १९८७, पृ. ४४७-५३.

३७ कोटलिंगाल येथे सापडलेल्या काही नाण्यांवर आढळते.

३८ नावांची ही रूपे नाणी व कोरीव लेखात दिसतात.

३९ पार्जिटरने हे वाचन केले आहे. **डी. के. ए.,** पृ. ४२.

४० यावरून असे दिसते की, इ. स. च्या पहिल्या शतकाच्या आधीच जेव्हा आपल्याला प्रथम हे नाव मिळाले तेव्हा तेलगु भाषेचा पूर्ण विकास झाला होता. के. गोपालाचारी हे आन्ध्र मूलस्थान या मताच्या विरोधी आहेत. त्यांना सुद्धा हे नाव मूळ द्रविडियन असे वाटते. **सी. एच. आय.,** २, पृ. ३१५.

४१ हे वाचन पार्जिटरने केलेले आहे. **डी. के. ए.,** पृ. ४०.

४२ कित्ता, पृ. ४०, तळटीप ६९.

४३ हे वाचन पार्जिटरने स्वीकारले आहे. कित्ता, पृ. ४२.

४४ कित्ता, पृ. ४२, तळटीप २ व ९८.

४५ कित्ता, पृ. ४३, तळटीप क्र. २४.

४६ गौतमीपुत्र सातकर्णीने पाडलेले चांदीचे प्रतिमायुक्त नाणे अजूनपर्यंत मिळाले नाही. पण तशी शक्यता पूर्णपणे नाकारताही येत नाही. कारण त्याच्यानंतर लगेच येणाऱ्या राजाने त्याच्या शासनकालाच्या आरंभीच अशी नाणी पाडली होती.

४७ आपल्याला या राजाचे तरुणपणीची प्रतिमा असलेले चांदीचे नाणे प्राप्त झाले आहे.

४८ **पी. एच. ए. आय.,** पृ. ४२; डी. सी. सरकार, **दि हिस्टरी ॲण्ड कल्चर ऑफ दि इंडियन पिपल,** २, री आवृत्ती, भारतीय विधानभवन, मुंबई, १९५३, पृ. १९४.

४९ सरकार, डी. सी., **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स बेअरींग ऑन इंडियन हिस्टरी ॲण्ड सिव्हिलायझेशन,** १ ली आवृत्ती, कलकत्ता, १९६५, पृ. ३६. अशोकाच्या तेराव्या शिल्पपटात आन्ध्रांचा उल्लेख भोज आणि मितिनिकांच्या नंतर किंवा भोज मितिनिकांच्या नंतर केलेला आहे, तर पाचव्या शिल्पपटात मितिनिकांचा उल्लेख रटिकानंतर आहे (कित्ता, पृ. २२). यावरून असे दिसते की, विदर्भ आणि महाराष्ट्रातील रटिक व भोज हे आन्ध्र प्रदेशातील तेलंगना विभागात राहणाऱ्या आन्ध्रांचे शेजारी होते. यामुळे आन्ध्र हे नाव गोदावरी-कृष्णा प्रदेशाचेच होते असे नाही, तर त्याच्या विस्तारामध्ये आता तेलंगणा म्हणून ख्यात असलेल्या प्रदेशाचाही समावेश होता याबद्दल शंका नाही.

५० के. पी. जायस्वाल, (**जर्नल ऑफ दि बिहार ॲण्ड ओरिसा रिसर्च सोसायटी,** ३, पृ. ४४२) यांचा सातवाहनांना अशोकाच्या लेखातील सतिय पुत्रांचे प्रतिनिधी मानण्याकडे कल होता. तर व्ही. एस. बखले, (पूर्वोक्त, पृ. ४५ आणि ५१) यांना असे वाटते की, सातवाहन हे सतिय पुत्रांची स्थानीय शाखा होती. जिने महाराष्ट्रात राज्य स्थापन केले. त्यांची राजधानी पैठण येथे होती.

५१ खरे म्हणजे केरळ पुत्रांप्रमाणे सतिय पुत्रही तामिळ लोक होते. प्राचीन तामिळ साहित्य व कोरीव लेखांमध्ये त्यांचा अदियमान असा उल्लेख आहे. दोन्ही शब्दांचा अर्थ एकच आहे. मान हा शब्द माकन किंवा मागन-पुत्र या शब्दाचे संक्षिप्त रूप आहे आणि सतिय व अदिय हे शब्द समानार्थक (identical) आहेत.

५२ एस. ए. जोगळेकर, यांनी (**ए. बी. ओ. आर. आय.,** २३, पृ. १६९-२०५) अशी कल्पना मांडली आहे की, त्यांना आन्ध्र म्हटले आहे ते आन्ध्र देशाचे रहिवासी होते म्हणून नाही तर ते पुणे जिल्ह्यातील (Poona District) आन्ध्र खोऱ्याचे निवासी होते म्हणून. परंतु ही कल्पना मान्य होण्यासारखी नाही कारण या प्रदेशाचा या नावाने प्राचीन साहित्य आणि लेखांमध्ये उल्लेख नाही आणि हे नाव प्रदेश किंवा स्थळे यांना घराण्यांच्या नावानुसार नाव प्राप्त होण्याची सामान्य प्रक्रिया दर्शविते. त्याचप्रमाणे व्ही. एस. सुकथनकर (**एपिग्राफिया इंडिका,** १४, पृ. १५१ आणि त्यापुढे. "ऑन दि होम ऑफ दि सो कॉल्ड आन्ध्र किंग्ज", **ए. बी. ओ. आर. आय.,** १, पृ. २१ आणि त्यापुढे.) यांची कर्नाटकमध्ये बेल्लारी जिल्ह्यात सातवाहनांचे मूळस्थान किंवा प्रदेश आहे ही कल्पनाही शेवटच्या कारणामुळे निरर्थक आहे.

५३ **इ. एच. डी.,** पृ. ३४.

५४ **ए. बी. ओ. आर. आय.,** १, पृ. २१ आणि त्यापुढे.

५५ **इ. एच. ए. सी.,** पृ. २१ आणि २५, **सी. एच. आय.,** २, पृ. २९८.

५६ **इ. एच. डी. वाय.,** पृ. ७५.

५७ पार्जिटर, पूर्वोक्त, पृ. ३८. ज्याचे नाव वेगवेगळ्या प्रकारे लिहिले आहे, त्या पहिल्या आन्ध्र राजाच्या संदर्भात पुराणे असे म्हणतात की, तो काण्वायनांचा नोकर (भृत्य) होता आणि असेही असू शकेल की, त्याने प्रारंभी काण्वांची सत्ता मान्य केली होती. सातवाहन राजांनी स्वतःला कधीही आन्ध्र भृत्य म्हटलेले नाही.

५८ **डी. के. ए.,** पृ. ४५, पार्जिटरने पडताळून पाहिल्याप्रमाणे **मत्स्य, वायु व ब्रह्मांड** पुराणे मूळ रचनेच्या शेवटी आन्ध्र सत्तेच्या अस्तानंतर (किंवा जेव्हा ते अस्तित्वात होते) त्यांची सामंत घराणी (भृत्य) सत्ताग्रहण करतील असे म्हणतात, तर **भागवत व विष्णु** पुराणे पश्चिम भारतामध्ये सातवाहनांनंतर आलेल्या आभिरांचा आन्ध्रभृत्य म्हणून उल्लेख करतात.

५९ रॅप्सन, इ. जे., **कॅटलॉग ऑफ इंडियन कॉइन्स इन दि ब्रिटिश म्युझिअम: कॉइन्स ऑफ दि आन्ध्र डायनेस्टि, दि वेस्टर्न क्षत्रपाज, दि त्रैकूटक डायनेस्टि ॲण्ड दि बोधी डायनेस्टि (बी. एम. सी., ए., डब्ल्यू. के.),** ब्रिटिश म्युझियम, लंडन, १९०८, पृ. ५, १५.

६० **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. २३-२४, परंतु सातकर्णींनंतर हे घराणे त्याच्या नावाने ओळखले जाऊ लागले व राजे आपल्या वैयक्तिक नावापुढे सातकर्णि हे नाव लावू लागले.

६१ कित्ता, पृ. ४५. मूळ रचना **सातवाहन–कुल–यस–पतिटापन–करस**

६२ **इ. आय.,** पृ. ३३, सातकर्ण्य–आदिभिश=च, कदंब राजा शांतिवर्मन याचा तालगुंडा स्तंभ लेख.

६३ संदर्भासाठी खालील परिच्छेद पहा : सातवाहन नाणी व कोरीव लेख यामध्ये उल्लेखिलेले सातवाहन नाव हे त्याच नावाचे अचूक रूप आहे हे सिद्ध करण्यास पुरेसे आहे. ते इतर शब्दांचे प्राकृत रूप आहे असे समजणे व्यर्थ आहे.

६४ अशा संदर्भसूचीसाठी पहा : जोगळेकर, ए. एस., ''सातवाहन ॲण्ड सातकर्णि'' **ए. बी. ओ. आर. आय.,** २७, पृ. २३९–४०, या ठिकाणी बहुतेक स्पेलिंग्ज दन्त्य वर्णिय (dental sibitant) आहेत.

६५ करतर्या कुंतल : शातकर्णि : सातवाहनो महादेवीम् मलयवतीम्, **कामसूत्र,** २, २. २८.

६६ इ. जे. रॅप्सन, एच. सी. रायचौधरी व डी. सी. सरकार हे सातवाहन आणि सातकर्णि ही नावे शातवाहन व शातकर्णी अशी लिहितात.

६७ सातेन–यस्माद–उदो भूत तस्मात तं सातवाहनं, नाम्ना चकार कालेन राज्ये च–ऐनं न्य अवेशयत. **कथा–सरित–सागर,** १. ६. ८६.

६८ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** १०, १८७१–७४, पृ. १३२; **संयुक्त वस्तु,** ३१ (XXXI) या बौद्ध ग्रंथात राजगृहावर सत्ता (preside) असणाऱ्या संत नामक यक्षाचा उल्लेख आहे.

६९ सन्ताली.

७० महा.

७१ धनगरी, मुण्डवि, बिहारी भाषेत.

७२ ''हिप्पोकॉर एत सातकर्णि'', **जे. आर. ए. एस.,** १९२९, पृ. २७३–७९.

७३ **सी. एच. आय.,** १, पृ. ५९९.

७४ **बुलेटिन ऑफ दि स्कूल ऑफ ओरिएण्टल ॲण्ड अफ्रिकन स्टडिज,** ९, पृ. ३२७.

७५ वाचिष्टि-माकण, "वसिष्ठ गोत्र असलेल्या स्त्रीचा पुत्र."

७६ **इ. एच. ए. सी.,** पृ. ३१. त्यांच्या मते "शात" हे "सन" (मिळविणे) या मूळ शब्दाचे भूतकालवाचक धातुसाधित किंवा विशेषण आहे.

७७ **ए. बी. ओ. आर. आय.,** २७, पृ. २६० आणि त्यापुढे. ऋग्वेदात सूर्याची सप्त–सप्ति, सप्ताश्व–वाहन आणि सप्तवाहन अशी वर्णने आहेत याचा ते दाखला देतात व सातवाहन नाण्यांवरील काही विशिष्ट चिन्हांचे अशा प्रकारे स्पष्टीकरण देतात की, त्यावरून सातवाहनांची खास सूर्य भक्ति किंवा सातवाहन खास सूर्योपासक होते असे ध्वनित होते.

७८ **सहस्र-आर्चिस सप्त-जिव्हा : सप्त ऐधास सत्य सप्त-वाहन** : ऋग्वेदातील विष्णु सूर्याचे रूप आहे.

७९ **सप्त-अश्वाःवाहनान्य-अस्य सप्त-वाहन : यदि वा सप्त-नामा एकोश्वो वाहनम-अस्य-एति वा एकोश्वो वहति सप्त नामा इति श्रुतः**

८० **सी. एच. आय.,** २, पृ. २९९–३००.

८१ "डेव्हलपमेन्ट ऑफ गोत्र नेम्स्", **पी. के. गोडे कॉमेमोरेशन व्हॉल्यूम,** पुणे, १९६०. पृ. २२१.

८२ देसाई, पी. एन. (संपा.), **ए हिस्टरी ऑफ कर्नाटक,** कर्नाटक युनिव्हर्सिटी, धारवाड, १९७०, पृ. ४८.

८३ **कॉइनेज ऑफ दि सातवाहन एम्पायर,** दिल्ली, १९८०, पृ. ३–४.

८४ **दि कावेरी, दि मौखरीज ॲण्ड दि संगम एज,** मद्रास, १९२५, पृ. ६३.

८५ **हिस्टरी ऑफ इंडिया, इ. स. १५०–३५०,** लाहोर, १९३३, पृ. १६८.

८६ **एम. एस. जी. एच.,** १, पृ. ७३.

८७ परंतु या टिकाणी हे नमूद केले पाहिजे की, सातवाहन हे नाव सुद्धा व्याकरणदृष्ट्या बरोबर ठरू शकले असते.

८८ उदा. शालिवाहन-शालि, तांदूळ, साळ, वाहन-गाडी, गाड्या. याप्रमाणे या नावाचा अर्थ ज्याच्या गाड्या साळीने गच्च भरल्या आहेत तो असा होतो.

८९ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. २, सातवाहन घराण्याचा दुसरा राजा कण्ह (कृष्ण) याच्या नाशिक शैलगृह कोरीव लेखात या घराण्याचा उल्लेख सादवाहन कुल असा केला आहे. हा या घराण्याचा सर्वांत आधीचा लेख आहे. त्याचप्रमाणे सातवाहन राजाचे नाव नाण्यांवर त च्या ऐवजी द घालून म्हणजे सादवाहन असे दिलेले असते.

३६२ मिराशी, व्ही. व्ही., **स्टडीज इन इन्डॉलॉजी,** ३, पृ. ४१-४२.

३६३ मिराशी, व्ही. व्ही., "वाटेगाव हॉर्ड ऑफ सातवाहन कॉइन्स", **जे. एन. एस. आय.,** ३४, पृ. २०८-१०.

३६४ अमरेन्द्रनाथ, "ए लीड इश्यु ऑफ शिवस्कंद सातकर्णि", **एन. एस.,** १, पृ. ५९-६१.

३६५ शास्त्री, अजयमित्र, "ए न्यू व्हरायटी ऑफ स्कंद सातकर्णिज सिल्व्हर कॉइन्स", **एन. एस.,** १, उपरोक्त, पृ. ५३-५७.

३६६ मिराशी, व्ही. व्ही. यांच्या मते वासिष्टीपुत्र पुलुमावीनंतर सातवाहन साम्राज्याचे त्याच्या भावांमध्ये विभाजन झाले. **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. ४०-४१. काही वेळेस नाणेघाट शिलालेखामध्ये उल्लेखिलेला चतरपण सातकर्णि म्हणजेच स्कंद सातकर्णि असे प्रतिपादन केले जाते (उपरोक्त, नं. २३). खुद हे नावसुद्धा शिलालेखात घातलेले आहे (उपरोक्त, पृ. ६६, ओळ १). वर दिल्याप्रमाणे काही वेळेस स्कंदचे समीकरण सिवमकशी करतात. कारण काही विद्वानांच्या मते सिवमक हे पुराणात दिलेल्या शिवस्कंद या नावाचे प्राकृत रूप आहे. वर पाहिल्याप्रमाणे सिवमक सद हा ज्याला वासिष्टीपुत्र पुलुमावीने आन्ध्र प्रदेशाच्या किनारी जिल्ह्यातून हुसकावून लावले होते तो शेवटचा सद शासक होता असे त्याच्या अमरावती येथे असलेल्या लेखावरून दिसते.

३६७ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** लेख नं. २९, पृ. ७७.

३६८ कित्ता, लेख नं. २६-२९.

३६९ मिराशी, व्ही. व्ही., **स्टडीज इन इनडॉलॉजी,** ३, पृ. १७-१८.

३७० सरकार, डी. सी., **ए. आय. यू.,** पृ. २०६; के. गोपालाचारी, **सी. एच. आय.,** पृ. ३२३; रॅप्सन, इ. जे., **बी. एम. सी., ए. डब्ल्यू. के.,** पृ. ९०.

३७१ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. २३१-३३; **सी. एच. आय.,** २, पृ. ३२३.

३७२ **डी. के. ए.,** पृ. ४३.

३७३ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. ८२.

३७४ दत्त, माला, पूर्वोक्त, पृ. ३२२-२३.

३७५ गोखले, शोभना, "विजय सातकर्णि याचे प्रतिमायुक्त नाणे", **विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक,** नागपूर, १९७९, पृ. १५३ आणि त्यापुढे. प्लेट नं. १-१.

३७६ **मत्स्य, वायु** आणि **ब्रह्मांड** या आधीच्या पुराणांच्या हस्तलिखितांमध्ये त्याचे नाव चण्ड असे दिले आहे. परंतु **विष्णू** आणि **भागवत** पुराणांमध्ये ते दण्ड असे आहे. श्री ही सन्मानदर्शक पदवी नावानंतर लावलेली आहे. नंतरच्या पुराणांनी त्याला तीन वर्षांची राजवट दिली आहे.

३७७ "दि कोडवली रॉक इन्स्क्रिप्शन ऑफ चण्डसातिः दि सेंकड इयर ऑफ रेन", **इ. आय.**, १८, पृ. ३१६-१९.

३७८ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ८६.

३७९ दत्त, माला, पूर्वोक्त, पृ. २२४-२५. रॅप्सन प्रमाणे यानीही या राजाला चंद्र सातकर्णी संबोधले आहे. प्राकृत मध्ये "ड" चा "द" होतो.

३८० **डी. के. ए.**, पृ. ४३.

३८१ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ८६; व्ही. एस. सुकथनकर यानी **इ. आय.**, १४ मध्ये याचे मूळ संपादन करून ते वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या नावावर टाकले आहे. पृ. १४३ आणि त्यापुढे.

३८२ शर्मा, एम. जे., "वासन इन्स्क्रिप्शन ऑफ वासिष्ठीपुत्र पुलुमावि", **इ. आय.** ४१, पृ. १५४-५८.

३८३ उपरोक्त, पृ. १५७. सुकथनकरांनी याचे वाचन आठ असे केले आहे. परंतु पुराणांनी शेवटच्या पुलुमावीला फक्त सातवर्षांचा राज्यकाल दिला आहे. या आधारावर ते हा लेख गौतमीपुत्र पुलुमावीचा पुत्र व वारस वासिष्ठीपुत्र पुलुमावि याच्या नावावर टाकतात.

३८४ सातवाहनांचा हाच एक लेख असा आहे की, त्यामध्ये राजाचा उल्लेख अशाप्रकारे केला आहे. व्ही. व्ही. मिराशी हे वर्ष आठच वाचतात. पहा. : **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ८६, ओळ १.

३८५ दत्त, माला, पूर्वोक्त, पृ. ३२६.

३८६ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ६२–६६. मिराशी हा लेख स्कंद सातकर्णीचा मानतात हे योग्य वाटत नाही.

३८७ दत्त, माला, पूर्वोक्त, पृ. ३२६–३२९.

३८८ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ८७–९४ (कर्नाटकातील मळवली व वनवासी आणि महाराष्ट्रातील मुंबईजवळ कान्हेरी हे तीन लेख).

३८९ कित्ता, पृ. ७८–८०.

३९० मिराशी, व्ही. व्ही., उपरोक्त, पृ. ३८.

३९१ शास्त्री, अजयमित्र, **इ. इच. डी. पी. पी.**, पृ. ३८–४४.

३९२ **बी. एम. सी., ए. डब्ल्यू. के.**, पृ. २० व ८५.

३९३ कित्ता, पृ. २०.

३९४ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ८७–८९.

३९५ कित्ता, पृ. ९२–९४.

३९६ **बी. एम. सी. ए. डब्ल्यू. के.**, पृ. ८६ फक्त नाणी.

३९७ कित्ता.

३९८ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ८९–९१.

३९९ **बी. एम. सी. ए. डब्ल्यू. के.**, पृ. २८, ७७, ५–९, १३–१६.

४०० उदाहरणार्थ कुर शब्दाने शेवट होणारी नावे. अशी नावे सातवाहन घराण्याच्या नावांमध्ये मिळत नाहीत.

४०१ मिराशी, व्ही. व्ही., **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ४६–४७.

४०२ नाणेघाट प्रतिमागृहामध्ये ज्या महारटि त्रनकायिरची प्रतिमा आहे तो बहुधा कुरांशी संबंधित असावा.

४०३ **डी. के.** ए., पृ. ४५ व ४६.

४०४ इक्ष्वाकुंच्या नागार्जुनकोण्ड येथील कोरीव लेखासाठी पहा : **इ. आय.**, २०, पृ. १ आणि त्यापुढे. पल्लव लेखांसाठी पहा : टी. व्ही. महालिंगम, **इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि पल्लवाज**, इंडियन कौन्सिल ऑफ हिस्टॉरिकल रिसर्च, न्यू दिल्ली, आगम-कला प्रकाशन, दिल्ली, १९८७, पृ. १ आणि त्यापुढे.

४०५ मिराशी, व्ही. व्ही., "इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि कलचुरी चेदि एरा", **सी. आय. आय.**, उटकमंड, १९५५, पृ. १–४.

४०६ **एच. आय. एस., डब्ल्यू. के.**, पृ. ५४–५६.

४०७ "दि मल्हारा प्लेटस् ऑफ आदित्यराज : ए रिप्रायजल", **जे. इ. एस. आय.**, ४, पृ. ३०–४१ व नं. ७, पृ. ६९–७६.

---

## प्रकरण ६

# पश्चिमी क्षत्रप *

**भा**रतावर राज्य करणारे अनेक परदेशी शासक क्षत्रप म्हणून ओळखले जात. वर्तमान संदर्भात आपला संबंध फक्त पश्चिमी क्षत्रप म्हणून ख्यात असलेल्या क्षत्रपांशी आहे. महाराष्ट्रात क्षहरात आणि कार्दमक ही दोन क्षत्रप घराणी राज्य करीत होती. क्षत्रप हा शब्द जरी भारतीय वाटत असला तरी तो मूळ इराणी भाषेतील आहे. आखिमिनियन साम्राज्याचे बऱ्याच प्रांतांमध्ये विभाजन झाले होते. या प्रांतांचे शासन लष्करी व नागरी अधिकार असलेल्या प्रांताधिपतींकडे सोपविलेले असे. या प्रांताधिपतींना क्षत्रपावन म्हणत. जुन्या इराणी भाषेत "क्षत्र" म्हणजे राष्ट्र, राज्य (Realm) आणि पावन म्हणजे संरक्षक किंवा रक्षणकर्ता. जेव्हा हे प्रांत इ. स. पू. चवथ्या शतकाच्या शेवटी ग्रीक सत्तेखाली आले तेव्हा त्यांनी आधी प्रचलित असलेली शासनपद्धतीच पुढे रूढ ठेवली आणि क्षत्रप हा हुद्दाही कायम ठेवला. त्यांच्यानंतर येणाऱ्या शक आणि पल्लव शासकांनी हेच धोरण सुरू ठेवले. मूळ सत्रप या पदवीचे छत्रप (प्राकृत), क्षत्रप (संस्कृत) असे भारतीयकरण करण्यात आले. जरी मूलतः ही प्रांताधिपतीची पदवी असली तरी नंतरच्या काळात, विशेषतः पश्चिम भारतामध्ये परकीय शासकांनी स्वातंत्र्य प्राप्त केल्यानंतरही आपल्या महाक्षत्रप या श्रेष्ठ पदवी बरोबर क्षत्रप ही पदवीही धारण करणे चालूच ठेवले. या परिस्थितीची तुलना शुंग वंशाचा संस्थापक पुष्यमित्र याच्या काळातील परिस्थितीशी करता येईल. राजा झाल्यानंतरही पुष्यमित्राने सेनापती ही मूळ पदवी कायम ठेवली होती.

पश्चिमी क्षत्रपांचा उदय उत्तर भारतात झाला. पतिकाच्या अज्ञात सनाच्या ७८ व्या वर्षीच्या (इ. स. पू. पहिल्या शतकाच्या प्रथमार्धात) तक्षशिला ताम्रपटात त्याचा पिता लिअक कुसूलक याचा क्षत्रप म्हणून उल्लेख आहे. परंतु या ताम्रपटाच्या वाचनाबद्दल विद्वानांमध्ये मतभेद आहेत. काही विद्वानांच्या मतानुसार त्याचे क्षहरात व चुक्ष या प्रांताचा क्षत्रप म्हणून वर्णन आहे आणि हे दोन्ही पाकिस्तानात तक्षशिलेच्या जवळपास कोठेतरी वसलेले आहेत. विद्वानांच्या दुसऱ्या गटाच्या मताप्रमाणे त्याचे चुक्ष प्रांताचा क्षहरात क्षत्रप म्हणून वर्णन आहे. या ताम्रपटातील वर्णन काहीही असले तरी एक गोष्ट स्पष्ट आहे ती म्हणजे क्षहरातांचा उत्तर भारताशी असलेला संबंध होता. जर त्याचे क्षहरात म्हणून वर्णन असेल तर क्षहरातांचा उदय उत्तर भारतात झाला याबद्दल संशय वाटत नाही आणि जरी त्याचे वर्णन क्षहरात व चुक्ष या प्रांतांचा क्षत्रप म्हणून असले तरी क्षहरात हे वंशनाम तक्षशिलेजवळ'

---

* या प्रकरणाचे मूळ इंग्रजी लेखन डॉ. अजयमित्र शास्त्री (निवृत्त इतिहास विभाग प्रमुख व ज्येष्ठ नाणेसंशोधक, नागपूर विद्यापीठ, नागपूर) यांनी केलेले असून त्याचा मराठी अनुवाद डॉ. मालती महाजन (निवृत्त प्राध्यापिका, नागपूर विद्यापीठ, नागपूर) यांनी केलेला आहे.

असलेल्या त्या प्रदेशाच्या नावावरून पडले असावे असा अर्थ निघतो. मथुरेजवळ गणेश्रा या टिकाणी मिळालेल्या अपूर्ण ब्राह्मी लेखामध्ये घाटक याचा क्षहरात म्हणून उल्लेख आहे. तो सुद्धा क्षत्रप[२] असावा. पश्चिमी क्षत्रपांचा दुसरा वंश (म्हणजे घासमोतीक किंवा चष्टन यांचे घराणे) कार्दमक[३] ह्या नावाने प्रसिद्ध आहे. हे नाव अखिमिनियन राज्यातील (Satrapy) बॅक्ट्रिआ[४] प्रांतातून वाहणाऱ्या कार्दम ह्या नदीच्या नावावरून पडले हे स्पष्टच आहे. सर्व क्षहरात राजे आणि चष्टन यांच्या नाण्यांवरील लेखांची खरोष्टी लिपी, नहपानाच्या चांदीच्या नाण्यांवरील लेखाची नक्कल करण्यासाठी योजलेली ग्रीक लिपी, त्याचप्रमाणे चष्टन वंशियांच्या चांदीच्या नाण्यांची अलंकृत कड या गोष्टींवरून पश्चिमी क्षत्रप हे उत्तरेकडून आले होते याबद्दल खात्री वाटते.

## कालक्रम

कार्दमक घराण्याचे लेख व नाण्यांवर इ. स. ७८ मध्ये स्थापन झालेल्या शक संवताच्या तिथी आहेत. खरे म्हणजे आता महाराष्ट्र आणि इतर टिकाणी प्रचलित असलेल्या शक संवताचा प्रारंभ चष्टनाने[५] केला होता किंवा चष्टनाच्या राज्यारोहणाची ती खूण आहे हे स्पष्ट झाले आहे. तरी पण क्षहरात क्षत्रपांच्या कालखंडाविषयी तीव्र मतभेद आहेत. या प्रश्नाची उकल दोन गोष्टींवर अवलंबून आहे. एक म्हणजे अज्ञात लेखाच्या ''पेरिप्लस मारीस एरिथ्रई''[६] या ग्रंथाची तिथी व दुसरे म्हणजे नहपान याचा जावई उषवदात (संस्कृत ऋषभदत्त) आणि अमात्य अयम (संस्कृत आर्यमन) यांच्या कोरीव लेखांतील तिथींचे स्वरूप. या टिकाणी लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी आहे की, या दोन्हींबद्दल विद्वानांचे एकमत नाही. ह्या दोन बाबींपैकी ''पेरिप्लस''च्या तिथीचा प्रश्न फार महत्त्वपूर्ण आहे; कारण त्यामध्ये गुजरात[७] मधील बॅरिगाझा (वर्तमान भडोच) वर राज्य करणाऱ्या मोंबारुस या राजाचा उल्लेख आहे. सर्वानुमताने या राजाच्या नावाची नंबानुस अशी दुरुस्ती केली आहे आणि त्याचे तादात्म्य लेख व नाणी[८] यावर मिळणाऱ्या नहपान ह्या नावाशी केले आहे. यावरून स्पष्ट होते की, ''पेरिप्लस''ची रचना पूर्ण झाली तेव्हा किंवा या ग्रंथाची रचना करणाऱ्या अज्ञात इजिप्शियन ग्रीक व्यापारी खलाशाने भारताला भेट दिली त्यावेळेस नहपान राज्य करीत होता. ह्या ग्रंथाची रचना सर्वानुमते इ. स. च्या पहिल्या शतकामध्ये[९] केव्हा तरी झाली असावी. या ग्रंथ रचनेची तिथी निश्चित करण्याच्या दृष्टीने सहाय्यभूत टरतील असे दोन महत्त्वाचे मुद्दे असे आहेत की, भाग १९ मध्ये नंबाटिअसचा राजा मलीखास याचा व हिमराईटसूचा[१०] राजा कारीबेल (Charibael) यांचा उल्लेख आहे. यावरून मलीखास हा मलीखास दुसरा (इ. स. ४०–७१) असावा व कारीबेल (Charibael) हा दक्षिण अरेबियामध्ये इ. स. ४०–७१ या कालखंडात राज्य करणारा कारीबील वॉटर येहुनीन (Karibil Water Yehunin) हा असावा. या उल्लेखांमुळे ह्या ग्रंथाची रचना इ. स. ६०–७०[११] च्या दरम्यान झाली असावी असे मानण्याकडे आमचा कल आहे. यावरून नहपान हा इ. स. च्या पहिल्या शतकाच्या सातव्या दशकात राज्य करीत होता असे स्पष्ट होते.

नहपानाच्या वेळचे कोरीव लेख ४१--६६[१२] या वर्षातील आहेत. ही वर्षे त्याच्या स्वतःच्या राज्यकाळाची, विक्रम संवताची की शक संवताची आहेत याविषयी विद्वानांमध्ये तीव्र मतभेद आहेत. ही वर्षे इतिहासकारांनी विक्रम[१३] किंवा शक[१४] संवताची मानली होती. परंतु ती विक्रम संवताची आहेत हे मत आता विद्वानांना मान्य नाही. कारण त्यामुळे नहपानाचा राज्यकाल इ. स. पू. पहिल्या शतकाच्या शेवटी येईल आणि ज्ञात असलेल्या ऐतिहासिक घटनांचा क्रम लावण्याच्या दृष्टीने हा काळ फार लवकरचा होईल. जे आज सर्वसामान्य आहे त्या दुसऱ्या मताचा स्वीकार केला तर नहपानाला इ. स. ११९ ते १२४ या कालखंडात टेवावे लागेल आणि हे ''पेरिप्लस''ने उल्लेख केलेल्या नंबानुसाशी नहपानाचे जे तादात्म्य साधले आहे त्याच्याविरुद्ध जाते. कारण ''पेरिप्लस''ची रचना इ. स. पहिल्या शतकात झाली हे बहुतेक सर्व विद्वानांनी मान्य केले आहे. जरी हे आक्षेप बाजूला टेवले तरी नहपानाचा राज्यकाल आता इ. स. च्या दुसऱ्या शतकाच्या पहिल्या पादात टेवता येत नाही. कारण त्यामुळे ही वर्षे शक संवताची आहेत हे मान्य करणे टाळता येणार नाही. ह्या सिद्धान्ताच्या समर्थकांच्या मते क्षहरात आणि आरंभीचे कार्दमक हे दोघेही कुषाण राजांचे त्यांच्या सत्तेखाली असलेल्या पश्चिम भारतीय प्रदेशातील नोकर होते आणि म्हणून त्यांनी आपल्या लेखांमध्ये कुषाण राजा बहुतेक कनिष्क पहिला[१५] याने चालू केलेल्या शक संवताचा उपयोग केला. हे मत मान्य न होण्यासारख्या दोन अनुमानावर आधारित आहे, ती म्हणजे (१) क्षहरात आणि कार्दमक हे कुषाणांचे सामंत किंवा प्रतिनिधी होते आणि (२) शक संवताची स्थापना कुषाणांनी केली. आपल्याला ह्या दोन पश्चिम भारतीय क्षत्रपांचे असंख्य लेख व नाणी प्राप्त झाली आहेत. पण लेख व नाणी यावरून ते कुषाणांसहित कोणत्याही अधिसत्तेचे, दुय्यम शासक होते असे दिसत नाही. कारण कोटेही कुषाण राजाचे नाव मिळत नाही किंवा कुषाण[१६] सत्तेशी त्यांचा संबंध होता असे दाखविणारा काही अन्य पुरावा मिळत नाही. हे अर्थातच खरे आहे की, कनिष्क पहिला[१७] याच्या वेळेपासून शक संवत प्रचलित झाला. परंतु हा शक संवत म्हणजेच, जो त्याच्या दुसऱ्या शतकाच्या नवव्या दशकापासून ''शक काल''[१८] म्हणून सर्वज्ञात आहे तोच शक संवत आहे हे सिद्ध करणारा काहीच पुरावा उपलब्ध नाही. याशिवाय कनिष्क पहिला याच्या तिथीविषयी वेगवेगळी मते प्रचलित आहेत. भिन्न भिन्न विद्वानांनी त्याची तिथी इ. स. पू. पहिल्या शतकापासून इ. स. च्या तिसऱ्या शतकापर्यंत निश्चित केलेली आहे. भारतीय परंपरेनुसार शक व कुषाण[१९] हे स्पष्टपणे भिन्न आहेत. अशा परिस्थितीतही दोनही अनुमाने पूर्णपणे असमर्थनीय वाटतात. याउलट चष्टन घराण्याचे क्षत्रप हे शकवंशीय होते आणि त्यांनी आपल्या लेखांमध्ये व नाण्यांवर शक संवताचा उपयोग केला याविषयी पूर्णपणे मतैक्य आहे. यावरून शक संवत चष्टनाच्या राज्यरोहणापासून सुरू झाला, एवढेच नाही तर चष्टनाने त्याची स्थापना केली असे तात्पर्य आपण काढू शकतो. हे तात्पर्य जैन ''पट्टावली''मध्ये[२०] व कालकाचार्याविषयी प्रचलित असलेल्या निरनिराळ्या आख्यायिकांमध्ये गुंफल्या गेलेल्या भारतीय परंपरांना अनुसरूनच आहे. यापूर्वी नहपानाच्या कोरीव लेखांच्या तिथी शक संवताच्या आहेत

आणि गौतमीपुत्र सातकर्णीने त्याचा पराभव केल्यावर त्याच्या कुषाण सम्राटाने त्याचे जागी चष्टनाची नियुक्ती केली असे मानले जात होते. कारण तेव्हा चष्टनाचे फक्त ५२ व्या वर्षीचेच (इ. स. १३० पर्यंत) लेख उपलब्ध होते. पण आता चष्टनाचे वर्ष ६ आणि वर्ष ११ म्हणजेच इ. स. ८४ व ८९ चे लेख प्राप्त झाले आहेत. विशेष म्हणजे जिथे चष्टनाचे आधीचे लेख प्राप्त झाले तो सौराष्ट्र प्रदेश या दोनही राजांच्या राज्यात अंतर्भूत होता. हे स्पष्ट झाले आहे. तेव्हा वरील मत मान्य करणे अशक्य आहे. याच्या जोडीला आणखी एक महत्त्वाची गोष्ट लक्षात घ्यावी लागेल. ती म्हणजे, नहपान व चष्टन यांचे कोरीव लेख व नाणी यांच्या तुलनात्मक विश्लेषणावरून नहपान खात्रीने चष्टनाच्या आधी होऊन गेला होता. भगवानलाल इंद्रजींनी दाखविल्याप्रमाणे नहपानाच्या चांदीच्या नाण्यांवरील अर्धपुतळा त्याला त्याच्या आयुष्यातील तरुण, प्रौढ, थोडा वयस्क व वृद्ध/म्हातारा अशा भिन्न अवस्थांमध्ये दाखविती. त्यामुळे नहपानाच्या कोरीव लेखांमध्ये उल्लेखिलेली वर्षे त्याच्या स्वतःच्या राजवटीशी संबंधित आहे असे मानणे आवश्यक आहे. जैन परंपरेनुसार, नहपानाने दीर्घकाळ राज्य केले. "तिलोयपण्णति" आणि "पट्टावलिगाथां"मध्ये त्याने चाळीस वर्षे राज्य केल्याचा उल्लेख आहे. तर जीनसेनाच्या "हरीवंश पुराणां"नी त्याला बेचाळीस वर्षांची राजवट दिली आहे. ह्या उल्लेखांवरून नहपानाने दीर्घकाळ राज्य केले हे सिद्ध होते. या संख्या अगदी पूर्णपणे बरोबर आहेत असे समजणे संयुक्तिक नाही. त्याचे लेख आपल्याला त्याने कमीत कमी सेहेचाळीस वर्षे राज्य केल्याचे सांगतात. "पेरिप्लस"मधील वर्णनावरून स्पष्ट दिसते की, या ग्रंथाच्या रचनाकाळात (इ. स. ६०-८०) सातवाहनांविरुद्ध जोरदार युद्धात नहपान पूर्णपणे गुंतला होता. चष्टन इ. स. ७८ मध्ये गादीवर आला. त्यामुळे नहपानाच्या सत्तेचा अस्त यावर्षी किंवा या वर्षाच्या पूर्वी ठेवावा लागेल. सेहेचाळीस हे त्याच्या राजवटीचे शेवटचे वर्ष आहे. याविषयी कोणीच पूर्णपणे निश्चित राहू शकत नाही. गौतमीपुत्र सातकर्णीने त्याच वर्षी त्याचा पराभव केला असे ग्राह्य धरले तर तो इ. स. ३२ मध्ये गादीवर आला असे मान्य करावे लागेल आणि ज्याअर्थी त्याच्यापूर्वी दोन राजे होऊन गेले त्याअर्थी या घराण्याच्या राजवटीचा प्रारंभ इ. स. पहिल्या शतकाच्या सुरुवातीस झाला असे मानावे लागेल. ह्या पार्श्वभूमीवर पश्चिमी क्षत्रपांच्या इतिहासाची रुपरेषा तपासावी लागते.

## ऐतिहासिक रुपरेषा

### क्षहरात राजवंश

**अधुदक इयन :** हा पश्चिम भारताचा पहिला ज्ञात क्षत्रप राजा होय. गुजरात प्रांतातील कच्छ जिल्ह्यात मिळालेल्या काही तांब्याच्या नाण्यांमुळे त्याचे ऐतिहासिकत्व लक्षात आले. या नाण्यांच्या दर्शनी बाजूवर उजवीकडे दोन्ही हातात फुलांचा हार घेऊन उभी असलेली नायके (Nike) ही देवी आणि कडेने अपूर्ण ग्रीक लेख आहे. नाण्याच्या मागील बाजूवर दोन स्तंभ आहेत. यापैकी डावीकडच्या स्तंभावर सिंहशीर्ष

व उजवीकडच्या स्तंभावर चक्रशीर्ष आहे. सभोवार "क्षहरातस क्षत्रपस अधुदकस इयनस" असा ब्राह्मी लेख आहे. अशा प्रकारची नाणी आधीही मिळाली होती. परंतु नुकतीच मिळालेली नाणी उत्तम स्थितीत असल्यामुळे त्यावरील लेखाचे अचूक वाचन करणे शक्य झाले. नायकेची अशा प्रकारची प्रतिमा उत्तर भारतात मिळालेल्या बऱ्याच इन्डो-ग्रीक, इन्डो-सिथियन आणि इन्डो-पार्थियन नाण्यांवर दृष्टीस पडते, परंतु पश्चिम भारतामध्ये अशा प्रकारचा पुरावा प्रथमच प्राप्त झाला आहे. यावरून क्षत्रपांनी[२३] उत्तर भारतातून देशांतर केले असे स्पष्टपणे दिसते. नाण्याच्या पुढील बाजूवर असलेल्या ग्रीक लेखाचे वाचन "सत्रापो" असे आहे. ते अधुदक इयन यांच्याबद्दल माहिती सांगणारे एकमेव साधन आहे. यामुळे त्याच्याविषयी एकच गोष्ट निश्चितपणे सांगता येते आणि ती म्हणजे त्याने उत्तर भारतातून देशांतर केले आणि गुजरातमध्ये आश्रय घेतला.

**भूमक :** अधुदक इयन प्रमाणेच भूमक हासुद्धा फक्त त्याच्या नाण्यांमुळे ज्ञात आहे. त्याच्या बाण छाप, तबक (Discus) छाप, वज्र छाप, सिंहशीर्ष छाप आणि चक्र छाप इत्यादी नाणेप्रकारांच्या अवलोकनावरून असे दिसून येते की, तो अधुदक-नंतर गादीवर आला. कदाचित तो अधुदक इयनच्या घराण्यातील असावा. परंतु तो अधुदकनंतर लगेच सत्तेवर आला की या दोघांच्यामध्ये एखादा दुसरा राजा होता हे ठरविणे अवघड आहे. पुढील बाजूवर खरोष्ठी लेख व मागील बाजूवर ब्राह्मी लेख असलेल्या गुजरात, माळवा, राजस्थान व अजमेर भोवतालच्या प्रदेशात मिळालेल्या नाण्यांवरून त्याच्या राज्यविस्ताराची कल्पना येते.[२४] लेखांमध्ये त्याचे फक्त क्षहरात क्षत्रप असे वर्णन आहे. त्याच्या नाण्याची दर्शनी बाजू आपल्याला अशाच प्रकारची मागची बाजू[२५] असलेल्या स्पलिरायझेस व आझेस दुसरा यांनी संयुक्तपणे काढलेल्या तांब्याच्या नाण्यांची आठवण करून देतात. ह्या प्रकारची नाणी व खरोष्ठी लेख भूमक मूळचा उत्तरेकडचा व सिथिक आहे असे सुचवितात. या नाण्यांवर अधुदक इयन याच्या नाण्यांवर आहे त्याप्रमाणे ग्रीक लेख आढळत नाही. कदाचित ग्रीक देवता नायके हिच्याबरोबर ग्रीक लेख अदृश्य झाले असावेत आणि भूमकांनी ह्या छापाची नाणी चलनात ठेवली असावीत. त्यामुळे त्याने ग्रीक लेखही दिले नसावेत.

**नहपान :** क्षहरात घराण्याचा दुसरा ज्ञात राजा म्हणजे "पेरिप्लस"मध्ये ज्याचा उल्लेख नंबानुस असा आहे व ज्याने इ. स. ३२ ते ७७ पर्यंत राज्य केले तो नहपान होय. फार सामर्थ्यवान असलेला हा या घराण्याचा शेवटचा ज्ञात राजा आहे. याच्याबद्दलची माहिती आपल्याला त्याची मुलगी दक्षमित्रा, जावई ऋषभदत्त आणि मंत्री अयम यांच्या नाशिक, कार्ले व जुन्नर येथे प्राप्त झालेल्या लेखांवरून तसेच नहपानाच्या दीर्घ राजवटीच्या[२६] ४१ ते ४६ वर्षांचा उल्लेख असलेल्या लेखांवरून, त्याचप्रमाणे त्याच्या तांबे, शिसे व चांदीच्या नाण्यांवरून[२७] मिळते. त्याच्या नाण्यांवरील लेखांमध्ये तो स्वतःचा उल्लेख क्षहरात व राजन असा करतो. त्याने क्षत्रपाल या हुद्याचा येथे अजिबात वापर केलेला नाही. परंतु त्याच्या राजवटीत दिलेल्या कोरीव

लेखांमध्ये मात्र त्याचे क्षत्रप आणि महाक्षत्रप (नंतरच्या जुन्नर लेखात), राजन त्याचप्रमाणे भट्टारक (स्वामी) म्हणून उल्लेख आहेत.

उपलब्ध पुराव्यांनुसार नहपान हा महाराष्ट्राच्या नाशिक, पुणे व उत्तर कोकण या प्रदेशांत आपल्या सत्तेचा प्रसार करणारा पहिला क्षहरात राजा होय. त्याचे कोरीव लेख नाशिक येथे व पुणे जिल्ह्यात कार्ले व जुन्नर येथे मिळाले आहेत. त्याची असंख्य नाणी ह्या प्रदेशांमध्ये त्याचप्रमाणे गुजरातच्या निरनिराळ्या भागांत मिळाली आहेत. त्याची सत्ता किंवा प्रभाव बऱ्याच विशाल प्रदेशावर पसरला होता. त्याचा जावई ऋषभदत्त याने ज्या टिकाणी धर्मकृत्ये केली त्या ठिकाणांच्या सूचीकडे नजर टाकल्यास त्याच्या प्रभावाखाली असलेल्या क्षेत्राची कल्पना येईल. या क्षेत्रामध्ये गोवर्धन (नाशिक), चिखलपद्र (सुरत जिल्हा, गुजरात), वलुरक (पुणे जिल्ह्यात कार्ले), भरुकच्छ (वर्तमान भडोच, गुजरात), प्रभास (गुजरात मधील प्रसिद्ध यात्रास्थळ), उज्जयिनी व दशपूर (अनुक्रमे उज्जैन व मंदसोर-मध्यप्रदेश), शूर्परक (मुंबईजवळ सोपारा) ह्या स्थळांचा व बार्णासा (वर्तमान बानास, राजस्थान मधील चंबळची उपनदी), तापी (वर्तमान तापी, सुरत जिल्हा), इबा (बलसाड जवळची नदी, गुजरात), पारदा (पारनदी, सुरत जिल्हा), दमण (दमण जवळून वाहणारी दमणगंगा), दाहानुका (डहाणूजवळ असलेली खाडी, ठाणे जिल्हा), करबेणा (अंबिका नदीला मिळणारी सध्याची कावेरी) या नद्यांचा समावेश होतो. त्याने राजस्थानमध्ये अजमेर-जवळ पुष्कर ह्या यात्रेच्या टिकाणी (तीर्थ) स्नान केले. या सर्व नावांवरून असे दिसते की, ऋषभदत्ताने त्याच्या सासऱ्याच्या राज्याबाहेरच्या त्याच्या सत्तेखाली नसलेल्या धर्मस्थळांना भेटी देण्यापेक्षा त्याच्या राज्यांतर्गत असलेल्या तीर्थस्थानांनाच भेटी देणे जास्त पसंत केले. या संदर्भावरून एक गोष्ट लक्षात येते, ती म्हणजे नहपानाच्या राज्यामध्ये सध्याचा पूर्ण गुजरात, विदर्भ आणि दक्षिणेकडचा प्रदेश सोडून महाराष्ट्र प्रांत, मध्य प्रदेशातील माळवा प्रदेश, अजमेरपर्यंत पसरलेला राजस्थानचा बराच मोठा भाग आणि त्या खालच्या सिंधूच्या खोऱ्याचा भाग या प्रदेशांचा अंतर्भाव होत होता. यापैकी गुजरात त्याच्या प्रत्यक्ष अंमलाखाली होता. तर जुन्नर जिल्ह्यासाठी आर्यमन हा शासक नेमलेला असावा आणि बाकीचा प्रदेश त्याचा जावई ऋषभदत्त याच्या अंमलाखाली असावा. त्याच्या सत्तेची झळ यावेळी राजस्थानमधील जयपूर प्रदेशात राहणाऱ्या मालवांना पोहचली होती. ऋषभदत्ताच्या नाशिक येथील एका कोरीव लेखात सांगितल्याप्रमाणे तो त्याच्या मालकाच्या (भट्टारक) म्हणजेच नहपानाच्या आज्ञेवरून मालयांनी (मालव) वेढा घातलेल्या उत्तमभद्रांच्या[२८] मुक्ततेसाठी गेला होता आणि त्याच्या येण्याची नुसती बातमी ऐकून मालयांनी पळ काढला होता. परंतु त्या सर्वांना उत्तमभद्रांचे कैदी बनवले होते.[२९] ज्याअर्थी ह्या टिकाणी मालय व उत्तमभद्रक या दोहोंचाही उल्लेख अनेकवचनी आहे त्याअर्थी ही दोन्हीही गणराज्ये (Republican) होती हे उघड आहे आणि शेजारी असल्यामुळे त्यांच्यामध्ये निरंतर संघर्ष होत होते. नहपानाने स्वतःचे साम्राज्य वाढविण्याच्या दृष्टीने या परिस्थितीचा

फायदा घेतला आणि त्याच्या राज्याबाहेर असलेल्या अजमेर प्रदेशात आपल्या सत्तेचा प्रसार व दबदबा निर्माण केला. ''पेरिप्लस'' वरून असे कळते की, नंबानसने (नहपानाने) स्वतःच्या फायद्यासाठी रोमन साम्राज्याबरोबर असलेला सागरी व्यापार स्वतःच्या ताब्यात ठेवण्याचा प्रयत्न केला, तसेच थोरल्या सॅरेगानसच्या काळी कल्लिएणला (कल्याण आणि कोकणातील इतर बंदरांना) नियमित व्यापारपेठेचा विशिष्ट दर्जा प्राप्त झाला होता. परंतु नंतर सँदनस (सातवाहन राजा सुनंदन किंवा सुंदर) यांच्या ताब्यात ही बंदरे गेली आणि येथील व्यापारावर कडक निर्बंध घालण्यात आले. ग्रीक जहाजांनी चुकून जरी येथे प्रवेश केला तरी त्यांना बॅरिगाझा (भडोच) येथे जाण्याकरीता संरक्षकांची गरज पडत असे.[३०] खरे म्हणजे ही परिस्थिती सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांच्यामध्ये श्रेष्ठत्व प्राप्त करण्यासाठीच्या संघर्षातील अवस्था दर्शविते. पूर्वी पाहिल्याप्रमाणे थोरला सॅरेगानस म्हणजे दुसरा कोणी नसून ज्याच्या राजवटीच्या शेवटच्या दशकांमध्ये किंवा त्याच्या आसपास नहपान राज्यावर आला तो सातकर्णी असावा. परंतु तो फार बलशाली असल्यामुळे नहपान त्याचे फार नुकसान करू शकला नाही आणि त्याच्या मृत्यूनंतरच नहपान सातवाहनांच्या राज्याचा महाराष्ट्रातील बराच मोठा प्रदेश जिंकू शकला. उत्तर कोकणामध्ये असंख्य बंदरे असल्यामुळे ह्या प्रदेशाला सागरी व्यापाराच्या दृष्टीने फार महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले होते. या प्रदेशावर नहपानाने आपली सत्ता स्थापन केली. त्याआधी त्याने येथे येणारी मालवाहू जहाजे आपली स्वतःची राजधानी भरुकच्छ येथे नेण्याचे प्रयत्न केले. भरुकच्छ हे नाव शकांची राजधानी असलेले भिन्नगर (सिथियन शहर) चे टोपण नाव असावे.[३१]

गौतमीपुत्र सातकर्णीने आपल्या दुर्बल पूर्वजांनी गमावलेला प्रदेश नहपानाच्या सत्तेपासून मुक्त करण्यासाठी नहपानावर बरीच आक्रमणे केली. हा संघर्ष दीर्घकालपर्यंत चालू होता. जैन परंपरेप्रमाणे सातवाहन राजाचे सैन्यसामर्थ्य उत्कृष्ट होते तर नहपानाजवळ खूप संपत्ती होती. आरंभी सातवाहन राजाने नहपानावर बरीच आक्रमणे केली परंतु तो विजय प्राप्त करू शकला नाही. शेवटी त्याने एक युक्ती केली, नहपानाकडे आपला गुप्त हेर पाठवून नहपानाला त्याच्या संपत्तीतून सढळ हाताने दानधर्म करण्यास उद्युक्त केले. त्याची ही युक्ती सफल झाली व अखेर नहपानाचा पूर्ण पराभव झाला.[३२] आधी या गोष्टीला उपोद्बलक पुरावा उपलब्ध नव्हता त्यामुळे इतिहासकारांना ही घटना म्हणजे कथाकारांनी रचलेली कल्पित कथा वाटत होती. परंतु अलीकडेच तशा स्वरुपाचा पुरावा उपलब्ध झाल्यामुळे आपण या घटनेकडे केवळ दंतकथा म्हणून दुर्लक्ष करू शकत नाही. आधी नहपानाची गौतमीपुत्राने आपला छाप मारून (Counter Struck) स्वतःची म्हणून चलनात ठेवलेली नाणीच फक्त उपलब्ध होती. परंतु अलीकडेच भोकरदन[३३] येथील उत्खननात गौतमीपुत्र सातकर्णीची नहपानाने आपला छाप मारून स्वतःची म्हणून चलनात ठेवलेली तांब्याची नाणी मिळाली आहेत. ही नाणी जैन परंपरेतील महत्त्वाच्या भागाला दुजोरा देतात. अखेर गौतमीपुत्र सातकर्णी नहपानाचा व पर्यायाने क्षहरातांचा विध्वंस

करण्यास यशस्वी झाला. त्याच्या मुलाच्या १९ व्या शासन वर्षाच्या नाशिक शैलगृह कोरीव लेखातील वर्णनाप्रमाणे त्याने क्षहरात घराण्याचे नामोनिशाण शिल्लक ठेवले नाही.[३४] जणू काही हे विधान निर्माण झालेल्या परिस्थितीचे खात्रीपूर्ण स्पष्टीकरण देण्यास पुरेसे नाही म्हणूनच की काय नाशिक जिल्ह्यात जोगलथंबी येथे नहपानाची १३,२५० पुतळा छाप चांदीची नाणी असलेला संचय प्राप्त झाला. ह्या नाण्यांपैकी जास्तीत जास्त म्हणजे ९,२७० नाण्यांवर गौतमीपुत्र सातकर्णीने आपले छाप मारलेले आहेत. ज्यांनी हा संचय प्रसिद्ध केला त्या रेव्ह. एच. आर. स्कॉट यांच्या मते नाण्यांच्या दर्शनी भागावर असलेल्या अर्धपुतळ्याच्या फक्त वयाच्या बाबतीत नव्हे तर शारीरिक वैशिष्ट्यांच्या चित्रणाच्या बाबतीतही विविधता आढळते आणि त्यावरून असा निष्कर्ष निघतो की, उपलब्ध नाणी ही एका राजाची नसून ती एका मागून एक या क्रमाने येणाऱ्या राजांची आणि संभवतः नहपानाचे पुत्र, पौत्र यांची असावीत. या राजांनी आपल्या नाण्यांवर पूर्वजाचे नाव कायम ठेवले आणि काही विशिष्ट कारणामुळे त्यांची स्वतःची शारीरिक वैशिष्ट्ये या नाण्यांवर चित्रित केली, परंतु त्यांची स्वतःची नावे मात्र अंकित केलेली नाहीत.[३५] या राजांच्या शासन कालाची नाणी एक ते दोन शतके[३६] तरी चलनात असावी. स्कॉट यांच्या मते ह्या संचयामध्ये फक्त नहपानाचीच नव्हे तर त्याच्यानंतर एक ते दोन शतकांपर्यंत राज्य केलेल्या त्याच्या वंशजाचीही नाणी आहेत. गौतमीपुत्र सातकर्णीने केवळ नहपानाचाच पराभव केला असे नाही, तर त्याच्या नंतर बऱ्याच वर्षांच्या अंतराने राज्यावर येणाऱ्या त्याच्या एका वंशजाचाही पराभव केला. ह्या मताला काही इतिहासकारांनी नाण्यांशिवाय इतर पुराव्याच्या आधारे दुजोरा दिला आहे. गौतमीपुत्र सातकर्णीने नहपानाच्या मागून येणाऱ्या राजाचा पराभव केला व त्याच्या वारसांना मारले असे मत रा. गो. भांडारकरांनी व्यक्त केले आहे.[३७] व्ही. एस. बखले नहपानाच्या कोरीव लेखांतील वर्षे अझेस पहिला याने प्रारंभ केलेल्या विक्रम संवताची धरतात. त्यांच्या मते इ. स. पू. पहिल्या शतकाच्या शेवटचा दशकात नहपानाच्या सत्तेचा अंत झाला. त्यामुळे तो बऱ्याच नंतरच्या काळात उदयास आलेल्या गौतमीपुत्र सातकर्णीचा समकालीन होऊ शकत नाही. ज्याअर्थी नहपानाची गौतमीपुत्र सातकर्णीने आपला छाप मारून स्वतःची म्हणून चलनात ठेवलेली नाणी जवळपास एक शतक चलनात राहिल्यामुळे बरीच झिजली आहेत, त्याअर्थी गौतमीपुत्राने ज्याचा पराभव केला तो नहपानाच्या वंशज असला पाहिजे.[३८] हरीचरण घोसंच्या मताप्रमाणे गौतमीपुत्र सातकर्णीने पराभूत केलेला राजा स्वतः नहपान नव्हता तर त्याचा वारस बहुतेक ऋषभदत्त[३९] असला पाहिजे. जी. व्यंकटराव आणि स्कॉट हे असे समजतात की, सातवाहन राजाने आपला शिक्का मारून स्वतःची म्हणून चलनात ठेवलेली नाणी नहपानानंतर आलेल्या त्याच्या वारसाची असावीत.[४०] ह्या मतांना उपोद्बलक असा काहीही पुरावा नाही. स्कॉटने वर्गीकरण केल्याप्रमाणे नहपानाचे कल्पित वारस आपली स्वतःची प्रतिमा वय, शारीरिक वैशिष्ट्ये वगैरे बारीकसारीक तपशीलासह नाण्यांवर चित्रित करीत. परंतु आपले नाव मात्र देत नसत. ही बाब मान्य करणे

शक्य नाही. शिवाय जैन परंपरा एकमताने सातवाहन राजा गौतमीपुत्र सातकर्णी याने पराभूत केलेला शत्रू म्हणून नहपानाचे वर्णन करतात. तात्पर्य हे की, गौतमीपुत्राने ज्याचा पराभव केला तो स्वतः नहपानच होता. या निष्कर्षाला आणखी काही गोष्टींमुळे पुष्टी मिळते.[६१] नहपानाने प्रथम पुतळा छाप चांदीची नाणी पाडण्यास प्रारंभ केला. नहपानाला जिंकणाऱ्या गौतमीपुत्र सातकर्णीची चांदीची पुतळा छाप नाणी.[६२] त्याच्यामागून शक राजांची चांदीची नाणी आणि साधारणपणे यांच्यातून पुढे प्रगत झालेली सार्वभौम गुप्त शासक आणि त्यांच्या वारस राजाची नाणी घडविण्यात या नाण्यांचे महत्त्वाचे योगदान आहे.[६३] नहपानाच्या नाण्यांचा सर्वात मोठा संचय प्राप्त झाल्यामुळे स्कॉट यांना त्याच्या चांदीच्या नाण्यांच्या सर्व वैशिष्ट्यांचा पूर्ण अभ्यास करणे शक्य झाले. या नाण्यांच्या दर्शनी बाजूवर नाणी पाडणाऱ्याचा यथार्थ पुतळा आणि गोलाकार कडेवर भारतीय लेखाच्या ग्रीको-रोमन भाषेत रुपांतर केलेला लेख, मागील बाजूवर त्याचा पूर्वज भूमक याच्या नाण्याच्या दर्शनी बाजूवर असलेली वज्र-बाण ही चिन्हे व ब्राह्मी आणि खरोष्टीतील राज्ञो क्षहरातस नहपानस असा लेख आहे. अलीकडे त्याची अशा प्रकारची तांब्याची नाणी सुद्धा मिळाली आहेत.[६४] नहपान हे नाव पर्शियन आहे आणि तो शक असावा. त्याच्या मुलीचे लग्न ऋषभदत्त या शक क्षत्रपाशी झाले. नहपान व त्याचा जावई ऋषभदत्त हे पूर्णपणे भारतीय संस्कृतीशी एकरूप झाले होते. नहपानाने आपल्या मुलीचे नाव दक्षमित्रा ठेवले यावरून ही बाब स्पष्ट होते. ऋषभदत्त हा पौराणिक धर्माचा पुरस्कर्ता होता. त्याने अनेक पौराणिक विधी व तीर्थयात्रा केल्या. ब्राह्मण मुलींची लग्ने लावून दिली, विद्वान ब्राह्मणांना सढळ हाताने देणग्या दिल्या. त्याने धर्म सहिष्णुतेचे धोरण स्वीकारले. नाशिक व कार्ले येथील बौद्ध संस्थांना उदार देणग्या दिल्या. आश्चर्यकारक बाब अशी आहे की, आपल्याला नहपानाची मुलगी, जावई, मंत्री यांच्या कार्याविषयी ज्ञान आहे, परंतु खुद्द नहपानाच्या कार्याविषयी काहीच माहिती नाही. भविष्यकाळात नहपानाचा स्वतःचा एखादा लेख उजेडात आला तर त्याच्याविषयी माहिती होईल.

## कार्दमक वंश

गौतमीपुत्र सातकर्णीने नहपान आणि त्याचे घराणे यांच्या केलेल्या उच्छेदाबरोबर क्षहरात राजघराण्याचा इ. स. ७८ मध्ये किंवा त्याच्यापूर्वी केव्हातरी अस्त झाला. नहपानाचा नाश त्याच्या ४६ व्या वर्षी किंवा त्यानंतर, किंवा गौतमीपुत्र सातकर्णीच्या अठराव्या शासन वर्षाच्या पूर्वी किंवा त्यावर्षी झाला असला पाहिजे. कारण त्याला पराभूत करणाऱ्या गौतमीपुत्र सातकर्णीच्या अठराव्या शासन वर्षीच्या नाशिक लेखानुसार त्याने पूर्वी ऋषभदत्ताने दान दिलेले शेत व कदाचित त्याचवर्षीच्या कार्ले लेखानुसार ऋषभदत्ताने पूर्वी तेथील बौद्ध संघाला दिलेले करजिक हे गाव पुन्हा दान दिले. एका बाजूने नहपानाचे ४६ वे वर्ष, त्याला पराभूत करणाऱ्या गौतमीपुत्र सातकर्णीचे अठरावे वर्ष आणि दुसऱ्या बाजूने कार्दमक घराण्याची स्थापना व

शक संवताची चष्टनाने केलेली स्थापना या घटनांमधील काळाचे अंतर जरी निश्चित सांगता येत नसले तरी ते फार थोडे असावे हे उघड आहे. आवश्यक पुराव्यांच्या अभावी चष्टन राज्यावर आला त्यावेळी असलेल्या परिस्थितीबद्दल काहीच सांगता येत नाही. परंतु हे अगदी शक्य आहे की, तो अत्यंत महत्त्वपूर्ण व सामर्थ्यवान शक घराण्यातील असावा. त्याने क्षहरातांच्या अडचणींचा फायदा घेऊन कच्छमध्ये आपल्या आयुष्यक्रमाला प्रारंभ केला. त्याचे वर्ष ६[८५] आणि ११[८६] चे लेख कच्छमध्ये मिळाले आहेत. त्यावरून त्याने तेथेच आपल्या कारकिर्दीला सुरुवात केली असे दिसते. ह्या लहान, एकाकी व अलग असलेल्या आपल्या तळावरून त्याने आपल्या साम्राज्याचा प्रसार करण्याच्या दृष्टीने आक्रमणे करण्यास प्रारंभ केला. क्षहरातांचा उच्छेद करणाऱ्या सातवाहन साम्राज्यावर आक्रमणे केली व आपले राज्य वाढविले. कदाचित क्षहरात त्याचे जवळचे नातेवाईक असावेत. त्याने सातवाहन राज्याचा उत्तरेकडील प्रदेश हळूहळू जिंकून घेत दोघांच्याही समान शत्रूंवर प्रभुत्व मिळविले.

चष्टनाने लवकरच गौतमीपुत्र सातकर्णीने नहपानाकडून घेतलेला उत्तरेकडील प्रदेश परत घेतला. ह्या प्रदेशात सौराष्ट्र, कुकुर, अनूप, आकर आणि अवन्ति या विभागांचा अंतर्भाव होता. जरी या विजयांची निश्चित वर्षे आपल्याला ज्ञात नसली तरी पूर्वी सुचविल्याप्रमाणे ती गौतमीपुत्र सातकर्णीच्या अमदानीच्या शेवटच्या कालखंडातील किंवा त्याचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या राजवटीच्या प्रारंभीच्या काळातील असावीत.

साधारणपणे हे विजय त्याने इ. स. ११० च्या सुमारास प्राप्त केले. टॉलेमीने उज्जैनीचा राजा म्हणून चष्टनाचा उल्लेख केला आहे.[८७]

टॉलेमीने कुठेही चष्टन हा दुसऱ्या कोणत्यातरी सम्राटाचा सामंत अथवा मांडलिक होता असे सुचविलेले नाही. तो जर असा कोणत्यातरी राजाचा दुय्यम शासक असता तर टॉलेमीने चष्टनाची राजधानी उज्जैनला होती असे वर्णन केले नसते. यावरून हे सिद्ध होते की, क्षत्रप हा हुद्दा या वेळेपर्यंत केवळ प्रांताधिपतींचा हुद्दा म्हणून उपयोगात राहिलेला नव्हता तर सार्वभौम सत्ताधीश हे केवळ भावनिक जवळिकेमुळे हा हुद्दा धारण करीत होते. या राजांनी सातवाहनांसारख्या सार्वभौम राजांनी धारण केलेल्या राजपदाला शोभणाऱ्या राजन आणि महाराजा ह्या पदव्याही धारण केल्या होत्या. चष्टनाने सातवाहनांकडून काही प्रदेश जिंकला होता याचे प्रतिबिंब त्याच्या चांदीच्या नाण्यांच्या उत्क्रांतीमध्येही दिसून येते. कार्दमकांच्या सर्व चांदीच्या नाण्यांवर दर्शनी बाजूवर राजाचा अर्ध पुतळा, कदाचित प्रतिमा व सभोवार अशुद्ध ग्रीक लेख आहे. या लेखाला नंतरच्या काळात अलंकारिक कडेचे स्वरूप प्राप्त झाले. चष्टनाने तो क्षत्रप असताना पाडलेल्या नाण्यांच्या मागील बाजूवर डावीकडे चंद्रकोर व उजवीकडे तारा ही चिन्हे[८८] आढळतात. तर त्याच अधिकारात पण नंतरच्या काळात पाडलेल्या नाण्यांवर मध्यभागी चंद्रकोरयुक्त टेकडी[८९] आणि आधी पाडलेल्या

नाण्यांप्रमाणेच चंद्रकोर आणि तारा ही चिन्हे आहेत. परंतु त्यांना आता उपचिन्हांचे[५०] स्वरूप प्राप्त झाले आहे. खरे म्हणजे चंद्रकोरयुक्त टेकडी हे प्राचीन चिन्ह आहे. परंतु वर्तमान संदर्भात ते सातवाहनांचे चिन्ह होते आणि ज्याप्रमाणे गुप्त सम्राटांनी हे चिन्ह त्यांच्या पश्चिमी क्षत्रपांबरच्या विजयाची[५१] खूण म्हणून वापरले, त्याचप्रमाणे चष्टनाने बहुतेक त्याच्या सातवाहनांवर प्राप्त केलेल्या विजयाचे प्रतिक म्हणून आपल्या नाण्यांवर वापरले असावे. या ठिकाणी हे नमूद करणे महत्त्वाचे आहे की, या चिन्हांची छाप चष्टनाने क्षत्रप म्हणून काढलेल्या नाण्यांवरही दिसते. त्यावरून त्याने सातवाहनांवर विजय प्राप्त केल्याची तिथी त्याच्या कारकिर्दीच्या प्रारंभी व गौतमीपुत्र सातकर्णीच्या अमदानीच्या शेवटी अशी ठेवावी लागेल. वर वर्णन केलेला पूर्ण विकसीत नाणे प्रकार कार्दमकांच्या चांदीच्या नाण्यांचा एकमेव नाणेप्रकार ठरला आणि नंतरच्या ज्या ज्या कार्दमक शासकांनी चांदीची नाणी पाडली त्यांनी हाच छाप प्रचलित ठेवला. चष्टनाच्या चांदीच्या नाणेप्रकारामध्ये नाण्यांच्या मागील बाजूवर खरोष्ठी भाषेत त्याचे राजन ह्या पदवीसह फक्त नाव आहे.[५२] त्यांच्या नंतर येणाऱ्या राजांनी खरोष्ठी भाषेचा उपयोग करणे सोडून दिले. याचा अर्थ ज्या प्रदेशात ही प्रचलित होती तो प्रदेश त्यांनी गमावला होता असा नाही, तर त्यांना त्यांच्या प्रजेला ही लिपी समजत नाही याची जाणीव झाली होती. चांदीच्या नाण्यांवर मागच्या बाजूस असलेला ब्राह्मी लेख आपल्याला नाणे पाडणाऱ्या राजाचा हुद्दा व नाव तसेच त्याच्या आधीच्या राजाचे नाव व हुद्दा याबद्दल माहिती पुरवितो. पुढे रुद्रसिंह पहिला याने नाण्याची तिथी[५३] शक संवतात देण्यास प्रारंभ केला. याप्रमाणे या नाणेप्रकाराने अखेरचे स्वरूप प्राप्त केले. या घराण्याच्या इतिहासाची पुनर्रचना करण्याच्या दृष्टीने या नाणे-प्रकाराला अनन्य साधारण असे महत्त्वाचे स्थान आहे. या घराण्याच्या इतिहासाच्या दृष्टीने जितकी विविध प्रकारची माहिती या नाणेप्रकाराने पुरविली आहे तितकी इतर कोणत्याही राजघराण्याच्या बाबतीत उपलब्ध नाही. चष्टनाने त्याच्या घराण्याची फक्त चांदीचीच नाणी पाडली असे नाही, तर याशिवाय त्याने हिणकस धातूचीही बऱ्याच प्रकारची नाणी पाडली. या नाण्यांच्या दर्शनी बाजूवर राजाच्या अर्धपुतळ्याऐवजी प्राण्यांच्या प्रतिमा आहेत. परंतु मागील बाजू मात्र चांदीच्या नाण्यांच्या मागील बाजूप्रमाणेच आहे. त्याच्या वंशजांचीही हलक्या धातूची नाणी ह्याच प्रकारची आहेत. चष्टनाने पश्चिम भारतामध्ये मुख्य शासक म्हणजे महाक्षत्रपाबरोबर त्याच्या वारसाला क्षत्रप हा हुद्दा देऊन कनिष्ट परंतु संयुक्त शासक म्हणून राज्यकारभारात घेण्याच्या शकपद्धतीचाही प्रारंभ केला. हे महाक्षत्रप व क्षत्रप हे दोघेही एकाच वेळी राजन ही पदवी धारण करीत. तो महाक्षत्रप झाल्यावर त्याने आपला पुत्र जयदामन याला क्षत्रप[५४] म्हणून नियुक्त केले. ही नेमणूक त्याने नक्की केव्हा केली हे आवश्यक पुराव्यांच्या अभावी सांगणे कठीण आहे. एवढेच म्हणता येईल की, ही नियुक्ती शक वर्ष ११ च्या नंतर व शक वर्ष ५२[५५] च्या आधी झाली असावी. कारण शक वर्ष अकराच्या अन्धौ लेखांत त्याचा उल्लेख क्षत्रप म्हणून आहे आणि शक वर्ष बावजनच्या अन्धौ लेखात त्याचा उल्लेख त्याचा नातू रुद्रदामन पहिला याच्याबरोबर

केलेला आढळतो. येथे रुद्रदामन पहिला याने त्याचा पिता जयदामन याची जागा घेतलेली दिसते. याचा अर्थ असा की, जयदामन हा त्याचा पिता चष्टन याच्या पूर्वीच कालवश झाला. तो सार्वभौम सत्ताधीश (महाक्षत्रप) होऊ शकला नाही.

चष्टनाने दीर्घकाळ राज्य केले. इ. स. १३० मध्ये जेव्हा तो आपला नातू रुद्रदामन पहिला याच्या सहकार्याने राज्य करीत होता, तेव्हा त्याच्या शासनाचे बावन्नावे (५२) वर्ष चालू होते. यानंतर त्याने फार काळ राज्य केले नसावे हे उघड आहे. ज्ञात असलेल्या पुराव्यांच्या आधारे असे म्हणता येते की, शक ५२ (इ. स. १३०) ते शक ७५ (इ. स. १५०) च्या दरम्यान सुदर्शन तलाव (धरण)[५६] फुटण्याच्या कालखंडातच केव्हातरी त्याच्या सत्तेचा अंत झाला. तात्पुरते हे वर्ष इ. स. १४० असेल असे ठरविता येईल. चष्टनाने कार्दमक राज्याचा मजबूत पाया घातला. शून्यामधून प्रारंभ करून त्याने पुढे शक संवत म्हणून ख्यात झालेल्या संवताची स्थापना केली. त्याच्या वंशजानी प्रचलित ठेवलेली चांदीची व हलक्या धातूची नाणीच त्याने पुढे चालू ठेवली. आपल्या नंतर येणाऱ्या वारसाला तो आपल्या हक्कानुसार जेव्हा सार्वभौम राजा होईल तेव्हा, त्याला राज्यकारभाराचा आवश्यक तो अनुभव असावा म्हणून त्याला कनिष्ठ शासक म्हणून घेण्याच्या शक पद्धतीचा प्रारंभ करण्याचे श्रेयही चष्टनालाच जाते. त्याची सहा दशकाची दीर्घ राजवट, त्याचबरोबर प्रबळ इच्छाशक्ति यामुळे ही कार्ये सिद्धीस नेण्याची संधी त्याला मिळाली असावी.

**रुद्रदामन पहिला :** आपला पिता जयदामन हा इ. स. १२० मध्ये किंवा त्याच्या आधी केव्हातरी चष्टानाच्याच राजवटीत मृत्यू पावल्यानंतर चष्टनाबरोबर रुद्रदामन पहिला हा राज्यकारभार करीत होता असे त्यांच्या संयुक्त राजवटीत दिलेल्या शक वर्ष ५२ च्या चार अन्धौ लेखावरून दिसते. ही व्यवस्था कमीत कमी दुसऱ्या वर्षापर्यंत म्हणजे शक वर्ष ५३ किंवा इ. स. १३१ चालू असावी असे त्या वर्षीच्या अन्धौ[५७] किंवा खावडा लेखानुसार दिसते. हा लेख त्याच प्रमाणे शक ७२ किंवा इ. स. १५० चा गिरनार लेख[५८] यांच्याद्वारे प्राप्त झालेल्या संयुक्त पुराव्यांवरून असे दिसते की, चष्टन कालवश झाला होता आणि त्याचा नातू रुद्रदामन पहिला हा सार्वभौम सत्ताधीश होता. त्याने या दोन तिथींच्या मधल्या काळात केंव्हातरी; बहुतेक इ. स. १४० च्या दरम्यान महाक्षत्रप ही पदवी धारण केली होती. जुनागढ लेखामधून रुद्रदामनविषयी बरीच माहिती मिळते. अशा प्रकारची माहिती आपल्याला ह्या घराण्याच्या दुसऱ्या कोणत्याच राजाविषयी मिळत नाही. त्याने महाक्षत्रप ही पदवी स्वतःच्या सामर्थ्याने संपादन केली होती.[५९] रुद्रदामन याला ही पदवी त्याचा पिता जमदामन जो त्याचा पिता चष्टन याच्या आधीच कालवश झाला होता. त्याच्याकडून वारसा हक्काने प्राप्त झालेली नसावी. त्याच्या राज्यामध्ये पूर्वाकर (पूर्व माळवा), परावन्ति (पश्चिम माळवा), अनुप (नेमाड प्रदेश), निवृत्त (ओळख पटलेली नाही), आनर्त (उत्तर काटियावाड) सौराष्ट्र, श्वभ्र (साबरमतीच्या काठचा प्रदेश, गुजरात), मरु (मारवाड, राजस्थान), कच्छ (कच्छ प्रदेश, गुजरात), सिन्धु सौवीर (सिंधु नदीच्या दोन्ही काटांवर पसरलेला, पूर्व आणि पश्चिम सिंध, पाकिस्तान), कुकुर

(आनर्तजवळचा कदाचित उत्तर काठियावाड), अपरांत (उत्तर कोंकण), निषादाज (पश्चिम विंध्य आणि अरवली पर्वतांच्यामध्ये राहणाऱ्या आदिवासी जमातींचा प्रदेश) इत्यादी विषयांचा (Provinces) समावेश होत होता. हे सर्व प्रांत त्याने आपल्या सामर्थ्याने प्राप्त केले होते आणि येथील लोक त्याच्याशी एकनिष्ठ होते. रुद्रदामनने यापैकी बहुतेक प्रदेश जेव्हा तो त्याच्या आजोबाबरोबर क्षत्रप म्हणून कारभार पहात होता तेव्हाच जिंकले होते, तर काही तो महाक्षत्रप झाल्यानंतर जिंकले. यापैकी आकर, अवन्ति, अनूप, सुराष्ट्र, कुकुर आणि अपरान्त हे प्रदेश त्याने सातवाहनाकडून घेतले असावेत. कारण वासिष्ठीपुत्र पुलुमावीच्या १९ व्या शासनवर्षीच्या नाशिक लेखात ह्या सर्व प्रदेशांचा समावेश गौतमीपुत्राच्या राज्यात केलेला आहे. सिंधुसौवीर हा प्रांत यावेळेस उत्तर भारतामध्ये राज्य करणाऱ्या कुषाणाकडून जिंकला होता.

रुद्रदामन याने दक्षिणापथाचा स्वामी सातकर्णि याचा दोनदा पराभव केला असा तो दावा करतो. परंतु तो जवळचा नातेवाईक असल्यामुळे आपण त्याचा नाश केला नाही असे सांगतो. हा सातकर्णि रुद्रदामनचा जावई म्हणून वर्णिलेला वासिष्ठपुत्र सातकर्णि असला पाहिजे. कदाचित तो रुद्रदामनने पराभूत केलेला अपरान्ताचा राजा असावा आणि त्याला रुद्रदामनने आपला प्रांताधिपती म्हणून राहू दिले असावे. परंतु कार्दमकांची अपरान्तावरची सत्ता फार काळ टिकली नसावी असे नंतरच्या सातवाहन राजांच्या कान्हेरी येथील लेखाच्या अस्तित्वावरून दिसते.

रुद्रदामनने यावेळी उत्तर भारताच्या दिल्ली, हरयाणा, निकटचा पंजाबचा भाग, हिमाचल प्रदेश, उत्तर प्रदेश आणि राजस्थान या विभागांचा समावेश असणाऱ्या विशाल प्रदेशावर राज्य करणाऱ्या यौधेयांचाही पराभव केला. सर्व क्षत्रियांमध्ये[६०] शूर म्हणून ख्यात असल्यामुळे गर्वाने फुगलेल्या यौधेयांवर रुद्रदामनने जोरदार आक्रमण करून त्यांचा समूळ नाश केला. आवश्यक पुराव्याच्या अभावी त्याने पराभूत केलेल्या यौधेयांचा एखादा किंवा एकापेक्षा अधिक गट कोठे राज्य करीत होते हे सांगणे कठीण आहे. परंतु ते राजस्थान किंवा हरयाणाशी संबंधित असावेत. शंकरराज आणि त्यानंतर गादीवर आलेल्या धर्ममित्र नंदवर्मनची निवड यौधेय गणाने केलेली होती. त्यांनी महाराज, महाक्षत्रप आणि सेनापती या पदव्या धारण केल्या होत्या. असे एका मोहोरेवरील (उपलब्धी-जिल्हा हिस्सार, हरयाना) लेखातील नोंदीवरून दिसते. रुद्रदामनने त्यांना पराभूत केल्यानंतर यौधेयांवर पश्चिम भारतातील शक क्षत्रपांचा प्रभाव प्रस्थापित झाला असावा.[६१]

रुद्रदामन हा फक्त शूर सेनापतीच होता असे नव्हे, तर तो त्याच्या प्रजेच्या कल्याणाची काळजी करणारासुद्धा होता. वर आलेली ही सर्व माहिती ऐतिहासिकदृष्ट्या महत्त्वपूर्ण असली तरी प्रशस्तीमध्ये ती केवळ ओघानेच आली आहे. प्रशस्तीचा मुख्य उद्देश शक १५० मध्ये आलेल्या भयंकर वादळामुळे फुटलेल्या सुदर्शन तलावाची पुन्हा बांधणी केली याची नोंद करणे हा होता. या लेखावरून

असे कळते की, हा तलाव चंद्रगुप्त मौर्य याच्यासाठी त्याचा प्रांताधिपती (राष्ट्रीय) पुष्यगुप्त याने बांधला होता. नंतर मौर्य राजा अशोक याच्या तुषास्क नामक यवनराज अधिकाऱ्याने त्यापासून कालवे काढले होते. प्रलयंकारी झंझावातामुळे हा तलाव पूर्णपणे नष्ट झाला होता आणि सर्व पाणी वाहून गेल्यामुळे आवश्यक झालेली दुरुस्ती व त्यासाठी येणारा अवाढव्य खर्च यामुळे येथील प्रजा फार निराश झाली होती. रुद्रदामनचा अमात्य व सल्लागार (मतिसचिव) तसेच कार्यकारी अधिकारी (कर्म सचिव) यांचा ही दुरुस्ती न करण्याकडे तर कल होताच, शिवाय त्यांनी याविरुद्ध निर्णयही दिला होता. तरीही रुद्रदामनने नगरातील व खेडेगावातील जनतेवर वाढीव कर न लावता, कोणालाही वेटबिगारी कामावर न ठेवता लोकांकडून त्यांनी आपणहून दिलेला नजराणाही न स्वीकारता, आपल्या स्वतःच्या खजिन्यातून मोठी धनराशी खर्च करून अत्यल्पावधीत हा तलाव दुरूस्त केला, एवढेच तव्हे तर पहिल्यापेक्षा तिप्पट बळकट व विशाल केला. तलाव त्यानंतर पूर्वीपेक्षाही सुंदर दिसत होता.[६२] आनर्त आणि सुराष्ट्र देशांच्या शासनाकरता नेमलेल्या कुलैपाचा पुत्र सुविशाख नामक पल्लव अमात्याने हे संपूर्ण बांधकाम पूर्ण करून आपल्या स्वामीची (रुद्रदामन) कीर्ती वृद्धिंगत केली. रुद्रदामनचे हे कृत्य त्याला प्रजेच्या कल्याणाबद्दल वाटत असलेल्या कळकळीचा बोलका पुरावा आहे. जुनागढ रुद्रदामनचा लेख व त्याच्यानंतरचा गुप्त सम्राट स्कंदगुप्त कालीन लेख संयुक्तपणे या तलावाचा इ. स. पू. चौथे शतक ते इ. स. चे. पाचवे शतक असा सुमारे आठ शतकांचा इतिहास देतात. या दृष्टीने हा लेख वैशिष्ट्यपूर्ण आहे.

रुद्रदामन हा पूर्णपणे भारतीय झालेला शक होता. संस्कृत गद्य-पद्य रचना कौशल्य, व्याकरण, अर्थशास्त्र, संगीत, न्याय, इत्यादी शाखांचे संपूर्ण ज्ञान प्राप्त करून त्याने बरीच कीर्ती संपादन केली होती. तो गो-ब्राह्मण पालनकर्ता होता. बऱ्याच राजकन्यांच्या स्वयंवरांमध्ये त्याने वरमाला प्राप्त केल्या होत्या. तो मोठा दानी व न्यायी होता. सुदृढ शरीरसंपदा असलेला तो रुबाबदार व शक्तिसंपन्न होता. तो न्याय कर वसुल करीत होता व त्याचा खजिना सुवर्ण, चांदी, हिरे, वेडुर्य आणि इतर रत्नांनी काठोकाठ भरलेला होता. त्याची प्रजा त्याच्याशी एकनिष्ट होती. जन्मतःच राज्यकारभारविषयक सर्व कर्तव्ये पार पाडण्यास आवश्यक असलेल्या गुणांनी मंडित असल्यामुळे सर्व वर्णाच्या लोकांनी त्याच्याकडे येऊन आपल्या रक्षणार्थ त्याला आपला स्वामी म्हणून पसंत केले होते. तो कोमल हृदयी आणि दयाळू होता. स्वतः येऊन प्रणिपात करणाऱ्या लोकांना तो संरक्षण देत असे. त्याची प्रजा चोर, रानटी प्राणी, रोगराई यापासून मुक्त होती. खरे म्हणजे ही सर्व त्याची फार मोठी कमाई होती. यापैकी एका प्रकारची जरी कमाई त्याने केली असती तरी त्याला त्याबद्दल गर्व असणे स्वाभाविकच होते आणि तसा अभिमान किंवा गर्व त्याला होताही. जुनागड कोरीव लेख हा शुद्ध संस्कृत भाषेमध्ये लिहिलेला कार्दमक वंशाचा पहिला लेख आहे. प्राचीन संस्कृत साहित्याच्या इतिहासातील ही एक अत्यंत महत्त्वपूर्ण घटना ठरते. त्याने संस्कृत साहित्याच्या निरनिराळ्या शाखांना आश्रय दिला असला पाहिजे.

आधी पाहिल्याप्रमाणे सुदर्शन तलावाचा बांध शक इ. स. ७५ मध्ये फुटला. तो पुन्हा बळकट आणि मजबूत बांधून काढण्यासाठी व मोठा करण्यासाठी किती वेळ लागला हे समजण्यासाठी पुरावा उपलब्ध नाही. परंतु फार काळ लागला नसावा (अंतिमहता कालेन) आणि परिणामतः या सर्व घटनांची नोंद करणारा गिरनार लेख हा निदान पंधरा वर्षे तरी नंतर कोरला असावा. रुद्रदामनच्या चांदीच्या नाण्यांवरील[६३] त्याच्या प्रतिमेकडे नजर टाकल्यास हे लक्षात येईल की, तो बराच वयस्क होईपर्यंत राज्य करीत होता. आधी दाखविल्याप्रमाणे तो इ. स. १३० मध्ये क्षत्रप झाला. इ. स. १५० पर्यंत महाक्षत्रपाच्या पदापर्यंत पोहोचला आणि त्याने निदान इ. स. १६५ पर्यंत तरी राज्य केले. म्हणजेच त्याला एकूण पस्तीस वर्षांची तरी कारकीर्द लाभली असावी.

## रुद्रदामन पहिला याचे वारस किंवा वंशज

रुद्रदामन पहिला याने आपल्या कारकिर्दीच्या शेवटच्या भागात आपला ज्येष्ठ पुत्र दामघ्सद (दामज़द किंवा दामजदश्री असेही लिहिलेले आहे) याची क्षत्रप म्हणून नेमणूक केली आणि तो आपल्या पित्याच्या मृत्यूनंतर महाक्षत्रप बनला.[६४] त्याच्या राजवटीचे कोरीव लेख नाहीत, तथापि त्याच्याबद्दलची माहिती त्याची स्वतःची चांदीची नाणी[६५] व त्याचप्रमाणे त्याचा मुलगा जीवदामन पहिला[६६] याच्या चांदीच्या नाण्यांमुळे मिळते. त्याचा भाऊ व वारस रुद्रसिंह पहिला याची महाक्षत्रप म्हणून ज्ञात असलेली सर्वात आधीची तिथी शक १०३ (इ. स. १८१)[६७] आहे. यावरून दामघ्सद याने ३८ वर्षे राज्य केले असावे असे दिसते. पश्चिमी क्षत्रपांच्या इतिहासकारांचा असा दावा आहे की, दामघ्सदनंतर त्याचा मुलगा जीवदामन पहिला राजा झाला. त्यांचा हा दावा त्याच्या आधीच्या चांदीच्या नाण्यांवर शक १००[६८] ही तिथी आहे या अनुमानावर आधारित आहे. याच्या कालापासून पश्चिम क्षत्रपांच्या चांदीच्या नाण्यांच्या पुढील बाजूवर शक संवताचे तत्कालीन वर्ष त्यांच्या मुखवट्यामागे उमटविण्याची प्रथा पडली.[६९] तथापि या धारणेला काहीच उपोद्बलक पुरावा नसल्यामुळे ही धारणा अनाठायी आहे. त्याच्या नाण्यांवरील आरंभीच्या तिथींमधील फक्त १०० हीच संख्या वाचता येते. आणि दशकाचे किंवा दहाची संख्या तसेच युनीट संख्या मुळीच वाचता येत नाहीत.[७०] त्यामुळे ही संख्या १०१ पासून १९९ पर्यंत काहीही असण्याची शक्यता आहे. जीवदामनच्या ज्ञात असलेल्या इतर तिथींच्या संदर्भात ही तिथी ११९ किंवा १२०[७१] च्या जवळपासची असली पाहिजे. परंतु रॅप्सनने मात्र ही तिथी १०० आणि १०३[७२] या वर्षाच्या मधली असली पाहिजे असे गृहीत धरले आहे. त्यानंतरच्या लेखकांनी या मतावर काही चर्चा न करता रॅप्सनचे म्हणणे[७३] मान्य केले आहे. आता जीवदामन पहिला याची ११९ व १२०[७४] अशी नक्की तिथी असलेली नाणी उपलबध आहेत. तर त्याचा चुलता पहिला रुद्रसिंह याची १०० ते निदान १२०[७५] पर्यंत तरी वर्षे दिलेली नाणी आहेत. याशिवाय रुद्रसिंह

पहिला याने त्याच्या मोठ्या भावाबरोबर म्हणजे दामघ्सदबरोबर क्षत्रप म्हणूनही काही वर्षे काम पाहिले (१०० ते १०३ चा सुरुवातीचा काळ). तसे जीवदामन[७६] पहिला याने काम केले नाही. यावरून हे स्पष्ट होते की, दामघ्सदने आपला मुलगा जीवदामन पहिला याच्याऐवजी आपला भाऊ रुद्रसिंह पहिला, याची आपला वारस म्हणून नियुक्ती केली होती. तेव्हा असा निष्कर्ष काढता येतो की, रुद्रसिंह पहिला आपल्या मोठ्या भावानंतर दामघ्सद गादीवर आला. त्यामुळे नाण्यांच्या दर्शनी बाजूवर नाणे पाडणाऱ्याच्या प्रतिमेच्या शीर्षभागामागे तत्कालीन संवताचे वर्ष देण्याच्या प्रथेचा प्रारंभ करण्याचे श्रेयही त्यालाच जाते.[७७]

रुद्रसिंह पहिला याच्या राजवटीबद्दल माहिती देणारे तीन लेख प्राप्त झाले आहेत. हे सर्व खाजगी असून गुजरातमध्ये[७८] मिळाले आहेत. यापैकी पहिला लेख शक संवत १०३[७९] चा (इ. स. १८१) असून त्यामध्ये त्याचा आभीर सेनापती रुद्रभूती, याने एक पायऱ्यांची विहीर (वापी) खोदून ती बांधून काढली याची नोंद आहे. हा सेनापती बापकचा पुत्र होय. रुद्रसिंहाच्या असंख्य नाण्यांवर १०० ते निदान १२०[८०] पर्यंत वर्षे दिलेली आहेत. यापैकी ज्या नाण्यांवर १०२ पर्यंत वर्षे आहेत ती नाणी, तो जेव्हा त्याच्या मोठ्या भावाच्या राजवटीत क्षत्रप[८१] म्हणून शासन कारभार पहात होता त्या आरंभीच्या काळामध्ये त्याने पाडली असावीत. परंतु काही नाण्यांवरून आपल्याला असे दिसते की, तो ११०-११२ (च्या आरंभापर्यंत) या कालखंडात पुन्हा क्षत्रप झाला होता आणि याचे कारण म्हणजे वारसा हक्काची त्रासदायक परंपरा असावी. जरी दामघ्सदने आपला धाकटा भाऊ रुद्रसिंह पहिला याला आपला वारस म्हणून नियुक्त केले होते तरी त्याचा हा निर्णय त्याचा पुत्र जीवदामन पहिला याला पसंत नव्हता. त्याची अशी धारणा होती की, पुत्राच्या नात्याने व वारसा. हक्काच्या परंपरेप्रमाणे सिंहासनावर त्याचाच हक्क पोहोचतो. यामुळे रुद्रसिंह पहिला या अल्पकालखंडात पुन्हा क्षत्रप या खालच्या पदावर गेला असावा. जीवदामन पहिला याची या कालखंडातील नाणी अजूनपर्यंत सापडली नाहीत. रुद्रसिंह पहिला वर्ष ११२ मध्ये पुन्हा एकदा महाक्षत्रप झाला व या पदावर तो वर्ष १२० पर्यंत निश्चितच आणि कदाचित १२२ पर्यंतही (आरंभापर्यंत) राहिला असावा.[८२] या कालखंडात त्याचा पुत्र रुद्रसेन पहिला याने त्याला क्षत्रप[८३] म्हणून राज्यकारभारात सहाय्य केले असावे. जीवदामन पहिला हा तीव्र असंतोषाने धुमसतच राहिला व शेवटी त्याने आपला चुलता रुद्रसिंह पहिला ह्याच्या विरुद्ध बंड केले असे त्याच्या वर्षे ११९ व १२० मध्ये महाक्षत्रप म्हणून काढलेल्या नाण्यांवरून दिसते.[८४] या अल्प काळातील रुद्रसिंह पहिला व जीवदामन पहिला ह्या दोघांनीही महाक्षत्रप म्हणून काढलेली नाणी उपलब्ध आहेत. हेही शक्य आहे की, जीवदामनने कार्दमक राज्याच्या काही भागामध्ये आपले स्वतंत्र राज्य स्थापन केले, परंतु शेवटी त्याच्या चुलत्याने ते नष्ट केले.[८५] जीवदामनच्या चांदीच्या नाण्यांवरून[८६] असे दिसते की, शक वर्ष ११९-१२० या काळात त्याचा धाकटा भाऊ सत्यदामन याने त्याच्याबरोबर क्षत्रप म्हणून शासनात

भाग घेतला. रुद्रसिंह पहिला याच्यानंतर त्याचा मुलगा रुद्रसेन गादीवर आला. याने आपल्या पित्याबरोबर दोन वर्षे[८७] क्षत्रप म्हणून राज्यकारभार केला होता आणि पित्याच्या शके १२२ (इ. स. २००) मध्ये मृत्यू झाल्यानंतर तो महाक्षत्रप झाला. तो शके १४४ (इ. स. २२२)[८८] पर्यंत महाक्षत्रप होता. ही वर्षे त्याच्या नाण्यांवरून ज्ञात होतात. याशिवाय अनुक्रमे शक वर्ष १२२ व १२७ या तिथींचे त्याचे दोन लेख गुजरातमध्ये मिळाले आहेत. या दोहोंमध्येही त्याचा महाक्षत्रप म्हणून उल्लेख आहे.[८९] जुनागढ जवळ इटवा येथे सापडलेल्या मृण्मय मुद्रेवरील (Clay Sealing) लेखामुळे महाराज रुद्रसेन विहार नामक बौद्ध मठाची आणि भिक्षुसंघाची[९०] माहिती मिळते. कार्दमक घराण्यामध्ये रुद्रसेन नावाचे बरेच राजे होते. अक्षरवटिका (Palaeographic features) स्पष्ट नाही. त्यामुळे येथे नोंदवलेला रुद्रसेन कोणता हे निश्चित ओळखता येत नाही. यामुळे या मठाची स्थापना करण्याचे श्रेय पहिल्या रुद्रसेनाइतकेच त्याच्यानंतर राजा झालेल्या दुसऱ्या कोणत्याही रुद्रसेनाला मिळू शकते. जर हा रुद्रसेन पहिला असेल तर असे म्हणता येईल की, तो स्वतः बौद्ध नव्हता तरीही त्याने बौद्ध धर्माला आश्रय देऊन ही बौद्ध मठाची इमारत बांधली. तसेच त्या काळात प्रचलित असलेल्या परंपरेनुसार[९१] त्या मठाला स्वतःचे नाव दिले.

रुद्रसेनाने आपला पूर्वज रुद्रदामन पहिला याच्याप्रमाणे काही भारतीय राजघराण्यांबरोबर विवाहसंबंध स्थापन केले. या घराण्यांपैकी आंध्र प्रदेशाचे इक्ष्वाकु हे एक घराणे होते. वीरपुरुषदत्ताच्या नागार्जुनीकोंड लेखामध्ये त्याच्या उज्जैनीहून[९२] आलेल्या रुद्रधर भट्टारिका नामक पट्टराणीच्या धर्मकृत्यांची नोंद केलेली आहे. तिचे रुद्रसेनाबरोबर जवळचे नाते होते. ती त्याची मुलगी किंवा नात किंवा अगदी जवळच्या नात्यातील असावी. बिहारमधील प्रसिद्ध बौद्ध स्थळ वैशाली (वसाड, मुझफ्फरपूर जिल्हा) येथे रुद्रसेनाची बहीण आणि कोणा अज्ञात राजाची पट्टराणी (महादेवी) प्रभुदामाहिची मुद्रा (Sealing) सापडली आहे. तिचा भाऊ रुद्रसेन[९३] म्हणजेच आपला कार्दमक राजा रुद्रसेन पहिला असण्याची शक्यता आहे.

रुद्रसेनाला त्याच्या कारकिर्दीच्या अखेरच्या दिवसात त्याचा मुलगा पृथ्वीसेन याचे क्षत्रप[९४] म्हणून सहाय्य मिळाले. परंतु त्याच्यानंतर त्याचा भाऊ संघदामन हा महाक्षत्रप झाला असे १४४ व १४५ (इ. स. २२२-२३)[९५] वर्षे असलेल्या नाण्यांवरून दिसते. संघदामननंतर त्याचा धाकटा भाऊ गादीवर आला. त्याची ज्ञात वर्षे शक १४५ ते १५९ अशी आहेत (इ. स. २२३-२३७).[९६] रुद्रसिंह पहिला याच्या राजवटीप्रमाणेच याच्याही कारकिर्दीमध्ये अशांतता होती असे दिसते. आणि या अशांततेचे कारण ईश्वरदत्त हा होता. नुकत्याच सापडलेल्या ईश्वरदत्ताच्या चवथ्या शासनवर्षीच्या म्हणजे शके १५४ च्या चांदीच्या नाण्यांवरून असे दिसते की, तो शक १५१ (इ. स. २२९) मध्ये महाक्षत्रप झाला आणि त्याने निदान शक १५४ पर्यंत (इ. स. २३२)[९७] महाक्षत्रप म्हणून राज्य केले. पुराव्याअभावी त्याचा

राज्य करीत असलेल्या राजघराण्याशी काय संबंध होता हे सध्या निश्चितपणे सांगता येत नाही. परंतु तो निश्चितच या मुख्य घराण्यातील नव्हता, कारण त्याच्या नाण्यांवरील लेख या मुख्य घराण्याच्या राजांच्या नाण्यांवरील लेखांपेक्षा वेगळे आहेत. मुख्य घराण्याच्या शासकाच्या नाण्यावरील लेखात त्या विशिष्ट राजाच्या पूर्वी राज्य करणाऱ्या राजाचे नाव व पदवीचा उल्लेख असतो. परंतु ईश्वरदत्तच्या नाण्यांप्रमाणे[९८] त्यावर राजाचे शासनवर्ष दिलेले नाही. बहुतेक तो सेनापती वगैरे असा उच्चाधिकारी असावा. त्याने स्वतः करीता सत्ता हस्तगत करून स्वतःला कार्दमकांच्या राज्याच्या एखाद्या भागाचा स्वतंत्र राजा म्हणून जाहीर केले असावे. परंतु पुराव्याच्या अभावी याबद्दल निश्चित असे काहीच सांगता येत नाही. असे सुचविले जाते की, सातवाहनांच्या अस्तानंतर त्याने महाराष्ट्रात आपली सत्ता स्थापन केली व नंतर नर्मदेच्या[९९] उत्तरेकडील प्रदेशाचर आक्रमणे केली, परंतु हा केवळ तर्क आहे. दामसेनाला त्याचा पुतण्या दामजड याने शक १५४-१५५[१००] या कालखंडात क्षत्रप म्हणून राज्यकारभारात मदत केली. त्यानंतर त्याचा मुलगा वीरदामन[१०१] हा क्षत्रप झाला. परंतु त्यापैकी कोणीही त्याच्यानंतर महाक्षत्रप झाला नाही. त्याचा दुसरा मुलगा यशोदामन जो शक १६०[१०२] मध्ये क्षत्रप होता तो शक १६१[१०३] मध्ये म्हणजे फक्त एक वर्षाकरिता महाक्षत्रप होता तर त्याचा धाकटा भाऊ विजयसेन क्षत्रप होता. यशोदामनच्या मृत्यूनंतर विजयसेन महाक्षत्रप झाला आणि तो शक १७२ (इ. स. २५०)[१०४] पर्यंत त्याच पदावर होता. त्याच्यानंतर त्याचा दुसरा भाऊ दामजड तिसरा हा राजा झाला. त्याने शक १७२-१७७ (इ. स. २५०-२५५)[१०५] पर्यंत म्हणजे ६ वर्षे राज्य केले. दामजड तिसरा याच्या कारकिर्दीच्या पूर्वी कार्दमकांनी[१०६] उज्जैनसह माळवा प्रदेश गमावला होता, ह्या मताला पुष्टी देणारा काहीही पुरावा उपलब्ध नाही. तथापि उज्जैन प्रदेश त्यांनी गमावला नव्हताच. उलट तो कार्दमकांच्या राज्यात अंतर्भूत होता हे आभीर राजा वसुषेण याच्या नागार्जुनीकोंड लेखातील "रुद्रदामन हा अवन्तीचा[१०७] राजा होता" या वर्णनावरून सिद्ध होते. हा राजा रुद्रदामन दुसरा असावा. शक १७८ (इ. स. २५६) मध्ये दामजड तिसरा याच्यानंतर त्याचा पुतण्या वीरदामनचा पुत्र रुद्रसेन दुसरा हा गादीवर आला. त्याने शक २०० पर्यंत (इ. स. २७८)[१०८] म्हणजे २३ वर्षे राज्य केले. त्याच्या राजवटीच्या नंतरच्या काळात त्याला त्याचा पुत्र विश्वसिंह जो शक १९८-२०० (इ. स. २७६-२७८) मध्ये क्षत्रप होता, त्याने राज्यकारभारात सहाय्य केले. पित्याच्या मृत्यूनंतर विश्वसिंह शक वर्ष २०० मध्ये महाक्षत्रप होऊन तो शक वर्ष २०३ पर्यंत या पदावर होता. त्यावेळी त्याला त्याचा धाकटा भाऊ भर्तृदामनने क्षत्रप म्हणून मदत केली. ज्याअर्थी तो शक २०८ पर्यंत क्षत्रप होता त्याअर्थी विश्वसिंहाने त्या वर्षापर्यंत निश्चितच राज्य केले असावे.[१०९] आतापर्यंत भर्तृदामनची महाक्षत्रप म्हणून शक २१२[११०] पर्यंत पाडलेली नाणी उपलब्ध नव्हती. त्यामुळे आधीच्या विद्वानांची विश्वसिंहाने शक २१२ पर्यंत राज्य केले अशी धारणा होती. तथापि आता महाक्षत्रप भर्तृदामनची शक २०८ ते शक २२१[१११] पर्यंत पाडलेली नाणी उपलब्ध झालेली आहेत. यामुळे या धारणेला काही अर्थ उरत नाही. त्याचा पुत्र विश्वसेन हा शक वर्ष २०५ पासून क्षत्रप म्हणून शासन करीत होता.

**संकटकारक परिस्थिती :** भर्तृदामननंतर सुमारे ४९ वर्षे शक २६९ (इ. स. ३४७) पर्यंत कोणीही महाक्षत्रप नव्हता. रुद्रसेन तिसरा याने शक २७० (इ. स. ३४८) मध्ये पुन्हा ही पदवी धारण केली. या कालखंडात विश्वसेन, रुद्रसिंह दुसरा, आणि यशोदामन दुसरा हे फक्त क्षत्रप होते. यावेळी कार्दमकांची परिस्थिती नक्कीच फार अवघड असली पाहिजे म्हणून त्यांना महाक्षत्रप ही सार्वभौम राजाची पदवी स्थगित ठेवणे भाग पडले. परकीय आक्रमक आणि वारसा हक्कासाठी चाललेले अंतःस्थ कलह ही या कठीण परिस्थितीची कारणे असली पाहिजेत. हे परकीय आक्रमक सस्सामियन असावेत. पश्चिमेकडे रोमन बादशहा मारक्यूस औरेलिअस कारस (Marcus Aurelius Carus) आणि डायोक्लेटन (Diocletian) यांनी सस्सानियन बादशहा वऱ्हरण (Varhran) दुसरा ( इ. स. २७६-९३) याला त्रस्त केले होते. तरीही त्याने पूर्वेकडील आपला उद्दाम भाऊ होरमिस्ट (Hormizd) याचे बंड यशस्वीपणे मोडून काढले; एवढेच नव्हे तर त्याने शकस्थान (Scythia) व सिंध हे प्रांत जिंकले. बहुतेक कार्दमकाना त्यांचा पश्चिमेकडील प्रदेश गमवावा लागला. इ. स. २९३ मध्ये नरसेह हा त्याचा पुतण्या वऱ्हरण तिसरा याला पराभूत करण्यात यशस्वी झाला तेव्हा क्षत्रपांनी याच्याबरोबर मित्रत्वाचे संबंध ठेवले. सस्सानियनांनी कार्दमकांचा सिंधुसौवीर प्रांत घेतला. हा प्रांत रुद्रदामन पहिला याच्या वेळेपासून कार्दमकांकडे असावा. तसेच त्यांना क्षत्रप या कनिष्ट पदवीचा[११२] उपयोग करावयास भाग पाडले. या परकीय आक्रमणाच्या जोडीला वारसा हक्काबाबत निरनिराळ्या स्पर्धकांमध्ये एकमेकांचे पाय मागे ओढण्याची चालू असलेली कसरत यामुळे या घराण्याची अंतर्गत सत्ताही दुर्बल झाली होती. विश्वसेनाने शक २२६ पर्यंत निश्चितच राज्य केले, पण तो कदाचित सस्सानियन सत्तेच्या दबावामुळे महाक्षत्रप ही पदवी धारण करू शकला नाही. भगवानलाल इंद्रजी[११३] यांनी सुचविल्याप्रमाणे कदाचित, दुर्बल राजांमुळे, चष्टन घराण्याची सत्ता संपुष्टात आली आणि स्वामी जीवदामनचा पुत्र रुद्रसिंह[११४] दुसरा याच्या नेतृत्वाखाली दुसरी एक शाखा अस्तित्वात आली. या शाखेचा चष्टनाच्या घराण्याशी[११५] अप्रत्यक्ष संबंध असावा. वारसासाठी या घराण्यांतर्गत कलह झाले असावेत आणि बऱ्याच संघर्षानंतर आणि युद्धानंतर जीवदामनचा मुलगा शेवटी राजा झाला असावा. तो आणि त्याचा पुत्र यशोदामन दुसरा यांनी दोघांनी मिळून शक २५४[११६] पर्यंत राज्य केले तरीही तो महाक्षत्रप ही पदवी धारण करू शकला नाही, ती स्थगितच राहिली.

**पुनरुत्थान व शेवट :** यशोदामन दुसरा याच्यानंतर पुन्हा वारसाच्या बाबतीत बदल झालेला दिसतो. कारण त्याच्यानंतर रुद्रदामन दुसरा याचा मुलगा रुद्रसिंह तिसरा हा शक २७० मध्ये महाक्षत्रप झाला. शके २५५ ते २७७ या काळात त्याचा पिता रुद्रदामन दुसरा हा राज्य करीत होता. त्याच्या मुलाच्या नाण्यांवर त्याचा महाक्षत्रप असा उल्लेख आहे. शिवाय आभीर वसुषेण याच्या वेळेच्या नागार्जुनकोंड येथील अष्टभुजस्वामीन या देवाच्या सेडगिरी[११७] येथे केलेल्या प्रतिष्टापनेच्या संदर्भात दिलेल्या

लेखात उल्लेखलेला रुद्रदामन हाच असावा. या लेखात त्याचा उल्लेख आवन्तक म्हणजे "अवन्तीचा शासक" असा असल्यामुळे हा लेख महत्त्वपूर्ण असून त्यामुळे उज्जैन राजधानी असलेला अवन्तीचा प्रदेश त्याच्या अमदानीत कार्दमकांच्या ताब्यात होता हे सिद्ध होते. रुद्रसेन तिसरा याच्या तीस वर्षांच्या दीर्घ राजवटीतील (शक २७०-३१२ इ. स. ३४८-३९०) चांदीची असंख्य नाणी उपलब्ध आहेत. परंतु त्याच्या अमदानीतील कोणतीही घटना निश्चितपणे माहीत नाही. वा. वि. मिराशी यांनी असे मत नोंदवले की, जमिनीत पुरून ठेवलेल्या नाणकसंचयावरून त्याच्या अमदानीत क्षत्रपांच्या असुरक्षिततेचे वातावरण होते.[११८] परंतु हे विधान बरोबर नाही, कारण हे नाणकसंचय क्षत्रपांनी स्वतः पुरून टेवले नव्हते, तर नाण्यांना संपत्तीच्या दृष्टीने असलेल्या महत्त्वामुळे हे लोकांनी पुरून ठेवले होते. तद्वतच हे संचय फक्त क्षत्रपांच्या राज्यातच मिळाले असे नाही, तर त्यांच्या राज्याबाहेर दूरवरच्या प्रदेशांतही मिळाले आहेत. गुप्त सम्राट समुद्रगुप्त याने पश्चिमेकडील प्रदेशांवर केलेल्या आक्रमणामुळे कार्दमकांची राजकीय परिस्थिती फारच चिंताजनक झाली होती याबद्दल संशय नाही. प्राप्त माहितीनुसार समुद्रगुप्ताने पूर्व माळव्यापर्यंत[११९] प्रदेश हस्तगत करून शक मुरुण्डचा (सिथियन राजा) पराभव केला. हे शक मुरुण्ड म्हणजे कार्दमकच[१२०] असावेत. समुद्रगुप्ताने आर्यवताच्या (उत्तर भारताच्या) पराभूत केलेल्या राजांमध्ये रुद्रदेव नामक राजा आहे. हा कदाचित कार्दमक राजा रुद्रसेन तिसरा[१२१] असावा. ते काही जरी असले तरी समुद्रगुप्ताने दूरवरच्या प्रदेशांवर मिळवलेले विजय व त्याचे लष्करी सामर्थ्य यामुळे कार्दमकांच्या मनात त्यांच्या भवितव्याविषयी भीती व चिंता नक्कीच उत्पन्न झाली असेल.

रुद्रसेन तिसऱ्याच्या मृत्यूच्या वेळी त्याची मुले बहुतेक जिवंत नसावीत. त्यामुळे बहिणीचा मुलगा सिंहसेन हा गादीवर आला. त्याने शक ३००-३०६ (इ. स. ३७८-८४) या कालावधीत राज्य केले असावे. कारण त्याच्या या दोन तिथी आपल्याला ज्ञात आहेत. त्याच्यानंतर रुद्रसेन त्याचा मुलगा व त्याच्यानंतर महाक्षत्रप सत्यसिंह[१२२] चा पुत्र रुद्रसिंह तिसरा यांनी राज्य केले. रुद्रसिंह तिसरा याच्या नाण्यांवरील लेखांप्रमाणे त्याचा पिता सत्यसिंह हा सुद्धा गादीवर आला होता. परंतु आतापर्यंत त्याच्या अमदानीतील लेख किंवा नाणी प्राप्त झालेली नाहीत. तो रुद्रसेन चौथा याचा पुत्र व त्याच्यानंतर गादीवर येणारा त्याचा वारस असणे अगदी सहज शक्य आहे. जरी रुद्रसिंह तिसरा याची पूर्वी मिळालेली नाणी तिथीयुक्त असली तरी त्यातील एकावरही पूर्ण संख्या (Unit) उपलब्ध नाही. परिणामतः तो शक ३१० (इ. स. ३८८)[१२३] मध्ये किंवा त्याचा थोड्या काळानंतर राजा होता, यापलीकडे त्याच्या तिथीबद्दल निश्चितपणे सांगणे कठीण होते. परंतु आता शक ३०९ ते ३३७ या (इ. स. ४१५)[१२४] कालमर्यादेतील वर्षसंख्या असलेली त्याची चांदीची बरीच नाणी प्राप्त झाली आहेत. आधी वर्णन केल्याप्रमाणे समुद्रगुप्ताच्या कारकिर्दीत कार्दमकांची सत्ता व प्रदेश बरेच कमी झाले होते. त्याचा मुलगा आणि गुणी वारस चंद्रगुप्त दुसरा

याने आपल्या पित्याचे कार्य पुढे चालू ठेवून, रुद्रसिंह दुसरा याच्या सत्तेखाली असलेला बहुतेक सर्व प्रदेश जिंकून घेतला. त्याच्या या पराभूत शत्रूंची नाणी या जिंकलेल्या प्रदेशात चांगलीच रुळली होती. ती सुमारे ३०० वर्षांच्या दीर्घकालावधीत चलनात असल्यामुळे बरीच लोकप्रियही झाली होती. त्यामुळे चंद्रगुप्ताने त्या नाण्यांच्या प्रतिकृतीसदृष्य स्वरुपात स्वतःची चांदीची नाणी काढली. त्याच्या नाण्यांवर कार्दमक राजा चष्टनने[१२५] आरंभ केलेल्या शक संवताऐवजी गुप्त संवताच्या तिथी आहेत. परंतु दुर्दैवाने या नाण्यांवरील ९० हा आकडा वाचता येत असला तरी पूर्ण संख्या (Unit) दाखविणारा आकडा (Figure) वाचता येत नाही.[१२६] या कारणामुळे चंद्रगुप्ताने हा विजय इ. स. ४०९ मध्ये मिळविला एवढेच फक्त आपण म्हणू शकतो, या विजयाची नक्की तिथी सांगू शकत नाही. तसेच चंद्रगुप्त दुसरा याच्या राजवटीत हे काम पूर्ण झालेले दिसत नाही. कारण रुद्रसिंह तिसरा याच्या नाण्यांवर शेवटचे ज्ञात वर्ष शक ३३७ (इ. स. ४१५) हे मिळते. हे वर्ष खरे म्हणजे चंद्रगुप्त दुसरा याचा वारस व मुलगा म्हणजेच त्याच्यामागून येणारा राजा कुमारगुप्त पहिला याच्या अमदानीतील आहे. कुमारगुप्त पहिला याने आपला आजा-आजोबांनी समुद्रगुप्त याने प्रारंभ केलेले कार्य त्याच्या स्वतःच्या राज्यकालाच्या आरंभीच्या काळात पूर्ण केले. तसेच त्याच्या राजवटीतील शक ३३७ या तिथीचा उल्लेख रुद्रसिंह तिसरा याच्या नाण्यांवर मिळणे हे जरा विचित्र वाटते.

पश्चिमी क्षत्रपांनी बऱ्याच मोठ्या प्रदेशावर कौशल्याने सुमारे चारशे वर्षे राज्य केले. सांस्कृतिकदृष्ट्या ते पूर्णपणे भारतीय बनले होते. त्यांनी भारतीय नावे धारण केली. भारतीय वैदिक, पौराणिक धर्माचे पालन केले. भारतीय समाज व्यवस्था आणि संस्कृत साहित्याला आश्रय दिला आणि भारतीय राजघराण्यांबरोबर वैवाहिक संबंध स्थापन केले. त्यांच्या वागणुकीमुळे ते फार लोकप्रिय झाले आणि त्यांना भारतीय साहित्य परंपरेमध्ये इतर कोणत्याही त्यांच्या पूर्वीच्या किंवा नंतर येणाऱ्या परकीय राजघराण्याला मिळाले नाही असे महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले आहे.[१२७] त्यांच्या, विशेषकरून पश्चिम किनाऱ्यावरील दीर्घ सत्तेमुळे समुद्री व्यापाराची भरभराट झाली आणि परिणामतः आर्थिक संपन्नता प्राप्त झाली. त्याचबरोबर निरनिराळ्या कला व उद्योगधंदे यांची प्रगती झाली. नाण्यांच्या आर्थिक (Economic) उपयुक्ततेमुळे त्यांच्या स्वतःच्या राज्यातच व राज्याबाहेर दूरवरच्या प्रदेशामध्ये सापडलेल्या नाणकसंचयावरून असे दिसते की, इतर प्रदेशांमध्ये ही नाणी फार प्रिय होती. भारतीय राजघराण्यांनी त्या नाण्यांचे अनुकरण करून स्वतःची नाणी चलनात आणली. याप्रमाणे नंतरच्या सातवाहन व गुप्त या राजघराण्यांच्या सर्व चांदीच्या नाणेप्रकारांना आणि त्यातून प्रगत झालेल्या इतर नाणेप्रकारांना[१२८] (Through them other series) स्वरूप देण्याचे कार्य केले. याशिवाय ज्या शक संवताचा भारत सरकारने राष्ट्रीय संवत म्हणून स्वीकार केला आहे तीही शकांचीच देणगी आहे. परकीय शासकांचा प्रभाव खरोखरच फार दीर्घकालीन व जबरदस्त असा होता.

———

## तळटिपा

१ स्टेन कोनो, "खरोष्ठी इन्स्क्रिप्शन्स विथ दि एक्सेप्शन ऑफ अशोक," **सी. आय. आय.** २, भाग २, लंडन १९२९, पृ. २८-२९.

२ व्होगेल, जे. पीएच., **जे. आर. ए. एस.,** १९१२, पृ. १२१–२२.

३ गोखले, शोभना, **कान्हेरी इन्स्क्रिप्शन्स नं. १५,** पृ. ६२.

४ **पी. एच. ए. आय.,** पृ. ४३७, तळटीप-२.

५ शास्त्री, अजयमित्र, (शक संवत्) **शक इरा, ऑन दि सिस्टीम ऑफ डेटींग इन इंडिया,** इंडियन नॅशनल अकॅडमी, न्यू दिल्ली.

६ स्कॉफ, डब्ल्यू. एच., **दि पेरिप्लस ऑफ एरिथ्रएइयन सी,** इंग्लिश भाषांतर, लंडन, १९१२; मजुमदार, आर. सी., **सी. ए. आय.,** पृ. २८८-३०९.

७ मजुमदार, आर. सी., पूर्वोक्त, परिच्छेद नं. ४१, पृ. ३०१-३०२.

८ कित्ता, पृ. ३०९, तळटीप २६.

९ आर. सी. मजुमदार (**सी. ए. आय.** पृ. २२८). यांच्या मते ही रचना इ. स. च्या ७३-७७ या कालात केंव्हातरी झाली. हे त्यांचे स्वतःचे मत आहे असे नाही, तर सर्वसामान्यपणे इतर विद्वानांचेही मत आहे. त्यांच्या स्वतःच्या मताप्रमाणे ही ग्रंथरचना इ. स. च्या तिसऱ्या शतकाच्या शेवटी केंव्हातरी झाली (**दि इंडियन हिस्टॉरीकल क्वार्टर्ली,** ३८, १९६२, पृ. ८९-९७). जे. डब्ल्यू. मॅकक्रिन्डल हे याच्या रचनेचा काल इ. स. ८०-९० असा सुचवितात (**आय. ए.,** ८, ८७९, पृ. १०८). जे आणखी काही विद्वान ही तिथी इ. स. च्या पहिल्या शतकात ठेवतात ते आहेत इ. जे. रॅप्सन (**केम्ब्रिज हिस्टरी ऑफ इंडिया,** १, पृ. ४९५), डी. सी. सरकार (**ए. आय. यू.,** पृ. ११२, १२६, १२८, १७८, १९९, २१६) आणि व्ही. ए. स्मिथ (**इ. एच. आय.,** लंडन, १९२८, पृ. २४५, एन.). यापैकी शेवटच्या दोन विद्वानांच्या मते हा काळ इ. स. च्या ७० ते ८० या वर्षामधील कालखंडात असावा. यापैकी पहिल्या विद्वानांना मॉबारुसचे (जे नम्बानस ऐवजी चुकून मॉबारुस झाले) नहपानाशी केलेले तादात्म्य मान्य नाही, कारण त्यांचा असा ग्रह आहे की, नहपान हा इ. स. ११९-२४ या कालात राज्य करीत होता (**ए. आय. यू.,** पृ. १७९) हे त्यांचे नहपानाच्या शासन कालाविषयीचे काहीही आधार नसलेले मत नहपानाच्या लेखातील वर्षे शक संवताची आहेत या सर्वमान्य असलेल्या अनुमानावर आधारित आहे. एच. सी. रायचौधरी ही वर्षे इ. स. पहिल्या शतकात ठेवतात (उपरोक्त, पृ. २८७). जे. एन. बॅनर्जी हा रचनेचा काल साधारणपणे त्याच कालखंडात ठेवतात (**सी. एच. आय.,** पृ. २३७). परंतु त्याच वेळेस या कालावधीत वेगवेगळ्या वेळी रचल्या गेलेल्या भागांचाही ते शोध घेण्याचा प्रयत्न करतात. त्यांना असे वाटते की, राजा मलीखस (मलीखुस दुसरा) चा उल्लेख करणारा भाग त्याच्याच राजवटीत

म्हणजे इ. स. च्या ४१-७२ वर्षे या कालखंडात लिहिला असावा आणि या भागाला नंतरचा मंबारुस (नंबानुस) नहपानचा निर्देश करणारा भाग जोडला असावा. त्यांच्या मते मंबारुस म्हणजे दुसरा कोणी नसून नहपानच असला पाहिजे (**सी. एच. आय.** पृ. २४१, तळटीप-१). या ग्रंथाची रचना डोमिशिअनच्या राजवटीत इ. स. ८१-९६ झाली. असे एम. रोस्टोवजेफ (M. Restovtzeff) चे मत त्याच्या संमतीने के. ए. निलकंठ शास्त्री (**सी. एच. आय.** पृ. ५१६) उद्धृत करतात (**सोशल ॲण्ड इकॉनॉमिक हिस्टरी ऑफ दि रोमन एम्पायर,** ऑक्सफोर्ड, १९४१, पृ. ९१). परंतु जी. सी. मेंडीस (**सी. एच. आय.,** २, पृ. ५९९) ग्रंथ रचनेची तिथी इ. स. ८० अशी सांगतात.

१० **सी. ए. आय.,** भाग २३, २६, ३१.

११ ज्यो. क्रिब ही तिथी इ. स. ६०-७५ या कालखंडात ठेवणे पसंत करतात. न्युमिसमॅटिक्स एव्हिडन्स फॉर दि डेट ऑफ "पेरिप्लस", **इंडियन न्युमिसमॅटिक्स-हिस्टरी, आर्ट ॲण्ड कल्चर : एसेज इन दि ऑनर ऑफ डॉ. परमेश्वरीलाल गुप्ता,** पृ. १३१-४५. परंतु हे काम इ. स. ६५ पर्यंत पूर्ण झाले असावे.

१२ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.** पृ. ९५-११४.

१३ ए, कनिंगहॅम (**कॉइन्स ऑफ मेडिव्हल इंडिया,** इंडियन रिप्रिन्ट, वाराणसी १९६७, पृ. ३), जे. डुब्रुईल (**एन्शंट हिस्टरी ऑफ दि डेक्कन,** पॉंडीचेरी, १९२०, पृ. २० आणि त्यापुढे), के. ए. निलकंठ शास्त्री ("दि लेटर सातवाहनाज ॲण्ड दि शकाज", **जे. आर. ए. एस.,** १९२६, पृ. ६५०-५६) यांना हे मान्य आहे.

१४ रॅप्सन, इ. जे., **केम्ब्रिज हिस्टरी ऑफ इंडिया,** १, पृ. ५२१ आणि ५७७; **बी. एम. सी., ए. डब्ल्यू. के.,** पृ. ११० (CX); एच. सी. रायचौधरी, **पी. एच. ए. आय.,** पृ. ४८५; डी. सी. सरकार, **ए. आय. यू.** पृ. १८०; **इंडियन एपिग्राफी,** मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, १९६६, पृ. २६१; **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स,** १, पृ. १६४ आणि त्यापुढे. येथे नहपानाचे लेख शक संवताचे आहेत असे मत व्यक्त केले आहे. व्ही. व्ही. मिराशी, **स्टडीज इन इन्डॉलॉजी,** ४, पृ. ११२-१९; **एच. आय. एस. डब्ल्यू. के.** पृ. ६२ इत्यादी.

१५ कनिष्क संवत् हा शक संवत् आहे असे मत प्रथम जेम्स फर्ग्युसन यांनी मांडले (**जे. आर. ए. एस.,** १८८०, पृ. २५९). या मताचा पुरस्कार ए. एम. बोयर, इ. जे. रॅप्सन, डी. सी. सरकार, बी. एन. मुखर्जी, जे. एन. बॅनर्जी, एच. सी. रायचौधरी आदि मान्यवरांनी केला आहे. वा. वि. मिराशी यांनी **सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप** या ग्रंथात स्वतंत्र परिशिष्ट देऊन या मताचा पुरस्कार केला आहे.

१६ भांडारकर, डी. आर. (**कार्मीकेल लेक्चर्स ऑन एन्शंट इंडियन न्युमिसमॅटिक्स,** कलकत्ता, १९२२, पृ. १९९) यांना असे वाटते की, ऋषभदत्ताच्या नाशिक कोरीव लेखात आलेला "कुशणमूल" हा शब्द कुशाणांचे मूल्य दर्शवितो. व्ही. व्ही. मिराशी, (**एच. आय. एस. डब्ल्यू. के.** पृ. १७१-७६) यांच्या मते "कुशणमूल" हे बहुतेक "कुशलमूल" या शब्दाबद्दल चुकीने कोरले असावे. "कुशलमूल" हा शब्द आधीच्या

बौद्ध लेखांमध्ये "आरोग्याचे मूल" किंवा औषध या अर्थाने घेत असत असे त्यांचे मत आहे.

१७. कुषाण सम्राट कनिष्क पहिला ते वासुदेव यांच्या लेखांमध्ये आपल्याला कनिष्क पहिला याच्या वेळेपासून या संवताची २ ते ९८ पर्यंत वर्षे मिळतात.

१८ शके १९१ मध्ये रचलेल्या स्फुजीध्वजाच्या **यवनजालका** मध्ये याचा शकांबरोबर प्रथम उल्लेख आला आहे. येथे या संवताचा उल्लेख समा : शकनाम आणि कालम शकानाम् असा असून या शब्दांचा अर्थ अनुक्रमे शक वर्ष आणि काल असाच होतो. पहा : डेव्हीड पिंगरी, **दि यवन जातक ऑफ स्फुजीध्वज,** १, केम्ब्रिज (मास), १९७८, ७९ (LXXIX).

१९ स्टेन कोनो (**सी. आय. आय.,** २, पृ. ६१ (LXI) आणि त्यापुढे) यांनी कुषाण हे मूळ शकवंशी आहेत असे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

२० या परंपरेच्या सविस्तर चर्चेसाठी पहा-स्टेन कोनो, **सी. आय. आय.,** २ (१), पृ. ६१ (LXI) आणि त्यापुढे.

२१ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. १५३-५६, दौलतपूर लेख, वर्ष ६ आणि ११५-१६, वर्ष ११ चा अंधौ लेख.

२२ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** २२, १९०८, चित्र १-४.

२३ मीतचिनेर, एम. बी., **इंडोग्रिक ॲण्ड इन्डोसिथियन कॉइनेज-९,** हॉकीन्स पब्लिकेशन्स, लंडन, १९७६, पृ. २८३.

२४ कित्ता, पृ. ८२३.

२५ व्हाईटहेड, आर. बी., **कॅटलॉग ऑफ कॉइन्स इन दि पंजाब म्युझियम,** लाहोर, १; **इन्डोग्रीक कॉइन्स,** ऑक्सफोर्ड, १९१४, पृ. १४४, चित्र १४, ३९६.

२६ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** लेख नं. ३८-४४.

२७ या नाण्यांकरिता पहा. मीतचिनेर, एम. बी., पूर्वोक्त, पृ. ४२४; अजयमित्र शास्त्री, "नहपानाज कॉपर कॉइन्स फ्रॉम भोकरदन", **एन. डी.,** ७, पृ. ३२-४०; **एक्सकॅव्हेशन्स ॲट भोकरदन,** संपा.–एस. बी. देव, पृ. ५४-५८.

२८ उत्तमभद्र हे क्षत्रिय होते असे म्हणतात.

२९ भटारका–अंत्रातिया च गतोस्मि वर्षारतुं मालयेहि ुधं उत्तमभाद्रं मोचयितुं ते च मालया प्रनादेनेव अपयाता उत्तमभद्रकानंच क्षत्रियानं सर्वे परिग्रहा कृता, **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. १११, ओळ ३-४.

३० **सी. ए. आय.,** परिच्छेद नं. ५२, पृ. ३०५. लोनेल कार्सन यांना असे वाटते की, सँदनेस हा शक असावा आणि तो माम्बनसचा दुय्यम अधिकारी असावा

("शकाज व्हर्सेस अन्ध्राज इन दि पेरिप्लस मारीस एरिथ्रएइ", **जर्नल ऑफ दि एकॉनॉमिक ॲण्ड सोशल हिस्टरी ऑफ दि ओरिएन्ट,** २६, भाग-१, १९८३, पृ. १७). परंतु हे असे असणे अशक्य आहे (कित्ता, पृ. १७१). आंध्र हे शकबंदराकडे जाणारी व्यापारी जहाजे लुटण्याचा प्रयत्न करीत असत असे पेरिप्लसच्या अवलोकनावरून दिसते हे त्यांचे मत असमर्थनीय आहे.

३१ पेरिप्लसच्या वर्णनानुसार, **(सी. ए. आय., पृ. ३०१),** नम्बानसची राजधानी मिन्नगर होती. परंतु असे वाटते की, हे भरुकच्छचेच दुसरे नाव आहे. मॅकक्रिन्डल, भगवानलाल इंद्रजी, श्कॉफ, जे. एफ. फ्लीट आणि भांडारकर यांनी या शहराचे तादात्म्य अनुक्रमे इंदोर, जुनागड, नगरी दोहद (पंच महाल, जिल्हा गुजरात) आणि मंदसोर या शहरांशी केलेले आहे. मिराशींच्या मते **(एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. ६४) नहपान यांची राजधानी जुन्नर येथे होती.

३२ मूळ जैन परंपरेकरिता पहा. के. पी. जायस्वाल, "प्रॉब्लेम्स ऑफ शक सातवाहनाज हिस्टरी," **जे. बी. ओ. आर. एस.,** १६, १९३०, पृ. २८२-८५ आणि २९०-९४. जैन ग्रंथात नहपानचा उल्लेख नहवाहन किंवा नरवाहन असा केला आहे.

३३ राजगोर, दिलीप, "रिसेन्ट रिसर्चेस इन क्षत्रप न्युमिसमॅटिक्स", **एन. एस.,** १, पृ. २६-३७.

३४ खखरात-वस-निर्वसेस, **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. ४५.

३५ कित्ता, पृ. २३७.

३६ कित्ता, पृ. ४६२.

३७ **इ. एच. डी.,** पृ. ४०.

३८ बखले, व्ही. एस., पूर्वोक्त, पृ. ६४ आणि त्यापुढे.

३९ "दि क्रॉनॉलॉजी ऑफ दि वेस्टर्न क्षत्रपाज ॲण्ड आन्ध्राज", **आय. एच. क्यू.,** ७, १९३०, पृ. १२१.

४० **इ. एच. डी. वाय.,** पृ. १०३. त्यांचा असा विश्वास आहे की, पेरिप्लस प्रत्यक्ष नहपानाचा उल्लेख न करता फक्त त्याच्या राज्याचा उल्लेख करतो.

४१ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. २६-२७.

४२ शास्त्री, अजयमित्र, "सिल्व्हर कॉइनेज ऑफ दि सातवाहनाज", **अर्ली इंडिजिनस इंडियन कॉइन्स,** (संपा. डी. सी. सरकार), कलकत्ता विद्यापीठ, १९७०, पृ. ११३-९०; "इनिशल पिरिअड ऑफ दि सिल्व्हर कॉइनेज ऑफ सातवाहनाज," **दि जर्नल ऑफ दि ओरिएण्टल इन्स्टिट्यूट,** एम. एस. युनिव्हर्सिटी ऑफ बरोडा, २३, पृ. ३२४-२८, "सातवाहन सिल्व्हर कॉइनेज", **एस. एस. आय. सी.,** १, पृ. ४५-४८.

४३ शास्त्री, अजयमित्र, "इम्पॅक्ट ऑफ वेस्टर्न क्षत्रप कॉइनेज ऑन अर्ली इंडियन इंडिजिनस कॉइन्स", **फॉरिन एलिमेन्टस इन इंडियन इंडिजिनस कॉइन्स** (संपा. अजयमित्र शास्त्री), न्युमिसमॅटिक सोसायटी ऑफ इंडिया, वाराणसी, १९८२, पृ. ३२-४३.

४४ राजगोर दिलीप, **एन. एस.**, १, पृ. ३५. ही नाणी मात्र चौकोनी आहेत.

४५ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. १५४-५६ (दौलतपूर).

४६ कित्ता, पृ. ११५-१६ (अंधौ).

४७ **सी. ए. आय.**, पृ. ३७३, ३७६ या ग्रंथाचा लेखक बैठण (पैठण) ही सिरिटोलेमिआस (Ptolemaios) किंवा पोलेमैऑस (पुलुमावि) ची राजधानी होती असा उल्लेख करतो.

४८ मीतचिनेर, पूर्वोक्त, पृ. ८३१, प्रकार १२५५.

४९ कित्ता, प्रकार १२५६.

५० प्रारंभी टेकडी चिन्ह चित्रित करण्यास आरंभ केला तेव्हा तीनही चिन्हांना काही काळ सारखेच महत्त्व होते. परंतु नंतर टेकडीला जास्त महत्त्व प्राप्त झाले.

५१ खरे म्हणजे या व्यवस्थेमागील हेतू जिंकलेल्या प्रदेशातील प्रजेचा सर्वतोपरी विकास करणे हा होता.

५२ घराण्याचे नाव दिलेली नहपानाची चांदीची नाणी.

५३ मीतचिनेर, कित्ता, पृ. ८३४, प्रकार १२६८.

५४ क्षत्रपांनी पाडलेल्या हलक्या धातूच्या नाण्यांकरिता पहा : मीतचिनेर, पूर्वोक्त, ८३२, प्रकार १२६१.

५५ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ११६-१९.

५६ या लेखाची तिथी साधारणपणे इ. स. १५० अशी ठरविली आहे. परंतु हे वर्ष खरे म्हणजे सुदर्शन बांध फुटल्याचे आहे. **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. १२५, ओळ ४-७.

५७ श्रीनिवासन, पी. आर., "थ्री वेस्टर्न क्षत्रप इन्स्क्रिप्शन्स," **इ. आय.**, ३७, पृ. १३९-४२; **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. १२१. लेखातील वर्षाचा दशमाचा अंक नष्ट झाला आहे. श्रीनिवासनच्या मताप्रमाणे हा आकडा ५० आहे आणि हा लेख व शक ५२ चा लेख यातील साम्य लक्षात घेता इच्छित वर्ष ५३ आहे. हे मत मिराशींच्या (हा आकडा ६० (इच्छित वर्ष ६३) आहे आणि हा लेख चष्टनाच्या राजवटीच्या अस्तानंतर, परंतु रुद्रदामन पहिला याने महाक्षत्रप ही श्रेष्ठ पदवी धारण करण्यापूर्वीचा आहे), या मतापेक्षा जास्त बरोबर वाटते.

५८ सुदर्शन बांध शक ७२ किंवा इ. स. १५० मध्ये फुटला. त्याच्या पुनर्बांधणीबद्दल त्याच्या अधिकाऱ्यांमध्ये मतभेद होते असे दिसते. त्यामुळे त्याची नोंद थोड्या वर्षानंतर झाली असावी. म्हणून या प्रत्यक्ष लेखाची तिथी इ. स. १६५ अशी घेता येईल.

५९ स्वयम-अधिगत-महानत्रप-नाम्ना, **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. १२६, ओळ १५.

६० सर्व-क्षत्र-अविष्कृत-वीर-शब्द-जात-उत्सेक-आविधेयानाम्-यौधयानाम्-प्रसह-उत्सादकेन, उपरोक्त, **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. १२६, ओळ ११-१२.

६१ शास्त्री, अजयमित्र, ''नोट ऑन यौधेय सील'', **जे. इ. एस. आय.**, ३६, (XXXVI), पृ. ११४-१८.

६२ हे वर्णन नावाच्या अर्थाला अनुलक्षून असावे. त्यामुळे या वर्णनाला विशेष अर्थ नाही.

६३ मीतचिनेर, पूर्वोक्त पृ. ८३४. पहिल्या रुद्रदामनची क्षत्रप म्हणून पाडलेली चांदीची नाणी अद्याप मिळालेली नाहीत. परंतु त्याचा पिता जयदामन याने अशी नाणी पाडली होती. कित्ता, पृ. ३८२.

६४ मीतचिनेर, पूर्वोक्त, पृ. ८३४. १२६६ (क्षत्रप म्हणून) आणि १२६७ (महाक्षत्रपाची) हे दोन्ही प्रकार फक्त चांदीचे आहेत. आतापर्यंत हलक्या धातूची नाणी मिळाली नाहीत.

६५ कित्ता.

६६ मीतचिनेर, पूर्वोक्त, पृ. ८३५, प्रकार १२७०; पृ. ८३६-३७, प्रकार १२७४ व १२७५

६७ मीतचिनेर, पूर्वोक्त, पृ. ८३५, प्रकार १२६९. त्याच्या आधी शक १०२ च्या नाण्यावर त्याचा क्षत्रप म्हणून उल्लेख आहे (कित्ता पृ. ८३४, प्रकार १२६८). शक १०३ च्या गुंदा लेखामध्ये त्याचा क्षत्रप म्हणून उल्लेख आहे. यावरून हे स्पष्ट होते की, तो शक १०३ च्या नंतरच्या भागात महाक्षत्रप झाला.

६८ **बी. एम. सी., ए. डब्ल्यू. के.**, पृ. ८३.

६९ कित्ता, पृ. १२४; सत्यश्रव, **दि शकाज इन इंडिया,** वेदिक रिसर्च इन्स्टिट्यूट, लाहोर, १९४७, पृ. ७८; मिराशी, व्ही. व्ही., **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ७४.

७० इंद्रजी, भगवानलाल, **बॉम्बे गॅझेटिअर-१,** भाग १, पृ. ४०-४१. मायकेल मीतचिनेर, पूर्वोक्त, पृ. ८२६.

७१ पहिल्या जीवदामनच्या उपलब्ध असलेल्या नाण्यांवर याच निश्चित ज्ञात असलेल्या तिथी आहेत. मीतचिनेर, मायकेल पूर्वोक्त, पृ. ८३६-३७.

७२ **बी. एम. सी. ए. डब्ल्यू., के.,** (CXXIV-CXXV) पृ. १२४-२५.

७३ सत्यश्रव, पूर्वोक्त, पृ. ७८; मिराशी, व्ही. व्ही.**एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. ७४.

७४ मीतचिनेर, मायकेल, पूर्वोक्त, पृ. ८३६-३७; दिलीप राजगोर, "ॲन इन्व्हेंटरी ऑफ डेटस, नोन ऑन दि कॉइन्स ॲण्ड इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि वेस्टर्न क्षत्रपाज", **एन. एस.,** २, पृ. १९०.

७५ सत्यश्रव, पूर्वोक्त, पृ. ८९-९०; मीतचिनेर, मायकेल पूर्वोक्त, पृ. ८३४-३६.

७६ दिलीप राजगोर हे सत्यश्रव यांनी दिलेल्या माहितीनुसार जीवनदामन पहिला याने क्षत्रप म्हणून काढलेल्या नाण्यांचा उल्लेख करतात (**एन. एस.,** २, पृ. ९०), परंतु सत्यश्रव (पूर्वोक्त, पृ. ७८) अशा नाण्यांचा उल्लेख करीत नाही.

७७ अशा तिथी हलक्या धातूच्या नाण्यांवरसुद्धा इतर ठिकाणी दिलेल्या आढळतात. यापैकी बऱ्याच नाण्यांवर फक्त तिथी दिलेल्या आहेत आणि राजांच्या चांदीच्या नाण्यांवरील वर्ष संख्येच्या मदतीने ती कोणत्या शासकाची आहेत हे ठरविता येते.

७८ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** नं. ५२ (शक १०३), ५३, ५४. यापैकी शेवटच्या दोन लेखांमध्ये त्याचा महाक्षत्रप म्हणून उल्लेख आहे. हा एकतर दामघ्सद किंवा रुद्रसिंह पहिला असावा. कारण हे दोघेही जयदामनचे नातू होते.

७९ कित्ता, नं. ५२. रुद्रभूति हा आभीर होता. ज्याने सर्वश्रेष्ठ अशी महाक्षत्रप पदवी धारण केली होती असे ज्याच्या थोड्याशाच नाण्यांच्या उपलब्धतेवरून कळते. तो बंडखोर ईश्वरदत्त आभीरच होता असे असंख्य इतिहासकार समजतात. काहींच्या मताप्रमाणे तो याच सुमारास होता. परंतु, हे विधान चुकीचे आहे असे सिद्ध करणारा महत्त्वपूर्ण नाणक पुरावा नुकताच प्राप्त झाला आहे.

८० **एन. एस.,** २, पृ. ८९-९०.

८१ राजगोर, उपरोक्त, पृ. ८९. जेव्हा वर्षे १०० ते १०३ चा उल्लेख असलेली नाणी रुद्रसिंह पहिला याने महाक्षत्रप म्हणून काढलेली आहेत असे म्हणतात, हे संयुक्तिक वाटत नाही. कारण आपल्याला त्याच्या त्यावर्षीच्या (१०३) गुंदा लेखानुसार तो यावर्षाच्या सुरुवातीच्या पादापर्यंत क्षत्रप म्हणूनच शासन करीत होता हे ज्ञात आहे.

८२ मीतचिनेर, मायकेल, पूर्वोक्त, पृ. ८३४.

८३ **एन. एस.,** २, पृ. ९०. रुद्रसिंह पहिला याच्या ज्या शेवटी दिलेल्या नाण्यावरील १०० आणि २० हे आकडे वाचता येतात, परंतु युनीटची संख्या वाचता येत नाही.

८४ **एन. एस.,** पृ. ९०. रुद्रसेन पहिला याची पहिली दोन नाणी.

८५ रुद्रसेन पहिला याच्या १२१ आणि १२२ ही वर्षे असलेल्या नाण्यांवरून असे दिसते की, त्याचा पिता १२२ पर्यंत राज्य करीत होता आणि जीवदामनच्या शेवटच्या ज्ञात नाण्यावर १२० हे वर्ष आहे.

८६ मीतचिनेर, मायकेल, पूर्वोक्त, पृ. ८३७; राजगोर, **एन. एस.,** २, पृ. ९०. त्यांच्या नाण्याची दिलेली १२६ ही तिथी चुकीची आहे.

८७ **एन. एस.,** २, पृ. ९०, रुद्रसेन १.

८८ कित्ता, पृ. ९०-९१.

८९ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** नं. ५६-५७.

९० कित्ता, नं. ५८.

९१ संस्थापक आश्रयदात्यांची नावे असलेले असंख्य मट आहेत.काही उदाहरणांकरिता पहा : अजयमित्र शास्त्री, **ॲन औटलाइन ऑफ दि अर्ली बुद्धिझम,** इन्डॉलॉजिकल बुक हाऊस, वाराणसी, १९६५, पृ. १२०–२५.

९२ सरकार, डी. सी., **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स,** १, पृ. २३१, ओळ ३–४.

९३ राज्ञो महाक्षत्रपस्य स्वामि–रुद्रसिंहस्य दुहितु राज्ञो महाक्षत्रपस्य स्वामि रुद्रसेनस्य भगिन्या महादेव्या प्रभुदामाय : असे वाचन आहे. **ॲन्युअल रिपोर्टस्, आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया,** १९१३–१४, पृ. १३६, नं. २४८.

९४ वर्ष ४४ (इ. स. १२२) हीच फक्त त्याची निश्चित तिथी आहे. मीतचिनेर, पृ. ८३९, प्रकार १२८१.

९५ मीतचिनेर, पृ. ८३९, प्रकार १२८०. राजगोर हे या राजाच्या १४९ वर्षीची तिथी दिलेल्या नाण्यांचा उल्लेख करतात हे संयुक्तिक वाटत नाही. कारण दामसेन याची १४५ वर्ष तिथी असलेली नाणी उपलब्ध आहेत.

९६ मीतचिनेर, पूर्वोक्त, पृ. ८३९–४०. राजगोर, **एन. एस.,** २, पृ. ९१–९२.

९७ त्याच्या आधीच्या नाण्यांसाठी पहा : **बी. एम. सी., ए. डब्ल्यू. के.,** पृ. १२४–२५. त्याच्या चौथ्या शासनवर्षीच्या म्हणजे शक १५४ या वर्षाच्या नाण्यासाठी पहा–शोभना गोखले, "ए युनिक कॉइन ऑफ महाक्षत्रप ईश्वरदत्त," **जे. एन. एस. आय.,** ४० (XL) (I) पृ. ३४–३६ चर्चेसाठी व्ही. व्ही. मिराशी, **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. ७५–७६.

९८ तो आभीर राजा होता या विधानाला पुष्टी देणारा पुरावा उपलब्ध नाही.

९९ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. ७६.

१०० मीतचिनेर, मायकेल, पूर्वोक्त, पृ. ८४०, प्रकार १२८४.

१०१ कित्ता, पृ. ८४१, प्रकार १२८५. १५६–६१ ही त्याची ज्ञात वर्षे आहेत.

१०२ मीतचिनेर, पूर्वोक्त, पृ. ८४१, प्रकार १२८७. यावर्षी वीरदामन, यशोदामन आणि विजयसेन हे तीन क्षत्रप होते हे स्पष्ट आहे.

१०३ मीतचिनेर, पृ. ८४२, प्रकार १२८८.

१०४ मीतचिनेर, पृ. ८४२, प्रकार १२९०. राजगोर हे या राजाच्या ज्या नाण्यांवरील वर्ष १७४ (कदाचित) असावे असे त्यांचे मत आहे त्याचा उल्लेख करतात **(एन. एस.,** २, पृ. ९४ विजयसेनचे शेवटचे नाणे) परंतु त्यांचे हे मत स्वीकारता येत नाही. कारण हे नंतर येणाऱ्या दामजड तिसरा याच्या अमदानीत जाते.

१०५ मीतचिनेर, मायकेल, पूर्वोक्त, पृ. ८४३, प्रकार १२९१.

१०६ कित्ता, पृ. ८२७, ८४३; ए. एस. आळतेकर, **एम. एस. जी. एच.,** १, पृ. १६१–६२.

१०७ सरकार, डी. सी., "नागार्जुनकोण्ड इन्स्क्रिप्शन ऑफ दि टाईम ऑफ आभीर वसुषेण, इअर ३०". **इ. आय.,** ३४, पृ. २०३, ओळ ३. सरकार (उपरोक्त पृ. १९८) यांनी रुद्रदामन दुसरा हा इ. स. च्या तिसऱ्या शतकात उदयाला आला असे विधान केले आहे, पण प्रत्यक्षात तो इ. स. ४ थ्या शतकाच्या मध्यकालाच्या सुमारास होता.

१०८ मीतचिनेर, मायकेल, पूर्वोक्त, पृ. ८४४, प्रकार १२९२.

१०९ राजगोर यांच्या **(एन. एस.,** २, पृ. ९६) याबाबतच्या लेखात गोंधळ आहे. मीतचिनेर, (पूर्वोक्त, पृ. ८४६) यांनी भर्तृदामनने क्षत्रप म्हणून काढलेल्या नाण्यांच्या तिथी दिलेल्या आहेत.

११० **बी. एम. सी., ए. डब्ल्यू. के.,** पृ. १२९ (CXXXIV) (वर्ष २११ च्या आधीची), मायकेल मीतचिनेर, पूर्वोक्त, पृ. २८५.

१११ **एन. एस.,** २, पृ. ९६–९७.

११२ इ. हेझ्झफेल्ड, **पैकुली : मॉनूमेंट ॲण्ड इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि अर्ली हिस्टरी ऑफ दि सस्सानियन एम्पायर,** १, बर्लीन, १९२४, पृ. ४१ आणि त्यापुढे.

११३ **बॉम्बे गॅझेटिअर,** १, पृ. ४९, ए. एस. आळतेकरांनी या मताच्या विरोधात केलेल्या विधानाला काही अर्थ नाही. **एम. एस. जी. एच.,** १, पृ. १६४, तळटीप २.

११४ नरसिंहमूर्ती, ए. व्ही. ॲण्ड के. व्ही. रमेश (संपा.), "ए प्रॉब्लेम ऑफ वेस्टर्न क्षत्रप न्यूमिसमॅटिक्स : दि नेम ऑफ स्वामी जयदामनस् सन : ए रिप्रायझल,"

**गिरिधश्री : एसेज ऑन इन्डॉलॉजी** (प्रो. जी. एस. दीक्षित फेलीसिटेशन व्हॉल्यूम), आगम कला प्रकाशन, दिल्ली, १९८७, पृ. ९१–९४. इतर ठिकाणी स्पष्ट केल्यानुसार त्यांच्या नाण्यावरील नावाचे रुद्रसेन हे वाचन बरोबर आहे हे काही विद्वानांचे मत किंवा दृष्टीकोन निरर्थक आहे.

११५ राजांनी धारण केलेली नावे आणि त्यांनी नाणे पाडण्याची चालू टेवलेली पद्धत यावरून जीवदामन व त्याचा पुत्र रुद्रसिंह दुसरा यांचा कार्दमक वंशाशी संबंध होता याबद्दल संशय रहात नाही. जीवदामनच्या नावाबरोबर कोणतीही राजसत्ता निदर्शक पदवी (राजन किंवा क्षत्रप) जोडलेली नाही.

११६ रुद्रसिंह दुसरा : २२७–३७, यशोदामन दुसरा : २३७–५४.

११७ **इ. आय.,** ३४, पृ. २०३, ओळ ३, यावरून आभीर वसुषेण हा चौथ्या शतकात होता आणि काही विद्वानांना वाटते त्याप्रमाणे तो तिसऱ्या शतकात नव्हता हे सिद्ध होते.

११८ मिराशी, वा. वि., **एच. आय. एस. डब्ल्यू. के.,** पृ. ८१.

११९ सरकार, डी. सी., पूर्वोक्त, यांचा एक लेख एरण येथे मिळाला आहे.

१२० **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स,** १, पृ. २६८–७०.

१२१ कित्ता, पृ. २६५, ओळ २१ आणि तळटीप २.

१२२ त्यांच्या नाण्यांकरीता पहा : मायकेल मीतचिनेर, पूर्वोक्त, पृ. ८४९–५१.

१२३ मीतचिनेर, पूर्वोक्त पृ. ८५१.

१२४ **एन. एस.,** २, पृ. १०१–१०२.

१२५ चंद्रगुप्ताच्या दुसऱ्या चांदीच्या नाण्यांकरीता पहा : जे. ॲलन, **"ए कॅटलॉग ऑफ इंडियन कॉइन्स इन दि ब्रिटिश म्युझियम** : कॉइन्स ऑफ दि गुप्त डायनेस्टीज ॲण्ड शशांक–किंग ऑफ गौड," ब्रिटिश म्युझियम, लंडन, १९१४, पृ. ४९–५१, ए. एस. आळतेकर, "कॉर्पस ऑफ इंडियन कॉइन्स," ४ : **दि कॉइनेज ऑफ दि गुप्त एम्पायर,** न्युमिसमॅटिक सोसायटी ऑफ इंडिया, वाराणसी, १९५७, पृ. १५३–५४.

१२६ मीतचिनेर, मायकेल, पूर्वोक्त., पृ. ८५२.

१२७ त्यांच्या शैक्षणिक परंपरा व विकासासाठी पहा – रमेश जमीनदार, **क्षत्रप–कालनु गुजरात,** (गुजराती) गुजरात विद्यापीठ, अहमदाबाद, १९७५, पृ. ५७–५८, ६५, ६८–६९; टीप १६–१७ (नहपान); सत्यश्रव, पूर्वोक्त, पृ. ६१–६७.

१२८ शास्त्री, अजयमित्र, "इम्पॅक्ट ऑफ वेस्टर्न क्षत्रप कॉइनेज ऑन अर्ली इंडियन इंडिजिनस कॉइनेज", **"फॉरेन इलेमेन्टस् इन इंडियन इंडिजिनस कॉइन्स,** पृ. ३२–४३.

———

# प्रकरण ७

# वाकाटक राजवंश *

पुराणांमध्ये वाकाटक किंवा विन्ध्यक असा उल्लेख केलेल्या या राजवंशाची इ. स. तिसऱ्या शतकाच्या शेवटी आन्ध्रसातवाहन सत्तेचा ऱ्हास झाल्यानंतर विदर्भ प्रांतामध्ये सत्ता स्थापन झाली. यांचे मूळ सत्ता केंद्र नर्मदा नदीच्या उत्तरेस मध्यप्रदेशातील विन्ध्य प्रदेशात होते. तेथून ते दक्षिणेकडे विदर्भ आणि महाराष्ट्रातील इतर प्रदेश, आन्ध्रप्रदेश आणि कर्नाटकाकडे आले. त्यांनी दक्षिण भारताचा बराच मोठा भाग आपल्या सत्तेच्या प्रभावाखाली आणला त्यांचे गुप्त राजवंश, कर्नाटकाचा कदंब राजवंश व आन्ध्रप्रदेशाचा विष्णुकुंडिन राजवंश यांच्याबरोबर वैवाहिक संबंध होते. त्यांची सत्ता इ. स. च्या तिसऱ्या शतकाच्या मध्यापासून ते इ. स. च्या सहाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत म्हणजे साधारणपणे २५० वर्षे टिकली. या कालावधीत प्रस्थापित झालेली शांतता व सुबत्ता यामुळे साहित्य आणि इतर कलांना बहर आला. ही शांतता व सुबत्ता प्राकृत साहित्याच्या प्रगतीचे विविध टप्पे व सुवर्ण युग ठरलेल्या या कालखंडातील अजंटा व गुलवाडा येथील महायान कलेच्या विकासाचीही साक्षीदार ठरली.

परंतु खात्रीलायक पुराव्याच्या अभावी व वाकाटकांचे मूलस्थान व कालक्रम या सारख्या महत्त्वाच्या व मूलभूत प्रश्नांवर संशोधकांचे एकमत नाही. आता मांढळ येथे मिळालेले अनुक्रमे रुद्रसेन दुसरा व प्रवरसेन दुसरा यांचे प्रत्येकी एक व पृथिवीषेण दुसरा याचे दोन असे एकूण चार ताम्रपट प्रभावती गुप्ताचा मिरेगाव ताम्रपट, पृथिवीषेण दुसरा याचा माहूरझरी ताम्रपट, प्रभावती गुप्ताच्या स्मरणार्थ दिलेला रामटेक ताम्रपट, देवसेनाची बीदर सनद व हिस्सेबोराळा शिलालेख, हरिषेणाचा थाळनेर ताम्रपट[१] आणि कदंब राजा सिंहवर्मन याचा मुडिगेरे ताम्रपट यामुळे या विषयाबाबत पूर्वीच्या संशोधकापेक्षा वर्तमान अभ्यासकांकडे अधिक पुरावे उपलब्ध आहेत.

## मूलस्थान

या राजवंशाने आपल्या राजकीय जीवनाचा प्रारंभ कोणत्या प्रदेशात केला याबाबत वाद असून त्याचे अद्यापही निश्चित उत्तर मिळालेले नाही. पुराणातील स्पष्ट उल्लेखानुसार त्यांचे मूलस्थान मध्यभारतात असले पाहिजे. तथापि ते दक्षिण भारतात असावे असा सिद्धांत मांडला गेला. हा सिद्धांत प्रथम आर. पी. चंदा[२] यांनी मांडला. नंतर वा. वि. मिराशी[३] आणि अ. स. आळतेकर[४] यांनी तो विस्तारपूर्वक मांडला.

* या प्रकरणाचे मूळ इंग्रजी लेखन डॉ. अजयमित्र शास्त्री (निवृत्त इतिहास विभाग प्रमुख व ज्येष्ठ नाणेसंशोधक, नागपूर विद्यापीठ, नागपूर) यांनी केलेले असून त्याचा मराठी अनुवाद डॉ. मालती महाजन (निवृत्त प्राध्यापिका, नागपूर विद्यापीठ, नागपूर) यांनी केलेला आहे.

दक्षिण भारतीय मूलस्थानाची कल्पना आन्ध्रप्रदेशात गुंटूर जिल्ह्यातील प्रमुख बौद्ध स्थान अमरावती येथील अष्टकोनी स्तंभावर अक्षरवटिकेच्या आधारे साधारणपणे ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकाचा मध्य ते तिसऱ्या शतकाचा मध्य या कालखंडातील एका अपूर्ण लेखात उल्लेखिलेल्या वाकाटक नामक गृहपति या नावावरून स्फुरली. या लेखाचा उद्देश वाकाटक याने त्याचे ज्ञातिजन आणि मित्र यांचे आयुष्य वृद्धिंगत[५] व्हावे या उद्देशाने केलेल्या पुण्यकृत्याची नोंद करणे हा आहे. कदाचित हे पुण्यकर्म म्हणजे या स्तंभाची स्थापना करणे हेही असू शकेल. या लेखाचे संपादन करताना आर. पी. चंदा यांनी याच टिकाणी मिळालेल्या ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकाच्या मध्यकालात दिलेल्या दुसऱ्या एका लहान लेखात उल्लेखिलेल्या "पाकोटक" या नावाचे अमरावती लेखातील वाकाटक या नावाशी तादात्म केलेले आहे. त्यांची कल्पना अशी होती की, यामुळे वाकाटकांचे वास्तव्य जास्तीत जास्त ख्रिस्तपूर्व १५० मध्ये[६] दक्षिणेत होते असे सिद्ध करता येईल. परंतु त्यांना वाकाटक हे व्यक्तिनाम आहे की, वंशनाम[७] आहे याबद्दल खात्री नव्हती. मिराशींच्या मते हे नाव वाकाटक वंशाची[८] स्थापना करण्याचे श्रेय असलेल्या व्यक्तीचे आहे. या लेखात उल्लेखिलेला गृहपति वाकाटक दक्षिण भारतात[९] कोठेतरी राहत असावा. परंतु हे मत पूर्णपणे ग्राह्य वाटत नाही. कारण एकतर या लेखामध्ये वाकाटकाचा उल्लेख फक्त "गृहपति" म्हणून केलेला असून त्याच्या नावामागे कोणतीही राजसत्तानिदर्शक पदवी नाही. दुसरे असे की, भारहूत व सांची प्रमाणे अमरावती हेही प्रसिद्ध यात्रास्थान झाले होते. त्यामुळे या ठिकाणी दूरदूरच्या प्रदेशातून बौद्ध यात्रेकरू येत असत. प्रत्यक्ष अमरावती येथे मिळालेल्या कोरीव लेखामध्येच निरनिराळ्या प्रदेशातून येणाऱ्या यात्रेकरूंच्या दानकृत्यांची नोंद केलेली मिळते. काही यात्रेकरू तर पाटलिपुत्र, राजगृह यासारख्या दूरवरच्या ठिकाणांहून आलेले आहेत.[१०] त्यामुळे या सिद्धान्ताच्या समर्थकांच्या म्हणण्याप्रमाणे या लेखात उल्लेखिलेला वाकाटक जवळपासच्या प्रदेशातून आला होता असे खात्रीपूर्वक म्हणता येत नाही. दूरवरच्या प्रदेशातून आलेल्या इतर काही दात्यांप्रमाणे तो आन्ध्रप्रदेशाहून दूर असलेल्या ठिकाणाहून आला असावा. याशिवाय वाकाटक हा धर्मशील भक्तिपरायण बौद्ध आहे. याउलट वाकाटक राजे हे वैदिक-पौराणिक हिंदू धर्माचे अनुयायी होते त्यामुळे वरील मत संयुक्तिक वाटत नाही. जर अमरावती कोरीव लेखातील गृहपति वाकाटक हा वाकाटक राजवंशाचा संस्थापक होता असे म्हणायचे झाले तर या लेखामध्ये गृहित असलेल्या सांप्रदायिक गोफनिकडे पूर्णपणे दुर्लक्ष करावे लागेल. म्हणून केवळ नामसांधर्म्य आहे यापेक्षा जास्त काही म्हणता येत नाही. नामसाधर्म्य असणे हा केवळ योगायोग आहे. मिराशींनी पुढे वाकाटक नृपति विन्ध्यशक्ति दुसरा याचा वाशीम लेख आणि पल्लव राजा शिवस्कंदवर्मन याच्या हीरहडगळ्ळी व मयिदवोलू लेख यामध्ये आढळणाऱ्या काही तांत्रिक संज्ञांमधील साम्याकडेही लक्ष वेधले आहे. याविषयी एवढेच म्हणता येईल की, या लेखामध्ये दानाची नोंद करणारा भाग प्राकृतमध्ये आहे आणि दक्षिण भारतातील एकमेकास लागून असलेल्या दोन प्रदेशांवर राज्य करणाऱ्या भिन्न राजवंशाच्या कोरीव लेखामध्ये समान महसुली संज्ञा येणे स्वाभाविकच आहे. अशा

प्रकारच्या समान संज्ञा या वंशाच्या फक्त दक्षिण (वाशीम) शाखेच्या लेखामध्येच आढळतात. त्या उत्तर (नंदिवर्धन-पद्मपूर-प्रवरपूर) शाखेच्या कोरीव लेखांमध्ये आढळत नाहीत. जर वाकाटक दक्षिण भारतीय असते तर या शाखेच्या सुद्धा अशा प्रकारच्या संज्ञा असायला पाहिजे. तेव्हा केवळ प्रादेशिक जवळीक किंवा निकटता व गरज यानुसार तांत्रिक संज्ञांमध्ये असलेले साम्य ही बाब पूर्णपणे मान्य करता येत नाही.

मिराशींच्या मते द्वितीय विन्ध्यशक्तीच्या[११] वाशीम ताम्रपटात वाकाटक नृपति प्रवरसेन प्रथम याच्या नावामागे लावलेली हारितीपुत्र ही पदवी आणि वत्सगुल्म शाखेचा संस्थापक सर्वसेन प्रथम आणि त्याचा पुत्र व वारस विन्ध्यशक्ति दुसरा यांच्या नावामागे लावलेली धर्मराज ही पदवी या दोन्हीही पदव्या वाकाटक मुळचे दक्षिण भारतीय होते असे दर्शवितात. कारण या पदव्या फक्त पल्लव, कदंब, बदामीचे चालुक्य यासारख्या दक्षिण भारतीय राजवंशाच्या कोरीव लेखांमध्ये मिळतात. उत्तर भारतीय राजवंशाच्या लेखांमध्ये त्या उपयोगात आणलेल्या दिसत नाहीत. वर उल्लेखिलेल्या महसूल संज्ञांप्रमाणेच या पदव्यांचा उपयोग दक्षिण भारतातील राजवंशाच्या काही सभासदांनी केलेला होता याची नोंद घेणे आवश्यक आहे. त्यांचा स्वीकार वाकाटकांच्या फक्त वत्सगुल्म शाखेच्या काही नृपतींनी आपल्या दानपत्रांत केलेला आहे. अशा पदव्या वाकाटक वंशामध्ये मूलतः अस्तित्वात असत्या तर त्यांच्या पद्मपूर-नंदिवर्धन-प्रवरपूर शाखांच्या राजांनीही आपल्या नावामागे त्या धारण केल्या असत्या. या वंशाच्या प्रवरसेन प्रथम पासूनच्या वंशावळ देणाऱ्या दानपत्रांमध्ये त्यांची नोंद आढळत नाही. या पदव्या वत्सगुल्म शाखेने त्यांचे दक्षिण भारतीय शेजारी वनवासी कदंब राजवंश याच्याकडून त्यांच्या सान्निध्यामुळे घेतल्या होत्या. कदंब राजवंश अशा पदव्यांच्या उपयोगाकरिता प्रसिद्धच आहे. परिणामतः या पदव्यांचा वापर हा पुरावा म्हणून या राजवंशाचे मूलस्थान ठरविण्याचे दृष्टीने उपयुक्त ठरत नाही.

या दृष्टीने शेवटचा परंतु महत्त्वाचा पुरावा म्हणून अजंटा येथील, क्रमांक १६ व्या लेण्यांतील[१२] वाकाटकांच्या सचिव कुलांनी दिलेल्या कोरीव लेखाकडे व वत्सगुल्म शाखेचा शेवटचा ज्ञात नृपति हरिषेण याच्या घटोत्कच लेण्यातील लेखाकडे लक्ष जाते.[१३] संबंधित सचिव कुल वल्लुर या नावाने ज्ञात होते. कदाचित हे नाव हे घराणे किंवा कुल ज्या गावाहून आले होते त्या गावाच्या नावावरून पडले असावे. मिराशींनी या गावाचे आन्ध्रप्रदेशात[१४] हैदराबादच्या उत्तर-पूर्वेस ४० मैलावर असलेल्या वेल्लूर ह्या वर्तमान गावांशी तादात्म्य सुचविलेले आहे. या कुलाच्या वाकाटकांबरोबर असलेल्या संबंधाचा वाकाटकांच्या दक्षिण भारतीय मूलस्थानाच्या सिद्धान्ताला बळकटी आणण्याच्या दृष्टीने उपयोग केलेला आहे. परंतु जरी जवळपासच्या प्रदेशांतील व्यक्तींना मंत्री किंवा अधिकारी पदावर नियुक्त करण्याची पद्धत सामान्यपणे अस्तित्वात असली तरी दूरवरच्या प्रदेशातून आलेल्या व्यक्तींची मंत्री म्हणून नेमणूक केल्याची उदाहरणेही मिळतात. ह्याशिवाय वराहदेवाचा अजंटा शिलालेख या कुलातील

शेवटच्या दोन म्हणजे हस्तिभोज व प्रत्यक्ष वराहदेव यांच्या वत्सगुल्म शाखेचे शेवटचे दोन नृपति अनुक्रमे[१५] देवसेन व हरिषेण यांचे मंत्री म्हणून उल्लेख करतो. वराहदेवाच्या घटोत्कच लेण्यातील लेखामध्ये नंबर दोनचा सचिव देव हा फार कर्तबगार, विद्वान, नीतिनिपुण व क्रियाशील राजनीतिज्ञ होता व त्याच्या प्रभावामुळे राजासह सर्व राज्य धार्मिक कृत्ये[१६] उत्तमरित्या पार पाडीत होते असे वर्णन आहे. या टिकाणी संबंधित राजाचे नाव स्पष्टपणे दिले नसल्यामुळे तो वाकाटक नृपति असेल असे खात्रीपूर्वक म्हणता येत नाही. हे केवळ अनुमान आहे. याशिवाय या घराण्यातील आठवा सभासद हस्तिभोज याचे पूर्वज हे केवळ ब्राह्मणीय गुणसंपत्ति किंवा ज्ञान यासाटी प्रसिद्ध होते. त्यांना वाकाटकांच्या वत्सगुल्म शाखेचा केवळ राजाश्रय लाभला असण्याचीही शक्यता आहे. प्रवरसेन प्रथम याने सुद्धा या घराण्यातील व्यक्तीला मंत्री पदावर किंवा सचिव पदावर नियुक्त केले होते असे दाखविणारा पुरावा उपलब्ध नाही.

यावरून असे दिसून येते की, वाकाटक हे मूळचे दक्षिण भारतीय[१७] होते असे सिद्ध करणारा स्पष्ट पुरावा सध्या उपलब्ध नाही. त्यामुळे कोरीव लेखांनी पुरविलेली माहिती पडताळून घेणे उचित टरते.

वायु, ब्रह्माण्ड, विष्णु आणि भागवत पुराणांची काही हस्तलिखिते साधारणपणे सातवाहनोत्तर काळात उदयाला आलेल्या विदिशा[१८] येथील राजांचे वर्णन करताना शुंग वंशाच्या शेवटी उदयाला आलेल्या शिशुनन्दिन व त्याचा भाऊ नन्दियशस यांचा उल्लेख करतात. पुढे असे म्हटले आहे की, नन्दियशसच्या घराण्यात शिशुकासह तीन राजांचा जन्म झाला. शिशुक हा नन्दियशसच्या मुलीचा (दौहित्र) मुलगा होता. तो पुरिका येथून राज्य करीत होता. येथे दुसरा उल्लेख विन्ध्यशक्तीचा मुलगा प्रवीर याचा आहे. या टिकाणी नन्दियशसच्या घराण्यात तीन राजे झाले या विधानानंतर लगेचच शिशुक, विन्ध्यशक्ति व प्रवीर यांच्या उल्लेखावरून प्रवीर व विन्ध्यशक्ति यांचा दुसऱ्या राजांशी काही संबंध होता असे सूचित करतात. पौराणिक वृत्तांतातील या विधानामुळे याबाबत निश्चितपणे काहीच सांगता येत नाही. काहीही असले तरी या टिकाणी असलेल्या वर्णनावरून विन्ध्यशक्ति व प्रवीर हे कोरीव लेखांद्वारे ज्ञात असलेले वाकाटक वंशाचे पहिले दोन राजे आहेत याबद्दल संशय रहात नाही. फरक एवढाच आहे की, येथे विन्ध्यशक्तिचा मुलगा प्रवरसेन प्रथम याचा उल्लेख प्रवीर असा केलेला आहे. प्रवीर याचे हे वैयक्तिक नाव असावे अथवा त्याने केलेल्या पराक्रमामुळे प्राप्त झालेला भूभाग व केलेले अनेक श्रौतयज्ञ यातून त्याने हे स्वतःला लावलेले किंवा त्याला दिलेले हे गुणविशेषण असावे.[१९] पार्जिटरच्या मते या व आधी दिलेल्या इतर राजांचा याटिकाणी उल्लेख करताना वापरलेल्या वैदेशि या शब्दाचा अर्थ विदिशेचा[२०] असा होतो. परंतु हे सर्व राजे विदिशा[२१] येथून किंवा विदिशावर राज्य करीत होते असे दिसत नाही. वास्तव या शब्दाचा अर्थ निरनिराळ्या प्रदेशाचे असा घेणे जास्त योग्य होईल. हाच त्याचा गृहीत अर्थ आहे हे नंतर वाकाटक राजा विन्ध्यशक्ति याचे विन्ध्यकाज म्हणजे विन्ध्य भागाचे[२२] अशा केलेल्या वर्णनावरून वाटते.

पुराणात सातवाहनांचे आन्ध्र किंवा आन्ध्रजातीय असे वर्णन आहे. त्यामुळे सातवाहनांच्या मूलस्थानाबद्दलही वाद निर्माण झाला होता. पुराणात केलेले वाकाटकांचे वर्णन व सातवाहनाचे वर्णन यामध्ये निकटचे साम्य आहे. याप्रमाणे वाकाटकांचे मूलस्थान विन्ध्य विभागात होते. तरीही साहित्यिक परंपरा व वर्तमान भूगोल तज्ज्ञ हे विन्ध्य तसेच जवळच असलेला ऋक्षवत पर्वत यांची स्थाननिश्चिती ठामपणे देऊ शकत नाहीत. विशाल अर्थाने उपयोग केल्यास विन्ध्य या नावाने साधारणपणे उत्तरप्रदेशातील मिर्झापूर शहरापासून ते गुजरातच्या बाजूस असलेल्या अरबी समुद्रापर्यंत पसरलेल्या पर्वत रांगांचा बोध होतो आणि त्यामध्ये कुलपर्वत म्हणून वर्णिलेल्या या दोन्ही पर्वतांचा अंतर्भाव होतो. परंतु या दोघांना एकमेकांपासून जेव्हा वेगळे संबोधले जाते तेव्हा या दोघांमधून नर्मदा नदी वाहते. या एका मुद्याबद्दलच फक्त मतैक्य होते. भारतीय विद्वानांमध्ये नर्मदा नदीच्या उत्तरेला व दक्षिणेला असलेल्या पर्वताच्या नामाभिधानाबद्दल प्राचीन परंपरांमध्ये मतभेद आहेत. काहींच्या मते मर्यादित अर्थाने ऋक्षवत व सातपुडा या नावांनी नर्मदा नदीच्या[२३] अनुक्रमे उत्तरेस व दक्षिणेस असलेल्या पर्वतांच्या रांगांचा बोध होतो. तरीही, हे मत मान्य करता येत नाही. कारण एक तर हे हरिवंशाचा मध्ययुगीन भाष्यकार नीलकंठ याच्या विधानावर व पुराणांतील भुवनकोश विभागातील विधानावर आधारित आहे आणि दुसरे म्हणजे हे मत बनवताना नर्मदा नदीच्या उत्तरेकडील पर्वताचे नाव विन्ध्य व तिच्या दक्षिणेकडील पर्वताचे नाव ऋक्षवत आहे हे ज्या महत्त्वाच्या मुद्यामुळे सिद्ध होऊ शकते, त्याकडे दुर्लक्ष झालेले आहे. प्राचीन साहित्यिक परंपरा व कोरीव लेखांतील परंपरा ही बाब स्पष्ट करतात. विन्ध्य हे नाव आता या अर्थानेच उपयोगात आणले जाते. ऋक्षवत हे नाव सामान्यतः सातपुडा म्हणून ख्यात असलेल्या पर्वताचे प्राचीन नाव आहे. सातपुडा हे नाव ऋक्षवत नावापासूनच निघालेले किंवा या नावाचे साधित रूप आहे. वासिष्ठीपुत्र पुळुमावि याच्या एकोणीसाव्या वर्षीच्या नाशिक शिलालेखामध्ये त्याचा पिता गौतमीपुत्र सातकर्णि याचे तो ज्याच पर्वतांचा स्वामी असल्याचे वर्णन आलेले आहे. त्या पर्वतांच्या नावाच्या सूचीमध्ये ऋक्षवत पर्वताचेही नाव आहे. या नावाचे या ठिकाणी "छवत"[२४] असे प्राकृत रूप दिलेले आहे. हे नाव ऋक्षवत या नावाचे सात असे रूपांतर होण्याच्या प्रक्रियेतील मधली अवस्था दर्शविते. हे रूपांतर होताना व या अक्षरातील उकार व "छ" या अक्षरातील अकार यांचा संयोग होऊन त्याचा आ होईल, मधल्या व चा लोप होईल व त्यामुळे स्वाभाविकपणेच छवत चे रूप छात असे होईल. दक्षिण भारतीय कोरीव लेख, नाणी व साहित्यिक पुराव्यांवरून असे दिसते की, दक्षिण भारतीय प्राकृत भाषेतील उष्मवर्ण व च आणि छ यांची अदलाबदल होते. याप्रमाणे छिमुक चे रूप सिमुक[२५] शान्तचे चान्त[२६] सातकर्णि चे चातकर्णि आणि वासिष्ठी चे वाचिट्टि अशी रूपे होतात. त्याचप्रमाणे छात चे "सात" असा बदल होऊ शकतो आणि अखेरचा "पुडा" हा शब्द नंतरच्या काळामध्ये पर्वताचे थर[२७] दर्शविण्यासाठी जोडला असावा. दुसरे असे की, बाणभट्टाच्या हर्षचरितामध्ये (उच्छ्वास ७ आणि ८) हर्षवर्धनाने राजश्रीचा शोध घेण्याच्या वर्णनात विन्ध्य पर्वत व विन्ध्यारण्याचा (विन्ध्य-आटवि) उल्लेख आहे.

हा उल्लेख नर्मदा नदीच्या दक्षिणेकडे असलेल्या पर्वत रांगांचा नाही. तिसरी गोष्ट अशी की, उत्तर भारतामध्ये विन्ध्य पर्वताबरोबर विन्ध्यासल, विन्ध्यवासिनी यासारखी बरीच नावे गुंफलेली आढळतात. परंतु नर्मदेच्या दक्षिणेस असे एकही नाव आढळत नाही. यावरून हे स्पष्ट होते की, नीलकंठाच्या अहेतुकपणे केलेल्या चुकीच्या विधानाच्या आधारे एच. सी. रायचौधरी व डी. सी. सरकार यांनी मांडलेला या पर्वताच्या स्थान निश्‍चिततीचा सिद्धात योग्य वाटत नाही. हा मुद्दा शेवटी शाकटायन[२८] च्या (२, २.७५) व्याकरणावरील उत्तरो विन्ध्यात पारियात्रा : या उदाहरणाने निकालात काढला. पारियात्र हा पर्वत विन्ध्यपर्वताच्या उत्तरेला आहे. विन्ध्य व पारियात्र या पर्वतांच्या मध्ये जर ऋक्षवत पर्वताचे स्थान निश्‍चित केले तर पारियात्र विन्ध्य पर्वताच्या उत्तरेला आहे या विधानाला काही अर्थ उरत नाही. प्रवीर किंवा प्रवरसेन प्रथम याच्या संबंधात पुराणातील पुनर्रचित श्लोक असा आहे.

**विन्ध्यशक्तिसुतश्चापि प्रवीरो नाम वीर्यवान ।**
**भोक्ष्यते च समाः षष्टिं पुरीं काञ्चनकां च वै ॥**[२९]

याचा अर्थ विन्ध्यशक्तीचा, प्रवीर नामक वीर पुत्र काञ्चनका नगरीवर ६० वर्षे राज्य करील असा होईल. हा अर्थ पार्जिटरच्या[३०] मताशी जुळतो. के. पी. जयस्वाल संबंधित ओळीचे वाचन 'पुरिकां चनकां च वै' असे करतात आणि प्रवीराने (म्हणजे प्रवसेन प्रथम) पुरिका व चनका[३१] ह्या दोन जुळ्या शहरांवर राज्य केले अशी दुरुस्ती सुचवितात. मिराशी यावर असे मत व्यक्त करतात की पार्जिटरच्या वाचनामुळे "च" हे निरर्थक टरेल व ते ओळीत केवळ श्लोक पूर्तीसाठी (पाद-पूरण)[३२] घातले आहे असे समजावे लागेल. या संदर्भात हे लक्षात ठेवणे आवश्यक आहे की, पार्जिटरने विचारात घेतलेल्या एकाही हस्तलिखितामध्ये पुरिकाचा या संदर्भात[३३] उल्लेख केलेला नाही आणि पुराणांतील मूळ लेखांच्या व्याकरणशुद्ध रचनेची एका मर्यादेपेक्षा जास्त अपेक्षा करणे योग्य नाही. कारण पुराणरचनाकारांनी हि, तु, च आणि वै यासारख्या शब्दांचा उपयोग श्लोकपुर्तीसाठी केला आहे. या शब्दांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करणे उपयुक्त टरत नाही. म्हणून प्रवरसेनने काञ्चनका येथून राज्य केले असे पार्जिटरचे वाचन जास्त योग्य वाटते. काञ्चनका ही प्रवरसेन प्रथम याची राजधानी होती हे स्पष्टच आहे.

जर याबाबतचे सुधारित वाचन स्वीकारावयाचे असेल तर प्रथम पुरिका व चनका यांची स्थाने निश्‍चित केली पाहिजेत. कारण वाकाटकांचे मूलस्थान निश्‍चित करण्याच्या प्रश्नाशी त्याचा अगदी निकटचा संबंध आहे. हरिवंशातील (विष्णुपर्वन ३८.२२) वर्णनाप्रमाणे पुरिका हे ऋक्षवत पर्वताच्या पायथ्याशी वसले होते. वर उल्लेखिल्याप्रमाणे ऋक्षवत हे नर्मदेच्या दक्षिणेला असलेल्या सातपुडा पर्वत रांगांचे प्राचीन नाव आहे. सातपुडा हे नाव ऋक्षवत या नावापासूनच निघालेले आहे. यामुळे पुरिका हे ठिकाण सातपुडा पर्वताच्या उतरणीवर असले पाहिजे आणि ते नर्मदा नदीच्या दक्षिण तीराच्या जवळपास शोधले पाहिजे. या ठिकाणी वराहमिहिराने बृहत्संहितेमध्ये पुरिका हे स्थान भारत वर्षाच्या[३४] दक्षिण-पूर्व भागात टेवले आहे आणि ते या वर्णनाशी जुळते हे नमूद करणे आवश्यक आहे.

वास्तविक आधी दाखविल्याप्रमाणे पुरिका शहराचा प्रत्यक्ष उल्लेख प्रवरसेन प्रथम याच्या संदर्भात केलेला नाही. पुरिकाचा अशा प्रकारे उल्लेख के. पी. जायस्वाल यांच्या पुराणातील उताऱ्यांमुळे आणि वा. वि. मिराशी यांनी याला दिलेल्या दुजोऱ्यातून व्यक्त झाला. या संदर्भात पुराणात फक्त काञ्चनका या गावाचाच उल्लेख आहे. या शहराचे (किंवा सुधारित वाचन मान्य केल्यास चनका) तादात्म्य मध्यप्रदेशातील[३५] बुंदेलखंड विभागात सतना जिल्ह्यातील नचना किंवा नचनेकी तलाई या नावाने ज्ञात असलेल्या खेड्याशी फार पूर्वीच केलेले आहे. हे तादात्म्य उपलब्ध असलेल्या इतर पुराव्याच्या आधारेही समाधानकारक आहे असे म्हणता येईल. या ठिकाणी गुप्त-वाकाटक काळातील असलेले मंदीर[३६] प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणे या ठिकाणी वाकाटकांचे दोन शिलालेखही[३७] प्राप्त झालेले आहेत. या प्रमाणे विन्ध्यप्रदेशातील बुंदेलखंड व बघेलखंड विभागाच्या बऱ्याच मोठ्या प्रदेशाचा अंतर्भाव प्रवरसेन प्रथम याच्या अमदानीत वाकाटक राज्यात होत होता आणि तो पुढे बऱ्याच काळापर्यंत त्यांच्या अंमलाखाली राहिला हे पुढे दाखविले आहे. प्रारंभी विन्ध्यविभाग वाकाटक राज्याच्या प्रमुख भाग होता हे इतर पुराव्यावरून स्पष्ट दिसते. या वंशाच्या संस्थापकाने धारण केलेलें विन्ध्यशक्ति हे नाव त्याने विन्ध्यविभागात राज्य स्थापन केले आणि विन्ध्य पर्वताला आपल्या शक्तीचा स्त्रोत मानले होते याचे निदर्शक आहे. त्याने बहुतेक काञ्चनका (किंवा चनका) ह्या शहराची स्थापना केली होती.

त्याचा पुत्र व वारस प्रवीर उर्फ प्रवरसेन प्रथम हा फार बलशाली होता. ज्याने वैदिक यज्ञ केले होते व त्यासाठी मोठा दानधर्म केलेला होता. तसेच सम्राट ही पदवी धारण केली होती. तो विन्ध्यविभागातील लहानशा राज्यावर संतुष्ट राहणे शक्य नव्हते. त्याने मोटमोठे विजय संपादन करून नवीन प्रदेश आपल्या राज्याला जोडले. दक्षिणेकडे विदर्भापर्यंत आपल्या राज्याचा विस्तार केला आणि पुराणांत वर्णिल्याप्रमाणे आपल्या चार पुत्रांमध्ये वाटून देण्याइतके पुरेसे मोठे राज्य निर्माण केले. जायस्वालने सुचवल्याप्रमाणे त्याच्या या राज्याची उत्तर भागात असलेली नचना (प्राचीन चनका) ही राजधानी बनविणे सोयीस्कर झाले नसते म्हणून प्रवरसेन प्रथम याने नर्मदा नदीच्या दक्षिणेला पुरिका येथे दुसरी राजधानी स्थापन केली असावी असे दिसते. वाकाटकांचा विन्ध्य पर्वताशी असलेला अतूट संबंध पुराणामध्ये या वंशाला प्रवरसेन प्रथम व त्याने चार पुत्र[३८] यांच्या वर्णनानंतर लगेचच दिलेल्या विन्ध्यक (विन्ध्यन) या नावामुळे सिद्ध होतो. या प्रमाणे असा निष्कर्ष काढता येतो की, वाकाटकांचे मूलस्थान वर्तमान मध्यप्रदेशातील विन्ध्यविभागात होते आणि ते वाकाटकांच्या बऱ्याच पिढ्यापर्यंत तेथेच राहिले.

पुराणांमध्ये या वंशाला विन्ध्यक असे म्हटले आहे. परंतु कोरीव लेखांमध्ये या वंशाचा उल्लेख फक्त वाकाटक असाच येतो. काही अंशी असाच प्रकार सातवाहन वंशाच्या बाबतीतही दिसून येतो. सातवाहनांप्रमाणे वाकाटक हे वंश किंवा घराण्याचे

नाव होते. अन्ध्र किंवा अन्ध्रजातीयप्रमाणे विन्ध्यक हे नाव त्याच्या राजकीय सत्तेचे मूळ केंन्द्र असलेल्या प्रदेशाचा निर्देश करते. सातवाहन प्रमाणे वाकाटक हे नावही याठिकाणी ज्याने आपले नाव आपल्या वंशाला दिले, त्याचा (जरी असे खात्रीपूर्वक म्हणता येत नसले तरी) अप्रत्यक्ष निर्देश करते. विन्ध्यशक्ति हे या वंशाच्या पहिल्या राजाचे उपनाव किंवा पदवी असावी. वाकाटक हे त्याचे वैयक्तिक नाव असावे असे खात्रीपूर्वक म्हणता येत नसले तरी तशी शक्यता नाकारता येत नाही किंवा असेही म्हणता येईल की, हे वंशनाम वाकाटकांचा घनिष्ट संबंध असलेल्या प्रदेशाच्या नावापासून प्राप्त झाले असावे. या दृष्टीने जायस्वाल उत्तरप्रदेशात झांशी जिल्ह्यातील चिरगांवच्या पूर्वेस पूर्वीच्या ओरछा संस्थानात अति उत्तरेकडच्या भागात असलेल्या वर्तमान बागट या नावाच्या खेड्याकडे आपले लक्ष वेधतात. त्यांच्या मते या वंशाला हे नाव या गावाच्या नावामुळे प्राप्त झाले असावे. त्यांना असेही वाटते की, विन्ध्यशक्तीने स्वतः या शहराचे नाव त्याच्या वंशाची[३९] पदवी म्हणून स्वीकारले असावे. परंतु या दोन नामांमधील साम्य हा निव्वळ योगायोग असण्याचीही शक्यता नाकारता येत नाही. शिवाय या प्रदेशाचे नाव या वंशाला प्राप्त होण्यापेक्षा या प्रदेशालाच वाकाटकांचे नाव प्राप्त झाले असावे. अशी काही नावे विदर्भामध्येही आहेत. एस. व्ही. सोहनी असे सुचवितात की, वाकाटकांच्या लेखातील "वाकाटकनाम" या शब्दसमुहाचे भाषांतर वाकाटक लोकांचा[६०] असे करण्याऐवजी वाकाटक प्रदेशाचा असे करावे. हे वंशनाव कशाही प्रकारे प्राप्त झाले असले तरी वाकाटक लेखात वाकाटकनाम या नावाचा उपयोग वंशाच्या संदर्भातच केला आहे. "वाकाटकनाम" हा शब्दसमूह "वाकाटकांचे" या अर्थानेच घ्यावा लागेल, वाकाटक प्रदेशाची या अर्थाने नक्कीच घेता येणार नाही, कारण या शब्दाचा येथे अनेक वचनी उपयोग केलेला आहे. जर हा शब्द प्रदेशाच्या निर्देशासाठी वापरला असता तर तो एकवचनी असता, किंवा त्यासाठी वाकाटकः राज्यस्य इत्यादीसारखे शब्दप्रयोग आले असते. वाकाटक लेखांमध्ये आलेल्या या शब्दसमुहाची पल्लव, कदंब आणि शेवटचा सातवाहन राजा पुलुमावि यांच्या लेखांमध्ये मिळणाऱ्या अशाच प्रकारच्या आणि याच अर्थाने वापरलेल्या शब्दसमूहाशी तुलना करता येईल. वाकाटक या शब्दला राजवंशीय हा गर्भित अर्थ जरी प्रथमच पृथ्वीषेण प्रथम याच्या अमदानीतील नचना व गंज येथील कोरीव लेखांमध्ये व विन्ध्यशक्ति दुसरा याच्या वाशीम लेखामध्ये आला असला तरी तो विन्ध्यशक्तीनंतर काही दिवसांतच प्राप्त झाला असावा. नुकत्याच प्राप्त झालेल्या देवसेनाच्या[६१] बीदर ताम्रपटात व वत्सगुल्म शाखेच्या हरिषेण याच्या थाळनेर[६२] ताम्रपटात हा शब्द प्रत्यक्ष विन्ध्यशक्ति प्रथम यांच्या संबंधातच वापरला आहे. त्यामुळे प्रथमदर्शनी असे वाटते की या वंशातील पहिल्याच व्यक्तीने स्वतःला वाकाटकांचा राजा असे म्हणवून घेतले होते. हे लेख या शब्दाला राजवंशीय हा अर्थ पूर्णपणे प्राप्त झाल्यानंतर बऱ्याच नंतरच्या काळातील आहेत. ज्या काळात हे लेख दिले गेले त्या काळातील स्थिती प्रतिबिंबीत करतात.

वाकाटक हे विष्णुवृद्ध गोत्री[६३] ब्राह्मण होते आणि वैदिक यज्ञ व विविध पौराणिक धर्मकृत्ये करून त्यांनी वैदिक-पौराणिक धर्माचे पालन केले. ज्या वाकाटक नृपतीची आपल्याला समर्पक अशी माहिती उपलब्ध आहे ते बहुतेक राजे एकनिष्ठ शिवभक्त होते आणि नंदिवर्धन शाखेचे फक्त दोनच राजे वैष्णव होते. याचे काही सेवक व मंत्र्यांसह काही अधिकारी हे महायान बौद्धधर्मीय होते आणि त्यांनी त्यांच्या मालकाच्या प्रोत्साहनाने अजंटा व घटोत्कच लेण्यांतील बौद्ध संस्थांना उदार आश्रय दिला होता.

## कालक्रम

काही विद्वानांच्या मते वाकाटकांनी एखाद्या संवताची स्थापना केली असावी. के. पी. जायस्वाल यांनी यापूर्वी असे सुचविले आहे की, इ. स. २४८-४९ मध्ये सुरू होणाऱ्या कलचुरि-चेदि संवताची स्थापना विन्ध्यशक्ति प्रथम[६४] याने केली होती. परंतु वाकाटकांचे असंख्य लेख राजांच्या वैयक्तिक राज्य वर्षी दिलेले आहेत. त्यामध्ये कोणत्याही संवताचा उपयोग केलेला नाही. त्यामुळे हे मत योग्य नाही. बी. एन. मुखर्जी यांनी असे सुचविले आहे की, वत्सगुल्म शाखेचा पांचवा राजा देवसेन याच्या शक ३८० च्या[६५] हिस्सेबोराळा लेखावरून असे दिसते की, शक ३८० पूर्वी (इ. स. ४५७-४५८) २२० वर्षे वाकाटक वंशाची स्थापना झाली. तेव्हा त्यांनी या वर्षापासून कालगणना करण्याच्या पद्धतीचा खाजगीरित्या अवलंब केला होता. परंतु पूर्वीच्या इतर वाकाटक लेखांमध्ये अशा प्रकारच्या कालगणना पद्धतीचे अस्तित्व दिसत नाही या मताप्रमाणेच हे मत स्वीकारार्ह नाही. शिवाय या लेखातील संबंधित भागाचे वाचन अतिशय अनिश्चित[६६] आहे.

असे असले तरी पण वाकाटकांचा कालक्रम साधारणपणे निश्चित करता येईल असा साधारण पुरावा उपलब्ध आहे. पुराण ग्रंथामध्ये या वंशाचा संस्थापक विन्ध्यशक्ति याचा राजा म्हणून इ. स. च्या तिसऱ्या शतकात उदय झाला असा उल्लेख आहे. परंतु पुराणांतील कालगंणनाविषयक माहिती ही अतिशय अनिश्चित व वादग्रस्त आहे. वाकाटकांचा साधारण कालक्रम निश्चित करण्याचा मुख्य आधार म्हणजे चंद्रगुप्त द्वितीय विक्रमादित्य (राज्यारोहण इ. स. ३७६) याची कन्या प्रभावती-गुप्ता हिचा वाकाटक राजा रूद्रसेन दुसरा याच्याबरोबर झालेला विवाह हा होय. या पुराव्यावरून असे दिसते की, रुद्रसेन प्रथम याचे पूर्वज चंद्रगुप्त दुसरा याच्या पूर्वीच्या काळात उदयास आले. या विधानाला वाकाटक वंशाच्या नन्दिवर्धन शाखेच्या बऱ्याच ताम्रपट सनदांमधील "या राजघराण्याचा विन्ध्यशक्तीपासून पांचवा राजा पृथिवीषेण प्रथम गादीवर आला त्याच्या आधी शंभर वर्षे वाकाटक खजिना व बळ वाढत होते" या माहितीमुळे दुजोरा मिळतो. या माहितीनुसार विन्ध्यशक्ति प्रथम याने पृथिवीषेण प्रथम याच्या राज्यारोहणाच्या १०० वर्षे पूर्वी वाकाटक राज्यसत्ता स्थापन केली होती असे दिसते. कालक्रमाविषयी याहीपेक्षा जास्त असंदिग्ध माहिती

वाकाटक वंशांचा संस्थापक विंध्यशक्ति प्रथम याच्यापासून सातवा व वत्सगुल्म शाखेचा पाचवा राजा देवसेन याच्या हिस्सेबोराळा शिलालेखातून मिळते. चांगल्या ज्ञात असलेल्या कालगणना पद्धतीनुसार तिथी असलेला हा एकच लेख आहे व या लेखात असे नमूद केले आहे की, राजाचा अधिकारी स्वामिल्लदेव याने शक ३८० (इ. स. ४५७-५८) मध्ये सुदर्शन नामक सरोवराचे खोदकाम केले. दुर्दैवाने या लेखात या तिथीस जुळणाऱ्या राज्यवर्षाचा उल्लेख नाही.[४७] परंतु यावरूनही विन्ध्यशक्ति प्रथम हा ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकाच्या[४८] मध्यकालात उदयास आला असावा असाच साधारणपणे निष्कर्ष निघतो.

वाकाटक सत्तेच्या अस्तासंबंधी निश्चितपणे सांगता येते. विष्णुकुंडिन राजा विक्रमेंद्रवर्मन प्रथम याने आपल्या जन्मामुळे विष्णुकुंडिन व वाकाटक[४९] या दोन्ही घराण्यांना भूषविले. विष्णुकुंडिन वंशाचा शेवटचा ज्ञात राजा विक्रमेंद्रवर्मन दुसरा याच्या शक ४८८ म्हणजेच इ. स. ५६६-६७[५०] च्या तुम्मलगुडे या त्याच्या अकराव्या शासनवर्षी दिलेल्या ताम्रपटावरून असे दिसते की, त्याने कमीत कमी २७ वर्षे राज्य केले. परिणामतः त्याचे राज्यारोहण इ. स. ५२८-२९ नंतर झाले असणे शक्य नाही. आतापर्यंत त्याचा पिता विक्रमेंद्रवर्मन प्रथम याचा एकही लेख प्राप्त झालेला नाही. परंतु त्याने धारण केलेल्या राजन आणि महाराज या राजसत्तानिदर्शक पदव्यांवरून तो राज्यावर आला होता हे निश्चित आहे. त्याला जर दहा वर्षाचा छोटासा शासनकाल दिला तर तो इ. स. ५१८-१९ नंतर राज्यावर येणे शक्य नाही आणि त्याचा पिता माधववर्मन दुसरा जनाश्रय, ज्याने ४० ते ४८ वर्षे[५१] असे दीर्घकाळ राज्य केले, तो इ. स. ४७८-७९ नंतर सत्तेवर येणे शक्य नाही. इ. स. ५१८-१९ मध्ये त्याची सत्ता संपुष्टात आली असावी. तो फार बलशाली नृपती होता आणि त्याच्या पोलमुरू ताम्रपटानुसार त्याने रेवा किंवा नर्मदा नदीपर्यंतचा प्रदेश जिंकला होता. अशी धारणा आहे आणि ती कदाचित खरीही असेल की, तो स्वतःला वाकाटकांचा न्याय्य उत्तराधिकारी समजत होता. बहुतेक त्याने महाराष्ट्राचा बराच मोठा प्रदेश आपल्या सत्तेखाली आणला होता. या प्रमाणे वाकाटक सत्तेचा अस्त कदाचित इ. स. ५००[५२] च्या फार नंतर ठेवता येणार नाही.

तात्पर्य असे की, वाकाटक राजसत्तेचा कालखंड इ. स. च्या तिसऱ्या शतकाचा मध्य ते इ. स. ५०० चा शेवट यामध्ये ठेवावा लागेल.

## ऐतिहासिक रुपरेषा

वर दिलेल्या पार्श्वभूमीवर विन्ध्यक वाकाटकांच्या कारकिर्दीचा पुढीलप्रमाणे आढावा घेता येईल.

**विन्ध्यशक्ति :** अ. स. आळतेकर यांचे मत आहे की, विन्ध्यशक्तीचा कोणत्याही धार्मिक पद्धतीनुसार राज्याभिषेक झाला नव्हता त्यामुळे तो अभिषिक्त राजा नव्हता तर केवळ सामंत होता. आळतेकरांचे हे मत हरिषेणाच्या अजंठा शिलालेखामध्ये

त्याच्या नावामागे राजसत्ता निदर्शक पदवी नाही[५३] या माहितीवर आधारित आहे. आतापर्यंत त्याच्यासंबंधी माहिती पुरविणारा हा एकच लेख उपलब्ध होता. हा लेख अतिशय खराब अवस्थेत आहे. याशिवाय याची रचना पद्यात्मक आहे आणि इतर राजांच्या नावामागे कोणत्याही पदवीचा उल्लेख यामध्ये आलेला नाही. परंतु नुकत्याच प्राप्त झालेल्या देवसेना[५४] च्या बीदर ताम्रपटात आणि त्याचा पुत्र व वारस हरिषेण[५५] याच्या थाळनेर ताम्रपटात विन्ध्यशक्तीला वाकाटकांचा पहिला (आदि) धर्ममहाराज म्हटले आहे. (वाकाटकानाम = आदिर = धर्म महाराज) यावरून तो अभिषिक्त (Cornated) राजा होता व त्याने राजसत्ता निदर्शक पदव्याही धारण केल्या होत्या याबद्दल शंका राहत नाही. अजंटा शिलालेखामध्ये त्याच्या सैनिकी यशाचे अगदी स्पष्ट पण अनुषंगिक रीतीने वर्णन दिलेले आहे. त्याने मोठमोठ्या युद्धांमध्ये जय मिळवून आपले सामर्थ्य वाढविले होते (महाविमर्देष्व-अभिवृद्ध-शक्तिः), संतापला तर देवानासुद्धा त्याला आवरणे शक्य नव्हते (कृद्धस-सुरैर-अध्य-अनिवार्य-वीर्यः), युद्धामध्ये त्याच्या घोड्याच्या खुरांमुळे उधळलेल्या धुळीच्या लोटांनी सूर्यही झाकोळला जातो (रणेषु हर्य-उद्धव, रेणू-जाल-सछादित-आर्क्कः), त्याने आपल्या बाहू सामर्थ्याने सर्व जगावर विजय मिळविला (स्व-बाहु-वीर्य-आर्जित-सर्व लोकः), त्याच्या ऐश्वर्याची तुलना पुरंदर व उपेंद्र यांचेशी करता येईल (पुरन्दर-ओपेन्द्र-सम-प्रभावः), त्याने शत्रुचा नाश केला होता (विनिवारित-आरिः).[५६] असे त्याचे लेखामध्ये वर्णन दिले आहे. परंतु ही सर्व स्तुती संदिग्ध आणि दुर्दैवाने त्याने पराभूत केलेल्या शत्रुची माहिती देणारा काहीही पुरावा नाही. परंतु यावरून असे दिसते की, राज्य निर्माण करणे व त्याचा विस्तार करण्यासाठी सतत सैनिकी कारवायांमध्ये तो व्यस्त होता. या दृष्टीने विचार करता राज्य निर्माण करण्याकरिता[५७] त्याला सैनिकी सामर्थ्यापेक्षा व्यवहार चातुर्याचा जास्त उपयोग झाला हे आळतेकरांचे मत संपूर्ण सत्य मानता येत नाही. व्यवहार चातुर्य व सैनिकी सामर्थ्य हे परस्परांना पूरक होते असे दिसते. मिराशी व अळतेकर यांच्या मताप्रमाणे वाकाटक दक्षिण भारतीय होते. म्हणून ते असे प्रतिपादन करतात की, त्याच्या सैनिकी मोहिमांमुळे वाकाटकांच्या राज्याचा उत्तरेकडे विस्तार झाला. आळतेकर म्हणतात की, या विजयी स्वाऱ्यांमुळे त्याला विन्ध्य विभागातील काही प्रदेशावर सत्ता स्थापन करता आली. वऱ्हाडपासून प्रारंभ करून त्याने बैतूल, इटारसी आणि होशंगाबाद हे मध्यप्रदेशातील[५८] जिल्हे जिंकले व आपल्या राज्याला जोडले. मिराशींच्या मते जरी विन्ध्यशक्तीने आपल्या राज्याचा विस्तार उत्तरेकडे केला असला तरी त्याने चनका या ठिकाणाहूनच राज्य केले असावे. हे चनका शहर त्यांच्या मते मध्य प्रदेशात[५९] असावे. तथापि पूर्वी उल्लेखिल्याप्रमाणे त्याचे मूळ राज्य विन्ध्य प्रदेशात होते व त्याने दक्षिणेकडे आपल्या राज्याचा विस्तार केला होता. परंतु माहितीच्या अभावी त्यांचे मूलस्थान निश्चित सांगता येत नाही. त्याने दक्षिणेकडे राज्यविस्तार केला हे निश्चित, कारण त्याचा पुत्र प्रवरसेन प्रथम याच्या वेळेपर्यंत वाकाटक राज्यविस्तार विदर्भापर्यंत झाला होता.

ख्रिस्तोत्तर तिसऱ्या शतकाच्या मध्यकाळात मध्य भारत व गंगा-यमुना दोआब या प्रदेशांमध्ये तीन राजसत्तांचा उदय झाला. यापैकी अलाहाबाद, अयोध्या प्रदेशावर गुप्त वंशाचे राज्य होते, तर मथुरा, ग्वाल्हेर, विदिशा विभाग नाग वंशाच्या सत्तेखाली आणि बुंदेलखंड (बघेलखंड) प्रदेश समकालीन वाकाटक राजवंशाच्या अधिपत्याखाली होता. त्याच्या दीर्घ अमदानीच्या कालखंडात या सर्व वंशांचे एकमेकांशी संबंध आले. वर उल्लेखिलेल्या अजंटा शिलालेखामध्ये[६०] विन्ध्यशक्तीचे ब्राह्मण म्हणून वर्णन असून त्याने काही धार्मिक कृत्ये केल्याचाही उल्लेख आहे. काही पुराणांमध्ये विन्ध्यशक्तीच्या[६१] संबंधात ९६ वर्षाचा उल्लेख आहे. हा उल्लेख जर बरोबर असेल तर त्यावरून त्याच्या दीर्घायुष्याचा बोध होतो. त्याने इ. स. २५०-२७५ या कालखंडात राज्य केले असावे. तो महत्त्वाकांक्षी राजा होता. त्याने वाकाटक सत्तेची बळकट पायावर प्रतिष्ठापना केली आणि त्याच्या समर्थ वारसांनी त्या सत्तेचे साम्राज्यात रुपांतर केले.

**प्रवीर उर्फ प्रवरसेन प्रथम :** विन्ध्यशक्तीनंतर त्याचा पुत्र प्रवीर उर्फ प्रवरसेन प्रथम हा गादीवर आला. पुराणांत त्याचा उल्लेख प्रवीर म्हणून तर इ. स. २७५ च्या कोरीव लेखांमध्ये प्रवरसेन म्हणून उल्लेख आहे. पुराणांमध्ये[६२] वर्णिल्याप्रमाणे त्याने ६० वर्षे राज्य केले. त्याच्या महत्त्वपूर्ण कारकिर्दीचा शेवट इ. स. ३३५ च्या सुमारास झाला. तो फार महत्त्वाकांक्षी होता. साम्राज्यविस्तार करण्यासाठी आवश्यक असलेले सामर्थ्यही त्याच्याकडे होते. परंतु उत्तरेकडे गुप्त व नाग वंशाच्या उदयामुळे त्याच्या साम्राज्य विस्ताराला वाव नव्हता. परिणामतः त्याला सातवाहन शाखेचे राज्य असलेल्या विदर्भाकडे वळावे लागले. या सातवाहन शाखेचे एक सातकर्णि, कुंभ सातकर्णि व कर्ण (किंवा कृष्ण) सातकर्णि हे तीन राजे फक्त तऱ्हाळा (अकोला जिल्हा) नाणे- संचयानुसार ज्ञात आहेत. त्यांनी सुमारे इ. स. ३०० पर्यंत[६३] राज्य केले. खात्रीलायक पुराव्यांच्या अभावी प्रवरसेनाने इ. स. तिसऱ्या शतकाच्या शेवटी कोणत्या सातवाहन राजाचा पराभव केला हे सांगता येत नाही. परंतु वाकाटक आणि विदर्भ प्रदेश या दोहोंच्याही दृष्टीने ही फार महत्त्वपूर्ण घटना होती. कारण यावेळेपासून वाकाटक व विदर्भ यांचे एकमेकांबरोबर अतूट संबंध राहिले आहेत. जरी आपल्याला अद्यापपर्यंत त्याने आणखी काही प्रदेशांवर आपली सत्ता स्थापन केली होती किंवा नाही याबद्दल माहिती उपलब्ध नसली तरी त्याने आणखी काही प्रदेश आपल्या प्रभावाखाली आणून आपल्या राज्याला जोडले असावेत. प्रारंभीच्या इतिहासकारांनी काही तर्क केले आहेत. अळतेकर यांच्या मते वाकाटक सत्तेच्या अस्तापर्यंत जे प्रदेश त्यांच्या सत्तेखाली होते ते सर्व प्रवरसेन प्रथम याने वाकाटक राज्याला जोडले होते. नंतरच्या इतर काही राजानी राज्याला काही प्रदेश जोडल्याबद्दलचा पुरावा उपलब्ध नाही. श्री शैल-स्थल-माहात्म्या मधील परंपरेनुसार चंद्रगुप्ताच्या चंद्रावती नामक कन्येने श्री शैल येथील भगवान मल्लिकार्जूनाला रोज जुईच्या फुलांची माला वाहिली. आळतेकर या चंद्रावतीचे तादात्म्य प्रभावतीगुप्ताशी करतात आणि त्याच्या आधारे त्यांनी असा निष्कर्ष काढला आहे की, या तीर्थाचा

(श्री शैल) अंतर्भाव वाकाटक राज्यात होत होता. कर्नुल जिल्ह्यापर्यंतचा प्रदेश वाकाटकांच्या प्रत्यक्ष शासनाखाली[६४] नव्हता, परंतु प्रभावाखाली होता. पण या पुराव्याला जेवढे खात्रीलायक समजले जाते तेवढा तो खात्रीलायक नाही. याचे प्रमुख कारण असे आहे की, शैल मल्लिकार्जून येथील प्रतिमा शिवाची आहे आणि प्रभावती गुप्ता ही गुप्त नृपतींप्रमाणेच कट्टर वैष्णव होती. प्रवरसेन प्रथम याच्या पश्चिमेकडील राज्यविस्ताराच्या संबंधाने असलेल्या त्यांच्या मताबद्दलही असेच म्हणावे लागेल. प्रवरसेन प्रथम याने पश्चिमी क्षत्रपांच्या कारभारात हस्तक्षेप केल्यामुळे भर्तृदामनच्या नंतर चष्टन वंशाचा अस्त झाला. तसेच स्वामी जीवदामन याचा पुत्र रुद्रसिंह दुसरा याचे झालेले सिंहासनारोहण आणि तो व त्याचा पुत्र व वारस यशोदामन दुसरा यांनी राजसत्तानिदर्शक महाक्षत्रप ही पदवी धारण न करणे या गोष्टी घडून आल्या. असा एक मतप्रवाह आहे की, प्रवरसेन प्रथम याने रुद्रसिंह दुसरा याला वाकाटकांचे सार्वभौमत्व मान्य करावे या अटीवर त्यावेळी राज्य करीत असलेल्या भर्तृदामन विरुद्ध उठविले आणि याच कारणामुळे रुद्रसिंह दुसरा व त्याचा पुत्र यशोदामन दुसरा यांनी राज सत्तानिदर्शक महाक्षत्रप पदवी धारण केली नसावी. मध्यप्रदेशातील छिंदवाडा जिल्ह्यात सोनपूर येथे मिळालेली त्यांची नाणी समाविष्ट असलेल्या नाणेसंचयावरून असे दिसते की, ते वाकाटकांना खंडणीही देत असावेत.[६५] परंतु हा सिद्धांत पूर्वीच्या सिद्धान्ताप्रमाणेच स्वीकारार्ह नाही. भर्तृदामन याच्यानंतर चष्टन वंशाला मुलगा नसल्यामुळे या वंशाचा अस्त झाला. रुद्रसिंह दुसरा याच्या प्राप्त झालेल्या नाण्यांवरून असे दिसते की, नाणे पाडण्याची व त्यावर नावे देण्याची पद्धत अव्याहत चालूच होती. महाक्षत्रप पदवी धारण न करण्यामागे बहुतेक ससानियन लोकांचे आक्रमण असावे. कारण या सुमारास ससानियनांनी सिंध प्रांत हस्तगत केला होता आणि त्यांनी या दोन क्षत्रपांना महाक्षत्रप ही श्रेष्ठ पदवी[६६] धारण करण्यास हरकत घेतली असावी. प्रवरसेन प्रथम याने निर्माण केलेले राज्य दक्षिणेत[६७] तुंगभद्रा नदीपर्यंत पसरले होते हा मिराशींचा मुद्दा पूर्णपणे मान्य करता येत नाही. प्रवरसेन प्रथम याच्या साम्राज्याच्या बाबतीत अतिशयोक्तिपूर्ण विधान जायस्वाल यांनी केले आहे. त्यांचा असा विश्वास आहे की, त्याच्या साम्राज्याचे स्वरूप अखिल भारतीय (Pan Indian) असे होते. त्याने कुषाणांना पंजाबातून अफगाणिस्थानापर्यंत हुसकावून लावले. पल्लव ही पल्लवाची शाखा होती. परंतु याविषयी स्पष्ट पुरावा उपलब्ध नाही. वर नमूद केल्याप्रमाणे विन्ध्यशक्तीच्या साम्राज्यात नर्मदा नदीच्या उत्तरेला असलेल्या विन्ध्य विभागाचा अंतर्भाव होत होता, परंतु इतर प्रदेशाच्या समावेशाबद्दल पुरावा उपलब्ध नाही. त्याचा पुत्र प्रवरसेन प्रथम याने साम्राज्याच्या दक्षिणेकडे विस्तार केला. विदर्भ आणि दक्षिण भारतातील त्याला लागून असलेला प्रदेशही त्याने बहुतेक ताब्यात घेतला असावा. त्याच्या मुलांनी त्याच्या अधिपत्याखाली थोडे फार विजय प्राप्त केले असण्याची शक्यता आहे. शिवाय मध्यप्रदेशातील लागून असलेला दक्षिण कोसल किंवा छत्तीसगड प्रदेशही त्याच्या प्रभावाखाली आला असावा, परंतु आजपावतो त्यावर त्याची सत्ता होती.[६८] असा पुरावा उपलब्ध नाही. तरी सुद्धा आपण असे खात्रीपूर्वक

म्हणू शकतो की, त्याच्या अमदानीत वाकाटक साम्राज्यात मध्यप्रदेशाच्या बुंदेलखंड (बघेलखंड) या विभागापासून महाराष्ट्रातील विदर्भापर्यंतच्या प्रदेशाचा समावेश होत होता. पुराणांनुसार त्याची राजधानी मध्यप्रदेशाच्या सतना जिल्ह्यातील नचना गावाशी तादात्म्य केलेल्या कांचनका या शहरी होती. जायस्वालांनी सुचविले सुधारित वाचन मान्य करावयाचे असेल, तर त्याने नर्मदा नदीच्या दक्षिण तीरावर सातपुडा किंवा ऋक्षवत पर्वताच्या उतरणीवर पुरिका येथे दुसरी राजधानी स्थापन केली असावी असे म्हणावे लागेल. परंतु या स्थानाची अजून समाधानकारकरित्या निश्चिती करता आलेली नाही.

प्रवरसेन प्रथम याने मध्यभारतात अतिशय बलशाली असलेल्या भारशिव नाग घराण्याबरोबर वैवाहिक संबंध स्थापन केले होते. त्यामुळे वाकाटक साम्राज्याला सामर्थ्य व महत्त्व प्राप्त झाले असावे. नन्दिवर्धन शाखेच्या सर्व लेखांमध्ये यासंबंधीचा उल्लेख केलेला आहे. त्याचा पुत्र गौतमीपुत्र याचा विवाह नाग नृपती भवनाग याच्या कन्येबरोबर झाला होता. या भवनागने आपल्या खांद्यावर शिवलिंग धारण केल्यामुळे संतुष्ट होऊन भगवान शंकराने भारशिव हा वंश उत्पन्न केला होता. भारशिवांनी स्वसामर्थ्याने प्राप्त केलेल्या भागीरथीच्या जलाने स्वतःस मूर्धाभिषेक करवून घेतला होता आणि दहा अश्वमेध यज्ञ[६९] केल्यानंतर पवित्र स्नान केले होते. वाकाटकांचे सामर्थ्य वाढविण्याच्या दृष्टीने हा विवाहसंबंध फारच महत्त्वपूर्ण ठरला. त्यांच्या गुप्त राजवंशाबरोबर अशाच प्रकारच्या असलेल्या संबंधामुळे नन्दिवर्धन शाखेच्या सर्व कोरीव लेखांमध्ये त्याचा अभिमानाने उल्लेख केलेला आहे.

सामर्थ्य, सत्ता व श्रद्धा याने युक्त असलेल्या प्रवरसेन प्रथम याने असंख्य श्रौत यज्ञ केले. या यज्ञांची वर्णने वाकाटकांचे कोरीव लेख व पुराणे या दोन्हींमध्येही मिळतात. पुराणांमधील नोंदीप्रमाणे त्याने असंख्य वाजपेय किंवा वाजिमेध केले व विपुल दानेही[७०] दिली. कोरीव लेखांवरून असे दिसते की, त्याने अग्निष्टोम, आपतोर्याम, उक्थ्य, षोडशीन, अतिरात्र, वाजपेय, तसेच बृहस्पतिसव, साद्यस्क्र आणि चार अश्वमेध[७१] हे सर्व यज्ञ (सप्त-सोम संस्था) केले. यापैकी बृहस्पतिसव हा यज्ञ फक्त ब्राह्मणच[७२] करू शकतात. चार अश्वमेध हे विन्ध्यशक्तीने पेरलेल्या बीजाला अंकुर येऊन त्याचे विशाल व सामर्थ्यशाली साम्राज्यवृक्षात रुपांतर करणाऱ्या विजयी मोहिमाच्या आनंदाप्रीत्यर्थ केले होते हे स्पष्टच आहे. हे याग केल्यानंतर, विशेषतः वाजपेय याग केल्यानंतर त्याने राजसत्ता निदर्शक ''सम्राट'' ही पदवी धारण केली. ही पदवी वाकाटक[७३] नृपतींमध्ये फक्त त्याच्याचसाठी वापरली आहे आणि नंतरच्या राजांपैकी फक्त यशोधर्मन उर्फ विष्णुवर्धन[७४] यानेच ही पदवी धारण केलेली आहे.

वत्सगुल्म शाखेच्या काही कोरीव लेखांमध्ये प्रवरसेनाचे वर्णन ''धर्ममहाराज'' असे केले आहे. परंतु या पदवीचा उपयोग येथे दक्षिण भारतीय परंपरेच्या प्रभावामुळे केला असावा. त्याने प्रत्यक्षात ही पदवी धारण केली होती असे दाखविणारा पुरावा उपलब्ध नाही.

प्रवरसेनाने आपल्या यशाने किर्ती प्राप्त केली होती. वाकाटकांचे तीन कोरीव लेख[७५] सोडून बाकीच्या सर्व लेखांमध्ये वाकाटक वंशावळ त्याच्यापासून प्रारंभ होते. त्याने जिंकलेल्या प्रदेशांचे एकत्रीकरण करून वाकाटक साम्राज्य सत्तेला उत्तरेतील गुप्त साम्राज्य सत्तेच्या तोडीचा दर्जा किंवा स्थान प्राप्त करून दिले. या वाकाटक साम्राज्याची, यशस्वी वाटचाल त्याच्या सत्तेच्या ऱ्हासाला प्रारंभ होण्यापूर्वी दीडशे वर्षापर्यंत निर्वेधपणे चालू होती. पुराणांतील वर्णनाप्रमाणे प्रवीर = प्रवरसेन प्रथम याला चार पुत्र होते व ते सर्व राजे[७६] झाले. त्याच्या एका पुत्राचे नाव गौतमीपुत्र[७७] होते. तसेच विन्ध्यशक्ति प्रथम याच्या वाशीम ताम्रपटाद्वारे प्रवरसेनाचा पुत्र व वत्सगुल्म शाखेचा संस्थापक सर्वसेन[७८] याची नोंद आहे. त्यामुळे पुराणातील माहितीमध्ये काही सत्यांश आहे हे मान्य करावे लागेल. वाकाटकांच्या नन्दिवर्धन व वत्सगुल्म[७९] या फक्त दोन शाखा ज्ञात आहेत. बाकीच्या दोन शाखांबद्दल अजून काही माहिती उपलब्ध नाही. ही दोन राज्ये[८०] शोधून काढण्याच्या दृष्टीने काही प्रयत्न केले आहेत. तथापि राज्यांच्या स्थाननिश्चितीसाठी भविष्यात खात्रीलायक संशोधन होणे आवश्यक आहे.

प्रवरसेन प्रथम याने आपले राज्य आपल्या हयातीतच तीन मुलांमध्ये वाटून दिले असावे आणि त्याच्या मुलांपैकी गौतमीपुत्र हा अल्पवयीन असल्यामुळे त्याने राज्याचा काही भाग स्वतःकडे ठेवला असावा. गौतमीपुत्र आणि त्याचे वंशज हे वाकाटकांच्या मुख्य किंवा ज्येष्ठ शाखेचे प्रतिनिधित्व करतात असा जो ग्रह सध्या प्रचलित आहे त्याच्या समर्थनार्थ पुरावा उपलब्ध झाला नाही. त्यामुळे या परिस्थितीत ज्ञात असलेल्या दोन वाकाटक शाखांचा उल्लेख त्यांच्या राजधानीच्या ठिकाणांच्या नावाने म्हणजे पद्मपूर-नन्दिवर्धन-प्रवरपूर शाखा व वत्सगुल्म शाखा असा करणेच योग्य टरेल.

## नन्दिवर्धन शाखा

**प्रवरसेन पहिला :** गौतमीपुत्राने भारशिव नागराजा भवनाग याच्या मुलीशी विवाह केला. या नागराजाला बहुतेक पुत्र नव्हता म्हणून त्याच्या मुलीला गौतमीपुत्रापासून झालेला मुलगा रुद्रसेन प्रथम याला वाकाटक राज्यातील त्याच्या स्वतःच्या हिश्श्याबरोबरच पद्मावतीचेही राज्य मिळणार होते. गौतमीपुत्र हा आपला पिता प्रवरसेन प्रथम याच्या कारकिर्दीतच मृत्यू पावला. परिणामतः प्रवरसेन पहिल्या नंतर त्याचा नातू रुद्रसेन प्रथम हा गादीवर आला. रुद्रसेन प्रथम याच्या वारसांच्या सर्व लेखांमध्ये त्याचे भवनाग-दौहित्र असे वर्णन आले आहे. त्यावरून रुद्रसेन प्रथम हा आईच्या वडिलांच्या राज्याचाही वारस होणार होता असे दिसते. दौहित्र हा शब्द येथे पारिभाषिक संज्ञेप्रमाणे वापरला आहे. लिच्छविगुप्त या संयुक्त राज्याचा वारस असणाऱ्या गुप्तसम्राट समुद्रगुप्ताचे वर्णन लिच्छवि दौहित्र असे केले आहे. लिच्छवि राज्य मिळाल्यामुळे गुप्त सामर्थ्य व राज्य या दोहोंची बरीच वृद्धी झाली. भवनाग

याच्या नाण्यांवरून त्याने अधिराज व महाराज[८१] या पदव्या धारण केल्या होत्या असे समजते. बहुतेक इतर नातेवाईकांच्या महत्त्वाकांक्षेमुळे नाग-वाकाटक यांचे संयुक्त राज्य निर्माण होऊन त्याचे सामर्थ्यशाली साम्राज्यात रुपांतर होऊ शकले नाही. प्राप्त झालेली नाग राजांची नाणी[८२] व अलाहाबाद कोरीव लेखांत[८३] समुद्रगुप्ताने पराभूत केलेल्या राजांच्या यादीत आलेली नाग राजांची नावे यावरून असे दिसते की, पद्मावतीवर नागसेन व गणपतिनाग यांच्यासह इतर नाग राजांनी राज्य केले.

रुद्रसेन पहिला हा इ. स. ३३५ मध्ये गादीवर आला. पुराणांमध्ये प्रवरसेन प्रथम याचे चारही पुत्र राजे होतील असे वर्णन आहे. परंतु गौतमीपुत्र हा आपल्या वडिलांच्या हयातीतच मृत्यू पावल्यामुळे त्याचा मुलगा रुद्रसेन प्रथम हा गादीवर आला. त्यामुळे पुराणातील वर्णन प्रत्यक्षात रुद्रसेनाच्या संदर्भात घ्यावे लागेल. त्याच्यानंतर येणाऱ्या राजांच्या कोरीव लेखांमध्ये त्याचे (रुद्रसेनाचे) स्वामि-महाभैरवाचा परमभक्त असे (अत्यंत-स्वामि-महाभैरव-भक्त) वर्णन मिळते. हे शिवाचे उग्र रूप आहे. याबाबतीत त्याचेवर प्रेम करणाऱ्या व त्याला आपला वारस[८४] करू इच्छिणाऱ्या त्याच्या आजोबांचा (आईचे वडील) प्रभाव त्याचेवर पडला असावा. काही विद्वान त्याला देवटेक[८५] येथे प्राप्त झालेल्या अपूर्ण लेखाचा कर्ता समजतात. या लेखामध्ये रुद्रसेनाने चिकंबुरि (देवटेकचे[८६] प्राचीन नाव) या टिकाणी बांधलेल्या धर्मस्थळाचा उल्लेख आहे. जर हा लेख खरोखरच त्याचा असेल तर उल्लेखित धर्मस्थळ म्हणजे ज्या स्वामी महाभैरवाचा तो परमभक्त होता त्याचे मंदीर असावे. त्याचे राज्य उत्तरेस मध्यप्रदेशातील विन्ध्यविभागापर्यंत पसरले होते. त्याच्या राज्याच्या पश्चिमेस खानदेश, पूर्वेस कोसल व दक्षिणेस विदर्भ हे प्रदेश होते. याखेरीज त्याच्या राज्यविस्ताराबद्दल काहीही माहिती उपलब्ध नाही. तो त्याच्या आजोबाप्रमाणेच राजधानीच्या ठिकाणाहून राज्य करीत असण्याची शक्यता आहे. उत्तर भारतामध्ये या काळात सामर्थ्यशाली गुप्तसम्राट समुद्रगुप्त दूरवरचे प्रदेश जिंकून आपली विजयी कारकीर्द गाजवत होता. त्यामुळे रुद्रसेन प्रथम याच्या अमदानीत उत्तर भारतामध्ये महत्त्वपूर्ण राजकीय घटना व स्थित्यंतरे झाली. के. पी. जायस्वाल[८७] व एस. के. अयांगार[८८] यासारखे प्रारंभीचे इतिहासकार व एस. आर. गोयल[८९] यासारखे वर्तमान इतिहासतज्ज्ञ यांची अशी धारणा आहे की, रुद्रसेन प्रथम याचा समुद्रगुप्ताने पराभव केला होता आणि त्याने आर्यावर्ताच्या (उत्तर भारत) पराभूत केलेल्या राजांच्या[९०] यादीमध्ये त्याचा उल्लेख रुद्रदेव या नावाने केला आहे. परंतु जरी मध्यप्रदेशातील विन्ध्यविभागाचा अंतर्भाव त्याच्या राज्यात होत असला तरी त्याचे (रुद्रसेन प्रथम) मुख्य राज्य नर्मदा नदीच्या दक्षिणेला होते. त्यामुळे त्याला आर्यावर्ताचा राजा म्हणता येणार नाही. या शिवाय ज्याठिकाणी वाकाटकांच्या मांडलिकांचे दोन लेख प्राप्त झाले ती सतना जिल्ह्यातील नचना व गज ही ठिकाणे दक्षिण भारतामध्ये अंतर्भूत नव्हती असे निश्चितपणे म्हणता येत नाही. तसेच समुद्रगुप्ताने आर्यावर्तातील पराभूत राजांची राज्ये नष्ट केली, परंतु रुद्रसेनाचा राजवंश त्याच्यानंतर जवळ जवळ दीड शतकापर्यंत राज्य करीत होता.

त्याचा पुत्र व वारस पृथिवीषेण प्रथम याचे मांडलिक नचना व गंज येथे सापडलेल्या दोन लेखांद्वारे ज्ञात आहेत. यामुळे असे म्हणता येते की, समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद स्तंभ लेखातील रुद्रदेव याचे रुद्रसेन प्रथम याचेशी समीकरण करणे शक्य नाही. काही विद्वानांचे असे मत आहे की, याबरोबरच इतर शाखांनी रुद्रसेनाच्या[११] राज्यरोहणाला विरोध केला. त्यामुळे प्रवरसेनाने स्वतःच त्याच्या चार मुलांमध्ये केलेल्या राज्याच्या विभागणीमुळे कमजोर झालेली राजसत्ता जास्तच क्षीण झाली. राजसत्ता दुर्बल झाल्यामुळे प्रवरसेनानंतर कोणत्याही राजाने सम्राट पदवी धारण न करणे स्वाभाविकच ठरते. काही वेळा असे म्हटले जाते की, प्रवरसेनाने वाजपेय याग केला होता म्हणून त्याने ''सम्राट'' ही पदवी धारण केली होती. इतर वाकाटक राजांनी हा याग केला नव्हता व ही पदवीही धारण केली नव्हती. शतपथ ब्राह्मणाच्या ज्या उताऱ्यात वाजपेय यज्ञ केल्याने ''सम्राट'' ही पदवी धारण करता येते असे विधान केले आहे त्याच उताऱ्यात राजसूय यज्ञ केल्यास ''राजन'' ही पदवी धारण करता येते असे प्रतिपादन केले आहे. भारतावर राज्य करणारे क्षहरात आणि कार्दमक यांच्यासारख्या परक्या राजांसह सर्व राजे तसेच जैन व बौद्ध या सारख्या अब्राह्मणीय धर्माचे अनुयायी असलेले राजे यांनी साधारणपणे राजसूय याग करणे अपेक्षित नव्हते, तरी पण त्यांनी राजन ही पदवी धारण केली होती. मंदसोर शिलालेखात ज्याच्या फुटकळ कार्याचे सविस्तर वर्णन दिलेले आहे, परंतु त्याने वाजपेय याग केल्याचा उल्लेख नाही, त्या औलिकर वंशीय यशोधर्मन-विष्णुवर्धन राजाने राजसत्ता निदर्शक ''सम्राट'' ही पदवी धारण केली होती. आणि या प्रमाणे बरेच राजे राजसूय याग न करताही राजन ही पदवी आपल्या नावामागे लावू शकले असते. जर यशोधर्मन वाजपेय याग न करता सम्राट ही पदवी धारण करू शकतो तर त्याच नियमाने प्रवरसेन प्रथम चे वारस जर पुरेसे बलशाली असते तर केवळ परंपरेचे पालन करण्यासाठी धारण केली जाणारी ही पदवी त्यांनी धारण करण्यात काहीच प्रत्यवाय नव्हता. यावरून असे दिसते की, ज्यांनी पूर्वीच मध्यभारतातील नागसत्ता चिरडून टाकली होती त्या बलशाली गुप्त सम्राट समुद्रगुप्ताच्या उपस्थितीत सम्राट ही पदवी धारण करण्याइतका रुद्रसेन प्रथम हा सामर्थ्यशाली नव्हता. मिराशींनी सुद्धा म्हटले आहे की, रुद्रसेन प्रथम याला समुद्रगुप्ताचे वर्चस्व मान्य करून त्याला त्याच्या दक्षिणापथाच्या[१२] विजयी आक्रमणासाठी आपल्या राज्यातून मार्ग द्यावा लागला. तात्पर्य समुद्रगुप्ताने रुद्रसिंहाचा प्रत्यक्ष पाडाव केला नसला तरी रुद्रसेन प्रथम याला समुद्रगुप्ताच्या दुय्यम मित्राप्रमाणे वागावे लागत असावे. रुद्रसेन प्रथम याने अंदाजे इ. स. ३५५ पर्यंत राज्य केले. त्याच्यामागून त्याचा मुलगा पृथिवीषेण हा गादीवर आला.

**पृथिवीषेण पहिला :** प्रत्यक्ष पृथिवीषेणाचे लेख उपलब्ध नाहीत. परंतु त्याचा पुत्र व वारस रुद्रसेन[१३] द्वितीय याच्या वेळेपासून पुढे आलेल्या सर्व वारस राजांच्या लेखांमध्ये त्याची स्तुती केलेली आहे. या पुराव्याचे अवलोकन केल्यास असे दिसून

येते की, या वेळेपर्यंत वाकाटकांच्या सरकारी ( Official) सनदांच्या मसुद्याचे स्वरूप निश्चित[९४] झालेले होते. हे स्वरूप शेवटपर्यंत कायम राहिले. या वर्णनाप्रमाणे तो परम शिवभक्त होता. त्याला महेश्वर भक्त (अत्यंत-माहेश्वर) म्हटले आहे. त्याचप्रमाणे तो सत्यवादित्व, ऋजुत्व, कारुण्य, शौर्य, विक्रम, नीतिनैपुण्य, विनय, माहात्म्य (थोरपणा), बुद्धिमत्ता, सकल जनांविषयी आदर, धर्मविजयित्व, मनोधैर्य इत्यादि गुणांनी युक्त होता. त्याचे वर्तन युधिष्ठिरासारखे होते. त्याला पुत्र आणि पौत्र होते, त्याचे सैन्य सामर्थ्य व कोष यामध्ये शंभर वर्षापासून[९५] सतत वृद्धि होत होती. याप्रकारचे हे वर्णन निश्चितच महत्वाकांक्षी नृपतीचे वाटत नाही तर एखाद्या धर्मात्म्याचे वाटते. त्याचा समकालीन गुप्त सम्राट समुद्रगुप्त हा विजयी मोहिमांमध्ये व्यस्त होता आणि रुद्रसेन प्रथम याने पूर्वीच आपल्या या परोपकारी दोस्ताची सत्ता मान्य केली होती. पृथिवीषेण प्रथम याने आपल्या पित्याचे धोरण पुढे चालू टेवले होते असे दिसते.

मध्यप्रदेशातील[९६] पन्ना जिल्ह्यात नचना की तलाई[९७] व गंज[९८] येथे प्राप्त झालेल्या वाकाटक महाराज पृथिवीषेण याचा सेवक असलेल्या व्याघ्रदेवाच्या दोन शिलालेखांवरून असे दिसते की, विन्ध्य विभागावर त्याची नाममात्र सत्ता अद्याप टिकून होती. वाकाटक वंशाचे पृथिवीषेण या नावाचे दोन राजे होते. पृथिवीषेन प्रथम व पृथिवीषेण दुसरा. यापैकी पहिला हा रुद्रसेन प्रथम याचा पुत्र होता. त्यामुळे संबंधित शिलालेखांमध्ये उल्लेखिलेल्या पृथिवीषेण हा कोणता होता याबद्दल विद्वानांमध्ये एकवाक्यता नाही. काही इतिहासकार त्याचे तादात्म्य या नावाच्या[९९] पहिल्या राजाशी करतात, तर जे. दुब्रुइल,[१००] रमेशचंद्र मजुमदार,[१०१] का. ना. दीक्षित[१०२] आणि वा. वि. मिराशी[१०३] इत्यादिंचा या नावाच्या दुसऱ्या राजाशी तादात्म्य करण्याकडे कल आहे. नंतरचा पृथिवीषेण राजा इ. स. च्या पाचव्या शतकाच्या शेवटच्या चतुर्थकांत उदयाला आला. संबंधित शिलालेखांत तिथी नमूद केलेली नाही. आणि दुसऱ्या मताचा पुरस्कार करणाऱ्या एकाही विद्वानाने हा लेख पहिल्या पृथिवीषेणाचा नाही हे सिद्ध करण्याकरिता निर्विवाद असा अक्षरवटिकाविषयक किंवा दुसरा कोणताही पुरावा सादर केलेला नाही. मिराशींच्या मते या लेखांमध्ये उल्लेखिलेला महाराज व्याघ्र हा उच्चकल्प वंशाच्या लेखांमध्ये उल्लेखिलेला उच्चकल्प महाराज जयनाथचा पिता असावा. त्याच्या ज्ञात वंशावळीनुसार हा पृथिवीषेण द्वितीयच्या अगदी समकालीन राज्य करीत होता, असे दिसते. पण हे मत केवळ नामसादृष्यावर आधारित आहे.

नचना आणि गंज येथील लेखांमध्ये मांडलिकाचे नाव व्याघ्रदेव असे दिलेले आहे, तर उच्चकल्प वंशाच्या लेखांमध्ये मुख्य व्यक्तीचे नाव फक्त व्याघ्र असे दिलेले आहे. या नावाच्या मागे महाराज ही राजसत्ता निदर्शक पदवीही आहे. परंतु ही पदवी संबंधित लेखांमध्ये त्याच्या नावामागे आढळत नाही. या गोष्टी लक्षात घेता वाकाटक मांडलिक व्याघ्रदेवचे उच्चकल्प महाराजाशी समीकरण स्वीकारता येणार नाही.

एच. सी. रायचौधरी[१०४] यांच्या अवलोकनाप्रमाणे नचना व गंज या ठिकाणांसहीत बुंदेलखंड (बघेलखंड) प्रदेश सामर्थ्यशाली गुप्त सम्राट समुद्रगुप्त याच्या वेळेपासून गुप्तांच्या सत्तेखाली होता आणि वाकाटकांची त्या प्रदेशांवर कमीत कमी इ. स. ५२८ पर्यंत सत्ता नव्हती. समुद्रगुप्ताच्या एरण शिलालेखावरून[१०५] असे दिसते की, दक्षिणेकडे कमीत कमी सागरपर्यंतचा प्रदेश त्याच्या प्रत्यक्ष अंमलाखाली होता. उच्चकल्प राज्याच्या पश्चिमेकडे असलेल्या प्रदेशावर परिव्राजक महाराजाची सत्ता होती व त्याने गुप्त वंशाची सर्वश्रेष्ठ सत्ता[१०६] मान्य केली होती. उच्चकल्प वंशीय महाराजाने जरी त्याच्या लेखांमध्ये असे स्पष्ट केलेले नसले तरी भौगोलिक राजनितीनुसार गुप्तांची सत्ता मान्य केली असावी. याशिवाय अलीकडेच प्राप्त झालेल्या महाराज हरिवर्मनच्या गुप्त संवत १६८ च्या मध्यप्रदेशात सिंधी जिल्ह्यात मिळालेल्या शंकरपूर सनदेनुसार गंज व नचना या ठिकाणांचा अंतर्भाव असणाऱ्या बघेलखंड भागात इ. स. ४८७-८८[१०७] मध्ये राज्य करणाऱ्या गुप्त सम्राट बुधगुप्ताच्या मांडलिक हरिवर्मन राज्य करीत होता. या सनदेमध्ये हरिवर्मनच्या आधीच्या दोन पिढ्यांचा उल्लेख आहे. त्यावरून असे दिसते की, संबंधित प्रदेश बऱ्याच वर्षापासून गुप्त साम्राज्यात मोडत असावा. त्यामुळे आपण खात्रीपूर्वक असे म्हणू शकतो की, नचना व गंज येथे प्राप्त झालेले संबंधित लेख हे पृथिवीषेण प्रथमच्या सत्ता काळातील आहेत. यावरून हे सिद्ध होते की मध्यप्रदेशातील बुंदेलखंड (बघेलखंड) प्रदेशातील आपल्या वडिलोपार्जित राज्यावर पृथिवीषेण प्रथम याच्या आमदानीच्या प्रारंभापर्यंत वाकाटकांची सत्ता होती. वर उल्लेख केल्याप्रमाणे समुद्रगुप्ताने या सत्तेचा शेवट केला. त्याच्या अलाहाबाद स्तंभलेखामध्ये त्याचा स्पष्टपणे उल्लेख आहे किंवा नाही किंवा हा व्याघ्रदेव आर्यावर्ताच्या लहान राजांपैकी अप्रत्यक्षपणे इतर राजांबरोबर सुचित केलेला एक राजा होता की नाही हे टरविणे कठीण आहे. समुद्रगुप्ताने पराभूत करून पुन्हा सिंहासनावर स्थापन केलेल्या दक्षिणापथाच्या (डेक्कन अँड साऊथ) राजांपैकी एक म्हणजे महाकांतारचा व्याघ्रदेव यांचेशी त्याचे तादात्म्य करणे शक्य आहे. परंतु व्याघ्रराज हा दक्षिणेचा राजा होता असा उल्लेख आहे, तर व्याघ्रदेव हा उत्तरेकडे विन्ध्यविभागात राज्य करीत होता असा आक्षेप घेतला जातो. या आक्षेपाचे निराकरण करणे शक्य आहे. वराहमिहीर सारखे प्राचीन भारतीय लेखक अलाहाबादच्या पश्चिम दक्षिण दिशेला ६५ मैलांवर बांदा जिल्ह्यात असलेल्या चित्रकूट टेकड्यांचा सुद्धा अंतर्भाव दक्षिण विभागात[१०८] करतात. याच न्यायाने मध्यप्रदेशातील जबलपूर ते उत्तर प्रदेशातील मिर्झापूरपर्यंत पसरलेल्या अरण्याचा किंवा अरवी विभागाचा महाकांतार या शब्दाने बोध होत असावा किंवा या विभागाला महाकांतार या नावाने संबोधित असावेत, आणि जरी दक्षिणेतील इतर राजांप्रमाणे समुद्रगुप्ताने त्याला त्याचे राज्य परत केले असले तरी गुप्त साम्राज्य सत्तेच्या प्रभावामुळे मालव, यौधेय यासारख्या इतर राज्यांप्रमाणे त्याची सत्ता संपुष्टात आली असे म्हणावे लागेल. पुढे पृथिवीषेण प्रथम याने समुद्रगुप्ताच्या दक्षिणेकडील आक्रमणामध्ये भाग घेतला

असे त्याने धारण केलेल्या ''धर्म-विजयीन'' (जो शत्रुंचा पराभव करतो आणि त्यांचे प्रदेश घेत नाही तर त्यांचे यश हिरावून घेतो असा पवित्र विजेता), या पदवीवरून दिसते. त्याने स्वतः कोणताही विजय प्राप्त केलेला दिसत नाही, परंतु विदर्भावर आपली सत्ता मात्र कायम टिकवली.[१०९] भारतीय उपखंडात त्यावेळी बलशाली दोन राजवंशातील मैत्री, वैवाहिक संबंध स्थापून दृढ केली होती. पृथिवीषेण प्रथम याच्या अमदानीचा शेवट होण्याच्या थोडा काळ आधी (इ. स. ३८०) त्याचा मुलगा रुद्रसेन द्वितीय याचा विवाह समुद्रगुप्ताची नाग राजकन्या कुबेरनागा हिच्यापासून झालेला मुलगा चंद्रगुप्त दुसरा याची कन्या प्रभावती गुप्ता हिच्याशी झाला होता. ही महत्त्वपूर्ण घटना वाकाटकांच्या[११०] नंतर दिलेल्या सर्व सनदांमध्ये अभिमानाने सांगितली आहे.

आपल्याला पृथिवीषेण प्रथम याच्या राजधानीबद्दल काहीच माहिती नाही. त्याच्या अमदानीत राजधानी नन्दिवर्धनला आणली गेली[१११] असे मिराशी सांगतात. पण तरीही याचा पुत्र रुद्रसेन द्वितीय याची राजधानी पद्मपूर येथे होती असे दिसते. त्याने त्याच्या वडिलांचा मांडलिक व्याघ्रदेव याला ताब्यात देऊन स्वतःची राजधानी पद्मपूर येथे स्थापन केली. याशिवाय पद्मपूरहून दिलेला एक अपूर्ण एकपत्री ताम्रपट[११२] त्याचा असण्याचीही शक्यता आहे.

**रुद्रसेन द्वितीय :** पृथिवीषेण प्रथम नंतर इ. स. ३८५ च्या सुमारास त्याचा पुत्र रुद्रसेन द्वितीय गादीवर आला. वर उल्लेख केल्याप्रमाणे त्याने गुप्त सम्राट चंद्रगुप्त द्वितीय याची कन्या प्रभावतीगुप्ता हिच्याशी विवाह केला. प्रभावतीगुप्ता आपल्या पित्याप्रमाणेच प्रभावशाली असावी आणि बहुधा त्याच्या प्रभावामुळे रुद्रसेन दुसरा हा परम वैष्णव बनला. आपली राजसत्ता चक्रपाणी विष्णूच्या[११३] कृपेने स्थापन झाली असा त्याचा दृढ विश्वास होता. त्याच्या पाचव्या शासनवर्षी दिलेला ताम्रपट नागपूर जिल्ह्यांत[११४] मांढळ येथे प्राप्त झाला आहे. यामध्ये त्याने विविध गोत्री ब्राह्मणांना व वैदिक चारणांना काही खेडी दान दिल्याची नोंद केली आहे. दान दिलेली खेडी पद्मपूरच्या पूर्वेस असलेल्या शासन विभागात (मार्ग) वसलेली होती. ताम्रपटात नमूद केल्याप्रमाणे या दान दिलेल्या खेड्यातील पूर्वी दोन मठांना दान दिलेली जमीन वगळून हे दान दिलेले होते. यावरून असे दिसते की, आधीचे हे दान त्याने वत्सगुल्महून आलेल्या सात्वत चारणांच्या मठांना दिले असावे. हा ताम्रपट राजाने नुकत्याच स्वीकारलेल्या वैष्णव तत्त्वांना अनुसरून भगवान मोंदस्वामिन्च्या आदेशानुसार दिलेला आहे. ताम्रपटातील वर्णनानुसार भगवान मोंदस्वामिन् म्हणजे चतुर्भुज क्षिरसागरात अनंत नागावर शैषशयन विष्णु निद्रा घेत आहे. त्याच्या तीन हातांमध्ये प्रत्येकी शंख, चक्र, खड्ग ही आयुधे आहेत. चौथा हात त्याच्या डोक्याखाली आहे.[११५]

याच्या शासन कालामध्ये पद्मपूरला फार महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले होते असे दिसते आणि या घराण्याची राजधानी जेव्हा प्रवरपूर येथे स्थापन झाली तेव्हा सुद्धा हे महत्त्वाचे शासन विभाग केंद्र होते असे प्रवरसेन द्वितीय याच्या मासेद ताम्रपटावरून

दिसते. या ताम्रपटानुसार प्रवरसेन द्वितीय याने पद्मपूर (अपर मार्ग)[११६] या नावाने ज्ञात असलेल्या शासन विभागातील गावे दान दिली होती. या ठिकाणी दान दिलेल्या स्थाननिश्चितीनुसार पद्मपूरचा शोध नागपूर, वर्धा जिल्ह्यांत घेतला पाहिजे. हे पद्मपूर म्हणजे हाच उच्चार असलेल्या ज्या ठिकाणाहून अपूर्ण दुर्ग ताम्रपट दिला[११७] होता तेच ठिकाण असले पाहिजे. रुद्रसेन दुसरा याच्या शासनकालात ही वाकाटकांची राजधानी होती असे दिसते.

संबंधित ताम्रपट देणाऱ्याचे नाव ज्ञात नसल्यामुळे फक्त अक्षरवटिकेच्या आधारे तो कोणत्या राजाचा आहे हे समजून येईल. मिराशी हा ताम्रपट नरेंद्रसेनाच्या काळातील आहे असे म्हणतात. तथापि हा ताम्रपट पृथिवीषेण प्रथम याच्या काळातील असावा. पद्मपूर ही त्याची राजधानी होती. रुद्रसेन दुसरा याचे पाचवे शासन वर्ष हीच एक ज्ञात तिथी आहे आणि त्याच्या कारकिर्दीचा शेवट इ. स. ३९५ च्या[११८] आसपास असू शकेल.

**युवराज दिवाकरसेन आणि राजप्रतिनिधी प्रभावतीगुप्ता :** रुद्रसेन दुसरा याचे अकाली निधन झाले तेव्हा त्याचे तीनही पुत्र दिवाकरसेन, दामोदरसेन आणि प्रवरसेन हे वयाने लहान होते. असे म्हणतात की, पृथिवीषेण प्रथम याला तो हयात असतानाच पुत्र-पौत्र झाले होते. यावरून हे स्पष्ट होते की, त्याच्या नातवांपैकी सर्वात मोठा दिवाकरसेन याचा जन्म त्याच्या कारकिर्दीच्या अस्तापूर्वी झाला होता. याप्रमाणे पित्याच्या मृत्युसमयी[११९] दिवाकरसेनाचे वय दहा वर्षापेक्षा जास्त असावे आणि इतर ज्यांचा जन्म त्यांच्या आजोबांच्या मृत्यूनंतर झाला असावा, ते फार लहान असावेत. त्यांच्यापैकी कोणीही सज्ञान आणि सिंहासनावर येण्याच्या क्षमतेचा नसल्यामुळे त्यांची माता प्रभावतीगुप्ता हिला तिचा ज्येष्ठ पुत्र युवराज दिवाकरसेन याच्या वतीने राज्यकारभार पहावा लागला. सध्या उपलब्ध असलेल्या माहिती आधारे रुद्रसेन द्वितीय याला धाकटा भाऊ होता का? असल्यास त्याचा सिंहासनावरील हक्क दिवाकरसेन याच्यासाठी त्याच्या मातेच्या वडिलांच्या मदतीने डावलण्यात आला का याविषयी निश्चित काहीही सांगता येत नाही. प्रभावतीगुप्ताला स्वतःचा व आपल्या पितृवंशजत्वाचा साहजिकच फार अभिमान होता याबद्दल शंका नाही. तिच्या अडचणींच्या काळात तिला पित्याकडून तसेच भावाकडून स्वाभाविकच भक्कम सहाय्य मिळाले असावे. तिने आपल्या पित्याच्या वंशाचे गोत्र (धारण) कायम ठेवले. तिच्या दोन्ही लेखांमध्ये इतर ताम्रपटांप्रमाणे वाकाटकांची वंशावळ[१२०] न देता तिच्या पित्याच्या वंशाची वंशावळ दिली आहे.

प्रभावतीगुप्ताचा पुणे ताम्रपट तिच्या राजप्रतिनिधित्वाच्या[१२१] तेराव्या वर्षी दिलेला आहे त्यावरून दिवाकरसेन हा कमीत कमी तेरा वर्षे युवराज होता असे दिसते. तो आणखी किती वर्षे युवराज राहिला हे ठरविणे सध्या कठीण आहे. परंतु तो

फार काळ नसावा, कारण पुणे ताम्रपट दिला त्या आधी त्याचे वय तेवीस वर्षापेक्षा कमी नव्हते. श्रीधरदासाने एकत्रित केलेल्या सदुक्तिकर्णामृत[१२२] काव्यसंग्रहामध्ये दिवाकरसेनाने रचलेला श्लोक आहे. श्रीधरदास रचनाकाराचा उल्लेख युवराज म्हणून करतो. यावरून दिवाकरसेनाचे युवराज म्हणूनच निधन झाले याबद्दल शंका राहत नाही. यावरून त्याच्या युवराजपदाचा शेवट इ. स. ४१० च्या सुमारास झाला असावा. पुणे ताम्रपट नन्दिवर्धनहून दिलेला आहे. या नन्दिवर्धनचे नागपूर जवळ सुमारे २८ मैलांवर असलेल्या नन्दरधन किंवा नगरधन या गावाशी तादात्म्य केलेले आहे. यावरून यावेळी वाकाटक राज्याची राजधानी पद्मपूरहून येथे हलविण्यात आली होती हे स्पष्ट होते. त्याचा निश्चित काळ मात्र सांगता येत नाही.

**दामोदरसेन :** दिवाकरसेन नंतर त्याचा भाऊ दामोदरसेन हा इ. स. ४१० च्या सुमारास गादीवर आला. काही काळपर्यंत प्रभावतीगुप्ता त्याच्यासाठीही[१२३] राजप्रतिनिधी म्हणून राज्यकारभार पहात असण्याची शक्यता नाकारता येत नाही. तो त्याचा भाऊ प्रवरसेन दुसरा ही एकच व्यक्ती नसून ते दोघेही राजसिंहासनाधिष्ठित स्वतंत्र राजे होते याबद्दल शंका नाही. आतापर्यंत या मुद्याबद्दल मतभेद होते. काही विद्वानांचा असा विश्वास होता की, दामोदरसेन व प्रवरसेन दुसरा या वेगवेगळ्या व्यक्ती नव्हत्या तर दामोदरसेनानेच (प्रवरसेन द्वितीय हे नाव) समान नाव असलेल्या त्याच्या पूर्वजाचे (प्रवरसेन प्रथम)[१२४] प्रवरसेन हे नाव धारण केले होते. प्रभावतीगुप्ताच्या ऋद्धपूर ताम्रपटात तिचे दामोदरसेन व प्रवरसेनाची माता असे वर्णन आहे (महाराज-श्री-दामोदरसेन-प्रवरसेन-जननी)[१२५] परंतु याठिकाणी "महाराज" ही राजसत्ता निदर्शक पदवी व "श्री" सन्मानदर्शक पदवी ह्या दोन्ही पदव्या फक्त एकदाच वापरल्या आहेत आणि हा ताम्रपट प्रवरसेन द्वितीय याच्या कारकिर्दीत दिलेला आहे. यामुळे दामोदरसेन व प्रवरसेन या दोन्ही व्यक्ती एकच होत्या अशी समजूत होती. या व्यतिरिक्त राज्य करणाऱ्या राजाच्या नावामागे सत्तानिदर्शक व सन्मानदर्शक पदवीच्या अभावाचे दुसरे समर्थन करणे शक्य नाही. हल्ली प्राप्त झालेल्या प्रभावतीगुप्ताच्या मिरेगाव (ता. साकोली, जि. भंडारा) ताम्रपटाच्या मुद्रेवर प्रभावतीगुप्ताचे दोन राजांची माता[१२६] असे स्पष्ट वर्णन आहे. या वर्णनामुळे या दोन वेगवेगळ्या व्यक्ती होत्या व दोघेही सिंहासनाधिष्ठित[१२७] राजे होते ही गोष्ट सिद्ध झाली आहे. दामोदरसेनाच्या कारकिर्दीबद्दल फारशी माहिती नाही. साधारणपणे त्याने दहा वर्षाची कारकीर्द उपभोगली असे मानले तर त्याचा अस्त इ. स. ४२० मध्ये झाला असे म्हणता येईल.

**प्रवरसेन द्वितीय :** दामोदरसेन नंतर त्याचा धाकटा भाऊ प्रवरसेन दुसरा गादीवर आला. त्याच्या काळातील ताम्रपट[१२८] तसेच शिलालेख[१२९] बऱ्याच मोठ्या संख्येत उपलब्ध आहेत. त्याचा शेवटचा ताम्रपट (पौनी ताम्रपट) हा त्याच्या बत्तीसाव्या शासन वर्षीचा आहे. यावरून त्याने सुमारे पस्तीस वर्षे राज्य केले असावे असे दिसते. हा आपल्या आईवडिलांप्रमाणे वैष्णव नसून शिवोपासक होता. भगवान शंभूच्या

कृपाप्रसादाने आपणास कृतयुग स्थापन करता आले असा त्याचा दृढविश्वास होता (शम्भोः प्रसादधृतकार्तयुगस्य),[१३०] त्याची त्याच्या शासनाच्या दुसऱ्या वर्षापासून ते अकराव्या वर्षापर्यंतची दानपत्रे नन्दिवर्धनाहून दिलेली आहेत. म्हणजे कमीत कमी अकराव्या शासन वर्षापर्यंत तरी त्याची राजधानी नन्दिवर्धन येथे होती आणि अकरावे ते सोळावे शासनवर्ष[१३१] यामधील काळात ती केव्हातरी प्रवरपूर येथे हलविण्यात आली. या प्रवरपूरचे तादात्म्य सामान्यपणे हल्लीच्या पवनार (वर्धा जिल्हा) या गावाशी केले जाते.

याचे इतर वाकाटक राजापेक्षा जास्त लेख[१३२] उपलब्ध आहेत. परंतु त्याच्या राजकीय जीवनाबद्दल ते लेख आपल्याला काहीच माहिती देत नाहीत. त्याचा नातू पृथिवीषेण दुसरा याच्या दानपत्रातील वर्णनाप्रमाणे त्याने आधीच्या राजांच्या आचरणाचे अनुकरण केले व उत्कृष्ट व्यवहारचातुर्य, सामर्थ्य व पराक्रम यांच्या योगे सर्व शत्रुंचा नाश केला. हाच सारांश स्वतः प्रवरसेन द्वितीय याने दिलेल्या सिवनी दानपत्रातही आढळतो. हे दानपत्र त्याच्या अठराव्या शासनवर्षी[१३३] दिले होते. परंतु त्याच वर्षी[१३४] काही महिने आधी दिलेल्या चम्मक दानपत्रात मात्र हा सारांश आढळत नाही. जर या संदर्भांना काही ऐतिहासिक महत्त्व असेल तर हे विजय त्याने त्याच्या अठराव्या शासन वर्षी ज्येष्ट ते फाल्गुन या कालावधीत संपादन केले असावेत. त्याची दानपत्रे प्राप्त झालेली ठिकाणे आणि दानपत्रांमध्ये दिलेल्या खेड्यांच्या नावांवरून असे दिसते की, त्याने आपल्या वाडवडिलांकडून प्राप्त केलेले[१३५] राज्य कायम राखले होते. त्याचा २३ व्या शासन वर्षाचा[१३६] इंदोर ताम्रपट "त्रिपुरीवासका"तून दिला आहे. मिराशींच्या मते प्रवसेन द्वितीय याचे त्याच्या आईकडील नातलगांशी (कुमारगुप्त पहिला) संबंध बिघडले होते म्हणून त्याने डाहल (बघेलखंड) प्रदेशावर आक्रमण केले आणि हे दानपत्र नर्मदेच्या[१३७] उत्तरेला असलेल्या त्रिपुरी (हल्लीचे तेवर, जबलपुर जिल्हा) येथील लष्करी छावणीतून दिले. परंतु असे अनुमान काढण्याचे कारणच नाही. कारण उपरोक्त त्रिपुरीवासकामधील वासक हा शब्द लष्करी छावणीचा बोध न करता केवळ तात्पुरत्या राहण्याच्या ठिकाणाचा निर्देश करतो आणि याच अर्थाने तो प्रवरसेन दुसरा याच्या पंचविसाव्या वर्षीच्या वडगांव ताम्रपटात वापरलेला आहे. हा ताम्रपट हिरण्या नदीवर असलेल्या (हिरण्या–नदी वासकात)[१३८] वासकातून दिलेला आहे. हे ठिकाण त्याच्याच राज्यात होते हे खात्रीने माहीत आहे. तेव्हा येथे त्याच्या आक्रमणांचा किंवा त्याचा लष्करी तळ असण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. दुसरे असे की, प्रवरसेन दुसरा याला त्याच्या आईबद्दल फार आदर होता. कारण तिने जन्मभर वाकाटक शासनामध्ये अधिकार गाजविला होता. तसेच वाकाटक राज्यकारभारांतील ती एक चांगलेच प्रस्थ होते. प्रवरसेनाच्या एकोणीसाव्या शासन वर्षी तिने आपल्या अधिकारांत ऋद्धपुर व मिरेगाव ताम्रपट दिले आणि राजांने स्वतः त्याच्या तेविसाव्या शासन वर्षी[१३९] तिच्या पुण्योपार्जनासाठी तिरोडी ताम्रपट दानपत्र दिले. संबंधित इंदोर ताम्रपटही याच सुमारास दिलेला आहे. त्याच्या मातेच्या मुत्यूनंतर व त्याच्या

कारकिर्दीच्या शेवटी दिलेल्या रामटेक शिलालेखामध्ये फक्त त्याच्या मातेच्या पित्याचीच नव्हे तर कुमारगुप्त प्रथम व घटोत्कच गुप्त[१४०] या त्याच्या पुत्रांचीही भरपूर स्तुती केलेली आहे. तसेच कोरीव लेखांमध्ये रुद्रसेन द्वितीय व प्रभावतीगुप्ता यांच्या विवाहाचा गौरवपूर्ण शब्दात उल्लेख करण्याच्या पद्धतीचे या शाखेचा शेवटचा सज्ञान राजा पृथिवीषेण दुसरा याच्या लेखामंध्ये अस्तित्व राहणे यावरून गुप्त व वाकाटक राजवंशांमध्ये वाकाटकांच्या या शाखेच्या अस्तापर्यंत टिकून होते असे अनुमान करता येते. हे सर्व पुरावे असतानाही असे वाटू शकते की, या दानपत्रांतील दान दिलेल्या गावांचे जर बघेलखंड विभागातील गावांशी तादात्म्य करता आले तर हे अनुमान स्वीकारता येईल. परंतु ही सर्व गावे मध्यप्रदेशाच्या बालाघाट जिल्ह्यात मिळाली आहेत. त्यामुळे प्रवरसेन दुसरा हा त्रिपुरी येथे बहुतेक यात्रेसाठी[१४१] गेला असण्याची शक्यता जास्त आहे असे वाटते. त्याने तेथे कदाचित नर्मदा नदीत स्नान केल्यानंतर आपल्या स्वतःच्या राज्यातील[१४२] जमिनीचे दान करणारे दानपत्र दिले असावे. किंवा त्रिपुरी हे महत्त्वपूर्ण टिकाण असल्यामुळे त्याने तेथे थोडासा मुक्काम करून मामाच्या अतिथ्याचा समाचार घेतला असावा.

प्रभावतीगुप्ताचा मृत्यू ही प्रवरसेन द्वितीय याच्या कारकिर्दीच्या शेवटी घडलेली महत्त्वपूर्ण घटना आहे. प्रभावतीगुप्ताने तिचा पती रूद्रसेन दुसरा याच्या अकाली निधनानंतर वाकाटकांचे राज्य कायम टेवण्याच्या दृष्टीने इतकी महत्त्वपूर्ण भूमिका निभावली होती की, त्यामुळे तिच्यात कोणतेही महत्त्वपूर्ण आव्हान स्वीकारण्याची क्षमता उत्पन्न झाली होती. ती विष्णूची परम भक्त होती. तिची तीनही दानपत्रे वैष्णव धर्मिय आहेत. तिचा पुणे ताम्रपटाचा प्रारंभ "जितंभगवता" या प्रसिद्ध वैष्णव सूत्राने होतो. या दानपत्रानुसार तिने हे दान कार्तिक[१४३] शुद्ध द्वादशीस पारण्याच्या प्रसंगी वैष्णव (भगवत भक्त) भक्तास दिले. तिने प्रथम हे दान भगवंताच्या पादमूलास (पादुकांस) अर्पण करून नंतर ते उपर्निर्दिष्ट व्यक्तीला दिले. ऋद्धपूर ताम्रपटही याच वैष्णव सूत्राने सुरू होतो. तो अशाच प्रसंगी प्रसिद्ध रामगिरी (नागपूर जिल्ह्यातील रामटेक) येथील भगवंताच्या पादुकांजवळ दिलेला आहे. अशा प्रकारचे तेजस्वी आयुष्य व्यतित केल्यानंतर तिला वयाच्या ८५ व्या[१४४] वर्षी ऐश्वर्यात मृत्यू आला. तिच्या स्मरणार्थ तिची अनामिक कन्या व पुत्र प्रवरसेन दुसरा यांनी प्रभावती स्वामीन या योग्य नावाने विष्णू (नरसिंह) मंदिर बांधले व सुदर्शन[१४५] नामक तलाव खोदला.

प्रवरसेन दुसरा याला वाङ्मयाची आवड होती. तो प्राकृत रचना करणारा कवीही होता. रामाचे लंकेला जाणे व रावणाचा वध करणे या विषयांवर त्याने प्राकृतमध्ये "सेतुबंध" किंवा "रावण वहो" हे काव्य रचले होते असे काही विद्वान मानतात. हे काव्य दण्डिन, बाणभट्ट, आनंदवर्धन इत्यादि ललितकलातज्ञ विद्वानांमध्ये फार प्रसिद्ध होते. परंतु विद्वानात याबाबत मतैक्य नसल्यामुळे हे काव्य वाकाटक प्रवरसेन द्वितीय याने रचले होते असे खात्रीपूर्वक म्हणता येत नाही. कारण काश्मीरमध्येही प्रवरसेन नावाचे राजे होते. काश्मीर हे ही वाङ्मयाचे केंद्र म्हणून प्रसिद्ध होते. काही विद्वानांच्या मते या काव्याची रचना या प्रवरसेनांपैकी एकाने केली असावी. या

काव्याचा नंतरच्या काळातील टिकाकार रामदास (इ. स. १८७५) याच्या मते हे काव्य कालिदासाने महाराज प्रवरसेनाकरिता महाराजाधिराज विक्रमादित्याच्या आज्ञेनुसार रचले. या काव्याच्या प्रत्येक आश्वासाच्या (कडवे) शेवटी प्रवरसेनाने हे काव्य रचले (विरचित) व कालिदासाने हे काव्य केले (कृत) असा कविनामोल्लेख येतो. या पुराव्यावरून असे वाटते की, कालिदासाने वाकाटक राजा प्रवरसेन दुसरा याच्या-वतीने आपला आश्रयदाता व विक्रमादित्य हे बिरुद धारण करणारा चंद्रगुप्त दुसरा याच्या आज्ञेने हे काव्य केले असावे. परंतु कालिदासाच्या नावावर हे काव्य ठेवणेही बरोबर वाटत नाही. कारण एकतर चंद्रगुप्त दुसरा हा एकटाच विक्रमादित्य म्हणून ख्यात नव्हता. जुन्या परंपरेनुसार मूळ विक्रमादित्य इ. स. पूर्वी पहिल्या शतकात होऊन गेला. दुसरे असे की, प्रत्यक्ष कालिदासाची तिथी निश्चित नाही. कित्येक विद्वान त्याला इ. स. च्या पूर्वी ठेवतात आणि तिसरे म्हणजे रामदासाने नमूद केलेली परंपरा नवीनच आहे. त्यामुळे तिच्या विश्वसनीयतेबद्दल शंका आहे. तरीही प्रवरसेनाच्या काव्यगुणांबद्दल शंका घेण्याची गरज नाही. कारण सातवाहन राजा हाल याने रचलेल्या "गाथासप्तशती" मध्ये त्याच्या काही गाथा दिलेल्या आहेत.

**नरेन्द्रसेन :** इ. स. ४५५ च्या सुमारास प्रवरसेन दुसरा याचा मुलगा नरेन्द्रसेन गादीवर आला. प्रवरसेन[१६६] दुसरा याच्या नुकत्याच मांढळ येथे प्राप्त झालेल्या ताम्रपटात उल्लेखिलेला आज्नाकभट्टारिका (Ajnakabhattarika) हिचा पुत्र नरिन्द्रराज म्हणजे हा नरेन्द्रसेन असावा. त्याचा एकही लेख मिळालेला नाही. त्याच्याबद्दलची सर्व माहिती त्याचा पुत्र व वारस पृथिवीषेण द्वितीय याच्या चार दानपत्रांद्वारे[१६७] प्राप्त होते. या ताम्रपटात नरेन्द्रसेनाचे वर्णन करताना फार मनोरंजक शब्दसमूह वापरलेला आहे. आतापर्यंत त्याचे वाचन पूर्व–अधिगत–गुण–विश्वासाद–अपहृतवंश–श्रियः असे करीत असत आणि त्याचे स्पष्टीकरण सामान्यपणे "त्याने पूर्वीच संपादन केलेल्या गुणांच्या योगे राजलक्ष्मी प्राप्त केली" असे करीत.[१६८] परंतु पृथिवीषेण द्वितीय याच्या दहाव्या वर्षीचा नुकत्याच प्राप्त झालेल्या मांढळ ताम्रपटामुळे या वाक्याचे वाचन पूर्व–अधिगत–गुणवद–दायाद–अपहृत–वंश–श्रियः असे करणे शक्य झाले आहे. याचा अर्थ असा आहे कीं, नरेन्द्रसेनाने प्रथम राजलक्ष्मी प्राप्त केली होती, परंतु त्याची पात्रता असून सुद्धा कनिष्ट (Minor) नातलगांनी तिचे अपहरण केले. यावरून असे दिसते की, प्रवरसेन द्वितीय याच्या मृत्यूनंतर वारसासंबंधी भांडणे झाली आणि नरेन्द्रसेन हा प्रथम स्वतःसाठी सिंहासन मिळविण्यात यशस्वी ठरला. परंतु नंतर त्याच्या नातलगांनी जे त्याचे भाऊ असू शकतात त्याच्याकडून सिंहासन हिरावून घेतले. जर गुणवद हा शब्द गौण या शब्दाचा समानार्थक असा घेतला, तर कदाचित हे भांडण वत्सगुल्म शाखेबरोबरचेही असू शकेल. असे असले तरी प्रारंभी मिळालेल्या यशानंतर नरेन्द्रसेनाच्या राज्याच्या बराच मोठा भाग त्याच्या नातलगांनी[१६९] हिरावून घेतला होता याबद्दल शंका नाही. नरेन्द्रसेनाने आपल्या पराक्रमाने पराभूत केलेल्या शत्रुंना नियंत्रणात ठेवले (प्रताप–प्रणत–अरि–शासनस्य) हे त्याच्या मुलांचे लेखातील

वर्णन बहुतेक करून त्याच्या ज्या शत्रुंनी प्रारंभी त्याच्या सिंहासनावर येण्याच्या मार्गात अयशस्वीपणे अडथळे निर्माण करण्याचे प्रयत्न केले त्यांच्यावर प्राप्त केलेल्या विजयासंबंधी असावे. नंतरच्या आयुष्यात नरेन्द्रसेनाची सत्ता इतकी डळमळीत होती की, त्याच्या आज्ञा कोसला, मेकला आणि मालव या देशाचे अधिपती आदराने पाळत होते या वर्णनामध्ये फारसे तथ्य दिसत नाही. नरेन्द्रसेनाची मेकला प्रदेशावर (मध्य प्रदेशातील अमरकंटक विभाग) सत्ता होती किंवा मेकला देशाचा राजा त्याची आज्ञा पाळत होता या विधानाचे स्पष्टीकरण आतापर्यंत असे करीत असत की, ब्राह्मणी ताम्रपटात नरेन्द्रसेनाचा अप्रत्यक्ष उल्लेख आहे व हा ताम्रपट मेकला देशाचा पांडव वंशी राजा भरतबल, जो नरेन्द्रसेनाचा[१५०] मांडलिक होता अशी समजूत होती, त्याने दिलेला आहे परंतु अलीकडेच प्राप्त झालेल्या मल्लार ताम्रपटावरून असे दिसून येते की, या दोन्ही अनुमानांना काहीच आधार नाही. इतरत्र[१५१] दाखविल्याप्रमाणे ही दोन्हीही दानपत्रे नरेन्द्रसेनानंतर उदयाला आलेल्या शुरबल उदीर्णवर[१५२] याने दिलेली आहेत आणि त्याने नरेन्द्रसेनाची अधिसत्ता[१५३] स्वीकारण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. हे शक्य आहे की, त्याने या विभागात गुप्तांची सत्ता पुन्हा स्थापन करण्यासाठी झालेल्या काही मोहिमांमध्ये भाग घेतला असावा. या मोहिमांना स्कंदगुप्त व बुधगुप्त यांच्या कारकिर्दीत बंडाचे स्वरूप प्राप्त झाले असावे आणि या बंडामध्ये त्याने शासकांविरुद्ध (Rulers) विजय प्राप्त केला असावा. सार्वभौम गुप्तांची सत्ता जेव्हा विस्कळीत झाली त्या वेळी या विभागात त्याने छोटे-मोटे हल्लेही केले असण्याची शक्यता आहे.

नरेन्द्रसेनाचा विवाह कुंतल राजकन्या अज्झितभट्टारिका हिच्याशी झाला. अज्झितभट्टारिकाने नंतर राजा झालेल्या पृथिवीषेणाला जन्म दिला. कुंतल हे उत्तर कर्नाटकाचे प्राचीन नाव होते. कुंतल राजकन्या ही वनवासीचा (कर्नाटकातील उत्तर कन्नड जिल्हा) कदंब राजा काकुस्थवर्मनची बहुधा मुलगी किंवा नात असावी. कदंब राजांनी आपल्या मुलींचे विवाह गुप्त आणि इतर राजवंशांशी करून दिले होते.[१५४] तसेच संबंधित संपूर्ण कालखंडात गुप्त आणि वाकाटक यांच्यामधील असलेले सलोख्याचे संबंध लक्षात घेऊन त्यांनी आपल्या मुली वाकाटक राजांना दिल्या असाव्यात.[१५५]

आतापर्यंत वाकाटकांची नाणी प्राप्त झाली नव्हती. परंतु अलीकडेच पवनार येथे वाकाटकांची काही नाणी प्राप्त झाली आहेत. त्यामध्ये नरेन्द्रसेनाची म्हणता येतील अशी दोन नाणी आहेत. ही दोन्हीही नाणी तांब्याची असून त्यापैकी एकाच्या दर्शनी भागावर पेटिका शीर्षक लिपीमध्ये ''रेन्द्र'' असा लेख असून पृष्ठभागावर ''श्री'' हे अक्षर आहे. दुसऱ्या नाण्याच्या दर्शनी भागावर मोठ्या आकारात न हा शब्द आहे आणि पृष्ठभागावर[१५६] अंशतः कोरलेले शंख चिन्ह आहे. दर्शनी भागावरील न हे अक्षर नरेन्द्रसेनाकरिता असावे. ही नाणी दैनंदिन व्यवहारासाठी उपयोगात असावीत.[१५७]

**पृथिवीषेण द्वितीय :** नरेन्द्रसेनानंतर इ. स. ४८० च्या सुमारास त्याचा पुत्र पृथिवीषेण दुसरा गादीवर आला. त्याच्या कारकिर्दीची माहिती देणारे त्याचे वर्ष २

आणि १०[१५८] असे दोन मांढळ ताम्रपट, १७ व्या वर्षीचा माहुरझरी ताम्रपट[१५९] व अपूर्ण बालाघाट ताम्रपट[१६०] असे एकूण चार ताम्रपट उपलब्ध आहेत. त्याचा पणजा रुद्रसेन द्वितीय प्रमाणे तो परम वैष्णव होता आणि अत्यंत-भागवत असे वर्णन मिळते. हा राज्यावर आला तेव्हा त्याचे वडिलोपार्जित राज्य किंवा राज्यांचा बराच मोठा भाग त्याच्या कनिष्ठ (minor) नातेवाईकांच्या ताब्यात असल्यामुळे त्याला खरोखरच अतिदुष्कर असे आव्हान होते. परंतु त्याने आव्हान समर्थपणे स्वीकारले आणि आपल्या राजवंशाची गेलेली प्रतिष्ठा पुन्हा प्राप्त केली (मग्न-वंश-औद्धर्तुः) असा उल्लेख त्याचा दहाव्या वर्षीच्या मांढळ व सतराव्या वर्षीच्या माहुरझरी ताम्रपटात मिळतो. नंतर दिलेल्या बालाघाट ताम्रपटामध्ये त्याने संकटात असलेल्या आपल्या राजवंशाच्या भाग्याची दोन वेळा सुटका केली असे वर्णन आहे (द्वि–मग्न–वंशस्य–ओद्ध–र्तुः).[१६१] हे दुसरे संकट बहुतेक मध्यप्रदेशातील बस्तर विभागावर व लागून असलेल्या प्रदेशाच्या भागावर राज्य करणारा नलराजा भवदत्तवर्मन याने वाकाटक राज्यावर केलेल्या आक्रमणामुळे उपस्थित झाले असावे. भवदत्तवर्मनचा अमरावती जिल्ह्यात ऋद्धपुर येथे सापडलेला ताम्रपट वाकाटकांची पूर्वीची राजधानी नन्दिवर्धन येथून दिलेला आहे. त्यामध्ये भवदत्तवर्मनने यवतमाळ जिल्ह्यातील[१६२] कदंबगिरीग्राम दान दिल्याचा उल्लेख आहे. यावरून असे स्पष्ट दिसते की, वाकाटक राज्याचा बराच मोठा भाग नल वंशाच्या विशेषतः त्यांचा राजा भवदत्तवर्मन याच्या ताब्यात गेला असावा. हा प्रसंग पृथिवीषेण दुसरा याच्या सतराव्या शासन वर्षानंतर केव्हातरी घडला असावा, कारण त्याच्या त्यावर्षी दिलेल्या माहुरझरी ताम्रपटामध्ये फक्त एकाच संकटाचा उल्लेख आहे. (मग्न–वंश–ओद्ध–र्तुः) रामगिरी (रामटेक)[१६३] जवळून दिलेल्या त्याच्या दुसऱ्या शासन वर्षीच्या मांढळ ताम्रपटानुसार त्याच्या कारकिर्दीच्या दुसऱ्या वर्षापर्यंत नन्दिवर्धन प्रदेश नक्कीच त्याच्या राज्यात अंतर्भूत होता. हा प्रदेश भवदत्तवर्मनकडे पृथिवीषेण दुसरा याच्या सतराव्या शासनवर्षानंतर गेलेला दिसतो. परंतु पूर्ण वाकाटक राज्य भवदत्तवर्मनाने जिंकले होते असे पृथिवीषेण दुसरा याने त्याच्या वेम्बार येथील तात्पुरत्या निवासस्थानाहून दिलेल्या अपूर्ण बालाघाट ताम्रपटावरून दिसत नाही. बेम्बार या स्थळाचे चंद्रपुरच्या[१६४] पूर्वेस अठ्ठावीस मैलांवर असलेल्या वेम्बाल या गावाशी तादात्म्य केलेले आहे. त्याने वीस किंवा पंचवीस वर्षे राज्य केले असावे. त्यामुळे त्याच्या कारकिर्दीचा अस्त इ. स. ५००–५०५ च्या सुमारास ठेवता येईल. नुकतेच पवनार[१६५] येथे पृथिवीषेणाचे एक वैशिष्ट्यपूर्ण नाणे प्राप्त झाले आहे. हा बहुतेक पृथिवीषेण दुसरा असावा. याच्या दर्शनी भागावर पेटिका शीर्षक लिपिमध्ये श्री महाराज पृथिवी असा गोलाकार लिहिलेला लेख आहे आणि पृष्ठभागावर कडेने मण्यांची नक्षी व मध्ये कागदाच्या गुंडाळीसारखी नक्षी आहे. वाकाटकांच्या प्रवरपूर शाखेचा पृथिवीषेण दुसरा हा शेवटचा ज्ञात राजा आहे. या शाखेचा शेवट बहुतेक या वंशाच्या वत्सगुल्म शाखेचा महत्त्वाकांक्षी नलराजा अर्थपति किंवा त्याचा पिता भवदत्तवर्मन, यांनी हे राज्य जिंकल्यामुळे झाला असावा किंवा अन्य कारणांमुळे झाला असावा. याचे निश्चित उत्तर भविष्यातील संशोधनच देऊ शकेल.

## वत्सगुल्म शाखा

इ. स. १९३९ मध्ये विन्ध्यसेन दुसरा[१६६] याचा वाशीम ताम्रपट मिळाल्यामुळे वाकाटकांच्या या शाखेची माहिती प्रथम उपलब्ध झाली. या शाखेच्या काही नृपतींची नावे अजंठा येथील सोळा नंबरच्या लेण्यातील लेखात आली आहेत. हे जरी खरे असले तरी ह्या लेखाचे तोपर्यंत नीट वाचन[१६७] झाले नव्हते. यानंतर प्राप्त झालेले देवसेनाचे आणखी दोन लेख (१)हिस्सेबोराळा[१६८] शिलालेख शक ३८० व (२) बीदर ताम्रपट[१६९] तसेच हरिषेणाचा[१७०] थाळनेर ताम्रपट आणि कदंब नृपति सिंहवर्मन[१७१] याच्या मुडिगेरे ताम्रपटात आलेला सर्वसेन नामक राजाचा उल्लेख इत्यादि गोष्टींमुळे या शाखेविषयी अधिक माहिती उपलब्ध झाली आहे.

**सर्वसेन प्रथम :** अविभक्त वाकाटक राजवंशाचा नृपती प्रवरसेन प्रथम याचा पुत्र सर्वसेन हा या शाखेचा संस्थापक होय. त्याला याच नावाच्या नंतर होऊन गेलेल्या राजापासून वेगळे ओळखता यावे म्हणून त्याला सर्वसेन प्रथम असे संबोधतात. त्याची माहिती पुरविणारे त्याचे स्वतःचे लेख उपलब्ध नाहीत. त्याचा मुलगा विन्ध्यशक्ति दुसरा याचा वाशीम ताम्रपट व त्याच्या वंशजांनी नंतर दिलेले लेख याद्वारेच त्याच्याविषयी माहिती प्राप्त होते. या शाखेच्या राज्याची कदंब राज्याशी असलेली भौगोलिक निकटता व त्या राजघराण्याबरोबर असलेल्या या शाखेच्या घनिष्ट संबंधांमुळे सर्वसेनाने "धर्म–महाराज" ही पदवी धारण केलेली होती. दुसऱ्या शाखेच्या[१७२] कोणत्याही राजाने ही पदवी धारण केलेली ज्ञात नाही. वर उल्लेखिल्या प्रमाणे सर्वसेन प्रथम हा प्रवरसेन पहिला याच्या अमदानीत राजपुत्र म्हणून प्रवरसेनाच्या वतीने कारभार करीत होता तेव्हाच म्हणजे प्रवरसेन प्रथम हयात असतानाच सर्वसेन त्याने जिंकलेल्या प्रदेशात सत्तेवर आला असण्याचा संभव आहे. म्हणजे त्याचे राज्यावर येणे इ. स. ३२५ च्या आसपास ठेवता येईल. त्याने किती वर्षे राज्य केले हे समजण्यास साधन नाही. परंतु त्याने तीन दशके राज्य केले असे गृहित धरल्यास त्याच्या राजवटीचा अस्त इ. स. ३५५ मध्ये होऊ शकतो. त्याच्या कारकिर्दीतील राजकीय घडामोडींबद्दल माहिती उपलब्ध नाही. अजंठा शिलालेखामध्ये त्याने सर्व सैन्याचा पराभव केला (श्लोक ७) असे निश्चित विधान आहे. परंतु दुर्दैवाने त्याबद्दल पुढे सविस्तर माहिती दिलेली नाही. तरी पण त्याने मराठवाडा व खानदेशचा लागून असलेला प्रदेश जिंकला असण्याची शक्यता आहे. त्याची राजधानी कोठे होती याबद्दल निश्चित सांगता येत नाही. ती वत्सगुल्म म्हणजे अकोला जिल्ह्यातील वाशीम येथेच असली पाहिजे. प्राचीन काळी वाशीम हे धर्म व संस्कृतीचे मोठे महत्त्वाचे केंद्र होते. त्याचा वाकाटकांशी संबंध आल्यामुळे ते जास्तच प्रसिद्धीला आले. ते यात्रेकरूंचे पवित्र तीर्थक्षेत्र होते. नंतरच्या काळात लिहिलेल्या "वत्सगुल्म

महात्म्य'' तील वर्णनाप्रमाणे या टिकाणी वत्सनामक ऋषीने आपल्या तपश्चर्येने देशांच्या समुहांना (गुल्म) येथे येऊन त्याच्या आश्रमात वस्ती करावयास लावली म्हणून या टिकाणाला वत्सगुल्म हे नाव पडले. वात्स्यायनाने त्याच्या ''कामसूत्रात'' (श्लोक ५.३) वत्सगुल्म येथे राहणाऱ्या लोकांचा वत्सगुल्मक असा उल्लेख केला आहे. यशोधर त्याच्या कामसूत्रावरील जय मंगला नामक टीकेत शहराभोवतालच्या प्रदेशाला वत्सगुल्मक म्हणतो. त्याच्या म्हणण्याप्रमाणे दक्षिणापथाचे दोन राजपुत्र वत्स व गुल्म या दोन सख्ख्या भावांनी वसविलेल्या प्रदेशास त्यांच्या नावावरून[१७३] वत्सगुल्म हे नाव पडले. वाकाटकांच्या वाङ्मय प्रेमामुळे आणि त्यांनी दिलेल्या आश्रयामुळे ते विद्येचे प्रमुख केंद्र बनले. येथे विकसित झालेली प्राकृत काव्य शैली वच्छोमी (वत्सगुल्मी) या नावाने सर्वत्र मान्यता पावली.[१७४] सुप्रसिद्ध संस्कृत-प्राकृत विद्याव्यासंगी राजशेखर यास या गावाबद्दल फार आकर्षण होते. या शहराचे त्याच्या ''काव्यमीमांसा'' ग्रंथात वर्णन करताना तो म्हणतो, ''या टिकाणी पौराणिक काव्य पुरुषाचा वाङ्मय विद्येशी[१७५] विवाह झाला आहे आणि हे स्थान देवाचे क्रीडास्थान आहे.'' राजशेखर या शहराचा अंतर्भाव विदर्भामध्ये करतो (विदर्भेषु वत्सगुल्मं नाम नगरम), परंतु वात्स्यायन ही दोन्ही[१७६] नावे वेगवेगळी समजतो असे दिसते. सर्वसेन हा मोठा प्राकृत कवी होता. त्याने प्राकृतात रचलेले ''हरिविजय'' हे काव्य दुर्दैवाने आज उपलब्ध नाही. परंतु ख्यातनाम विद्याव्यासंगी टिकाकारांनी या काव्याची स्तुती केलेली आहे. या काव्याची स्तुती दण्डिनने त्याच्या ''अवन्ति सुंदरी'' कथामध्ये, आनंदवर्धन याने त्याच्या ''ध्वन्य-आलोक'' आणि कुंतकाने ''वक्रोक्ति जीवितम्'' मध्ये त्याची तुलना कालिदासाशी[१७७] केली आहे. जरी त्याचे हे काव्य गहाळ झाले असले तरी त्याने रचलेल्या काही प्राकृत गाथांचा समावेश ''गाथासप्तशती''[१७८] या प्रसिद्ध काव्यात केलेला आहे.

**विन्ध्यशक्ति द्वितीय (विन्ध्यसेन) :** सर्वसेनानंतर त्याचा पुत्र विन्ध्यसेन हा गादीवर आला. त्याला इ. स. ३५५ मध्ये राज्य करीत असलेल्या व हेच नाव असलेल्या त्याच्या आजोबांपासून वेगळे ओळखता यावे म्हणून त्याच्या नावासमोर दोन हा आकडा लावलेला आहे. त्याने त्याचा वाशीम ताम्रपट[१७९] सदतीसाव्या शासन वर्षी दिलेला आहे यावरून त्याने पंचेचाळीस वर्षे राज्य केले असावे अशी समजूत आहे. त्याच्या सत्तेचा अस्त इ. स. ४०० च्या सुमारास झाला असावा. त्याचा पिता सर्वसेन प्रथम ह्याच्याप्रमाणेच त्याने धर्म-महाराज ही पदवी धारण केली होती असे त्याच्या वाशीम ताम्रपटावरून[१८०] दिसते. या वाशीम ताम्रपटात नान्दीकड (नांदेड) विभागात असलेले एक गाव दान दिल्याच्या उल्लेखावरून त्याच्या राज्यात मराठवाडा प्रदेशातील काही भागाचा अंतर्भाव होत होता असे दिसते. त्याच्या प्रभुत्व क्षेत्राची निश्चित माहिती नाही. हरिषेणाच्या वेळच्या अजंटा शिलालेखांमध्ये याचा उल्लेख विन्ध्यसेन[१८१] असा केला असून त्याने कुंतलच्या राजाचा पराभव केल्याचे नमूद केले आहे.[१८२]

कुंतल नाव येथे यावेळी वनवासीच्या[१८३] कदंब वंशाच्या सत्तेखाली असलेल्या उत्तर कर्नाटक प्रदेशाचा निर्देश करते. या वेळेपासून वाकाटकांनी कदंबांच्या अंतर्गत कारभारात ढवळाढवळ करण्यास प्रारंभ केला. पुढे जेव्हा कदंब राज्याचे दोन भागात विभाजन झाले तेव्हा वाकाटकांचे कदंब कारभारात चांगलेच प्रस्थ वाढले होते. दोन कदंब राजांपैकी एकाने वाकाटकांच्या वत्सगुल्म शाखेची मदतही घेतली होती. यामुळे कदाचित देवसेन राज्यावर येण्यापूर्वी किंवा देवसेन राज्य करीत असताना वाकाटकांनी बीदर प्रदेश आपल्या अमलाखाली आणला असावा. याशिवाय त्याची कारकीर्द आणखी एका कारणाने महत्त्वपूर्ण टरली आहे ते म्हणजे ताम्रपटांसाठी प्राकृत भाषेऐवजी हळूहळू होऊ लागलेला संस्कृत भाषेचा उपयोग होय. त्याच्या वाशीम ताम्रपटातील लेखाच्या आरंभाचा राजवंशाच्या प्रशस्तीचा भाग संस्कृतमध्ये असून नंतरचा दानविषयक भाग प्राकृत[१८४] मध्ये आहे. खरे म्हणजे हे दान घेणाऱ्या व्यक्तीलाही संस्कृतचे चांगले ज्ञान असेलच, परंतु इतर ज्या लोकांना, संस्कृत माहीत नाही, त्यांनाही हे दानपत्र समजावे म्हणून त्यांच्यासाठी हा भाग प्राकृतमध्ये लिहिला असावा. हीच गोष्ट आधी दिलेल्या दानपत्रांच्या बाबतीतही लागू होईल. यावेळेपासून सर्व दरबारी कामकाजासाठी प्राकृत ऐवजी पूर्णपणे संस्कृत वापरण्यात येऊ लागले. कारण संस्कृत आता राजभाषा झाली होती.

**प्रवरसेन द्वितीय :** विन्ध्यशक्ति दुसरा याचा पुत्र प्रवरसेन द्वितीय हा इ. स. ४०० च्या सुमारास गादीवर आला. त्याला या राजवंशाच्या दोन्ही शाखांचा पूर्वज प्रवरसेन प्रथमच्या नामसादृष्यामुळे प्रवरसेन द्वितीय म्हणणे योग्य होईल. तो आपल्या उत्कृष्ट, बलशाली व उदार शासनाने कीर्तिमान झाला असे अजंटा लेखामध्ये संदिग्ध शब्दात त्याचे वर्णन आहे, तर नुकत्याच प्राप्त झालेल्या देवसेनाच्या बीदर ताम्रपटामध्ये त्याला वंशावळीच्या भागात महाराज[१८५] म्हटले आहे. अजंटा लेखातील नोंदी सांगितल्याप्रमाणे त्याच्यामागून गादीवर आलेला त्याचा पुत्र राज्यारोहणाच्या[१८६] वेळेस फक्त आठ वर्षांचा होता. यावरून असे दिसते की, एकतर त्याने फार थोडा काळ राज्य केले असावे किंवा त्याला फार उशिरा पुत्रप्राप्ती झाली असावी. कदाचित त्याने पंचवीस वर्षे राज्य केले असावे.

**सर्वसेन द्वितीय :** प्रवरसेन द्वितीय नंतर इ. स. ४२५ मध्ये त्याचा आठ वर्षांचा मुलगा गादीवर आला. अजंटा लेखांतील त्याचे नाव नष्ट झाले आहे. त्याने उत्तम रीतीने राज्य केले असे त्यात त्याचे वर्णन आहे, परंतु नुकत्याच प्राप्त झालेल्या देवसेनाच्या[१८७] बीदर ताम्रपटामुळे व त्याचा नातू हरिषेण[१८८] याच्या थाळनेर ताम्रपटामुळे त्याचे नाव उजेडात आले आहे. परंतु या ताम्रपटांमधून नावाव्यतिरिक्त त्याच्या जीवनाविषयी काहीही माहिती मिळत नाही. त्याच्या एका राजकीय कार्याविषयी ज्ञान देणारे महत्त्वपूर्ण साधन प्राप्त झाले आहे ते म्हणजे कर्नाटकाच्या चिकमंगलूर जिल्ह्यात तेरिकेरे तालुक्यात मुडिगेरे येथे कदंब राजा विष्णुवर्मन याचा

पुत्र सिंहवर्मन याचा मिळालेला ताम्रपट होय. या ताम्रपटानुसार सिंहवर्मनचा महाराज सर्वसेनने राज्याभिषेक[१८९] करून सन्मान केला होता. या कालखंडात "सेन"[१९०] शब्द शेवटी असणारी नावे पश्चिम-दक्षिण भारतामध्ये फक्त वाकाटकांनीच धारण केली होती असे दिसते. सर्व वाकाटक राजांची नावे या प्रकारची आहेत ही गोष्ट लक्षात घेता कदंबाच्या या ताम्रपटात उल्लेखिलेला महाराज सर्वसेन हा वाकाटकवंशीय राजा असावा असे समजणे चुकीचे होणार नाही. वाकाटकांच्या पद्मपूर-नन्दिवर्धन-प्रवरपूर शाखेमध्ये या नावाचा कोणीही राजा नाही. पण वत्सगुल्म शाखेमध्ये या नावाचे दोन राजे होते. या वंशाचा संस्थापक सर्वसेन प्रथम होता. त्याने इ. स. ३२५-३५५ ह्या कालखंडात राज्य केले. त्यामुळे कदंबांच्या अंतर्गत राज्यकारभारात पराभूत सिंहवर्मनचा पक्ष घेऊन हस्तक्षेप करणारा सर्वसेन हा सर्वसेन प्रथम असणे शक्य नाही. कारण हा फार आधीच्या काळात राज्यावर होता आणि सिंहवर्मन सुद्धा सर्वसेन प्रथमच्या समकालीन असणे शक्य दिसत नाही. ही गोष्ट लक्षात घेऊन ज्यांनी हा लेख आपल्या "कॉर्पस ऑफ कदंब इन्स्क्रिप्शन्स"मध्ये समाविष्ट केला आहे त्या बी. आर. गोपाल यांनी अशा प्रकारचे तादात्म्य[१९१] करण्याच्या मार्गात कालक्रमासंबंधाने अडचणी आहेत असे विधान केले आहे. आतापर्यंत या नावाचा दुसरा कोणी राजा ज्ञात नसल्यामुळे याची समाधानकारक रीतीने ओळख पटविणे कठीण होते. परंतु सर्वसेन प्रथम याच्या, ज्याचे नाव अजंठा शिलालेखात नष्ट झाले आहे. त्याच्या नातवाचे नावही सर्वसेन होते असे अलीकडेच प्राप्त झालेल्या देवसेन याच्या बीदर ताम्रपट व हरिषेण याच्या थाळनेर ताम्रपटामुळे ज्ञात झाले आहे. यापूर्वी वर्णन केल्याप्रमाणे तो सुमारे इ. स. ४२५ मध्ये गादीवर आला, आणि राज्यारोहणसमयी फक्त आठ वर्षाचा असल्यामुळे त्याने दीर्घ काळ राज्य केले असले पाहिजे. ज्याअर्थी त्याच्या मागून येणारा राजा देवसेन याची पहिली ज्ञात तिथी शक ३८० किंवा इ. स. ४५८ आहे त्याअर्थी त्याचा पिता सर्वसेन द्वितीयची सत्ता या तिथीपूर्वी संपुष्टात आली असली पाहिजे. कदंब राजा सिंहवर्मन यास सिंहासन प्राप्त करून देणारा हाच सर्वसेन असला पाहिजे. तथापि, सिंहवर्मनची पहिली ज्ञात तिथी इ. स. ४९०[१९२] आहे. म्हणजे सर्वसेन ह्याची शेवटची ज्ञात तिथी व सिंहवर्मनची पहिली तिथी यामध्ये तीस वर्षांचे अंतर आहे. तथापि, वाकाटकांच्या बहुतेक लेखांप्रमाणे कदंब नृपतींच्या लेखांमध्ये त्या त्या राजाच्या शासनवर्षाच्या तिथी दिलेल्या आहेत. त्यामुळे यापैकी कोणत्याही राजाची वैयक्तिक तिथी निश्चित करता येत नाही, तर केवळ ठोकळमानाने त्यांचा शासनकाल सांगता येतो. त्यामुळे कदंब वंशाचा कालक्रम अजूनही अनिश्चित पायावर आधारलेला आहे. परिणामी ज्ञात असलेला हाच सर्वसेन कदंब राजा सिंहवर्मन याचा समकालीन किंवा थोडा फार समकालीन असू शकतो. त्यामुळे त्याचे तादात्म्य ज्ञात असलेल्या या एका लेखात उल्लेखिलेल्या सर्वसेनाशी करावे लागेल आणि सिंहवर्मनचे राज्यारोहण तीन दशकांपेक्षा थोडे जास्त मागे न्यावे लागेल. कदंब राजवंशाच्या कालक्रमातील (Chronology) अनिश्चितता लक्षात घेता हे कठीण नाही. परंतु सिंहवर्मन याच्या मुडिगेरे ताम्रपटातील हे विधान प्रामुख्याने

त्याच्या राज्यारोहणाची तिथी निश्चित करण्याच्या दृष्टीने व कदंब वंशाचा कालक्रम सामान्यपणे ठरविण्याचे दृष्टीने अतिशय महत्त्वपूर्ण पुरावा होय. कदंब राजा सिंहवर्मन याला सर्वसेनाच्या हातून राज्याभिषेक करवून घेण्यात सन्मान वाटला या वर्णनावरून त्याला सर्वसेनाबद्दल वाटत असलेला आदर स्पष्ट होतो. जर याचे स्पष्टीकरण योग्य रीतीने केले तर सिंहवर्मन स्वतःला वाकाटक राजा सर्वसेन द्वितीयचा मांडलिक नव्हे तर कनिष्ट मित्र समजत होता. या गोष्टीचा वाकाटक-कदंब संबंधाचे स्वरूप व स्पष्टीकरणास उपयोग होतो. वाकाटक वंश विदर्भ आणि त्याला लागून असलेल्या महाराष्ट्राच्या प्रदेशावर राज्य करीत होता आणि काही काळ त्यांची सत्ता आंध्र व कर्नाटकाच्या लागून असलेल्या प्रदेशावरही पसरली होती आणि नंतर ती कर्नाटकाच्या कुंतल भागावरही स्थापन झाली होती. येथील काही राजे वाकाटकांचे दुय्यम राजे म्हणूनही राज्यकारभार करीत होते.

यावरून सर्वसेन द्वितीय हा फार बलशाली राजा होता असे दिसते. वत्सगुल्म शाखेच्या या राजाला केवळ वारसा हक्काने मिळालेले वडिलोपार्जित राज्यच टिकवले असे नव्हे, तर शेजारच्या कदंब राज्यामध्ये यशस्वी हस्तक्षेप करून स्वतःची तसेच आपल्या वंशाची प्रतिष्टा वाढवली.

**देवसेन :** सर्वसेन नंतर इ. स. ४५५ ते ४५८ च्या दरम्यान देवसेन राजा झाला. त्याच्याबद्दल माहिती देणारे जे तीन लेख उपलब्ध आहेत ते म्हणजे त्याचा अधिकारी स्वामिल्लदेव याने दिलेला हिस्सेबोराळा[१९३] शिलालेख, लंडनच्या इंडिया ऑफीसमध्ये ठेवलेला अपूर्ण ताम्रपट आणि त्याच्या पाचव्या शासनवर्षी दिलेला बीदर ताम्रपट हे होत. बीदर ताम्रपटाची लोखंडाची प्रतिकृती सध्या हैद्राबादच्या[१९४] बिर्ला आर्किऑलॉजिकल अँड कल्चरल रिसर्च इन्स्टिट्यूटमध्ये ठेवलेली आहे. यापैकी इंडिया ऑफीस ताम्रपट वाकाटक राजा देवसेन याने वत्सगुल्महून (वत्सगुल्म) दिला होता. त्याद्वारे आपणास देवसेनाबद्दल माहिती मिळत नाही. कारण त्यामध्ये फक्त एक गाव दान दिल्याची नोंद केलेली आहे. बाकीच्या लेखांना त्यांचे स्वतंत्र महत्त्व आहे व त्यामधून त्यांच्या विषयी माहिती मिळते. बीदर ताम्रपटावरून त्याने "धर्ममहाराज"[१९५] पदवी धारण केली होती असे समजते. थाळनेर ताम्रपटात त्याचा हरिषेणाचा पिता म्हणून उल्लेख आहे व त्याच्या नावामागे फक्त महाराज[१९६] हीच पदवी आहे, परंतु अजंटा (लेणे क्र. १६) आणि घटोत्कच लेण्यातील हरिषेणाचा मंत्री वराहदेव याच्या लेखानुसार वराहदेवाच्या पित्याचे नाव हस्तिभोज होते. हा हस्तिभोज वेल्लुरच्या ब्राह्मण घराण्यातील असून हरिषेणाचा मंत्री किंवा प्रधान[१९७] होता. त्याच्यावर राज्यकारभाराची सर्व जबाबदारी सोपवून देवसेन विषयोपभोगात[१९८] आपला वेळ घालवीत असे. पण या विधानाचा शब्दशः अर्थ घेण्याची जरुरी नाही. कारण वराहदेव ज्या प्रधान घराण्यातील[१९९] होता त्या घराण्याचे महत्त्व वाढविण्यासाठी केवळ हे विधान केलेले आहे.

हिस्सेबोराळा शिलालेख देवसेनाचा अधिकारी (आज्ञाकार) स्वामिल्लदेव याने खोदलेल्या तलावाची माहिती देतो. हा लेख शक ३८०[२००] किंवा इ. स. ४५७-५८ अशी तिथी देतो. हा तिथी उल्लेख फक्त देवसेन आणि त्याची वत्सगुल्म शाखा यांच्या दृष्टीनेच महत्त्वपूर्ण आहे असे नव्हे, तर पूर्ण वाकाटक राजवंशाच्या दृष्टीनेही महत्त्वपूर्ण आहे. कारण वाकाटकांच्या संबंधात ज्ञात असलेली ही एकच निश्चित तिथी आहे. जर या तिथीबरोबर त्यासंबंधित शासन वर्ष दिले असते तर त्याच्या राज्यरोहणाची तिथी निश्चित करता आली असती. तेव्हा हे वर्ष देवसेनाच्या शासन कालात येते, इतकेच म्हणता येईल.

बीदर ताम्रपटानुसार देवसेन याने चार वेदांमध्ये निष्णात असलेल्या (चातुर्वेज्ज = चातुर्विद्य) रद्दोच्च याला यज्ञीय हवन (Sacrificial offerings) करण्याकरिता वेल्पकोण्ड गाव दान दिले होते. हे दानपत्र तयार करणारा स्वामिल्लदेव व वरील लेखात उल्लेखिलेला स्वामिल्लदेव या एकच व्यक्ती असाव्यात. हे दानपत्र त्याच्या पाचव्या शासन वर्षी दिलेले होते व हे शासन वर्ष शक ३८० नंतर लगेचच आले असावे. सदर लेखाचे प्राप्तिस्थान जर बरोबर दिले असेल तर ऐतिहासिकदृष्ट्या तो फार महत्त्वपूर्ण आहे. जर हा ताम्रपट मूलतः बीदर येथे मिळाला असेल, तर वाकाटकांच्या वत्सगुल्म शाखेची सत्ता उत्तर कर्नाटकात पसरली होती असे दिसते. या ताम्रपटात उल्लेखिलेली स्थलनामे विशेषतः दान दिलेल्या गावाचे नाव या अनुमानास पुष्टी देतात. 'कोण्ड' या शब्दानी शेवट होणारी स्थलनामे साधारणपणे कर्नाटकात आढळतात. विन्ध्यशक्ति द्वितीयच्या वेळेसच नांदेड (नान्दीकड) प्रदेश वाकाटकांच्या राज्याचा भाग होता आणि अजंटा शिलालेखानुसार त्याने कुंतल किंवा उत्तर कर्नाटकाचा भाग जिंकला होता. यापूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे कदंब नृपती सिंहवर्मन याला मुडिगेरे दानपत्रात वर्णिल्याप्रमाणे महाराज सर्वसेनाने सिंहासनावर बसविले होते आणि सर्वसेन हे नाव धारण केलेला राजा देवसेनाचा पिता होता. कदंब राजवंशाच्या अंतर्गत कारभारात केलेल्या हस्तक्षेपाचा परिणाम म्हणून वाकाटकांनी निदान उत्तर कर्नाटकाचा काही भाग आपल्या सैन्याच्या अमलाखाली आणला असावा. बीदर ताम्रपट प्राप्त झाल्यामुळे बीदर सभोवलातचा प्रदेश व बीदर आणि आन्ध्रप्रदेश याच्यामधील प्रदेश देवसेनाच्या पाचव्या शासन वर्षापर्यंत वाकाटक राज्याला जोडला गेला होता याबद्दल संशय राहत नाही. वत्सगुल्म शाखेचा हा निःसंशय महत्त्वपूर्ण विजय होता.

देवसेन हा वाकाटकांच्या दुसऱ्या शाखेचा राजा नरेन्द्रसेन याचा समकालीन होता. त्याचे कंदब राजवंश आणि दुसऱ्या शाखेच्या त्याच्या चुलत भावाबरोबरचे संबंध यांचा परस्परांशी संबंध असणे शक्य आहे. नरेन्द्रसेन याचा कदंब राजकन्येबरोबर विवाह झाला होता. ही कदंब राजकन्या कदाचित काकुस्थवर्मनची मुलगी किंवा नात असेल. यामुळे देवसेन नाराज झाला असावा आणि त्याने त्याचा बराच प्रदेश काबीज केला

असावा. या घटना नक्की कशा घडल्या असतील यावर भविष्यकालातील संशोधनच प्रकाश टाकू शकेल. कदाचित नरेन्द्रसेन व कदंब राजवंश यांच्याविरुद्ध मदत मिळविण्यासाठी देवसेनाने आपल्या मुलीचा विवाह अतिशय बलशाली असा विष्णुकुण्डिन नृपती माधववर्मन द्वितीय जनाश्रय याच्या बरोबर करून दिला असावा. असे म्हणतात की, माधववर्मनचा पुत्र विक्रमेन्द्रवर्मन प्रथम याने आपल्या जन्माने विष्णुकुण्डिन व वाकाटक या दोन्ही राजवंशांना गौरव प्राप्त करून दिला. वाकाटक सत्तेचा ऱ्हास झाल्यानंतर या नातेसंबंधी जास्त महत्त्व प्राप्त झाले.

सुदर्शन तलाव खोदणे ही त्याच्या काळातील अतिशय महत्त्वपूर्ण घटना आहे. वाकाटक राजे प्रजाहितदक्ष होते. प्रजेला पिण्यास पाणी पुरविणे व पाटबंधारे काढणे वगैरे दृष्टीने मदत करण्यास ते तत्पर होते हे यावरून स्पष्ट होते. या तलावाचे सुदर्शन हे नाव आपणास चंद्रगुप्त मौर्य याच्या शासन कालात त्याच्या हुकुमाने खोदल्या गेलेल्या सुदर्शन तलावाची आठवण करून देते. उत्तर-दक्षिण भारतामध्ये तलावांकरिता सुदर्शन हे नाव फारच प्रिय झाले होते. रामटेक[२०१] येथील केवल नरसिंह मंदिरातील शिलालेखावरून असे कळते की, वाकाटक नृपती रुद्रसेन द्वितीय याची अग्रमहिषी प्रभावतीगुप्ता हिच्या स्मरणार्थ खोदलेला तलावही सुदर्शन या नावाने ख्यात होता. हिस्सेबोराळा शिलालेखामध्ये आर्य स्वामिल्लदेव याने तलाव खोदल्याचा उल्लेख आहे. हा स्वामिल्लदेव सौराष्ट्रातून म्हणजे ज्या भागात मूळ सुदर्शन तलाव खोदलेला होता त्या प्रदेशातून आला होता. वाकाटकांचा हा एकच लेख शक संवताची तिथी असलेला असा आहे. त्यांचे सर्व लेख राज्य करीत असलेल्या नृतपींच्या वैयक्तिक शासन वर्षाच्या तिथी असलेले आहेत. हा शिलालेख प्राचीन तलावाच्या अवशेषांमध्ये प्राप्त झाला.

**हरिषेण :** देवसेनानंतर इ. स. ४८० मध्ये त्याचा पुत्र हरिषेण हा गादीवर आला. याच्या राज्यकालाविषयी माहिती पुरविणारे चार लेख उपलब्ध आहेत. वाकाटक राजवंशाच्या या शाखेच्या इतर कोणत्याही राजाचे इतक्या मोठ्या संख्येने लेख प्राप्त झाले नाहीत. या लेखांपैकी एक त्याने दिलेला ताम्रपट आहे व बाकीचे अजंटा येथील लेणे क्र.१६ व १७ आणि जवळच असलेल्या घटोत्कच लेण्यांत असलेले शिलालेख आहेत. त्याच्या तिसऱ्या शासनवर्षी[२०२] दिलेला थाळनेर ताम्रपट (प्राचीन स्थालकनगर, जिल्हा धुळे) हा एकच फक्त अधिकृतरित्या (official) दिलेला लेख आहे. बाकीच्या लेखांपैकी अजंटा[२०३] लेणे क्र.१६ व घटोत्कच लेण्यातील[२०४] शिलालेख हे वल्लुरच्या ब्राह्मण घराण्यातील शेवटचा ज्ञात सभासद वराहदेव या त्याच्या मंत्र्याने दिलेले आणि अजंटा लेणे[२०५] क्र. १७ मधील शिलालेख हरिषेणाच्या मांडलिकाने दिलेला आहे. या लेखांद्वारे आपल्याला वाकाटकांच्या वत्सगुल्म शाखेच्या ज्ञात असलेल्या शेवटच्या राजाविषयी चांगलीच माहिती मिळते.

हरिषेणाने त्याच्या काही पूर्वजांप्रमाणे धर्ममहाराज ही पदवी धारण केली नव्हती असे त्याच्या थाळनेर ताम्रपटावरून दिसते. ज्याच्या पूर्वपरवानगीने हा ताम्रपट दिला

होता तो गोमिकराज (गोमिकराज–आनुज्ञातम) हा या घराण्यातील[२०६] वयोवृद्ध सभासद असावा. पण हरिषेणाने स्थालकनगरच्या (हल्लीचे थाळनेर) विजयानंतर धुळे प्रदेश जिंकला होता, पराभूत राजा गोमिक याला मांडलिक म्हणून या प्रदेशावर राज्य करण्याची परवानगी दिली होती व या नुकत्याच मांडलिकत्व पत्करलेल्या राजाची त्याच्या प्रदेशात दान देण्याची[२०७] परवानगी घेतली होती असा दाखविणारा पुरावा नाही. खरे म्हणजे हा प्रदेश त्याने नव्याने जिंकला असे म्हणता येत नाही. कारण हा विभाग आधीपासूनच त्याला वारसाहक्काने मिळालेल्या राज्यामध्ये अंतर्भूत होता. त्याचप्रमाणे त्याने जळगावचा प्रदेश आपल्या राज्याला जोडला असे दर्शविणारा पुरावा नाही. हा ही भाग त्याने प्राप्त केलेल्या राज्यामध्ये समाविष्ट असला पाहिजे.

हरिषेणच्या मंत्र्याचे नाव वराहदेव होते. हा वराहदेव देवसेनाचा मंत्री हस्तिभोज याचा पुत्र होता. वराहदेवाने अजंठा लेणे क्र. १६ व गुळवाडा येथील घटोत्कच ही लेणी निर्माण केली व तेथे आपले लेख कोरविले. घटोत्कच लेण्यातील त्याच्या लेखांमध्ये त्यांच्या वंशाची आरंभापासून माहिती दिली आहे. त्याने स्वतःचा हरिषेणाचा मंत्री म्हणून उल्लेख केला आहे. तसेच आपला पिता देवराज म्हणजेच देवसेन याचा मंत्री होता हेही नमूद केले आहे. अजंठा येथील लेख वाकाटकांच्या वत्सगुल्म शाखेच्या इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण आहे. त्यामध्ये या शाखेच्या प्रारंभापासून म्हणजे या शाखेच्या संस्थापकाच्या आधीचे दोन राजे विन्ध्यशक्ति प्रथम व प्रवरसेन प्रथम यांच्या वेळेपासून झालेल्या स्थित्यंतरांची नोंद केली आहे. त्या लेखाचा बराचसा भाग खराब झाल्याने बरीच महत्त्वाची माहिती नष्ट झाली आहे. हरिषेणच्या संदर्भात (श्लोक १८) हा लेख असे सांगतो की, त्याने कुंतल, अवंती, कलिंग, कोसल, त्रिकूट, लाट आणि आंध्र हे प्रदेश जिंकले होते. बहुतकरून अपरांतचा समावेशही जिंकलेल्या प्रदेशांच्या[२०८] यादीत होता. याप्रदेशांपैकी कुंतलवर यावेळी कदंब वंशाची सत्ता होती आणि त्यांच्या अंतर्गत कारभारात सर्वसेनाने हस्तक्षेप केला होता. देवसेनाने उत्तर कर्नाटकाच्या काही भागावर आपली सत्ता स्थापन केली होती हे आपणास ज्ञात आहेच. हरिषेण याने या प्रदेशावरच्या मोहिमेत त्याच्या वडिलांना मदत केली असावी. इतर प्रदेशांच्या बाबतीतही, जरी प्रशस्तीमध्ये तसा स्पष्ट उल्लेख नसला तरी, असेच घडले असावे. अवंती प्रदेश गुप्तांच्या हातून गेला होता आणि बुधगुप्तानंतर दशपुरच्या औलिकर वंशाने अवंतिवर आपली सत्ता स्थापन केली होती. वलभीच्या मैत्रक वंशालाही आपल्या सत्तेखाली[२०९] आणले होते. हरिषेणने या प्रदेशावर[२१०] आक्रमण केले असण्याची शक्यता आहे. कलिंग या संज्ञेने अंदाजे ओरिसामधील पुरी-गंजम विभाग व आन्ध्रप्रदेशातील विशाखापट्टनम व श्रीकाकुलम या भागाचा बोध होतो. मिराशींच्या मते कलिंगमध्ये गंग राजवंशाच्या स्थापनेत हरिषेणाची महत्त्वाची भूमिका असावी. त्याच्या मदतीनेच इ. स. ४९८ मध्ये कलिंग देशात गंगाच्या राज्यस्थापनेचा निदर्शक असा गंग संवत् सुरू झाला असावा. मध्यप्रदेशातील छत्तीसगड विभाग

म्हणजे प्राचीन कोसल होय. हरिषेणाने शरभपुरी याच्या राज्य कालांत कोसलवर आक्रमण केले असण्याची शक्यता आहे. त्रिकूट म्हणजे उत्तर कोकणातील त्रैकूटक राज्य हे स्पष्टच आहे आणि ज्ञात असलेला शेवटचा त्रैकूटक राजा व्याघ्रसेन याने इ. स. ४९२[२११] पर्यंत राज्य केले. हरिषेणाने येथील अनिश्चित राजकीय परिस्थितीचा फायदा घेऊन येथे आपली सत्ता स्थापन केली असणे अशक्य नाही. गुजरातमधील नवसारी-भडोच प्रदेश प्राचीन काळी लाट या नावाने ख्यात होता. हरिषेणाने त्याच्या अंमलाखाली आधीपासूनच असलेल्या खानदेश प्रदेशातून लाट देशावर विजयी आक्रमण केले असावे. आन्ध्रप्रदेशामध्ये त्याचा शालक विष्णुकुण्डिन राजा माधववर्मन दुसरा जनाश्रय हा राज्य करीत होता. याने इ. स. ४७०-७१ किंवा इ. स. ४७८-७९ पासून राज्य केले असावे. तो हरिषेणानंतरही[२१२] राज्य करीत होता. आपल्या विजयी मोहिमांमध्ये तो रेवा नदीपर्यंतच्या प्रदेशावर चाल करून गेला होता आणि त्रिकूट व मलय पर्वतांचा स्वामी झाला होता. काही विद्वानांचे असे मत आहे की, हरिषेणाने आंध्रप्रदेशावर आक्रमण करून तेथे राज्य करीत असलेल्या शालंकायन राजवंशाची सत्ता नष्ट केली व त्याजागी विष्णुकुण्डिन राजा माधववर्मन याची स्थापना करून तेथे मोठीच राज्यक्रांती घडवून आणली. वर उल्लेखिलेल्या काही सत्य घटना आणि विष्णुकुण्डिन हा इ. स. पाचव्या शतकाच्या[२१३] आरंभी राज्यावर आला ही गोष्ट लक्षात घेता असे घडणे सर्वस्वी अशक्य आहे हे एकच उदाहरण या सर्व गोष्टीविरुद्ध जाण्यास पुरेसे आहे. त्याने काही प्रदेशांवर धावती आक्रमणे केली असण्याची शक्यता आहे. पण प्रशस्तीकारांनी या आक्रमणांना पूर्ण यशस्वी मोहिमांचे स्वरूप देऊन त्याने या प्रदेशांवर तसेच ज्या प्रदेशांवर त्याचे नातलग राज्य करीत होते किंवा ज्या प्रदेशावर लष्करी चढाई करण्याची गरज नव्हती तेही प्रदेश त्याच्या सत्तेखाली आणले असे दर्शविले आहे. त्यामुळे हरिषेणाची सत्ता उत्तरेस माळव्यापासून दक्षिणेत कुंतल प्रदेशापर्यंत आणि पश्चिमेस अरबी समुद्रापासून पूर्वेस बंगालच्या उपसागरापर्यंत[२१४] पूर्ण दक्षिण भारतावर पसरली होती किंवा तो इ. स. ५ व्या शतकाच्या उत्तरार्धात राज्य करणारा सर्व जगात[२१५] श्रेष्ठ असा राजा होता अशी दरबारी कवींची वर्णने अन्य सबळ पुराव्याच्या अभावी मान्य करणे चुकीचे होईल. तथापि एवढेच म्हणता येईल की, त्याच्या पित्याने वाकाटकांच्या दुसऱ्या शाखेच्या राज्यावर आपली सत्ता स्थापन करण्यासाठी चालू केलेली प्रक्रिया समर्थपणे शेवटास नेली. यासाठी त्याने त्या शाखेचा शेवटचा ज्ञात राजा पृथिवीषेण द्वितीय किंवा त्याच्या वारसाचा पराभव केला असावा किंवा वारसाच्या अभावी फारसा प्रतिकार न होता आपोआपच हा प्रदेश त्याच्या सत्तेखाली आला असावा. असेही म्हणता येईल की, त्याने जरी थोडा काळ राज्य केले तरी त्या काळात त्याच्या सैनिकी सामर्थ्यामुळे तसेच त्याच्या अंगच्या गुणांमुळे तत्कालीन राजवंशांमध्ये त्याला मानाचे स्थान होते. हरिषेण हा कलेचा आश्रयदाता होता. त्याचा मंत्री वराहदेव व बहुतेक त्या भागातील त्याचा सामंत यांनी अजंटा येथे बरीच बौद्ध लेणी तयार करून ती शिल्पाकृती व चित्रकलेनी सुशोभित केली. त्यांना या कामी त्यांच्या सुसंस्कृत राजाकडून[२१६] प्रोत्साहन मिळाले असावे. हरिषेणाच्या सामंताचे या लेखातील नाव नष्ट झाले आहे. हरिषेणाचा स्वतःचा बौद्ध

धर्माकडे चांगलाच ओढा असावा. त्याच्या प्राप्त झालेल्या दानपत्रानुसार त्याने काही ब्राह्मणांना गावे दान दिली होती हे ही स्पष्ट होते.

वाकाटक राजवंशाच्या वत्सगुल्म शाखेचा हरिषेण हा शेवटचा ज्ञात राजा आहे. वाकाटकांच्या दुसऱ्या शाखेचा पृथिवीषेण द्वितीय जसा शेवटचा राजा होता. त्याप्रमाणे हा वत्सगुल्म शाखेचा शेवटचा राजा होता. त्याची सत्ता इ. स. ५१० च्या[२१७] सुमारास संपुष्टात आली. याप्रमाणे या दोनही शाखांचा थोड्या थोड्या अंतराने अस्त झाला.

सद्यःस्थितीत वाकाटक सत्तेचा आकस्मिक अस्त होण्यामागील निश्चित कारणे सांगणे शक्य नाही. मार्क कोलीन्सच्या मते दण्डीनच्या **दर्श-कुमार-चरित** च्या विश्रुत चरितामध्ये (आठवा उच्छवास) विदर्भातील[२१८] तत्कालीन राजकीय परिस्थितीचे प्रत्यक्ष वर्णन आहे. वा. वि. मिराशींच्या निष्कर्षानुसार हे वर्णन म्हणजे हरिषेणाच्या मृत्यूनंतर झालेल्या वाकाटकांच्या अंताचा प्रत्यक्ष धावता वृत्तांत आहे. त्यांनी या वर्णनानुसार सत्ता अस्ताला नेणाऱ्या[२१९] घटना कशा कशा घडल्या असतील हे नमूद केले आहे. आणि त्यांचे हे मत सर्वमान्य[२२०] झालेले आहे. तथापि असेही म्हणता येते की, शेवटच्या उच्छवासाप्रमाणेच आधीच्या भागांमध्ये मगधच्या सिंहासनावरून दूर केलेला पौराणिक (Mythical) राजा राजहंसचा पौराणिक पुत्र राजवाहन याचा पाठलाग करून त्याच्यावर विजय मिळविलेल्या इतर राजकुमारांचे वर्णन आहे. तेव्हा फक्त या आठव्या भागालाच इतर प्रकरणांपासून वेगळा काढून त्यातील माहिती विषयी वेगळा विचार करता येत नाही. त्यामुळे या प्रकरणात दिलेली कथा ही इतर कथे प्रमाणेच दण्डीन यानेच लिहिलेली आहे. म्हणून या कथेच्या आधारावर वाकाटकांच्या अंताला कारणीभूत ठरणाऱ्या घटनांची साखळी तयार करणे परिपूर्ण ठरत नाही. यासाठी उपलब्ध पुराव्याच्या मदतीने वाकाटकांच्या अंताची कारणे शोधावी लागतील.

पूर्वी नमूद केल्याप्रमाणे देवसेनाने आपल्या एका मुलीचा विवाह महत्त्वाकांक्षी विष्णुकुण्डिन राजा माधववर्मन दुसरा जनाश्रय याच्याशी करून दिला होता. या विष्णुकुण्डिन राजाने इ. स. ५१८ पर्यंत राज्य केले. त्याचा एक लेख खानापूर[२२१] येथे प्राप्त झाला. विष्णुकुण्डिन नाणी मोठ्या संख्येने वाकाटक[२२२] राज्यात तसेच महाराष्ट्रातही मिळालेली आहेत. यावरून असे दिसते की, विष्णुकुण्डिन राजे बहुतेक स्वतःला वाकाटक राज्याचे वारस समजत होते. त्या प्रदेशात ते राहत होते आणि त्यावर त्यांनी काही काळ[२२३] राज्यही केले.

ज्या नलवंशानी नंदिवर्धन शाखेच्या राज्यावर आक्रमण केले त्या वंशाचे राजे बलशाली होते. त्यांचे सामर्थ्य बदामीच्या चालुक्य वंशाचा राजा कीर्तिवर्मन (इ. स. ५६६-६७ ते ५९७-९८) याने नष्ट करेपर्यंत तसेच कायम होते. कीर्तिवर्मनला नलांची[२२४] काळ रात्री (काळरात्र) असे म्हटले आहे. नलांनी वाकाटक राज्याचा बराच भाग व्यापला असावा.

कुंतल देशाच्या कदंब राज्याचे आधी वर्णन केल्याप्रमाणे वाकाटकांशी शत्रुत्वाचे संबंध होते. हरिषेणाने त्यांच्या राज्यावर आक्रमण करून त्यांना नाराज केले होते.

पुलकेशी द्वितीय याच्या ऐहोळे शिलालेखात कीर्तिवर्मनला कदंबाची काळरात्र[२२५] म्हटलेले आहे. यावरून कदंब बऱ्याच काळपर्यंत इतरांना जाणीव देण्याइतपत बलशाली राहिले असे म्हणावे लागेल. कदंबांनी हरिषेणानंतर आलेल्या राजाच्या दुबळेपणाचा किंवा वारसाच्या अभावाचा फायदा घेऊन निदान वत्सगुल्म शाखेच्या राज्याचा भाग जिंकला असावा.

याशिवाय मुंडपुत्रांनी आणि कुंभकर्ण सरदारांनी वाकाटकांच्या दोन्ही शाखांच्या राज्याचा काही भाग जिंकला होता असे दाखविणारा पुरावा उपलब्ध आहे. मुंडपुत्र राजा आदित्यराज याच्या मल्हारा (तालुका अचलपूर, जिल्हा अमरावती) ताम्रपटामुळे एका ब्राह्मण घराण्याची माहिती मिळाली आहे. या घराण्याचे राष्ट्रमहाराज, राजकुल महाराज आणि आदित्यराज हे शेवटचे तीन राजे फार सामर्थ्यशाली होते. त्यांनी आपल्या विजयाप्रत्यर्थ अश्वमेध यज्ञ (एक किंवा जास्त) केले होते. या ताम्रपटावर कोणत्याही संवताची तिथी नाही. परंतु काही विशिष्ट गोष्टींमुळे हा वाकाटकोत्तर[२२६] कालखंडातील आहे असे म्हणता येते. या घराण्याचे प्रारंभीचे काही सभासद वाकाटकांचे नोकर असावेत. त्यांच्या अस्तानंतर या लोकांनी राजकीय सत्ता धारण केली आणि पद्मपूर–नंदिवर्धन–प्रवरपूर शाखेच्या राज्याचा बराचसा प्रदेश काबीज केला. कुंभकर्ण घराण्याचा शेवटचा राजा भानुषेण याच्या थाळनेर ताम्रपटाच्या प्राप्तीमुळे या घराण्याच्या पाच पिढ्यांची माहिती मिळाली. भानुषेण याने त्याच्या आधी होऊन गेलेल्या तीन शासकांप्रमाणे महाराज ही पदवी धारण केली होती. या घराण्याचा पहिला राजा जयराज याचा उल्लेख पहिला महाराज (आदि–महाराज) असा आहे. हा वाकाटकांच्या सत्तेच्या अंतानंतर खानदेश भागात राज्यावर आला. हे घराणे बदामीच्या[२२७] चालुक्य वंशाने नष्ट केले.

अखेरीस इसवी सनाच्या सहाव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास पद्मपूर–नंदिवर्धन–प्रवरपूर शाखेच्या सत्तेखाली असलेला प्रदेश माहिष्मतीच्या प्रारंभीच्या कलचुरि वंशाचा पहिला ज्ञात राजा कृष्णराज याने जिंकला व येथील कारभार त्याच्या मांडलिकाकडे सोपविला असे कलचुरि–चेदि संवताच्या तीनशे बावीसाव्या वर्षीच्या म्हणजेच इ. स. ५७३[२२८] मध्ये दिलेल्या स्वामिराज याच्या नगरधन ताम्रपटावरून दिसते. त्यांनी मुंडपुत्रांच्या सत्तेचा समूळ उच्छेद केला किंवा वाकाटक राज्याचा काही भाग त्यांच्याकडेच ठेवला हे खात्रीपूर्वक सांगता येत नाही. कलचुरि कृष्णराजाची समकालीन राजवंशांमध्ये ''कृष्णराज-रुपक'' म्हणून ख्यात असलेली नाणी वाकाटकांच्या या शाखेच्या राज्यामध्ये सर्वत्र मिळाली आहेत.

अशा रीतीने विन्ध्यशक्ति प्रथम[२२९] याने स्थापन केलेल्या आणि त्याच्या कार्यक्षम वारसांनी भरभराटीस आणलेल्या प्रभावी वाकाटक राज्याचा अंत झाला.

---

## तळटिपा

१ शास्त्री, अजय मित्र, "न्यू वाकाटक इन्स्क्रिप्शन्स," **ए. व्ही.**, पृ. २२७–६८, "दि मुडिगेरे इन्स्क्रिप्शन ऑफ सिंहवर्मन अ‍ॅण्ड कदंब–वाकाटक रिलेशन्स," सी. मार्गबंधु व इतर (संपा.), **इंडियन आर्किऑलॉजिकल हेरिटेज : के. व्हि. सौंदरराजन फेलिसिटेशन व्हॉल्यूम,** आगम कला प्रकाशन, दिल्ली १९९१, पृ. ३१७–१९.

२ "सम अनपब्लिशड् अमरावती इन्स्क्रिप्शन्स", **इ. आय.**, १५, पृ. २६०–६१.

३ **नागपूर युनिव्हर्सिटी जर्नल,** ३, पृ. २२ त्यापुढे. "इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि वाकाटकाज," **सी. आय. आय.**, ५, आर्किऑजिकल सर्व्हे ऑफ इंडिया, उटकमंड, १९६५, पृ. ११–१६ (XI–XVI), **एम. एच. जी. एच.**, १, पृ. ११३–१६; **सी. एच. आय.**, भाग–१, पृ. १३०.

४ मजुमदार, आर. सी. अ‍ॅण्ड ए. एस. आळतेकर (संपा.) "दि वाकाटक–गुप्त एज," **एन. एच. आय. पी.**, ५, (नवीन आवृत्ती), मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, १९६०, पृ. ९६; **इ. एच. डी. वाय.,** पृ. १५४–५५.

५ **इ. आय.**, १५, पृ. २६७–६८, नं. २७.

६ कित्ता, पृ. २६०–६१.

७ **इ. आय.**, १५, पृ. २६०. त्यांनी हे नाव व्यक्तिनाम म्हणून घेतले आहे आणि आठ नंबरच्या लेखात (पृ. २६३) आलेले पाकोटकचे वाकाटक या शब्दाशी तादात्म्य केलेले आहे. (प या अक्षराचे जेव्हा ब या अक्षरात रुपांतर होते तेव्हा त्याचे ब असेही रूप होऊ शकते.) परंतु इतर टिकाणी (कित्ता, पृ. २६८) त्यांनी हे वंशनाम म्हणून घेतलेले आहे. सी. शिवराममूर्ति **(अमरावती स्कल्पचर्स इन मद्रास गव्हर्नमेंट म्युझियम,** न्यू सिरीज, जनरल सेक्शन ४, मद्रास, १९५६, पृ. ३०४, (नं. १२६) यांनी चंदा यांच्या मताची फक्त नोंद केली आहे.

८ आळतेकर आणि मजुमदार (संपा.), पूर्वोक्त.

९ वाकाटक कोणत्या टिकाणाहून आले याचा उल्लेख संबंधित कोरीव लेखात केला होता. परंतु तो भाग दुर्दैवाने नष्ट झाला आहे.

१० **इ. आय.** १५, पृ. २६२ नं. ३, ल्युडर्स लीस्ट नं. १२५०; अमरावती लेखामध्ये उल्लेखिलेली कलिंगा, तिच्या नावावरून ती कलिंगहून आलेली असावी, उपरोक्त नं. १२५१.

११ **सी. आय. आय.**, ५, पृ. ९४, ओळ ३–५, नुकताच प्राप्त झालेला देवसेनाचा बीदर ताम्रपट (ए. व्ही. पृ. २४८–५१) आणि हरिषेणाचा थाळनेर ताम्रपट (कित्ता पृ. २५१–५३) यावरून असे दिसते की, धर्म–महाराज ही पदवी या वंशाच्या विन्ध्यशक्ति प्रथम, प्रवरसेन प्रथम, आणि देवसेन या तीन राजांच्या नावाबरोबर आणि हारितीपुत्र ही पदवी फक्त शेवटच्या दोन नृपतींच्या नावामागे लावलेली होती.

१२ **सी. आय. आय.,** ५, पृ. १०३–११.

१३ कित्ता, पृ. ११२–१९.

१४ मिराशी, वा. वि., **वाकाटक नृपती आणि त्यांचा काळ,** नागपूर १९५७, पृ. २४.

१५ कित्ता, पृ. १०८, श्लोक. १२–१८; पृ. ११६–१७, श्लोक १०–१८.

१६ कित्ता, पृ. ११६, श्लोक ५.

१७ के. व्ही. रमेश, "दि वाकाटकाज ॲण्ड देअर इन्स्क्रिप्शन्स," **ए. व्ही.,** पृ. २९–३० यांच्या मते पुराणांत वाकाटकांचे संबंधीत प्रदेशाचे मूळ निवासी म्हणून वर्णन आहे त्यामुळे त्यांचे मूल स्थान विदर्भामध्ये शोधले पाहिजे असे त्यांचे मत आहे. ह्या संदर्भात ते वाकाटकांच्या विष्णुवृद्ध गोत्राला फार महत्व देतात आणि त्याबाबतीत पुराणांतील वर्णनाकडे आपले लक्ष वेधतात. पौराणिक वृत्तांतानुसार कोणा विजेत्याने विदर्भाच्या राजाच्या पत्नीचे जबरदस्तीने हरण करून तिला आपली पत्नी केले. या जबरदस्तीच्या संबंधातून जन्मलेली संतती विष्णुवृद्ध या नावाने ख्यात आहे. या वर्णनानुसार विष्णुवृद्ध गोत्राचा प्रारंभ किंवा जन्म विदर्भात झाला असे दिसते. या त्यांच्या विधानाला त्यांनी भाषिक दुजोरा दिलेला आहे. ते म्हणतात की, वाकाटक या नावाचा संस्कृत भाषेच्या दृष्टीने अर्थ लावता येत नाही. परंतु या नावातील **काट** हा शब्द **काडू** या शब्दाचे संस्कृत रूप असावे. सर्व द्राविड भाषांमध्ये **काडू** ह्या शब्दाचा अर्थ अरण्य, जंगल असा होतो. वाकाडू हे भाषेच्यादृष्टीने दक्षिण भारताचा भाग असलेल्या विदर्भातील एखाद्या प्रदेशाचे नाव असावे. त्याचप्रमाणे एस. व्ही. सोहोनी वाकाटकांचा संबंध मध्यप्रदेशातील निमाड जिल्ह्यातील महेश्वर जवळ व अजंठ्याजवळील घटोत्कच लेण्याजवळ वाकाड नाव असलेल्या चार खेड्यांशी लावतात. या वंशाचा प्रारंभिक ऐतिहासिक मंच सातपुडा व महादेव टेकड्यांच्या दक्षिणेला टेवण्याकडे त्यांचा कल आहे. (पहा : **जे. आय. एच.,** ४९, पृ. १३५–४२ वरील "वाकाटकांचे मूलस्थानावरील टिपण"). ही दोन्ही मते पुराणातील विन्ध्यकाज म्हणून केलेल्या वर्णनाशी मात्र जुळत नाहीत.

१८ पुराणातील नृपान वैदेशिकान या शब्दासमुहाचा अर्थ पार्जिटरने सुचविल्याप्रमाणे विदिशाचे राजे असा न घेता विविध प्रदेशांचे (किंवा प्रदेशातील) राजे या अर्थाने घेणे जास्त योग्य होईल.

१९ शास्त्री, अजय मित्र, "सम आस्पेक्टस् ऑफ पर्सनल नेम्स इन दि वाकाटक इन्स्क्रिप्शन्स," **जे. ओ. आय.,** ३६, पृ. २५४ आणि त्यापुढे.

२० **डी. के. ए.,** पृ. ७२.

२१ क्षहरात नहपानाशी तादात्म्य केलेला नखवान किंवा नखपान व त्याचे पूर्वज यांचा विदिशाशी काही संबंध नाही.

२२ विन्ध्यकानाम कुलस्य–आन्ते, ''तिसऱ्या शतकातील राजवंश,'' **डी. के. ए.**, पृ. ५०.

२३ रायचौधरी, एच. सी., **स्टडीज इन इंडियन अँटिक्विटीज,** दुसरी आवृत्ती, युनिव्हर्सिटी ऑफ कलकत्ता, १९५८, पृ. १०८–१४.

२४ मिराशी, व्ही. व्ही., **दि हिस्टरी ॲण्ड इन्स्क्रप्शन्स ऑफ दि सातवाहनाज ॲण्ड दि वेस्टर्न क्षत्रपाज,** महाराष्ट्र स्टेट बोर्ड ऑफ लिटरेचर ॲण्ड कल्चर, बॉम्बे, १९८१, पृ. ४५.

२५ शास्त्री, अजय मित्र, ''प्रेसिडेन्शिअल ॲड्रेस'', **पी. आय. एच. सी.,** १९७८, पृ. ९६९–७०.

२६ कर्नाटकाच्या धारवाड जिल्ह्यामध्ये चिक संदोगी येथे प्राप्त झालेल्या ५५३४ चांदीची आहत नाणी असलेल्या तांब्याच्या भांड्यावर (उपरोक्त, **पी. आय. एच. सी.,** पृ. ९६९) शांतस ऐवजी असलेले चांतस आणि इक्ष्वाकुंच्या कोरीव लेखांमध्ये सांतमूल ऐवजी असलेले चातमूल ही याबाबतची उदाहरणे म्हणून देता येतील.

२७ या दृष्टीने रसेल यांनी बैतुलच्या **सी. पी. डिस्ट्रिक्ट गॅझेटिअर** मध्ये (१९२७, पृ. २५८) नमूद केल्याप्रमाणे सातपुडा म्हणजे विन्ध्यचे सात पुत्र किंवा सातघड्या असा जो सामान्यपणे समज आहे तो खोडून काढावा लागेल. ही आख्यायिका सात म्हणजे सात आकडा हे या पर्वताच्या वैचित्र्यपूर्ण नावाचे, स्पष्टीकरण देण्याच्या गरजेतून निघाली आहे हे स्पष्टच आहे. एच. सी. रायचौधरी, पूर्वोक्त, पृ. ११२, तळटीप–५.

२८ पहा – अग्रवाल, व्ही. एस., **मत्स्यपुराण – ए स्टडी,** ऑल इंडिया काशीराज ट्रस्ट, वाराणशी, १९६३, पृ. १९४.

२९ पार्जिटर, **डी. के. ए.,** पूर्वोक्त, पृ. ५०.

३० कित्ता, पृ. ७३.

३१ जायस्वाल, के. पी., **हिस्टरी ऑफ इंडिया : इ. स. १५० ते इ. स. ३५०.,** मोतीलाल बनारसीदास, लाहोर, १९३३, पृ. १६, तळटीप १३ आणि पृ. ७०. जायस्वाल यांच्या मते कांचनका आणि चनका ही बहुतेक वैकल्पिक नावे आहेत. या संदर्भात ते कल्की पुराणामधील (३, १४, २. ११) नागांची राजधानी कांचनीपुरीचे उदाहरण देतात. कित्ता, पृ. १६–१७ तळटीप ३.

३२ पुरी हे पुरिकाही असू शकते.

३३ डी. के. ए., पृ. ५०, तळटीप ३३.

३४ पुरिकाच्या कोरीव लेखातील उल्लेखांसाठी पहा – ल्यूडर्स लिस्ट, नं. ७८२, ८१२, ८३८ आणि ८३९. तसेच पि. के. भट्टाचार्य, **हिस्टॉरिकल जिऑग्राफी ऑफ मध्य प्रदेश,** मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, १९७७, पृ. २१७–१८.

३५ जायस्वाल, के. पी., पूर्वोक्त, पृ. १६, तळटीप ३. जायस्वाल यांनी दाखविल्याप्रमाणे चनका (किंवा कांचनका) चे रुपांतर नचना या नावामध्ये होणे हे ध्वनिशास्त्राप्रमाणे शक्य वाटते.

३६ **आर्किऑलॉजिकल सर्व्हे रिपोर्टस,** २१, फलक २६, **एच. सी. आय. पी., ३, सी. ए.** भारतीय विद्याभवन, बॉम्बे, १९५४, पृ. ५०१–०६.

३७ **सी. आय. आय.,** ५, पृ. ८९–९१.

३८ **डी. के. ए.,** पृ. ५० **(विन्ध्यकाना कुले = तिते).** वाकाटक व विन्ध्यक यांचे समीकरण जायस्वाल यांनी पूर्वीच दाखविले होते. जायस्वाल पूर्वोक्त, पृ. ५५ आणि ६६.

३९ जायस्वाल, पूर्वोक्त, पृ. ६७–६८.

४० "ए नोट ऑन दि ओरिजिनल टेरिटरि ऑफ दि वाकाटकाज", **जे. आय. एच.,** ४९ (XLIX), पृ. १३५–४२.

४१ परब्रह्मशास्त्री, पी. व्ही., "हैदराबाद-प्लेट्स ऑफ वाकाटक देवसेन, इयर ५", **जे. इ. एस. आय.,** १३ (XII), पृ. ७३.

४२ मिराशी, व्ही. व्ही., **इन्डॉलॉजिकल रिसर्च पेपर्स,** विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर, १९८२, पृ. ८५.

४३ विन्ध्यशक्ती दुसरा याच्या वाशीम ताम्रपटात गोत्र नाम चुकीने वृष्णिवृद्ध असे दिले आहे.

४४ जायस्वाल, पूर्वोक्त, पृ. १०९–११.

४५ "ए नोट ऑन दि हिस्सेबोराळा इन्स्क्रिप्शन ऑफ दि टाईम ऑफ वाकाटक देवसेन," **जे. इ. एस. आय.,** ७, पृ. ३–५.

४६ शास्त्री, अजयमित्र, "न्यू वाकाटक इन्स्क्रिप्शन्स", **ए. व्ही.,** पृ. २४६-४७.

४७ गोखले, शोभना, **इ. आय.,** ३७, पृ. १-४; व्हि. बी. कोलते, **डॉ. मिराशी फेलिसिटेशन व्हॉल्यूम,** नागपूर, १९६५, पृ. ३७२-८४.

४८ हा निष्कर्ष जवळजवळ सर्वमान्य आहे. परंतु जे. इ. मीतचिनेर, (**एशियाटिक सोसायटी, मंथली बुलेटिन,** ऑगस्ट, १९७८, पृ. ६-७) आणि बी. एन. मुखर्जी (**जे. इ. एस. आय.,** ७, पृ. ३-५) यांचे हिस्सेबोराला शिलालेखामध्ये दिलेल्या शक ३८० (इ. स. ४५७-५८) या तिथीच्या आधारे असे मत आहे की, शक ३८०

मध्ये वाकाटकांचे राज्य स्थापन होऊन २२० वर्षे होऊन गेली होती. आर. सी. मजुमदार (**जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी ऑफ बंगाल,** लेटर्स, २०, पृ. १०१-०५) आणि डी. सी. सरकार, (**जे. ए. आय. एच. १२,** युनिव्हर्सिटी ऑफ कलकत्ता, १९७८ पृ. ७१ आणि त्यापुढे, १३, पृ. ७५-७८; **एच. सी. आय. पी.,** ३, **सी. ए.,** पृ. १८०-८१; **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स बेअरींग ऑन इंडियन हिस्टरी ॲण्ड सिव्हिलायझेशन,** १, दुसरी आवृत्ती, युनिव्हर्सिटी ऑफ कलकत्ता, १९६५, पृ. ४४०, टीप २-३) हे सुद्धा या राजवंशाचा प्रारंभ ख्रिस्तपूर्व २५० मध्ये ठेवतात. त्यांचे हे मत व वाचन प्रभावतीगुप्ताचा पुत्र प्रवरसेन दुसरा याच्या एकोणीसाव्या वर्षी दिलेल्या ऋद्धपूर ताम्रपटात आलेल्या **स-आग्रा-वर्ष-शत-दि (जी) व पुत्र-पौत्रा** या शब्दसमुहाच्या स्पष्टीकरणावर आधारित आहे. या वर्णनाप्रमाणे प्रभावतीगुप्ता हा ताम्रपट देतेवेळी व प्रवरसेनाच्या १९ व्या शासन वर्षी वयाने १०० वर्षाच्या वर होती या वाचनाला दुजोरा मिळत नाही. वास्तविक हा पूर्ण सामासिक शब्द एक शब्दसमूह म्हणून घ्यावयास पाहिजे. अशा नोंदी भारतीय साहित्यात नेहमीच मिळतात (पहा-मिराशी, **सी. आय. आय.,** ५, पृ. ८). त्याचप्रमाणे हरिषेण हा नरेन्द्रसेनाचा समकालीन होता. वैयक्तिक राज्यकाल मर्यादा कमीजास्त होऊ शकते.

४९ **विष्णुकुण्डि-वाकाटक-वंश-द्वय-आलंकृत-जन्म;** विक्रमेंद्रवर्मन दुसरा याचा वर्ष १० चा चिक्कुल्ला ताम्रपट. एस. शंकर नारायणन, **दि विष्णुकुण्डिन ॲण्ड देअर टाईम्स,** आगम प्रकाशन, दिल्ली, १९७७, पृ. १६९.

५० या ताम्रपटाच्या मूळ लेखांसाठी (Text) पहा-उपरोक्त, एस. शंकर नारायणन, पृ. १७२-७४.

५१ हे पूर्णपणे त्याच्या पोलमुरु ताम्रपटातील शासन वर्षाच्या वाचनावर अवलंबून आहे. काहीजण हे वर्ष ४८ वाचतात तर काही हे वर्ष ४० असे वाचतात.

५२ विक्रमेन्द्रवर्मन दुसरा, याच्या तुम्मलगुडे ताम्रपटातील कालगणने संबंधात सविस्तर चर्चेसाठी पहा-**इ. एच. डी.,** पृ. १२८-२९.

५३ **एन. एच. आय. पी.,** ६, **व्ही. जी. ए.,** पृ. ९७; **इ. एच. डी. वाय.,** पृ. १५७ आणि १५८.

५४ **जे. इ. एस. आय.,** १३, पृ. ७३; **ए. व्ही.,** पृ. २४८.

५५ मिराशी, व्ही. व्ही. **इन्डॉलॉजिकल रिसर्च पेपर्स,** जे, पृ. ८५.

५६ **सी. आय. आय.,** ५, पृ. १०७, श्लोक, २-५.

५७ **एन. एस. आय. पी.,** ६, **व्ही. जी. ए.,** पृ. ९७.

५८ **इ. एच. डी. वाय.,** पृ. १५७-५८.

५९ **सी. एच. आय.,** ३, भाग १, पृ. १३१.

६० **सी. आय. आय.**, ५, पृ. १०७, श्लोक, २ आणि ५.

६१ **डी. के. ए.**, पृ. ४८ (मूळ लेख) आणि टीप ८६.

६२ भोक्ष्यते च समाः षष्टिं पुरीं काञ्चनकां च वै, उपरोक्त, **डी. के. ए.**, पृ. ५०.

६३ सविस्तर माहितीसाठी पहा-अजयमित्र शास्त्री, **इ. एच. डी. पी. पी.**, पृ. ३८-४४.

६४ **इ. एच. डी. वाय.**, पृ. १५९, **एन. एच. आय. पी.**, ६, **व्ही. जी. ए.**, पृ. ९९.

६५ **इ. एच. डी. वाय.**, पृ. १६०-६१. ही सूचना श्रीराम गोयल यांनी मान्य केली आहे. (पहा-गुप्त और वाकाटक साम्राज्योंका युग, कुसुमांजली प्रकाशन, मेरठ १९८८, पृ. ३९९-४००).

६६ या मुद्यावरील चर्चेकरिता याच ग्रंथातील सातवाहन प्रकरण पहा.

६७ **सी. एच. आय.**, भाग-१, पृ. १३३.

६८ मिराशींना असे वाटते की, समुद्रगुप्ताच्या समकालीन असलेल्या महेन्द्रने कदाचित वाकाटकांची दक्षिणेकडील सत्ता नष्ट केली असावी. उपरोक्त, पृ. १३४, तळटीप ४५.

६९ **सी. आय. आय.**, ५, पृ. १२, (प्रवरसेन दुसरा याचा जांब ताम्रपट) व्ही. व्ही. मिराशी, ''पवनी स्टोन इन्स्क्रिप्शन ऑफ दि भार किंग भगदत्त'', **इ. आय.**, २४, पृ. ११-१४.

७० यक्ष्यते वाजपेयश-च समाप्त-वर-दक्षिणैः **डी. के. ए.**, पृ. ५० वाजपेयश ऐवजी वायु पुराणाच्या हस्तलिखितात वाजिमेधैश हे रूप वापरलेले आहे. पहा– उपरोक्त, **सी. एच. आय.**, तळटीप ३५. त्याच हस्तलिखीतामध्ये (तळटीप ३६) ''बहु'' चे वाचन ''वर'' असे केले आहे.

७१ अग्निस्टोम आप्तोर्याम-ऊक्थ्य-षोडस्य, अतिरात्र-बृहस्पतिसव-साद्यस्क्र-चतुर-अश्वमेध-याजिन : (जांव ताम्रपट), **सी. आय. आय.**, ५, पृ. १२. ओळ १-२. या वंशाच्या कोरीव लेखांमध्ये पुन्हा पुन्हा नावे दिलेली आहेत. सात सोम यज्ञांपैकी अत्यग्निष्टोमची जागा साद्यस्क्र या यज्ञाने घेतली.

७२ वाकाटक हे ब्राह्मण होते असे दाखविणारा हा अधिकतर पुरावा आहे.

७३ डी. सी. सरकार (**एच. सी. आय. पी.**, २, **ए. आय. यू.**, पृ. २२०) ही पदवी वाकाटक कोरीव लेखांमध्ये वाकाटकांसाठी, विशेषतः प्रवरसेन प्रथम याच्यासाठी वापरली आहे असे समजतात. पण ते चुकीचे आहे. ती पदवी फक्त प्रवरसेन प्रथम याच्यासाठीच वापरलेली आहे. इतर वाकाटक राजांसाठी नाही.

या संदर्भात हे नमूद करणे आवश्यक आहे की, वाकाटक राजांपैकी फक्त प्रवरसेन प्रथम यानेच वाजपेय याग केला होता. **शतपथब्राह्मणात** दिलेल्या नियमानुसार हा याग करणाऱ्या राजालाच फक्त (सम्राट) ही पदवी धारण करता येते.

७४ त्याचा मंदसार कोरीव लेख पहा-डी. सी. सरकार, **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स** १, पृ. ४१८, श्लोक ३; मिराशी, **वाकाटक नृपति आणि त्यांचा काल,** नागपूर युनिव्हर्सिटी १९५७, पृ. ३२. ही पदवी उत्तर किंवा दक्षिण भारतातील इतर कोणत्या राजाने धारण केल्याचे ज्ञात नाही.

७५ देवसेन यांचा बिदर किंवा हैद्राबाद लेख, हरिषेण याचा थाळनेर ताम्रपट व हरिषेणाचा अजिंठा शिलालेख हे ते तीन अपवादात्मक लेख आहेत व हे सर्व लेख वाकाटकांच्या वत्सगुल्म शाखेचे आहेत.

७६ **डी. के. ए.,** पृ. ५०.

७७ हे केवळ मातृवाचक (Metronymic) आहे. कोणत्याही लेखात त्याचे वैयक्तिक नाव दिलेले नाही.

७८ **सी. आय. आय.,** ५, पृ. ९६-९८.

७९ नन्दिवर्धन शाखा ही मुख्य शाखा किंवा जेष्ठ शाखा होती हे मत प्रस्तुत लेखकास मान्य नाही.

८० आळतेकर यांच्या मते या शाखा कोसल व आन्ध्रमध्ये होत्या (**इ. एच. डी. वाय.,** पृ. १६३, **एन. एच. आय. पी.,** ६, **व्ही. जी. ए.,** पृ. १०२) आणि मिराशी ही राज्ये दक्षिण कोसलच्या व महाराष्ट्राच्या भागात होती असे म्हणतात (**सी. एच. आय.,** ३, भाग १, पृ. १३४), पण नंतरच्या उपलब्ध पुराव्यानुसार ही मते मान्य करता येत नाहीत.

८१ त्रिवेदी, एच. व्ही., **कॅटलॉग ऑफ दि कॉइन्स ऑफ दि नागाज ऑफ पद्मावती,** डिपार्टमेंट ऑफ आर्किऑलॉजी ॲण्ड म्युझिअम्स, ग्वालिअर, १९५७, पृ. २७-३७, प्रस्तावना पृ. १८-२०.

८२ उपरोक्त त्रिवेदी, पृ. ४९-५४ (गणपति नाग).

८३ भांडारकर, डी. आर. (Revisor), बी. एच. छाब्रा ॲण्ड जी. एस. गै. (संपा.), "इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि अर्ली गुप्त किंग्ज," **सी. आय. आय.,** ३, आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया, न्यू दिल्ली, १९८१, पृ. २१२, पृ. २१३.

८४ प्रवरसेन प्रथम त्याचप्रमाणे त्याचा पुत्र गौतमीपुत्र यांच्या सांप्रदायिक संबंधाबाबत काहीही माहिती नाही. परंतु प्रवरसेन प्रथम याने केलेल्या बऱ्याच सोम यागांवरून तो वैदिक धर्माचा अनुयायी होता असे दिसते.

८५ **सी. आय. आय.,** ५, पृ. १ आणि त्यापुढे.

८६ कित्ता, पृ. ४.

८७ जायस्वाल, पूर्वोक्त, पृ. १४१ आणि त्यापुढे.

८८ **ए. बी. ओ. आर. आय.**, ४, पृ. ३०-४०.

८९ **हिस्टरी ऑफ इम्पिरिअल गुप्ताज,** सेन्ट्रल बुक डेपो, अलाहाबाद, १९६७, पृ. १४१-४७; **गुप्त साम्राज्यका इतिहास,** १९८७, पृ. १०८-१३ आणि **गुप्त और वाकाटक साम्राज्योंका युग,** कुसुमांजली प्रकाशन, मेरठ, १९८८, पृ. ४०४-१०.

९० भांडारकर, छाब्रा आणि गै, **सी. आय. आय.**, पृ. २१३, ओळ २१. समुद्रगुप्ताने नष्ट केलेल्या आर्यावर्ताच्या राजांच्या यादीत रुद्रदेवाचे नाव प्रथम दिले आहे.

९१ आळतेकर, **इ. एच. डी. वाय.**, पृ. १७१.

९२ मिराशी, वा. वि., **वाकाटक नृपति आणि त्यांचा काळ,** पृ. ३७.

९३ शास्त्री, अजय मित्र आणि चंद्रशेखर गुप्त, ''द्वितीय रुद्रसेनाचा मांढळ ताम्रपट'', **संशोधनाची क्षितिजे** (संपा. भा. ल. भोळे), अमेय प्रकाशन, नागपूर, १९८५, पृ. २२३ आणि त्यापुढे.

९४ ए. एस. आळतेकर यांचे रुद्रसेन द्वितीयाचा मांढळ ताम्रपट सापडण्यापूर्वी असे मत होते की, वाकाटक ताम्रपटांच्या मसुद्याचा मूळ गाभा (Text) प्रभावतीगुप्ता जेव्हा राजप्रतिनिधी म्हणून राज्यकारभार पहात होती, तेव्हा गुप्त वंशाच्या प्रभावाखाली कायम किंवा निश्चित झाला. **इ. एच. डी. वाय.**, पृ. १७०.

९५ सत्य-आर्जव-कारुण्य-शौर्य-विक्क्रम-नय-विनय-माहात्म्य-धीमत्त्व-पात्र गत-भक्तित्व-धम्मविजयित्व-मनो-नैर्म्मल्य-आदि-गुणेश-समुपेतस्य वर्ष-शतम-अभिवर्धमान-कोश-दण्ड-साधन-सन्तान-पुत्र-पौत्रिणः, जाम्ब ताम्रपट, प्रवरसेन दुसरा, **सी. आय. आय.**, ५.

९६ **सी. आय. आय.**, पृ. ८९-९१.

९७ कित्ता, पृ. ९२.

९८ **इ. एच. डी. वाय.**, पृ. १७२, **एन. एच. आय. पी.**, ६; **व्ही. जी. ए.** पृ. १०९-१०. उलटपक्षी, वाकाटकांचे दक्षिण भारतीयत्व लक्षात घेता वाकाटकांचा सत्ता प्रभाव विन्ध्य विभागापर्यंत पसरला होता याचा हे शिलालेख उत्तम पुरावे आहेत असे आळतेकर मानतात.

९९ जायस्वाल, के. पी., पूर्वोक्त, पृ. ७३; एच. सी. रायचौधरी, **पी. एच. ए. आय.**, पृ. ५४१-४२; ए. एस. आळतेकर, **एन. एच. आय. पी.**, ६, **व्ही. जी. ए.**, पृ. १०९-१० आणि **इ. एच. डी. वाय.**, पृ. १७३; डी. सी. सरकार, **एच. सी. आय. पी.**, ३, **सी. ए.**, पृ. १७९.

१०० **आय. ए.,** ५५, पृ. १०३ आणि त्यापुढे.

१०१ **जे. आर. ए. एस. बी.,** १२, पृ. १ आणि त्यापुढे.

१०२ **इ. आय.,** १७, पृ. ३६२.

१०३ **सी. आय. आय.,** पृ. २७-२९, ८९-९२; **सी. एच. आय.,** ३, भाग-१, पृ. १४१.

१०४ **पी. एच. ए. आय.,** पृ. ५४१-४२.

१०५ सरकार, डी. सी., **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स,** १, पृ. २६८-७०. या ठिकाणी ७ व्या श्लोकामध्ये एरिकिण (वर्तमान एरण) त्याचे **स्व-भोग-नगर** असल्याचे नमूद केले आहे.

१०६ परिव्राजकांच्या लेखांचा प्रारंभ गुप्त-नृपराज्य-भुक्तौ अशा शब्दसमुहाने होतो.

१०७ जैन, बी. सी., "शंकरपूर प्लेट ऑफ बुधगुप्त ॲण्ड हरिवर्मन, इयर १६८," **जे. इ. एस. आय.,** ४, पृ. ६२-६६. के. व्ही. रमेश यांनी दाखविल्याप्रमाणे (उपरोक्त पृ. ६४, तळटीप १ आणि पृ. ६६, टीप १७) वर्षसंख्येचे अचूक वाचन १६८ आहे. हरिवर्मनचा मौखरींशी संबंधाचा तशा प्रकारचा कोणताही पुरावा उपलब्ध नाही. ताम्रपट सापडल्यानंतर डी. सी. सरकार यांनी असे मत व्यक्त केले आहे की, पृथिवीषेण प्रथम याला फारच थोडी कारकीर्द लाभली असावी. त्यांच्यामते पृथिवीषेण द्वितीय याचे येथे राज्य होते. पण हाही एक तर्क आहे. पुढे ते असेही सुचवितात की, नचना व गंज येथे व्याघ्रदेव यात्रेकरिता गेला असावा (पहा–**ए. व्ही.,** पृ. ४७-४९).

१०८ शास्त्री, अजय मित्र, **इंडिया ॲज सीन इन दि बृहतसंहिता ऑफ वराहमिहीर,** पृ. ५०.

१०९ **इ. एच. डी. वाय.,** पृ. १७२; **एन. एच. आय. पी.,** ६; **व्ही. जी. ए.,** पृ. १०९. त्याने त्याचा चुलतभाऊ विन्ध्यसेन (वत्सगुल्म शाखेचा) यास त्याच्या कुंतल प्रदेशावर बहुतेक कदंब राजा कंगवर्मन याने केलेल्या आक्रमणाच्यावेळी मदत केली असावी या आळतेकरांच्या सूचनेवर एकमत नाही. याबाबत विन्ध्यसेनाच्या कुंतल विजयासाठी पहा–**सी. आय. आय.,** ५, १०८, श्लोक-८.

११० प्रवरसेन दुसरा याच्या वेळेपासून वाकाटकांच्या या शाखेच्या सर्व लेखांमध्ये त्याचे महाराजाधिराज देवसेन किंवा चंद्रगुप्त द्वितीय याची मुलगी प्रभावती गुप्ता हिच्यापासून रुद्रसेन दुसरा याला झालेला मुलगा असे वर्णन आहे.

१११ **सी. एच. आय.,** ३, भाग-१, पृ. १ ३६.; **सी. आय. आय.,** ५, पृ. २३ (XXIII).

११२ **सी. आय. आय.**, ५, पृ. ७८.

११३ जांब ताम्रपटात **भगवतश-चक्र-पाणेः–प्रसाद-ओपार्जित-श्री-समुदयस्य** असा शब्दसमूह मिळतो, तर त्याच्या स्वतःच्या मांढळ ताम्रपटामध्ये **भगवतश-चक्र-लक्षं-प्रतिष्ठित-शासनस्य** असा शब्दसमूह मिळतो.

११४ शास्त्री, अजय मित्र आणि चंद्रशेखर गुप्त, पूर्वोक्त, पृ. २२३ आणि त्यापुढे.

११५ कित्ता, पृ. २२७, ओळ १-२. शेषशायी विष्णूचे वर्णन करणारा हा प्रारंभीच्या काळात दिलेल्या लेखांपैकी एक लेख आहे. चर्चेकरीता पहा–"शेष शयन विष्णू : अर्लिएस्ट एपिग्राफीक एव्हीडन्स", **विष्णू इन आर्ट, थॉट, लिटरेचर,** बिर्ला आर्किऑलॉजिकल ॲण्ड कल्चरल रिसर्च इन्स्टिट्यूट, हैद्राबाद, १९९२, पृ. १-६.

११६ शास्त्री, अजय मित्र, "न्यू वाकाटक इन्स्क्रिप्शन्स", **ए. व्ही.**

११७ मिराशी याचे तादात्म्य भंडारा जिल्ह्यातील गोंदिया तालुक्यात असलेल्या पद्मपूरशी करतात. **सी. आय. आय.**, पृ. ७७-७८.

११८ मिराशी, व्ही. व्ही. (**सी. एच. आय.**, भाग-१, पृ. १३७) यांचे असे म्हणणे आहे की, दिवाकरसेन जेव्हा गादीवर आला तेव्हा बहुतेक त्याचे वय बारा वर्षापेक्षा कमी असावे आणि ज्याअर्थी तो त्याच्या आजोबाच्या मृत्यूपूर्वी जन्मला त्याअर्थी त्याचा पिता रुद्रसेन द्वितीय याने आठ वर्षापेक्षा जास्त काळ राज्य केले नसावे. त्यांचे हे मत प्राचीन भारतीय राजपुत्र चोवीस वर्ष पूर्ण केल्यानंतर राजपद ग्रहण करण्यास पात्र होत असत या समजुतीवर आधारलेले आहे (पृ. ५१). ही समजूत त्यांच्या खारवेलाच्या हाथीगुफा लेखातील विधानावरून झालेली आहे. त्यांच्या मते खारवेल चोवीस वर्षांचा झाल्यानंतर पूर्णार्थाने राजा झाला किंवा त्याला महाराज म्हणून राज्याभिषेक करण्यात आला. परंतु अशा प्रकारचा नियम व्यवहारात अस्तित्वात नव्हता. खारवेलाला चोवीस वर्षे पूर्ण झाल्यावर महाराज म्हणून राज्याभिषेक करण्याचे कारण बहुतेक याचवेळी त्याच्या पित्याचे झालेले निधन हे असावे.

११९ वरील तळटिपेत दिल्याप्रमाणे मिराशींना असे वाटते की, राज्यारोहणाप्रसंगी बहुतेक त्याचे वय १२ वर्षापेक्षा कमी असण्याची शक्यता आहे. **सी. एच. आय.**, ३, भाग-१, पृ. १३७.

१२० हे लेख म्हणजे तिचे दिवाकरसेनाची प्रतिनिधी म्हणून कारभार करीत असल्याच्या तेराव्या वर्षीचे व प्रवरसेन दुसरा याच्या एकोणीसाव्या वर्षीचे अनुक्रमे पुणे व ऋद्धपूर ताम्रपट आहेत.

१२१ **सी. आय. आय.**, ५, पृ. ७-८. प्रामुख्याने २२ वी ओळ तिथीकरीता आणि त्याचा युवराज म्हणून उल्लेख करणाऱ्या मुद्रेवरील (Seal) कोरीव लेखासाठी आहे.

१२२ शर्मा, एच. डी. (संपा.), **सदुक्तिकर्णामृत,** २ (II), ३१.४.

१२३ जर त्याचा जन्म त्याचा पिता रुद्रसेन दुसरा याच्या कारकिर्दीच्या अखाच्या दोन वर्षे आधी झाला असेल तर त्याचा वडील भाऊ दिवाकरसेन याच्या मृत्यूसमयी त्याचे वय १७ वर्षे असावे.

१२४ मिराशी, वा. वि.; **वाकाटक नृपति आणि त्यांचा काळ,** पृ. ४३; **सी. आय. आय.**, ५, पृ. २४ (XXIV); **सी. एच. आय.**, ३, भाग-१, पृ. १३७.

१२५ **सी. आय. आय.**, ५, पृ. ३६.

१२६ विक्रान्तयोर-जनन्यासतु वाकाटक-नरेन्द्रयोः

श्री-प्रभावतीगुप्तायाः शासनम् रिपु-शासनम्.

**ए. व्ही.**, पृ. २३३. हा महत्त्वपूर्ण ताम्रपट अजून प्रसिद्ध व्हावयाचा आहे.

१२७ प्रवरसेनाच्या नावामागे सत्तादर्शक महाराज व सन्मानदर्शक श्री ही पदवी नाही याचे खरे कारण आजच्या व्याकरणाच्या नियमाप्रमाणे या पदव्या पहिल्या नावांच्या आधी दिलेल्या असल्यामुळे त्यांचा उपयोग या दोन्ही राजांसाठी केलेला आहे हे स्पष्ट आहे.

१२८ आतापर्यंत त्याची जास्तीतजास्त म्हणजे एकोणीस ताम्रपट-दानपत्रे मिळाली आहेत. पहा–**सी. आय. आय.**, ५, इन्स्क्रिप्शन नं. ३-१६ आणि **ए. व्ही.** पृ. २३०-३८, इन्स्क्रिप्शन नं. २-४ (II-IV) आणि ६-७ (VI–VII).

१२९ हा रामटेक येथे नरसिंह मंदिरात प्राप्त झालेला शिलालेख आहे. (Stone Slab inscription) उपरोक्त, पृ. २५३-५७.

१३० हा शब्दसमूह स्वतः प्रवरसेन दुसरा याच्या दानपत्रांमध्ये तसेच त्याचा नातू पृथिवीषेण दुसरा याच्या दानपत्रांमध्ये मिळतो. तो वैष्णव होता हे विधान निव्वळ नजरचुकीने केलेले असावे. ए. एस. आळतेकर, **एन. एच. आय. पी.**, ६; **व्ही. जी. ए.**, पृ. ११४; **इ. एच. डी. वाय.**, पृ. १७८.

१३१ त्याच्या नुकत्याच सापडलेल्या १७ व्या शासनवर्षी प्रवरपुराहून दिलेल्या मांढळ ताम्रपटामुळे हे ज्ञात झाले. या दानपत्रामध्ये त्याने सोळाव्या शासन वर्षी दिलेल्या दानाची नोंद केली आहे. पहा-**ए. व्ही.**, पृ. २३०-३१; अजय मित्र शास्त्री, "मांढळ कॉपर प्लेट चार्टर ऑफ प्रवरसेन सेकंड-इयर १६", **इ. आय.**, नं. ४१ (XLI), पृ. ६८-७६.

१३२ त्याच्या दहाव्या शासन वर्षीचा मांढळ ताम्रपट, सतराव्या शासन वर्षीचा माहुरझरी ताम्रपट आणि तिथीरहित बालाघाट ताम्रपट.

## तळटिपा

१३३ **सी. आय. आय.,** ५, पृ. ३०.

१३४ कित्ता, पृ. २३ आणि त्यापुढे.

१३५ या दृष्टीकोनानुसार ए. एस. आळतेकर यांचे त्याने वत्सगुल्म शाखेच्या-राजवंशावर राज्य केले (**इ. एच. डी. वाय.,** पृ. १७९, **एन. एच. आय. पी.,** ६, (VI), **व्ही. जी. ए.,** पृ. ११४–१५) हे मत टिकू शकत नाही.

१३६ या दानपत्राचा पहिला पत्रा आता प्राप्त झाला असला तरी बाकीचे पत्रे आधीच मिळाले आहेत. पहा – व्ही. व्ही. मिराशी, **इन्डॉलॉजीकल रिसर्च पेपर्स,** १, विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर, १९८२, पृ. ७२, (पहिला पत्रा) आणि **सी. आय. आय.,** ५, पृ. ४०–४१ (इतर पत्र्यांकरता), त्रिपुरी वासकच्या संदर्भाकरिता पहा–उपरोक्त, ओळ १.

१३७ **इन्डॉलॉजिकल रिसर्च पेपर्स** १, पृ. ६५–७१.

१३८ **सी. आय. आय.,** ५, पृ. ५४.

१३९ **सी. आय. आय.,** ५, पृ. ५०.

१४० या वैचित्र्यपूर्ण ताम्रपटातील माहितीसाठी पहा–**ए. व्ही.,** पृ. २३५–५७.

१४१ शास्त्री, अजय मित्र, **त्रिपुरी,** (हिंदी), मध्य प्रदेश हिंदी ग्रंथ ॲकॅडेमी, भोपाल, १९७१, पृ. १६७–६८.

१४२ शास्त्री, अजय मित्र, **इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि शरभपुरीयाज, पांडुवंशीन्स ॲण्ड सोमवंशीन्स,** इंडियन कौन्सिल ऑफ हिस्टॉरिकल रिसर्च, न्यू दिल्ली, ॲण्ड मोतीलाल बनारसीदास, दिल्ली १९९२, पृ. ३–६. याची तुलना शरभपुरीय राजा नरेंद्र याच्या कुरुद ताम्रपटाशी करता येईल. या ताम्रपटामध्ये गुप्त सम्राटाने गंगा नदीत स्नान केल्यानंतर दक्षिण कोसल विभागातील जमीन दान दिल्याचे नमूद केले आहे.

१४३ वैष्णव भक्तांच्या श्रद्धेप्रमाणे विष्णू त्याच्या चार महिन्याच्या निद्रेनंतर कार्तिक शुद्ध द्वादशीस जागा होतो. हे दान कार्तिक शुद्ध एकादशीच्या दुसरे दिवशी याच कारणास्तव दिले आहे.

१४४ जेव्हा पृथिवीषेण प्रथम याच्या कारकिर्दीच्या शेवटी (इ. स. ३८०) तिचा विवाह झाला तेव्हा तिचे वय अंदाजे वीस वर्षे असावे. तिचा मृत्यू प्रवरसेन दुसरा याच्या पंचविसाव्या शासनवर्षी झाला (इ. स. ४४५). यामुळे आर. सी. मजुमदार आणि डी. सी. सरकार यांनी तिने ऋद्धपुर ताम्रपट दिला त्यावेळेस तिचे वय १०० वर्षांचे वर होते असे तिच्या वयाविषयी व्यक्त केलेले मत संयुक्तिक ठरत नाही.

१४५ **ए. व्ही.,** पृ. २५३–५७.

१४६ शास्त्री, अजय मित्र, ''मांढळ कॉपर प्लेट चार्टर ऑफ प्रवरसेन सेकंड–इयर १६'', **इ. आय.,** ४१, पृ. ७४, ओळ २२–२३; **ए. व्ही.** पृ. २३१.

या दानापासून मिळणाऱ्या धार्मिक पुण्याचा वाटा नरिन्द (नरेन्द्र) राज याची माता आज्नाकभट्टारिका हिला मिळणार होता.

१४७ दुसऱ्या आणि दहाव्या वर्षीचा असे दोन मांढळ ताम्रपट, सतराव्या वर्षीचा माहुरझरी ताम्रपट व अपूर्ण पण खात्रीने नंतर दिलेला बालाघाट ताम्रपट अशी ही दानपत्रे आहेत.

१४८ हे एफ. केलहॉर्न, व्ही. व्ही. मिराशी व व्ही. बी. कोलते यांचे वाचन आहे. बालाघाट ताम्रपटात ते स्पष्ट दिलेले नाही म्हणून केलहॉर्नने साशंक मनाने हे वाचन केले आहे. प्रस्तुत लेखकाने केलेले माहुरझरी ताम्रपटाचे वाचन मांढळ ताम्रपटाच्या वाचनापेक्षाही स्पष्ट आहे. व्ही. बी. कोलते यांनी केलहॉर्नचे वाचन स्वीकारले आहे.

१४९ शास्त्री, अजयमित्र, ''मांढळ प्लेटस ऑफ पृथिवीषेण सेकंड, इयर्स २ ॲण्ड १०'', **इ. आय.**, ४१ (XLI) पृ. १७२–७४; **ए. व्ही.** २४१–४२. ही घटना बहुतेक त्याच्या व त्याचा समकालीन वत्सगुल्म शाखेचा राजा देवसेन यांच्यामधील संघर्षाचा प्रारंभ दर्शविते.

१५० छाब्रा, बी. सी. एच., **इ. आय.**, (XXVII) पृ. १३७–३८; व्ही. व्ही. मिराशी, **सी. आय. आय.**, ५, पृ. ८३–८४. हे मत बामनी ताम्रपटात (श्लोक ११) उल्लेखिलेला नरेंद्र हा नरेन्द्रसेनच आहे यावर आधारित आहे.

१५१ ''दि डेट ऑफ बाम्हनी ॲण्ड मल्लार प्लेटस् ऑफ शूरबल उदिर्णवैर'', **भारती भानम,** डॉ. के. व्ही. शर्मा फेलिसिटेशन व्हॉल्यूम, होशियारपूर, १९८०, पृ. ४३९–५३.

१५२ बाम्हनी ताम्रपटाच्या गद्य भागात त्याचा पुत्र व वारस शूरबल उदिर्णवैर याचा उल्लेख नसल्यामुळे हा ताम्रपट भरतबलाने दिला आहे असा समज होता. अलीकडेच प्राप्त झालेल्या मल्लार ताम्रपटामध्ये हे नाव दिलेले आहे.

१५३ शास्त्री, अजय मित्र, **इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि शरभपुरीयाज, पाण्डुवंशीन्स ॲण्ड सोमवंशीन्स,** १, पृ. १२२–२८.

१५४ सरकार, डी. सी., ''तालगुण्डा पिलर इन्स्क्रिप्शन ऑफ शान्तिवर्मन'', **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स बेअरींग ऑन इंडियन हिस्टरी ॲण्ड सिव्हिलिझेशन,** १, पृ. ४७८, श्लोक ३१.

१५५ मिराशींनी केलेल्या तर्काप्रमाणे मानपूरच्या राष्ट्रकूटांचे वाकाटकांशी काही नातेसंबंध होते आणि अज्झितभट्टरिका ही अविधेयची मुलगी होती यावर, तसेच मानांक याची कुंतल प्रदेशावर सत्ता होती व त्याने विदर्भावर आक्रमण केले होते याबद्दल निश्चित माहिती उपलब्ध नाही. पहा–**सी. आय. आय.**, ५, पृ. २५ (XXV); **सी. एच. आय.**, भाग–१, पृ. १३९.

१५६ शास्त्री, अजय मित्र, ''वाकाटक कॉइन्स'', **ए. व्ही.**, पृ. २८७–८८.

१५७ नुकताच काही इतर नाण्यांबरोबर त्रैकुटक राजा धरसेन याची दहा नाणी असलेला नाणक संचय बुलढाणा जिल्ह्यात मलकापूर तालुक्यात दहिगाव येथे मिळाला. यावरून मिराशींनी (**जर्नल ऑफ दि न्युमिसमॅटिक सोसायटी ऑफ इंडिया**, ३५, पृ. ११८–२२, **लिटररी अ‍ॅण्ड हिस्टॉरिकल स्टडिज इन इन्डॉलॉजी**, मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, १९७५, पृ. १८०–८५, **न्युमिसमॅटिक डायजेस्ट ३**, भाग–१, पृ. ४–६) असा निष्कर्ष काढला आहे की, नरेंद्रसेनाच्या दुबळेपणाचा फायदा घेऊन महत्वाकांक्षी त्रैकुटक राजा धरसेन याने आक्रमण केले व पश्चिम विदर्भाच्या बुलढाणा जिल्ह्यासह काही भागावर आपली सत्ता स्थापन केली. त्यांचे असे मत आहे की, या नाणक संचयातील त्रैकुटक नाणी समकालिन क्षत्रप नाण्यांपेक्षा चांगल्या अवस्थेत आहेत. त्यामुळे त्रैकुटकांची सत्ता येथे थोडा काळ टिकली असावी. प्रस्तुत लेखकाने इतरत्र दाखविल्याप्रमाणे (''ट्रू न्युमिसमॅटिक नोटस्'', **न्युमिसमॅटिक डायजेस्ट**, १, भाग १, पृ. २५–२८; ''**विदर्भ अ‍ॅण्ड दि त्रैकुटकाज**'', पूर्वोक्त २, भाग–१, पृ. ७–९) केवळ राजाची नाणी सापडली या आधारावर इतका महत्त्वपूर्ण निष्कर्ष काढणे हे धोक्याचे व असुरक्षितपणाचे आहे. प्रस्तुत लेखकाच्या निष्कर्षाला पी. एल. गुप्त यांनी दुजोरा दिलेला आहे. (''बेअरींग ऑफ दहिगाव होर्ड ऑन त्रैकुटक हिस्टरी'', ३, भाग–२, पृ. ४२–५१).

१५८ शास्त्री, अजय मित्र, ''मांढळ प्लेटस ऑफ पृथिवीषेण सेकंड, इअर्स २ अ‍ॅण्ड १०'', **इ. आय.**, ४१, पृ. १५९–८०.

१५९ कोलते, व्ही. बी., ''माहुरझरी प्लेटस ऑफ पृथिवीषेण संकड'', **ए. बी. ओ. आर. आय.**, ५३, पृ. १८३–९४.

१६० **सी. आय. आय.**, ५, पृ. ८०–८१.

१६१ कित्ता, पृ. ८१; एफ, केलहॉर्न, **इ. आय.**, ९, पृ. २७१, तळटीप १५. ज्यानी या लेखाचे प्रथम संपादन केले त्यांनी साशंक मनाने सुचविले आहे की, ''नी'' या अक्षराऐवजी येथे ''द्वि'' अक्षर चुकून पडले आहे. परंतु मिराशींनी केलहॉर्नने ''नी'' या अक्षरापुढे टेवलेले प्रश्नचिन्ह खोडून ते अक्षर ''नी'' म्हणून घेतले आहे. **सी. आय. आय.**, ५, पृ. ८१.

१६२ गुप्ते, वाय. आर., ''ऋद्धपूर प्लेटस ऑफ भवत्तर्मन'', '',**इ. आय.**, २०, पृ. १००–०४. या राजाचे नाव भवत्तवर्मन व भवदत्तवर्मन अशा दोन्ही प्रकारे लिहिले आहे.

१६३ प्रत्यक्ष रामगिरी स्थान किंवा रामगिरी येथील पवित्र मंदिर.

१६४ **सी. आय. आय.**, ५, पृ. ८७.

१६५ शास्त्री, अजय मित्र, ''वाकाटक कॉइन्स'', **ए. व्ही.**, पृ. २८६–८७. या अक्षरांचे त्याच्या लेखातील अक्षरांशी बरेच साम्य आहे. उपलब्ध माहितीप्रमाणे

पृथिवीषेण दुसरा याचा पिता नरेन्द्रसेन हा स्वतःची नाणी पाडणारा पहिला वाकाटक राजा आहे आणि त्याचा पुत्र–वारस पृथिवीषेण दुसरा याने ही परंपरा पुढे चालविणे स्वाभाविकच आहे.

१६६ मिराशी, व्ही. व्ही., ॲण्ड डी. बी. महाजन, "वाशीम प्लेटस ऑफ विन्ध्यशक्ति सेकंड", **इ. आय.**, २६, पृ. १३७–५५.

१६७ **सी. आय. आय.**, ५, पृ. १०३–११.

१६८ संदर्भासाठी पहा पूर्वोक्त, संदर्भ क्र. ४७.

१६९ परब्रह्मशास्त्री, पी. व्ही., "हैदराबाद प्लेटस् ऑफ वाकाटक देवसेन, इयर ५," **जे. इ. एस. आय.**, १३, पृ. ७१–७५; अजयमित्र शास्त्री, **इ. एच. डी. पी. पी.**, पृ. ७१–७४; **ए. व्ही.**, पृ. ३४८–५१ (चर्चेकरिता). हा ताम्रपट बिर्ला आर्किऑलॉजिकल ॲण्ड कल्चरल रिसर्च इन्स्टिट्यूट हैदराबाद येथे बीदरहून आणून ठेवला आहे. म्हणून **जे. इ. एस. आय.** मध्ये संपादकांनी त्याचा हैदराबाद प्लेटस् असा उल्लेख केलेला आहे.

१७० मिराशी, व्ही. व्ही., **इन्डॉलॉजिकल रिसर्च पेपर्स** १, पृ.७८–८७; अजयमित्र शास्त्री, "थाळनेर प्लेटस ऑफ हरिषेण, : ए रिअप्रायझल", **जे. इ. एस. आय.**, ११, पृ. १५–२०, **ए. व्ही.**, पृ. २५१–५३.

१७१ गोपाल, बी. आर., **कॉर्पस ऑफ कदंब इन्स्क्रिप्शन्स**, १, शिर्सी, १९८५, पृ. १४५; अजय मित्र शास्त्री, "दि मुडिगेरे प्लेटस् ऑफ सिंहवर्मन ॲण्ड कदंब-वाकाटक रिलेशन्स", **इंडियन आर्किऑलॉजिकल, हेरिटेज : के. व्ही. सौंदरराजन फेलिसिटेशन व्हॉल्यूम**, (संपा. सी. मार्गबंधु आणि इतर), आगम कला प्रकाशन दिल्ली, १९९१, पृ. ३१७–१९.

१७२ जयमंगला कॉमेंटरी ऑफ यशोधर, काशी संस्कृत सिरीज, नं. २९ वाराणसी, १९२९, पृ. २६१.

१७३ **दक्षिणापथ सौदर्यो राज–पुत्रौ वत्स–गुल्मौ–ताभ्याम–अध्यासितो, देशो वत्सगुल्मक इति प्रतीत :** कित्ता.

१७४ राजशेखर इन हिज प्राकृत प्ले, **कर्पूर–मंजरी, १ (I) १.**

१७५ दलाल, सी. डी. ॲण्ड शास्त्री, आर. ए. (संपा.) **काव्यमिमांसा,** गायकवाडस् ओरिएन्टल सिरीज, नं. १, तिसरी आवृत्ती, ओरिएन्टल इन्स्टिट्यूट, बरोडा, १९३, पृ. १०.

१७६ वात्स्यायन वत्सगुल्म (श्लोक ५, ३३) आणि विदर्भातील (श्लोक ५, ३४) कामविषयक प्रथांचे वर्णन करतो, तर राजशेखर हा वत्सगुल्म विदर्भामध्ये वसलेले आहे असा स्पष्ट उल्लेख करतो. राजशेखरने विदर्भ या शब्दाचा उपयोग विशाल (Wider Sense) या अर्थाने केला आहे, तर वात्स्यायनाने याचा उपयोग फार संकुचित अर्थाने केला आहे.

## तळटिपा

१७७ व्ही. व्ही. मिराशी, **स्टडिज इन इन्डॉलॉजी-१** (I), दुसरी आवृत्ती, विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर, १९६८, पृ. ११-१९.

१७८ उपरोक्त, मिराशी, पृ. ११९.

१७९ **सी. आय. आय.,** पृ. ९६-९७.

१८० कित्ता, पृ. ९६.

१८१ **सी. आय. आय.,** ५, पृ. १०८.

१८२ श्लोक ८. डी. सी. सरकार (**एच. सी. आय. पी.,** ३, **सी. ए.** पृ. १८५), यांना हे वाचन किंवा आर्धाच्या वाचनाचे सुधारित वाचन जरा शंकास्पद वाटते. त्यांना असे वाटते की, जर पूर्वीचे पृथिवीषेण हे वाचन स्वीकारले तर हा पृथिवीषेण हा विन्ध्यशक्ति दुसरा याचा भाऊ समजता येईल.

१८३ मिराशी, व्ही. व्ही., **सी. आय. आय.,** ५, पृ. २९-३० (XXIX-XXX); **सी. एच. आय.,** ३, भाग-१, पृ. १४३. राष्ट्रकूटांच्या या शाखेच्या इतिहासांसाठी पहा–**स्टडिज इन इन्डॉलॉजी,** १, पृ. १८५-२०५. मिराशी हे जोरदारपणे असे प्रतिपादन करतात की, कुन्तल म्हणजे दक्षिण मराठा प्रदेश (South Maratha Country). प्रारंभीचा राष्ट्रकूट राजा मानांक याने स्थापन केलेले व आपल्या नावामागे नाव दिलेले ठिकाण मानपूर ही याची राजधानी होती. मानांक हा स्वतःच वाकाटक राजा विन्ध्यशक्ति दुसरा याच्याशी युद्ध करणारा कुंतल नरेश होता. मानांकसुद्धा आपण विदर्भ नरेशाचा पराभव केला असे सांगतो. त्यावरून कोणत्याच राजाला निर्णयात्मक विजय प्राप्त झाला नसावा असा त्यांनी निष्कर्ष काढला आहे. तथापि दक्षिण महाराष्ट्राचा प्रदेश कुंतल या नावाने ज्ञात होता असे दाखविणारा पुरावा उपलब्ध नाही. अविधेय याच्या पाण्डरंगपल्ली दानपत्रातील मानांकच्या संदर्भात आलेल्या **कुंतलाना प्रशासिता** या शब्दसमूहाचा अर्थ व्ही. व्ही. मिराशींनी सुचविल्याप्रमाणे (**स्टडिज इन इन्डॉलॉजी,** ४, तारा पब्लिकेशन्स, वाराणसी, १९६६, पृ. १२६) कुंतल देशाचा राजा असा न घेता डी. सी. सरकार यांच्या मताप्रमाणे त्याच कडव्यातील आधीच्या वर्णनाप्रमाणे कुंतलांना शिक्षा किंवा कुंतलांचा पराभव करणारा असा घ्यावा. (**एच. सी. आय. पी.,** ३, सी. ए., पृ. २००). कारण ज्या कडव्यात राजा त्याच्या शत्रुविरुद्ध मिळालेल्या यशाचा उल्लेख करतो त्याच कडव्यात त्याला स्वतःच्या राज्याचाही उल्लेख करण्याची गरज नव्हती. या वंशाचे खरे म्हणजे महाराष्ट्रातील सोलापूर-सातारा प्रदेशाचा समावेश असणाऱ्या माण देशावर राज्य होते.

१८४ **सी. आय. आय.,** ५, पृ. ९६-९८, ओळ १-४. या ओळी पूर्णपणे संस्कृतमध्ये आहेत. ५ वी ओळ थोडीशी संस्कृतमध्ये आहे तर बाकीचा ताम्रपट प्राकृतमध्ये आहे.

१८५ **जे. इ. एस. आय.,** पृ. ७४.

१८६ इतिहासकारांमध्ये पहिले स्पष्टीकरण फार प्रिय आहे. सर्वांनी अजिंठा शिलालेखातील वर्णनावरून त्याच्यामागून गादीवर येणारा त्याचा मुलगा सत्तेवर आला तेव्हा फक्त आठ वर्षांचा होता असा निष्कर्ष काढला आहे.

१८७ **जे. इ. एस. आय.,** २३, पृ. ७४.

१८८ मिराशी, व्ही. व्ही., **इन्डॉलॉजिकल रिसर्च पेपर्स,** १, पृ. ८६.

१८९ गोपाल, बी. आर., ''तद-अनु सर्व्वसेन-महाराजेन मूर्ध-आभिषेकेन-आभ्यार्चित'': **कॉर्पस ऑफ कदंब इन्स्क्रिप्शन्स,** १, पृ. १४१.

१९० संबंधीत कालखंडात संपूर्ण भारत देशातील दुसऱ्या कोणत्याही राजवंशामध्ये हे नाव नाही.

१९१ गोपाल, बी. आर., उपरोक्त, पृ. १४०.

१९२ गोपाल, बी. आर., उपरोक्त, उपोद्‌घात, पृ. ३० (XXX). मालती महाजन यांच्या मते हे नाव हरिवर्मन नसून सिंहवर्मन असावे. पहा–पृ. ३० (वंशावळ).

१९३ पूर्वोक्त, संदर्भ क्र. ४७.

१९४ **जे. इ. एस. आय.,** १३, पृ. ७३-७५; **ए. व्ही.,** पृ. २४८-५१.

१९५ कित्ता, १३, पृ. ७३.

१९६ मिराशी, व्ही. व्ही., **इन्डॉलॉजिकल रिसर्च पेपर्स,** १, पृ. ८६.

१९७ **सी. आय. आय.,** ५, पृ. १०८, श्लोक १२ (अजंटा शिलालेख); पृ. ११६, श्लोक १०. नंतरच्या लेखामध्ये देवसेनाचा उल्लेख देवराज म्हणून केलेला आहे. पृ. ११९, श्लोक १३.

१९८ कित्ता, पृ. १०८, श्लोक १६ (अजंटा शिलालेख).

१९९ वाकाटक राजवंशाच्या वत्सगुल्म शाखेशी संबंध आलेली हस्तिभोज ही या घराण्यातील पहिलीच व्यक्ती आहे. त्याचे पूर्वज यज्ञपति, देव, सोम, रवि, प्रवर, श्रीराम आणि कीर्ति यांचासुद्धा वाकाटकांशी संबंध होता किंवा नाही याबद्दल सध्या उपलब्ध असलेल्या माहितीच्या आधारे काहीच निश्चित सांगता येत नाही.

२०० काही खगोलशास्त्रीय तारखाही दिलेल्या आहेत. परंतु लेख इतक्या खराब अवस्थेत आहेत की, त्यांचे समाधानकारकपणे निश्चित स्पष्टीकरण देणे कटीण आहे. त्यांचे वेगवेगळे स्पष्टीकरण केलेले आहे.

२०१ प्रस्तुत लेखकाच्या या लेखावरील चर्चेकरिता पहा. **ए. व्ही.,** पृ. २५३-५७.

२०२ मिराशी, व्ही. व्ही., **इन्डॉलॉजिकल रिसर्च पेपर्स,** १, पृ. ७८-८७; अजयमित्र शास्त्री, ''**थाळनेर प्लेटस ऑफ वाकाटक हरिषेण** : ए रिअप्रायझल'', **जे. इ. एस. आय.,** ११, पृ. १५-२०.

२०३ **सी. आय. आय.**, ५, पृ. १०३-११.

२०४ कित्ता, पृ. ११२-१९.

२०५ कित्ता, पृ. १०२-२९.

२०६ **इन्डॉलॉजिकल रिसर्च पेपर्स**, १, पृ. ७९ आणि ८५. मिराशींच्या मते हा हरिषेणाने पराभव केलेला स्थालकनगरचा राजा होता.

२०७ **जे. इ. एस. आय.**, ११, पृ. १७-१८.

२०८ गोखले, शोभना, ''एपिग्राफिकल एव्हिडन्स ऑन हरिषेणाज कॉन्क्वेस्ट फ्रॉम कान्हेरी'', **ए. व्ही.**, पृ. २७७-७८.

२०९ शास्त्री, अजयमित्र, ''ओव्हरलॉर्ड ऑफ दि अर्ली मैत्रकाज'', **जे. इ. एस. आय.**, १६, पृ. ८-१३.

२१० काही विद्वानांच्या मते हरिषेणाने वाकाटकांच्या नंदिवर्मन शाखेच्या सत्तेखाली असलेला प्रदेश स्वतःकडे घेतला होता आणि त्या शाखेचा राजा नरेन्द्रसेन याने मालवांना आधीच जिकल्यामुळे हरिषेणाने अवंती जिंकल्याचा दावा करणे सहज शक्य होते.

२११ मिराशी, व्ही. व्ही., **इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि कलचुरी-चेदि इरा.** १, गव्हर्नमेंट एपिग्राफीस्ट फॉर इंडिया, उटकमंड, १९५५, पृ. ४३.

२१२ **इ. एच. डी.**, पृ. १२८-२९. सुमारे इ. स. ५१८ पर्यंत.

२१३ कित्ता, पृ. १२९.

२१४ मिराशी, व्ही. व्ही., **सी. एच. आय.**, ३, भाग-१, पृ. १४४; **सी. आय. आय.**, ५, पृ. ३५ (XXXV). तसेच काही अन्य बाबींसाठी पहा–**वाकाटक नृपति आणि त्यांचा काळ**, पृ. ५९.

२१५ वाल्टर, एम. स्पिंक, ''द अचिव्हमेंटस ऑफ अजंठा'', **ए. व्ही.**, पृ. १७७.

२१६ लेणी नं. १६-१७ आणि १९ ही नक्कीच त्याच्या राज्य कालातील आहेत. स्पिंक याने दिलेल्या छोट्या कालक्रमानुसार संपूर्ण महायान लेणी त्याच्या शासन काळात येतात.

२१७ क्षुल्लक फरक करून (इ. स. ५०० ते ५१०) सर्व इतिहासकारांनी ही तिथी स्वीकारली आहे. स्पिंक मात्र ही तिथी इ. स. ४८६ देतात. पहा. **ए. व्ही.**, पृ. १७९.

२१८ **रघुवंश आणि दशकुमारचरितातील भौगोलिक वृत्तांत**, पृ. २१.

२१९ **स्टडिज इन इन्डॉलॉजी**, १, पृ. १८२-९४; **सी. आय. आय.**, ५, पृ. ३२-३३ (XXXII-XXXIII), **सी. एच. आय.**, ३, भाग-१, पृ. १४६.

२२० वाल्टर. एम. स्पिंक, **ए. व्ही.**, पृ. १८३-८४.

२२१ मिराशी, व्ही. व्ही. ॲण्ड वाय. आर. गुप्ते, "खानापूर प्लेटस् ऑफ माधववर्मन", **इ. आय.**, २७, पृ. ३१२-१८.

२२२ ती विष्णुकुण्डिन वंशाची आहेत किंवा नाही याबद्दल अलीकडेच शंका व्यक्त करण्यात येऊ लागली. परंतु ती कोणाची असावीत याबद्दल काही खात्रीलायक सूचना केलेल्या नाहीत.

२२३ **इ. एच. डी.**, पृ. १३२-३७.

२२४ सरकार, डी. सी., "ऐहोले इन्स्क्रिप्शन ऑफ पुलकेशी सेकंड", **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स बेअरींग ऑन इंडियन हिस्टरी ॲण्ड सिव्हीलायझेशन**, २, मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, १९८३, पृ. ४४५, श्लोक ९.

२२५ कित्ता.

२२६ शास्त्री, अजय मित्र, "दि मल्हारा प्लेटस् ऑफ आदित्यराजः ए रिअप्रायझल", **जे. इ. एस. आय.**, ४, पृ. ३०-४१; "दि डेट ऑफ मल्हारा प्लेटस् ऑफ आदित्यराज", कित्ता, ७, पृ. ६९-७५.

२२७ शास्त्री, अजय मित्र, "ए नोट ऑन दि थाळनेर प्लेटस् ऑफ भानुषेण", **जे. इ. एस. आय.**, १२, पृ. ५३-५८.

२२८ मिराशी, व्ही. व्ही., "इन्स्क्रिप्शन्स ऑफ कलचुरि-चेदि इरा", **सी. आय. आय.**, ४, भाग-२, पृ. ६११-१७.

२२९ विन्ध्यशक्ति पहिला याच्याबद्दलची माहिती पुराणांद्वारे प्राप्त होते. ज्या शाखेचे सामान्यपणे ज्येष्ट किंवा प्रमुख शाखा असे वर्णन करण्यात येते त्या शाखेच्या राजांना याची आठवण होती असे त्याच्या लेखावरून दिसत नाही. मुळात ही शाखाच ज्येष्ठ किंवा प्रमुख होती याबद्दल निश्चित सांगता येत नाही. वत्सगुल्म शाखेचा देवसेन व त्याचा पुत्र हरिषेण या राजांच्या लेखांमध्ये त्याच्या नावाचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख केलेला दिसतो. त्याचे वर्णन पुराणांनी आदि-राज किंवा वाकाटकांचा पहिला राजा असे केलेले आहे.

---

## प्रकरण ८

# वातापीचे चालुक्य *

**इ. स.** च्या सहाव्या शतकाच्या सुरुवातीस दक्षिणेत एका शक्तिशाली राजघराण्याचा उदय झाला. या घराण्याने सर्वसाधारणपणे भारतीय इतिहासात आणि विशेषतः दक्षिणेच्या इतिहासात महत्त्वाची भूमिका पार पाडली. हे घराणे प्रारंभीचे चालुक्य किंवा वातापी (बदामी, जिल्हा विजापूर, कर्नाटक) किंवा बदामीचे चालुक्य म्हणून ओळखले जाते. विशेषतः दुसरे नाव कोरीव लेखावर तसेच अलिकडील संशोधनावर आधारित असल्यामुळे चालुक्यांच्या इतर शाखापासून वेगळे दाखविण्यासाठी या ग्रंथात प्रस्तुत नावाचा प्रामुख्याने वापर करण्यात आला आहे.[१]

**चालुक्य राजवंशाची उत्पत्ती आणि त्यांचे मूल स्थान :** वातापी (हल्लीचे बदामी, जिल्हा विजापूर, कर्नाटक) ही चालुक्यांच्या संपूर्ण अमदानीतील त्यांची राजधानी होती. इ. स. च्या सहाव्या शतकाच्या मध्यास पहिल्या पुलकेशीने वातापी नगर वसविले. परंतु उत्तर चालुक्यांच्या कोरीव लेखात इक्ष्वाकु राजवंशाची प्रख्यात राजधानी अयोध्या हे चालुक्यांचे मूल स्थान असल्याची नोंद आढळते. या कोरीव लेखात चालुक्यांचे पूर्वज असलेल्या ५२ राजांची वंशावळही देण्यात आलेली आहे. परंतु यात ऐतिहासिकता असण्याची शक्यता फारच कमी आहे. कारण यातील बहुतेक नावे हस्तिनापूरच्या पांडव राजांच्या वंशावळीतील आहेत. या आख्यायिकेतून इतिहासकारांनी एक निष्कर्ष मात्र मान्य केला आहे. तो म्हणजे हा राजवंश उत्तर भारतातील गंगेच्या खोऱ्यातून दक्षिणेत स्थलांतरित झालेला आहे.[२]

उत्तर चालुक्यांच्या कोरीव लेखात "चालुक्य" या वंश नावाच्या व्युत्पत्तीसंदर्भात अनेक आख्यायिका देण्यात आलेल्या आहेत. अर्थात ऐतिहासिक कसोटीवर त्या उतरत नाहीत.[३] तथापि या आख्यायिकात या वंशाचा संस्थापक विष्णुवर्धन ज्या "चलिक्य" पर्वतावर राहत असल्याची माहिती देण्यात आलेली आहे त्याच्यामागे ऐतिहासिक पार्श्वभूमी असल्याचे दिसते. उत्तरेतून दक्षिणेत आल्यावर चालुक्यांचे पूर्वज "चलिक्य" किंवा "चलुक्य" म्हणून ओळखल्या जाणाऱ्या प्रदेशात स्थायिक झाले असावेत व त्या प्रदेशावरून किंवा त्या प्रदेशातील "चलिक्य" नामक पर्वतावरून ते "चालुक्य" या नावाने ओळखले जाऊ लागले असावेत. हा प्रदेश महाराष्ट्र, आंध्र आणि कर्नाटकाच्या संलग्न भागात असावा असे संशोधक मानतात.[४]

आंध्र प्रदेशातील नार्गार्जुनकोंडा येथील दुसऱ्या किंवा तिसऱ्या शतकातील एका शिलालेखात महासेनापती आणि महातलवर हे पद धारण करणाऱ्या खण्ड चालकी रेमणक नामक प्रमुखाचा उल्लेख आलेला आहे.[५] वातापी चालुक्यांच्या पूर्वजांपैकी

* या प्रकरणाचे लेखन डॉ. हरिहर ठोसर (निवृत्त प्रपाठक, इतिहास विभाग, एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई) यांनी केले आहे.

तो असावा असे इतिहासकार मानतात. आंध्रप्रदेशातील विजयपुरी येथील उत्तर सातवाहन किंवा इक्ष्वाकू राजांच्या सेवेत तो असावा व त्याचे वंशज सातवाहनांच्या उत्तराधिकाऱ्यांच्या आमदनीत त्याच भागात शासकीय सेवेत असावेत असे बहुतेक इतिहासकारांचे मत आहे.

वातापीच्या चालुक्यांच्या कोरीव लेखातील वंशावळीनुसार या वंशातील पहिला ऐतिहासिक पुरुष जयसिंह हा होय, परंतु त्याच्या राजकीय जीवनाविषयी फारच थोडी माहिती उपलब्ध आहे. जयसिंह हा चालुक्य राजवंशाचा खरा संस्थापक पहिला पुलकेशी याचा पितामह होता. पुलकेशीचा काळ सहाव्या शतकाचा मध्यावधी आहे. त्यावरून जयसिंह हा सहाव्या शतकाच्या सुरुवातीस होऊन गेला असावा असे इतिहासकार मानतात. काही संशोधक हा जयसिंह आणि मानपूरचा राष्ट्रकूट राजा अभिमन्यू याच्या उण्डिकवाटिका ताम्रपटात उल्लेखिलेला जयसिंह एकच होत असे मानतात.[६] परंतु अभिमन्यूचा काळ चालुक्य जयसिंहाच्या काळापेक्षा कितीतरी अगोदरचा होता.[७] या जयसिंहाच्या संदर्भातील एकच राजकीय घटना ज्ञात आहे आणि ती म्हणजे त्याने राष्ट्रकूट कृष्णाचा पुत्र इंद्र याचा केलेला पराभव. राष्ट्रकूट कृष्ण आणि इंद्र बहुधा दन्तिदुर्गाचे पूर्वज असून त्यांचे राज्य औरंगाबाद–वेरूळ परिसरात होते.[८] या विजयापाठोपाठ जयसिंहाने दक्षिण गुजरात आणि खानदेश हे प्रदेश जिंकून आपला ज्येष्ठ पुत्र रणविक्रम बुद्धवर्मन याची तेथील प्रशासक म्हणून नियुक्ती केली. जयसिंहचा कनिष्ट पुत्र रणराग व त्याचा पुत्र पहिला पुलकेशी यांनी दक्षिण महाराष्ट्र आणि उत्तर कर्नाटकाचा प्रदेश जिंकण्यावर आपले लक्ष केंद्रित केले. हा प्रदेश अनुक्रमे मानपूरचे राष्ट्रकूट आणि कदंब यांच्या राज्यात समाविष्ट होता. ही दोन्ही राजघराणी त्यावेळी ऱ्हासास लागली होती.

**पहिला पुलकेशी** :–पहिला पुलकेशी हा वातापीच्या चालुक्य राजवंशाचा खरा संस्थापक मानला जातो. त्याने अश्वमेध यज्ञ केला होता. हा यज्ञ पुलकेशीने वनवासीचे कदंब आणि मानपूरचे राष्ट्रकूट यांचे प्रदेश जिंकून चालुक्यांचे सार्वभौम राज्य स्थापन केल्याच्या घोषणेच्याप्रसंगी केला असावा. त्याशिवाय पुलकेशीने इतर अनेक यज्ञ व हिरण्यगर्भ महादान समारंभही साजरा केला. त्याने वातापी (बदामी, जिल्हा विजापूर, कर्नाटक) या तटबंदीयुक्त नगराची उभारणी केली व त्या नगरास आपल्या राजधानीचा दर्जा दिला.[९]

पहिल्या पुलकेशीने आपल्या सार्वभौमत्वाचे द्योतक म्हणून त्याच्या पूर्वीच्या राजांच्या "राजन्" आणि "नृप" अशा साध्या बिरुदाऐवजी "महाराज" हे बिरुद धारण केले. तसेच त्याने सत्याश्रय, रणविक्रम आणि श्रीपृथ्वीवल्लभ अशी बिरुदेही धारण केली. पहिला पुलकेशी हा उत्तम योद्धा तर होताच, शिवाय विद्या आणि कलांचाही तो भोक्ता होता. आपल्या सद्‌गुणाचा आदर्श त्याने आपल्या उत्तराधिकाऱ्यासमोर ठेवला व त्यांनी त्याचे अनुकरण केले. त्यामुळे चालुक्यांच्या राज्यात कला, स्थापत्य आणि विद्येची विशेष प्रगती झाली. पहिल्या पुलकेशीचे कीर्तिवर्मन पहिला आणि मंगलेश

हे दोन पुत्र होते. त्याने इ. स. ५३५ ते ५६६ पर्यंत राज्य केले. त्याच्या मृत्यूनंतर ज्येष्ठ पुत्र कीर्तिवर्मन पहिला हा राज्यावर आला. दुर्लभदेवी आणि इंदुमती या पहिल्या पुलकेशीच्या दोन राण्या होत्या. दुर्लभदेवी ही कपूरवंशीय राजकन्या होती.

**पहिला कीर्तिवर्मन :**–कीर्तिवर्मनने अनेक दिग्विजयी स्वाऱ्या करून वारसाहक्काने मिळालेल्या राज्याचा विस्तार केला. मंगलेशाच्या महाकूट येथील शिलालेखात कीर्तिवर्मनने जिंकलेल्या प्रदेशांची यादीच देण्यात आली असून त्यापैकी काही उत्तर भारतातील तर काही प्रदेश दक्षिणेकडील होते. या यादीत अंग, वंग, कलिंग, मगध, मद्र, गंग, मूषक, पांड्य, द्रविड, अलूप, कोलीच इत्यादींचा समावेश होता. ही यादी केवळ प्रशस्तीच्या स्वरुपाची असावी असे इतिहासकार मानतात. परंतु कीर्तिवर्मनच्या उत्तराधिकाऱ्यांच्या कोरीव लेखात त्याने वनवासीचे कदंब, कोकणचे मौर्य आणि मध्यभारतातील नलवंशीय राजांचा निश्चित पराभव केला होता असा उल्लेख आहे. यापैकी कदंबांचे राज्य कर्नाटकात होते. त्या राज्याचा उत्तरेकडील प्रदेश पहिल्या पुलकेशीने जिंकला होता. कीर्तिवर्मनने कदंबांची राजधानी वनवासी पादाक्रांत केली व दक्षिणेतील राजकीय पटावरून कदंबांना नामशेष केले. वनवासीच्या दक्षिणेस दक्षिण कानडा जिल्ह्यात राज्य करीत असलेल्या अनुपांचाही कीर्तिवर्मनने पराभव केला व दक्षिण कर्नाटकात चालुक्य राज्याचा विस्तार केला.

कीर्तिवर्मनची दुसरी महत्त्वाची कामगिरी म्हणजे कोकण अणि गोवा या सागरी प्रदेशावर राज्य करणाऱ्या कोकणच्या मौर्याविरुद्धची मोहीम. अर्थात या मोहिमेची फलनिष्पत्ती पश्चिम किनारपट्टीत चालुक्य राज्याचा विस्तार होण्यात झाली नाही असे दिसते. कारण सातव्या शतकाच्या सुरुवातीस दुसऱ्या पुलकेशीने मौर्यांची राजधानी पुरी जिंकेपर्यंत हे राज्य टिकून असल्याचे पुरावे आहेत.[१०]

नलांचे राज्य नेमके कुठे होते याविषयी संशोधकात मतभेद आहेत. काहींच्या मते आंध्र–कर्नाटकच्या सरहद्दीवरील बेल्लारी–कर्नुल प्रदेशात ते असावे.[११] परंतु हे मत आता कालबाह्य झाले आहे. कारण नलांचे कोरीव लेख ओरिसा आणि मध्यप्रदेश राज्याच्या सरहद्दीवरील बस्तर प्रांतात उपलब्ध झाले आहेत. पुष्करी ही त्यांची राजधानी होती. बस्तर प्रांतातील पोडागढ म्हणजे पुष्करी होय. रिद्धपूर (जिल्हा अमरावती, महाराष्ट्र) येथील नल राजा भवदत्तवर्मनच्या ताम्रपटावरून नलांनी महाराष्ट्राचा विदर्भ प्रदेश जिंकला असल्याची माहिती मिळते.[१२] यावरून वाकाटक घराण्याच्या अस्तानंतर त्यांचे विदर्भातील राज्य नलांनी जिंकून आपल्या राज्यास जोडले हे स्पष्ट होते. या आधारे कीर्तिवर्मनने नलांच्या विरुद्ध जी मोहीम हाती घेतली ती आग्नेय दिशेस नसून ईशान्य दिशेस होती हे सिद्ध होते. ही मोहीम देखील प्रदेश मिळण्याच्या दृष्टीने फलदायी टरली नाही. कीर्तिवर्मनचा धाकटा भाऊ मंगलेश याने पुढे नलांचा पूर्ण बीमोड केला. के. व्ही. रमेश यांच्या मतानुसार कीर्तिवर्मनने उत्तर भारतातही धडक मारली असावी.[१३] तथापि उत्तरेतील मोहिमा केवळ

दिग्विजयाच्या स्वरुपाच्या असाव्यात कारण उत्तर भारतातील कोणताही प्रदेश चालुक्यांनी जिंकला नाही. सततच्या मोहिमामुळे कीर्तिवर्मनला राज्यकारभारात लक्ष देण्यास फुरसत मिळाली नाही. त्यामुळे इ. स. ५७८ नंतर कीर्तिवर्मनने आपल्या राज्य प्रशासनात आपला धाकटा भाऊ मंगलेश यास सहभागी करून घेतले.

कीर्तिवर्मन आपल्या पित्याप्रमाणे विद्या आणि कलांचा आश्रयदाता होता. वेदाभ्यासाठी त्यांनी कित्येक विद्वान ब्राह्मणांना भूमि आणि ग्रामदाने दिली. त्याने वातापीच्या उभारणीचे काम चालू ठेवले. तसेच त्या परिसरातील ऐहोळ येथील चिकीगुडी मंदिर बांधले. पुगवर्मन हे कीर्तिवर्मनचे दुसरे नाव असून त्याची कारकीर्द इ. स. ५६७ ते ५९१ किंवा ५९७ या कालावधीत मोडते. कीर्तिवर्मनची राणी सेंद्रक वंशातील होती पण तिचे नाव माहीत नाही. त्याला पुलकेशी आणि विष्णुवर्धन असे दोन पुत्र होते.

**मंगलेश :**—कीर्तिवर्मनचा मृत्यूच्या वेळी पुत्र अल्पवयीन असल्यामुळे त्याचा धाकटा भाऊ मंगलेश राज्यावर आला. मंगलेश याला राज्यारोहणापूर्वीपासूनच प्रशासकीय कामाचा अनुभव होता. या विषयीची नोंद उपलब्ध आहे. त्यामुळे कीर्तिवर्मनच्या मुलांचा राजपालक म्हणून राजसत्तेची सुत्रे त्याच्या हाती आली. त्याने कीर्तिवर्मनचे आक्रमक धोरण पुढे चालू ठेवले.

राज्याची सुत्रे हाती घेतल्याबरोबर प्रथम त्याला महिष्मतीच्या कलचुरींविरुद्ध मोहीम हाती घ्यावी लागली. बहुधा बुद्धराज कलचुरी याने चालुक्यांच्या प्रदेशावर आक्रमण केले व त्याला धडा शिकविण्यासाठी मंगलेशाने बुद्धराजाशी संघर्ष केला असे मानले जाते. मंगलेशाच्या कोरीव लेखातील वर्णनानुसार त्याने बुद्धराज यास परास्त केले असे वर्णन आढळते. परंतु बुद्धराज कलचुरीच्या वडनेर ताम्रपटानुसार या घटनेनंतरही नाशिक परिसराचा समावेश कलचुरींच्या राज्यात होता.[१४] यावरून कलचुरींच्या विरुद्ध हाती घेतलेल्या या मोहिमेमुळे मंगलेशाला नवीन मुलूख मिळाला नाही.

नेरूर ताम्रपटानुसार मंगलेशाने चालुक्य वंशातील कोणा स्वामिराज. नामक व्यक्तिचा वध केला. काही संशोधकांनी असे मत व्यक्त केले आहे की स्वामिराज हा चालुक्य राजपुत्र असून कीर्तिवर्मनने त्याची नियुक्ती कोकणातील नव्याने जिंकलेल्या प्रदेशाचा प्रशासक म्हणून केली. पुढे मंगलेश आणि दुसरा पुलकेशी यांच्यातील सत्ता संघर्षाच्यावेळी स्वामिराजाने पुलकेशीची बाजू घेतली व त्यामुळे मंगलेशाने त्याला ठार केले. वास्तविक पुलकेशी झालेल्या संघर्षात मंगलेश स्वतःच ठार झाला त्यामुळे यानंतरच्या आलेखात त्याचा उल्लेख येत नाही. तेव्हा त्याने यादवी नंतर स्वामिराजास ठार केल्याच्या तर्कास आधार नाही. याउलट नेरूर ताम्रपटातील या स्वामिराजाच्या उल्लेखावरून ही घटना मंगलेश हा चालुक्य राज्याचा सर्वाधिकारी असताना घडली होती असे दिसते. के. व्ही. रमेश यांनी सूचित केल्याप्रमाणे

स्वामिराज हा बुद्धराज कलचुरीचा मित्र असून त्याच्याशी संगनमत केल्यामुळे मंगलेशाने त्याचा वध केला असावा ही शक्यता रास्त वाटते.[१५] असे असेल तर स्वामिराज हा दख्खनच्या उत्तर भागातील बुद्धराज कलचुरीचा शेजारी असलेला असावा. प्रस्तुत लेखकाने अलिकडेच दाखवून दिले आहे की मंगलेशाने वध केलेला स्वामिराज म्हणजे महाराष्ट्रातील नागपूर जिल्ह्यात नगरधन येथे सापडलेल्या ताम्रपटातील स्वामिराज होय.[१६]

उत्तर चालुक्यांच्या ताम्रशासनात नोंदलेली मंगलेशाची दुसरी महत्त्वाची कामगिरी म्हणजे त्याचा रेवतीद्वीपाचा विजय. ताम्रपटातील वर्णनावरून घनघोर नाविक युद्धानंतर मंगलेशाने रेवतीद्वीप जिंकले होते. त्यावरून ते ठिकाण महाराष्ट्राच्या पश्चिम किनारपट्टीत असले पाहिजे हे निश्चित. काही संशोधकांनी दक्षिण कोकणातील सिंधुदुर्ग जिल्ह्यातील रेडी म्हणजे रेवतीद्वीप होय असे म्हटले आहे. परंतु हे समीकरण बरोबर नाही. कारण रेडी हे दक्षिण कोकणात आहे, तर त्याच्या अंतर्गत ताम्रपटात जी ग्रामनामे दिली आहेत ती उत्तर कोकणातील आहेत. त्या आधारे रेवतीद्वीप म्हणजे रायगड जिल्ह्यात चौलजवळील रेवदंडा किंवा रेवस असले पाहिजे. कारण प्राचीन आख्यायिकात चौल परिसराचा उल्लेख रेवतीक्षेत्र म्हणून करण्यात आला आहे.[१७] याउलट इतर समकालीन ताम्रपटात रेडीचा उल्लेख इरिडिगे म्हणून करण्यात आला आहे. काही संशोधकांनी असे मत व्यक्त केले आहे की वर उल्लेखिलेल्या नेरुर ताम्रपटातील स्वामिराजाचा वध करून मंगलेशाने त्याचे रेवतीद्वीप जिंकले. हा तर्कही चुकीचा आहे. कारण वर दाखविल्याप्रमाणे स्वामिराज हा दख्खनच्या उत्तरेकडील प्रदेशातील शासक होता. शिवाय उत्तर चालुक्यांच्या ताम्र शासनात रेवतीद्वीपाच्या पूर्वीच्या शासकाचे नावच दिलेले नाही. याउलट अलीकडे प्रकाशात आलेल्या कोरीव लेखावरून संपूर्ण कोकणपट्टीवर त्याकाळी कोकणच्या मौर्य घराण्याचे राज्य होते हे सिद्ध झाले आहे.[१८]

दुसऱ्या पुलकेशीच्या काळातील ऐहोळे शिलालेखातील वर्णनावरून वातापीच्या चालुक्यांनी पहिल्या कीर्तिवर्मनच्या कारकीर्दीपासूनच कोकणातील मौर्यांच्या विरुद्ध मोहिमा सुरू केल्या होत्या. म्हणून मंगलेशाचा रेवतीद्वीप विजय म्हणजे त्याच मालिकेतील पुढील घटना ठरते. यावरून हेही सिद्ध होते की मंगलेशाने रेवतीद्वीप कोकणच्या मौर्यांकडून जिंकले. बप्पुर वंशीय ध्रुवराज इंद्रवर्मन याच्या गोवा ताम्रपटातही मंगलेशाने रेवतीद्वीप जिंकल्याचे वर्णन आले आहे. या ताम्रपटात अशीही नोंद आहे की मंगलेशाने रेवतीद्वीपातील चार विषयांचा शासक म्हणून ध्रुवराज इंद्रवर्मन याची नियुक्ती केली.[१९]

या सैनिकी विजयांची धुंदी मंगलेशाला एवढी चढली की तिच्या भरात आपला वयात आलेला पुतण्या दुसरा पुलकेशी याचा चालुक्य सिंहासनावरील हक्कच त्याने नाकारला. ऐहोळ शिलालेखात पुढे असे वर्णन आले आहे की मंगलेशाच्या या

धारिष्ट्यांमुळे त्याच्यात व दुसऱ्या पुलकेशीमध्ये यादवी सुरू झाली आणि या यादवीत मंगलेशाला केवळ राजसिंहासनच नव्हे तर आपला प्राणही गमवावा लागला. त्याने इ. स. ५९१ किंवा ५९७ ते ६११ या कालावधीत राज्य केले. मंगलेशाने रणविक्रांत हे बिरुद धारण केले होते.

**दुसरा पुलकेशी (इ. स. ६११ ते ६४३) :** दुसऱ्या पुलकेशीने आपल्या चुलत्याचा वध करून सिंहासन तर मिळविले, परंतु आपले आसन स्थिर करण्यापूर्वी त्याला अनेक आपत्तींना सामोरे जावे लागले. पुलकेशी आणि मंगलेश यांच्यातील यादवीची संधी साधून अनेक सामंत आणि शत्रूंनी चालुक्य सत्तेविरुद्ध बंडाचे निशाण उभारले. ऐहोळे शिलालेखात या काळातील अराजकाचे पुढील शब्दात वर्णन करण्यात आले आहे. "शत्रूंच्या रुपाने निर्माण झालेल्या अंधःकारात संपूर्ण राज्य बुडून गेले होते."[२०]

ऐहोळे शिलालेखातील माहितीनुसार पुलकेशीच्या अधिकारग्रहणानंतरच्या काळात प्रथम भीमा नदीच्या उत्तरेकडील प्रदेशातून गोविंद आणि अप्पायिक यांनी चालुक्य राज्यावर आक्रमण केले. पुलकेशीने या दोघावरही मात केली. ऐहोळे प्रशस्तीत पुढे असे म्हटले आहे की विजयी पुलकेशीने गोविंदाच्या बंडखोरीस क्षमादान केले आणि त्याची पूर्वायुष्यातील सेवा विचारात घेऊन त्याचे राज्य त्याच्याकडे कायम ठेवले. परंतु अप्पायिकास मात्र पुलकेशीने ठार केले. रा. गो. भांडारकर यांनी या गोविंदाची निश्चिती राष्ट्रकूट दंतिदुर्गाचा प्रपितामह पहिला गोविंद याच्याशी केली होती ती रास्त ठरते.[२१] कारण अलीकडेच या राष्ट्रकूट गोविंदाचा पुत्र कर्क प्रतापशील याचे दोन ताम्रपट औरंगाबाद आणि बुलढाणा जिल्ह्यात उपलब्ध झाले आहेत. त्यावरून गोविंदाचे राज्य औरंगाबाद-बुलढाणा परिसरात होते हे प्रकाशात आले. हा प्रदेश भीमा नदीच्या उत्तरेस आहे. कर्क राष्ट्रकूटांचे वरील दोन्ही ताम्रपट सातव्या शतकाच्या उत्तरार्धातील होत. कर्काचा काळ सातव्या शतकाच्या मध्यापासून शेवटापर्यंत मानला जातो. गोविंद हा कर्काचा पिता असल्यामुळे त्याचा काळ सातव्या शतकाच्या पूर्वार्धात मोडतो व तो दुसऱ्या पुलकेशीचा समकालीन ठरतो. अशाप्रकारे कालविपर्यासाचा जो आक्षेप काही संशोधकांनी भांडारकरांच्या या विधानास केला होता तो आपोआप दूर होतो.[२२] त्यामुळे ऐहोळे शिलालेखातील पुलकेशीचा शत्रू गोविंद म्हणजे राष्ट्रकूट पहिला गोविंद होय हे निःसंशय सिद्ध होते.

के. व्ही. रमेश यांनी अप्पायिक हा मंगलेशाचा पुत्र असावा असे म्हटले आहे तेही तर्कसंगत वाटते.[२३] यावरून असे दिसते की, मंगलेशाच्या मृत्यूनंतर अप्पायिक राष्ट्रकूट गोविंद याच्या आश्रयास गेला. मंगलेश हा पूर्वी गोविंदाचा अधिराज असल्यामुळे स्वामीपुत्रास संकटकाळी मदत करणे त्याला क्रमप्राप्त वाटले व त्याने पुलकेशीचे शत्रुत्व पत्करून अप्पायिकास वातापीवर स्वारी करण्याच्या कामी मदत केली. ऐहोळे शिलालेखातील गोविंद व अप्पायिक यांची ऐतिहासिकता व त्यांच्या स्वारीमागील ऐतिहासिक पार्श्वभूमी याठिकाणी प्रथमतः विशद करण्यात आली.

चालुक्य सिंहासनावर हक्क सांगणाऱ्या व त्यांना मदत करणाऱ्या शत्रूंचा बीमोड केल्यानंतर पुलकेशीने आपले लक्ष दक्षिणेकडील प्रतिस्पर्धी असलेल्या राजांकडे वळविले. यापैकी वनवासीचे कदंब हे चालुक्यांचे प्रमुख प्रतिस्पर्धी होते. खरे पाहिल्यास पुलकेशीचा पिता कीर्तिवर्मन याने वनवासी जिंकून कदंब घराण्याची सत्ता जवळ जवळ संपुष्टात आणली होती. परंतु पुलकेशी आणि मंगलेश यांच्यातील यादवीचा लाभ घेऊन कदंबांनी पुन्हा डोके वर काढले व आपल्या पुरातन राजसत्तेचे पुनरुज्जीवन करण्याच्या दृष्टीने हालचाली सुरू केल्या. पुलकेशीने वनवासीवर स्वारी करून ते शहर परत जिंकले व कदंबांचा प्रयत्न निष्फळ केला. त्यानंतर त्याने दक्षिण कर्नाटकातील गंग आणि अलूप वंशीय राजांना धडा शिकविला. त्यांनी कदंबांना पुलकेशी विरुद्ध लढण्याच्या कार्यात मदत केली होती. पुलकेशी अशाप्रकारे उत्तरेस गोदावरी व दक्षिणेस कावेरी या नद्यांच्या मधील विशाल प्रदेशाचा अनिरुद्ध स्वामी बनला.

ऐहोळे प्रशस्तीचा कर्ता रविकीर्ति याने यानंतर पुरी या कोकणच्या मौर्यांच्या राजधानीवरील पुलकेशीच्या स्वारीचे सविस्तर वर्णन केले आहे. अलीकडील पुराभिलेखीय संशोधनावरून ही बाब स्पष्ट झाली आहे की त्रैकूटक राजवंशाच्या अस्तानंतर इ. स. च्या चौथ्या शतकाच्या अखेरीस महाराष्ट्राची पश्चिम किनारपट्टी आणि गोवा या प्रदेशावर कोकणच्या मौर्यांनी आपली सत्ता स्थापन केली. कीर्तिवर्मन आणि मंगलेश यांच्या सतत होणाऱ्या आक्रमणानंतर देखील त्यांनी दुसऱ्या पुलकेशीच्या कारकिर्दीपर्यंत उत्तर कोकणवर आपली पकड कायम ठेवली होती. कीर्तिवर्मनची कोकण मोहीम फक्त दिग्विजयाच्या स्वरुपाची होती. त्यामुळे कोकणचा कुठलाही प्रदेश त्याने जिंकला नाही. मंगलेशाने मात्र वर वर्णन केल्याप्रमाणे चौल–रेवदंडा या उत्तर कोकणातील बंदरापर्यंत संपूर्ण दक्षिण कोकण जिंकले. चौलच्या उत्तरेकडील कोकण मात्र राजधानी पुरीसह अजूनही मौर्यांच्या ताब्यात होते.[२४] ऐहोळे शिलालेखातील माहितीवरून पुरी ही मौर्यांची राजधानी होती हे सत्य सर्वज्ञात झाले. परंतु ही पुरी नेमकी कुठे होती याविषयी संशोधकात विविध मतप्रवाह होते. परंतु निर्णायक पुराव्यांच्या आधारे प्रस्तुत लेखकाने पुरी म्हणजे रायगड जिल्ह्यातील व मुंबई जवळील घारापुरी उर्फ एलिफंटा बेट होय हे दाखवून दिले आहे.[२५]

पुरीवरील विजय आणि कोकणच्या मौर्यांच्या राज्याच्या शेवट पुलकेशीला अतिशय लाभदायक टरला. या विजयाने चालुक्य राज्याचा विस्तार तर झालाच, शिवाय कोकणातील आयात–निर्यात व्यापारासाठी प्रसिद्ध असलेल्या सोपारा, कल्याण, चौल टाणे आणि पुरी या बंदरावर चालुक्यांचे स्वामित्व प्रस्थापित झाल्यामुळे पाश्चात्य जगताशी व्यापारावर चालुक्यांचे नियंत्रण सुरू झाले.[२६] रविकीर्तिने पुरीचे वर्णन "अपरजलधेर्लक्ष्मी" अशा गौरवपूर्ण विशेषणाने केले आहे. ऐहोळे शिलालेखात अशीही नोंद करण्यात आली आहे की पुरी जिंकण्यासाठी पुलकेशीने शेकडो

युद्धनौकांचा वापर केला व पुरीला चहुबाजूंनी वेढा दिला.[२७] या वर्णनावरून स्पष्ट होते की, पुरीसाठी प्रदीर्घ सागरी युद्ध झाले. दोन्ही पक्षांनी केलेल्या आरमारी क्षेत्रातील प्रगतीची यावरून कल्पना येते. प्राचीन काळी नौदलाकडेही विशेष लक्ष पुरविले जात होते हे सिद्ध करणारा हा महत्त्वाचा पुरावा होय. बुद्धवर्ष चालुक्यांच्या संजान ताम्रपटावरून स्पष्ट होते की पुरी–कोकण विजयानंतर या प्रदेशाचा प्रशासक म्हणून पुलकेशीने बहुधा बुद्धवर्षाची नियुक्ती केली असावी. बुद्धवर्ष हा चालुक्य वंशाच्या गुजरात शाखेतील राजपुरुष असून पुलकेशीचा दूरचा चुलतभाऊ होता.[२८] या विजयाचे स्मारक म्हणून पुलकेशीने "सत्याश्रय" अशी अक्षरे असलेली खास नाणी पाडली ती नुकतीच घारापुरी येथे सापडली आहेत.[२९]

कोकण विजयानंतर पुलकेशीने गुजरातवर स्वारी केली. त्यावेळी मध्य आणि दक्षिण गुजरात किंवा लाट देश गुर्जर वंशाच्या व सौराष्ट्र आणि माळव्याचा पश्चिम भाग मैत्रक घराण्याच्या अंमलाखाली होता. पुलकेशीने मध्य गुजरातपर्यंतचा प्रदेश जिंकला. बागुमरा ताम्रपटानुसार पुलकेशीने आपल्या नात्यातील निकुंभ अल्लशक्ती याची गुजरातचा प्रशासक म्हणून नियुक्ती केली.

त्यानंतर ऐहोळे शिलालेखात पुलकेशीने हर्षवर्धनावर मिळविलेल्या विजयाचे वर्णन आलेले आहे. ही घटना नेमकी कोणत्या वर्षी घडली याविषयी विद्वानात मतभेद आहेत. परंतु असे म्हणता येईल की आपल्या आयुष्यातील सर्वात महत्त्वाचा असलेला हा विजय पुलकेशीचा असलेला हा विजय पुलकेशीने इ. स. ६३० व ६३४ या कालावधीत प्राप्त केला. हर्ष आणि पुलकेशी यांच्यातील लढाई नर्मदा नदीकाठी झाली. यापूर्वी मध्य गुजरात जिंकून पुलकेशीने नर्मदेच्या उत्तरेकडील प्रदेश आपल्या स्वामीत्वाखाली आणला होता. हर्षाने संपूर्ण उत्तर भारत आपल्या स्वामीत्वाखाली आणून "सकलोत्तरपथनाथ" ही उपाधी प्राप्त केली होती आणि नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेश आपल्या प्रभुत्वाखाली आणण्याच्या दृष्टीने त्याने हालचाली सुरू केल्या होत्या. अशा परिस्थितीत पुलकेशी आणि हर्ष यांच्या ताब्यातील प्रदेश परस्परांना भिडले. त्यामुळे दोघातील संघर्ष अटळ टरला. या संघर्षाची सविस्तर माहिती उपलब्ध नाही. परंतु असे दिसते की, हा संघर्ष नर्मदेच्या उत्तरेकडील भागात झाला. पुलकेशीने हर्षास केवळ नर्मदेच्या पलीकडे रोखलेच नव्हे, तर त्याला तेथूनही माघार घेण्यास भाग पाडले. ऐहोळे शिलालेखात पुढे असे वर्णन आले आहे की या स्वाऱ्यानंतर पुलकेशी ९९,००० गावे ज्याच्यात समाविष्ट आहेत अशा तीन महाराष्ट्रकांचा स्वामी बनला. ही तीन महाराष्ट्रक म्हणजे हल्लीचे गुजरात, महाराष्ट्र आणि कर्नाटक ही राज्ये होत. हर्षावरील विजयाचे प्रतीक म्हणून त्याने "परमेश्वर" व "दक्षिणापृथनाथ" अशी बिरुदे घेतली. सत्याश्रय हेही त्याचे बिरुद होते. पुलकेशीच्या कारकिर्दीत प्रसिद्ध चिनी प्रवाशी ह्यू-एन-त्संग याने महाराष्ट्रास भेट दिली. त्याने पुलकेशीचे वर्णन महाराष्ट्राचा राजा म्हणून केले. त्याची एका मोठ्या नदीच्या पूर्व किनाऱ्यावरील राजधानी म्हणजे पैठण होय.[३०]

हर्षावरील विजयापाटोपाट पुलकेशीने मध्य भारताच्या पूर्व भागातील कोसल राज्यातील पांडुवंशी आणि कलिंगच्या गंग राजांचा पराभव केला. त्यानंतर आंध्र प्रदेशातील पिष्टपुर आणि कुणाल दुर्गावर स्वारी केली व त्या भागातील विष्णुकुंडिन वंशाचे राज्य पादाक्रांत केले. संपूर्ण आंध्र प्रदेशाचा शासक म्हणून पुलकेशीने आपला भाऊ कुब्जविष्णुवर्धन याची नियुक्ती केली. त्याचे वंशज तिथे इ. स. १०७० पर्यंत राज्य करीत होते.

आंध्र विजयानंतर पुलकेशीने कांचीच्या पल्लवांविरुद्ध मोहीम सुरू केली. पुलकेशीच्या सैन्याने पल्लवांची राजधानी असलेल्या कांची नगरापर्यंत धडक मारली. कांचीवर पुलकेशीला विजय मिळविता आला नाही. परंतु पल्लव राजा पहिला महेंद्रवर्मन याचा त्याने पाडाव केला व त्याला कांचीच्या तटबंदीत कोंडून ठेवले. पल्लव राजास एकटे पाडण्यासाठी त्याने त्यांच्या अंकित असलेल्या चौल, पाण्ड्य आणि चेर राजांची मैत्री संपादन केली. संपूर्ण सातव्या शतकात पल्लव आणि चालुक्य यांच्या ज्या अनेक लढाया झाल्या त्या मालिकेतील ही पहिली लढाई होती. या लढाईने पल्लव आणि चालुक्य यांच्यात पिढीजात वैर सुरू झाले व शेवटी पुलकेशीच्या मृत्यूस ते कारणीभूत ठरले. त्यामुळे चालुक्यांच्या सार्वभौम सत्तेस एक दशकाहून अधिक काळाचे ग्रहण लागले. शेवटी मात्र चालुक्य–पल्लव यांच्यातील संघर्षाची परिणती पल्लवांचे राज्यच नष्ट होण्यात झाली.

इ. स. ६४२ मध्ये आपल्या पित्याच्या पराभवाचा सूड घेण्याच्या दृष्टीने महेंद्रवर्मनचा उत्तराधिकारी पहिला नरसिंहवर्मन याने अचानकपणे चालुक्यांच्या राज्यावर आक्रमण केले. हा हल्ला एवढ्या तडकाफडकी करण्यात आला की, त्यात पुलकेशी देखील बेसावध अवस्थेत पकडला गेला. पल्लव सैन्याने चालुक्यांचा प्रदेश पादाक्रांत करून वातापीस वेढा टाकला. पुलकेशीने सैन्याची जमवाजमव करून राजधानी वाचविण्यासाठी प्रखर प्रतिकार केला. परंतु या लढाईत स्वतः पुलकेशी मारला गेल्यामुळे युद्धाचे पारडे पल्लवांच्या बाजूने झुकले. नरसिंहवर्मनने वातापीचा ताबा घेतला. आपल्या विजयाचे प्रतीक म्हणून त्याने "वातापीकोंडा" हे बिरुद धारण केले व या पराक्रमाचे स्मारक म्हणून वातापी येथील प्रस्तरावर आपल्या राजाज्ञेचा शिलालेख कोरविला.[३१] चालुक्य वंशातील सर्वश्रेष्ठ आणि प्राचीन भारतातील श्रेष्ठ असलेल्या पुलकेशीचा असा दुर्दैवी अंत झाला. त्याने आपल्या वंशासाठी एक विशाल साम्राज्य निर्माण केले. या साम्राज्याची व्याप्ती उत्तरेस नर्मदेपासून दक्षिणेस कावेरीपर्यंत व पश्चिमेस अरबी समुद्रापासून पूर्वेस बंगालच्या उपसागरापर्यंत होती.

**पहिला विक्रमादित्य :** इ. स. ६४२–४३ मध्ये पुलकेशीचा मृत्यू झाला. त्यानंतरची १२–१३ वर्षे चालुक्य वंशाच्या इतिहासातील अंधःकारमय कालखंड ठरला. पहिल्या

विक्रमादित्याचे राज्यारोहण इ. स. ६५४–५५ मध्ये झाले. त्या आधारे इतिहासकार असे मानतात की मध्यंतरीच्या १३ वर्षांच्या कालावधीत चालुक्यांचे सिंहासन रिक्त होते. राजधानी वातापीवर पल्लवांचा ताबा असल्यामुळे पुलकेशीच्या मुलांना या काळात इतरत्र आश्रय घ्यावा लागला होता. अलीकडे प्रकाशात आलेल्या पुराभिलेखीय पुराव्यामुळे या ग्रहणकाळातील घटनाविषयी नवी माहिती उपलब्ध झाली आहे ती पुढीलप्रमाणे होय.

दुसऱ्या पुलकेशीला एकूण चार पुत्र होते. त्यांची नावे आदित्यवर्मन, चंद्रादित्य, विक्रमादित्य आणि जयसिंह अशी होती. के. व्ही रमेश यांच्या मते चंद्रादित्याचे दुसरे नाव नागवर्धन असे होते.[३२] बदामी येथील एका शिलालेखात अशी स्पष्ट नोंद करण्यात आली आहे की पुलकेशीने स्वतः आपला तिसरा मुलगा विक्रमादित्य याला युवराजपद देऊन आपला उत्तराधिकारी म्हणून त्याची निवड केली होती.[३३] परंतु पुलकेशीच्या आयुष्याची शोकांतिका आणि पुढील एक तपाच्या काळातील वातापीवरील पल्लवांच्या कब्जामुळे विक्रमादित्यास आपला राज्याभिषेक करवून घेता आला नाही. यामागे आणखी एक कारण होते. ते म्हणजे पुलकेशीचा ज्येष्ठ पुत्र आदित्यवर्मन याने विक्रमादित्याच्या वारसाहक्कास दिलेले आव्हान. कारण १३ वर्षांच्या ग्रहणकाळातील पल्लवांचा केवळ एकच शिलालेख बदामीस उपलब्ध झाला आणि तोही ६४२–४३ च्या सुमारास कोरविलेला. त्याऐवजी या काळातील आदित्यवर्मन याचा एक ताम्रपट नुकताच उपलब्ध झाला असून त्यात अशी माहिती आढळते की विक्रमादित्यांचा वारसाहक्क अमान्य करून आदित्यवर्मन याने आपण स्वतः पुलकेशीचा खरा वारस असल्याचे घोषित करून राजशासन काढले. कर्नाटकाच्या चित्रदुर्ग जिल्ह्यात उपलब्ध झालेल्या आणखी एका कोरीव लेखावरून असे दिसते की आदित्यवर्मनच्या नंतर त्याचा पुत्र अभिनवादित्य याने आपणास चालुक्य नरेश म्हणून घोषित केले. यावरून हे स्पष्ट होते की १३ वर्षांच्या ग्रहणकाळात या पितापुत्रांनी वातापी चालुक्य सत्ता आपल्या ताब्यात घेतली होती.[३४] या काळात बहुधा इतर भाऊ विक्रमादित्याच्या पक्षात होते व विक्रमादित्यांसह त्यांनी चालुक्य राज्यात इतरत्र, बहुधा महाराष्ट्रात आश्रय घेतला असावा. महाराष्ट्राच्या कोकण विभागात सिंधुदुर्ग जिल्ह्यातील नेरुर (तालुका कुडाळ) येथे वातापी चालुक्यांचे सहा ताम्रपट सापडले आहेत.[३५] यापैकी एक विक्रमादित्याचा ज्येष्ठ बंधु चंद्रादित्य याची पत्नी विजयभट्टारिका हिने जारी केला होता. या ताम्रपटातील राजवंशावळीत शासक राजा म्हणून विक्रमादित्याचा उल्लेख असून तीत चंद्रादित्याचे नावही नमूद करण्यात आले आहे. यावरून अशी शक्यता दिसते की चालुक्य राज्याचा दक्षिण भाग पल्लवांच्या ताब्यात असल्यामुळे व वातापीवर आदित्यवर्मनने वर्चस्व प्रस्थापित केल्यामुळे विक्रमादित्य आणि चंद्रादित्य यांनी महाराष्ट्रातील नाशिक–कोकण परिसरात आश्रय घेतला. काही इतिहासकारांनी चंद्रादित्यपूर (चांदवड, जिल्हा नाशिक, महाराष्ट्र) या स्थलनामाचा संबंध चालुक्य चंद्रादित्य

याच्याशी असल्याचे मत व्यक्त केले आहे.[३६] यास पुष्टी देणारा पुरावा नाशिक जिल्ह्यातील नांदगाव इथे उपलब्ध झालेल्या चंद्रादित्य उर्फ नागवर्धन याच्या स्वतः दिलेल्या ताम्रपटावरून मिळतो.[३७] या संदर्भात आणि एक महत्त्वाचा पुरावा म्हणजे वातापी चालुक्यांच्या कित्येक ताम्रशासनात पहिल्या विक्रमादित्याच्या नावामागे "कोंकणी" असे पूर्वपद जोडण्यात आले आहे.[३८]

इ. स. ६५४–५५ च्या सुमारास विक्रमादित्याने आपला बंडखोर पुतण्या अभिनवादित्य याचा पराभव करून वातापीवर आपला ताबा प्रस्थापित करून स्वतःस राज्याभिषेक करवून घेतला. आदित्यवर्मन आणि अभिनवादित्य यांच्या बंडखोरीमुळे त्यांची नावे पुढील काळातील ताम्रपटातील वंशावळीतून वगळण्यात आली. अशा परिस्थितीत १३ वर्षांच्या विक्रमादित्याचा वनवास व अज्ञातवासाचा काळ हा ग्रहणकाळ नसून आदित्यवर्मन आणि अभिनवादित्य यांचा शासनकाळ होता अशी माहिती या काळातील इतिहासाबाबत उपलब्ध झाली आहे.

विक्रमादित्याने वातापी येथे आपले आसन स्थिर केल्यावर सर्व मांडलिक राजांवर आपले नियंत्रण प्रस्थापित केले व त्यानंतर आपल्या वंशाचे पुरातन शत्रू असलेल्या पल्लवांविरुद्ध बदल्याच्या मोहिमा सुरू केल्या. हैद्राबाद ताम्रपटानुसार विक्रमादित्याने पल्लव नरेश पहिला नरसिंहवर्मन, त्याचा पुत्र दुसरा महेंद्रवर्मन आणि पौत्र परमेश्वरवर्मन या तिघांच्याही विरुद्ध स्वाऱ्या केल्या. यावरून त्याने पल्लवांच्या तीन पिढ्यांशी सतत संघर्ष केला हे स्पष्ट होते. या कालावधीत विक्रमादित्याने पल्लवांच्या ताब्यातील आपला प्रदेश तर मुक्त केलाच एवढेच नव्हे तर पल्लव प्रदेश व्यापून व कांची शहर जिंकून वातापीच्या पाडावाचा व पुलकेशीच्या मृत्यूचा पूर्ण बदला घेतला.

अलीकडील काळातील प्रकाशित ताम्रशासनावरून हे स्पष्ट होते की पल्लवांना त्यांच्या दुष्कृत्यांचा धडा शिकविण्याची प्रतिज्ञाच जणू विक्रमादित्याने घेतली होती. कित्येक वर्षे त्याने पल्लवांच्या प्रदेशात आपली छावणी टाकली व त्याची दमछाक करून टाकली. त्यामुळे पल्लवांचा लौकिक पार धुळीस मिळाला आणि त्या राजवंशाच्या ऱ्हासास सुरुवात झाली.[३९]

वनवासाच्या काळात विक्रमादित्यास सतत भ्रमंती करावी लागली. राज्यपुनर्स्थापनेनंतरही पल्लवांविरुद्धच्या मोहिमांमुळे त्याला सतत राजधानीपासून दूर रहावे लागे. त्यामुळे या काळातील विक्रमादित्याच्या ताम्रपटात वारंवार त्याच्या चित्रकंठ नामक आवडत्या घोड्याचा उल्लेख येतो. सतत बाहेर रहावे लागल्यामुळे आपल्या कारकिर्दीच्या अखेरीस विक्रमादित्याने राज्यप्रशासनाची जबाबदारी युवराज विनयादित्यावर सोपविली. धाकटा भाऊ धराश्रय जयसिंह यास गुजरातचा शासक म्हणून नेमले. अंजनेरी ताम्रपटानुसार नाशिक आणि कोकण प्रदेशाचे प्रशासन गुर्जर वंशाशी संबंधित असलेल्या स्वामिचंद्र याच्याकडे सुपूर्त केले. आपली सत्ता पुन्हा

प्रस्थापित करण्यासाठी तसेच बंडखोरांना शासन करण्यासाठी विक्रमादित्यास अतिशय आक्रमक आणि काहीसा कठोर पवित्रा घ्यावा लागला. परंतु उद्दिष्ट साध्य झाल्यावर त्याच्या कार्यकालाच्या अखेरीस शांततेचे नवे युग अवतरले व काही अपवाद वगळता त्याच्या उत्तराधिकाऱ्यांच्या काळात शांतता कायम राहिली. विक्रमादित्याची कारकीर्द इ. स. ६८१ मध्ये संपली.[४०]

**विनयादित्य आणि विजयादित्य :** पहिल्या विक्रमादित्याच्या मृत्यूनंतर इ. स. ६८१ च्या सुमारास त्याचा पुत्र विनयादित्य हा राज्यावर आला. परंतु वर सांगितल्याप्रमाणे आपल्या पित्याच्या राजधानीतील अनुपस्थितीमुळे त्याच्यावर राज्यकारभाराची जबाबदारी युवराजावस्थेतच येऊन पडली. त्यामुळे राज्यारोहणापूर्वीच त्याला प्रशासकीय क्षेत्रातील अनुभव प्राप्त होता. त्याचप्रमाणे बऱ्याचवेळा पित्याबरोबर मोहिमांवर राहिल्यामुळे युद्धक्षेत्रातील बारकाव्यांचाही अनुभव त्याच्या गाठीशी होता.

चालुक्यांच्या ताम्रशासनातील विनयादित्याच्या प्रशस्तीच्या संदर्भात कित्येक राज्यांवर व राजावर विजय प्राप्त केल्याचे श्रेय त्याला देण्यात आले आहे. यात पल्लव, पाण्ड्य, चोल, केरळ, कलभ्र, हैहेय, विल, मालव, अलूप व गंग यांचा समावेश आहे. त्याशिवाय खमेर, पारसिक आणि सिंहल या सागरपार द्वीपातील शासकाकडून विनयादित्याने खंडणी वसूल केल्याचे वर्णनही त्यात आहे. काही इतिहासकारांच्या मते हे वर्णन अतिशयोक्त आहे. परंतु अलीकडील संशोधनावरून त्यातील काही विजयांची सत्यता पटते हे पुढील नोंदीवरून स्पष्ट होईल.

बहुतेक दक्षिणेतील विजय हे विक्रमादित्याच्या अमदनीतील असून विनयादित्याचा त्यात प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष सहभाग असल्यामुळे त्यांचे अंशतः श्रेय विनयादित्यास मिळाले. पर्शिया, श्रीलंका आणि आग्नेय आशियातील खमेर येथील समकालीन राजकीय अस्थिरता लक्षात घेतल्यास त्या देशाकडून खंडणी वसूल केल्याची माहिती देखील अनाठायी म्हणता येणार नाही.[४१] यातील खमेरचा उल्लेख विशेष महत्त्वाचा मानावा लागेल. या काळात भारताचा आग्नेय आशियातील देशाशी व्यापाराच्या क्षेत्रातील तसेच सांस्कृतिक क्षेत्रातील संबंध खूपच वाढला होता. याचा परिणाम असा झाला की हे देश पूर्णपणे भारतीय संस्कृतीच्या प्रभावाखाली आले. यालाच इतिहासकारांनी बृहत्तर भारत असे नाव दिले आहे. दुर्दैवाने भारतीय संस्कृतीच्या या भारताबाहेरील प्रसाराची माहिती जास्त करून विदेशी साधनातूनच मिळते. वरील खमेर किंवा कंबोडियाचा उल्लेख विनयादित्याच्या कोरीव लेखातील त्या दृष्टीने त्रोटक का असेना, परंतु अतिशय महत्त्वाचा आहे.

विनयादित्याने पराभूत केलेल्या उत्तर भारतातील शत्रूंमध्ये दोघांचा उल्लेख बहुतेक कोरीव लेखात आढळतो. त्यातील पहिला शत्रू वज्रट किंवा वज्जड आणि दुसरा ज्याचे वर्णन "सकलोत्तरपथनाथ" म्हणून करण्यात आले आहे. अद्यापपर्यंत या दोहोंचीही ऐतिहासिकता स्पष्ट झाली नव्हती. परंतु अलीकडील संशोधनाने त्यावरही प्रकाश

पडला आहे. काही संशोधकांनी वज्रट किंवा वज्जड म्हणजे कनोजचा हर्षोत्तरकालीन राजा वज्रायुध असून त्याकाळी कनोजही उत्तर भारताची राजधानी असल्यामुळे तोच "सकलोत्तरपथनाथ" होय असा तर्क केला होता, परंतु हा तर्क निराधार आहे. कारण वज्रायुध हा विनयादित्याचा समकालीन नसून नंतरच्या काळातील होता. तसेच त्याच्या काळात कनोजचे वैभव त्या शहरापुरतेच सीमित राहिले होते. त्यामुळे अशा राज्याचा शासक "सकलोत्तरपथनाथ" म्हणून वर्णिला जाऊ शकत नाही.

वा. वि. मिराशी यांनी वज्रट हे सौराष्ट्रातील मैत्रक राजवंशातील शिलादित्य राजाचे उपनाव असावे असा अंदाज वर्तविला आहे. परंतु यास सबळ पुराव्याचा आधार नाही. के. व्ही. रमेश यांनी असे मत व्यक्त केले आहे की वज्रट हा माळव्याचा राजा असून त्याने गुजरातवर आक्रमण करून त्याचा काही भाग जिंकला होता. विनयादित्याचा काका धराश्रय जयसिंह हा गुजरातचा शासक होता. त्याने वज्रटाचा पराभव करून गुजरात परत मिळविला. त्यामुळे विनयादित्याने परास्त केलेल्या शत्रूंच्या यादीत वज्रटाचे नाव आले. रमेशनी पुढे असेही म्हटले आहे की, या वज्रटाचेच वर्णन "सकलोत्तरपथनाथ" म्हणून करण्यात आले असावे. हा तर्क ऐतिहासिकतेच्या बराच जवळचा असल्यामुळे त्याच्यावर विचार करणे आवश्यक आहे.

विनयादित्याच्या काळातील अजिंठा लेण्यातील एका शिलालेखात वज्रट नावाच्या महापराक्रमी योद्ध्याचे वर्णन आले असून तो राष्ट्रकूट वंशीय होता असा त्यात उल्लेख आला आहे. छाब्रा आणि चक्रवर्ती यांनी आपल्या संशोधनातून हा राष्ट्रकूट वज्रट म्हणजेच विनयादित्याने परास्त केलेला शत्रू वज्रट होय असे दाखवून दिले आहे. परंतु तो कोणत्या प्रदेशात होता हे त्यांनी स्पष्ट केलेले नाही.

अजिंठा शिलालेखात वज्रटास राष्ट्रकूट म्हटले असल्यामुळे त्याच्या वंशाविषयी संशयच नाही. के. व्ही. रमेश यांच्या मताप्रमाणे वज्रट हा माळव्यातील असण्याची शक्यताही नाकारता येत नाही. कारण मध्यप्रदेशात भोपाळ जवळील पाथरी येथील राष्ट्रकूट परबल याच्या किंवा मंदसौर जवळील इंदरगढ येथील राष्ट्रकूट नन्नराजाच्या शिलालेखावरून माळव्यात दक्षिणेतील राष्ट्रकूट वंशाच्या व्यक्तींनी राज्ये स्थापन केली होती हे सिद्ध झाले आहे. पाथरीचा परबल राष्ट्रकूट हा दक्षिणेतील मानपूरच्या राष्ट्रकूटांचा वंशज होता हेही प्रकाशात आले आहे. वातापीच्या चालुक्यांनी मानपूरचे राज्य नष्ट केल्यामुळे मानपूरच्या राष्ट्रकूटांच्या वंशजांच्या दृष्टीने चालुक्य हे पिढीजात शत्रू होते आणि राष्ट्रकूट वज्रट हा माळव्यातील राष्ट्रकूटांपैकी असल्यामुळे त्याने गुजरातवर स्वारी करून चालुक्यांकडून तो प्रदेश जिंकला व नंतर धराश्रय जयसिंहाने वज्रटास परास्त करून तो प्रदेश परत मिळविला असण्याची जास्तीत जास्त शक्यता आहे. यावरून हे स्पष्ट होते की वज्रट हा माळव्यातील राष्ट्रकूटांपैकी होता.

वज्रट म्हणजे "सकलोत्तरनाथ" होय हे डॉ. रमेश यांचे मत मात्र पटण्यासारखे नाही. कारण सातव्या शतकाच्या अखेरीस ही उपाधी केवळ कनोजचा सम्राट धारण करू शकत होता. वज्रट हा कनोजचा शासक होता. मात्र हर्षवर्धनानंतर कनोजच्या सिंहासनावर बसलेला सर्वात पराक्रमी राजा यशोवर्मन हा "सकलोत्तरपथनाथ" हे बिरुद धारण करणे शक्य होते. त्याच्या निश्चित काळाविषयी मतभेद आहेत. आठव्या शतकाच्या सुरुवातीस तो कनोजचा राजा होता हे निश्चित. त्यामुळे सातव्या शतकाच्या अखेरीपर्यंत त्याचा काळ मागे जाऊ शकतो. यावरून असे अनुमान केले जाऊ शकते की, माळव्यातील राष्ट्रकूट हे कनोजच्या यशोवर्मनचे मांडलिक असून वज्रटाचा समर्थक म्हणून यशोवर्मनचा वातापीच्या चालुक्यांशी संघर्ष झाला असावा.[६२] विनयादित्याची कारकीर्द इ. स. ६९५ मध्ये समाप्त झाली.

विनयादित्यानंतर त्याचा पुत्र युवराज विजयादित्य हा इ. स. ६९६ मध्ये राज्यावर आला. त्याची कारकीर्द तुलनात्मक दृष्ट्या शांततापूर्ण टरली. विनयादित्याच्या कारकिर्दीच्या अखेरीस विनयादित्याने काही मोहिमात भाग घेतला होता. त्यापैकी उत्तरेतील एका राजाविरुद्धच्या मोहिमेवर विनयादित्याने त्याला पाठविले असता त्याने शत्रूचा पराभव केला, परंतु पलायन करीत असलेल्या शत्रूने विजयादित्यास बंदी केले अशी माहिती चालुक्यांच्या कोरीव लेखात आलेली आहे. विजयादित्याने अद्‌भूत मार्गाने आपली सुटका करून घेतली व तो वातापीस सुखरुप परत आला. परंतु त्याच्या अटकेचा धक्का न सहन होऊन विनयादित्याने त्यापूर्वीच प्राण सोडला होता.[६३]

वातापीचे चालुक्य आणि पल्लव यांच्यातील पिढीजात वैर विनयादित्य आणि विजयादित्य यांच्या काळातही चालूच होते. विनयादित्याने युवराज विजयादित्य यास कांचीच्या स्वारीवर पाठविले. विजयादित्याने पल्लव नरेश दुसरा परमेश्वरवर्मन याचा पराभव करून त्याच्याकडून खंडणी वसूल केली. अशाप्रकारे विजयादित्याने केलेल्या बहुतेक स्वाऱ्या विनयादित्याच्या कारकिर्दीतील होत्या. त्या वगळल्यास इ. स. ७३३ पर्यंतची विजयादित्याची ३८ वर्षांची कारकीर्द शांततामय होती असेच म्हणावे लागेल.

**दुसरा विक्रमादित्य आणि दुसरा कीर्तिवर्मन :** दुसरा विक्रमादित्य हा इ. स. ७३३–३४ मध्ये राज्यावर आला. त्याच्या काळात चालुक्य–पल्लव संघर्षास पुन्हा तोंड फुटले. त्याने पल्लवांचा मुलुख पादाक्रान्त करून त्यांचे मांडलिक असलेल्या पाण्ड्य, चोल आणि केरळ तसेच कलभ्रांचा पाडाव केला आणि हिंदी महासागराच्या तीरावर विजयस्तंभ उभारला. दुसऱ्या विक्रमादित्याच्या काळात सिंध प्रांतातील अरबांनी उत्तर गुजरातवर स्वारी केली परंतु तेथील चालुक्य शासक अवनिजनाश्रय पुलकेशी याने अरबांचे आक्रमण परतवून लावले. त्यावर संतुष्ट होऊन विक्रमादित्याने अवनिजनाश्रयाचा विशेष पदवी देऊन गौरव केला.

विक्रमादित्याची छोटीशी परंतु अनेक घटनांनी युक्त अशी कारकीर्द इ. स. ७४४–४५ मध्ये संपली. इ. स. ७४५ मध्ये त्याचा पुत्र युवराज दुसरा कीर्तिवर्मन राज्यावर आला. त्याने इ. स. ७५० पर्यंत कसेबसे राज्य केले. राजशासनातील वंशावळीत दुसऱ्या कीर्तिवर्मनचे वर्णन त्याच्या पूर्वजांनी धारण केलेल्या गौरवपूर्ण उपाधींसहित करण्यात आले आहे. परंतु प्रत्यक्ष परिस्थिती मात्र वेगळी होती. त्याच्या काळात चालुक्यसत्तेला बाह्य शत्रूपासून धोका नव्हता, परंतु काही मांडलिकांनी बंडखोरीस सुरुवात केली होती. दख्खनच्या उत्तर भागात वेरूळ–औरंगाबाद परिसरात राज्य करणाऱ्या राष्ट्रकुटांनी उघडपणे चालुक्य सत्तेस आव्हान देण्यास सुरुवात केली होती. या वंशातील कर्क प्रतापशील याने यापूर्वीचे चालुक्य अधिराजाच्या उल्लेखाशिवाय राजशासने जारी केली होती. एवढेच नव्हे तर आपल्या राज्यात मांडलिकांची नेमणूकही केली होती.[४४] त्याचा पुत्र इंद्र याने तर दक्षिण गुजरातमधील खेडा येथील स्वयंवर मंडपातून तेथील चालुक्य शासकाची राजकन्या भवनागा हिचे हरण करून तिच्याशी राक्षस विवाह केला. या घटना कीर्तिवर्मनच्या शक्तिशाली पूर्वाधिकाऱ्यांच्या काळात घडल्या होत्या. कीर्तिवर्मनच्या दुर्बलपणामुळे राष्ट्रकुटांच्या स्वैरतेस आणखी गती आली. परंतु कीर्तिवर्मन या घटनाकडे असहायपणे बघण्याशिवाय काही करू शकला नाही. त्यामुळे तर राष्ट्रकुटांचे आणखी फावले. राष्ट्रकूट इंद्राचा पुत्र दन्तिदुर्ग याने कीर्तिवर्मनच्या असहाय्यतेचा जास्तीत जास्त उपयोग करून घेतला. त्याने गुजरात आणि माळव्यावर स्वारी करून ते प्रदेश जिंकले. हे दिग्विजय प्राप्त केल्यानंतर त्याच्या आनंदाप्रीत्यर्थ त्याने उज्जयिनी येथे आपली सुवर्णतुला करविली आणि त्या प्रसंगी गुर्जर राजास आपला द्वारपाल बनविले. या सर्व घटनांना आवर न घालता आल्यामुळे दुसऱ्या कीर्तिवर्मनला नैराश्याने एवढे ग्रासले की त्यात त्याचे मानसिक संतुलन ढळले होते.[४५] त्यामुळे दन्तिदुर्गाचे कार्य अधिक सोपे झाले. त्याने कीर्तिवर्मनच्या ताब्यातील कोकण व दक्षिण महाराष्ट्र हे प्रदेश जिंकून घेतले व चालुक्यांचे अधिपत्य झुगारून राष्ट्रकुटांच्या सार्वभौमत्वाची रीतसर घोषणा केली.

———

## तळटिपा

१ रमेश, के. व्ही., **चालुक्य ऑफ वातापी,** आगमकला प्रकाशन, दिल्ली, १९८४, पृ. १२.

२ कित्ता, पृ. १६-२०.

३ गोपाल, बी. आर., **दि चालुक्याज ऑफ कल्याणी अँड दि कलचुरीज,** कर्नाटक युनिव्हर्सिटी, धारवाड, १९८१, पृ. १८-४८.

४ टोसर, एच. एस., **स्टडिज इन दि हिस्टॉरिकल अँड कल्चरल जिऑग्राफी ऑण्ड इथनोग्राफी ऑफ मराठवाडा** (अनपब्लीश्ड थिसीस), मराठवाडा युनिव्हर्सिटी, औरंगाबाद, १९७७, पृ. ६५.

५ रमेश, के. व्ही., पूर्वोक्त, पृ. १४.

६ मजुमदार, आर. सी., (संपा.), **दि क्लासिकल एज,** भारतीय विद्या भवन, बॉम्बे, १९७०, पृ. २००-०१.

७ मिराशी, व्ही. व्ही., **"राष्ट्रकूटाज ऑफ मानपुरा",** अबोरी, खंड २५, पृ. ३६-५०.

८ टोसर, हरिहर, "भारतीय इतिहास आणि संस्कृती", त्रैमासिक, जुलै-सप्टेंबर, १९९०, पृ. ३-१२.

९ नागराजराव, एम. एस., (संपा.), **दि चालुक्याज ऑफ बदामी,** बंगलोर, १९७८, पृ. ४४.

१० टोसर, हरिहर, "संशोधक", जून-जुलै, १९९०, पृ. ५-२२.

११ मजुमदार, आर. सी., पूर्वोक्त, पृ. १९०.

१२ मिराशी, व्ही. व्ही., **सी. आय. आय.,** खंड ५, इन्ट्रोडक्शन, पृ. २७.

१३ रमेश, के. व्ही., पूर्वोक्त, पृ. ५१.

१४ मिराशी, व्ही. व्ही., **सी. आय. आय.,** खंड ४, भाग-१, इन्स्क्रिप्शनस् ऑफ दि चेदी-कलचुरी इरा, पृ. ४७-५१.

१५ मजुमदार, आर. सी., पूर्वोक्त, पृ. १३३-२३४.

१६ टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** खंड २०, १९९४, पृ. १९-२५.

१७ टोसर, एच. एस., "कोकण, सप्तकोकण अँड अपरान्त", अ पेपर प्रेझेन्टेड पणजी सेशन ऑफ दि प्लेस नेम्स सोसायटी ऑफ इंडिया इन मार्च १९९०, **स्टडिज इन इंडियन प्लेस नेम्स,** खंड १२, पृ. २२-३०.

१८ टोसर, हरिहर, **संशोधक,** डिसेंबर १९९०.

१९ तेलंग, के. टी., **जे. बी. बी. आर. ए. एस.,** १८७१-७४, खंड १०, पृ. ३४८-६७.

२० **इ. आय.,** खंड ६, पृ. १-१२.

२१ भांडारकर, आर. जी., **इ. एच. डी.,** पृ. १९४.

२२ टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** १९८९, खंड १६, पृ. १४-२१.

२३ रमेश, के. व्ही., पूर्वोक्त, पृ. ७८.

२४ टोसर, हरिहर, **संशोधक,** पूर्वोक्त.

२५ टोसर, एच. एस., **जर्नल ऑफ दि एलफिन्स्टन कॉलेज स्टाफ ॲकेडमी,** १९८९, पृ. ४९-५४.

२६ टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** १९८८, खंड १५, पृ. ९७-१०७.

२७ **इ. आय.,** खंड ६, पूर्वोक्त.

२८ स्टेन कोनोव, **इ. आय.,** खंड १४, पृ. १४४-४८.

२९ नरसिंहमूर्ती, ए. व्ही. (संपा.), **एस. एस. आय. सी.,** खंड ३, पृ. ८९-९६.

३० टोसर, एच. एस., **अनुसंधान पत्रिका,** जुलै १९८९, पृ. १-१३.

३१ रमेश, के. व्ही., पूर्वोक्त, पृ. १००.

३२ रमेश, के. व्ही., **इ. आय.,** व्हॉ. ६२, पृ. १-५.

३३ रमेश, के. व्ही., पूर्वोक्त, पृ. १०४.

३४ कित्ता. पृ. १०३-०४.

३५ देव, शां. भा., **महाराष्ट्र व गोवे : शिलालेख-ताम्रपटांची वर्णनात्मक सूची,** इन्स्क्रिप्शन महाराष्ट्र स्टेट बोर्ड ऑफ लिटरेचर अँड कल्चर, बॉम्बे, १९८२, क्र. ४८०-८५.

३६ कोलते, व्ही. बी., **विदर्भ संशोधन,** वार्षिक, १९८४, पृ. ४१-८१.

३७ शास्त्री, बी. जी., **जे. बी. बी. आर. ए. एस.,** १८४४, व्हॉ. २, पृ. ४-१२.

३८ स्टेन कोनोव, **इ. आय.,** खंड १४, पूर्वोक्त.

३९ रमेश, के. व्ही., पूर्वोक्त, पृ. १०८.

४० टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** १९९१, व्हॉ. १७, पृ. २१-२८.

४१ मजुमदार, आर. सी., पूर्वोक्त, पृ. २४५.

४२ टोसर, एच. एस., **अनुसंधान पत्रिका,** जानेवारी १९९१, पृ. १-९.

४३ कित्ता.

४४ टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** व्हॉ. १९, पृ. १०३-१४.

४५ रमेश, के. व्ही., पूर्वोक्त.

---

# प्रकरण ९

# राष्ट्रकूट राजवंश *

आठव्या शतकाच्या मध्यास दक्षिणेची सार्वभौम सत्ता वातापीच्या चालुक्यांकडून राष्ट्रकूट राजवंशाकडे आली. "मानपूरचे राष्ट्रकूट" म्हणून ओळखली जाणारी राष्ट्रकूटांची एक शाखा चालुक्यांच्या उदयांपूर्वी दक्षिण महाराष्ट्रात सत्तेवर होती.[१] अनेक राष्ट्रकूट वंशीय शासकांनी मध्यप्रदेश,[२] गुजरात[३] आणि विदर्भात[४] इ. स. च्या सातव्या-आठव्या शतकात आपापली राज्ये स्थापन केली होती. राष्ट्रकूटांच्या या सर्व शाखात "सम्राट राष्ट्रकूट" किंवा "मालखेडचे राष्ट्रकूट" म्हणून ओळखली जाणारी मुख्य शाखा अतिशय बलाढ्य होती. या शाखेने पूर्व-मध्ययुगीन इतिहासात महत्त्वाची कामगिरी केली. सामान्यतः दख्खनच्या आणि विशेषतः महाराष्ट्राच्या इतिहासात त्यांचे मोलाचे योगदान आहे.

**राष्ट्रकूटांचे मूलस्थान :** राष्ट्रकूट हे मूळ "लत्तनूर" (मराठवाड्यातील लातूर) चे रहिवाशी असून हा मूळ कन्नड वंश असल्याचे मत डॉ. अ. रा. आळतेकर यांनी आपल्या "राष्ट्रकूट ॲण्ड देअर टाईम्स" या ग्रंथात नोंदविले आहे.[५] परंतु अलीकडील संशोधनावरून हे स्पष्ट झाले आहे की, इ. स. च्या नवव्या शतकाच्या मध्यास पहिल्या अमोघवर्षाच्या काळात राष्ट्रकूटांचा लातूरशी पहिल्यांदा संबंध आला. या साम्राज्याचा संस्थापक दंतिदुर्ग याचे पूर्वज इ. स. च्या सहाव्या शतकापासून औरंगाबाद जिल्ह्यातील वेरूळ येथे रहात होते. इ. स. ८०० पर्यंत वेरूळ हीच राष्ट्रकूट राज्याची राजधानी होती.[६] "यावरून हे स्पष्टपणे प्रतिपादन करता येते की, महाराष्ट्राच्या हृदयस्थानी असलेले वेरूळ हेच राष्ट्रकुटांचे मूळ स्थान होते."

**"राष्ट्रकूट" वंशनामाची व्युत्पत्ती :** आळतेकरांच्या मते अशोकाच्या शिलालेखातील "रटिक" आणि सातवाहनकालीन शिलालेखातील "महारटी" या नावातून राष्ट्रकूट या वंशनामाची व्युत्पत्ती झाली आहे. तथापि हे मत स्वीकारार्ह वाटत नाही, कारण "महारटी" हे एक पद असून विविध वंशातील व्यक्तींनी ते भूषविले होते. उदा. "कुर महारटी", "चुटुकुल महारटी", "कळलाय महारटी" इत्यादींपैकी कोणते महारटी राष्ट्रकूटांचे पूर्वज होते हे स्पष्ट होत नाही. शिवाय महारटी हे पदनाम राष्ट्रकूट नावापेक्षा "महारथी" या पदनामाशी अधिक जवळचे आहे.

काही विद्वानांच्या मते "राष्ट्रकूट" म्हणजे राष्ट्रविभागाचा प्रशासक. त्यामुळे राष्ट्रकूट वंशाचा मूळ पुरुष त्या पदावर असावा व त्याच्या वंशजांनी त्याचे हे पदनाम वंशनाम म्हणून रूढ केले असावे. पण हा तर्क देखील पटण्यासारखा नाही, कारण राष्ट्रकूट हे पदनाम इ. स. च्या सातव्या-आठव्या शतकानंतरच्या कोरीव लेखात आढळते. उलट राष्ट्रकूट हे वंशनाम चौथ्या शतकातील होय.

---

* या प्रकरणाचे लेखन डॉ. हरिहर ठोसर (निवृत्त प्रपाठक, इतिहास विभाग प्रमुख, एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई) यांनी केलेले आहे.

रा. गो. भांडारकरांच्या मते "राष्ट्रकूट" वंशाच्या मूळ पुरुषाचे नाव तुंग असे होते. रट्ट नामक त्याच्या वंशजाने या वंशास राजसत्ता प्राप्त करून दिली व त्याचा लौकिक वाढविला. पुढे त्याच्या वंशजांनी जेव्हा राज्यविस्तार केला तेव्हा त्यांनी साहजिकच आपल्या राज्याचा खरा संस्थापक असलेल्या रट्टाचे नावच आपले वंशनाम म्हणून धारण केले. राष्ट्रकूट हे रट्ट या नामाचे संस्कृत रूप होय. खालील मुद्यांच्या आधारे भांडारकरांचे मत इतर मतांच्या तुलनेत ऐतिहासिक सत्याच्या अधिक जवळचे वाटते.

१. राष्ट्रकुटांच्या अनेक कोरीव लेखांत त्यांच्या मूळ पुरुषाचे तुंग असे नाव नमूद करण्यात आले आहे.

२. या वंशातील अनेक राजांनी "जगतुंग", "शुभ-तुंग", "नृपतुंग" अशी तुंगपदांत बिरुदे धारण केली होती. उत्तरेतील एका राष्ट्रकूट राजाचे मुख्य नावच तुंग होते. प्राचीन काळी वंशजांना पूर्वजांची नावे देण्याची जी प्रथा होती त्या प्रथेनुसारही तुंग नावाची पुनरावृत्ती झालेली दिसते.

३. मानपूरच्या राष्ट्रकुटांचा उल्लेख देखील कदंबांच्या कोरीव लेखात "तुंग" असा करण्यात आला आहे.

४. काही शिलालेखात रट्ट हे वंशनाम म्हणून, तर काहीमध्ये संस्थापकाचे नाव म्हणून आले आहे.

५. "राष्ट्र" हा मुख्य घटक ज्या नावात आहे अशा नावाच्या अनेक व्यक्ती प्राचीन इतिहासात नमूद आहेत. उदा. राष्ट्रपाल, राष्ट्रमहाराज इत्यादी. अशाप्रकारे "राष्ट्रकूट" या वंशनामाच्या व्युत्पत्तीच्या संदर्भात इतर मतापेक्षा भांडारकरांचे मत साधार आणि तर्काधिष्ठित वाटते.[७]

**प्रारंभीचे राष्ट्रकूट राजे :** दुसऱ्या कीर्तिवर्मनला पदभ्रष्ट करून चालुक्य वंशाची सार्वभौम सत्ता नष्ट करण्याचे श्रेय दंतिदुर्गाकडे जात असल्यामुळे तो राष्ट्रकूट साम्राज्याचा संस्थापक मानला जातो. वेरूळ येथील दशावतार लेण्यातील शिलालेखात दंतिदुर्गाने आपल्या घराण्याची पूर्ण वंशावळ पुढीलप्रमाणे नमूद केली आहे.

दंतिवर्मन
|
इंद्र (प्रच्छकराज)
|
गोविंदराज
|
कर्क (प्रतापशील)
|
इंद्र
|
दंतिदुर्ग

या वंशावळीवरून स्पष्ट होते की, राष्ट्रकूटांच्या सार्वभौम राज्याचा संस्थापक दंतिदुर्ग असला तरी त्याच्यापूर्वी एक शतकापेक्षा अधिक काळ दंतिदुर्गाच्या पूर्वजांनी राज्य केले. कर्क प्रतापशील याच्या अलीकडील काळात उपलब्ध झालेल्या भिंधोन (जिल्हा औरंगाबाद) ताम्रपटावरून महाराष्ट्राच्या मराठवाडा विभागातील औरंगाबाद, जालना आणि परभणी जिल्ह्यांचा समावेश त्याच्या राज्यात होता हे उघडकीस आले.[८] याच राजाच्या खामखेड (जिल्हा बुलढाणा) ताम्रपटातील ग्रामनामांच्या उल्लेखावरून कर्काचे राज्य विदर्भाच्या पश्चिम भागापर्यंत पसरले होते अशी माहिती मिळते.[९] काही वर्षापूर्वी दुर्गराज नामक राष्ट्रकुटाचे दोन ताम्रपट उपलब्ध झाले आहेत. त्यांचा काळ इ. स. ६७५ असा आहे. या ताम्रपटातील ग्रामनामावरून या दुर्गराजाच्या अधिपत्याखाली जळगाव जिल्ह्यातील चाळीसगाव परिसरातील प्रदेश असल्याची व तो कर्कराजाचा मांडलिक असल्याची माहिती मिळते.[१०] यावरून स्पष्ट होते की, दंतिदुर्गाच्या पूर्वजांच्या राज्यात उत्तरेस तापी नदीपासून दक्षिणेस गोदावरी पर्यंतचा उत्तर महाराष्ट्रातील विस्तृत प्रदेश होता. कर्काने आपल्या ताम्रपटात चालुक्य अधिराजाचा उल्लेख केलेला नाही. आणखी एक उल्लेखनीय बाब म्हणजे संपूर्ण विदर्भ आणि त्याला लागून असलेल्या मराठवाड्याच्या गोदावरीच्या उत्तर भागातील प्रदेशात वातापीच्या चालुक्यांचा एकही कोरीव लेख उपलब्ध झालेला नाही. यावरून हे स्पष्ट होते की, दंतिदुर्गाचे पूर्वज देखील स्वतंत्र राजे होते.

वेरूळ येथील राष्ट्रकुटांचे राज्य नक्की केव्हा स्थापन झाले याविषयीचा पुरावा उपलब्ध नाही. परंतु चालुक्यांच्या कोरीव लेखात वर्णिलेल्या चालुक्य जयसिंह आणि राष्ट्रकूट कृष्णाचा पुत्र इंद्र यांच्यातील संघर्षावरून प्रारंभीचे राष्ट्रकूट औरंगाबाद-वेरूळ परिसरातील चालुक्य सत्तेच्या उदयापूर्वीपासून राज्य करीत होते हे स्पष्ट होते.[११]

चालुक्य जयसिंह सहाव्या शतकाच्या सुरुवातीस होऊन गेला. राष्ट्रकूट इंद्र हा जयसिंहाचा समकालीन होता. त्यावरून इंद्राचा पिता असलेल्या राष्ट्रकूट कृष्णाचा काळ पाचव्या शतकाच्या उत्तरार्धातील होता असे मानावे लागेल. दंतिदुर्गाचे पूर्वज ज्या प्रदेशात राज्य करीत होते त्याच परिसरात राष्ट्रकूट कृष्ण आणि इंद्राचे राज्य असण्याची शक्यता असल्यामुळे ते राष्ट्रकूट राजवंशाचा पहिला पुरुष दंतिवर्मन याचे पूर्वज असले पाहिजेत. कृष्ण आणि इंद्र या नावाची राष्ट्रकूट वंशावळीतील पुनरावृत्ती या संभाव्यतेस पुष्टी देते. आळतेकरांनी विदर्भातील राष्ट्रकूट हे सम्राट राष्ट्रकूटांचे पूर्वज असल्याचे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु मिराशींनी तशी शक्यता फेटाळून लावली आहे. उलट दंतिदुर्गाच्या पूर्वजांचे वास्तव्य वेरूळ-औरंगाबाद भागात होते हे त्यांनी दाखवून दिले आहे. त्यावरून त्यांनी या शाखेचे "राष्ट्रकूटांची मूलक शाखा" असे नामकरण केले आहे.[१२] आळतेकरांनी दंतिदुर्गाच्या पूर्वजांची जी कालगणना गृहित धरली होती ती अलीकडील संशोधनावरून निराधार असल्याचे पुढील घटनाक्रमांच्या वर्णनावरून स्पष्ट होते.

**दंतिवर्मन :** दंतिवर्मनचे नाव फक्त दंतिदुर्गाच्या दशावतार लेण्यातील शिलालेखातच आलेले आहे. पण त्याच्या राजकीय कर्तृत्वाविषयीचा त्यात कोणताही उल्लेख नाही.[१३]

शक्यता अशी दिसते की, वर वर्णन केलेल्या चालुक्य जयसिंहाद्वारे झालेल्या राष्ट्रकूट इंद्राच्या पराभवानंतर राष्ट्रकूट घराण्याला दंतिवर्मनने सावरले व त्याला परत राजकीय प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. पहिल्या पुलकेशीने अश्वमेध यज्ञ करून चालुक्य राजवंशाच्या सार्वभौम राज्याची स्थापना केली होती. दंतिवर्मनने बहुधा पुलकेशीचे स्वामित्व स्वीकारून आपले राज्य वाचविले. त्याच्या या कामगिरीमुळे त्याचे नाव त्याच्या पुढील पिढ्यातील अनेक राजपुत्रांना देण्यात आले असावे.

**इंद्र प्रच्छकराज :** इंद्राचे नाव राष्ट्रकूट राजवंशावळीमध्ये नमूद करणारा सर्वात प्राचीन कोरीव लेख म्हणजे दंतिदुर्गाचा दशावतार शिलालेख हाच होय. पहिल्या अमोघवर्षाच्या संजान ताम्रपटात त्याची नोंद "प्रच्छकराज" या बिरुदाद्वारे करण्यात आली आहे.[१४] विशेष म्हणजे या ताम्रपटातील वंशावळीत प्रच्छकराजाचे नाव सर्वात प्रथम आले आहे. संजान ताम्रपट हा राष्ट्रकूट घराण्याच्या कोरीव लेखापैकी महत्त्वाचा लेख आहे. त्यात या वंशाचा मूळ पुरुष म्हणून इंद्र प्रच्छकराजाचे नाव ज्याअर्थी आले आहे त्याअर्थी या वंशातील प्रारंभीच्या राजांपैकी तोही एक महत्त्वाचा राजा असला पाहिजे. दशावतार शिलालेखात त्याचे "विषम महीपती" या विशेषणाने वर्णन करण्यात आले आहे.[१५] दुसऱ्या पुलकेशीने आपला भाऊ विष्णुवर्धन याला बहाल केलेल्या "विषमसिद्धी" या पदवीची या विशेषणावरून आठवण होते. के. व्ही. रमेश यांच्या मते "विषमसिद्धी" ही पदवी जमीन आणि समुद्र अशा दोन्ही ठिकाणच्या युद्धात विजय संपादन केलेल्या योद्ध्यास दिली जाते.[१६] विष्णुवर्धन याला पुलकेशीनेही पदवी बहाल करण्यामागे त्याची या दोन्ही प्रकारच्या युद्धातील कामगिरी होती.

वातापीचे चालुक्य आणि कोकणचे मौर्य यांच्यातील संघर्ष पहिला कीर्तिवर्मन, मंगलेश आणि दुसरा पुलकेशी यांच्या काळात चालू होता.[१७] दंतिवर्मन हा पहिल्या पुलकेशीचा समकालीन होता. त्या आधारे इंद्र प्रच्छकराज हा कीर्तिवर्मन आणि मंगलेश यांचा समकालीन ठरतो. या दोन्ही चालुक्य राजांच्या काळात कोकणच्या मौर्यांविरुद्ध आरमारी मोहिमा हाती घेण्यात आल्या होत्या.[१८] इंद्र प्रच्छकराज याने चालुक्यांचा मांडलिक म्हणून त्यांच्या बाजूने या मोहिमांत भाग घेतला असावा आणि त्या कामगिरीवरून त्याने "विषम महीपती" ही पदवी प्राप्त केली असावी असे वाटते. हे मान्य केले तर इंद्राच्या राजकीय इतिहासाविषयीचा हा ताजा पुरावा ठरेल. दशावतार लेण्यातील शिलालेखात इंद्राला "महाविक्रम" आणि "देवराज" या उपाधींनी गौरविण्यात आले असून कित्येक यज्ञयाग केल्याचे श्रेयही त्याला देण्यात आले आहे.

**पहिला गोविंदराज :** इंद्र प्रच्छकराजाचा पुत्र आणि उत्तराधिकारी पहिला गोविंदराज हा दंतिदुर्गाच्या पूर्वजांपैकी पहिला बलाढ्य राजा होता. राष्ट्रकूट राज्याचा संस्थापक म्हणून त्याचे नाव केवळ सम्राट राष्ट्रकुटांच्याच नव्हे, तर या वंशाच्या गुजरात सारख्या इतर शाखांच्या तसेच शिलाहारासारख्या मांडलिकांच्या राजशासनातून देखील आले

आहे. सम्राट राष्ट्रकुटांच्या बहुतेक राजशासनात गोविंदाचे नाव राष्ट्रकुटांच्या वंशावळीच्या अग्रभागी आले आहे.

आपला पिता इंद्र प्रच्छकराज याच्या प्रमाणेच गोविंदानेही वातापी चालुक्यांना मोलाचे साह्य केले. त्याचे पारितोषिक म्हणून गोविंदास पंचमहाशब्दांचे अधिकार प्राप्त झाले. या अधिकारांचा उपभोग घेणारा गोविंद हा पहिला राष्ट्रकूट राजा होता.

गोविंद हा मंगलेश आणि दुसरा पुलकेशी या दोन चालुक्य राजांचा समकालीन आणि मांडलिक होता असे दिसते. मंगलेशाने महिष्मतीचे कलचुरी आणि मध्य भारतातील नलांच्या प्रदेशावर आक्रमण केले होते.[१९] गोविंदाचे राज्य या दोन्ही राज्यांच्या दक्षिणेस होते. मंगलेशाला त्याच्या या मोहिमांच्या वेळी गोविंदाचे साह्य मोलाचे ठरले असावे.

मंगलेश आणि दुसरा पुलकेशी यांच्यातील यादवीच्या वेळी गोविंदाने मंगलेशाचा पक्ष घेणे स्वाभाविक होते. कारण तो गोविंदाचा अधिराज होता. मंगलेशाच्या वधानंतर त्याचा पुत्र अप्पाइक याने गोविंदाच्या राज्यात आश्रय घेतला. वातापीवर स्वामित्व प्रस्थापित करण्याच्या हेतूने गोविंद आणि अप्पाइक यांनी भीमेच्या पलीकडून पुलकेशीच्या राज्यावर स्वारी केली, परंतु याच्या ऐहोळे शिलालेखातील वर्णनानुसार ती निष्फळ ठरली. या स्वारीत अप्पाइक ठार झाला. परंतु गोविंदाचे मात्र फारसे नुकसान झाले नाही. चालुक्य राज्याची पूर्वी केलेली सेवा लक्षात घेऊन पुलकेशीने गोविंदाशी समेट केला.

दुसऱ्या पुलकेशीने आपले आसन स्थिर केल्यानंतर गोविंदाने त्याचे स्वामित्व मान्य केले आणि वेरूळ येथील राजधानीहून खानदेश, मराठवाडा आणि विदर्भ या प्रांतांचा समावेश असलेल्या आपल्या वडिलोपार्जित राज्याचे शासन चालविले. राष्ट्रकुटांच्या कोरीव लेखात असे वर्णन आले आहे की, गोविंद हा शिवाव्यतिरिक्त कुणासमोरही नतमस्तक होत नसे.[२०] वेरूळ येथील घृष्णेश्वर शिवालय भारतातील बारा ज्योतिर्लिंग पीठापैकी एक होय. राष्ट्रकुटांच्या काळी या शिवालयाचे गुहेश्वर असे नाव होते. गोविंद आणि त्याचे वंशज गुहेश्वराचे एकनिष्ठ उपासक होते. गुहेश्वर शिव हे राष्ट्रकुटांचे कुलदैवत होते.

**कर्क प्रतापशील :** पहिल्या गोविंदराजचा पुत्र आणि उत्तराधिकारी कर्क प्रतापशील हा तर आपल्या पित्यापेक्षाही महाबलाढ्य होता. दंतिदुर्गाच्या पूर्वजांपैकी कर्क हाच एकमेव राष्ट्रकूट राजा आहे की, ज्याच्या कारकिर्दीतील राजशासने उपलब्ध झालेली आहेत आणि विशेष बाब म्हणजे त्याच्या राजशासनात चालुक्य अधिराजांच्या नावाचा उल्लेख नाही. याउलट कर्कराजाचे जे दोन ताम्रपट उपलब्ध झाले आहेत ते दोन्ही त्याच्या मांडलिकांनी जारी केले असून त्यात कर्काचा "परमस्वामी" आणि "मांडलिकांचा अधिराज" अशा उपाधीसहित उल्लेख करण्यात आला आहे. यावरून हे स्पष्ट होते की, कर्काने स्वतंत्रपणे राज्यकारभार करण्यास सुरुवात केली होती.

कर्काच्या काळातील दक्षिणेतील राजकीय स्थिती राष्ट्रकुटांना अनुकूल होती. कर्क राज्यावर आला तेव्हा पुलकेशीचे निधन झाले होते आणि पल्लवांनी चालुक्यांचा बराच मोठा प्रदेश व्यापल्यामुळे व पुलकेशीच्या कुळातील भाऊबंदकीमुळे चालुक्यांच्या सार्वभौम सत्तेला ग्रहण लागून पुलकेशीचे पुत्र वणवण भटकत होते. या संधीचा लाभ घेऊन कर्काने आपल्या राज्यात सार्वभौम सत्ताधिशाप्रमाणे शासन चालविले होते. कर्काच्या भिंधोन ताम्रपटाने स्पष्ट झाले आहे की, मराठवाड्यातील औरंगाबाद, जालना आणि परभणी जिल्ह्याचा परिसर त्याच्या राज्याचा भाग होता.[२१] खामखेड ताम्रपट आणि दुर्गराज राष्ट्रकुटाच्या नुकत्याच सापडलेल्या ताम्रपटावरून विदर्भाचा[२२] मराठवाड्यास लागून असलेला भाग आणि खानदेश[२३] त्याच्या राज्यात समाविष्ट होता. अशाप्रकारे पश्चिमेस नाशिक ते पूर्वेस वर्ध्यापर्यंत व उत्तरेस तापी नदीपासून दक्षिणेस गोदावरी नदीपर्यंतचा उत्तर महाराष्ट्राचा फार मोठा भाग कर्काच्या राज्यात समाविष्ट होता.

भिंधोन आणि खामखेड या दोन्ही ताम्रशासनात कर्काचे प्रतापशील असे दुसरे नाव नमूद करण्यात आले आहे. हे नाव बहुधा त्याने आपल्या राज्यारोहणाच्यावेळी धारण केले असावे. खामखेड ताम्रशासनानुसार उत्तरगण हा कर्क प्रतापशीलाचा ज्येष्ठ भ्राता होता आणि विदर्भातील बुलढाणा जिल्ह्यातील प्रदेशाचा शासक म्हणून कर्काच्या वतीने तो कारभार चालवीत होता. यावरून हे स्पष्ट होते की, कर्क हा गोविंदराजचा ज्येष्ठ पुत्र नसूनही गोविंदराजने उत्तराधिकारी म्हणून त्याची निवड केली. कर्काच्या योग्यतेचे हे आणखी एक द्योतक मानावे लागेल. दंतिदुर्गाच्या एलोरा ताम्रशासनातील राष्ट्रकूट राजवंशावळीत कर्क प्रतापशीलाचे नाव अग्रभागी आले आहे. त्याच्या किमान दोन वंशजांनी कर्क हे नाव धारण केले होते. यावरून हे सिद्ध होते की, दंतिदुर्गाच्या पूर्वजांपैकी कर्क प्रतापशील हा सर्वश्रेष्ठ राजा होता. सुदैवाने त्याला प्रदीर्घ कारकीर्द लाभली. सातव्या शतकाच्या संपूर्ण उत्तरार्धात तोच राष्ट्रकूट राज्याचा शासक होता. त्यामुळे त्याला विक्रमादित्य, विनयादित्य आणि विजयादित्य या तीन वातापी चालुक्य नरेशांचे समकालीनत्व लाभले.

**इंद्रराज :** कर्क प्रतापशील यांच्यानंतर त्याचा इंद्रराज हा अतिशय धाडशी पुत्र राज्यावर आला. त्याच्याविषयीची फारशी माहिती उपलब्ध नाही. चालुक्य विजयादित्याच्या मृत्यूनंतर वातापीच्या चालुक्य सत्तेला उतरती कळा लागली होती. त्यामुळे राष्ट्रकुटांनी वेरूळचे आपल्या राज्याचे शासन स्वायत्तपणे चालविले होते. चालुक्यांची असहाय्यता आणि राष्ट्रकुटांचा वरचढपणा दाखविणारी घटना या काळात घडली. गुजरातचा चालुक्य शासक मंगलरस याची राजकन्या भवगणा हिचे स्वयंवर दक्षिण गुजरातमधील खेडा येथे साजरे केले जात होते. राष्ट्रकूट इंद्रराजाने अचानक स्वयंवर मंडपावर छापा घातला आणि भवगणाचे हरण करून तिच्याशी विवाह केला.[२४] यांचा पुत्र राष्ट्रकूट साम्राज्याचा संस्थापक दंतिदुर्ग होय. राष्ट्रकुटांच्या

प्रारंभिक इतिहासातील वरील घटनाक्रमावरून हे स्पष्ट होते की, चालुक्य जयसिंहाने राष्ट्रकूट कृष्णसुत इंद्राचा पराभव केल्यानंतर राष्ट्रकूटांनी काही काळ नमते धोरण स्वीकारले. परंतु गोविंदराजाच्या काळापासून त्यांनी पुन्हा चालुक्य सत्तेच्या सार्वभौमत्वास आव्हान देण्यास सुरुवात केली आणि शेवटी दंतिदुर्गाने चालुक्यांच्या सार्वभौम सत्तेवर शेवटचा आघात केला.

## विदर्भातील राष्ट्रकूट

जेव्हा वेरूळ-औरंगाबाद परिसरात दंतिदुर्गाचे पूर्वज राज्य करीत होते तेव्हा विदर्भात याच वंशाची शाखा अधिकार पदावर होती. ही शाखा विदर्भ राष्ट्रकूट म्हणून ओळखली जाते. या शाखेतील नन्नराज युद्धासुर नामक राजाचे पुढील तीन ताम्रपट आजवर उपलब्ध झाले आहेत. इ. स. ७०९ चा मुलताई ताम्रपट,[२५] ६३१ चा तिवरखेड ताम्रपट[२६] आणि ६९३ चा सांगळूद ताम्रपट.[२७]

ज्या काळात आळतेकरांनी विदर्भ राष्ट्रकूटांच्या इतिहासाचे लेखन केले त्यावेळी सांगळूद ताम्रपट उपलब्ध झालेला नव्हता. त्यामुळे आळतेकरांनी मुलताई ताम्रपटास बनावट ठरवून तिवरखेड ताम्रपटाच्या आधारे नन्नराज युद्धासुराचा काळ ६३१ च्या आसपासचा ठरविला व त्या आधारावर या नन्नराज युद्धासुरास दंतिदुर्गाचा पूर्वज असलेल्या दंतिवर्मन याचा पूर्वज ठरविले.[२८]

सांगळूद ताम्रपट सापडल्यानंतर त्याच्यातील ६९३ ही कालगणना मुलताई ताम्रपटातील ७०९ च्या जवळची असल्याच्या आधारावर मिराशींनी आळतेकरांचे मत बरोबर नसल्याचे व्यक्त केले व तिवरखेड ताम्रपटास बनावट ठरविले. सांगळूद आणि मुलताई ताम्रपटांच्या आधारे नन्नराज युद्धासुर दंतिदुर्गाचा पिता इंद्रराज याचा समकालीन ठरतो. त्यामुळे ज्याअर्थी त्याच्या पाच पिढ्या त्यापूर्वी होऊन गेलेल्या दंतिवर्मन याचा पूर्वज नन्नराज ठरू शकत नाही[२९] त्याअर्थी तिवरखेड ताम्रपटातील काळ चुकीचा नोंदण्यात आला आहे. अशाप्रकारे प्रारंभीच्या राष्ट्रकूट राजांची कालगणना आणि त्यांचे वांशिक मूल या बाबतची आळतेकरांची मते निराधार ठरली आहेत. विदर्भ राष्ट्रकुटांच्या वरील तिन्ही ताम्रपटात या शाखेची वंशावळ पुढीलप्रमाणे नोंदण्यात आली आहे.

दुर्गराज
|
गोविंदराज
|
स्वामिकराज
|
नन्नराज युद्धासुर

या वंशावळीच्या आधारावर मिराशींनी असे प्रतिपादन केले की, नन्नराज युद्धासुराच्या पूर्वी त्याचे पूर्वज निदान शंभर वर्षे तरी अगोदर महिष्मतीचे कलचुरी आणि नंतर वातापीच्या चालुक्यांचे मांडलिक म्हणून विदर्भात राज्य करीत असावेत. वास्तविक हे विधानही बरोबर नाही, कारण पहिली गोष्ट म्हणजे वरील तिन्ही ताम्रपट नन्नराज युद्धासुराचे असून त्याच्या पूर्वजांनी राज्य केल्याची त्यात कुठेही नोंद नाही. उलट आपल्या प्रशस्तीत नन्नराजाने नमूद करून ठेवले आहे की, विदर्भाचे राज्य त्याला वारसा हक्काने मिळाले नसून त्याने ते आपल्या बाहुबलावर प्राप्त केले आहे. दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे खामखेड ताम्रपटानुसार सातव्या शतकाच्या उत्तरार्धात विदर्भाचे प्रशासन कर्क प्रतापशीलाच्या वतीने त्याचा पुतण्या व उत्तरगणाचा पुत्र राष्ट्रकूट दवण द्रुहट हा चालवीत होता.[30] दवण द्रुहट हा वेरूळच्या राष्ट्रकुटाचा मांडलिक म्हणून पर्णखेट (वानखेड, जिल्हा बुलढाणा) या राजधानीहून पश्चिम विदर्भावर राज्य करीत होता.[31] नन्नराजाची राजधानी अचलपूर (जिल्हा अमरावती) ही होती. तोही इंद्रराजाचा मांडलिक म्हणून पूर्व विदर्भाचे शासन चालवीत असला पाहिजे. वेरूळच्या राष्ट्रकुटांनी आपल्या वंशातील व्यक्तिना इतर प्रांतात प्रशासक म्हणून नेमण्याची प्रथा सुरू केली होती. दवण द्रुहटाची नेमणूक त्याच प्रथेचा एक भाग होता. नन्नराजाची नेमणूकही त्याच प्रथेनुसार झाली असावी. याला आणखी एक पुरावा म्हणजे कर्क प्रतापशीलाच्या भिंधोन आणि खामखेड ताम्रपटात त्याचे सेवक आणि अधिकारी म्हणून दुर्गराज, गोविंद आणि स्वामिकराज यांची नावे आली आहेत. सांगळूद ताम्रपटानुसार हे तिघे नन्नराज युद्धासुराचे पूर्वज होते. यावरून हे स्पष्ट होते की, सातव्या शतकाच्या अखेरीस व आठव्या शतकाच्या सुरुवातीस वेरूळच्या राष्ट्रकूट राजवंशातील दोन शाखा विदर्भावर राज्य करीत होत्या व त्या मुख्य शाखेच्या अधिपत्याखाली विदर्भाचे प्रशासन चालवीत होत्या.

दवण द्रुहट किंवा नन्नराज युद्धासुर या दोघांच्या पश्चात बहुधा दंतिदुर्ग किंवा राष्ट्रकूट कृष्णाने विदर्भ प्रदेश मुख्य राज्यात विलीन करून घेतला असावा. कारण त्यापुढील काळातील त्यांच्या वंशजाचे कोरीव लेख विदर्भात आढळत नाहीत. उलट राष्ट्रकूट कृष्णाचा एक ताम्रपट भांदक येथे सापडला.[32] त्यानंतर तिसऱ्या गोविंदाचे ताम्रपटही विदर्भात उपलब्ध झाले आहेत. विदर्भातील पर्णखेट शाखेतील राष्ट्रकुटांची वंशावळ आणि त्यांचा वेरूळच्या राष्ट्रकुटांशी असलेला संबंध पुढील वंशावळीवरून स्पष्ट होऊ शकेल.

पहिला गोविंद–(वेरूळच्या राष्ट्रकूटांची मुख्य शाखा)



## खानदेशचे राष्ट्रकूट

अगदी अलीकडे दुर्गराज राष्ट्रकुटांचे इ. स. ६७५ मधील दोन ताम्रपट प्रसिद्ध झाले आहेत.[३३] हे ताम्रपट कोठे प्राप्त झाले त्या ठिकाणांची नोंद केलेली नाही. तसेच त्यातील स्थळनामांची निश्चिती केलेली नसल्यामुळे हा दुर्गराज कोणत्या भागात राज्य करीत होता हे आजवर अज्ञात होते. परंतु प्रस्तुत लेखकांने या ताम्रपटातील बाहली विषयाची (बहाळ, तालुका चाळीसगाव, जिल्हा जळगाव) व त्याबरोबर आलेल्या सर्व ग्रामांची निश्चिती जळगाव जिल्ह्याच्या चाळीसगाव तालुक्यातील बहाळ परिसरात केली व त्यावरून राष्ट्रकूट दुर्गराज हा बहाळ–चाळीसगाव परिसरातील प्रदेशाचा प्रशासक होता हे स्पष्ट झाले.[३४]

या ताम्रपटात दुर्गराजाने आपल्या पित्याचे नाव बप्प असे नमूद केले आहे. ताम्रशासनात सार्वभौम स्वामीचा उल्लेख नाही. तसेच दुर्गराजाने कोणतेही राजपददर्शक बिरुदही धारण केलेले नाही. यावरून दुर्गराज हा स्वतंत्र शासक नसून मांडलिक होता असे दिसते.

इ. स. ६७५ या कालगणनेवरून दुर्गराज हा वेरूळच्या कर्क प्रतापशीलाचा समकालीन होता हे स्पष्ट होते. बहाळ–चाळीसगाव परिसर हा वेरूळ–औरंगाबाद परिसरालगतच आहे. त्यावरून विदर्भातील पर्णखेटच्या दवण द्रुहटाप्रमाणे दुर्गराज हा कर्काच्या वतीने चाळीसगाव परिसराचे शासन चालवीत असला पाहिजे. या तर्कास पुष्टी देणारा पुरावा कर्क प्रतापशीलाच्या भिंधोन ताम्रपटात मिळतो. या ताम्रपटात ज्याने ग्रामदान दिले त्या शासकाचे नाव स्वामिराज होते. हा स्वामिराज कर्क प्रतापशीलाचा सेवक (अनुचर) आणि दुर्गराजाचा पुत्र होता अशी माहितीही त्यात नमूद करण्यात आली आहे.[३५] स्वामिराजाचा पिता दुर्गराज म्हणजेच बहाळ–चाळीसगाव परिसराचा प्रशासक दुर्गराज होय. उत्तरगण आणि दवण द्रुहट हे कर्काच्या वतीने पश्चिम विदर्भाचे शासन चालवीत होते आणि दुर्गराज हा खानदेशातील कर्क राजाचा मांडलिक होता असे दिसते. यावरून कर्क प्रतापशील हा मराठवाड्याचा उत्तर भाग आणि त्यालगतचा विदर्भ आणि खानदेशचा राजा होता.

## प्रारंभीच्या राष्ट्रकुटांचे राज्यकाल

नव्याने उपलब्ध झालेल्या कोरीव लेखातील माहितीच्या आधारे पूर्वीच्या संशोधकांनी प्रारंभीच्या राष्ट्रकुटांचे सुचविलेले राज्यकाल चुकीचे टरले आहेत. त्यामुळे त्याबाबतीत थोडेसे विवेचन आवश्यक आहे. आळतेकरांनी तिवरखेड ताम्रपटातील ६३१ या कालोल्लेखाच्या आधारावर नन्नराज युद्धासुराचा राज्यकाल इ. स. ६३० ते ६९० असा टरविला व तो दंतिवर्मनचा पूर्वज समजून ६९० च्या पुढील अर्ध्या शतकात दंतिदुर्गाच्या सर्व पूर्वजांचा राज्यकाल निश्चित केला. मुळात तिवरखेड ताम्रपटातील कालोल्लेख चुकीचा आहे हे सिद्ध झाल्यामुळे त्या आधारे आळतेकरांनी सुचविलेले प्रारंभीच्या राष्ट्रकूट राजांचे राज्यकालही आपोआपच चुकीचे टरले.

आळतेकरांनी सुचविलेला दंतिदुर्गाचा इ. स. ७४५ ते ७५६ हा राज्यकालही चुकीचा टरला आहे, कारण एलोरा ताम्रपट दंतिदुर्गाने इ. स. ७४१ मध्ये जारी केला होता. त्याने अनेक स्वाऱ्या करून ज्याअर्थी राज्यविस्तार केला त्याअर्थी त्याची कारकीर्द कमीत कमी दोन दशकांची तरी असलीच पाहिजे. त्यामुळे त्याचा राज्यकाल इ. स. ७३५ ते ७५५ असा दुरुस्त करावयास हवा. या आधारे दंतिदुर्गापर्यंतच्या राष्ट्रकूट राजांचे शासनकाल पुढीलप्रमाणे निश्चित करावयास हवेत.

| | |
|---|---|
| राष्ट्रकूट कृष्ण (चालुक्य जयसिंहाकडून पराभूत) | इ. स. ५०० ते ५३० |
| इंद्र | इ. स. ५३० ते ५६० |
| दंतिवर्मन | इ. स. ५६० ते ५९० |
| इंद्र–प्रच्छकराज | इ. स. ५९० ते ६१० |
| पहिला गोविंदराज | इ. स. ६१० ते ६५० |
| कर्क प्रतापशील | इ. स. ६५० ते ७१० |
| इंद्रराज | इ. स. ७१० ते ७३५ |
| दंतिदुर्ग | इ. स. ७३५ ते ७५५ |

वा. वि. मिराशी यांनी दंतिदुर्गाच्या एलोरा ताम्रपटातील कालोल्लेख इ. स. ४६३ असा वाचला व ती नोंद तथाकथित चेदि–कलचुरी कालगणनेनुसार असावी असे प्रतिपादन केले आहे.[३६] परंतु मिराशींचे वाचन बरोबर नव्हते. कारण प्रस्तुत ताम्रपटाच्या फोटोप्रतीत व टशात इ. स. ६६३ अशी काल नोंद स्पष्ट दिसते. मिराशींनी वरील कालगणनेच्या आधारे जो दंतिदुर्गाचा राज्यकाल इ. स. ७१० ते ७५० असा सुचविला आहे तो संयुक्तिक नाही. कारण सामनगड[३७] ताम्रपटातील कालोल्लेखावरून दंतिदुर्ग इ. स. ७५३ मध्ये राज्यावर होता हे स्पष्ट होते. दुसरी गोष्ट म्हणजे दंतिदुर्गाचा राज्यकाल ४० वर्षांचा असणेच शक्य नाही. कारण त्याच्यानंतर त्याचा चुलता कृष्ण हा राज्यावर आला. यावरून दंतिदुर्गाचा राज्यकाल वैविध्यपूर्ण परंतु २० वर्षांपेक्षा अधिक नव्हता हे सिद्ध होते.

एलोरा ताम्रपट हा दंतिदुर्गाचा सर्वात पहिला ताम्रपट होय. त्यातील कालोल्लेख ७४१ असा आहे. त्यावरून पाच–सहा वर्षे म्हणजे इ. स. ७३५ च्या सुमारास तो राज्यावर आला हे स्पष्ट होते. इ. स. ७५३ चा सामनगड ताम्रपट हा दंतिदुर्गाचा शेवटचा कोरीव लेख होय. दंतिदुर्गाचा उत्तराधिकारी असलेल्या कृष्णराजाचा पहिला कोरीव लेख इ. स. ७५८ चा होय.[३८] इ. स. ७५३ आणि इ. स. ७५८ च्या मधोमध म्हणजे इ. स. ७५५ च्या सुमारास दंतिदुर्गाचे अचानक निधन होऊन त्याची कारकीर्द संपली असे सिद्ध होते.

**दंतिदुर्ग :** इ. स. ७३५ च्या सुमारास दंतिदुर्गाचे राज्यारोहण झाले. राष्ट्रकुटांच्या कोरीव लेखात त्याने जिंकलेल्या राज्यांच्या व प्रदेशांच्या यादीत कांची, कलिंग, श्रीशैल, कोसल, मालव, लाट, टंक आणि सिंध इत्यादींचा समावेश आहे.[३९] दंतिदुर्गाच्या दिग्विजयांचा निश्चित कालक्रम ठरविणे साधनांच्या अभावी कठीण आहे. आळतेकरांच्या मते त्याने आपल्या दिग्विजयाची सुरुवात पूर्वेकडील कोसल राज्यावरील स्वारीने केली असावी.[४०] परंतु हे मत तितकेसे बरोबर वाटत नाही. काही इतिहासकारांनी असे मत मांडले आहे की, यातील काही स्वाऱ्या दंतिदुर्गाने बदामीच्या चालुक्यांचा मांडलिक असताना त्यांच्यासाठी केल्या असणे शक्य आहे. तसे असल्यास कांची, टंक आणि सिंध या प्रदेशावरील स्वाऱ्या त्याने चालुक्यांच्या वतीने केल्या असाव्यात.[४१]

दंतिदुर्गाने स्वतःसाठी केलेला पहिला दिग्विजय हा लाट किंवा दक्षिण गुजरातचा असावा, ही घटना इ. स. ७४० च्या सुमारास घडली असावी. कारण यानंतरच्या काळातील गुजरातवर राज्य करणाऱ्या चालुक्यांच्या सत्तेविषयीचे कोणतेही पुरावे आढळत नाहीत. याउलट इ. स. ७४१–४२ मधील एलोरा ताम्रपटात दंतिदुर्गाने दक्षिण गुजरातमधील नवसारी येथील ब्राह्मणांना भूमिदाने दिल्याची नोंद आढळते.[४२] यावरून हे स्पष्ट होते की, इ. स. ७४१ मध्ये दंतिदुर्गाचे गुजरातवर स्वामित्व प्रस्थापित झाले होते. या प्रदेशाच्या प्रशासनाचे कार्य दंतिदुर्गाने आपला दूरचा पुतण्या कर्क याच्याकडे सोपविले. इ. स. ७५७ मधील कर्काच्या अंत्रोळी–छरोळी ताम्रपटावरून इ. स. ७६० पर्यंत तो राष्ट्रकुटांचा मांडलिक म्हणून गुजरातचे शासन चालवीत होता असे दिसते.[४३]

इ. स. ७४९ मधील मनोर ताम्रपटावरून कोकण प्रदेश दंतिदुर्गाच्या राज्यात समाविष्ट झालेला होता.[४४] यावरून त्याने स्वतः केलेल्या प्रारंभीच्या स्वाऱ्यांमध्ये नाशिक, खानदेश, कोकण आणि दक्षिण गुजरात या प्रदेशांवरील स्वाऱ्यांचा समावेश होता हे स्पष्ट होते. दंतिदुर्गाच्या पूर्वजांनी या प्रदेशावर अचानक धाडी घालून तेथील चालुक्य सत्ता खिळखिळी केली होती. अरबांच्या गुजरातवरील स्वारीने अगोदरच कमकुवत बनलेल्या चालुक्य प्रशासनावर आणखी आघात बसला. औरंगाबाद–वेरूळ परिसरात दंतिदुर्गाचे पैतृक राज्य असल्यामुळे लागूनच असलेल्या चालुक्यांच्या वरील प्रदेशावर त्याचे बारीक लक्ष होते. चालुक्य सत्तेला उघड आव्हान देण्यासाठी दंतिदुर्गाने या प्रदेशाची पहिल्यांदा निवड केली. या प्रदेशावरील स्वाऱ्या दंतिदुर्गाने बदामीचा चालुक्य राजा दुसरा कीर्तिवर्मन याची सत्ता झुगारून देण्यापूर्वी केल्या होत्या असे निश्चितपणे म्हणता येईल. कारण वर उल्लेखिलेल्या एलोरा आणि मनोर त्याच्या ताम्रपटात दंतिदुर्गाच्या नावाशी सार्वभौमत्वदर्शक अशी बिरुदे जोडलेली नाहीत.

दक्षिण गुजरात आणि कोकण हे प्रदेश चालुक्यांकडून जिंकून घेतल्यानंतर दंतिदुर्गाने दक्षिण महाराष्ट्रावर स्वारी केली. इ. स. ७५३ मधील सामनगड ताम्रपटाद्वारे त्याने कोल्हापूर परिसरातील ब्राह्मणांना भूमिदाने जारी केली यावरून हा प्रदेश त्याने कीर्तिवर्मनकडून जिंकला होता हे सिद्ध होते.[४५] चालुक्य सत्तेचा संपूर्ण नायनाट जरी पहिल्या कृष्णाच्या कारकिर्दीत झाला असला तरी या सत्तेचा शेवट करण्याचे मुख्य श्रेय दंतिदुर्गास दिले जाते. कारण त्याने संपूर्ण महाराष्ट्र आपल्या सत्तेखाली आणून उत्तर कर्नाटकाचाही काही प्रदेश जिंकला होता. कर्नाटकाच्या गुलबर्गा जिल्ह्यातील एका शिलालेखात त्या प्रदेशावरील दंतिदुर्गाच्या स्वारीचे वर्णन आलेले आहे.[४६] त्याच स्वारीत दंतिदुर्गाचा आंध्र प्रदेशातील श्रीशैल मल्लिकार्जुन येथील चालुक्यांच्या मांडलिक राजाशी संघर्ष झाला असला पाहिजे. या स्वाऱ्या इ. स. ७५० ते ७५४ या काळात झाल्या व त्यानंतर लगेच दंतिदुर्गाने चालुक्य सत्तेस नमवून आपले सार्वभौमत्व घोषित केले.

पूर्वेकडील कलिंग आणि कोसल तसेच मध्य भारतातील माळव्यावरील स्वारी दंतिदुर्गाने यानंतरच्या काळात केली होती. हा दिग्विजय त्याच्या कारकिर्दीच्या अखेरच्या काळातील होता असे दिसते. उत्तर दिग्विजयानंतर दंतिदुर्गाने उज्जयिनी येथे ''हिरण्यगर्भमहादान'' समारंभ साजरा केला. त्याप्रसंगी गुर्जर नरेश त्याचा द्वारपाल झाला होता.

उज्जयिनी येथील हिरण्यगर्भमहादान समारंभ म्हणजे दंतिदुर्गाच्या उत्कर्षाचा परमोच्च बिंदू होता. तेथून आपली राजधानी असलेल्या वेरूळला परतल्यावर त्याने तेथील दशावतार लेण्यात शिलालेख कोरविला. त्या शिलालेखात दंतिदुर्गाच्या कामगिरीची माहिती समाविष्ट आहे. यावरून दशावतार लेण्याचा कर्ता दंतिदुर्ग हाच असला पाहिजे असे म्हणता येईल.

दशावतार लेण्यातील दंतिदुर्गाची प्रशस्ती अपूर्ण राहिली आहे. त्यावरून याच काळात दंतिदुर्गाचे अकाली आणि अचानक निधन झाले असावे असा तर्क केला जातो. दंतिदुर्गास पुत्रसंतान नसल्यामुळे त्याच्या पश्चात त्याचा वयस्क चुलता कृष्णराज हा राज्यावर आला. दंतिदुर्गाने अशाप्रकारे राष्ट्रकुटांचे सार्वभौम राज्य स्थापन केले. या राज्याने पुढील दोन अडीच शतके भारतातील राजकीय इतिहासावर आपला प्रभाव निर्माण केला.

**पहिला कृष्णराज :** इ. स. ७५६ च्या सुमारास पहिला कृष्ण राष्ट्रकूट राज्याच्या सिंहासनावर बसला. उतार वयात त्याला राज्य प्राप्ती झाल्यामुळे तसेच दंतिदुर्गाचा तो प्रत्यक्ष वंशज नसल्यामुळे त्याच्या राज्यारोहणात काही राष्ट्रकूट प्रमुखांनी अडचणी निर्माण केल्या होत्या असे दिसते. खुद्द कृष्णाच्या कोरीव लेखातही कोणा दायादाशी (नातेवाईक) त्याला संघर्ष करावा लागल्याची नोंद आढळते.[४७] हा दायाद कोण

असावा, तसेच त्याने कृष्णास का विरोध केला याविषयी अद्यापपर्यंत निश्चित माहिती प्रकाशात आलेली नाही. बहुतेक इतिहासकार असे मानतात की, कृष्णाचा संघर्ष ज्या दायादाशी झाला तो दंतिदुर्गाने गुजरातचा प्रशासक म्हणून नेमलेला राष्ट्रकूट कर्क होय. इ. स. ७५७ मधील या कर्काच्या अंत्रोळी-छरोळी ताम्रपटात त्याच्या नावाशी सार्वभौमत्वदर्शक अशी अनेक बिरुदे लावलेली आहेत.[४८] यावरून दंतिदुर्गाच्या मृत्यूनंतर या कर्काने कृष्णाविरुद्ध बंडाचे निशाण फडकविले. त्यामुळे राज्याची सुत्रे हाती घेतल्यावर कृष्णाला सर्वप्रथम या बंडाचा बीमोड करावा लागला. कृष्ण आणि गुजरातचा कर्क यांच्यातील लढाईत बहुधा कर्क मारला गेला व कृष्णाने आपला धाकटा भाऊ नन्न गुणावलोक यास गुजरातचा प्रशासक नेमले. नन्नानंतर त्याचा मुलगा शंकरगण हा गुजरातचा प्रशासक झाल्याची माहिती आपणास शंकरगणाच्या दौलताबाद ताम्रपटावरून मिळते.[४९] गुजरातमधील कर्काचे किंवा त्याच्या वंशजांचे कोरीव लेख आढळत नाहीत. यावरून कृष्णाने त्याचा समूळ उच्छेद केला हे स्पष्ट होते. कृष्ण आणि कर्क (दायाद) यांच्यातील या संघर्षास तत्कालीन राजकीय परिस्थितीत विशेष महत्त्वाचे स्थान होते. त्यामुळे उत्तर कालातील राष्ट्रकूट राजांच्या दानशासनामधूनही कृष्ण–दायाद संघर्षाचा वारंवार उल्लेख आढळतो.

दंतिदुर्गाचा मृत्यू व कृष्णाविरुद्ध काही प्रमुखांनी केलेली बंडाळी यांचा फायदा घेऊन बदामी चालुक्य नरेश दुसरा कीर्तिवर्मन याने राष्ट्रकूट राज्यावर आक्रमण करून आपला गेलेला प्रदेश परत मिळविण्याचा शेवटचा प्रयत्न केला. त्याच्या या प्रयत्नास गंगवाडीच्या गंग राजाची साथ होती. परंतु कृष्णाने कीर्तिवर्मनचा पराभव करून व त्याची राजधानी बदामी जिंकून चालुक्य सत्ता संपूर्ण नष्ट केली. पाटोपाठ त्याने गंगवाडीवर चढाई करून गंग राजासही पराभूत केले. चालुक्य सत्तेचा शेवट करून त्याने या विजयाचे स्मारक म्हणून "राजाधिराज परमेश्वर" हे बिरुद धारण केले. दक्षिणेवर आता राष्ट्रकुटांची सार्वभौम सत्ता प्रस्थापित झाली.

कीर्तिवर्मनला राष्ट्रकुटांविरुद्ध मदत करणाऱ्यांमध्ये वेंगीचे चालुक्यही होते. त्यामुळे कृष्णाने आन्ध्रप्रदेशावर स्वारी करण्याचा निश्चय केला. वेंगीच्या चालुक्यांनी सरहद्दीवरील काही प्रदेश बळकावला होता. वेंगीच्या मोहिमेसाठी कृष्णाने आपला उत्तराधिकारी राजपुत्र दुसरा गोविंद याची निवड केली. त्याच्या अळस ताम्रपटावरून वेंगीच्या चालुक्याविरुद्ध नेत्रदीपक यश मिळविले. त्यांनी जिंकलेला राष्ट्रकुटांचा प्रदेश गोविंदाने परत मिळवून वेंगीवरही चढाई केली. वेंगीचा चालुक्य राजा विष्णुवर्धन याने आपली कन्या शीलभट्टारिका हिचा विवाह कृष्णाचा धाकटा राजपुत्र ध्रुव याच्याशी करून तसेच काही प्रदेश राष्ट्रकूटांना देऊन तह केला.

वेंगीच्या पाटोपाठ कृष्णाने मध्यभारतातील राहप्पा नावाच्या राजाविरुद्ध मोहीम हाती घेतली. हा राहप्पा कोण होता याविषयी अद्यापर्यंत इतिहासकारांत एकमत नाही. नर्मदेच्या पलीकडील प्रदेशावर कृष्णाने स्वारी केली होती याची निश्चित माहिती

कृष्णाच्या नुकत्याच उपलब्ध झालेल्या बार्शी ताम्रपटावरून मिळते. हा ताम्रपट कृष्णाने नर्मदेच्या काठावरील अमरकंटक येथील आपल्या विजयी शिबिरातून जारी केला होता.[५०] अशाप्रकारे दक्षिणेत राष्ट्रकुटांच्या साम्राज्य स्थापनेचे व त्याच्या विस्ताराचे दंतिदुर्गाने सुरू केलेले काम कृष्णाने पूर्ण केले. बदामीच्या चालुक्य सत्तेचा संपूर्ण नायनाट ही कृष्णाने आपल्या वंशासाठी केलेली फार महत्त्वाची कामगिरी होय.

कृष्णाच्या कारकिर्दीतही वेरूळ हीच राष्ट्रकुटांची राजधानी होती असे निश्चितपणे म्हणता येईल. उतारवयात राज्यावर आल्यामुळे त्याला अल्पशी कारकीर्द लाभली असली तरी त्याने आपल्या काळात केलेली संस्मरणीय कामगिरी म्हणजे प्राचीन भारतीय शिल्प व स्थापत्य कलेच्या क्षेत्रातील उत्कृष्ट अशी कलाकृती असलेल्या वेरूळ येथील कैलास लेण्याची निर्मिती होय. औरंगाबाद जिल्ह्यातील वेरूळ जवळच असलेल्या पैठण येथील कोकस नावाच्या शिल्प्याकडून कृष्णाने या वास्तूचे कोरीव काम पूर्ण करून घेतले.[५१] त्यावरून कृष्णाचे वास्तव्य वेरूळ येथेच असले पाहिजे.

**दुसरा गोविंद :** कृष्णाच्या मृत्यूनंतर इ. स. ७७३ च्या सुमारास त्याचा ज्येष्ठ पुत्र दुसरा गोविंद हा राज्यावर आला. युवराज असतानाच त्याने एक यशस्वी योद्धा म्हणून नाव कमावले होते. वेंगीच्या चालुक्याविरुद्धच्या त्याच्या यशस्वी मोहिमेचे वर्णन वर आले आहेच. परंतु राज्यारोहणानंतर मात्र त्याच्याकडून विशेष अशी कामगिरी झाली नाही. दौलताबाद ताम्रपटामध्ये त्याने पारिजात नामक राजाचा पराभव करून गोवर्धनास संकटमुक्त केले असे वर्णन त्याच्या दौलताबाद ताम्रपटामध्ये आले आहे.[५२] तथापि, हा पारिजात कोण होता तसेच गोवर्धनास कोणत्या परिस्थितीत संकटमुक्त करावे लागले हे अद्याप गूढच राहिले आहे. पारिजात हे राजस्थानातील अरवली पर्वताचे प्राचीन नाव होय. बहुधा त्या प्रदेशातील राजाने राष्ट्रकुटांच्या राज्यावर आक्रमण करून गोवर्धन (गोवर्धन-गंगापूर, जिल्हा नाशिक) पर्यंत धडक मारली असताना गोविंदाने त्याचे आक्रमण परतवून गोवर्धन परत मिळविले असा त्याचा अर्थ होतो. ही घटना गोविंदाच्या राज्यारोहणाच्या नंतर घडली, की तो युवराज असताना घडली हे निश्चितपणे सांगता येत नाही. बहुधा ती कृष्णाच्या काळात घडली असणेच अधिक संभवनीय आहे. कारण कृष्णाने राहप्पा नामक राजस्थानातील राजाचा पराभव केल्याचे वर्णन वर आले आहेच. वेंगीच्या चालुक्यांवरील स्वारीच्या वेळी जशी कृष्णाने गोविंदाची सेनापती म्हणून नियुक्ती केली तशीच ती या मोहिमेत केली असावी व म्हणून दौलताबाद ताम्रपटात या मोहिमेचे श्रेय गोविंदास दिले गेले असावे. राहप्पाच्या ऐवजी पारिजात असे पर्वताचे नाव नमूद करण्यामागे ताम्रशासनाच्या मजकुराची रचना करणाऱ्याचे कौशल्य असावे. गोवर्धन पर्वताच्या नावाशी जुळण्यासाठी पारिजात या पर्वताच्या नावाचा उपयोग करण्यात आला असे दिसते. त्यावरून कृष्णाचा शत्रू राहप्पा आणि गोविंदाचा शत्रू पारिजात हे बहुधा एकच असावेत असे म्हणता येईल.

युवराज म्हणून पराक्रम गाजविणाऱ्या गोविंदाने राज्यावर आल्यावर मात्र प्रशासनाची जबाबदारी आपला धाकटा भाऊ ध्रुव याच्यावर सोपविली व स्वतः विलासात मग्न झाला. याचा फायदा घेऊन ध्रुवाने राज्यप्रशासनावर आपली पकड घट्ट बसविली. ध्रुव डोईजड होत असल्याचे पाहून गोविंदाने त्याला आपली जागा दाखविण्यासाठी हालचाल सुरू केली, परंतु तोपर्यंत वेळ निघून गेली होती. दोघांत गृहयुद्ध सुरू झाले व त्यात ध्रुवाची सरशी होऊन त्याने गोविंदास पदच्युत करून सिंहासन बळकावले. ही घटना इ. स. ७७९ च्या सुमारास घडली. या संघर्षात दुसरा गोविंद ठार झाला.

**ध्रुव धारावर्ष :** इ. स. ७७९ मधील धुळे ताम्रपट हा गोविंदाच्या कारकिर्दीतील शेवटचा कोरीव लेख आहे.[५३] त्यावरून ध्रुवाचे राज्यारोहण इ. स. ७८० च्या सुमारास झाले असावे असे मानले जाते. यावेळी ध्रुव प्रौढ होता. परंतु आपल्या तीन तरुण राजपुत्रांच्या बळावर त्याने आक्रमक धोरण यशस्वीपणे राबविले.

ध्रुवाचा थोरला मुलगा कर्क हा गोविंदाच्या कारकिर्दीत नाशिक प्रांताचा प्रशासक असल्याची माहिती त्याच्या धुळे ताम्रशासनावरून मिळते. ध्रुवाचा दुसरा मुलगा स्तंभ याची नियुक्ती त्याने नव्याने जिंकलेल्या गंगवाडी प्रांताचा प्रशासक म्हणून केली होती. ध्रुवाचा तिसरा पुत्र गोविंद हा सर्व राजपुत्रात कर्तबगार होता. प्रशासनात व इतर प्रांतावरील स्वाऱ्यात प्रामुख्याने त्याची ध्रुवाला मदत होत असे. ध्रुवाचा सर्वांत धाकटा पुत्र इंद्र याची नियुक्ती गुजरातचा प्रशासक म्हणून करण्यात आली. यापुढील जवळजवळ एक शतक गुजरातचे प्रशासन त्याच्या वंशजाकडे होते. ध्रुवाने राज्यावर आल्याबरोबर प्रथम अंतर्गत प्रशासनावर आपली घट्ट पकड बसविली व त्यानंतर बाह्य शत्रूंचा समाचार घेण्यासाठी मोहिमा हाती घेतल्या.

ध्रुव आणि दुसरा गोविंद यांच्या गृहकलहात ज्यांनी गोविंदाची साथ केली त्यांना धडा शिकविण्याचे काम ध्रुवाने प्रथम हाती घेतले. गंगवाडीचा दुसरा शिवमार याने गोविंदास मदत केली होती. त्यामुळे ध्रुवाने प्रथम गंगवाडीवर स्वारी केली. शिवमाराचे राज्य जप्त करून त्याला बंदी केले व गंगवाडीचा प्रशासक म्हणून राजपुत्र स्तंभ याची नेमणूक केली. कांचीचे पल्लव हे राष्ट्रकुटांचे पिढीजात शत्रू होते. गृहयुद्धात पल्लव राजाने गोविंदाची बाजू घेतली होती. त्यामुळे गंगवाडी पाठोपाठ ध्रुवाने कांचीवर आक्रमण करून पल्लव राजाचा पराभव केला. तिसऱ्या गोविंदाच्या राधनपूर ताम्रपटातील माहितीनुसार पल्लव राजाने त्यावेळी जबर किंमत मोजून ध्रुवाशी तह केला.[५४]

दक्षिणेत आपले पाय घट्ट रोवल्यानंतर ध्रुवाने उत्तर भारतातील राजकारणाकडे लक्ष वळविले. गुर्जर-प्रतिहार वंशातील वत्सराज हा ध्रुवाचा समकालीन असून राष्ट्रकुटांच्या गृहकलहात त्याची सहानुभूती दुसऱ्या गोविंदास होती. त्यामुळे तो ध्रुवास

शत्रुस्थानी होता. त्याशिवाय वत्सराजाने उत्तर भारतात गुर्जर-प्रतिहारांचे वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी आणि कनोज हस्तगत करण्यासाठी हालचाल सुरू केली होती. त्याचा हा डाव हाणून पाडण्यासाठी बंगालचा महत्त्वाकांक्षी पालवंशीय राजा धर्मपाल याने कनोजच्या राजकारणात हस्तक्षेप करण्यास सुरुवात केली होती. कनोजचा नामधारी शासक इंद्रायुध यास वत्सराजाने आपल्या हातचे बाहुले बनविले होते. चक्रायुध हा इंद्रायुधाचा प्रतिस्पर्धी इंद्रायुधास हटवून कनोजची गादी बळकावण्याची खटपट करू लागला होता. धर्मपालाने चक्रायुधाला हाताशी धरले. परिणामतः इंद्रायुध व चक्रायुध यांच्यातील सत्तास्पर्धेचे रुपांतर वत्सराज आणि धर्मपाल यांच्यातील युद्धात झाले.[५५] चक्रायुधाला मदत करण्यासाठी व प्रसंगी वत्सराजशी दोन हात करून कनोजवर आपले वर्चस्व प्रस्थापित करण्याच्या उद्देशाने धर्मपाल आपल्या सैन्यासह दुआबात दाखल झाला. वत्सराज आणि धर्मपाल यांच्यात घनघोर लढाई झाली. वत्सराजने या लढाईत धर्मपालाचा निर्णायक पराभव करून त्याची श्वेतछत्रे हस्तगत केली.[५६] त्यामुळे चक्रांयुधाच्या माध्यमाने कनोजवर आपले वर्चस्व प्रस्थापित करण्याचे त्याचे स्वप्न धुळीस मिळाले. परिणामतः वत्सराजची स्थिती भक्कम झाली.

ध्रुवाचे उत्तरेतील घटनांकडे लक्ष होतेच. कनोजवर वत्सराजचे वर्चस्व कायम होणे राष्ट्रकुटांच्या दृष्टीनेही धोक्याचे होते. त्यामुळे ध्रुवाने उत्तर भारतावर स्वारी करण्याचा निर्णय घेतला. तसे पाहिल्यास उत्तर भारतात दिग्विजय संपादन करण्याची आकांक्षा राष्ट्रकूट राज्याच्या संस्थापकापासून सर्वच राजांच्या मनात होती असे दिसून येते. दंतिदुर्गाची माळव्यावरील स्वारी आणि उज्जयिनी नगरात त्याने साजरा केलेला "हिरण्यगर्भमहादान" समारंभ, तसेच कृष्णाने केलेला राहप्पाचा पराभव व त्यासाठी हाती घेतलेली मध्य भारतातील मोहीम या घटना त्या आकांक्षेतूनच घडल्या होत्या. गंगा-यमुना नद्यांच्या दुआबापर्यंत मजल मारणारा पहिला राष्ट्रकूट राजा ध्रुव हाच होय.

ध्रुवाने कनोजच्या दिशेने कूच केले. इ. स. ७८९ मध्ये वत्सराज आणि ध्रुव धारावर्ष यांच्यात दुआबात तुंबळ युद्ध झाले. ध्रुवाने वत्सराजचा संपूर्ण पराभव केला आणि धर्मपालाकडून त्याने हस्तगत केलेली श्वेतछत्रे आपल्या ताब्यात घेतली.[५७] राष्ट्रकुटांच्या या विजयाने उत्तरेकडील राजकारणाचे समीकरण पूर्णपणे बदलून गेले.

वत्सराजकडून पराभूत झालेला धर्मपाल ध्रुवाच्या उत्तरेतील आगमनाबरोबर दुआबातून काढता पाय घेण्याच्या विचारात होता. परंतु ध्रुवाने केलेल्या वत्सराजाच्या पराभवानंतर त्याने आपला विचार बदलला. कारण त्याचा असा समज होता की, ध्रुवाचे सैन्य उत्तर भारतात फार काळ न थांबता दक्षिणेत परत जाईल व त्यानंतर आपणास पुन्हा कनोजवर यशस्वी चढाई करता येईल. म्हणून धर्मपाल परतीचा विचार सोडून दुआबातच थांबला. ही गोष्ट ध्रुवाच्या लक्षात आल्याबरोबर त्याने आपल्या सैन्यास धर्मपालाच्या छावणीवर आक्रमण करण्याचा आदेश दिला. या लढाईत देखील

राष्ट्रकूट सैन्याने बंगालच्या सैन्याचा संपूर्ण पराभव केला. या विजयाची नोंद राष्ट्रकूट पहिल्या अमोघवर्षाच्या संजान ताम्रपटात तसेच गुजरातचा राष्ट्रकूट शासक कर्क सुवर्णवर्ष याच्या सुरत ताम्रपटात करण्यात आलेली आहे.[५८]

ध्रुवाने या दोन्ही विजयाद्वारे उत्तर भारतातील राजकारणास कलाटणी दिली. तसेच राष्ट्रकुटांच्या उत्तर भारतविषयक धोरणास नवे वळण दिले. राष्ट्रकुटांची सत्ता प्रामुख्याने दक्षिणेत असली तरी उत्तर भारतातील सत्तास्पर्धेत त्यानी .यशस्वी भाग घेऊन आपल्या उत्तराधिकाऱ्यांसमोर एक नवा आदर्श निर्माण केला. या राजवंशातील शेवटचा महत्त्वाचा राजा तिसरा कृष्ण याच्यापर्यंत ध्रुवाच्या बहुतेक वंशजांनी त्याचे उत्तर भारतविषयक धोरण पुढे चालविले.[५९]

यादृष्टीने राष्ट्रकुटांच्या उत्तर भारतविषयक धोरणाच्या बाबतीत यापूर्वीच्या इतिहासकारांनी व्यक्त केलेली मते पुन्हा तपासून पाहणे आवश्यक आहे. आळतेकरांसहित बहुतेक सर्व इतिहासकारांनी राष्ट्रकुटांच्या उत्तर भारतातील स्वाऱ्या म्हणजे "केवळ दिग्विजय" होत असे म्हटले आहे.[६०] कारण या विजयातून त्यांनी उत्तर भारतात प्रदेश संपादन करून आपली राजकीय सत्ता प्रस्थापित केली नाही. परंतु हे मत ग्राह्य मानता येत नाही. ध्रुवाने उत्तर भारतात फक्त धाड घातली असे नसून आपल्या विजयानंतर तेथे काही प्रदेश प्राप्त केला व त्याचा प्रशासक म्हणून आपल्या वंशातील शासकाची नियुक्ती केली. या शासकाच्या वंशजांनी पुढील कित्येक पिढ्या तेथे राज्य केले असल्याची माहिती काही नव्याने उपलब्ध झालेल्या कोरीव लेखांवरून मिळते.

बिहार राज्यातील बोधगया येथे राष्ट्रकूट वंशीय तुंग धर्मावलोक या शासकाचा शिलालेख प्राप्त झाला आहे. हा तुंग स्वतःस नन्न गुणावलोकाचा नातू आणि कीर्तिराजचा पुत्र म्हणवितो.[६१] दौलताबाद ताम्रपटातील माहितीनुसार नन्न गुणावलोक हा ध्रुवाचा चुलता होता. त्याचा मुलगा कीर्तिराज हा ध्रुवाचा चुलतभाऊ आणि समकालीन ठरतो. या कीर्तिराजचा पुत्र तुंग हा उत्तर भारतातील प्रदेशाचा शासक होता त्यावरून स्वाभाविकपणे हे राज्य कीर्तिराजने मिळविले असावे. कीर्तिराज हा ध्रुवाच्या उत्तर भारतीय मोहिमेत सामील झालेला असल्यामुळे ध्रुवाकडून त्याला या नव्याने जिंकलेल्या प्रदेशाचे शासनाधिकार मिळाले असावेत. अन्यथा इ. स. च्या नवव्या व दहाव्या शतकात उत्तर भारतात राष्ट्रकुटांचे राज्य कसे स्थापन होऊ शकले याचे उत्तर मिळणे कठीण आहे. बोधगये (बुद्धगया) प्रमाणेच उत्तर प्रदेशातील व्होडमाऊत किंवा बदायुन येथेही राष्ट्रकुटांची एक शाखा राज्य करीत असल्याची माहिती तेथील राष्ट्रकूट वंशीय शासकांकडून मिळते.[६२] हे राष्ट्रकूट शासक म्हणजे राष्ट्रकुटांनी उत्तरेत स्वाऱ्याकरून जे प्रदेश मिळविले त्यावर शासन करणारे राष्ट्रकुटांचे प्रतिनिधी होते. त्यामुळेच ध्रुवानंतरच्या तिसरा गोविंद, तिसरा इंद्र आणि तिसरा कृष्ण या राजांना उत्तर भारतावर वारंवार स्वाऱ्या कराव्या लागल्या. यावरून राष्ट्रकुटांच्या

उत्तर भारत धोरणाविषयीचा पूर्वीच्या इतिहासकारांचा दृष्टिकोन पूर्णतः स्वीकारार्ह ठरत नाही.[६३] केवळ क्षणिक विजयासाठी राष्ट्रकूट राजे आक्रमण करीत नसत, तर त्या प्रदेशात स्थिर सत्ता संपादन करण्याचा हेतू अशा हालचालींमागे असे.

उत्तर दिग्विजयानंतर ध्रुव दक्षिणेत परत आल्यावर त्याने आपला तिसरा पुत्र गोविंद याची आपला वारस म्हणून निवड केली. इ. स. ७९३ च्या अखेरीस त्याचे निधन झाले. ध्रुव हा राष्ट्रकूट वंशातील सर्वांत कर्तबगार शासक होता. अवघ्या १३ वर्षांच्या काळात त्याने दक्षिणेत तर आपला दबदबा निर्माण केलाच, शिवाय उत्तर भारतातील राजकारणावरही आपला प्रभाव निर्माण केला. आळतेकर म्हणतात की, नऊशे वर्षांपूर्वी सातवाहनांच्या रूपाने दक्षिणेतील शासकाने विंध्य पर्वतापलीकडील प्रदेश जिंकण्याचा जो विक्रम केला होता त्याची पुनरावृत्ती ध्रुवाने केली व मध्यप्रदेशात आपली सत्ता प्रस्थापित केली.[६४]

**तिसरा गोविंद :** ध्रुवाने आपल्या हयातीतच आपला वारस म्हणून गोविंद याची निवड केल्यामुळे इ. स. ७९४ च्या सुरुवातीस गोविंदाचे राज्यारोहण निर्विघ्नपणे पार पडले. परंतु त्यानंतर लगेच गोविंदाला गंगवाडीतील गंगांच्या बंडाचा बीमोड करावा लागला. खरे म्हणजे उदार धोरणाचा अवलंब करून गोविंदाने आपल्या राज्याभिषेकाच्या वेळी राष्ट्रकुटांच्या कारागृहात असलेल्या गंग शिवमार याची सुटका केली. परंतु गंगवाडीत पोचताच त्याने गोविंदाविरुद्धच बंडाचे निशाण फडकवले. गंगवाडीचा शासक असलेल्या स्तंभाला गोविंदाने शिवमाराची केलेली सुटका खटकली होती. आपल्याऐवजी आपल्या धाकट्या भावाची निवड राजा म्हणून झाल्याची खंत स्तंभाच्या मनात होतीच. शिवमाराची सुटका करून गोविंदाने आपल्याविरुद्ध आणखी एक आगळीक मुद्दाम केल्याची भावना स्तंभाच्या मनात बळावली.

स्तंभाने गोविंदावर मात करण्यासाठी शिवमाराशी हातमिळवणी करून गोविंदाच्या शत्रूंची आघाडी निर्माण केली. या आघाडीत दक्षिणेतील बारा राजे सामील झाले. एवढे झाल्यानंतर त्याने गोविंदाच्या सत्तेस उघड आव्हान दिले. बंडखोरांना गोविंदाच्या शासन यंत्रणेतील काही मंत्री व अधिकारी यांची सहानुभूती मिळाल्यामुळे तर तो अडचणीत आला.[६५] परंतु धैर्य आणि मुत्सद्दीपणाच्या बळावर त्याने या संकटाचा मुकाबला केला. तो एक उत्तम योद्धा असूनही बलप्रयोगाऐवजी त्याने समझोता आणि क्षमाशीलता यांचा अवलंब करून स्तंभाला जाऊन मिळालेल्या कित्येक मांडलिकांना परत आपल्या पक्षात आणले. इ. स. ७९८ मध्ये गोविंदाने गंगवाडीवर स्वारी करून गंग शिवमार मुत्तरसचा पराभव करून त्याला कैद केले. त्यामुळे स्तंभाने गंगराजची साथ सोडली. तेव्हा गोविंदाने स्तंभाच्या चुका माफ करून गंगवाडीचे प्रशासन परत त्याच्याकडे सोपविले. त्यानंतर गोविंदाने आपल्याविरुद्धच्या आघाडीतील एक शत्रू असलेल्या कांचीच्या पल्लवाकडे मोर्चा वळविला. पल्लवाचा पराभव करून गोविंदाने त्यास धडा शिकविला, परंतु पुढे पल्लवांनी अनेक वेळा त्याच्या विरोधी मोहिमा हाती घेतल्यामुळे आपल्या कारकिर्दीच्या अखेरपर्यंत गोविंदास कांचीवर अनेक वेळा स्वाऱ्या कराव्या लागल्या.

यानंतर तिसऱ्या गोविंदाने वेंगीच्या चालुक्याविरुद्ध मोहीम हाती घेतली. या मोहिमे मागील निश्चित कारण अज्ञात आहे. वेंगीचे चालुक्य आणि राष्ट्रकूट यांच्यात पूर्वीपासून शत्रुत्व होते. कारण राष्ट्रकुटांनी चालुक्य घराण्याकडून दक्षिणेतील सत्ता बळकावली असल्याची त्यांची भावना होती. पहिल्या कृष्णाने वेंगीच्या चालुक्यांचा पराभव करून या दोन घराण्यात वैवाहिक संबंधाद्वारे परस्परातील वैरभाव कमी करण्याचा प्रयत्न केल्याचा उल्लेख वर आलाच आहे. परंतु गोविंद आणि स्तंभातील गृहकलहाच्यावेळी वेंगीच्या चालुक्यांनी स्तंभाची बाजू घेतल्यामुळे गोविंदाचे या घराण्याशी असलेले संबंध पुन्हा बिघडले. त्यामुळे गोविंदाने वेंगीवर स्वारी केली. या स्वारीत गोविंदाने चालुक्यांचा पूर्ण पराभव केला.[६६]

दक्षिणेकडील शत्रूंचा पूर्ण बंदोबस्त केल्यावर गोविंदाने उत्तर भारताकडे आपले लक्ष वळविले. मध्यंतरीच्या काळात उत्तर भारतातील राजकीय संघटनांना अशी कलाटणी मिळाली होती की, गोविंदास उत्तर भारतावर स्वारी करण्याशिवाय गत्यंतर राहिले नव्हते.

ध्रुवाने उत्तर भारतातील सर्व प्रमुख प्रतिस्पर्ध्यांचा पराभव करून या प्रदेशात आपला वचक बसविला होता. परंतु त्याच्या दक्षिणेतील आगमनानंतर बंगालच्या धर्मपालाने पुन्हा मोहीम हाती घेतली. त्याने कनोजवर स्वारी करून तेथील नामधारी राजा इंद्रायुध आणि त्याच्या संरक्षणार्थ असलेल्या गुर्जर-प्रतिहारांच्या सैन्यास पिटाळून लावले व आपणास अनुकूल असलेल्या चक्रायुधास कनोजच्या सिंहासनावर बसविले. गुर्जर-प्रतिहार वत्सराजचा उत्तराधिकारी नागभट याने कनोजवर स्वारी करून धर्मपाल आणि चक्रायुधाचा पराभव केला व अपमानाचा बदला घेतला; एवढेच नव्हे तर नागभटाने राष्ट्रकुटांच्या विरुद्ध असलेल्या कोसल, कलिंग आणि वेंगी येथील शासकांची आघाडी निर्माण केली व राष्ट्रकुटांच्या माळवा आणि उत्तर गुजरातेतील प्रदेशावर आक्रमण केले.

गोविंदाने उत्तरेकडील मोहीम इ. स. ७९९ मध्ये सुरू केली. यावेळी त्याने आपल्या सैन्याची दोन आघाड्यात विभागणी केली. आपला भाऊ व गुजरातचा शासक इंद्र याच्या नेतृत्वाखाली त्याने एक तुकडी गुर्जर-प्रतिहारांच्या मुख्य प्रदेशावर आक्रमण करण्यासाठी पश्चिम भारतात पाठविली व स्वतः दुसऱ्या तुकडीबरोबर कनोजवर चाल केली. दोन आघाड्यांवर लढावे लागल्यामुळे गुर्जर-प्रतिहार सैन्याचा पराभव झाला व कनोज गोविंदाच्या हाती पडले. याच मोहिमेत त्याने कोसल आणि बंगालच्या सैन्याचा पराभव करून उत्तर भारतातील राजकीय स्थितीवर पुन्हा आपले वर्चस्व निर्माण केले. गोविंदाच्या या उत्तरेकडील स्वारीचे वर्णन देखील आळतेकरांनी 'केवळ एक दिग्विजय' असेच केले आहे. पण हा केवळ तत्कालीक विजय नसावा असे म्हणता येते.

राधनपूर ताम्रपटातील माहितीनुसार गोविंदाने उत्तरेकडील मोहिमेवरून परत येतेवेळी काही दिवस श्रीभवनचा राजा मारशर्व याचा पाहुणचार स्वीकारला. त्यावेळी मारशर्वाने अमूल्य अशा वंशपरंपरागत जतन केलेल्या वस्तुंचा गोविंदास नजराणा देऊन त्याचे आदरातिथ्य केले.[६७] इ. स. ८०० मधील पावसाळ्यात गोविंदाचा मुक्काम श्रीभवन येथे होता. त्याचवेळी तेथे त्याच्या एकुलत्या एक असलेल्या शर्व अमोघवर्ष या पुत्राचा जन्म झाला. त्याचे नामकरण बहुधा गोविंदाने आपल्या यजमानाच्या नावावरून केले असे दिसते.

आळतेकरांनी श्रीभवनच्या मारशर्वाच्या ऐतिहासिकतेविषयी जे मत मांडले आहे ते बरोबर वाटत नाही. श्रीभवन म्हणजे गुजरातमधील बडोद्याजवळील सरभोन असावे, तर मारशर्व बहुधा तेथील शासक व गुर्जर–प्रतिहार नागभटाचा मांडलिक असावा असे त्यांनी म्हटले आहे.[६८] परंतु पुढील मुद्यावरून हा तर्क चुकीचा आहे हे सिद्ध होते.

राधनपूर ताम्रशासनात श्रीभवन हे विन्ध्य पर्वताजवळ असल्याचे वर्णन आले आहे. त्याआधारे त्याचा शोध गुजरात ऐवजी माळव्यात घेणे क्रमप्राप्त ठरते. बडोद्यासह दक्षिण गुजरातचा प्रदेश गोविंदाचा भाऊ राष्ट्रकूट इंद्र याच्या अधिपत्याखाली गोविंदानेच ठेवला होता. त्यामुळे त्याच प्रदेशात आणखी दुसरा शासक असण्याची शक्यता नव्हती. विशेष म्हणजे श्रीभवन येथे गोविंदाने संपूर्ण वर्षा ऋतू घालविला, तसेच आपल्या नवजात पुत्राचे नाव आपल्या यजमानाच्या नावावरून ठेवले. त्यामुळे मारशर्व हा गोविंदाचा जवळचा मित्र किंवा नातेवाईक असावा असे वाटते. भोपाळ जवळील पाथरी येथील शिलालेखावरून इ. स. च्या नवव्या शतकात या प्रदेशात राष्ट्रकुटांची एक शाखा राज्य करीत असल्याची माहिती मिळते.[६९] मारशर्व बहुधा या शाखेशी संबंधित असावा. कर्नाटकातील गुडिगेरे येथील कोरीव लेखात मारशर्व नामक शासकाचा उल्लेख आलेला.[७०] फ्लीट यांच्या मते गुडिगेरे आलेखातील मारशर्व आणि राधनपूर ताम्रपटातील श्रीभवनचा मारशर्व हे एकच असावेत.[७१] सर्वरस नामक शासकाचे नाव इ. स. च्या पाचव्या–सहाव्या शतकात होऊन गेलेल्या मानपूरच्या राष्ट्रकूट वंशातील विभुराज याच्या पांडुरंगपल्ली ताम्रपटातही नमूद केलेले आहे.[७२] इ. स. च्या सहाव्या शतकात होऊन गेलेला देज्ज महाराज हा मानपूरच्या राष्ट्रकूट शाखेतील शेवटचा शासक होता. प्रस्तुत लेखकाने हे दाखवून दिले आहे की, ज्याअर्थी पाचव्या शतकातील राष्ट्रकुटांचा पांडुरंगपल्ली ताम्रपट हा नवव्या शतकात होऊन गेलेल्या सर्बराजकडे[७३] होता, त्याअर्थी हा सर्बराज मानपूरच्या राष्ट्रकूटांचा वंशज असला पाहिजे.[७४] इ. स. च्या सहाव्या शतकात बदामीच्या चालुक्यांची सत्ता प्रस्थापित झाल्यामुळे राष्ट्रकूट देज्ज महाराजाचे वंशज नव्या प्रदेशाच्या शोधात माळव्यात जावून स्थायिक झाले. पाथरी शिलालेखातील राष्ट्रकूट परबल आणि राधनपूर ताम्रपटातील शर्वमहाराज हे त्यांच्या वंशजापैकी असावेत. गोविंदाने शर्वास परत कर्नाटकात

प्रशासक म्हणून पाठविले. गुडिगेरे आणि पांडुरंगपल्ली ताम्रपटातील नवव्या शतकातील सर्ब किंवा सर्बरस हा अशा परिस्थितीत दक्षिणेत परत आला असावा.[७५]

गोविंद उत्तरेकडील मोहिमेत अडकल्याची संधी साधून दक्षिणेतील त्याच्या शत्रूंनी उचल खाल्ली. गंग, चोल, पांड्य, पल्लव व केरल नरेशांनी राष्ट्रकुटांच्या विरुद्ध पुन्हा आघाडी स्थापन केली. दक्षिणेतील शासकांनी राष्ट्रकुटांची सत्ता नेस्तनाबूत करण्याचा प्रयत्न केला. गोविंदाने परिस्थितीचे गांभीर्य ओळखले व दक्षिणेतील शत्रूंचा बीमोड करण्याची त्याने पूर्ण तयारी केली. यावेळी त्याने दक्षिणेतील आपल्या शत्रूंवर केवळ स्वारी न करता कर्नाटकातील मयूरखंडी येथे कायमचा तळ ठोकला व तेथून दक्षिणेतील आपल्या सैन्याच्या हालचालींवर देखरेख ठेवण्याची व्यवस्था केली. आपल्या कारकिर्दीची शेवटची दहा वर्षे गोविंदाचा मुक्काम मयूरखंडी (मोरखंडी, जिल्हा बीदर, कर्नाटक) येथे होता हे त्याने या कालावधीत जारी केलेल्या नऊ ताम्रपटावरून स्पष्ट होते. हे सर्व ताम्रपट इ. स. ८०५ ते ८१३ या कालावधीत जारी करण्यात आले आहेत आणि त्यात राजाच्या वास्तव्याचे ठिकाण मयूरखंडी असे नमूद करण्यात आले आहे.[७६]

यावरून हे स्पष्ट होते की, उत्तरेतील मोहिमेवरून परत आल्यानंतरच्या दशकात गोविंदाचे वास्तव्य वेरूळ येथे नसून मयूरखंडी येथे होते. दक्षिणेकडील शत्रूंचे सतत होणारे उठाव हे त्यामागील मुख्य कारण होय. वेरूळहून दक्षिणेत राजधानी हलविण्याची आवश्यकता गोविंदास त्याच्या पहिल्या दक्षिण मोहिमेच्या वेळेसच जाणवली होती. परंतु उत्तरेकडील स्वारीमुळे त्यावेळी ते शक्य झाले नाही. त्यामुळे उत्तर दिग्विजयावरून परत आल्यावर पुन्हा दक्षिणेतील शत्रूंनी केलेला सामूहिक उठाव बघून गोविंदाने दक्षिणेत कायमचे वास्तव्य ठेवण्याचा निर्णय घेतला. मयूरखंडी हे बदामीच्या चालुक्यांच्या राजवटीत विषय विभागाचे मुख्यालय होते, शिवाय राष्ट्रकूट राज्याच्या केंद्रस्थानी ते वसलेले होते.[७७]

उत्तरेकडील मोहिमेवरून परत आल्यावर गोविंदाने आपल्या विजय आणि पुत्रप्राप्तीस्तव वेरूळ येथे यज्ञ केला[७८] आणि त्यानंतर दक्षिणेकडील मोहिमेच्या निमित्ताने मयुरखंडीस प्रयाण केले. दक्षिणेतील या स्वारीत गोविंदाने प्रथम गंग राजाचा पराभव केला. त्या पाठोपाठ पल्लव, पांड्य आणि केरल ही राज्ये पादाक्रांत केली. गोविंदाच्या या विजयांनी प्रभावित होऊन श्रीलंकेचा राजाही गोविंदास आपण होऊन शरण आला. दक्षिणेतील या विजयानंतर गोविंदाने नव्या मोहिमा हाती घेतल्या नाहीत. त्याऐवजी जिंकलेल्या प्रदेशातील आपली स्थिती मजबूत करणे व मयूरखंडी येथील नव्या राजधानीतील अत्यावश्यक अशा नव्या इमारतींची निर्मिती करणे यावर त्याने लक्ष केंद्रित केले. इ. स. ८१४ मध्ये गोविंदाचा मृत्यू झाला.

**पहिला अमोघवर्ष :** तिसऱ्या गोविंदाच्या मृत्यूनंतर इ. स. ८१४ मध्ये त्याचा पुत्र पहिला अमोघवर्ष हा राज्यावर आला. अमोघवर्ष हा अल्पवयीन असला तरी गोविंदाचा एकुलता एक पुत्र असल्यामुळे त्याचे राज्यारोहण निर्विघ्नपणे पार पडले. अमोघवर्ष अल्पवयीन असल्यामुळे गोविंदाने आपला पुतण्या आणि गुजरातचा शासक कर्क सुवर्णवर्ष यास राजपालक म्हणून नेमले असे विधान आळतेकरांनी केले आहे.[७९] परंतु या विधानास पुष्टी देणारा पुरावा सम्राट राष्ट्रकुटांच्या किंवा गुजरातेतील राष्ट्रकुटांच्या शासनादेशात आढळत नाही. राष्ट्रकुटांच्या काही उत्तरकालीन आलेखात कर्काने अमोघवर्षास राज्य प्राप्त करून देण्यात महत्त्वाची भूमिका बजावल्याचा उल्लेख आलेला आहे. परंतु त्यावरून कर्क हा अमोघवर्षाचा राजपालक होता हे सिद्ध होत नाही. उलट खुद्द अमोघवर्षाच्या शासनादेशात पातालमल्ल आणि बंकेय यांचे अमोघवर्षाचे रक्षणकर्ते म्हणून उल्लेख आलेले आहेत.[८०] यातील पातालमल्ल हे कर्क सुवर्णवर्षाचे बिरुद असावे असे जे मत आळतेकरांनी व्यक्त केले तेही निराधार आहे. कर्क सुवर्णवर्षाचे गुजरातेतील उत्तराधिकारी आणि अमोघवर्ष यांच्यात पुढे जो प्रदीर्घ संघर्ष झाला त्यावरूनही कर्क सुवर्णवर्ष हा अमोघवर्षाचा राजपालक होता हे मत ग्राह्य ठरत नाही.

अमोघवर्षाच्या कारकिर्दीची पहिली ३–४ वर्षे सुरळीतपणे गेली. परंतु त्यानंतर मात्र त्याला अंतर्गत शत्रूंनी निर्माण केलेल्या भयंकर स्थितीचा सामना करावा लागला. या बंडाळीचे स्वरुप एवढे भीषण होते की, त्यामुळे काही काळ अमोघवर्षास आपले राजपदही गमवावे लागले. या अंतर्गत शत्रूंच्या बंडाळीचे निश्चित स्वरूप व त्यामागील कारणे स्पष्ट नाहीत. परंतु या संदर्भात पुढीलप्रमाणे अनुमान केले जाऊ शकते.

राज्यारोहणाच्यावेळी अमोघवर्ष हा केवळ चौदा वर्षाचा युवक असल्यामुळे प्रशासन व राजकारण या बाबतीत अनभिज्ञ आणि अननुभवी होता. त्यामुळे प्रशासनावर त्याचा वचक बसू शकला नाही. आपल्या पित्याप्रमाणे अमोघवर्षाच्या ठिकाणी आक्रमक वृत्ती नव्हती. धार्मिक आणि शांततामय कार्यात त्याला अधिक रस होता.

अमोघवर्षाच्या विरुद्ध झालेल्या बंडाळीचे सर्वात मोठे कारण म्हणजे तिसऱ्या गोविंदाने राष्ट्रकूट राज्याच्या राजधानीचे वेरूळहून मयूरखंडी येथे केलेले स्थलांतर होय. त्याने दक्षिणेतील गंग, वेंगीचे चालुक्य इत्यादी शत्रूंकडून वारंवार होणाऱ्या उपद्रवास कायमचा पायबंद घालण्याच्या दृष्टीने हे स्थलांतर घडवून आणले होते. परंतु मयूरखंडीस पूर्णपणे राजधानीचे स्वरूप प्राप्त करून देण्याच्या आतच त्याचा मृत्यू झाल्यामुळे या नगरात राजघराण्यास सुरक्षितता लाभू शकली नाही. त्यामुळे अमोघवर्षास मयूरखंडीऐवजी पुढे मान्यखेट येथे आपली राजधानी कायम करावी लागली.

अमोघवर्षास राज्यसिंहासनावरून पदच्यूत करण्याऱ्यांचीही निश्चित माहिती उपलब्ध नाही. बहुधा वेंगीच्या चालुक्यांनी नेहमीप्रमाणे पहिल्यांदा बंडाचे निशाण उभारले व इतर शत्रूंनी त्यांच्याशी संगनमत करून, मयूरखंडीवर आक्रमण करून ती ताब्यात घेतली असावी. त्यामुळे अमोघवर्षास राजसिंहासनास व राजधानीस मुकावे लागले. यापुढील अनिष्ट काळात अमोघवर्षाचे वास्तव्य बहुधा लत्तलूर (लातूर) येथे असावे. त्यामुळेच कदाचित त्याच्या शिरुर आणि मुळगूद येथील आलेखात अमोघवर्षाच्या नावाबरोबर "लत्तलूरपुरवराधीश्वर" असे बिरुद लावण्यात आले आहे.[८१] वेंगीच्या चालुक्यांनी राष्ट्रकूट राज्याचा मयूरखंडीपर्यंतचा पूर्वेकडील प्रदेश काही काळ व्यापलेला होता या तर्कास चौथ्या गोविंदाच्या सांगली ताम्रपटातील माहितीमुळे पुष्टी मिळते.[८२] या ताम्रपटात अमोघवर्ष आणि वेंगीचे चालुक्य यांच्यात विंगवल्ली येथे झालेल्या घनघोर लढाईचा उल्लेख आलेला आहे. या लढाईत अमोघवर्षाचा विजय होऊन त्यामुळे राष्ट्रकूट आणि वेंगीचे चालुक्य यांच्यातील संघर्षास कलाटणी मिळाली. विंगवल्लीची स्थलनिश्चिती न झाल्यामुळे आजवर या महत्त्वाच्या पुराव्याचा उपयोग केला नाही. इतर शिलालेखातील उल्लेखावरून विंगवल्ली म्हणजे हिंगोली (जिल्हा हिंगोली) हे सिद्ध झाले आहे.[८३] यावरून परभणी व त्यास लागून असलेल्या कर्नाटकातील बीदर जिल्ह्यातील प्रदेशावर काही काळ वेंगीच्या चालुक्यांनी आपला ताबा बसविला होता हे स्पष्ट होते.

अमोघवर्षाच्या सत्तेस लागलेले ग्रहण इ. स. ८१७ ते ८२० या कालवधी पर्यंत टिकले. इ. स. ८२० मध्ये अमोघवर्षाने आपले विश्वासू सरदार बंकेय, पातालमल्ल आणि कर्क सुवर्णवर्ष यांच्या सहाय्याने आपली गेलेली राजसत्ता परत मिळविली. यापैकी बंकेय आणि कर्क सुवर्णवर्ष यांची तत्कालीन इतिहासात नोंद आहे. पातालमल्ल कोण होता हे मात्र अद्यापपर्यंत गूढच राहिले आहे.

पातालमल्ल हे गुजरातचा राष्ट्रकूट शासक कर्क सुवर्णवर्ष याचे बिरुद होते हा आळतेकरांचा तर्क बरोबर वाटत नाही. कारण पहिली गोष्ट म्हणजे तसा निश्चित पुरावा उपलब्ध नाही. दुसरी आणि विशेष महत्त्वाची बाब म्हणजे त्याकाळी व्यक्तिनाम आणि बिरुद यांच्या बाबतीत प्रत्येक राजघराण्यात विशिष्ट संकेत होते. "मल्ल" हे उपपद तत्कालीन गंग राजवंशाच्या नामावळीत आढळते. उदा. राजमल्ल.[८४] गंग हे राष्ट्रकुटांचे पिढीजात शत्रू होते ही गोष्ट खरी आहे. त्याआधारे अमोघवर्षास त्याचे सिंहासन परत मिळण्याच्या कामी गंगांनी कशी मदत केली असा प्रश्न विचारला जाण्याची शक्यता आहे. परंतु त्याचे उत्तर शोधणे तेवढे कटीण नाही. अमोघवर्षाची राजकन्या चंद्रवल्लभा हिचा विवाह गंग युवराज बुटुग याच्याशी झाल्याची इतिहासात नोंद आहे. पिढीजात शत्रूंमध्ये झालेला हा नातेसंबंध या दोघांना एक दुसऱ्याच्या जवळ आणण्यासाठी झालेला होता हे उघड आहे.[८५] त्यावरून पातालमल्ल हे बुटुग किंवा त्याच्या पित्याचे बिरुद असून गंगांनी नव्या परिस्थितीत अमोघवर्षास त्याचे

राजपद परत मिळवून देण्यास मदत केल्याची शक्यता अवश्य आहे. या तर्कास उपोद्बलक असा आणखी एक पुरावा आहे. या काळातील वेंगीच्या चालुक्यांच्या कोरीव लेखात त्यांनी अमोघवर्ष आणि गंग यांच्या संयुक्त सैन्याशी संघर्ष केल्याची नोंद आहे.[८६] यावरून अमोघवर्षाच्या काळात गंग आणि राष्टकूट यांच्यातील पिढीजात शत्रुत्व काही काळ तरी संपले होते हे स्पष्ट होते.

अमोघवर्षाच्या प्रदीर्घ कारकिर्दीतील बराचसा काळ वेंगीच्या चालुक्यांशी लढण्यांत गेला. तिसऱ्या इंद्राच्या बागुम्रा ताम्रपटात असा स्पष्ट उल्लेख आलेला आहे की, अमोघवर्षाने चालुक्यरुपी गहन सागरात बुडालेले राष्ट्रकुटांचे गत वैभव परत मिळविले.[८७] यावरूनही अमोघवर्षाच्या सत्ता पदच्युतीस वेंगीचे चालुक्यच प्रामुख्याने जबाबदार होते हे सिद्ध होते.

विजयादित्य हा वेंगीचा चालुक्य राजा अमोघवर्षाचा समकालीन होता. त्याने विंगवल्ली (हिंगोली, जिल्हा हिंगोली) पर्यंतचा राष्ट्रकूटांचा प्रदेश तर जिंकलाच, शिवाय मयूरखंडीपर्यंत मुसंडी मारून अमोघवर्षास परांगदा केले. ही गेलेली सत्ता परत मिळविण्यासाटी अमोघवर्षास विजयादित्याशी प्रदीर्घ संघर्ष करावा लागला. राष्ट्रकूट आणि वेंगीचे चालुक्य यांच्यात या कालावधीत झालेल्या अनेक लढायांच्या नोंदी अमोघवर्षाच्या उत्तराधिकाऱ्यांच्या कोरीव लेखात आढळतात. चौथ्या गोविंदाच्या सांगली ताम्रपटात असे वर्णन आले आहे की, विंगवल्लीच्या रणभूमीवर अमोघवर्षाने कित्येक चालुक्य वंशीयांचा यमराजास बळी दिला व त्यास संतुष्ट केले. विंगवल्लीच्या लढाईत अमोघवर्षाविरुद्ध वेंगीच्या चालुक्यांच्या मदतीस अभ्युषक वंशाचे सैन्यही आलेले होते.[८८] त्या सर्वांचा अमोघवर्षाने नायनाट केला. त्यामुळे विंगवल्ली येथील लढाई अमोघवर्षाच्या कारकिर्दीतील सर्वात महत्त्वाची लढाई टरली.

वेंगीच्या चालुक्यांच्या आलेखात त्यांच्या सैन्याने अमोघवर्षाचा राजपुत्र दुसरा कृष्ण याचा पराभव करून किरणपूर नगर ताब्यात घेतल्याची नोंद आढळते.[८९] किरणपूर कदाचित कृष्णपूर किंवा कंधारपूर या ऐवजी चुकून लिहिले गेले असावे. कारण त्या नावाचे ठिकाण आढळत नाही. तसे असल्यास किरणपूर म्हणजे राष्ट्रकूटांची उपराजधानी असलेले नांदेड जिल्ह्यातील कंधारही असू शकेल.[९०] ही घटना केव्हा घडली याची नोंद नाही. परंतु ती अमोघवर्षाच्या कारकिर्दीत घडली असण्याची शक्यताही नाकारता येत नाही. चालुक्यांशी चाललेल्या या प्रदीर्घ संघर्षामुळे अमोघवर्षाने बहुधा वैवाहिक संबंधाद्वारे गंग राजवंशाची मैत्री प्राप्त केली. अमोघवर्ष आणि वेंगीचे चालुक्य यांच्यातील संघर्ष इ. स. ८६० पर्यंत चालू होता. शेवटी अमोघवर्षाने वेंगीच्या चालुक्यांवर पूर्ण मात केली.

अमोघवर्षाच्या कारकिर्दीत राष्ट्रकूटांना करावा लागलेला दुसरा संघर्ष म्हणजे गुजरातच्या राष्ट्रकुटांशी केलेला संघर्ष होय. खरे म्हणजे गुजरातमधील राष्ट्रकूट राजा कर्क सुवर्णवर्ष हा अमोघवर्षाचा ज्येष्ट चुलत भाऊ असल्यामुळे संकटकाळी त्याने अमोघवर्षास साथ दिली होती. त्याचे राज्य परत मिळविण्याच्या कामी कर्काचा महत्त्वाचा वाटा होता. असे असूनही पुढे या दोन शाखांत बेबनाव का निर्माण झाला हे अद्यापही एक न उलगडलेले कोडे आहे. एक तर कर्क सुवर्णवर्षाच्या नंतरच्या राजांनी अमोघवर्षाचे स्वामित्व मान्य करण्यात कुचराई केली असावी किंवा गुजरात शाखेतील गृहकलहामुळे अमोघवर्षास त्यात हस्तक्षेप करणे भाग पडले असावे. कर्क सुवर्णवर्षानंतरच्या काळातील गुजरात शाखेच्या इतिहासावरून दुसऱ्या पर्यायाची शक्यता अधिक वाटते.

कारण काहीही असो, अमोघवर्षास गुजरात शाखेविरुद्ध इ. स. च्या नवव्या शतकाच्या उत्तरार्धात अनेक मोहिमा हाती घ्याव्या लागल्या. अमोघवर्ष विजयी होऊन काही काळ संपूर्ण दक्षिण गुजरात त्याने केंद्रीय प्रशासनाखाली आणला असल्याची माहिती त्याच्या तत्कालीन शासनादेशावरून मिळते. इ. स. ८५० मधील तारसदी किंवा अहमदाबाद ताम्रपट अमोघवर्षाने मान्यखेट येथून जारी केला असून त्यात त्याने गुजरातमधील गावे ब्राह्मणास दान दिल्याची नोंद आढळते.[११] त्यानंतरचा त्याचा संजान ताम्रपटही पश्चिम किनारपट्टीवर राष्ट्रकुटांचे केंद्रीय प्रशासन प्रस्थापित झाल्याची ग्वाही देतो.[१२] परंतु पुढील काळात दोन घराण्यातील मतभेद संपुष्टात येऊन अमोघवर्षाने दक्षिण गुजरातचे शासन पुन्हा गुजरात राष्ट्रकूट शाखेकडे सुपूर्द केले. याच सुमारास त्याने उत्तर कोकणात शिलाहार प्रमुख कपर्दिन यास मांडलिक म्हणून नेमले. पुढील चार शतके कोकणवर शिलाहारांचे राज्य अस्तित्वात होते.[१३]

अमोघवर्षाच्या शिरूर शिलालेखानुसार अंग, बंग आणि मगध इत्यादि राज्यांचे राजे अमोघवर्षाचे मांडलिक होते. आळतेकरांना हे मान्य नसून त्यांच्या मतानुसार अमोघवर्षाने उत्तर भारतावर एकही स्वारी केली नाही. उलट त्याचा समकालीन असलेला बंगालचा पालवंशीय राजा नारायणपाल याने मात्र द्रविड राजाच्या प्रदेशावर स्वारी केल्याची नोंद त्याच्या आलेखात आहे. अशा परिस्थितीत अमोघवर्षाचे स्वामित्व बंगालच्या मगधच्या राजांनी मानले असे गृहित धरणे चुकीचे आहे.[१४] परंतु आळतेकरांचा हा तर्कही इतिहासाच्या कसोटीस उतरत नाही. कारण "द्रविड" हा उल्लेख चोल, पांड्य आणि चेर राजांच्या संदर्भातील होय. राष्ट्रकुटांना समकालीन कोरीव लेखात कर्नाट असे संबोधले आहे. शिवाय अमोघवर्ष आणि नारायणपाल हे परस्परांचे समकालीन नव्हते ही बाबही आळतेकरांनी विचारांत घेतलेली दिसत नाही.[१५] अमोघवर्षाने उत्तर भारतावर स्वारी केली नाही ही गोष्ट खरी आहे, परंतु इतरत्र त्यांनी असे विधान केले आहे की, वेंगीच्या चालुक्यांचा पराभव केल्यानंतर

अमोघवर्षाने वंग प्रांतावर स्वारी केली होती. त्या आधारे शिरुर शिलालेखातील वर्णन अवास्तव समजण्याचे कारण नाही. तसेच नारायणपालाने द्रविड राजाच्या प्रदेशावर स्वारी केल्याची माहितीही अशा शक्यतेच्या आड येऊ शकत नाही. कारण अमोघवर्ष हा द्रविड राजा म्हणून संबोधला जात नसे. उलट समकालीन इतर प्रांतातील राजे राष्ट्रकुटांना कर्नाट म्हणून संबोधीत. द्रविड हे संबोधन चोल, पांड्य व केरळ इत्यादी प्रदेशातील राजांना लागू होते.

साठ वर्षांचा प्रदीर्घ राज्यकाल अमोघवर्षाच्या वाट्यास आला. परंतु वेंगीचे चालुक्य आणि गुजरातेतील राष्ट्रकूट यांच्याविरुद्ध लढण्यातच त्यापैकी बराचसा काळ गेला. शांतताप्रिय स्वभावाच्या अमोघवर्षास तेच जड गेले. अशा परिस्थितीतही सर्व शत्रूंवर मात करून त्याने आपले राज्य कायम टिकविले ही त्याच्या कारकिर्दीतील एक फार मोठी जमेची बाजू मानावी लागेल.

कानडी भाषेतील सर्वात प्राचीन म्हणून ओळखल्या जाणाऱ्या ''कविराजमार्ग'' या ग्रंथाचा कर्ता स्वतः अमोघवर्ष होय. तो जैन धर्माचा उपासक होता. त्यामुळे त्याने अनेक विद्वान जैन साधूंना उदार आश्रय दिला होता. यामध्ये जिनसेन आणि भट्टारक हे प्रमुख होत.[१६] अमोघवर्षाच्या कारकिर्दीतील आणखी एक महत्त्वाची घटना म्हणजे त्याने मान्यखेट (मालखेड, जिल्हा गुलबर्गा, कर्नाटक) ही राष्ट्रकुटांची नवी राजधानी निर्माण केली. यापुढील दोन शतकापर्यंत ही दक्षिणेची राजधानी होती.[१७] इ. स. ८७९ मध्ये अमोघवर्षाचे निधन झाले. अमोघवर्ष प्रजेच्या उत्तरदायित्वाविषयी किती जागरूक होता हे महामारीपासून लोकांना वाचविण्यासाठी आपले बोट कापून त्याने सिद्ध केले.[१८]

**दुसरा कृष्ण :** पहिल्या अमोघवर्षाच्या मृत्यूनंतर इ. स. ८८० मध्ये त्याचा पुत्र दुसरा कृष्ण गादीवर आला. त्यापूर्वीही अनेक वेळा त्याने राज्याची सूत्रे स्वतंत्रपणे सांभाळली होती. जैन धर्माचा एकनिष्ठ अनुयायी म्हणून अमोघवर्षाने आपल्या कारकिर्दीच्या अखेरीस अनेक वेळा राज्यकारभारातून निवृत्ती स्वीकारली होती. त्या काळात दुसऱ्या कृष्णाने राज्याची धुरा सांभाळल्याची माहिती तत्कालीन ताम्रशिलाशासनावरून मिळते.[१९]

दुसऱ्या कृष्णाच्या कारकिर्दीतही राष्ट्रकूट आणि त्यांचे दक्षिणेतील वेंगीचे चालुक्य, गंग व नोलम्ब यांच्यासारखे शत्रू व उत्तरेतील गुर्जर-प्रतिहार आणि गुजरातेतील राष्ट्रकूट यांच्यातील संघर्ष चालूच होता. दुसरा कृष्ण हा डहाल प्रांतातील चेदी नरेश कोकल्ल याचा जावई होता. त्यामुळे आपल्या शत्रूंशी लढताना त्याला कोकल्लाची सतत मदत मिळत होती.

पहिल्या अमोघवर्षाने वेंगीच्या चालुक्यांचा पूर्ण बीमोड केला होता. परंतु दुसऱ्या कृष्णाचा समकालीन असलेल्या तिसरा विजयादित्य या वेंगीच्या चालुक्याने

राष्ट्रकुटांविरुद्ध पुन्हा कारवाया सुरू केल्या. त्यामुळे कृष्णाने आपल्या श्वसुराच्या सहाय्याने वेंगीच्या चालुक्यांविरुद्ध युद्ध घोषित केले. वेंगीच्या चालुक्यांच्या कोरीव लेखावरून या संघर्षात प्रारंभी वेंगीच्या चालुक्यांची सरशी होती.[१००] त्यामुळे कृष्णाला बचावात्मक पवित्रा घ्यावा लागला. वेंगीच्या चालुक्यांच्या आलेखात उल्लेखिलेला कृष्णाविरुद्धचा त्याचा किरणपूरच्या लढाईतील विजय या काळातील असावा. परंतु तिसऱ्या विजयादित्यानंतर राज्यावर आलेल्या पहिला भीम या वेंगी चालुक्य राजाच्या काळात कृष्णाने आक्रमक पवित्रा घेतला व भीमाचा संपूर्ण पराभव करून पूर्वीच्या पराभवाचा सूड घेतला.

कृष्णाने उत्तर भारतावर स्वारी केली नाही. तरीही त्याला पहिला भोज या गुर्जर-प्रतिहार राजाशी संघर्ष करावा लागला. कारण भोजाने राष्ट्रकूट राज्यावर आक्रमण केले होते. भोजाने राष्ट्रकुटांचा प्रदेश जिंकण्याचा निकराचा प्रयत्न केला. परंतु कृष्णाने त्याचा यशस्वीपणे प्रतिकार करून आपल्या प्रदेशाचे रक्षण केले. भोजाविरुद्धच्या संघर्षात त्याला गुजरातचा मांडलिक कृष्णराज यानेही मदत केली. असे असूनही इ. स. ८९० च्या सुमारास कृष्णाने गुजरात पुन्हा केंद्रीय प्रशासनाखाली आणला व त्याबरोबर गुजरातेतील राष्ट्रकूटांच्या शाखेची राजवट संपुष्टात आली.[१०१] या मागील नक्की कारण समजण्यास मार्ग नाही. बहुधा गुजरातचा शासक राष्ट्रकूट कृष्णराज यास पुत्रसंतान नसावे व त्यामुळे कृष्णाला तो प्रदेश केंद्रीय प्रशासनाखाली आणावा लागला असावा असे वाटते. परकीय आक्रमणावर मात करून आपले वडिलोपार्जित राज्य कृष्णाने कायम टेवून त्यात दक्षिण गुजरातची भर घातली ही दुसऱ्या कृष्णाच्या कारकिर्दीतील एकमेव जमेची बाजू होय. आपल्या पित्याप्रमाणे दुसरा कृष्णही जैन धर्माचा अनुयायी होता. आदिपुराण या जैन ग्रंथाच्या शेवटच्या पाच प्रकरणांचा कर्ता जैन मुनि गुणभद्र हा दुसऱ्या कृष्णाचा गुरु होता. जवळजवळ ३५ वर्षे राज्य केल्यानंतर इ. स. ९१४ च्या सुमारास दुसऱ्या कृष्णाचे निधन झाले. मृत्यूसमयी त्याचे वय बरेच असावे. कारण त्याचा मुलगा जगतुंग हा त्याच्या हयातीतच मृत्यू पावला व त्यामुळे दुसऱ्या कृष्णानंतर त्याचा नातू व जंगतुंगाचा पुत्र तिसरा इंद्र हा इ. स. ९१४ मध्ये राष्ट्रकूट सिंहासनावर विराजमान झाला.

**तिसरा इंद्र :** दुसऱ्या कृष्णाचा नातू आणि उत्तराधिकारी तिसरा इंद्र याने आपला पट्टबंधोत्सव कुरुंदक येथे साजरा केल्याचे वर्णन त्याच्या अनेक ताम्रपटात आलेले आहे. राजधानी मान्यखेट (मालखेड, जिल्हा गुलबर्गा, कर्नाटक) ऐवजी कुरुंदक (कुरुंदा, तालुका बसमत, जिल्हा परभणी, महाराष्ट्र) या गावी इंद्राने आपला पट्टबंधोत्सव का साजरा केला हे अद्यापही गूढच आहे.[१०२] कुरुंदक हे स्थलनाम राष्ट्रकूट इंद्राच्या अनेक शासनात आढळते. कारण तेथे इंद्राने आपला पट्टबंधोत्सव साजरा केला व त्यावेळी अनेक ताम्रशासन जारी केले. कुरुंदक या स्थलनामाच्या निश्चितीविषयी संशोधकात मतभेद आहेत. भांडारकर यांनी कुरुंदक याची निश्चिती गुजरातेतील कडोदा या गावाशी केली तर मिराशींनी कायगाव (तालुका गंगापूर,

जिल्हा औरंगाबाद) हे राष्ट्रकूटकालीन कुरुंदक असल्याचे मत व्यक्त केले. आळतेकरांनी कोल्हापूरजवळील कुरुंदवाड म्हणजे कुरुंदक होय असे मत मांडले. तर न. शे. पोहनेरकर आणि वि. भि. कोलते यांनी कुरुंदक म्हणजे परभणी जिल्ह्याच्या बसमत तालुक्यातील कुरुंदा होय असे विधान केले आहे.

वरील सर्व मतमतांतरात पोहनेरकर आणि कोलते यांनी सुचविलेली कुरुंदकाची निश्चिती अधिक संयुक्तिक व तर्कशुद्ध वाटते. कारण कडोदा आणि कायगाव व कुरुंदक यांच्यात किमान उच्चारसाम्य देखील नाही. त्यामुळे ते कुरुंदकाचे आजचे पर्याय होऊच शकत नाहीत. कुरुंदवाड याचा समकालीन कोरीव लेखात "कुदलदामवाड" असा उल्लेख आलेला आहे. त्यामुळे त्याचे प्राचीन नाव कुरुंदक नव्हते हे वेगळे सांगण्याची गरज नाही. त्यामुळे कुरुंदकाची निश्चिती पोहनेरकर आणि कोलते यांनी सुचविल्याप्रमाणे कुरुंदकाशीच केवळ होऊ शकते. कारण भाषाशास्त्राच्या संकेतानुसार कुरुंदक याचे आजचे नाव कुरुंदाच होऊ शकते. कुरुंदा हे गाव नांदेड जिल्ह्यातील कंधार पासून जवळच उत्तरेस आहे. कंधार ही राष्ट्रकुटांची निवासी किंवा दुय्यम राजधानी होती. उत्तरेकडील मोहिमांच्या पहिल्या टप्प्यात इंद्राची छावणी कुरुंदास पडली असताना तेथून हे ताम्रपट जारी करण्यात आले असले पाहिजेत. बहुधा दुसऱ्या कृष्णाच्या मृत्यूपाठोपाठ माळव्याचा परमार राजा उपेंद्र उर्फ कृष्णराज याने राष्ट्रकूट राज्यावर आक्रमण करून नाशिक–गोवर्धनपर्यंतचा प्रदेश व्यापला व त्याचा प्रतिकार करण्यासाठी इंद्राला ताबडतोब नाशिककडे सैन्यासह धावून जावे लागले असावे.[१०३] इंद्राने केवळ आपला प्रदेशच परमाराच्या आक्रमणापासून मुक्त केला असे नव्हे, तर परमारांना राष्ट्रकुटांचे स्वामित्व मान्य करण्यास भाग पाडले. या लढाईच्यावेळी कुरुंदक येथे बहुधा इंद्राची छावणी असावी व या विजयी छावणीत इंद्राने विजयोत्सवाच्या निमित्ताने पट्टबंधोत्सव साजरा केला असावा. शिवाय कुरुंदक हे राष्ट्रकुटांची दुसरी राजधानी असलेल्या कंधारपुर (कंधार, जिल्हा नांदेड, महाराष्ट्र) पासून अगदी जवळ होते.[१०४]

आळतेकरांच्या मते इंद्राची कारकीर्द अल्पकालीन म्हणजे अवघी ३–४ वर्षांची होती. परंतु नव्याने प्रसिद्ध झालेल्या काही कोरीव लेखांवरून तिसरा इंद्र किमान इ. स. ९२९ पर्यंत तरी हयात होता.[१०५] त्यामुळे त्याने किमान १५ वर्षे तरी राज्य केले असावे. तिसऱ्या इंद्राची कारकीर्द राष्ट्रकुटांच्या इतिहासातील एक दैदिप्यमान कालखंड मानला जातो. कारण परमारांसारख्या परकीय आक्रमकांना तर त्याने पायबंद तर घातलाच, शिवाय कनोजवर स्वारी करून गुर्जर–प्रतिहारांवर आणखी एक प्रहार केला.

ध्रुव धारावर्ष आणि तिसरा गोविंद या इंद्राच्या पूर्वजांनी उत्तर भारतात स्वाऱ्या करून तेथे आपले राजकीय वर्चस्व तर निर्माण केलेच होते, शिवाय त्या भागातील

काही प्रदेशही जिंकला होता त्याचे वर्णन यापूर्वी आलेले आहेच. पहिला अमोघवर्ष आणि दुसरा कृष्ण यांच्या कारकिर्दीत अंतर्गत शत्रूंच्या सतत होणाऱ्या उठावांमुळे त्या दोघांना उत्तरेकडील परिस्थितीकडे लक्ष देणे शक्य झाले नाही. त्यामुळे राष्ट्रकुटांचे उत्तरेकडील राजकारणावरील वर्चस्व तर संपलेच, त्यांच्या उत्तरेतील मांडलिकांना शत्रूंनी त्रास द्यावयास सुरुवात केली. एवढेच नव्हे तर परमारासारख्या काही शत्रूंनी तर राष्ट्रकुटांच्या दक्षिणेतील प्रदेशावर आक्रमण करण्यापर्यंत मजल मारली होती. त्यामुळे तिसऱ्या इंद्राला राज्यावर आल्याबरोबर बचावात्मक आणि आक्रमक अशा दोन्ही प्रकारच्या परराष्ट्र धोरणाचा अवलंब करावा लागला.

तिसऱ्या इंद्राने अगोदर माळव्याच्या उपेंद्र परमारास धडा शिकविला. त्यानंतर लगेच उत्तरेस कूच केले. यावेळी गुर्जर-प्रतिहार वंशातील दुसरा भोज आणि त्याचा भाऊ महिपाल यांच्यातील यादवीमुळे कनोजचे राज्य पोखरून निघाले होते. भोजाच्या राज्यारोहणास महिपालाने आव्हान दिल्यामुळे त्यांच्यात यादवी सुरू झाली होती. त्यामुळे त्यांचे मांडलिक दोन गटात विभागले होते. इंद्राच्या दृष्टीने ही सुवर्णसंधी होती. त्याने या संधीचा पुरेपूर लाभ उठविला. इंद्राच्या उत्तरेतील मोहिमेत त्याचा मातुल आणि श्वसुर असलेला डहाल प्रांताचा राजा आमणदेव याचे त्याला सैनिकी सहाय्यही मिळाले. अशा अनुकूल परिस्थितीत आणि पूर्ण तयारीनिशी इंद्र कनोजवर चालून गेला. इंद्राने कनोजवर संपूर्ण ताबा मिळविला आणि प्रतिहार राजा महिपाल यास पिटाळून लावले. त्याने बुंदेलखंडातील खजुराहो येथे जाऊन चंदेल राजांचा आश्रय घेतला. चंदेल आणि राष्ट्रकुटांचे कोरीव लेख, तसेच तत्कालीन कवी पम्प याच्या काव्यातही इंद्राच्या या पराक्रमाचे वर्णन आले आहे. राष्ट्रकूटांच्या सैन्याने गुर्जर-प्रतिहार राजाचा प्रयागपर्यंत पाठलाग केला. परंतु इंद्राच्या अकाली निधनामुळे राष्ट्रकुटांना आपली मोहीम गुंडाळून दक्षिणेत परतावे लागले. त्याचा फायदा घेऊन महिपाल चंदेलांच्या संरक्षणाखाली परत कनोजला आला व त्याने आपले राज्य आणि राजधानी परत मिळविली.[१०६]

इंद्राच्या उत्तरेकडील मोहिमेचा फायदा घेऊन दक्षिणेत वेंगीच्या चालुक्यांनी पुन्हा उठाव केला. परंतु इंद्राचा विश्वासू मांडलिक श्रीविजय याने त्यांचा उठाव हाणून पाडला.[१०७] अशाप्रकारे इंद्राने आपल्या सर्व आघाड्यांवरील शत्रूंना नामोहरम केले. त्यामुळे त्याची कारकीर्द अल्प असूनही विशेष उल्लेखनीय ठरली. उत्तर, दक्षिण, पूर्व आणि पश्चिम या सर्व दिशातील प्रदेशात त्याने परत राष्ट्रकुटांचा वचक निर्माण केला. इंद्र हा अतिशय सुस्वरुप होता. त्यामुळेच समकालीन कोरीव लेखात त्याचे वर्णन रट्टकंदर्प किंवा राष्ट्रकुटातील मदन म्हणून करण्यात आले आहे. इंद्राचे निधन बहुधा इ. स. ९२९ च्या सुमारास झाले असावे.

**तिसऱ्या इंद्राचे उत्तराधिकारी :** इ. स. ९२९ मध्ये तिसऱ्या इंद्राच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र दुसरा अमोघवर्ष हा गादीवर आला. त्याची कारकीर्द अवघ्या एका वर्षात संपुष्टात आली. इ. स. ९३० मध्ये त्याचा भाऊ आणि तिसऱ्या इंद्राचा धाकटा मुलगा चौथा गोविंद हा राज्यावर आला. तो आपल्या पित्याप्रमाणे सुस्वरुप होता. परंतु पित्याच्या अंगी असलेले सद्‌गुण मात्र त्याच्याजवळ नव्हते. आपला पूर्वज दुसरा गोविंद याच्याप्रमाणे तो स्त्रीलंपट होता. त्यामुळे त्याचा बहुतेक वेळ स्त्रियांच्या सहवासात आणि विलासी जीवनात व्यतित होत असे. परिणामी त्याच्या मांडलिकांनी मनमानी कारभार सुरू केला. एवढेच नव्हे, तर त्याचा चुलता वद्दिग उर्फ तिसरा अमोघवर्ष याला बरेचसे मांडलिक जाऊन मिळाले. वद्दिगापेक्षा त्याचा पुत्र तिसरा कृष्ण हा अधिक महत्त्वाकांक्षी, मुत्सद्दी आणि आक्रमक वृत्तीचा होता. त्याने गोविंदाच्या बहुतेक सामंतांना आपल्या वडिलांशी अनुकूल करवून घेतले. इ. स. ९३५ मध्ये चौथ्या गोविंदास पदच्यूत करून वद्दिग तिसरा हा अमोघवर्ष हे बिरुद धारण करून राज्यावर बसला.

वद्दिग राजा झाला तरी प्रशासनावर आणि राजकीय धोरणावर त्याचा मुलगा तिसरा कृष्ण याचेच वर्चस्व होते. त्यामुळे तिसरा अमोघवर्ष हा केवळ नामधारी राजा होता. तो धार्मिक वृत्तीचा असून शिवोपासक होता. त्याचा बहुतेक वेळ धार्मिक कार्यात जात असे. त्यामुळे सैनिकी कारवाईचे नेतृत्व देखील त्याचा मुलगा कृष्ण हाच करीत असे.

अमोघवर्षाच्या कारकिर्दीतील राष्ट्रकुटांची प्रमुख मोहीम गंगांच्या विरुद्ध होती. रायमल्ल हा गंग यावेळी सिंहासनावर होता. त्याने बहुधा राष्ट्रकुटांच्या गृहयुद्धात चौथ्या गोविंदाचा पक्ष घेतला असावा. गंग वंशातील राजपुत्र पेरमाडी दुसरा बुट्टुग हा अमोघवर्षाची कन्या रेवकनिम्मडी हिचा पती होता. कृष्णाने रायमल्लास देशोधडीस लावून आपल्या मेहुण्यास गंगवाडीचे राज्य मिळवून दिले. दुसरी मोहीम उत्तर भारतातील होती. तिसऱ्या इंद्राच्या काळात चंदेलांनी कनोजच्या राजास आश्रय दिला होता. त्याचा बदला म्हणून कृष्णाने चंदेलांचे चित्रकूट व कलंजर किल्ले जिंकून घेतले. उत्तरेकडील या मोहिमेत राष्ट्रकुटांना चेदी सैन्याशीही लढावे लागले. वास्तविक तिसरा अमोघवर्ष हा चेदी राजाचा जावई होता. तरीही कृष्णाने आपल्या मातुलाशी युद्ध कसे केले हे एक गुढच आहे. बहुधा कलंजर आणि चित्रकूट किल्ल्यावर चेदींनी हक्क सांगितला असावा किंवा त्यांनी चंदेलांना राष्ट्रकुटांविरुद्ध मदत केली असावी. अमोघवर्षाच्या काळातील या दोन्ही मोहिमांचे नेतृत्व युवराज कृष्णाने केले होते. इ. स. ९४० च्या सुरुवातीस वद्दिग अमोघवर्षाचा मृत्यू झाला आणि त्यानंतर तिसऱ्या कृष्णाचा राज्याभिषेक झाला.

**तिसरा कृष्ण :** आपल्या पित्याच्या हयातीतच कृष्णाने एक कुशल प्रशासक आणि धडाडीचा सेनानी म्हणून ख्याती प्राप्त केलेली असल्यामुळे पित्याच्या मृत्यूनंतर गादीवरील त्याच्या अधिकारास कुणी आव्हान देण्याचा प्रश्नच नव्हता. त्यामुळे

इ. स. ९३९–९४० च्या सुरुवातीस त्याचे निर्विघ्नपणे राज्यारोहण झाले.[१०८] राज्यावर आल्यानंतरची पहिली तीन वर्षे कृष्णाने प्रशासनावरील आपली पकड घट्ट करण्याकडे लक्ष केंद्रित केल्यामुळे या काळात मोहिमा हाती घेतल्या नाहीत.

इ. स. ९४२–४३ मध्ये तिसऱ्या कृष्णाने दक्षिणेकडील मोहीम हाती घेतली. कृष्णाचा समकालीन असलेला चोल राजा परांतक हा त्याच्याप्रमाणेच महत्त्वाकांक्षी होता. त्याने शेजारच्या गंग आणि बाण राजांच्या अंतर्गत कारभारात ढवळाढवळ करण्यास सुरुवात केली. गंग व बाण हे कृष्णाचे नातेवाईक असल्यामुळे कृष्णाला चोल राजाच्या हस्तक्षेपाचा समाचार घेणे भाग पडले. त्यामुळे त्याने चोलाविरुद्ध मोहीम हाती घेतली. त्याने कांची आणि तंजावरपर्यंत धडक मारून ही दोन्ही नगरे आणि आसपासचा प्रदेश जिंकला. चोलांच्या कोरीव लेखात देखील कृष्णाने हा प्रदेश जिंकल्याची नोंद आढळते.[१०९] चोल परांतकाने आपला प्रदेश परत मिळविण्याची पराकाष्ठा केली. त्यामुळे कृष्णाची ही दक्षिण मोहीम प्रदीर्घ काळ चालली.

या मोहिमेतील सर्वात घनघोर मानली जाणारी टक्कोलम येथील लढाई इ. स. ९४९ मध्ये लढली गेली.[११०] या लढाईत चोल सैन्याचे नेतृत्व युवराज राजादित्याकडे होते, तर राष्टकूट सैन्याचा सेनापती गंग राजा दुसरा बुटुग हा होता. लढाईच्या सुरुवातीस राजादित्याची सरशी झाली तरी शेवटी राष्ट्रकुटांचा विजय होऊन चोल युवराज राजादित्य धारातीर्थी पडला. कृष्णाने या विजयापाठोपाठ दक्षिणेतील रामेश्वरापर्यंतचा मुलूख पादाक्रांत केला. त्याने पांड्य आणि चेर राजांचा पराभव करून लंकेच्या राजालाही खंडणी देण्यास भाग पाडले. चोलांचे संपूर्ण राज्य खालसा करून तेथील प्रशासनासाठी त्याने आपले अधिकारी प्रशासक म्हणून नेमले. त्याचा मेहुणा गंग बुटुग याचा या दिग्विजयात महत्त्वाचा वाटा होता. त्याचा मोबदला म्हणून कृष्णाने बुटुगास गंगवाडीशिवाय बनवासी बेलव्होल, पुरिटोरे, किसुकाड आणि बागेनाड हे प्रदेश बहाल केले.

दक्षिणेत राष्ट्रकुटांचे सैन्य अडकल्याची संधी साधून इ. स. ९५३ मध्ये उत्तरेत चंदेलांनी चित्रकूट आणि कलंजरवर परत आपला ताबा प्रस्थापित केला. तसेच माळव्याच्या परमार सियकाने राष्ट्रकुटांच्या प्रदेशावर हल्ले सुरू केले. त्यामुळे यापुढील काळात कृष्णास पुन्हा आपले लक्ष उत्तरेकडे वळवावे लागले. त्याने माळव्यावर आपला मांडलिक मारसिंह याच्या नेतृत्वाखाली आपले सैन्य पाठविले व सियकाचा पूर्ण पराभव केला.[१११] ज्युरा येथील शिलालेखानुसार कृष्णाने स्वतः बुंदेलखंडावर चाल करून चित्रकूट आणि कलंजर परत जिंकून घेतले. त्यानंतर त्याने वेंगीच्या चालुक्याविरुद्ध मोहीम हाती घेतली.[११२]

इ. स. ९६८ मध्ये कृष्णाचे निधन झाले. त्याच्या काळात उत्तरेकडील काही प्रदेश गमवावा लागला तरी दक्षिणेस रामेश्वरपर्यंतचा प्रदेश राष्ट्रकुटांना मिळाला. दक्षिणेतील

संपूर्ण द्वीपकल्प आपल्या प्रभावाखाली आणणारा तिसरा कृष्ण हा एकमेव राष्ट्रकूट राजा आहे. उत्तरेकडे मोहिमा हाती घेणाराही तो शेवटचा राष्ट्रकूट राजा होता. त्याच्यानंतर राष्ट्रकूट साम्राज्याचा ऱ्हास सुरू झाला.

कर्नाटकातील मालखेड ही जरी राष्ट्रकूट राज्याची राजधानी असली तरी तिसऱ्या कृष्णाचे वास्तव्य बऱ्याच वेळा मराठवाड्याच्या नांदेड जिल्ह्यातील कंधार येथे असे. कारण ही राष्ट्रकुटांची उत्तरेकडील उपराजधानी होती. कृष्णाच्या काळात कोरविला गेलेला एक शिलालेख कंधार येथे उपलब्ध झाला असून त्यात कंधार पुरातील उपनगरे, बाजारपेठा, मंदिरे, राजप्रासाद आणि जलाशयाचे सविस्तर वर्णन आले आहे. तत्कालीन नगर रचनेचा आदर्श वस्तुपाठच या लेखात नोंदविला आहे.[११३] नगराचे एवढे सविस्तर वर्णन करणारा, किंबहुना नगर प्रशस्ती म्हणून कोरविला गेलेला हा शिलालेख अद्वितीय होय. विशेष म्हणजे प्रस्तुत शिलालेखात ज्या इमारतींचे वर्णन करण्यात आले आहे, त्यापैकी बहुतेकांचा शोध श्रीमती शोभना गोखले यांनी कंधार शहराच्या विविध भागात लावला आहे.[११४] पुण्याच्या डेक्कन कॉलेजमधील पुरातत्व विभागाने सन १९८४ मध्ये कंधार येथे उत्खनन केले. या उत्खननात २३ मीटर लांबीच्या क्षेत्रपाल मूर्तीचे आणि ती ज्या ओट्यावर निजलेल्या स्थितीत ठेवण्यात आली होती त्याचे अवशेष आढळले. हे अवशेष कंधार जवळील मानसपुरी या गावी सापडले.[११५] मध्य आशियातील सर्वात मोठा मूर्तिशिल्पावशेष म्हणून याची नोंद करण्यात आली. याच काळात कृष्ण तिसरा याने आपल्या पूर्वजांच्या स्मृतिप्रीत्यर्थ बांधलेल्या जगत्तुंग समुद्र या जलाशयाचा शोध घेऊन त्याची स्थलनिश्चिती अ. शं. पाठक यांनी केली आहे.[११६] वर उल्लेखिलेला कृष्णाचा शिलालेख कंधारच्या बहाद्दरपुरा या उपनगरात सापडला. यावरून कंधार शहराचा विस्तार राष्ट्रकुटांच्या काळात किती होता याची कल्पना येते. कंधार येथील बऱ्याचशा इमारती कृष्णाच्या काळात बांधण्यात आल्या. उत्तरेकडील मोहिमांच्या दृष्टीने सोयीचे म्हणून कृष्णाने या उपराजधानीत आपले वास्तव्य ठेवले असावे. कृष्ण आणि कंधारपुर यांच्यातील घनिष्ट संबंध सौदंत्तीच्या रट्टांच्या कोरीव लेखातील कृष्णाला लावलेल्या "कंधारपुरवराधीश्वर"[११७] या विरुदावरूनही सिद्ध होतात.

## राष्ट्रकूट साम्राज्याचे पतन

तिसऱ्या कृष्णाला किमान एक तरी पुत्र होता. त्याचे नाव काय होते हे कळण्यास मार्ग नाहीं. परंतु कृष्णाचा नातू म्हणविणाऱ्या इंद्र नामक प्रमुखाचा उल्लेख उत्तरकालीन शिलालेखात आलेला आहे.[११८] यावरून कृष्णाचा हा पुत्र त्याच्या हयातीतच मृत्यू पावला असावा व नातू चौथा इंद्र अल्पवयीन असल्यामुळे कृष्णाच्या अनेक भावांपैकी एक खोट्टिग हा चौथा अमोघवर्ष हे बिरुद धारण करून कृष्णाचा उत्तराधिकारी बनला असावा असे इतिहासकार मानतात. तो इ. स. ९६८ च्या सुमारास राज्यावर आला.

खोट्टिगाच्या कारकिर्दीपासून राष्ट्रकूट साम्राज्याचा ऱ्हास सुरू झाला. राष्ट्रकुटांच्या वैभवावर जबरदस्त आघात करणारी घटना खोट्टिगाच्या राज्यारोहणानंतर अवघ्या तीन वर्षात घडली. ज्या मान्यखेट नगरीत उत्तरेस गंगा-यमुना दुआबापर्यंत व दक्षिणेस कन्याकुमारी–रामेश्वरापर्यंतचे मुलूख पादाक्रांत करण्याच्या मोहिमा आखल्या गेल्या ती

ही राष्ट्रकुटांची राजधानी लुटण्यापर्यंत शत्रूंची मजल गेली. माळव्याचा परमार राजा सियक उर्फ श्रीहर्ष याने खोट्टिगाच्या राज्यावर आक्रमण करून त्याचा पूर्ण पराभव तर केलाच, पण तेवढ्यावर न थांबता त्याने मालखेड लुटून नेले. समकालीन कोरीव लेखात तसेच वाङ्मयीन साधनातही या घटनेचा उल्लेख आलेला आहे. राष्ट्रकुटांच्या आलेखागारातील ताम्रशासनेही परमारांनी लुटून नेली व त्यातील कोऱ्या पत्र्यांवर आपले शासनादेश कोरविले.[११९] यावरून या लुटीचे स्वरूप किती भयंकर होते हे स्पष्ट होते. परमारांच्या या हल्ल्याच्या वेळी बहुधा खोट्टिग मारला गेला असावा.

खोट्टिग बहुधा निपुत्रिक असल्यामुळे त्याचा व तिसऱ्या कृष्णाचा भाऊ असलेल्या निरुपमाचा मुलगा दुसरा कर्क हा या ढासळत्या साम्राज्याचा वारस बनला. खर्डा ताम्रपटानुसार या कर्काने पांड्य, गुर्जर, चोल आणि हुण इत्यादी शत्रूंवर मात केल्याचे वर्णन आहे.[१२०] ते अतिशयोक्त मानण्याचे कारण नाही. तिसऱ्या कृष्णाच्या कारकिर्दीतील ते कर्काने प्राप्त केलेले विजय असू शकतात. परंतु कर्काच्या कारकिर्दीत राष्ट्रकूट साम्राज्याचा मनोरा ढासळू लागला होता हे मात्र निश्चित. याला कारणेही अनेक होती. पहिले आणि महत्त्वाचे कारण म्हणजे सियक परमाराने केलेले राष्ट्रकूट राज्यावरील आक्रमण आणि राजधानी मालखेडची लुटालूट. या लुटालुटीत राष्ट्रकुटांची आर्थिक हानी किती झाली याची माहिती उपलब्ध नाही. परंतु त्यांचा जो राजकीय दबदबा तिसऱ्या कृष्णाच्या काळापर्यंत होता तो नष्ट झाला. यामुळे त्यांच्या बाह्य शत्रूंनी तर डोके वर काढलेच, शिवाय मांडलिकांची निष्ठाही डळमळीत झाली.

दुसरे कारण म्हणजे कृष्णाचा नातू चौथा गोविंद हा वयात आला असतानाही त्याला सिंहासनावर न बसवता कर्क हा कृष्णाचा पुतण्या राजा झाला होता. चौथ्या गोविंदाची आई गंग राजवंशातील होती. त्यामुळे गंगांनी कर्काचे राज्यारोहण मान्य केले नाही व त्याच्याविरुद्ध कारवाया चालू ठेवल्या.[१२१] त्रिपुरीच्या कलचुरींचे आणि राष्ट्रकुटांचे आप्त संबंध असूनही कलंजर प्रश्नावरून या दोन राजघराण्यात कृष्णाच्या काळापासूनच वितुष्ट आले होते. त्यामुळे संकटकाळी त्यांची मदत मिळणे तर दूरच, उलट त्यांचे शत्रूत्व मात्र राष्ट्रकुटांनी पत्करले होते.

कृष्णाच्या उत्तरेकडील मोहिमांचा ताण राष्ट्रकूट साम्राज्याच्या अर्थव्यवस्थेवर पडला होता आणि अशा प्रतिकूल परिस्थितीत राष्ट्रकूट सत्तेची धुरा कर्कासारख्या दुर्बल शासकाकडे होती. यामुळे मांडलिकांनी कर्काविरुद्ध बंडाचे निशाण उभारले.

या बंडखोर मांडलिकांचा अग्रणी होता चालुक्य तैलप. हा वातापीच्या चालुक्यांचा वंशज व राष्ट्रकूट प्रशासनात कर्नाटकातील विजापूर जिल्ह्याच्या बागेवाडी क्षेत्राचा शासकही होता. परमारांच्या हल्ल्याच्या वेळची राष्ट्रकूटांची गलितगात्र अवस्था हेरून त्याने चालुक्य सत्तेच्या पुनर्स्थापनेचे प्रयत्न सुरू केले. त्यासाठी त्याने यादव भिल्लम याची आणि कलचुरींची मदत मिळविली. तैलपाची आई राष्ट्रकूट वंशातील होती. या आधारावर त्याने राज्यावर हक्क प्राप्त करण्यासाठी हालचाली सुरू केल्या. इ. स. ९७३ मध्ये तैलपाने कर्काचा पराभव करून मान्यखेट जिंकले व आपल्या चालुक्य वंशाच्या सार्वभौम राज्याची स्थापना केली.[१२२]

------

## तळटिपा

१ मजुमदार, आर. सी. (संपा.), **दि क्लासिकल एज,** भारतीय विद्याभवन, बॉम्बे, १९६५, पृ. १९९-२०१.

२ कृष्णदेव, **इ. आय.,** खंड-१, ३२, पृ. ११२-१७.

३ टोसर, एच. एस., **जे. ओ. आय.,** खंड-१, ४०, नं. १-२, पृ. ७५-८१.

४ टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** १९९३, खंड-१, १९, पृ. १०३-१४.

५ आळतेकर, ए. एस., **राष्ट्रकूटस अँड देअर टाईम्स,** ओरिएंटल बुक एजन्सी, पुना, १९६७, पृ. २२-२३.

६ टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** खंड-१, १९, पूर्वोक्त.

७ टोसर, हरिहर, भारतीय इतिहास आणि संस्कृती, त्रैमासिक, ऑक्टो-डिसें. १९८९, पृ. ३, ५.

८ टोसर, एच. एस.; **जे. इ. एस. आय.,** खंड-१, १९, पूर्वोक्त.

९ कित्ता.

१० कित्ता.

११ कित्ता.

१२ मिराशी, वा. वि., **संशोधन मुक्तावली** (मराठी), खंड-१, २, पृ. १११-१४.

१३ बर्जेस अँड भगवानलाल इंद्रजी, **ए. एस. डब्ल्यू. आय.,** १८८३, खंड-१, ५. पृ. ८७-८९.

१४ भांडारकर, डी. आर., **इ. आय.,** खंड-१, १८, पृ. २३५-५७.

१५ बर्जेस अँड इंद्रजी, पूर्वोक्त.

१६ रमेश, के. व्ही., **चालुक्य ऑफ वातापी,** आगमकला प्रकाशन, दिल्ली, १९८४, पृ. ६५.

१७ **इ. आय.,** खंड-१, ६, पृ. १-१२.

१८ कित्ता.

१९ टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** १९९४, खंड-२०, पृ. १९-२५.

२० रमेश, के. व्ही. ''भिंधोण प्लेटस् ऑफ राष्ट्रकूट कर्कराजा'', **जे. इ. एस. आय.,** खंड-१०, पृ. ३०-३५.

२१ कित्ता.

२२ टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** खंड-१, १७, पृ. १४-२१.

२३ टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** खंड-१९, पूर्वोक्त.

२४ आळतेकर, ए. एस., पूर्वोक्त, १९३४, पृ. ३२.

२५ **आय. ए.,** खंड-१८, पृ. २३०-३६.

२६ कित्ता, खंड-११, पृ. २७६ व त्यापुढे.

२७ व्यंकटरामनय्या, एन., **इ. आय.,** खंड-२९, पृ. १०९-१५.

२८ आळतेकर, ए. एस., पूर्वोक्त, पृ. ८.

२९ मिराशी, व्ही. व्ही., पूर्वोक्त.

३० मिराशी, व्ही. व्ही., **इ. आय.,** १९१७-१८, खंड-२२, पृ. ९३-९६.

३१ टोसर, एच. एस., **"आयडेन्टिफिकेशन ऑफ हेमाद्रि अँड पर्णखेटाज",** पेपर प्रेझेन्टेड अॅट दि नॅशनल सेमिनार ऑन यादवाज, आर्गनाइझ्ड बाय दि नागपूर युनिव्हर्सिटी इन फेब्रु., १९८८.

३२ सुखटनकर, व्ही. एस., **इ. आय.,** १९१७-१८, खंड-१, १४, पृ. १२१-३०.

३३ रमेश, के. व्ही., तिवारी, एस. पी. अँड शर्मा, एम. जे. (संपा.), **आय. एच. इ.,** डॉ. गई, जी. एस., फेलिसिटेशन व्हॉल्यूम, आगमकला प्रकाशन, दिल्ली, १९९०, पृ. २११-१८.

३४ टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** खंड-१९, पूर्वोक्त.

३५ रमेश, के. व्ही., **जे. इ. एस. आय.,** खंड-१०, पूर्वोक्त.

३६ मिराशी, व्ही. व्ही., **इ. आय.,** खंड-२८, पृ. १-११.

३७ शास्त्री, बी. जी., **जे. बी. बी. आर. ए. एस.,** १८४४-४७, खंड-२, पृ. ३७१-७५, जे. एफ. फ्लीट, **आय. ए.,** १८८२, खंड-३, पृ. ११०-१५.

३८ आळतेकर, ए. एस., पूर्वोक्त, पृ. ४१.

३९ **आय. ए.,** खंड-११, पृ. ३, **ए. एस. डब्ल्यू. आय.,** खंड-५, पृ. ९२.

४० आळतेकर, ए. एस., पूर्वोक्त.

४१ **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर, हिस्ट्री : एन्शंट पिरीअड,** पृ. २३६.

४२ दीक्षित, एस. के., **इ. आय.,** खंड-२५, पृ. २५-३१.

४३ टोसर, एच. एस., **जे. ओ. आय.,** वडोदरा, सप्टें-डिसें. १९९०, पृ. ७५–८२.

४४ मिराशी, व्ही. व्ही., **आय. एच. क्यू.,** खंड-३५.

४५ शास्त्री, बी. जी., **जे. बी. बी. आर. ए. एस.,** १८४४-४७, खंड-२, पृ. ३७१-७५.

४६ रमेश, के. व्ही., पूर्वोक्त.

४७ **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर**, पूर्वोक्त, पृ. ३३८.

४८ टोसर, एच. एस., पूर्वोक्त.

४९ कित्ता.

५० टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** खंड-११, पृ. १०६-१३.

५१ टोसर, एच. एस., **अनुसंधान पत्रिका,** अंबेजोगाई, जुलै १९८९, पृ. १-१३.

५२ **इ. आय.,** खंड-९, पृ. १९५.

५३ भांडारकर, डी. आर., **इ. आय.,** खंड-८, पृ. १८२-८७.

५४ **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर,** पूर्वोक्त, पृ. २४०.

५५ मजुमदार, आर. सी. (संपा.), **दि क्लासिकल एज,** बॉम्बे, १९६४, पृ. ५.

५६ कित्ता.

५७ कित्ता.

५८ भांडारकर, डी. आर., **इ. आय.,** खंड-८, पृ. २३५-५७.

५९ मजुमदार, आर. सी. (संपा.), **इम्पीरिअल कनोज,** पृ. ५.

६० टोसर, एच. एस., **जे. ओ. आय.,** पूर्वोक्त.

६१ कित्ता.

६२ कित्ता.

६३ कित्ता.

६४ आळतेकर, ए. एस., पूर्वोक्त.

६५ भांडारकर, डी. आर., **इ. आय.,** खंड-१८, पूर्वोक्त.

६६ **इ. आय.,** खंड-६, पृ. २३९.

६७ कित्ता.

६८ टोसर, एच. एस., **अनुसंधान पत्रिका,** जानेवारी १९९१, पृ. १-९.

६९ कित्ता.

७० टोसर, एच. एस., **अनुसंधान पत्रिका,** जानेवारी १९९१, पृ. १-९.

७१ कित्ता.

७२ मिराशी, व्ही. व्ही., **संशोधन मुक्तावली,** सार, ५, पृ. १३३-४२.

७३ कित्ता.

७४ टोसर, एच. एस., **अनुसंधान पत्रिका,** पूर्वोक्त.

७५ कित्ता.

७६ टोसर, एच. एस., **जे. इ. एस. आय.,** १९९३, खंड-१९, पृ. ११२.

७७ कोलते, व्ही. बी., **विदर्भ संशोधन वार्षिक,** १९६६, पृ. १७-३७.

७८ सेनगुप्ता, आर., **आय. एच. क्यू.,** खंड-२६, पृ. ५८-६७.

७९ **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर,** पूर्वोक्त, पृ. २४५.

८० भांडारकर, डी. आर., **इ. आय.,** खंड-१८, पूर्वोक्त.

८१ टोसर, हरिहर, भारतीय इतिहास आणि संस्कृती, **त्रैमासिक,** एप्रिल-जून १९८९, पृ. ७.

८२ फ्लीट, जे. एच., **आय. ए.** १८८३, खंड-१, १२, पृ. २४७-५५.

८३ टोसर, हरिहर, **मराठवाडा काल आणि आज,** संकेत प्रकाशन, जालना. पृ. ८७.

८४ मजुमदार, आर. सी., पूर्वोक्त, पृ. १६१-६२.

८५ कित्ता.

८६ कित्ता, पृ. १३४.

८७ **इ. आय.,** खंड-९, पृ. २४.

८८ **आय. ए.,** खंड-१२, पूर्वोक्त.

८९ **इम्पीरिअल कनोज,** पूर्वोक्त, पृ. १३५.

९० रित्ती आणि शेळके, नांदेड डिस्ट्रिक्ट इन्स्क्रिप्शन क्र. २.

९१ **ए. आर. आय. इ.,** १९७१-७२, इन्स्क्रिप्शन नं. २.

९२ भांडारकर, डी. आर., **इ. आय.,** खंड-१८, पूर्वोक्त.

९३ मिराशी, व्ही. व्ही., **संशोधन मुक्तावली,** सार, ५. पृ. १५१-५७ आणि **सी. आय. आय.,** खंड-१, ६, इन्स्क्रिप्शनस् ऑफ दि शिलाहाराज : इन्ट्रोडक्शन.

९४ आळतेकर, ए. एस., पूर्वोक्त.

९५ **इम्पीरिअल कनोज,** पूर्वोक्त, पृ. ३१.

९६ **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर,** पूर्वोक्त, पृ. २४७.

९७ भारतीय इतिहास आणि संस्कृती, **त्रैमासिक,** एप्रिल-जून, १९८९.

९८ भांडारकर., डी. आर., पूर्वोक्त.

९९ **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर,** पूर्वोक्त.

१०० **इम्पीरिअल कनोज,** पूर्वोक्त.

१०१ टोसर, एच. एस., **जे. ओ. आय.,** पूर्वोक्त.

१०२ टोसर, एच. एस., "स्टडिज इन दि हिस्टॉरिकल अँड कल्चरल जिऑग्राफी अँड इथनोग्राफी ऑफ मराठवाडा", अप्रकाशित प्रबंध प्रकरण २, सेक्शन-१, औरंगाबाद, एप्रिल, १९७७.

१०३ मिराशी, व्ही. व्ही., **इ. आय.,** खंड-३६, पृ. २२९.

१०४ रित्ती आणि शेळके, पूर्वोक्त, इन्ट्रोडक्शन.

१०५ **इ. आय.,** खंड-२६, पृ. १६२.

१०६ **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर,** पूर्वोक्त, पृ. २५१.

१०७ **इ. आय.,** खंड-३६, पृ. २२४.

१०८ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड-१८, पृ. २३९.

१०९ **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर,** पूर्वोक्त, पृ. २५३.

११० **इम्पीरिअल कनोज,** पूर्वोक्त, पृ. १४.

१११ कित्ता, पृ. ८९.

११२ कित्ता, पृ. १५.

११३ रित्ती आणि शेळके, पूर्वोक्त, इन्स्क्रिप्शनस् नं. २.

११४ **जे. इ. एस. आय.,** खंड-७, पृ. २२.

११५ ढवळीकर, म. के. आणि जामखेडकर, अ. प्र., **नांदेड : स्थानिक इतिहास आणि संहिता–एक शोध.,** १९८६, पृ. ३६-४३.

११६ पाठक, अ. शं. जगत्तुंग समुद्र : राष्ट्रकुटांची एक निर्मिती, **संशोधक,** (वि. का. राजवाडे, संशोधन मंडळाचे त्रैमासिक यातील लेख), वर्ष ५९, अंक १-२, धुळे, १९९१, पृ. ११ ते २१.

११७ **इतिहास आणि संस्कृती,** १९८९, पूर्वोक्त

११८ **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर,** पूर्वोक्त पृ. २५४.

११९ कित्ता, पृ. २५५.

१२० फ्लीट, जे. एफ., **आय. ए.,** खंड-१२, पृ. २१३-७०.

१२१ **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर,** पूर्वोक्त, पृ. २५५.

१२२ कित्ता.

--------

## प्रकरण १०

# कल्याणीचे चालुक्य *

"कल्याणचे चालुक्य" हे या वंशाचे नाव त्यांच्या राजधानीच्या स्थलनामावरून प्राप्त झाले आहे. कल्याण किंवा कल्याणपूर हे नगर बसवकल्याण या नावाने ओळखले जाते. महाराष्ट्र-कर्नाटकाच्या सरहद्दीवरील हे स्थान कर्नाटक राज्याच्या बिदर जिल्ह्यातील आहे. कल्याणी ऐवजी काहीवेळा कल्याणचे चालुक्य अशी नोंद मिळते ती योग्य ठरते. त्यामुळे कल्याणचे हेच योग्य नामाभिधान होय.

कल्याणचे चालुक्य हे वातापी किंवा बदामीच्या चालुक्यांचे वंशज होत ही बाब आता सर्वमान्य झाली आहे. डॉ. जे. एफ. फ्लीट,[१] रा. गो. भांडारकर[२] आणि अ. स. आळतेकर[३] यांच्यासारख्या गेल्या पिढीतील संशोधकांना हे मत मान्य नव्हते. परंतु यासाठी त्यांनी जी कारणे दिली आहेत ती पटणारी नाहीत. उदाहरणार्थ आळतेकरांनी असे मत मांडले आहे की, कल्याणच्या चालुक्यांचे "त्रिभुवनमल्ल" हे बिरुद बदामीच्या चालुक्यांनी लावलेले नव्हते. परंतु मग वेंगी आणि वेमुलवाड्याच्या चालुक्य शाखांतील राजे लावीत असलेले "युद्धमल्ल" हे बिरुदही बदामीच्या चालुक्य राजांच्या वापरात नव्हते. तरीही या दोन्ही शाखांचा रक्तसंबंध बदामीच्या चालुक्यांशी होता हे या विद्वानांना मान्य होते. उलट बदामीच्या चालुक्यांचे "सत्याश्रय" हे बिरुद कल्याणच्या चालुक्य राजांनी धारण केले ही बाब त्यांचे वांशिक संबंध दर्शविते.

फ्लीट आणि भांडारकर यांना या दोन राजवटींच्या मध्ये दोन शतकांहून अधिक काळ असलेले अंतर ही बाब आक्षेपार्ह वाटते (इ. स. ७५७ ते इ. स. ९७३). या कालावधीत कल्याणच्या चालुक्य वंशात फक्त सात पिढ्या झाल्या. प्रत्येक पिढीतील राजाचा सरासरी ३२ वर्षांचा राज्यकाल हा त्यांना वाजवीपेक्षा अधिक वाटतो. परंतु डॉ. एस्. एल. कटारे यांनी स्पष्ट केले आहे की,[४] माळव्याचे परमार आणि गुजरातचे चालुक्य या समकालीन राजवंशातील राजांच्या कारकिर्दी अनुक्रमे ३३ आणि ३८ वर्षांच्या होत्या. सारांश, कल्याणचे चालुक्य हे बदामीच्या चालुक्याचे वंशज होते हे सिद्ध होते.

कल्याणच्या चालुक्यांच्या कवठे, येऊर, निळगुंड आणि मिरज कोरीव लेखातील माहितीनुसार इ. स. ९७३ मध्ये राष्ट्रकूट दुसऱ्या कर्काला पदच्युत करणारा चालुक्य दुसरा तैल हा चालुक्य चौथ्या विक्रमादित्याचा पुत्र होता व विक्रमादित्य चौथा हा बदामीचा चालुक्य राजा दुसरा विक्रमादित्य (इ. स. ७३४ ते ७४४) याचा भाऊ भीम उर्फ भीम पराक्रम चालुक्य याचा सातवा वंशज होता.[५] कवि बिल्हण रचित "विक्रमांकदेवचरित्रम" या संस्कृत ग्रंथात व रण्ण याच्या "गदायुद्ध" या कन्नड

* या प्रकरणाचे मूळ इंग्रजी लेखन डॉ. एस्. जे. मंगलम् (प्राध्यापक, पुरातत्व विभाग, डेक्कन महाविद्यालय, पुणे) यांनी केलेले असून त्याचा मराठी अनुवाद डॉ. हरिहर ठोसर (निवृत्त प्रपाठक, इतिहास विभाग प्रमुख, एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई) यांनी केला आहे.

काव्यात बदामीच्या चालुक्यांना कल्याणच्या चालुक्यांशी जोडणारी सलग वंशावळ देण्यात आलेली आहे. पुराभिलेख आणि वाङ्मयीन साधनात या दोन्ही राजवंशांना परस्परांशी जोडणारी वंशावळ या प्रकरणाचे शेवटी दिली आहे.

## पूर्वेतिहास

बदामीचा चालुक्य राजा दुसरा कीर्तिवर्मन आणि कल्याणच्या चालुक्य राजवंशाचा संस्थापक दुसरा तैल यांच्या दरम्यानच्या काळात चालुक्य वंशातील उपशाखातील अनेक शासकांनी राष्ट्रकुटांचे मांडलिक म्हणून दक्षिणेतील विविध प्रदेशांचे शासन चालविले.[६] उदाहरणार्थ राष्ट्रकूट तिसऱ्या गोविंदाच्या कारकिर्दीत चालुक्य बलवर्मनचा पौत्र आणि यशोवर्मनचा पुत्र विमलादित्य हा इ. स. ८१२ मध्ये कुमिंगिल देशाचे शासन चालवीत होता.[७] राष्ट्रकूट तिसऱ्या इंद्राच्या कारकिर्दीत चालुक्य बलवर्मन हा एका प्रांतांचा शासक होता.[८] राष्ट्रकूट तिसऱ्या कृष्णाच्या कारकिर्दीत महासामंत चालुक्य काटयेन्न हा कर्नाटकातील बेल्लारी जिल्ह्यातील कोगल्ली-५०० आणि मसियवाडी-१४० या प्रभागांचा शासक होता.[९] राष्ट्रकुटांचे एकनिष्ट मांडलिक म्हणून वेमुलवाडा येथील चालुक्य सामंतांचा उल्लेख कित्येक कोरीव लेखात आढळतो.[१०]

कल्याणच्या चालुक्य राजवंशाचा संस्थापक दुसरा तैल याचे वर उल्लेखिलेले पूर्वजही राष्ट्रकुटांच्या राजवटीत त्यांचे मांडलिक म्हणून विविध विभागांचे शासक होते. त्यापैकी काहींनी राष्ट्रकुटांशी व इतर राजवंशाशी वैवाहिक संबंध जोडले होते. उदाहरणार्थ चालुक्य दुसऱ्या भीमाचा पुत्र पहिला अय्यन याने राष्ट्रकूट दुसऱ्या कृष्णाच्या राजकन्येशी विवाह केला होता.[११] अय्यनाचा पुत्र चौथा विक्रमादित्य याचा विवाह त्रिपुरी येथील कलचुरी राजा लक्ष्मण राज याची कन्या बोंथादेवी हिच्याशी झाला होता.[१२]. राष्ट्रकूट आणि कलचुरी राजवंशाशी झालेल्या वैवाहिक संबंधामुळे या चालुक्य राजवंश शाखेच्या राजकीय प्रतिष्टेत भर पडली.

तैलाचे पूर्वज मोठी राजबिरुदे धारण करून इतर मांडलिकांना प्रदेश दान करण्याइतपत शक्तिशाली झाल्याने समकालीन कोरीव लेखावरून दिसून येते. उदाहरणार्थ सोंदेकोल येथील इ. स. ९७० मधील एका कोरीव लेखानुसार दुसऱ्या तैलाचा पिता चौथा विक्रमादित्य याने महाराजाधिराज, परमेश्वर आणि परमभट्टारक अशी सार्वभौमत्वाचे निदर्शक असलेली बिरुदे धारण करून चालुक्य पंदरस नामक अधिकाऱ्यास कदंबलिगे हा प्रदेश इनाम म्हणून दिला होता.[१३] दुसऱ्या एका शिलालेखानुसार हाच चालुक्य पंदरस कदंबलिगे १००० या विभागाचे प्रशासन राष्ट्रकूट राजा खोटिग नित्यवर्ष याच्या वतीने चालवीत होता. या लेखाचा काळ इ. स. ९६८ असा आहे.[१४] यावरून हे स्पष्ट होते की इ. स. ९६८ ते ९७० या कालावधीत चालुक्य चौथा विक्रमादित्य याने कदंबलिगे १००० हा प्रदेश जिंकून घेतला व तो पंदरसास बहाल करून त्याला आपली राजकीय निष्ठा बदलण्यास भाग

पाडले. राष्ट्रकूट सत्तेस आव्हान देण्याची सुरुवात अशा प्रकारे विक्रमादित्याने तैलाच्या पूर्वीच केली होती.

मध्यंतरीच्या काळात राष्ट्रकूट तिसऱ्या कृष्णाद्वारे पराभूत झालेला माळव्याचा परमार राजा सियक हा आपल्या अपमानाचा बदला घेण्याच्या संधीची वाट पहात होता. इ. स. ९७२ मध्ये त्याने मालखेडवर स्वारी करून ते लुटले. याचा आघात सहन न होऊन वृद्ध खोटिग मरण पावला व त्याचा पुतण्या दुसरा कर्क राज्यावर बसला. तो दुबळा आणि चैनी होता.[१५] त्यामुळे तो राष्ट्रकूट राज्याची दुरवस्था थांबवू शकला नाही. त्यात भर पडली सामंतांच्या बंडखोरीची अशा सामंतात गंग मारसिंह हा प्रमुख होता.

. राष्ट्रकूट तिसऱ्या कृष्णाचा नातू इंद्र हा खोटिगानंतर राष्ट्रकूट सिंहासनाचा दावेदार असून गंग मारसिंह त्याचा मामा होता. त्यामुळे मारसिंहाने कर्काच्या विरुद्ध उघड बंडखोरी केली. तिसऱ्या कृष्णाने राष्ट्रकुटांचे पिढीजात सोयरे आणि मित्र असलेल्या त्रिपुरीच्या कलचुरीविरुद्ध आगळीक करून त्यांचे शत्रुत्व विकत घेतले होते. त्यामुळे राष्ट्रकुटांच्या पडत्या काळात ते कलचुरींच्या सहानुभूतीस पारखे झाले. उलट उदयोन्मुख चालुक्य तैल हा कलचुरी राजकन्येचा. पुत्र असल्यामुळे कलचुरींनी आपले वजन चालुक्यांच्या पारड्यात टाकले. त्यामुळे दुसऱ्या तैलास राष्ट्रकूट दुसऱ्या कर्कास पदच्युत करून चालुक्य सत्तेची पुनःस्थापना करण्याच्या कामी कलचुरींची सहानुभूती मिळाली.

**चालुक्य दुसरा तैल :** करजोल येथील कोरीव लेखातील माहितीनुसार चालुक्य राज्यसंस्थापक दुसरा तैल याने इ. स. ९५६ च्या सुमारास राष्ट्रकूट तिसऱ्या कृष्णाचा मांडलिक म्हणून आपल्या राजकीय जीवनाची सुरुवात केली.[१६] त्यानंतर तो तारदावाडी १००० या मोठ्या प्रदेशाचा शासक झाला व महासामंताधिपती हे बिरुद प्राप्त करण्याइतपत त्याला बढती मिळाली.[१७] दोन शतकांपूर्वी आपल्या पूर्वजांकडून राष्ट्रकुटांनी सत्ता हस्तगत केली होती हे शल्य त्याच्या मनास बोचत होते. राष्ट्रकूट सत्तेस उतरती कळा लागल्याचा फायदा घेऊन त्यांना सत्ता भ्रष्ट करून चालुक्य सत्तेची पुनर्स्थापना करून आपल्या वंशास गतवैभव प्राप्त करून देण्याची महत्त्वाकांक्षा त्याला होती. त्याने त्रिपुरीच्या कलचुरींची सहानुभूती मिळवून व यादवभिल्लम यांच्या सारख्या राष्ट्रकुटांच्या इतर सामंताना आणि प्रांतिक प्रशासकांना आपल्या बाजूस वळवून आपले स्थान अधिक बळकट केले.[१८]

राष्ट्रकूट दुसरा कर्क आणि चालुक्य दुसरा तैल यांच्यातील शेवटचा निकराचा संघर्ष इ. स. ९७३ मध्ये उत्तर कर्नाटकात झाला. या निर्णायक संघर्षाचे वर्णन स्वतः तैलाने करून ठेवले आहे.[१९] या लढाईत कर्काचा संपूर्ण पराभव होऊन त्याने

दक्षिण कर्नाटकात पलायन केले व एका छोट्या प्रदेशाचा शासक म्हणून नोसोराब तालुक्यात राहू लागला.[२०] राष्ट्रकुटांची सत्ता नष्ट करून विजयी तैलाने राजधानी मालखेडमध्ये प्रवेश केला व दक्षिणेचा सार्वभौम शासक म्हणून तेथून राज्यकारभार सुरू केला.

राष्ट्रकुटांची सत्ता आणि संपत्ती नष्ट होऊन कर्काने दक्षिणेत पलायन केल्यानंतर देखील तिसऱ्या कृष्णाचा नातू चौथा इंद्र याच्यासारख्या राष्ट्रकूट सिंहासनाच्या दावेदारांनी गंग मारसिंहाच्या मदतीने तैलास आव्हान दिले. परंतु त्यांच्या प्रयत्नास यश न आल्यामुळे शेवटी त्यांनी संन्यास घेतला.[२१] मारसिंहानंतर त्याचा उत्तराधिकारी गंग पांचालदेव याने तैलाविरुद्ध बंडखोरी केली, परंतु तीही तैलाने असफल केली.[२२] अशा रीतीने इ. स. ९७३ मध्ये आपल्या सर्व विरोधकांना नामशेष करून तैल राष्ट्रकूट सत्तेचा संपूर्ण शेवट करून दक्षिणेचा सम्राट बनला. त्याने राष्ट्रकुटांविरुद्ध मिळविलेल्या निर्णायक विजयाचे वर्णन त्याच्या नंतरच्या चालुक्य राजांच्या आणि चालुक्य सामंतांच्या कोरीव लेखात सविस्तर करण्यात आलेले आहे.[२३]

सत्ताप्राप्तीनंतर तैलाने महाराजाधिराज, परमेश्वर, परमभट्टारक आणि समस्तभुवनाश्रय ही सार्वभौमत्व दर्शक व भुजवल वीरनारायण, भुवनैकमल आणि आहवमल्ल ही पराक्रम दर्शक बिरुदे धारण केली.[२४] राष्ट्रकुटांच्या जवळजवळ सर्व सामंतांनी तैलाचे सार्वभौमत्व स्वीकारले. अशा प्रमुख सामंतात यादव, कदंब, सिंद रट्ट, मत्तूर आणि काही राष्ट्रकुटांच्या उपशाखातील प्रमुखांचा समावेश होता. अशा राष्ट्रकूट प्रमुखात भम्मह हा विशेष उल्लेखनीय असून तो तैलाचा श्वशुर आणि बनवासी–१२००० व इतर प्रभागांचा सामंत होता.[२५] नोलंब आणि शिलाहार सामंतांनी सुरुवातीस तैलास विरोध केला परंतु तैलाने बळाचा वापर करून त्यांनाही आपल्या अंकित केले.[२६]

गंगवाडी–९६००० चा सामंत व मारसिंहाचा उत्तराधिकारी गंग पांचालदेव याने केलेल्या बंडाचा तैलाने बीमोड केल्याचे वर्णन वर आलेले आहेच. परंतु पांचालदेवाने पुन्हा तैलाविरुद्ध उठाव केला आणि गंगवाडी–९६००० च्या शिवाय नोलम्बवाडी–३२०००, पुलिगेरे–३०० आणि बेलहोळ–३०० हे प्रांत आपल्या ताब्यात घेऊन तो स्वतंत्र शासक म्हणून कारभार करू लागला.[२७] त्यामुळे तैलाला पांचालदेवाविरुद्ध पुन्हा मोहीम हाती घ्यावी लागली. या मोहिमेचे नेतृत्व तैलाने आपला विश्वासू सेनानी नागदेव याच्या सुपूर्त केले. नागदेवाने पांचालदेवाचा संपूर्ण पराभव करून त्याच्या सैन्यास गुराढोराप्रमाणे रणांगणावरून पिटाळून लावले.[२८] नागदेवाच्या या विजयाचे स्मारक म्हणून आपली राणी अत्तियब्बे हिच्या विनंतीवरून तैलाने धारवाड जिल्ह्यातील लोक्किगुण्डी (आजचे लकुण्डी) येथे एक जैन बसती बांधली.[२९] पांचालदेवाप्रमाणे आणखी एक गंग प्रमुख गोविंदर याने इतर सामंतांना हाताशी धरून तैलाच्या सत्तेस दिलेले आव्हानही तैलाने आपल्या सैन्यबळावर अयशस्वी ठरविले.[३०]

पांचाल आणि गोविंदर या दोन गंग बंडखोरांना नामोहरम करून तैलाने दक्षिण कर्नाटकावर आपली पकड मजबूत केली व नंतर त्याने आपले लक्ष उत्तरेकडे

वळविले. कारण या भागातील राष्ट्रकुटांचे सामंत अजूनही तैलास पूर्णतया शरण आले नव्हते. कोकणातील शिलाहार सामंत अपराजित याने आपल्या भाडणे ताम्रशासनात राष्ट्रकूट सत्तेचा शेवट झाल्याचा उल्लेख केला आहे. परंतु त्याने तैल चालुक्यास आपला सार्वभौम मानलेले नाही.[३१] तैलाने युवराज सत्याश्रयाच्या नेतृत्वाखाली कोकणावर स्वारी केली. सत्याश्रयाने अपराजिताचा संपूर्ण पराभव करून त्याला राजबंदी बनविले व चालुक्यांचे स्वामित्व स्वीकारल्यावर त्याची सुटका केली.

राष्टकूट तिसऱ्या कृष्णाने दक्षिणेतील चोलांचा पराभव करून तामिळनाडूवर आपले स्वामित्व प्रस्थापित केले होते. राष्ट्रकुटांच्या पतनानंतर चोलांनी आपला प्रदेश मुक्त करून राष्ट्रकुटांच्या राज्यातील प्रदेशावर स्वाऱ्या सुरू केल्या व काही सरहद्दीवरील प्रदेश आपल्या ताब्यात घेतला होता. चालुक्यांच्या कोरीव लेखावरून असे दिसते की तैलाने चोलांचा प्रयत्न असफल करून त्यांच्या सैन्यास आपल्या प्रदेशात पिटाळून लावले.[३२] एवढेच नव्हे तर चालुक्य सामंतांनी कांचीवरही स्वारी केली. नोलंब–पल्लव, परमांडीदेव या तैलाच्या सामंताने "कांचीचा अधिपती" असे आपले वर्णन एका कोरीव लेखात केले आहे,[३३] यावरून हे सिद्ध होते. कदम्ब सामंत आदित्यवर्मन याने पूर्वी राष्ट्रकूट तिसऱ्या कृष्णाद्वारे दिलेले आपल्या प्रदेशातील ग्रामदान रद्द करून आपली स्वतंत्र सत्ता प्रस्थापित करण्याचा केलेला प्रयत्नही तैलाने हाणून पाडला व त्या ग्रामदानाचे नूतनीकरण केले.[३४] यावरून नोलंब आणि कदंब सामंतांनी तैलाचे स्वामित्व स्वीकारल्याचे सिद्ध होते. तैलाचे सेनानी धल्ल आणि नागदेव यांनी वेंगीवर विजय मिळवीला.[३५] परंतु या विजयाची सविस्तर माहिती उपलब्ध नाही.

माळव्याचे परमार हे राष्ट्रकुटांचे जुने शत्रू असल्यामुळे राष्ट्रकुटांच्या पतनाचा त्यांना आनंद वाटणे स्वाभाविक होते. परंतु चालुक्यांच्या रुपाने दुसऱ्या शत्रूचा उदयही त्यांना खपणारा नव्हता. त्यामुळे त्यांनी चालुक्यांविरुद्ध कारस्थाने सुरू केली. त्यामुळे तैलास परमाराविरुद्ध आघाडी उघडावी लागली. समकालीन दस्तऐवजानुसार चालुक्य आणि परमार यांच्यात अनेक लढाया होऊन विजयाचे पारडे सतत दोलायमान राहिले. परंतु तैलाने शेवटी परमार सैन्याचा पराभव करून वाक्पती मुंज परमारास राजबंदी बनवून त्याचा वध केला.[३६] लाट किंवा दक्षिण गुजरात हा पूर्वी राष्ट्रकुटांच्या ताब्यात असलेला प्रदेश तैलाने जिंकल्याची नोंद इ. स. ९८० मधील सोगल येथील शिलालेखात आढळते. तैलाने चालुक्य बारप्पा याची लाट देशाचा शासक म्हणून नियुक्ती केली.[३७] बारप्पाचे वंशज तेथील शासन चालवीत असल्याची माहिती त्यांच्या कोरीव लेखावरून मिळते.

कल्याणच्या चालुक्य राजवंशाचा पहिला राजा दुसरा तैल याने अशा रीतीने सैनिकी विजय आणि मुत्सद्देगिरीद्वारा उत्तरेत दक्षिण गुजरातपासून दक्षिणेस चित्रदुर्ग-शिमोग्यापर्यंत विशाल साम्राज्य निमार्ण केले. तैलाला आपली राणी जाकब्बे

हिच्यापासून झालेले सत्याश्रय आणि दशवर्मन असे दोन पुत्र होते. दशवर्मन[३८] हा काही प्रदेशांचा शासक होता व ज्येष्ठ पुत्र म्हणून सत्याश्रय हा इ. स. ९९७ च्या सुमारास तैलाचा उत्तराधिकारी झाला.[३९]

**सत्याश्रय :** दुसऱ्या तैलाचा उत्तराधिकारी सत्याश्रय याने आपल्या राज्यारोहणाच्या वेळी इरिवबेडंग, आहवमल्ल, अकलंकचरित इत्यादी बिरुदे धारण केली होती.[४०]

इ. स. ९८५ मध्ये चोल साम्राज्यात राजराज महान हा उत्तम चोलाचा उत्तराधिकारी म्हणून राज्यावर आला. राजराजाने दक्षिण भारतावर आणि दक्षिणेकडील सागरपार प्रदेशावर आपले वर्चस्व प्रस्थापित करून चोल साम्राज्यास वैभव आणि प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. त्यानंतर उत्तरेकडील नोलम्ब आणि कल्याणचे चालुक्य यांच्याविरुद्धच्या मोहिमांचा महत्त्वाकांक्षी कार्यक्रम त्याने हाती घेतला. इ. स. ९९७ मध्ये त्याने नोलंबांचा पराभव केला व त्यापाटोपाठ इ. स. १००४ मध्ये तलकडच्या गंगांना नेस्तनाबूत केले. त्यामुळे त्याच्या राज्याची उत्तर सीमा कल्याणच्या चालुक्यांच्या राज्यास भिडली. त्यानंतर राजराजाने कल्याणच्या चालुक्यांच्या प्रदेशावर स्वाऱ्या सुरू केल्या. होट्टर शिलालेखात चोल आक्रमण व त्याच्या संहारक परिणामांचे सविस्तर वर्णन करण्यात आले आहे. तुंगभद्रा नदीपर्यंतचा प्रदेश चोलांनी पादाक्रांत केला. सत्याश्रयाने चोलांचा प्रतिकार करून त्यांच्या सैन्यास तुंगभद्रेच्या दक्षिणेस रोखून धरले.[४१]

काही कोरीव लेखातील माहितीनुसार सत्याश्रयाने चोलांविरुद्ध आक्रमक पवित्रा घेऊन त्यांना आपल्या प्रदेशातून हद्दपार करण्याचा प्रयत्न देखील केला.[४२] परंतु ही माहिती संदिग्ध आहे. सत्याश्रयाच्या काळातील कोरीव लेखानुसार गंगय्यारस बय्यलनम्बी, गुणगरस आणि अरसपय्य हे चालुक्यांचे मांडलिक म्हणून कल्याणचे चालुक्य व वेंगीचे चालुक्य यांच्या राज्यामधील प्रदेशावर राज्य करीत होते.[४३] यावरून सत्याश्रयाने चोलांचे आक्रमण परतवून लावल्याचे सिद्ध होते. नागदेवाचा पुत्र पडेवल तैल आणि शोभनरस हे सत्याश्रयाचे आणखी विश्वासू सेनानी आणि सामंत होते.[४४]

सत्याश्रयाचा पुत्र कुण्डराज आणि त्याच्या भावाची कन्या आक्कादेवी विविध प्रदेशाचे प्रशासन चालवीत होत्या. आक्कादेवी सत्याश्रयाच्या नंतरच्या काळात देखील प्रशासक म्हणून आपल्या प्रदेशाचा कारभार पहात होती. कुण्डराजाच्या ताब्यात बनवाशी–१२००० आणि सातलिगे हे प्रदेश होते. अशा प्रकारे चोलांच्या आक्रमणास प्रतिकार करून नव्याने स्थापन झालेले कल्याणच्या चालुक्यांचे राज्य कायम टिकविण्यात सत्याश्रय यशस्वी झाला.

सत्याश्रयाचा मुलगा कुण्डराज हा आपल्या पित्यांनतर राजा होण्याऐवजी बनवासीचा शासक म्हणून का राहिला याच्या मागील कारण ज्ञात नाही. आपल्या तिन्ही चुलतभावांच्या कारकिर्दीत तो आपल्या पदावर कायम होता.

सत्याश्रयाचा धाकटा भाऊ दशवर्मन हा बहुधा त्याच्या कारकिर्दीत मृत्यू पावला. दशवर्मनला पाचवा विक्रमादित्य, दुसरा अय्यन आणि दुसरा जयसिंह असे तीन पुत्र होते. सत्याश्रयाच्या मृत्यूनंतर इ. स. १००८ च्या सुमारास त्याचा पुतण्या आणि दशवर्मनचा पुत्र पाचवा विक्रमादित्य हा चालुक्य राज्याच्या सिंहासनावर विराजमान झाला. दशवर्मनची कन्या अक्कादेवी हिच्याविषयीचा उल्लेख वर आलेला आहे.

सत्याश्रयाचा उत्तराधिकारी पाचवा विक्रमादित्य याचे राज्यारोहण इ. स. १००८ ते १००९ या कालावधीत झाले. त्याने त्रिभुवनमल्ल आणि वल्लभनरेंद्र ही बिरुदे धारण केली होती. त्याच्या कारकिर्दीत सत्याश्रयाचा पुत्र कुण्डराज आणि बहीण आक्कादेवी यांनी विक्रमादित्याच्या मार्गात अडथळे न आणता प्रांतिक प्रशासक म्हणून रहाणे पसंत केले. विक्रमादित्याच्या कारकिर्दीची शेवटची ज्ञात तिथी ८ ऑक्टोबर १०१३ ही आहे.[४५] यावरून त्याची कारकीर्द अल्पकालीन होती असे दिसते. त्याच्या नंतर त्याचा भाऊ दुसरा अय्यन हा राज्यावर आला. त्याचे नाव विक्रमांकदेवचरितम् ग्रंथातील व बऱ्याचशा कोरीव लेखातील चालुक्य राजवंशावळीतून वगळण्यात आलेले आहे. परंतु त्याच्या नावाचा समावेश चालुक्य वंशावळीत करणारे कोरीव लेखही बरेच आहेत.[४६] यावरून पाचवा विक्रमादित्य आणि दुसरा जयसिंह यांच्या दरम्यानच्या अल्पकाळात दुसऱ्या अय्यनाने राज्य केले हे सिद्ध होते. त्याला बहुधा दोनच वर्षांची कारकीर्द लाभली. कारण त्याचा उत्तराधिकारी दुसऱ्या जयसिंहाचे राज्यारोहण इ. स. १०१५ मध्ये झाले होते.[४७] जयसिंहाच्या काळातील एका कोरीव लेखातील त्याच्या विशेषणावरून त्याने अय्यनास पदच्युत करून राज्यसिंहासन मिळविले असे काही इतिहासकार मानतात.[४८]

**दुसरा जयसिंह :** दुसऱ्या जयसिंहाने आपल्या राज्यारोहणानंतर जगदेकमल्ल, विक्रमसिंह आणि मालिकामोद ही बिरुदे धारण केली होती. जयसिंहास शत्रूंच्या अनेक भयानक आक्रमाणास तोंड द्यावे लागले. राजेंद्र चोलाने चालुक्य राज्यावरील स्वाऱ्या चालूच ठेवल्या होत्या. इ. स. १०१७–१८ मध्ये जयसिंहास मसंगी (मस्की, जिल्हा रायचूर) एडेडोर–२०००, बनवासी, कोल्लीपक (हैद्राबाद जवळील कुल्पक) आणि मान्यखेर (राजधानी मालखेड जिल्हा गुलबर्गा) येथील लढायांत हार पत्करावी लागली.[४९] परंतु शेवटी जयसिंहाने चोलांच्या सैन्यास पराभूत करून त्यांच्या ताब्यातील आपला प्रदेश परत जिंकून घेतला.[५०] इ. स. १०२४ च्या सुमारास चोलांनी परत चालुक्य राज्यावर आक्रमण करून गंगवाडी–९६००० हा प्रदेश पादाक्रांत केला. परंतु जयसिंहाने चोल सैन्यास मागे रेटून तो मुक्त केला.

जयसिंह चोलांच्या आक्रमणाचा प्रतिकार करण्यात गुंतल्याचा फायदा घेऊन उत्तरेकडील परमारांनी चालुक्यांविरुद्ध आक्रमक पवित्रा घेतला. तैलाने केलेल्या मुंज परमाराच्या वधाचा सूड घेण्यासाठी परमार भोजाने इ. स. १०१९ मध्ये कोकणावर स्वारी करून त्यावर आपले स्वामित्व प्रस्थापित केले. त्याच्या कोरीव लेखात कोकण विजयाचे वर्णन आलेले आहे.[५१] भोजाचा मांडलिक यशोवर्मन याच्या कळवण शिलालेखातही त्याने कर्नाटक आणि कोकणच्या राजांचा पराभव करून कोकण जिंकल्याची नोंद आढळते.[५२] इ. स. १०२४ मधील जयसिंहाच्या मिरज ताम्रपटानुसार त्याने परमारांच्या सैन्यास पराभूत करून त्यांच्या ताब्यातील उत्तर आणि दक्षिण कोकण परत जिंकून घेतले.[५३]

भोज परमाराविरुद्धच्या मोहिमेत जयसिंहाचा मांडलिक कदंब चट्टैय्य याने अतिशय महत्त्वाची कामगिरी बजावली होती. त्याबद्दल जयसिंहाने ''पठारी प्रदेशाचा संरक्षक'' ही पदवी देऊन त्याचा गौरव केला. परमारांच्या सैन्याशी लढत असताना जयसिंहास उत्तरेकडील आणखी दोन शत्रूंचा मुकाबला करावा लागला. गुजरातचा चौलुक्य राजा भीम आणि त्रिपुरीचा कलचुरी गांगेयदेव यांनी संयुक्त आघाडी करून चालुक्य राज्यावर आक्रमण केले. व गोदावरीच्या दक्षिणेकडील बालाघाटपर्यंतचा प्रदेश व्यापला. जयसिंहाने या आक्रमकांचा पराभव करून त्यांना गोदावरीच्या उत्तरेकडे माघार घेण्यास भाग पाडले.[५४] परमारांच्या विरुद्धच्या मोहिमेत वर उल्लेखिलेल्या चालुक्य कुण्ड राजाचा सासरा बाची याचे देखील मोलाचे सहकार्य लाभले.[५५] या मोहिमा आणि गोदावरीची लढाई इ. स. १०२८ मध्ये झाल्या.[५६]

चोलांच्या ताब्यातून मुक्त केलेल्या गंगवाडी–९६००० या महामंडळाचे प्रशासन जयसिंहाने आपले मांडलिक चोल[५७] महाराज मलिदेव आणि बरम्मदेव यांच्याकडे क्रमाने सुपूर्त केले. काही काळ तो प्रदेश नोलंबवाडी–३२००० मंडलाचा प्रशासक असलेल्या नोलंब–पल्लव जगदेकमल्ल परमाडी उर्फ उदयादित्य याच्या स्वाधीन करण्यात आला होता.[५८] उत्तर कोकणावर शिलाहार छित्तराजदेव हा जयसिंहाचा मांडलिक म्हणून राज्य करीत होता. तर दक्षिण महाराष्ट्र आणि दक्षिण कोकणचे शासन शिलाहार गण्डरादित्य हा जयसिंहाचा सामंत म्हणून चालवीत होता.

जयसिंहाची बहीण अक्कादेवी ही आपला पती कदंब मयूरवर्मन याच्यासह बनवासी–१२००० या प्रभागाचे शासन सांभाळून होती.[५९] राणी सुग्गलादेवीपासून झालेल्या हम्मा उर्फ अव्वलादेवी या आपल्या राजकन्येचा विवाह जयसिंहाने यादव राजा तिसरा भिल्लम याच्याशी लावून दिला होता.[६०] त्याची दुसरी राणी नोलंब घराण्यातील होती.

चोलांच्या सततच्या स्वाऱ्यांमुळे राजधानी मालखेड उध्वस्त झाल्यामुळे जयसिंहाला बहुधा इतरत्र रहावे लागले. त्याच्या कोरीव लेखात होट्टलकेरे, कोलिपक, एटगिरी, तगरिल, विजयपुर आणि घट्टदकेरे या नगरांचा त्याचे वास्तव्यस्थान म्हणून उल्लेख

आढळतो.[६१] त्यापैकी होट्टलकेरेचा उल्लेख सर्वांत अधिक कोरीव लेखात आढळतो. यावरून मालखेड आणि कल्याण या राजधान्यांच्या मध्यंतरीच्या काळात जयसिंहाची राजधानी होट्टलकेरे येथे असून ते शहर म्हणजे आजचे नांदेड जिल्ह्यातील होट्टल होय असे मत काही संशोधकांनी मांडले आहे.[६२] या मतास पुष्टी देणारे पुरातत्वीय अवशेष, स्मारके, मूर्तीशिल्प तसेच सोमेश्वर चालुक्य याचा सन ११२० चा शिलालेख येथे आहे. येथील शिलालेख पूर्वप्रकाशित असून रब्बेश्वर मंदिर, सिद्धेश्वर मंदिर, महादेव मंदिर व पार्वती मंदिर आणि पुष्करणी ही चालुक्यकालीन स्मारके पोट्टल (होट्टल) या टिकाणी अस्तित्वात आहेत. राजधानी म्हणून कल्याणचा पहिला पुराभिलेखीय उल्लेख इ. स. १०३३ मध्ये आढळतो.[६३] त्यानंतरच्या चालुक्यांच्या कोरीव लेखात राजधानी म्हणून कल्याणचा उल्लेख वारंवार आढळतो. २५ एप्रिल १०४२ ही जयसिंहाच्या कारकिर्दीची शेवटची ज्ञात तारीख होय.[६४]

**पहिला सोमेश्वर :** जयसिंहानंतर त्याचा पुत्र पहिला सोमेश्वर हा २३ जानेवारी १०४३ च्या पूर्वी केव्हातरी राज्यावर आला.[६५] त्याने त्रैलोक्यमल्ल, आहवमल्ल, आणि रायनारायण ही बिरुदे धारण केली. त्याला किमान सहा राण्या होत्या.[६६] त्या बहुतेक सामंत घराण्यातील असून त्यांच्यापैकी काही विविध विभागाचे प्रशासन चालवीत होत्या. राणी बचलादेवी हिच्यापासून पहिल्या सोमेश्वरास दुसरा सोमेश्वर आणि सहावा विक्रमादित्य हे दोन पुत्र झाले होते. दुसऱ्या जयसिंहाने कल्याणला राजधानी हालविली असली तरी त्या नगरात विविध इमारती बांधून त्यास राजधानीचे स्वरुप आणि वैभव प्राप्त करून देण्याचे काम पहिल्या सोमेश्वराने केले.

कारकिर्दीच्या सुरुवातीपासूनच पहिल्या सोमेश्वराने आपल्या शत्रूंविरुद्ध आक्रमक धोरण स्वीकारले. पहिला आक्रमक पवित्रा त्याने माळव्याच्या परमाराविरुद्ध घेतला. माळव्याच्या स्वारीत त्याने मंण्डू शहर उध्वस्त केले तर धार आणि उज्जैन शहरे जाळून भस्मसात केली. भोज परमाराने पलायन करून आपली कशीबशी सुटका करून घेतली. चालुक्यांच्या कित्येक कोरीव लेखात सोमेश्वराच्या माळवा विजयाचे व त्याच्या सेनानींनी केलेल्या पराक्रमाचे सविस्तर वर्णन करण्यात आले आहे.[६७]

परंतु दक्षिणेकडून चोलांनी आक्रमक हालचाली सुरू केल्यामुळे सोमेश्वरास माळव्यातून माघार घ्यावी लागली. या संधीचा लाभ घेण्यासाठी गुजरातचा चौलुक्य भीम आणि त्रिपुरीचा कलचुरी कर्ण यांनी संगनमत करून माळव्यावर स्वारी केली. त्यांचा प्रतिकार करीत असताना भोज परमार ठार झाला. परंतु माळव्याचा जिंकलेला प्रदेश आपापसात वाटून घेण्याच्या प्रश्नावरून भीम आणि कर्ण यांच्यात तंटा उद्भवला. भीमाने कर्णास आपल्या राज्यात परत जाण्यास भाग पाडले व संपूर्ण माळव्यावर आपले स्वामित्व प्रस्थापित केले. अशा परिस्थितीत भोजाचा उत्तराधिकारी जयसिंह परमार याने भीमाविरुद्ध पहिल्या सोमेश्वराकडे मदतीसाठी याचना केली. चोल आक्रमणाशी सामना देत असताना माळव्याशी मैत्री उपयुक्त ठरेल या भावनेतून

सोमेश्वराने परमार जयसिंहाच्या मदतीस परत आपले सैन्य पाठविले आणि चौलुक्य भीमास पराभूत करून जयसिंहास माळव्याचे राज्य मिळवून दिले.[६८]

चालुक्यांचे सैन्य माळव्यात गुंतले असताना चोल पहिला राजाधिराज याने चालुक्याकडून गंगवाडी जिंकून घेण्यासाठी स्वारी केली. केल्लिपक (हैद्राबाद जवळील कुल्पक) येथे चोल आणि चालुक्य सैन्यात घनघोर लढाई झाली. चोलांनी कुल्पक नगर जाळून टाकले. त्यापाटोपाट चालुक्यांची निवासी राजधानी असलेले काम्पिली नगरही जाळण्यात आले. चालुक्यांच्या कित्येक सामंतास चोल सैन्याने पराभूत केले. चालुक्यांवरील चोलांच्या विजयाचे सविस्तर वर्णन चोलांच्या कोरीव लेखात करण्यात आले आहे.[६९] याउलट चालुक्यांच्या कोरीव लेखातील वर्णनावरून चोलांना या आक्रमणाचा फारसा फायदा झाला नाही असे ध्वनित होते.[७०] शत्रूचे आक्रमण परतवून लावण्यासाठी व त्यांनी केलेल्या विनाशाचा सूड घेण्यासाठी पहिल्या सोमेश्वराने चोलांविरुद्ध अधिक आक्रमक पवित्रा घेतला. चोलांची राजधानी जाळून उध्वस्त केली व चोल राजाचे धडावेगळे केलेले शीर तो घेऊन आला.[७१] चोल आणि चालुक्य यांच्यातील निकराचा संघर्ष चालूच राहिला व दोन्ही बाजूंनी हानी होत राहिली.

वेंगीच्या चालुक्यांनी कल्याणच्या चालुक्यांविरुद्ध चोलास मदत केली होती. त्यामुळे सोमेश्वराने युवराज सहावा विक्रमादित्य व जयसिंह परमार यांच्या नेतृत्वाखाली वेंगीवर स्वारी केली. परमार जयसिंहाने उत्तरेकडून आणि विक्रमादित्याने पश्चिमेकडून एकाचवेळी वेंगीवर केलेले आक्रमण राजेंद्र चोलाने परतवून लावले.[७२] इ. स. १०६४ मध्ये चोल आणि चालुक्य सैन्यात कुडलसंगम येथे भयानक लढाई झाली. हे टिकाण बेळगाव जिल्ह्यातील कोप्पलपासून जवळच आहे. कोप्पलच्या रणभूमीवर दहा वर्षांपूर्वी चालुक्य आणि चोल सैन्यात अशीच निकराची लढाई झाली होती.[७३]

चालुक्यांच्या काही कोरीव लेखानुसार पहिल्या सोमेश्वराने उत्तर भारतातील कान्यकुब्ज उर्फ कनोजवर स्वारी केली होती.[७४] त्यावेळी भुवनपाल पुत्र गोपाल हा दुर्बल राजा कनोजच्या गादीवर होता. त्याशिवाय लाट, कलिंग, गंग, करहाट, तुरुष्क, वराळ, चोल, कर्नाट, सौराष्ट्र, मालव, दशार्ण, केरल, आकीर, पांचाल, कोकण, मलय, पुन्नात, शक, नेपाल, पाण्ड्य, चेर, गुर्जर आणि अंग देशांच्या विजयाचे श्रेय काही लेखात पहिल्या सोमेश्वरास देण्यात आलेले आहे. बिल्हणाने सोमेश्वरास कामरुप, केरळ, चोल, मालव, गौड, द्राविड, वेंगी आणि कोसल देशांच्या विजयाचे श्रेय दिले आहे. हे वर्णन अतिशयोक्त असले तरी या यादीतील बऱ्याचशा राजांविरुद्ध सोमेश्वराने किंवा त्याच्या सामंतांनी विजय संपादन केले होते, हे सत्य नाकारता येत नाही. कामरूप, नेपाळ, अंग, बंग, गौड, मगध, कोसल आणि कलिंग यांच्यासारखे दूरचे प्रदेश जिंकणे शक्य नाही. परंतु बिल्हणाच्या कथनावरून सोमेश्वराने युवराज विक्रमादित्याच्या नेतृत्वाखाली उत्तर आणि ईशान्य भारतावर स्वारी

केली होती. असे दिसते.[७५] कामरुपाचा राजा रत्नपाल याने गुर्जर, गौड, केरल आणि दक्षिणेच्या राजांना पराभूत केल्याचे श्रेय घेतले आहे.[७६] यावेळी म्हणजे अकराव्या शतकाच्या मध्यास कल्याणचे चालुक्य हेच दक्षिणापथाचे अधिपती होते. त्यामुळे चालुक्य आणि कामरुप यांच्यातील संघर्ष कपोल कल्पित नसावा. या स्वारीच्या वेळी विक्रमादित्याच्या सैन्यास कलिंग, कोसल, गौड आणि वंगराज्यातूनच जावे लागले असणार, अर्थात ही स्वारी प्रदेश मिळविण्याऐवजी शक्ति प्रदर्शनासाठी केली होती हे उघडच आहे.

मध्य भारतातील चक्रकूटवर स्वारी करून तेथील राजा धारावर्ष याला १०६० मध्ये पराभूत केल्याचे श्रेयही बिल्हण राजपुत्र विक्रमादित्यास देतो.[७७] राजेंद्र चोल दुसरा याने देखील चक्रकूटवर स्वारी करून विक्रमादित्याचा पराभव केल्याचा व धारावर्षाकडून खंडणी वसूल केल्याचा दावा केला आहे.[७८]

अशा प्रकारे पहिल्या सोमेश्वराची कारकीर्द घटनापूर्ण होती. आपल्या पूर्वाधिकाऱ्याकडून मिळविलेल्या राज्याचा त्याने चारी दिशांना विस्तार केला. राज्य मजबूत करून त्याने त्याचे रुपांतर साम्राज्यात केले. आपल्या पहिल्या राणीपासून झालेल्या दुसरा सोमेश्वर, सहावा विक्रमादित्य आणि चौथा जयसिंह या राजपुत्रांना त्याने विविध प्रांतांचे प्रशासक म्हणून नेमले होते. आपल्या कारकिर्दीच्या अखेरीस तो असाध्य ज्वराने आजारी झाला. यातून बरे होणे अशक्य असल्याचे पाहून सोमेश्वराने कुरुवर्ती हा धार्मिक विधी करून रविवार १० मार्च १०६८ या दिवशी तुंगभद्रा नदीत जलसमाधी घेतली.

**दुसरा सोमेश्वर :** पहिल्या सोमेश्वरानंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र भुवनैकमल्ल उर्फ दुसरा सोमेश्वर हा ११ एप्रिल १०६८ रोजी राज्यावर आला. त्याचा धाकटा भाऊ सहावा विक्रमादित्य याने अनेक विजयी युद्ध मोहिमात चालुक्य सैन्याचे नेतृत्व करून व गंगवाडी–९६०००, नोलम्बवाडी–३२००० व बनवासी–१२००० या सारख्या मोठ्या प्रांतांचा शासक म्हणून आपल्या वडील भावापेक्षा जास्त ख्याती प्राप्त केली होती.[७९] आपला पिता पहिल सोमेश्वर याच्या मृत्यूच्या वेळी, उत्तरक्रियेच्या वेळी व दुसऱ्या सोमेश्वराच्या राज्याभिषेकाच्या वेळी देखील तो राजधानीपासून दूरवरच्या मोहिमेवर होता. राजधानीस परत आल्यावर त्याने मोहिमातील लूट सोमेश्वरास अर्पण करून त्याच्याशी आपली निष्ठा व्यक्त केली. परंतु दोघातील संबंध लवकरच बिघडले. राजधानीत असुरक्षित वाटल्यामुळे विक्रमादित्याने आपला धाकटा भाऊ जयसिंह व आपले सैन्य बरोबर घेतले व दक्षिणेकडे कूच केले. तुंगभद्रा नदीपर्यंत आल्यावर दक्षिणेकडून चोलांचे सैन्य चालून येत असल्याची बातमी विक्रमादित्यास मिळाली. विक्रमादित्याने आपल्या विश्वासू सामंतांच्या सहाय्याने वीर राजेंद्र चोलास तुंगभद्रेच्या पलीकडेच रोखून धरले. विक्रमादित्याच्या जबर प्रतिकारास घाबरून वीर राजेंद्र चोलाने

आपल्या कन्येचा विवाह त्याच्याशी लावून तह केला. चोलांशी झालेल्या वैवाहिक संबंधामुळे विक्रमादित्याची बाजू अधिक भक्कम झाली व दुसऱ्या सोमेश्वरास पदच्युत करून चालुक्य सिंहासन प्राप्त करण्याच्या हालचाली त्याने सुरू केल्या.

विक्रमादित्याचा चोल राजकन्येशी विवाह झाल्यानंतरही चोलांचे चालुक्य प्रदेशावरील आक्रमण चालूच होते. उलट आता विक्रमादित्याने प्रतिकार न केल्यामुळे वीर राजेंद्र चोलाच्या सैन्याने तुंगभद्रा पार करून गुत्ती नगर ताब्यात घेतले. त्या पाठोपाठ तुंगभद्रेवरील काम्पिली नगर जाळून उध्वस्त केले आणि करडीकलचे महत्त्वाचे टाणे जिंकून तिथे आपला विजयध्वजस्तंभ उभारला. सोमेश्वराने आपले घोडदळ पाठवून चोलांच्या सैन्याची आणखी आगेकूच कशीबशी रोखून धरली.[८०] विक्रमादित्य आणि चोलातील वैवाहिक संबंधामुळे सोमेश्वरापुढे नवे आव्हान निर्माण झाल्याची जाणीव त्याला होती. परंतु दुसरा सोमेश्वर आपल्या बंडखोर भावाविरुद्ध कारवाई करू शकत नव्हता. कारण तो मुळातच प्रबळ होता व आता चोलांचे आणि काही चालुक्य सामंतांचेही पाठबळ त्याच्यामागे होते हे सोमेश्वर ओळखून होता. विक्रमादित्याने आता आपल्या भावाविरुद्ध उघड पवित्रा घेतला व स्वतः स्वतंत्र राजा असल्याचे त्याने घोषित केले.[८१] २३ डिसेंबर १०७३ च्या हुलेगुंडी येथील शिलालेखात सहाव्या विक्रमादित्याने स्वतःस सार्वभौम राजा म्हणून घोषित केले व महाराजाधिराज, परमेश्वर, परमभट्टारक आणि त्रिभुवनमल्ल ही सार्वभौमत्व निदर्शक बिरुदे लावली. नोलम्बपल्लव सामंत परमाडी जयसिंहदेव याने देखील त्रैलोक्यमल्ल हे बिरुद धारण करून दुसऱ्या सोमेश्वराऐवजी सहाव्या विक्रमादित्यास आपला स्वामी म्हणून घोषित केले.[८२]

सहाव्या विक्रमादित्यास पराभूत करणे शक्य नसल्यामुळे दुसऱ्या सोमेश्वराने त्याला मदत करणाऱ्या राजांविरुद्ध मोहीम हाती घेतली. माळव्याचा परमार जयसिंह हा विक्रमादित्याचा मित्र असल्यामुळे प्रथम सोमेश्वराने माळव्यावर स्वारी करून जयसिंह परमारास ठार केले.[८३] परंतु जयसिंहाचा उत्तराधिकारी परमार उदयादित्य याने चहमान तिसरा दुर्लभ याच्या मदतीने चालुक्यांचे आक्रमण परतावून लावले.[८४]

इ. स. १०७० च्या सुमारास विक्रमादित्याचा सासरा वीर राजेंद्र चोल मृत्यू पावला व त्याचा पुत्र अधिराजेंद्र विक्रमादित्याच्या सहाय्याने चोल सिंहासनावर बसला. राजिग उर्फ कुलोत्तुंग हा देखील चोलांच्या गादीचा दावेदार होता. विक्रमादित्याची पाठ फिरताच कुलोत्तुंगाने अधिराजेंद्रास ठार करून सिंहासन बळकावले व विक्रमादित्यास आपल्यावर आक्रमण करण्याची संधी न देता त्याने त्याचा पाठलाग सुरू केला. दुसऱ्या सोमेश्वराने या संधीचा फायदा घेण्यासाठी विक्रमादित्याविरुद्ध स्वारी केली. इ. स. १०७६ मध्ये विक्रमादित्य दक्षिणेकडून चोलांच्या व उत्तरेकडून सोमेश्वराच्या सैन्याच्या विळख्यात सापडला. परंतु सहाव्या विक्रमादित्याने दोन्ही शत्रूवर मात केली. कुलोत्तुंगास त्याने माघारी पिटाळले व चालुक्य सैन्यास पराभूत करून खुद्द दुसऱ्या सोमेश्वरास बंदी बनविले. त्यानंतर त्याने आपणास कल्याणचा चालुक्य सम्राट म्हणून घोषित केले.[८५] सोमेश्वराचे पुढे काय झाले ते कळण्यास साधन नाही. २१ फेब्रुवारी १०७६ ही दुसऱ्या सोमेश्वराच्या कारकिर्दीची शेवटची ज्ञात तिथी होय.[८६]

**सहावा विक्रमादित्य** : बस्तर मधील राजपुरा ताम्रपटात पहिल्या सोमेश्वराच्या कारकिर्दीत युवराज विक्रमादित्यानें बजावलेल्या कामगिरीचें सविस्तर वर्णन करण्यात आले आहे.[८७] त्यानुसार विक्रमादित्याने चोलांचा अनेकवेळा पराभव केला व कांची शहर लुटले. शिवाय त्याने माळव्याच्या परमार राजास राजसिंहासन मिळवून दिले. श्रीलंकेवरील स्वारी, केरळच्या राजाचा वध आणि गंग, वेंगी आणि चक्रकोट विजयाचे श्रेयही विक्रमादित्यास देण्यात आले आहे. उपोद्बलक पुराव्यांच्या अभावी वरीलपैकी काही पराक्रम केवळ प्रशस्तीचा भाग असल्याचे गृहीत धरूनही एवढे मात्र मान्य करावेच लागेल की विक्रमादित्याने राज्यारोहणापूर्वी आपली कर्तबगारी सिद्ध केली होती.

इ. स. १०७६ मध्ये आपल्या राज्यारोहणाच्या निमित्ताने सहाव्या विक्रमादित्याने स्वतःचे व आपल्या वंशाचे नाव असलेला चालुक्य विक्रम संवत सुरू केला व आपल्या राज्यात शक संवताऐवजी त्याचा वापर प्रचारात आणला.[८८] चंद्रलेखा उर्फ चंदलादेवी ही सहाव्या विक्रमादित्याची महाराणी होती. कऱ्हाडच्या शिलाहार राजवंशातील या राजकन्येने स्वयंवरासाठी आलेल्या अनेक राजपुत्रांतून विक्रमादित्यास माला अर्पण करून आपला पती म्हणून निवडल्याचे वर्णन बिल्हणाच्या विक्रमांकदेवचरितात आलेले आहे. परंतु त्याला सबळ पुरावा नसल्यामुळे ती बिल्हणाची कविकल्पना देखील असू शकेल. त्रिभुवनमल्ल, परमर्दीराय आणि कलिविक्रम ही बिरुदे सहाव्या विक्रमादित्याने धारण केली होती. काश्मिरी कवि बिल्हण याचा विक्रमादित्य आश्रयदाता होता. बिल्हण विरचित विक्रमांकदेवचरितात विक्रमादित्याच्या व त्याच्या पूर्वजांच्या कारकिर्दीचे वर्णन करण्यात आलेले आहे.

दुसऱ्या सोमेश्वराविरुद्धच्या बंडात आपल्या पाठीशी राहिलेल्या जयसिंह या धाकट्या भावास विक्रमादित्याने बनवासी–१२,००० व इतर प्रदेशाचा शासक बनविले. तसेच त्याला युवराजपद बहाल करून आपला उत्तराधिकारी म्हणून घोषित केले.[८९] परंतु जयसिंहाने नंतर विक्रमादित्याच्या विरुद्ध बंडखोरी केली. यासाठी त्याने आपल्या प्रजेकडून भरमसाट कर वसूल करून अमाप संपत्ती जमा केली. आपले सैन्यबल वाढविले. वन्य जमातीच्या प्रमुखास व चोल राजा कुलोत्तुंगास आपल्या बाजूस वळविले. विक्रमादित्याच्या शांततेच्या आवाहनास न जुमानता त्याने उघड बंडखोरी केली व कृष्णेच्या काठावर युद्धाचा तळ ठोकला. वारंवार केलेल्या शांततेच्या आवाहनास अपयश आल्यामुळे शेवटी विक्रमादित्यास आपल्या भावाविरुद्ध लढणे भाग पडले. प्रारंभी जयसिंहास आपल्या विजयाची खात्री होती व सुरुवातीस त्याला विजय देखील मिळाले. परंतु शेवटी चोल कुलोत्तुंगाची मदत वेळेवर न मिळाल्यामुळे युद्धाचे पारडे विक्रमादित्याच्या बाजूस झुकले व जयसिंहाचा पराभव होऊन त्याला राजबंदी व्हावे लागले.[९०] पुढे त्याचे काय झाले ते अज्ञात आहे.

दुसऱ्या सोमेश्वरास पराभूत केल्यानंतरची दोन वर्षे विक्रमादित्याचे वास्तव्य एटगिरी (यादगीर, जिल्हा रायचूर) येथे होते. आपल्या कारकिर्दीच्या तिसऱ्या वर्षी तो राजधानी कल्याणला आला. त्या अगोदर त्याने इ. स. १०७८-७९ मध्ये उत्तम चोलाने केलेले आक्रमण परतवून लावले.[९१]

सहाव्या विक्रमादित्याने होयसळांनी केलेल्या सेवेचे बक्षीस म्हणून गंगवाडी–९६,००० हा विभाग त्यांच्याकडे सोपविला.[९२] त्यामुळे यापूर्वी नगण्य असलेल्या होयसळ घराण्याचे राजकीय महत्त्व वाढले. चक्रकोट आणि काकतीयांवरील मोहिमेत जगद्‌देव परमाराने केलेल्या महत्त्वपूर्ण कामगिरीबद्दल विक्रमादित्याने त्यास गोदावरीच्या उत्तरेकडील प्रदेश बहाल केला होता. इ. स. १०९४ च्या पूर्वी होयसळांनी जगद्‌देव परमाराच्या प्रदेशावर आक्रमण केले. या संघर्षात होयसळ आणि परमार हे दोघेही विजयाचे श्रेय आपणाकडे घेतात.[९३] परंतु या घटनेद्वारे होयसळांनी विक्रमादित्याच्या सत्तेस आव्हान देऊन आपली राजकीय महत्त्वाकांक्षा स्पष्ट केली. इ. स. १०४७ ते १०९८ या काळात होयसळ विनयादित्याने राज्य केले. त्याच्यानंतर त्याचा मुलगा एरेयंगदेव याने इ. स. १०९८ ते ११०२ राज्य केले. त्याच्यानंतर एरेयंगदेवाचे पुत्र पहिला बल्लाळ (इ. स. ११०२ ते ११०८) व बिट्टिग उर्फ विष्णुवर्धन (इ. स. ११०८ ते ११५२) हे राज्यावर आले.[९४] या दोघांनी सहाव्या विक्रमादित्याप्रमाणे त्रिभुवनमल्ल हे बिरुद धारण करून त्याची बरोबरी करण्याचा प्रयत्न केला. तसेच त्यांनी स्वाऱ्या करून आपल्या राज्याचा बराच विस्तार केला. पहिल्या बल्लाळाने गंगवाडी–९६,००० च्या शिवाय नोलम्बवाडी–३२,०००, हानुंगल–५०० हे प्रदेश आपल्या प्रशासनाखाली आणले. विष्णुवर्धनाने चोल आणि चालुक्य राज्यांच्या प्रदेशावर स्वाऱ्या करून आणखी प्रदेश मिळविला. चालुक्यांशी एकनिष्ठ अशा अनेक मांडलिकांच्या प्रदेशावर त्याने स्वाऱ्या केल्या. आपल्या विजयाचे प्रतीक म्हणून त्याने तलकाडु-वनवासी-हानुंगल गोंड विजयनोलम्ब, साहस कदम्ब, भुजबल गंग आणि वीरगंग ही नवी बिरुदे धारण केली.[९५] होयसळांची बंडखोरी मोडून काढण्यासाठी विक्रमादित्याला त्यांच्याविरुद्ध मोहीम हाती घ्यावी लागली.

विक्रमादित्याने होयसळाविरुद्ध पाठविलेल्या सैन्याचा विष्णुवर्धनाचा मंत्री गंगराज याने पराभव केला.[९६] परंतु दुसरा अचुगी या सहाव्या विक्रमादित्याच्या विश्वासू मांडलिकाने होयसळांचा पराभव करून इ. स. ११२२ मध्ये त्यांना चालुक्यांचे स्वामित्व स्वीकारण्यास भाग पाडले.[९७] होयसळांच्या बंडाचा फायदा घेऊन गोव्याचे कदम्ब आणि कोकणच्या शिलाहारांनी चालुक्यांविरुद्ध आक्रमक हालचाली सुरू केल्या होत्या. विक्रमादित्याने तिकडे सैन्य पाठवून त्यांचा बंदोबस्त केला.

गंगवाडीचा प्रदेश होयसळांच्या प्रशासनाखाली असल्यामुळे चोलांना चालुक्य राज्यावर दक्षिणेकडून आक्रमण करणे शक्य नव्हते. त्यामुळे चोलांनी पूर्वेकडील वेंगीच्या चालुक्यांच्या प्रदेशामधून विक्रमादित्याच्या राज्यावर स्वाऱ्या सुरू केल्या. कुलोत्तुंग चोलाच्या काळापासून चोल आणि वेंगीच्या चालुक्यांमध्ये वैवाहिक संबंधाद्वारे

मैत्री वाढत गेली व वेंगीचे चालुक्य हे चोल-चालुक्य म्हणून ओळखले जाऊ लागले. युद्ध आणि राजनीती या दोन्ही क्षेत्रात कुलोत्तुंग आणि विक्रमादित्य हे समसमान होते. वेंगी प्रांतात सापडलेल्या चोल आणि चालुक्यांच्या कोरीव लेखात दोन्ही पक्ष आपली सरशी झाल्याचा दावा करतात. यावरून या प्रातांत निर्णायक विजय दोन्ही पक्षांना मिळाला नाही हे सिद्ध होते.[९८] उदाहरणार्थ द्राक्षाराम येथील इ. स. १०९३ मधील एका कोरीव लेखात सहाव्या विक्रमादित्याद्वारे दिल्या गेलेल्या भूमिदानाची नोंद करण्यात आली आहे. परंतु इ. स. १०९७ मधील भीमावरम् येथील पुराभिलेखात सहाव्या विक्रमादित्याच्या मंत्र्याने केलेल्या दीपदानाच्या संदर्भात त्याप्रदेशावर चोल कुलोत्तुंगाची सत्ता असल्याचा संकेत देण्यात आला आहे.[९९] यावरून एकतर चालुक्य आणि चोल यांच्यात तह झाला असावा किंवा चालुक्य मंत्र्याने कुलोत्तुंगाच्या सेवेत प्रवेश केला असावा. इ. स. १११८ मध्ये कुलोत्तुंग चोल मृत्यू पावल्यानंतर मात्र चोलांच्या आंतरिक अस्थिरतेचा फायदा घेऊन विक्रमादित्याने वेंगीच्या चालुक्यांचा जास्तीत जास्त प्रदेश जिंकून आपल्या राज्यात समाविष्ट केला. विक्रम चोल या आपल्या पुत्रास कुलोत्तुंगाने वेंगीचा प्रशासक म्हणून नेमले होते. पण कुलोत्तुंगाच्या मृत्यूनंतर तो कांचीस परतला व त्यानंतर चोलांनी वेंगी प्रांताचा प्रशासक म्हणून कुणाचीही नियुक्ती केली नाही. उलट या काळातील चालुक्यांच्या कोरीव लेखात वेंगी–१४,००० या प्रांतावर विक्रमादित्याची अधिसत्ता असल्याचा दावा करण्यात आला आहे.[१००] यामुळे विक्रमादित्याच्या राज्याचा विस्तार अरबी समुद्रापासून बंगालच्या उपसागरापर्यंत झाला.

विक्रमादित्याच्या अनेक राज्य शासनात गुजरातच्या चौलुक्यावर त्याने मिळविलेल्या विजयाचे उल्लेख आढळतात. या उलट गुजरातचा चौलुक्य राजा जयसिंह याने आपल्या शासनात कल्याणकटकाचा परमदी (सहावा विक्रमादित्य) याला पराभूत केल्याची नोंद केली आहे.[१०१] विक्रमादित्याचा मांडलिक बिज्जल याने जयसिंहास पराभूत केल्याचा दावा केला आहे.[१०२] हा जयसिंह म्हणजे गुजरातचा चौलुक्य जयसिंहच असावा. बिज्जलाने गुजरातवर इ. स. ११९५ मध्ये स्वारी केली.

विक्रमादित्याने श्रीलंकेचा राजा विजयबाहू याच्या दरबारी नजराण्यासह आपला राजदूत पाठवून त्याच्याशी मैत्री संपादन केली.[१०३] परंतु विक्रमादित्याच्या या मुत्सद्देगिरीकडे चोल कुलोत्तुंग हा संशयाने बघू लागला.

वरंगलचे काकतीय हे कल्याणच्या चालुक्याचे मांडलिक होते. पहिल्या सोमेश्वराच्या कोकण आणि चक्रकोटच्या मोहिमात पहिल्या प्रोल काकतीय हा सहभागी झाला होता. त्याबद्दल सोमेश्वराने काकतीयास अनमकोंडा (वरंगल) चा प्रदेश बहाल केला.[१०४] काकतीयांनी चोलाविरुद्धच्या मोहिमात सहाव्या विक्रमादित्यास देखील मोलाचे सहाय्य केले. याचे बक्षीस म्हणून विक्रमादित्याने प्रोलाचा उत्तराधिकारी बेट याला सब्बिनाडू किंवा सब्बी–१००० हा प्रदेश दिला. चालुक्यांचे एकनिष्ठ मांडलिक म्हणून

काकतीयांनी विक्रमादित्याची सेवा केली. त्या बदल्यात चालुक्यांच्या आश्रयाखाली काकतीयांची सत्ता दृढ होऊन त्यांच्या राजकीय प्रतिष्ठेत वाढ होत गेली.

चोलांकडून होणारी सततची आक्रमणे व होयसळांची बंडखोरी यामुळे विक्रमादित्यास सतत लढावे लागले. परंतु त्यावर मात करून विक्रमादित्याने संपूर्ण दक्षिणेवर आपले प्रभुत्व प्रस्थापित करण्यास यश मिळविले. कल्याणच्या चालुक्य राजवटीत सहाव्या विक्रमादित्याची कारकीर्द सर्वांत वैभवशाली मानली जाते, कारण त्याने बल आणि मुत्सद्देगिरीद्वारा शत्रूंवर मात करून आपले राजकीय वर्चस्व प्रस्थापित केले आणि राज्यात स्थैर्य आणि शांतता निर्माण केली. कला आणि साहित्यास प्रोत्साहन देऊन त्याने आपल्या राज्यात सांस्कृतिक प्रगती घडवून आणली. विक्रमादित्याच्या काळातील कोरीव लेखात त्याच्या अनेक राण्यांची नावे आलेली असून त्या विविध प्रांतांचे प्रशासन चालवीत असल्याची माहिती देण्यात आली आहे.[१०५] त्यांनी अनेक मंदिरे बांधली. त्यांच्या पूजा-अर्चेसाठी कायम दाने दिली. शिलाहार राजकन्या चंदलादेवी ही विक्रमादित्याची महाराणी असून जयकर्ण आणि सोमभूप या त्याच्या दोन पुत्रांची माता होती. इतर राण्यांपासून झालेल्या मुलामुलींना विक्रमादित्याने विविध प्रांतांच्या प्रशासकपदी नेमले होते. मैलालमहादेवी या आपल्या कन्येचा विवाह विक्रमादित्याने गोव्याचा कदंब राजा दुसरा जयकेशी याच्याशी केला होता. ज्येष्ठ पुत्र जयकर्ण याच्या अकाली मृत्यूमुळे विक्रमादित्याचा धाकटा पुत्र सोमभूप हा तिसरा सोमेश्वर हे नाव धारण करून इ. स. ११२७ च्या सुमारास राज्यावर आला. विक्रमादित्याच्या कारकिर्दीचा शेवट व तिसऱ्या सोमेश्वराच्या कारकिर्दीचा प्रारंभ या घटना नक्की कोणत्या दिवशी घडल्या हे निश्चितपणे सांगता येत नाही कारण चालुक्यांच्या राजशासनात त्याविषयी उलट-सुलट माहिती आढळते. २८ फेब्रुवारी ११२७ ही तिसऱ्या सोमेश्वराच्या राज्यारोहणाची तारीख देण्यात आलेली आहे. त्याचवेळी २८ एप्रिल व २८ ऑक्टोबर ११२७ आणि मार्च ११२८ पर्यंत विक्रमादित्य राज्य करीत असल्याची माहिती काही नोंदीत देण्यात आली आहे.[१०६] त्यावरून असे अनुमान केले जाते की विक्रमादित्याने वार्धक्यामुळे इ. स. ११२६-२७ मध्येच राज्यकारभार तिसऱ्या सोमेश्वराकडे सुपूर्त केला. इ. स. ११२८ पर्यंत तो हयात असल्यामुळे पुढील दानपत्रात शासक म्हणून त्याच्या नावाची नोंद करण्यात आली.

**तिसरा सोमेश्वर :** राज्यारोहणाच्या वेळी तिसऱ्या सोमेश्वराने भूलोकमल्ल हे बिरुद धारण केले होते. विद्वता आणि व्यासंग त्याच्या अंगी असल्यामुळे त्याला सर्वज्ञ चक्रवर्ती ही उपाधीही प्राप्त झाली होती. चालुक्य-भूलोकमल्ल-वर्ष या नावाचा त्याने संवत देखील सुरू केला होता. परंतु तो त्याच्या राज्यकाळापुरताच मर्यादित राहिला. सहाव्या विक्रमादित्याच्या तुलनेत तिसरा सोमेश्वर हा सौम्य स्वभावाचा असल्यामुळे सुरूवातीस प्रशासन व्यवस्थेत शैथिल्य निर्माण झाले. त्याचा फायदा घेऊन मांडलिक पुन्हा शिरजोर झाले. विशेषतः होयसळांनी आपल्या शेजारच्या चालुक्यांच्या मांडलिकांच्या प्रदेशावर नव्याने स्वाऱ्या सुरू केल्या. त्यामुळे होयसळांना

वटणीवर आणण्यासाठी सोमेश्वरास इ. स. ११२९ च्या सुरुवातीसच दक्षिणेकडील मोहीम हाती घ्यावी लागली.[१०७] त्याचा समकालीन असलेल्या होयसळ विष्णुवर्धनाने सहाव्या विक्रमादित्याच्या कारकिर्दीत देखील चालुक्यांविरुद्ध आक्रमक पवित्रा घेतला होता, परंतु त्यावेळी त्याला फारसे यश लाभले नव्हते. राजवटीतील बदलाचा फायदा घेऊन त्याने यावेळी अधिक आक्रमक पवित्रा घेतला. परंतु आपल्या एकनिष्ठ मांडलिकांच्या मदतीने सोमेश्वराने याही वेळी होयसळांना फारसे यश मिळू दिले नाही. त्यामुळे विष्णुवर्धनाने दक्षिणेकडील पाण्ड्य आणि कदंब यांच्या प्रदेशाकडे आपला मोर्चा वळविला. त्याने पाण्ड्यांच्या राज्यावर अचानक छापा घालून त्यांची राजधानी उच्छंगी आपल्या ताब्यात घेतली.[१०८] परंतु यावेळी पाण्ड्यांशी सोयीरसंबंध असलेल्या कदंबांनी होयसळ सैन्यावर प्रतिहल्ला करून त्यांना उच्छंगीचा विजय महाग टरविला.[१०९] विष्णुवर्धनाने हंगल, पलसिग्गे-१२,०००, तलक्कड, कोंगु, नांगली, गंगवाडी आणि नोलंबवाडी इत्यादी चालुक्यांचे प्रदेश जिंकून इ. स. ११२६ मध्ये गोव्याचा चालुक्यांचा मांडलिक कदंब जयकेशी याचा देखील पराभव केल्याचा दावा आपल्या राजशासनात केला आहे.[११०] यातील सर्वच दावे खरे नसले तरी त्यातून होयसळांची वाढती आक्रमकता व त्यामुळे चालुक्य सत्तेसमोर निर्माण झालेले आव्हान याची प्रचीती येते.

चालुक्यांचे अनेक प्रदेश होयसळांनी जिंकल्यामुळे व अनेक चालुक्य मांडलिकांवर त्यांनी आपले स्वामित्व प्रस्थापित केल्यामुळे तिसऱ्या सोमेश्वराचा वचक कमी झाला. होयसळ हे चालुक्यांचे मांडलिक असल्यामुळे त्यांना त्यांची जागा दाखविणे हे सार्वभौम शासक या नावाने सोमेश्वराचे कर्तव्य होते. परंतु ते करण्याऐवजी त्याने सर्वज्ञ चक्रवर्ती या आपल्या बिरुदानुसार विद्वान आणि साहित्यिकांच्या सहवासात राहणे पसंत केले.[१११] आपल्या राज्यकाळाच्या चौथ्या वर्षी त्याने अभिलाषितार्थ चिंतामणी उर्फ मानसोल्लास हा राजनीति, न्याय, प्रशासन, युद्धकला, काव्य, संगीत, चित्रकला, ज्योतिष, वैद्यकशास्त्र, हस्तिपालन व क्रीडा इत्यादी विषयावर भाष्य करणारा ग्रंथ लिहिला. इ. स. ११३७ ते ११४० या काळातील काही चालुक्यांच्या कोरीव लेखात सोमेश्वर राज्य करीत असल्याचा उल्लेख आहे तर काहीत त्याचा उत्तराधिकारी जगदेकमल्ल याचा शासक म्हणून निर्देष करण्यात आलेला असल्यामुळे तिसऱ्या सोमेश्वराच्या कारकिर्दीच्या अखेरीविषयी निश्चितपणे सांगता येत नाही.[११२] तरीपण त्याने इ. स. ११४० पर्यंत राज्य केले असे गृहीत धरून शेवटच्या काळात जगदेकमल्ल हा सहशासक असल्याचे बहुतेक इतिहासकार मानतात.

**दुसरा जगदेकमल्ल** (इ. स. ११३८ ते ११५१) : याचे नाव त्याच्या पूर्वजांच्या बिरुदाप्रमाणे वाटते. त्याशिवाय त्याने त्रिभुवनमल्ल प्रतापचक्रवर्ती आणि परमर्द्दीदेव ही बिरुदेही धारण केली होती.[११३] त्यानेही आपला राज्यसंवत् सुरू केला होता. पण तो अल्पकालीन टरला. त्याच्या कारकिर्दीतही राज्याच्या दक्षिण आणि नैर्ऋत्य भागावर चालुक्यांचा मांडलिक असलेल्या होयसळ विष्णुवर्धन याचेच शासन होते.[११४] बल्लारी आणि अनंतपूर भागावर चालुक्यांचे मांडलिक म्हणून सिंद वंशीयांचे शासन होते.[११५]

होयसळ विष्णुवर्धनाच्या वाढत्या आक्रमक कारवायांना पायबंद घालण्याचा निर्णय निश्चयी स्वभावाच्या दुसऱ्या जगदेकमल्लाने घेतला. या कामासाठी त्याने सेनानी म्हणून सिंद परमर्दी याची निवड केली. होयसळांच्या आक्रमणाची झळ लागलेल्या पाण्ड्य आणि कदंबांनी सिंद परमाडीच्या पाठीशी ठामपणे उभे राहण्याचा निश्चय केला. या संयुक्त सैन्याने होयसळ सैन्याचा केवळ पराभव केला असे नव्हे तर होयसळ विष्णुवर्धनास ठार करून त्याच्या राज्यातील शहरे लुटली. ही घटना २४ ऑक्टोबर ११४३ च्या पूर्वी घडली असावी, कारण या दिनांकाच्या एका कोरीव लेखात दुसऱ्या जगदेकमल्लाने होयसळांचा संपूर्ण पराभव केल्याचा दावा केला आहे.[११६]

होयसळास वटणीवर आणल्यानंतर दुसऱ्या जयसिंहाने राजकीय अस्थैर्य निर्माण झालेल्या माळव्याकडे आपले लक्ष वळविले. वीर पाण्ड्य यांच्या पाठबळावर त्याने आपला सेनानी केशिराज याला माळव्याच्या मोहिमेवर पाठविले. या लढाईत माळव्याचा परमार राजा जयवर्मन हा ठार झाला. जयसिंहाने माळव्यामध्ये सतत हस्तक्षेप करणाऱ्या गुजरातच्या चालुक्यांचा देखील पराभव केला.[११७]

जयसिंहाचा सेनापती केशिराज याने दक्षिणेतील चोल राजाच्या सत्तेवर आघात केल्याचा तसेच उत्तरेतील गुर्जरांच्या सैन्याचा पराभव करून त्यांचे हत्ती आणि घोडे पळवून नेल्याचा दावा केला आहे.[११८] वर वर्णन केल्याप्रमाणे कुलोत्तुंग चोलाच्या मृत्युनंतर चालुक्य, चोल आणि कलिंगच्या पूर्व गंगाच्यामध्ये वेंगीवर आपला ताबा प्रस्थापित करण्याची स्पर्धा सुरू झाली होती. गंग राजा अनंतवर्मनदेव याने वेंगीवर आक्रमण केले तेव्हा जगदेकमल्ल याने त्याला पिटाळून लावले.[११९] होयसळास पूर्णपणे काबूत आणून आपल्या मांडलिकांचा विश्वास प्राप्त केल्यामुळे जगदेकमल्ल आपल्या कारकिर्दीच्या अखेरीस विशेष समाधानी होता.

**तिसरा तैल :** जगदेकमल्लानंतर त्याचा भाऊ तिसरा तैल हा राज्यावर आला. २० डिसेंबर ११५१ ही जगदेकमल्लाच्या कारकिर्दीची अखेरची ज्ञात तारीख असून तिसऱ्या तैलाच्या राज्यकालाचा पहिला ज्ञात दिनांक २० मार्च ११५२ हा आहे. त्यावरून यामधील काळात तैलाचे राज्यारोहण झाले असावे. परकीय आक्रमण आणि अंतर्गत अशांतता यावर मात करू शकणारी जगदेकमल्लाची लढावू वृत्ती आणि सामर्थ्य याचा तिसऱ्या तैलाजवळ अभाव होता. गुजरातचा सोळंकी राजा कुमारपाल याने चालुक्यांचे मांडलिक असलेल्या कोकणच्या शिलाहारांवर आक्रमण केले. हा चालुक्यांच्या सार्वभौमत्वावरील आघात होता. चालुक्यांचा मांडलिक बिज्जल कलचुरी तिसऱ्या तैलास पदच्युत करून दक्षिणेची सत्ता हस्तगत करण्याची तयारी करीत होता. अशा परिस्थितीत चालुक्यांचा मांडलिक असलेल्या हनमकोंडा येथील काकतीय दुसरा प्रोल याने कल्याणवर आक्रमण करून तिसऱ्या तैलाचा केवळ पराभवच केला असे नव्हे तर त्याला बंदी बनवून नेले.[१२०] पुढे तिसऱ्या तैलाची सुटका झाली. परंतु एकेकाळी विश्वासू सामंत असलेल्या बिज्जल कलचुरीने तैलावर शेवटचा आघात केला.

बिज्जल कलचुरी याने कऱ्हाड–४००० या विभागाचा प्रशासक म्हणून तिसऱ्या सोमेश्वराच्या कारकिर्दीत आपल्या राजकीय जीवनाची सुरुवात केली. पुढे तो महामंडलेश्वर बनला आणि तिसऱ्या तैलाच्या अमदानीत तो चालुक्य सैन्याचा सेनापती बनला. या पदाचा लाभ घेऊन बिज्जलाने आपला राजकीय प्रभाव वाढविला.[१२१] शेवटी शेवटी तर बिज्जलाने तैलास नामधारी शासक बनवून शासनाची सूत्रे आपल्या हाती घेण्यास सुरुवात केली.[१२२] त्याने चालुक्यांचे सामंत असलेल्या कदंब आणि संतार प्रमुखावर आक्रमण करून त्यांना तैलाऐवजी आपले स्वामित्व मान्य करण्यास भाग पाडले.[१२३]

इ. स. ११५७ मध्ये बिज्जलाने तिसऱ्या तैलास कल्याण सोडण्यास भाग पाडले. त्यामुळे तो बनवासीस जाऊन राहिला. पुढे त्याने अन्निगेरीस आश्रय घेतला. बिज्जलाने अन्निगेरीस जाऊन तैलास पदच्युत करून तो इ. स. ११६२ मध्ये स्वतः सत्तारुढ झाला.[१२४] इ. स. ११६२ ते ११८२ हा २१ वर्षांचा काळ म्हणजे कलचुरी राजवटीचा काळ होता. चालुक्यांचे मांडलिक असलेल्या होयसळ, कदंब, सिंद, शिलाहार इत्यादींनी नाइलाजाने बिज्जलाचे स्वामित्व मान्य केले. परंतु काही सामंत विशेषतः पाण्ड्य हे चालुक्यांनाच आपले स्वामी मानीत होते.[१२५] कलचुरींच्या राजवटीत अराजक आणि अशांतता असल्यामुळे त्यांना आपली सत्ता दृढ करणे शक्य झाले नाही. होयसळ, कदंब आणि काकतीय यांनी विविध दिशांनी आपली आक्रमणे चालूच ठेवली.

**सोमेश्वर चौथा :** होयसळांनी कलचुरींचा पराभव केल्याचा फायदा घेऊन विजनवासातील तिसऱ्या तैलाचा पुत्र चौथा सोमेश्वर याने इ. स. ११८३ मध्ये कलचुरींना सत्ताभ्रष्ट करून आपले पैत्रक राज्य परत मिळविले[१२६] व त्याने कलचुरी कुलमर्दन हे बिरुद धारण केले.[१२७] चौथ्या सोमेश्वरास राज्य पुनर्प्राप्तीमध्ये कदंब, सिंद आदि प्रमुखांचे सहाय्य लाभले.[१२८] परंतु उत्तरेकडून यादवांनी, दक्षिणेकडून होयसळांनी आणि पूर्वेकडून काकतीयांनी चालुक्य प्रदेशावर आक्रमणे सुरू केल्यामुळे सोमेश्वरास मिळविलेली सत्ता कायम ठेवणे कठीण झाले. काकतीय राजा दुसरा प्रोल याने सरहद्दीवरील चालुक्य सामंत कोंडापल्लीचा गोविंद दण्डनायक याच्या ताब्यातील प्रदेशावर आक्रमण करून तो आपल्या राज्यास जोडला.[१२९] होयसळ दुसरा बल्लाळ याने इ. स. ११८३ मध्ये सोमेश्वराविरुद्ध केलेली मोहीम फसली, परंतु चार वर्षांनंतर त्याने पुन्हा आक्रमण करून चौथ्या सोमेश्वरास कल्याण सोडून जयंतीपुराचा आश्रय घेण्यास भाग पाडले.[१३०] इ. स. ११८९ मध्ये उत्तरेकडून यादव भिल्लमाने कल्याणवर स्वारी करून होयसळ बल्लाळास दक्षिणेत पिटाळून लावले.[१३१] यानंतर देखील यादव आणि होयसळात चालुक्यांचा प्रदेश ताब्यात घेण्यासाठी अनेक लढाया झाल्या, पण यशाचे पारडे दोलायमान राहिले. सोमेश्वराला मात्र आपली सत्ता कायमची गमवावी लागली. २५ डिसेंबर ११८९ ही सोमेश्वराची शेवटची ज्ञात तारीख आहे.[१३२] त्या सुमारास त्याचे निधन झाले व त्याबरोबर कल्याणच्या चालुक्य सत्तेचा कायम अस्त झाला.

कल्याणच्या चालुक्यांचे वंशज पुढील काळात यादव, होयसळ आणि काकतीय यांचे सामंत म्हणून विविध भागांचे प्रशासन चालवीत असल्याची माहिती त्यांच्या कोरीव लेखावरून मिळते. त्यापैकी तेरवण आणि कोल्हापूर परिसरातील आलेखात अशा चालुक्य शासकांची नावे नोंदलेली असून "कल्याणपूरवराधीश्वर" हे बिरुद त्यांच्या नावाशी जोडलेले दिसून येते.[१३३]

## कल्याणचे कलचुरी

बिज्जल कलचुरी याने इ. स. ११६२ मध्ये चालुक्यांचा राजा तैलास पदच्युत करून सत्ता प्रस्थापित केली. दोन दशकाहून अधिक काळपर्यंत चालुक्य सत्तेला लागलेल्या या ग्रहण कालात कल्याणचे राजसिंहासन बिज्जल कलचुरी आणि त्यांच्या वंशराजांच्या ताब्यात होते. कलचुरी राजवंशाचा मूळ पुरुष हैहेय कार्तवीर्य असून त्यांचे मूलस्थान मध्यप्रदेशातील महिष्मती हे होते. तेथून या वंशाचे लोक विविध ठिकाणी स्थलांतरित झाले व त्यातून या राजवंशाच्या विविध शाखा अस्तित्वात आल्या. या वंशाच्या मध्यप्रदेशातील कलंजर शाखेतील काही लोक दक्षिणेत गेले व त्यांनी कल्याणच्या चालुक्यांची चाकरी पत्करली.[१३४]

या वंशातील जोगम कलचुरी याला चालुक्य सहाव्या विक्रमादित्याने महामंडलेश्वर हे पद बहाल करून त्याच्याकडे कऱ्हाड–४००० या मंडळाचे प्रशासन सोपविले. चालुक्य राजवंशाशी वैवाहिक संबंध झाल्यामुळे कलचुरींची प्रतिष्ठा वाढत गेली.[१३५] जोगमाचा पुत्र कलचुरी पेर्माडी हा तिसऱ्या सोमेश्वराच्या कारकिर्दीत महामंडलेश्वर म्हणून तारदावाडी मंडलाचे प्रशासन चालवीत होता.[१३६] पेर्माडीचा मुलगा बिज्जल हा सहाव्या विक्रमादित्य आणि त्याची राणी चंदलादेवी यांचा नातू होता कारण त्यांची कन्या पेर्माडीची पत्नी आणि बिज्जलाची माता होती. सोलापूर जिल्ह्यातील तालुका मुख्यालय असलेले मंगळवेढे हे या कलचुरींचे वास्तव्यस्थान होते.[१३७]

पेर्माडीचा मुलगा दुसरा बिज्जल अशा प्रकारे चालुक्य जगदेकमल्ल आणि तिसरा तैल यांचा आतेभाऊ होता. कऱ्हाड-४००० मण्डलाचा प्रशासक बिज्जल असताना त्यांची आजी चंदलादेवी ही कदंबडे-३०० विभागातील वलसंग उपविभागाचे प्रशासन चालवीत होती.[१३८] चालुक्यांचा मांडलिक म्हणून बिज्जलाने आपले राजकीय महत्त्व वाढविले आणि शेवटी आपल्या स्वामीचे सिंहासन बळकावून स्वतंत्र व सार्वभौम राजा बनला. इ. स. ११६२ मध्ये तो सार्वभौम राजाच्या बिरुदासह कल्याण येथून राज्य करीत होता.[१३९] बिज्जलाने दूरदूरचे अनेक प्रदेश जिंकल्याचा दावा केला आहे. परंतु त्यात फारसे तथ्य नाही. कारण होयसळांच्या आक्रमणाचा मुकाबला करण्यातच त्याला आपली सर्व शक्ती पणाला लावावी लागली होती.[१४०] होयसळांचा पराभव बिज्जलाने चालुक्यांचा सेनानी असताना केला होता, परंतु त्याने सत्ता बळकावल्यानंतर मात्र होयसळांनी त्याला स्वस्थपणे कारभार करू दिला नाही. बिज्जलाने पर्वत, मैदानी प्रदेश आणि समुद्रकिनारपट्टीतील एक हजार किल्ले आपल्या ताब्यात असल्याचा दावा केला

आहे.[१४१] हा दावा जरी अतिशयोक्त असला तरी त्याचे सैन्य सुसज्ज असून चालुक्यांच्या ताब्यातील बहुतेक किल्ले त्याने आपल्या ताब्यात ठेवले होते.

वीरशैव पंथाचा संस्थापक बसवेश्वर हा बिज्जलाचा आश्रित मंत्री होता. त्याने नवीन पंथाची स्थापना करून त्याचा प्रसार सुरू केला. त्यामुळे बिज्जल आणि बसवेश्वर यांच्यात वितुष्ट निर्माण झाले व त्याचे पर्यवसान बिज्जलाच्या हत्येत झाले. ३० सप्टेंबर ११६७ ही बिज्जलाच्या कारकिर्दीची अखेरची ज्ञात तारीख होय. त्याने आपला पुत्र सोमेश्वर उर्फ सोविदेव याला आपला उत्तराधिकारी म्हणून नेमले होते. त्याला त्याच्या इतर भावांनी आक्षेप घेतला होता, परंतु तो डावलून सोविदेवाने बिज्जलाच्या हयातीतच इ. स. ११६६ मध्ये आपला राज्याभिषेक करवून घेतला.[१४२] किरकोळ स्वाऱ्या आणि बंडाळ्यांचा बीमोड या व्यतिरिक्त सोविदेवाच्या कारकिर्दीत फारशी महत्त्वाची घटना घडल्याची नोंद आढळत नाही. त्याच्या कारकिर्दीतील शेवटची ज्ञात तारीख ३१ जानेवारी ११७७ ही होय.[१४३] सोविदेवानंतर त्याचा भाऊ संकमदेव हा २६ जून ११७७ रोजी राज्यावर आला. त्या दिवशी त्याने त्याच्या काही शूर सैनिकांनी बांधलेल्या बसवेश्वराच्या मंदिराची प्रतिष्ठापना केली.[१४४] त्याने कल्याणप्रमाणे मंगळवेढा ही आपली दुसरी राजधानी बनविली.[१४५]

संकमदेवास आपल्या कारकिर्दीत त्याच्या भावांनी केलेल्या बंडाळीचा सतत सामना करावा लागला. त्याच्या भावांनी राज्याच्या विविध प्रांतात आपापली स्वतंत्र सत्ता प्रस्थापित केली होती. संकमदेवाच्या बंडखोर भावात आहवमल्ल हा प्रमुख असून त्याने रायनारायण हे सार्वभौम बिरुद धारण करून इ. स. ११७८ मध्ये आपण स्वतंत्र राजा झाल्याची घोषणा केली,[१४६] तर त्याचा दुसरा भाऊ सिंघणदेव याने इ. स. ११८२ मध्ये महाराजाधिराज हे बिरुद धारण करून आपल्या स्वतंत्र राज्याची स्थापना केली.[१४७] कलचुरी राज्यातील या यादवीचा फायदा घेऊन होयसळांनी आपल्या आक्रमक कारवाया वाढविल्या. या गोंधळाचा फायदा घेऊन चौथा सोमेश्वर चालुक्य याने कलचुरी सत्तेचा शेवट करून वर वर्णन केल्याप्रमाणे चालुक्य सत्तेची पुनर्स्थापना केली.

———

## कल्याणीच्या चालुक्यांची वंशावळ



## तळटिपा

१ **बॉम्बे गॅझेटिअर,** खंड–१, भाग–२, **डायनॅसिटीज ऑफ कॅनरीज डिस्ट्रिक्टस,** २ री आवृत्ती, बॉम्बे, १८९६, पृ. ४२९.

२ कित्ता.

३ कामथ, एस. यू., **ए कन्साईज हिस्टरी ऑफ कर्नाटक,** बंगलोर, १९८०, पृ. १०५.

४ **गॅझेटिअर ऑफ इंडिया, महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर,** हिस्टरी : **एन्शंट पिरिअड,** भाग–१, बॉम्बे, १९६७, पृ. २८६.

५ **इ. आय.,** खंड–२, पृ. २०८, खंड–१२, पृ. २६८ व त्यापुढे. **आय. ए.,** खंड–८, पृ. ११ व त्यापुढे.

६ **आय. ए.,** खंड–५, पृ. १४५, खंड–१२, पृ. १८१.

७ **इ. आय.,** खंड–४, पृ. ३४९.

८ **आय. एम. पी.,** खंड–१, नं. ९४.

९ कित्ता, नं. २६७.

१० शास्त्री, श्रीकांत (संपा.) पंपभारत आल्सो कॉल्ड अॅज विक्रमार्जूनविजय यशस्तीलक ऑफ सोमदेवसुरी, **जे. ए. एच. आर. एस.,** खंड–६, पृ. १८५ व त्यापुढे.

११ **बॉम्बे गॅझेटिअर** १८९६, खंड–१, भाग–२, पृ. ३७९; **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर,** हिस्टरी : **एन्शंट पिरिअड,** भाग–१, १९६७, पृ. २९१.

१२ **आय. ए.,** खंड–४०, पृ. ४३.

१३ **इ. सी.,** खंड–१२, सी. डी. नं. २५.

१४ कित्ता, सी. डी. नं. ५०.

१५ **इ. आय.,** खंड–१२, पृ. १५०.

१६ **ए. आर. एस. आय. इ.,** १९३३–३४, बी. के. नं. १७८.

१७ **एस. आय. आय.,** खंड–११, भाग–१, नं. ४०, **ए. आर. एस. आय. इ.,** १९२९–३०, बी. के. नं. १३०.

१८ **महाराष्ट्र स्टेट गॅझेटिअर : हिस्टरी भाग–१,** १९६७, पृ. २५७.

१९ **इ. आय.,** खंड–५, पृ. २०.

२० **इ. सी.**, खंड–१०, सोराब, डब्ल्यू., ४७९.

२१ **इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम श्रवणबेळगोळा**, नं. ५९.

२२ **आय. ए.**, खंड-१२, पृ. ९८, तोरगल इन्स्क्रिप्शन्स.

२३ **इ. आय.**, खंड–३, पृ. २७० व त्यापुढे; २९८ व त्यापुढे; खंड–६, पृ. २०४ व त्यापुढे; खंड-१६ **आय. ए;** पृ. २ व त्यापुढे; खंड–१२, पृ. २७० व त्यापुढे; खंड–१६, पृ. १६७.

२४ **आय. एम. पी.**, खंड–१, सी. डी. नं. ५८०, **ए. एस. आय. ए. आर.** १९३०–३४, भाग–१, पृ. २४१.

२५ **इ. सी.**, खंड–७, इन्ट्रोडक्शन, पृ. ४५, **डी. के. डी.**, पृ. ४३०–३३.

२६ **एस. आय. आय.**, खंड–९, भाग–१, नं. १०२–१०४.

२७ **आय. ए.**, खंड–१७, पृ. २२५.

२८ **आय. ए.**, खंड–१२, पृ. २१६; **इ. आय.**, खंड–११, पृ. ३५६.

२९ **एस. आय. आय.**, खंड–११, भाग–१, नं. ५२, पृ. ३९ व त्यापुढे.

३० **इ. सी.**, खंड–२, नं. २८१; **एस. आय. आय.**, खंड–६, नं, १०२.

३१ **इ. आय.**, खंड–३, पृ. २६७ व त्यापुढे. **सी. आय. आय.**, खंड–६, पृ. ३६ व त्यापुढे.

३२ **एस. आय. आय.**, खंड–९, भाग–१, नं. ७३–७८; **ए. आर. एस. आय. इ.**, १९३७–३८, नं. ३०७.

३३ **एस. आय. आय.**, खंड–९, भाग-१, नं. ७३.

३४ कित्ता, नं. ७६–७८.

३५ कित्ता, नं. १, ११, भाग–१, नं. ५२.

३६ **आय. ए.**, खंड–६, पृ. ५१, खंड–३६, पृ. १६८; **इ. आय.**, खंड–४, पृ.२०७.

३७ **इ. आय.**, खंड–१६, पृ.७.

३८ **ए. आर. एस. आय. इ.**, १९३३–३४, बी. के. नं. १७९.

३९ **इ. आय.**, खंड–३, पृ. २७०; **इ. सी.**, खंड–७, एस. के. नं. १७९.

४० **इ. आय.**, खंड–१६, पृ. ७५, १८७–८९.

४१ **इ. आय.**, खंड–१६, पृ. ७५.

४२ **ए. आर. एस. आय. इ.**, १९१२–१३, परिशिष्ट–बी, नं. ५१५; १९३२–३३, बी. के. नं. १७९; **एस. आय. आय.**, खंड–११, भाग–१, नं. ५१.

४३ **जे. इ. एस. आय.**, खंड–१८, पृ. ११८ व त्यापुढे, **एस. आय. आय.**, खंड–६, नं. १०२.

४४ **एस. आय. आय.**, खंड–११, भाग–१, नं. ५१.

४५ **इ. सी.**, खंड–७, एस. के. नं. ४७१; **एस. आय. आय.**, खंड–९, भाग–१, नं. ७९.

४६ **आय. ए.**, खंड–४, पृ. २०८, **इ. सी.**, खंड–७, एसआर. नं. ११०, १२३, १३०, १९७ एसबी. नं. २३३, २३८, खंड–११, डिजी नं. ३५, ४१; **ए. आर. एस. आय. इ.**, १९२४–२५, पृ. ७५; **आय. ए.**, खंड–४७, पृ. २८७.

४७ **एच. सी.**, खंड-८, एसबी. नं. १६, ७६; **ए. आर. एस. आय. इ.**, १९३७-३८, नं. ५९.

४८ **आय. ए.**, खंड-४, पृ. १०८.

४९ **एस. आय. आय.**, खंड-२, पृ. ९२, खंड-३, पृ. २७.

५० **इ. सी.**, खंड–७, एस. के. नं. १२५; **इ. आय.**, खंड-८, पृ. २४.

५१ **इ. सी.**, खंड-११, पृ. १८१, खंड-१८, पृ. ३२०.

५२ **ए. एस. आय. ए. आर.**, १९२१-२२, पृ. ११८-१९.

५३ **इ. आय.**, खंड-१२, पृ. ३०३-१५.

५४ कित्ता, खंड-१७, पृ. ३५९, खंड-१९, पृ. ७१-७२.

५५ **एचं. ए. एस.**, नं. ८.

५६ **इ. आय.**, खंड-१५, पृ. ३३३.

५७ **इ. सी.**, खंड-१२; एस. आय., नं. ३७, ४०.

५८ **एस. आय. आय.**, खंड-९, भाग-१, नं. ८०, ८२, ८५, ८७, ८८, ९०.

५९ **इ. आय.**, खंड-१६, पृ. ७६.

६० **एस. आय. आय.**, खंड-९, भाग-१, नं. ९१-९२.

६१ कित्ता, खंड-११, भाग-१, नं. ६८.

६२ टोसर, एच. एस., **स्टडीज इन इंडियन प्लेस नेमस्**, खंड-११, पृ. ११ व त्यापुढे.

६३ **एस. आय. आय.**, खंड-११, नं. ६९.

६४ **इ. सी.**, खंड-८, नं. १०८-१०९.

६५ कित्ता, खंड-७, एस. के. नं. ३२३.

६६ कित्ता, एच. आय., नं. १, **ए. आर. एस. आय. इ.,** १९३०, नं. १७९; **इ. आय.**, खंड-१५, पृ. ३५७.

६७ **इ. आय.,** खंड-१५, पृ. ८७, खंड-१६, पृ. ८६; **एच. ए. एस.,** नं. ८, पृ. १८, २१.

६८ बिल्हणकृत **विक्रमाङ्कदेवचरित,** ३, व्ही. ६७.

६९ एस. आय. आय., खंड-३, पृ. ५६, ५७; **ए. आर. एस. आय. इ.,** १८९०, नं. ६, १८९४, नं. २२१, १८९५, नं. १८; **इ. आय.,** खंड-१५, पृ. ७७, त्यापुढे.

७० **ए. आर. एस. आय. इ.,** १९१४, नं. ४८४.

७१ **विक्रमाङ्कदेवचरित,** खंड-४, पृ. २१.

७२ **एस. आय. आय.,** खंड-३, पृ. ३७.

७३ कित्ता, पृ. ३७, ६७-७०.

७४ **आय. ए.,** खंड-१७, पृ. ६१ व त्यापुढे, खंड-१८, पृ. ३३ व त्यापुढे. **जे. आर. ए. एस.,** १९२७.

७५ **इ. सी.,** खंड–७, एस. के. नं. ११८, १६९; **एच. ए. एस.,** नं. ८; **इ. आय.,** खंड-१५, पृ. ९१, **विक्रमाङ्कदेवचरित,** ३.

७६ **जे. ए. एस. बी.,** १८९८, पृ. १०५.

७७ **विक्रमाङ्कदेवचरित,** ४, खंड-३०.

७८ **एस. आय. आय.,** खंड-३, पृ. ६९-७१, २२५, २३४, खंड-१, पृ. ९९; **आय. एच. क्यू.,** खंड-१, पृ. ९२, **इ. आय.,** खंड-९, पृ. ९८ व त्यापुढे, खंड-२२, पृ. ६०.

७९ **इ. सी.,** खंड-७, एसके. नं. १३६, **आय. ए.,** खंड-८, पृ. २०.

८० **इ. सी.,** खंड-७, एसके. नं. १३६.

८१ **आय. एम. पी.,** खंड-१, बी. ओ. १८२; **एस. आय. आय.,** खंड-९, भाग-१, नं. १३५.

८२ **इ. सी.,** खंड-९, सीडी., नं. ८२.

८३ **इ. आय.,** खंड-२, पृ. १८५.

८४ **पृथ्वीराजविजय,** सर्ग-५, खंड-७८.

८५ **विक्रमाङ्कदेवचरित,** प्रस्तावना पृ. ३६-३७.

८६ **इ. सी.,** खंड-७, एसके., नं. ३०.

८७ **इ. आय.,** खंड-९, पृ. १०८.

८८ **आय. ए.,** खंड-१०, पृ. १८५ व त्यापुढे. **एस. आय. आय.,** खंड-११, भाग-२, नं. १२६, १३१ आणि १४०.

८९ **इ. सी,** खंड-७, एसके. नं. २९३, खंड-८, एस. ए. नं. १०९.

९० **विक्रमाङ्कदेवचरित,** अध्याय-१५, व्ही. ८७.

९१ **इ. सी.,** खंड-७, एसके. नं. १२४, १३५; **विक्रमाङ्कदेवचरित,** १७, पृ. ६८.

९२ **इ. सी.,** खंड-५, ए. के. नं. १८६, बीआय, नं. २०८, १२ टी. पी. नं. १०५.

९३ **इ. आय.,** खंड-२२, पृ. ६२; **इ. सी.,** खंड-५, बी. जे. नं. ५८, ११६, १९३, खंड-६, टी. के. नं. ४५.

९४ कामत, एस. यू., **ए कन्साईज हिस्टरी ऑफ कर्नाटका,** पृ. १३०-५३.

९५ **बॉम्बे गॅझेटिअर,** खंड-१ (जुनी आवृत्ती), भाग-२, पृ. ४९५.

९६ **इ. सी.,** खंड-२, पृ. ७३.

९७ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड-११, पृ. २४४, **इ. सी.,** खंड-६, सीएम. नं. १५१.

९८ **आय. एम. पी.,** खंड-२, सीडी. नं. ३३, ३५, ४३, ९०, १००, १६१, २३८, २६५, ३३४.

९९ कित्ता, नं. ३५, १६१.

१०० कित्ता, नं. ११२, २३७, २५१, ३४५, ३५१.

१०१ **काशी नगरी प्रचारिणी पत्रिका,** खंड-९, पृ. २८९, **राजपुताना म्युझियम रिपोर्ट,** १९१४-१५, पृ. २.

१०२ **इ. आय.,** खंड-१८, पृ. २०२-२०३.

१०३ चौलवंश, सीएच. ६०, व्ही. २४.

१०४ **कॉर्पस ऑफ दि इन्स्क्रिप्शन्स इन दि तेलंगणा डिस्ट्रिक्ट ऑफ एच. इ. एच. निजाम डोमिनिअन,** भाग-२, पृ. २६.

१०५ **इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि बॉम्बे-कर्नाटका,** नं. ५६, ६७, ऑफ १९३६-३७; नं. ७६, १९२७-२८; नं. १०५ ऑफ १९३२-३३; **इ. आय.,** खंड-१५, पृ. १०१; **एस. आय. आय.,** खंड-९, भाग-१, नं. १५९, १७५; **आय. ए.,** खंड-१०, पृ. १८५-९०.

१०६ **इ. सी.,** खंड-३, एसबी, नं. १४१, खंड-७, एसके. नं. ९९, २८०, खंड-११, डी. जी. नं. ९०.

१०७ कित्ता, खंड-७, एसके. नं. १००.

१०८ कित्ता, खंड-२, नं. १४३, ३८४, खंड-४, के. पी. नं. ७८, खंड-१२, सी. आय. नं. २९-३०.

१०९ कित्ता, खंड-५, बी. आय. नं. १७, **एम. ए. एस. आर.,** १९१६, पृ. ५२-५३.

११० कित्ता, खंड-५, बी. आय. नं. १७, १२४, २०२, सीएन. नं. १९९, खंड-८, एसबी., ४१४, खंड-१२, जीबी. नं. १३.

१११ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड-११, पृ. २६८.

११२ इ. सी., खंड-७, एसके. नं. ११२, २६८; खंड-८, एसके. नं. ४१५, ४१६, एसबी. नं. २३३; **केलहॉर्नस लिस्ट ऑफ इन्स्क्रिप्शन्स ऑफ सदर्न इंडिया,** नं. २३७.

११३ **एस. आय. आय.,** खंड-९, भाग-१, नं. २३६, **इ. सी.,** खंड-६, केडी. नं. ७६.

११४ **जे. आर. ए. एस.,** १९१५, पृ. ५२९, इ. सी. खंड-५, एके., नं. १७, १८, १०५.

११५ **व्ही. रंगाचारीज लिस्ट ऑफ इन्स्क्रिप्शन्स,** खंड-१, बेल्लारी, नं. ३१, १२८.

११६ **इ. सी.,** खंड-११, डीजी. नं. ८५, खंड-६, सीएम., नं. ९६.

११७ कित्ता, खंड-७, एसके. नं. १२३, खंड-११, डीजी. नं. ५५.

११८ **एस. आय. आय.,** खंड-१५, नं. २३, के. आय. १, नं. ९४.

११९ **इ. सी.,** खंड-७, एसके. नं. १२३, खंड-११, डिजी, नं. ३५५.

१२० **आय. ए.,** खंड-११, पृ. १२-१३.

१२१ **जे. आर. ए. एस.,** खंड-४, पृ. १६.

१२२ **इ. सी.,** खंड-७, एसके. नं. १८, १७३; खंड-८, एसबी. नं. १३१, ३२८.

१२३ कित्ता, खंड-८, एसबी. नं. ६६, ११४, एसबी. नं. १७७, ५६७.

१२४ **डी. के. डी.,** पृ. ४६९, **जे. आर. ए. एस.,** खंड-४, पृ. १६, तळटीप नं. २, **आय. ए.,** खंड-११, पृ. १८.

१२५ **इ. सी.,** खंड-११, सी. डी. नं. १३, **ए. आर. एस. आय. इ.,** १९१७, नं. ७३३, **एच. आय. एस. आय.,** पृ. ११६.

१२६ **ए. आर. एस. आय. इ.,** १९२८-२९, परिशिष्ट-इ., नं. २०७, १९४०-४५ बीके. नं. ४६.

१२७ **एस. आय. आय.,** खंड–९, भाग–१, नं. २७८.

१२८ **इ. सी.,** खंड–७, एसबी. नं. ४७, १७९.

१२९ **इ. आय.,** खंड–९, पृ. २६१.

१३० **ए. आर. एस. आय. इ.,** १९१५, परिशिष्ट–बी. नं. ४५८, **इ. सी.,** खंड–११, सिडी. नं. ३३, **इ. आय.,** खंड–६, पृ. ९२.

१३१ **बॉम्बे गॅझेटिअर** (जुनी आवृत्ती), खंड–१, भाग–२, पृ. ५१८–१९.

१३२ **इ. सी.,** खंड–८, एसबी. नं. १२९.

१३३ **जे. आर. ए. एस.,** खंड–५, पृ. ७७, नं. ८, **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड–२, पृ. २६३.

१३४ **इ. आय.,** खंड–१२, पृ. २९१, खंड–२०, पृ. २६९; **आय. ए.,** खंड–१, पृ. १९१.

१३५ **ए. आर. एस. आय. इ.,** १९४०–४१, बी. के. नं. १०२, १०३, १२४, १३०, १३१.

१३६ कित्ता, १९३६–३७, बीके. नं. ९३.

१३७ **इ. आय.,** खंड–१५, पृ. ३२४; **इ. सी.,** खंड–११, डीजी. नं. ४४.

१३८ **ए. आर. एस. आय. इ.,** १९४०–४१, बीके. नं. १२८.

१३९ **इ. सी.,** खंड–८, एसबी. नं. ३४६, **ए. आर. एस. आय. इ.,** १९३७–३८, नं. १४.

१४० **इ. आय.,** खंड–१५, पृ. ३२४; **इ. सी.,** खंड–३, एसबी. नं. २८७, ३७२, खंड–७, एसके. नं. १९७.

१४१ **जे. आर. ए. एस.,** खंड–४, पृ. २०.

१४२ **कर्नाटका इन्स्क्रिप्शन्स,** खंड–२, नं.२५; **इ. सी.,** खंड–७, एसके. नं. १५०.

१४३ **इ. सी.,** खंड–७, एसके. नं. २३६, खंड–८, एसबी. नं. ३८९, ४९८.

१४४ **एस. आय. आय.,** खंड–९, भाग–१, नं. २९७.

१४५ कित्ता, **ए. आर. एस. आय. इ.,** १९४०–४१, बीके. नं. ८९.

१४६ **इ. सी.,** खंड–७, एसके. नं. १४४, ११९, १५८, २४५.

१४७ **आय. ए.,** खंड–४, पृ. २७४.

———

· प्रकरण ११

# शिलाहार राजवंश *

"शिलाहार" या वंशनामाच्या व्युत्पत्तीविषयी अशी आख्यायिका आहे की, गरुड रोज एक सर्प भक्षण करीत असे. त्यासाठी रोज एक नाग शिळेवर पडून गरुडाचे भक्ष्य म्हणजे आहार बनत असे. एके दिवशी हे भक्ष्य होण्याची शंखचूड नागाची पाळी आली असताना विद्याधर राजकुमार जिमुतवाहन याने आपण स्वतः गरुडाचे भक्ष्य होऊन नागाचे प्राण वाचविले. जिमुतवाहन शिळेवरील गरुडाचा आहार बनला. त्यावरून त्याच्या वंशास "शिलाहार" हे नाव प्राप्त झाले.[१] या आख्यायिकेत ऐतिहासिकता असण्याची शक्यता फारच कमी. कारण या काळातील बहुतेक राजवंश आपली उत्पत्ती दैवी किंवा पौराणिक पुरुषापासून झाल्याचे दावे करतात.

महाराष्ट्र आणि कर्नाटकाच्या संलग्न प्रदेशात शिलाहार वंशाच्या ज्या अनेक शाखा होत्या त्यापैकी पश्चिम किनारपट्टीवर शासन करणाऱ्या तीन प्रमुख शाखा होत्या.[२] पहिली शाखा उत्तर कोकणातील शिलाहारांची असून त्यांच्या राज्यात मुंबई, ठाणे आणि रायगड जिल्ह्यातील प्रदेशाचा समावेश होता. दुसरी शाखा दक्षिण कोकणच्या शिलाहारांची असून त्यांच्या राज्यात रत्नागिरी, सिंधुदुर्ग आणि गोव्याचा समावेश होता. तिसरी शाखा कोल्हापूरच्या शिलाहारांची असून त्यांच्या राज्यात दक्षिण महाराष्ट्रातील कोल्हापूर, सांगली आणि सातारा व कर्नाटकातील बेळगाव जिल्ह्याचा समावेश होता. एकूण महाराष्ट्राच्या संपूर्ण पश्चिम किनारपट्टी व त्यालगतचा भाग हेच यांचे कार्यक्षेत्र राहिले.

शिलाहार वंशाच्या या तिन्ही शाखा जिमुतवाहनास आपला मूळ पुरुष मानतात व उत्तर कोकण आणि कोल्हापूरचे शिलाहार तगरपूर हे आपले मूलस्थान मानतात. तगर हे प्राचीन काळातील ऐतिहासिक महत्त्वाचे नगर असून टॉलेमी आणि पेरिप्लस या ग्रीक ग्रंथात त्याचा उल्लेख आला आहे. तगर म्हणजे सध्याचे महाराष्ट्राच्या उस्मानाबाद जिल्ह्यातील तेर होय. ज्याअर्थी, शिलाहार राजे "तगरपुरवराधीश्वर" हे बिरुद लावतात त्याअर्थी, मूळचे ते तेरचे शासक होते हे स्पष्ट होते. या वंशातील राजांची नावे कानडी पद्धतीची असल्यावरून तसेच त्यांची बिरुदे आणि त्यांच्या अधिकाऱ्यांच्या नावातील पदान्त कानडी वळणाचे असल्यावरून शिलाहार हे मूळचे कन्नड भाषी असल्याचे इतिहासकार मानतात.[३] उत्तर कोकणवर शिलाहारांची सत्ता प्रस्थापित होण्याच्या पूर्वी बदामीचा चालुक्य राजा दुसरा पुलकेशी याने हा प्रदेश जिंकलेला असल्यामुळे त्यावर कन्नड भाषी असलेल्या चालुक्यांचे शासन होते.[४] त्यामुळे कोकण हा मूळचा मराठी भाषी प्रदेश असून ही शिलाहारांच्या राजशासनात कानडी भाषेतील नावे आणि संज्ञा आढळतात.[५] दक्षिण कोकणच्या शिलाहारांचे कोरीव

* या प्रकरणाचे मूळ इंग्रजी लेखन डॉ. एस. जे. मंगलम् (प्राध्यापक, पुरातत्व विभाग, डेक्कन महाविद्यालय, पुणे) यांनी केलेले असून त्याचा मराठी अनुवाद डॉ. हरिहर ठोसर (निवृत्त प्रपाठक, इतिहास विभाग प्रमुख, एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई) यांनी केला आहे.

लेख मात्र संस्कृतमध्ये असून त्यात कानडी शब्दांचे मिश्रण फार कमी आहे. याउलट कोल्हापूर परिसर कर्नाटकाशी लागून असल्यामुळे या शाखेच्या कोरीव लेखात कानडी शब्दांचा व भाषेचा मुक्तपणे वापर झालेला आहे. महाराष्ट्रात राज्य केलेल्या शिलाहारांच्या तीन प्रमुख शाखांचा इतिहास पुढीलप्रमाणे होय.

## उत्तर कोकणचे शिलाहार

उत्तर कोकणच्या शिलाहारांना राष्ट्रकूटांकडून त्या प्रदेशाचे मांडलिक म्हणून सत्ता प्राप्त झाली. राष्ट्रकुटांच्या उदयापूर्वी बदामीच्या चालुक्यांचे सामंत येथील सत्ताधीश होते. दुसऱ्या पुलकेशीने कोकणच्या मौर्यांच्या सत्तेचा शेवट केल्यानंतर काही काळ या प्रदेशाचे प्रशासन आपल्या प्रत्यक्ष नियंत्रणाखाली टेवले होते. त्यावेळी बहुधा नाशिक हे चालुक्यांच्या प्रांतिक प्रशासकाचे मुख्यालय होते.[६] दुसऱ्या पुलकेशीचा उत्तराधिकारी पहिला विक्रमादित्य याने आपला भाऊ धराश्रय जयसिंह याची नाशिक विभागाचा प्रशासक म्हणून नियुक्ती केली होती. जयसिंहाने लाट किंवा दक्षिण गुजरात जिंकून तेथील प्रशासक म्हणून आपला ज्येष्ठ पुत्र श्रयाश्रय शिलादित्य याची नियुक्ती केली व उत्तर कोकणचे प्रशासन धाकटा पुत्र मंगलरस याच्याकडे सोपविले. त्याचे इ. स. ६९१, ७३१ आणि ७३२ मधील तीन ताम्रपट प्राप्त झाले आहेत.[७] मंगलरसाच्या कारकिर्दीच्या अखेरीस राष्ट्रकूट दन्तिदुर्गाने उत्तर कोकण जिंकून तेथील प्रशासक म्हणून अनिरुद्ध याची नियुक्ती केली.

**पहिला कपर्दिन :** यानंतरचा कोकणचा शासक शिलाहार पहिला कपर्दिन हा असून तो राष्ट्रकूट तिसरा गोविंद (इ. स. ७९३ ते ८१४) याचा समकालीन होता. कपर्दिन याने तिसऱ्या गोविंदासाठी महत्त्वाची कामगिरी बजावली व त्याचे बक्षीस म्हणून गोविंदाने कपर्दिनला उत्तर कोकणचा शासक बनविले असे मानले जाते.[८] उत्तर कोकणात मुंबई, टाणे आणि रायगड जिल्ह्यांचा समावेश असून कोकण-१४०० हे त्याचे पारंपरिक नाव होते.[९]

कपर्दिनच्या नंतर पुल्लशक्ती हा राज्यावर आला. कान्हेरी येथील त्याच्या शिलालेखातील कालोल्लेख अस्पष्ट आहे. तथापि, कीलहॉर्न यांनी शके ७६५ असे त्याचे वाचन केले आहे व म. म. वा. वि. मिराशी यांनी देखील ते बरोबर असल्याचे म्हटले आहे.[१०] या शिलालेखात पुल्लशक्तीने आपला उल्लेख ''महासामन्त'' असा केला असून राष्ट्रकूट पहिला अमोघवर्ष याच्याकडून आपल्याला कोकणचे राज्य प्राप्त झाल्याचे त्याने विधान केले आहे.[११] पुल्लशक्ती नंतर दुसरा उर्फ लघु कपर्दिन हा कोकणचा शासक बनला. अरिकेसरीच्या ठाणे ताम्रपटानुसार दुसरा कपर्दिन राज्यावर आला तेव्हा अल्पवयीन होता, आणि तरीही त्याचा शत्रूवर वचक होता, कान्हेरी येथील लेण्यात त्याच्या काळातील इ. स. ८५४ आणि ८७८ मधील दोन शिलालेख प्राप्त झाले असून त्याद्वारे त्याने कान्हेरी येथील बौद्ध विहारास कायम स्वरुपाची देणगी दिल्याची नोंद केली आहे.[१२]

दुसऱ्या कपर्दिनच्या नंतर त्याचा पुत्र वप्पुवन्न हा राज्यावर आला. त्याच्या कारकिर्दीत राष्ट्रकूट राजा दुसरा कृष्ण याने उत्तर कोकणातील संयान मंडल (हल्लीच्या दक्षिण गुजरातमधील बलसाड जिल्ह्यातील संजानचा परिसर) या भागावर अरब प्रमुख मधुमती उर्फ महम्मद याची सामंत म्हणून नियुक्ती केली. महम्मद त्याचा मुलगा शहरियार आणि नातू सुबक्त हे इ. स. ९७४ मध्ये झालेल्या राष्ट्रकूट सत्तेच्या अखेरपर्यंत संजान मंडळाचे प्रशासक होते. राष्ट्रकूटांच्या पतनानंतर शिलाहार अपराजित याने या अरब प्रशासकांना पराभूत करून संजान मंडल आपल्या राज्यात समाविष्ट केले.[१३]

शिलाहार झंझ हा वप्पुवन्नाचा उत्तराधिकारी होता. तो शैव पंथाचा अनुयायी असून त्याने शिवाची बारा मंदिरे बांधली होती, परंतु सध्या त्यातील एकही अस्तित्वात नाही.[१४] झंझानंतर त्याचा धाकटा भाऊ गोग्गिराज राज्यावर आला. त्यानंतर गोग्गिराजाचा मुलगा वज्जड याची अल्पकालीन कारकीर्द झाली. वज्जडानंतर त्याचा भाऊ छदवैदेव हा उत्तर कोकणचा शासक बनला. त्याच्या कारकिर्दीची माहिती त्याच्या एकमेव प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयातील उपलब्ध ताम्रपटावरून मिळते.[१५] त्याचे नाव शिलाहारांच्या राजवंशावळीत समाविष्ट नसल्यामुळे त्याने राज्य बळकाविले असावे असे इतिहासकार मानतात.

**अपराजित :** छदवैदेवानंतर त्याचा पुतण्या व वज्जडाचा पुत्र अपराजित हा शिलाहार नृपती बनला. त्याच्या कारकिर्दीत दक्षिणेतील राष्ट्रकूट राजवट संपुष्टात येऊन दुसरा तैल चालुक्य हा सत्ताधीश झाला.[१६] परंतु अपराजिताने आपल्या राजशासनात कल्याणच्या चालुक्यांऐवजी राष्ट्रकुटांना आपले स्वामी मानून त्यांची वंशावळ नमूद केली. यावरून चालुक्यांचे स्वामित्व त्याने मान्य केले नव्हते हे स्पष्ट होते. आपण स्वतंत्र आणि सार्वभौम शासक आहोत हे दाखविण्यासाठी त्याने पश्चिम समुद्राधिपती आणि मांडलिक त्रिनेत्र अशी बिरुदे धारण केली. तसेच त्याने अनेक दिग्विजय प्राप्त केले. संजानच्या अरब शासकास पराभूत करून तो प्रदेश जिंकल्याचा वर उल्लेख आलेला आहेच. त्याशिवाय त्याने देशावरील पुणे, दक्षिणेकडील चिपळूण, संगमेश्वर आणि गोवा हे प्रदेश जिंकून संपूर्ण कोकणची किनारपट्टी आपल्या नियंत्रणाखाली आणली. त्याच्या राज्याच्या सीमा उत्तरेस दक्षिण गुजरात, दक्षिणेस गोवा, पश्चिमेस अरबीसमुद्र तर पूर्वेस यादव भिल्लमाच्या राज्याशी म्हणजे खानदेशशी भिडल्या होत्या.

अपराजिताने केलेला आपल्या प्रदेशाचा विस्तार, त्याने धारण केलेली स्वतंत्र राज्याची बिरुदे, परमारांशी त्याने जोडलेले मित्रत्व आणि चालुक्यांच्या सार्वभौमत्वास न मानण्याची त्याची वृत्ती या बाबी लक्षात घेऊन त्याला धडा शिकविण्यासाठी दुसऱ्या तैलाचा युवराज सत्याश्रय याने कोकणवर स्वारी केली. चालुक्य सैन्याचा प्रचंड सागर

एका बाजूस आणि दुसऱ्या बाजूस असलेल्या पश्चिम सागराच्या कात्रीत अडकल्यामुळे अपराजिताने सत्याश्रयाशी शरणागती पत्करली व २१ हत्तींची खंडणी देऊन त्याने चालुक्यांचे सार्वभौमत्व स्वीकारले.[१७] परंतु सत्याश्रयाची पाठ वळताच त्याने आपला पवित्रा बदलला आणि इ. स. १०१० मधील आपल्या मृत्यूपर्यंत त्याने चालुक्यांना आव्हान देणे चालूच ठेवले. अपराजितानंतर त्याचा पुत्र दुसरा वज्जड हा राज्यावर आला. त्याच्या राजकीय जीवनाविषयी फारशी माहिती उपलब्ध नाही. बहुधा त्याच्या कन्येचा विवाह हंगल येथील कदंब प्रमुख छट्टदेव ह्याच्याशी झाला होता.[१८]

दुसऱ्या वज्जडानंतर त्याचा धाकटा भाऊ अरिकेसरी उर्फ पहिला केशिदेव हा कोकणचा शासक बनला. युवराज असताना त्याने परमार सिंधुराजा बरोबर त्याच्या छत्तीसगड आणि सौराष्ट्रातील मोहिमात भाग घेतला होता.[१९] परंतु त्याच्या कारकिर्दीत परमार भोजाने कोकणवर स्वारी केली आणि काही काळपर्यंत त्यावर आपले वर्चस्व प्रस्थापित केले.[२०] परंतु अरिकेसरीचा पुतण्या छित्तराज याने परमारांच्या वर्चस्वातून लौकरच आपला प्रदेश मुक्त केला. मध्यन्तरी इ. स. १०२४ मध्ये चालुक्य जयसिंहाने दक्षिण कोकणावर स्वारी करून तेथील शिलाहारांना आपले स्वामित्व स्वीकारण्यास भाग पाडले.[२१] तेथून उत्तर कोकणात येण्याचा त्याचा विचार होता पण तो फलद्रुप झाला नाही. इ. स. १०२६ मधील आपल्या कोरीव लेखात छित्तराजाने चालुक्यांचा उल्लेख केलेला नाही.[२२]

अरिकेसरीनंतर त्याचा पुतण्या छित्तराज हा इ. स. १०२६ च्या सुमारास राज्यावर आला. छित्तराजाचा पितामह अपराजित याने आपल्या प्रदेशावर केलेल्या आक्रमणाचा बदला घेण्यासाठी गोव्याचा कदंब षष्टदेव याने छित्तराजाच्या कारकिर्दीत कोकणवर स्वारी केली. त्याने आपल्या स्वारीत कोकणसहित अनेक प्रदेश जिंकले व तेथील शासकाकडून खंडण्या वसूल केल्या. छित्तराजासही कदंबांचे श्रेष्ठत्व मान्य करून आपला प्रदेश ताब्यात ठेवणे शक्य झाले. त्याचवेळी कोल्हापूरचा शिलाहार राजा गोंक याने दक्षिण कोकणवर स्वारी करून तो प्रदेश जिंकला.[२३]

छित्तराज हा विद्या आणि कलांचा भोक्ता आणि आश्रयदाता होता. त्याने कल्याणजवळील अंबरनाथ येथील शिवमंदिराच्या बांधकामास प्रारंभ केला. उदयसुंदरीकथा या काव्याचा कर्ता कवि सोढ्ढल याला छित्तराजाने आश्रय दिला व ''कविप्रदीप'' ही उपाधी बहाल करून त्याचा गौरव केला.

नागार्जुन हा छित्तराजाचा धाकटा भाऊ त्याचा उत्तराधिकारी बनला. चालुक्यांचे सार्वभौमत्व न स्वीकारण्याचे आपल्या पूर्वजांचे धोरण त्याने पुढे चालू ठेवले व स्वतःस गौरविण्यासाठी नरेंद्र नागार्जुन आणि कोदंड-सहस्त्रार्जुन ही बिरुदे धारण केली. त्याने इ. स. १०३५ ते १०४५ या काळात राज्य केले. वर वर्णन केल्याप्रमाणे चालुक्य सत्याश्रयाने शिलाहार अपराजिताचा पराभव केल्यानंतरही त्याने व त्याच्या वंशजांनी

चालुक्यांची अधिसत्ता स्वीकारली नव्हती. चालुक्य पहिला सोमेश्वर याने शिलाहारांना कायमचा धडा शिकविण्यासाठी कोकण मोहीम हाती घेण्याचे ठरविले. आपले इतर मांडलिक असलेले काकतीय, यादव, हैहेय आणि कदंब यांच्या सहाय्याने त्याने इ. स. १०४५ मध्ये कोकणवर स्वारी केली.[२४] या लढाईत नागार्जुन धारातीर्थी पडला. सोमेश्वराने नागार्जुनाचा धाकटा भाऊ मुम्मुनिराज याला आपला मांडलिक म्हणून कोकणचे राज्य बहाल केले.

मुम्मुनीने छित्तराजाद्वारा बांधलेल्या अंबरनाथ येथील मंदिराच्या पूजा-अर्चेसाठी गावे दान दिली.[२५] कमकुवत झालेल्या शिलाहारांना मुम्मुनीच्या काळात चालुक्यांचे स्वामित्व आणि कदंबांचे श्रेष्ठत्व स्वीकारावे लागले.[२६] त्याचा फायदा घेऊन संजान येथील शिलाहारांच्या अंकित असलेल्या मोढ बिज्जलाने त्यांची बिरुदे धारण करून बंडखोरी केली. त्यामुळे इ. स. १०५३ मध्ये मुम्मुनीने बिज्जलाकडून संजानचा कारभार काढून घेतला.[२७]

इ. स. १०७० मध्ये मुम्मुनीचा मृत्यू झाला व त्यापाठोपाठ त्याचा मुलगा व नागार्जुनाचा मुलगा अनंतपाल यांच्यात वारसा हक्काबाबत वाद सुरू झाला. शेवटी अनंतपालाचा विजय होऊन तो सत्ताधीश झाला. त्याने पश्चिम समुद्राधिपती आणि संपूर्ण कोकणचा स्वामी ही बिरुदे धारण केली.[२८] अनन्तपालाच्या कारकिर्दीच्या अखेरीस गोव्याचा कदंब पहिला जयकेशी याने कोकणवर स्वारी केली. अनन्तपालास ठार करून कोकणचा समावेश आपल्या राज्यात केला.[२९] लवकरच अनन्तपालाचा उत्तराधिकारी पहिला अपरादित्य याने कदंबांचा पराभव करून आपले पैत्रक राज्य त्यांच्या दास्यत्त्वातून मुक्त केल्याचे वर्णन अपरादित्याच्या वडवली ताम्रपटात आढळते.[३०]

अपरादित्य हा स्वतः विद्वान असून याज्ञवल्क्य स्मृतीवरील अपरार्कटीका नावाचा ग्रंथ त्याने लिहिला. अपरादित्याने इतर समकालीन राजांच्या दरबारात आपले प्रतिनिधी पाठविण्याची प्रथा सुरू केली. मंख कवीच्या ''श्रीकंठचरित'' या ग्रंथात अपरादित्याने काश्मीरच्या राजाकडे तेजकंठ नावाचा राज प्रतिनिधी पाठविल्याची माहिती देण्यात आली आहे.[३१] या तेजकंठाने अपरादित्य लिखित अपरार्कटीका काश्मीरमध्ये लोकमान्य बनविली. अपरादित्यानंतर हरिपालदेव हा त्याचा उत्तराधिकारी झाला. ठाणे परिसरात उपलब्ध झालेल्या त्याच्या कोरीव लेखावरून हरिपालदेवाने इ. स. ११४८ ते ११५५ या काळात राज्य केल्याची माहिती मिळते.[३२] विशेष म्हणजे त्याच्या काळातील कोरीव लेखात पहिल्यांदा संस्कृतबरोबर मराठीचा वापर केल्याचे दिसून येते.

शिलाहार मल्लिकार्जुन हा हरिपालदेवाचा उत्तराधिकारी होता. त्याच्या काळातील दोन कोरीव लेखात त्याच्याविषयी माहिती नमूद करण्यात आली आहे. पहिल्या आलेखात त्याने प्रणालक प्रांताचा "दण्डाधिपती" म्हणनू सुपय्याची नियुक्ती तर दुसऱ्यात एका शिवमंदिराचा जीर्णोद्धार याविषयी नोंद करण्यात आलेली आहे.[३३] हेमचंद्र रचित "कुमारपालचरित"[३४] आणि मेरुत्तुंग विरचित "प्रबंध-चिंतामणी"[३५] या ग्रंथातील माहितीनुसार गुजरातचा सोळंकी राजा कुमारपाल याने मल्लिकार्जुनाच्या काळात कोकणवर स्वारी केली. मिराशी यांच्या मतानुसार मेरुत्तुंगाने या युद्धाचे व त्यामागील कारणांचे जे वर्णन केले आहे ते विश्वास ठेवण्यायोग्य वाटत नाही.[३६] या युद्धात शिलाहारांचा पराभव होऊन मल्लिकार्जुन यास रणांगणावर वीरगती प्राप्त झाली.

मल्लिकार्जुनाचा उत्तराधिकारी दुसरा अपरादित्य याच्या राजशासनात त्याच्या नावाबरोबर महाराजाधिराज आणि कोकण चक्रवर्ती अशी सार्वभौम शासकाची बिरुदे लावलेली आढळतात.[३७] यावरून त्याने सोलंकीच्या दास्यत्त्वातून आपले राज्य मुक्त केले असे मानले जाते. दुसऱ्या अपरादित्यानंतर दुसरा अनंतदेव याची अल्पकालीन (इ. स. ११९८ ते १२००) कारकीर्द झाल्यानंतर दुसरा केशिदेव हा कोकणचा राजा झाला. त्याच्या कोरीव लेखावरून त्याला प्रदीर्घ अशी पंचेचाळीस वर्षांची कारकीर्द लाभली (इ. स. १२०० ते १२४५).[३८] यादव नरेश दुसरा सिंघण याने पराभूत केलेला व मांडलिक म्हणून आपले राज्य परत मिळविणारा केशी म्हणजे शिलाहार दुसरा केशिदेव होय असे इतिहासकार मानतात.

तिसरा अनंतदेव हा दुसऱ्या केशिदेवाचा उत्तराधिकारी असून त्याच्या काळातील एकमेव कोरीव लेख दिवे-आगर येथील इ. स. १२५४ मधील शिलालेख होय.[३९] तिसऱ्या अनंतदेवाचा उत्तराधिकारी सोमेश्वर हा उत्तर कोकणच्या शिलाहार शाखेतील अखेरचा शासक ठरला. राज्यावर आल्यावर त्याने महाराजाधिराज आणि कोकण चक्रवर्ती ही सार्वभौम निदर्शक बिरुदे लावली व यादवांचे अधिपत्य अमान्य केले.[४०] त्यामुळे यादव नरेश कृष्ण (इ. स. १२४७ ते १२६१) याने सेनापती मल्ल याच्या नेतृत्वाखाली कोकणवर स्वारी केली, परंतु त्याला फारसे यश प्राप्त झाले नाही. यादव महादेव याने हस्तिदलाच्या संरक्षणाखाली प्रचंड सैन्यासह पुन्हा कोकणवर स्वारी केली. सोमेश्वराचा पराभव होऊन त्याने समुद्राचा आश्रय घेतला. परंतु महादेवाने त्याचा पाटलाग करून सोमेश्वरास समुद्रात बुडविले.[४१] इ. स. १२६५ च्या सुमारास घडलेल्या या घटनेने उत्तर कोकणच्या शिलाहारांची ४५० वर्षांची राजवट संपुष्टात आणली. महादेवाने अच्युत नासकाची प्रांतिक प्रशासक पदावर नियुक्ती केली व तेव्हापासून कोकण हा यादव राज्याचा एक प्रांत बनला.

पुरी किंवा घारापुरी (मुंबई जवळील एलिफन्टा बेट) शिलाहारांची प्रारंभीच्या काळातील राजधानी होती. चालुक्य सत्याश्रयाच्या आक्रमणाच्यावेळी ते नगर उध्वस्त झाले. त्यामुळे अपराजिताने राजधानी ठाण्यास हलविली. शिलाहार राजवटीच्या अखेरपर्यंत ठाणे हीच शिलाहारांची राजधानी होती. शिलाहारांनी मराठी भाषेला राजभाषा बनविले. त्यांच्या राजवटीचा कायमचा ठसा कोकणच्या आणि पर्यायाने महाराष्ट्राच्या इतिहास आणि संस्कृतीवर उमटला आहे.

## उत्तर कोकणच्या शिलाहारांची वंशावळ



## दक्षिण कोकणचे शिलाहार

राष्ट्रकूट पहिल्या कृष्णाने दक्षिण कोकण जिंकून आपल्या राज्यात समाविष्ट करून दक्षिण कोकणच्या शिलाहार शाखेचा संस्थापक सणफुल्ल याची त्या प्रांताचा प्रशासक म्हणून नियुक्ती केली. सणफुल्लाचा नववा वंशज रट्टराज याने आपल्या राजशासनात कृष्णाने आपल्या पूर्वजांवर केलेल्या कृपेचा आवर्जून उल्लेख केला आहे.[४२] इ. स. ९८८ मधील अवसराचा पट्टणकुडी ताम्रपट, इ. स. १००८ मधील रट्टराजाचा खारेपाटण ताम्रपट आणि त्याचाच इ. स. १०१० मधील बलिपट्टण ताम्रपट या तीन कोरीव लेखांद्वारे या शाखेचा इतिहास उपलब्ध होतो.[४३] त्या साधनांच्या आधारे म. म. वा. वि. मिराशी यांनी दक्षिण कोकणच्या शिलाहारांची वंशावळ आणि त्यांची कालगणना पुढील प्रमाणे निश्चित केली आहे.

सणफुल्ल (इ. स. ७६५ ते ७८५)
|
धम्मियार (इ. स. ७८५ ते ८२०)
|
अय्यपराज (इ. स. ८२० ते ८४५)
|
अवसर पहिला (इ. स. ८४५ ते ८७०)
|
आदित्यवर्मन (इ. स. ८७० ते ८९५)
|
अवसर दुसरा (इ. स. ८९५ ते ९२०)
|
इंद्रराज (इ. स. ९२० ते ९४५)
|
भीम (इ. स. ९४५ ते ९७०)
|
अवसर तिसरा (इ. स. ९७० ते ९९५)
|
रट्टराज (इ. स. ९९५ ते १०२४)

राष्टकूट पहिल्या कृष्णराजाचा मांडलिक म्हणून सणफुल्ल हा सह्याद्रि आणि अरबी समुद्रामधील गोवा व त्यालगतच्या प्रांतांचे प्रशासन चालवित होता. त्याचा उत्तराधिकारी धम्मियार याने बलिपट्टण (बलियत्तन) हे शहर वसविल्याची माहिती वरील ताम्रपटात आढळते. परंतु ग्रीक लेखक टॉलेमीने आपल्या ग्रंथात या नगराचा उल्लेख केला आहे. तसेच वराहमिहिराच्या बृहत्संहितेतही याची नोंद आढळून येते. त्यामुळे असे मानले जाते की, अगोदर अस्तित्वात असलेल्या या नगरास तटबंदी बांधून धम्मियाराने ते आपल्या राजधानीसाठी निवडले. वा. वि. मिराशी यांच्या मते बलिपट्टण म्हणजे आजचे रत्नागिरी जिल्ह्यातील खारेपाटण असून रट्टराज शिलाहाराचा

एक ताम्रपट येथे प्राप्त झालेला आहे.[४४] धम्मियाराने गोव्यास लागून असलेला दक्षिण कोकणचा प्रदेश जिंकला व त्यामुळे प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने त्याने खारेपाटणला आपली राजधानी स्थलांतरित केली असे मानले जाते. धम्मियाराचा उत्तराधिकारी अय्यपराज याने आक्रमक धोरणाचा अवलंब करून चंद्रपूर जिंकले. चंद्रपूर ही गोव्याची राजधानी असून आज ते चांदोर या नावाने ओळखले जाते. यावरून असे स्पष्ट होते की, सणफुल्लाच्या कारकिर्दीच्या अखेरीस शत्रूंनी चंद्रपूर जिंकले होते व त्यामुळे धम्मियाराला आपली राजधानी बलिपट्टण येथे हलवावी लागली होती. अय्यपराजाने त्या अपमानाचा बदला घेतला व प्राप्त झालेल्या पैतृक राज्याचा विस्तार केला.

रट्टराजाच्या ताम्रपटानुसार पहिला अवसर हा अय्यपराजाचा उत्तराधिकारी होता. परंतु बहुधा अनवधानाने त्याचे नाव पट्टणकुडी ताम्रपटातील शिलाहारांच्या वंशावळीत देण्याचे राहून गेले असावे. अवसर याने राजनीतीचा सखोल अभ्यास केला होता. त्याच्यानंतर आदित्यवर्मन आणि दुसरा अवसर हे या शाखेतील शासक होऊन गेले.

दुसऱ्या अवसराने चेमूल्य आणि चंद्रपूर येथील राजांना सहाय्य केल्याचे वर्णन या शाखेच्या कोरीव लेखात आढळते.[४५] यातील चेमूल्य म्हणजे टॉलेमीच्या ग्रंथातील सेमूल्ल असून त्याची निश्चिती मुंबईच्या दक्षिणेस ५० किलोमीटर अंतरावर असणाऱ्या रायगड जिल्ह्यातील चौल बंदराशी करण्यात आलेली आहे. दुसऱ्या अवसराने सैनिकी सहाय्य केलेला तिथला शासक बहुधा उत्तर कोकणचा शिलाहार राजा वप्पुवन याचा मांडलिक असावा. वप्पुवन हा अल्पवयीन असल्याचा फायदा घेऊन चौलच्या प्रमुखाने त्याच्याविरुद्ध बंड केले व याकामी दुसऱ्या अवसराने त्याला सहाय्य केले असावे असे इतिहासकार मानतात. दुसऱ्या अवसराने आपल्या या कृत्याद्वारे उत्तर कोकणवर आपले राजकीय वर्चस्व प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला असे दिसते. दुसऱ्या अवसराने ज्या चंद्रपूरच्या राजाला संरक्षण दिले तो अय्यपराजाने पराभूत करून आपला मांडलिक बनविलेल्या चंद्रपूरच्या शासकाचा वंशज असावा. या काळात चंद्रपूर ही गोव्याच्या कदंबांची राजधानी होती. अय्यप्पाने प्रतिष्ठापीत केलेला गोव्याचा कदंब राजा म्हणजे या शाखेचा संस्थापक कण्टकाचार्य असावा असे मत मिराशी यांनी व्यक्त केले आहे.[४६]

दुसऱ्या अवसरानंतर राज्यावर आलेल्या त्याचा पुत्र इंद्रराज याने दानधर्म करून आपली कारकीर्द आनंदात व्यतित केली. त्याच्यानंतर राज्यावर आलेला इंद्रराजाचा पुत्र भीम हा महापराक्रमी होता. त्याने चंद्रमंडल (गोवा परिसर) जिंकून आपल्या राज्यात सम्माविष्ट केले. या बाबतीत भीमाने आपला पितामह दुसरा अवसर याच्या विपरित धोरण स्वीकारले. मिराशींच्या मतानुसार भीमाच्या आक्रमणाची झळ बसलेला कदंब राजा बहुधा षष्टदेव किंवा त्याचा उत्तराधिकारी गुहल्ल असावा.

भीमाचा उत्तराधिकारी तिसरा अवसर हा बुद्धिमान, शूर, देखणा असून विद्वानांचा चाहता आणि आश्रयदाता होता. इ. स. ९८८ मध्ये त्याने जारी केलेल्या पट्टणकुडी ताम्रपटाच्या अगोदर १५ वर्षे राष्ट्रकूट सत्तेचा अस्त होऊन दुसऱ्या तैलाने आपल्या घराण्याची सत्ता प्रस्थापित केलेली असताना देखील अवसराने चालुक्यांचे सार्वभौमत्व मान्य करण्याऐवजी राष्ट्रकूट घराण्याची वंशावळ या ताम्रपटाच्या सुरुवातीला नमूद करून त्यांच्याशी आपली निष्ठा व्यक्त केली होती. त्याच्यानंतर इ. स. ९९५ च्या सुमारास रट्टराज राज्यावर आला. त्याच्या तीस वर्षांच्या कारकिर्दीत कल्याण चालुक्यांनी आपले स्वामित्व मान्य न करणाऱ्या बंडखोरांविरुद्ध मोहीम उघडून त्यांना अंकित केले होते. ही जाणीव ठेऊन रट्टराजाने आपल्या खारेपाटण ताम्रपटात चालुक्य सत्याश्रय याच्या नावाचा उल्लेख आपला अधिपती म्हणून केला.

सत्याश्रयाच्या मृत्यूनंतर राज्यावर आलेल्या पाचव्या विक्रमादित्याच्या नेमस्त स्वभावाचा व चौल आणि चालुक्य यांच्यातील संघर्षाचा फायदा घेऊन रट्टराजाने पुन्हा चालुक्यांचे अधिपत्य झुगारून दिले. चालुक्य जयसिंहाने राज्यावर आल्यावर दक्षिण कोकणवर स्वारी करून रट्टराजाचा पूर्ण पराभव केला. त्याचे पुढे काय झाले याची कुठे नोंद आढळत नाही. अशा रीतीने दक्षिण कोकणावरील शिलाहारांची राजवट एकाएकी संपुष्टात आली. जयसिंहाच्या या विजयाचे वर्णन त्याच्या इ. स. १०२४ मधील मिरज ताम्रपटात सविस्तर आले आहे. त्यावेळी जयसिंहाने कोल्हापूर येथे आपली छावणी टाकली होती. तेथूनच हा ताम्रपट जारी करण्यात आला होता.

अशा रीतीने दक्षिण कोकणच्या शिलाहारांनी इ. स. ७६५ ते १०२४ पर्यंत म्हणजे जवळपास अडीच शतके या प्रदेशावर राज्य केले. काही वेळा त्यांनी उत्तर कोकणातील चौल आणि गोव्यातील चंद्रपूर हे प्रदेश जिंकून आपल्या राज्याचा विस्तार केला होता. राष्ट्रकूटांचे एकनिष्ठ मांडलिक म्हणून त्यांनी राज्याचा उपभोग घेतला, परंतु कल्याणच्या चालुक्यांविरुद्धच्या त्यांच्या बंडखोर वृत्तीमुळे शेवटी त्यांना आपले राज्य गमवावे लागले. जयसिंह चालुक्याने त्यानंतर काही काळ कोल्हापूरच्या शिलाहाराकडे दक्षिण कोकणचे शासन सोपविले होते, पण पुढे तो प्रदेश गोव्याच्या कदंबांच्या स्वाधीन करण्यात आला. कारण गोव्याचे कदंब हे चालुक्य सहावा विक्रमादित्य याचे सोयरे असल्यामुळे त्यांचा कदंबावर वरदहस्त होता. त्यामुळे यापुढील काळात दक्षिण कोकण किंवा कोकण-९०० हा प्रदेश वंशपरंपरेने गोव्याच्या कदंबाकडे राहिला.

## कोल्हापूरचे शिलाहार

कोल्हापूरचे शिलाहार ही दक्षिणेतील शिलाहार राजवंशाची तिसरी शाखा असून त्यांच्या राज्यात दक्षिण महाराष्ट्रातील सांगली, सातारा आणि कोल्हापूर हे तीन जिल्हे आणि कर्नाटकातील बेळगाव जिल्ह्याचा समावेश होता. प्राचीन काळी हा भाग

कुंतलदेश या नावाने ओळखला जात असून तो कृष्णा खोऱ्याचा वरील भाग होता.[४७] इ. स. च्या चौथ्या शतकाच्या मध्यास कुंतल देशावर मानपूरच्या राष्ट्रकूट राजवंशाचे शासन होते. राष्ट्रकूट मानाङ्क हा या राजवंशाचा संस्थापक असून आपल्या नावावरून ओळखल्या जाणाऱ्या मानपूर या नगराची त्याने आपल्या राजधानीसाठी निवड केली. मानपूर हे सध्याचे सातारा जिल्ह्यातील माण असून एका तालुक्याचे नाव होय. गुप्त सम्राट दुसरा चंद्रगुप्त विक्रमादित्य याच्याशी या राजवंशाचे मित्रत्वाचे संबंध असून नंतर या राष्ट्रकुटांनी वाकाटकांचे स्वामित्व स्वीकारले होते. सातव्या शतकाच्या तिसऱ्या दशकात चालुक्य दुसरा पुलकेशी याच्याद्वारे पराभूत होईपर्यंत कुंतल देश मानपूरच्या राष्ट्रकुटांच्या शासनाखाली होता.[४८] यापुढील काळात आठव्या शतकाच्या मध्यापर्यंत कुंतल देशावर बदामीच्या चालुक्यांचे शासन होते. आठव्या शतकाच्या मध्यापासून दहाव्या शतकाच्या आठव्या दशकापर्यंत तेथे मालखेडच्या राष्ट्रकुटांचे शासन होते.

राष्ट्रकुटांच्या आमदनीत कुंतल देशाचे प्रशासन कोणाकडे सोपविले होते याविषयी निश्चित माहिती उपलब्ध नाही. परंतु कोरीव लेखातील माहितीनुसार या भागावर सिंद प्रमुखांचे शासन असावे असे दिसते. हे सिंद शासक आपला "करहाटपुरवराधीश्वर" असा उल्लेख करतात. यावरून कऱ्हाड, जिल्हा सातारा येथून हे सिंद या प्रदेशाचे प्रशासन चालवित होते हे स्पष्ट होते. महासामन्त सिंद आदित्यवर्मन याचा इ. स. ९६५ मधील अपूर्ण ताम्रपट सापडला असून त्यात पुण्याच्या पश्चिमेस २५ कि. मी. अंतरावर इंद्रायणी नदीच्या काठावरील किन्ही या गावाच्या दानाची नोंद आढळते. पुणे जिल्ह्यातील नारायणगाव येथे सिंद शासकाचा इ. स. १०११ मधील आणखी एक ताम्रपट उपलब्ध झाला आहे.[४९] यावरून म. म. मिराशी यांनी असे विधान केले आहे की कराड येथून सिंद प्रशासकांनी या भागाचे प्रशासन अकराव्या शतकापर्यंत चालविले होते.[५०]

या नंतरच्या काळात सिंदांचे कोरीव लेख या भागात आढळत नाहीत. उलट कोल्हापूर शाखेतील प्रारंभीचे शिलाहार राजे कऱ्हाड येथे वास्तव्य करून असल्याची माहिती या शाखेच्या कोरीव लेखात आढळते. मारसिंहाच्या मिरज ताम्रपटात त्याचा पूर्वज शिलाहार दुसरा जतिग हा महापराक्रमी असून त्याने अनेक शत्रूंचा पराभव करून त्यांचे प्रदेश जिंकल्याची नोंद आहे. यावरून दुसऱ्या जतिगाने या भागावरील सिंदांचे प्रशासन संपवून तेथे आपली सत्ता प्रस्थापित केली हे स्पष्ट होते. त्याची प्रारंभीच्या काळातील राजधानी कऱ्हाड होती.

उत्तर आणि दक्षिण कोकणच्या शिलाहार शाखांप्रमाणे या शाखेतील राजे जीमुतवाहनास आपल्या वंशाचा मूळ पुरुष मानत असून "तगरपुरवराधीश्वर" हे पारंपरिक बिरुद लावतात. परंतु त्यांच्यात जवळचे नाते असल्याचा पुरावा आढळत नाही. आपल्या वंशास देवी महालक्ष्मीच्या कृपेने राज्यप्राप्ती झाली अशी त्यांची श्रद्धा होती. या शाखेच्या तीन राजधान्या असल्याचे उल्लेख त्यांच्या कोरीव लेखात

आढळतात.[५१] यापैकी पहिली राजधानी प्रणालक किंवा पद्मनाल, (कोल्हापूरच्या उत्तरेस २० कि. मी. अंतरावर असलेला पन्हाळगड) दुसरी क्षुल्लकपुर म्हणजे सध्याचे कोल्हापूर व तिसरी वलिवाड किंवा वलयवाड (कोल्हापूरच्या पूर्वेस १० कि. मी. अंतरावर असले वळिवडे) ही होय. परंतु या तीन राजधान्या होण्यापूर्वी दुसऱ्या जतिगाच्या काळात कऱ्हाड ही या शाखेची राजधानी असल्याची माहिती बिल्हण कवीच्या विक्रमांकदेव चरितावरून मिळते.[५२] त्यात सहाव्या विक्रमादित्याचा सासरा व त्याची राणी चंद्रलेखा हिचा पिता कऱ्हाडनिवासी शिलाहार प्रमुख असल्याचे वर्णन आले आहे. त्याचे नाव बिल्हणाने दिलेले नाही. परंतु काळाचा विचार करता तो दुसऱ्या जतिगाचा नातू मारसिंह (इ. स. १०५० ते १०७५) असावा. मारसिंहाचा पिता गोङ्क याने इ. स. ९८० मधील मिरज ताम्रपट कऱ्हाड येथून जारी केला होता. सहावा विक्रमादित्य आणि चंद्रलेखा यांच्या स्वयंवर विवाहानंतर केव्हा तरी या शाखेची राजधानी कऱ्हाडहून कोल्हापूरास हलविण्यात आली. तरीही पुढील काळातील काही शिलाहारांचे वास्तव्यस्थान कऱ्हाड हेच होते. या शाखेची राजवंशावळ पुढीलप्रमाणे आहे.[५३]



ज्याअर्थी, मारसिंहाच्या मिरज ताम्रपटानुसार शके ९८० (इ. स. १०५८) ही या राजवंशाची सर्वात पूर्वीची ज्ञात तिथी आहे आणि मारसिंह हा या शाखेचा मूळ पुरुष पहिल्या जतिगाचा पाचवा वंशज आहे. त्याअर्थी पहिला जतिग आणि त्याचे नजीकचे वंशज राष्ट्रकुटांच्या काळात होऊन गेले.[५४] परंतु कोकणच्या शिलाहाराप्रमाणे ते आपणास राष्ट्रकुटांचे मांडलिक मानीत नसत.

तथापि या शाखेतील सुरुवातीच्या प्रमुखांचे राष्ट्रकुटांशी सोयरे संबंध असून त्यांच्या राज्यातील काही प्रांतांचे ते प्रशासन चालवित असावेत. शिलाहार पहिला जतिग हा तलकडचा पश्चिम गंग राजा पेर्माडी उर्फ मारसिंह याचा मामा होता. हा मारसिंह राष्ट्रकूट सम्राट तिसऱ्या कृष्णाचा मेव्हणा बुटुग याचा पुत्र होता. मारसिंहाने तिसऱ्या कृष्णाच्या अनेक मोहिमात सक्रीय भाग घेतला होता. तसेच अखेरच्या वेळी राष्ट्रकूट सत्तेचे रक्षण करण्याचा प्रयत्न केला होता. जतिग शिलाहारास मारसिंहाने राष्ट्रकूट कृष्णाकडून शिमोगा जिल्ह्यातील एका प्रांताच्या प्रशासनाचे अधिकार मिळवून दिले होते.[५५] शिलाहार गणुरादित्य याच्या कोल्हापूर येथील कोरीव लेखात पहिल्या जतिगाचे वर्णन गोमंथ दुर्गाचा अधिपती म्हणून करण्यात आले आहे.[५६] गोमंथ या नावाची एक टेकडी कर्नाटकाच्या शिमोगा जिल्ह्यात आहे. यावरून जतिग हा राष्ट्रकुटांच्या प्रशासकीय सेवेत असावा असे दिसते. यापेक्षा त्याच्याविषयी अधिक माहिती उपलब्ध नाही. त्याचे उत्तराधिकारी नसिवर्मन आणि चंद्राजांच्या राजकीय जीवनाविषयी देखील फारशी माहिती आढळत नाही.

शिलाहार दुसरा जतिग याने सिंदांचा पराभव करून दक्षिण महाराष्ट्रावर आपली सत्ता प्रस्थापित केली व आपली राजधानी म्हणून त्याने कऱ्हाडची निवड केली. त्यानंतर त्याने कोल्हापूर जवळील पन्हाळगड जिंकून आपल्या राज्याचा दक्षिणेकडे आणखी विस्तार केला. कल्याणच्या चालुक्यांच्या वर्चस्वाखालील हे प्रदेश त्याला जिंकणे शक्य झाले कारण त्यावेळी चालुक्य राज्यावर दक्षिणेकडून चोलांचे व उत्तरेकडून परमारांचे हल्ले चालू होते. यावेळी त्याने चालुक्यांना सहाय्य करून बदल्यात हे प्रदेश मिळविले असावेत. कारण त्याचा उत्तराधिकारी गुहल याच्यावर चालुक्य सत्याश्रयाची कृपा होती.[५७] हेमचंद्राच्या द्वाश्रयकाव्यानुसार इ. स. ९९५ ते इ. स. १००८ या काळात राज्यावर असलेल्या गुजरातचा चौलुक्य राजा चामुंडराज याच्याकडे कोल्हापूर नरेशाने उत्कृष्ट माणकांचा नजराणा पाठविला होता.[५८] या काळात शिलाहार दुसरा जतिग हाच कोल्हापूरचा राजा होता. जतिगाने बहुधा आपले राजकीय स्थान मजबूत करण्याच्या दृष्टीने मैत्रीचे प्रतीक म्हणून हा नजराणा पाठविला असावा.

वर उल्लेख केलेल्या मारसिंहाच्या मिरज ताम्रपटात दुसऱ्या जतिगाचा मुलगा व उत्तराधिकारी गोङ्क हा करहाट, कुंडि, मिरिंजदेश आणि कोकणंचा बराच मोटा भाग यावर राज्य करीत असल्याचे वर्णन आले आहे. यावरून त्याच्या राज्यात सातारा,

सांगली, कोल्हापूर आणि लगतचा दक्षिण कोकणचा काही भाग आणि कर्नाटकातील बेळगाव जिल्हा समाविष्ट होता असे दिसते. कल्याणचा चालुक्य राजा दुसरा जयसिंह याच्या इ. स. १०२४ मधील मिरज ताम्रपटानुसार त्याने आपल्या दक्षिण कोकणच्या स्वारीच्या वेळी कोल्हापूर येथे आपली छावणी टाकली होती, आणि रट्टराजाचा पराभव करून दक्षिण कोकण जिंकले होते. या स्वारीत गोङ्काने जयसिंहास सहाय्य केले असावे, त्याचे बक्षीस म्हणून जयसिंहाने काही काळ दक्षिण कोकण गोङ्काच्या ताब्यात दिले असावे.[५९] यापुढील काळात कोल्हापूरच्या शिलाहारांनी कल्याणच्या चालुक्यांचे मांडलिकत्व स्वीकारले होते.

गंडरादित्याच्या ताळले ताम्रपटात पहिला गुहल आणि कीर्तिराज हे गोङ्काचे भाऊ असून शासक असल्याचे वर्णन आले आहे.[६०] त्याचप्रमाणे विजयादित्याच्या कोल्हापूर ताम्रपटात गोङ्काचा तिसरा भाऊ चंद्रादित्याचा उल्लेख आला आहे.[६१] हे तिन्ही भाऊ राजे असल्याचा उल्लेख असल्यामुळे मिराशी यांनी असे विधान केले आहे की त्यांनी प्रांतिक प्रशासक म्हणून विविध भागांचे शासन चालविले असावे.[६२] गोङ्काचा उत्तराधिकारी त्याचा मुलगा मारसिंह असल्याची माहिती त्याच्या इ. स. १०५८ मधील मिरज ताम्रपटावरून मिळते.[६३] त्याने स्वतःस महामंडलेश्वर म्हटले आहे. परंतु आपल्या सार्वभौम शासकाच्या नावाचा उल्लेख केलेला नाही.

मारसिंहाच्या काळात चालुक्य सोमेश्वराच्या विरुद्ध राजराज चोल याने निकराचा हल्ला चढविला होता. आपल्या पूर्वजांप्रमाणे चालुक्यांचा सामंत म्हणून मारसिंहाने सोमेश्वरास या चोल आक्रमणाचा प्रतिकार करण्याच्या कामी सर्वतोपरी मदत केली. चोल सैन्याने गंगवाडीवर स्वारी करून तो प्रदेश पादाक्रांत केला व वाटेतील अनेक शहरे जाळून उध्वस्त करून कोप्पमच्या किल्ल्याला वेढा दिला.[६४] पहिल्या सोमेश्वराने चोल सैन्याचा शर्थीने प्रतिकार केला व या लढाईत खुद्द राजराज चोल ठार झाला, परंतु राजराजाचा मुलगा राजेंद्र चोल याने संकटावर मात करून मुसंडी मारली व चालुक्य सैन्याचा पराभव करून विजय खेचून घेतला. विजयी राजेंद्र चोल कोप्पम येथे आपला विजयस्तंभ उभारूनच राजधानीस परतला.[६५] पराभूत पहिल्या सोमेश्वराने बहुधा आपला सामंत शिलाहार मारसिंह याच्या ताब्यात असलेल्या दक्षिण कोकणात आश्रय घेतला असावा. चोल सैन्य परत गेल्यावर सोमेश्वराने आपला गेलेला प्रदेश परत मिळविला. त्यामुळे दोन्ही पक्ष आपल्या विजयाचा दावा करतात.

शके १०६५ मधील शिलाहार विजयादित्याच्या कोल्हापूर शिलालेखानुसार मारसिंहास पाच पुत्र होते.[६६] त्यांच्यापैकी काहींना प्रांतिक प्रशासक म्हणून नेमण्यात आले तर काही राज्यावर आले. बिल्हणाच्या विक्रमांकदेव चरितात चालुक्य विक्रमादित्य सहाव्या आणि चंद्रलेखा उर्फ चंदलादेवी या शिलाहार राजकन्येच्या स्वयंवर विवाहाचे वर्णन आले आहे.[६७] त्यात त्याने चंदलादेवी असामान्य रूपवती, विदूषी आणि विविध कलात पारंगत असल्याचे म्हटले आहे. तिचा पिता कोण होता

याचा त्याने उल्लेख केलेला नाही परंतु काळाचा विचार करता, तो शिलाहार मारसिंहच असला पाहिजे.

दुसरा गुहल हा मारसिंहाचा ज्येष्ट पुत्र त्याचा उत्तराधिकारी झाला. त्याचा राज्यकाल इ. स. १०७५ ते १०८५ असा होता. त्याच्या राज्यकाळातील एकही कोरीव लेख उपलब्ध नाही. मारसिंहाचा दुसरा मुलगा गोइक हा राज्यावर आला नाही. कारण विजयादित्याचा वरील कोल्हापूर शिलालेख वगळता शिलाहारांच्या कोणत्याही कोरीव लेखात याविषयी नोंद आढळत नाही.[६८] शिलाहारांच्या बहुतेक कोरीव लेखात दुसऱ्या गुहलानंतर पहिल्या भोजदेवाचे नाव आढळते. तो पराक्रमी आणि महत्त्वाकांक्षी होता. गंडरादित्याच्या शके १०३७ मधील कोल्हापूर ताम्रपटात त्याच्या काही दिग्विजयांचे वर्णन आढळते.[६९] तो चालुक्य सहाव्या विक्रमादित्याचा विश्वासू आणि एकनिष्ट मांडलिक असून त्याने कदंब दुसरा शांतिवर्मन याला पराभूत करण्यात कोंगलाचा (अज्ञात शत्रू) शेवट करण्यात, बिज्जलाचे (हा बहुधा पहिल्या सोमेश्वराचा मंगळवेढा येथील कलचुरी सामंत असावा) बंड मोडून काढण्यात आणि अज्ञात अशा कोक्कलाचा शेवट करण्याच्या कामात विक्रमादित्याला सहाय्य केले.[७०] भोजाचे इतर पराक्रम म्हणजे वेणुग्रामाचे दहन, कुरंजच्या गोविंदाचा नाश, कोकणविजय आणि भिल्लमाची सुटका हे होत. वेणुग्राम म्हणजे सध्याचे बेळगाव असून ते सौंदत्तीच्या रट्टाच्या प्रदेशात होते, तर गोविंद हा खानदेशातील मौर्य वंशातील सामंत होता.[७१] कोकणचा राजा म्हणजे उत्तर कोकणचा शिलाहार सामंत अनंतपाल होय. भिल्लम हा चालुक्यांचा यादव वंशीय सामंत होता. याशिवाय येलबुर्ग येथील सिंदांचा देखील भोजाने पराभव केला होता.[७२] सततच्या विजयामुळे भोजाची महत्त्वाकांक्षा वाढत गेली व त्याने आपला स्वामी चालुक्य सहावा विक्रमादित्य याच्याविरुद्ध बंड केले. इ. स. १०८९ व ११०० मध्ये त्याची आणि विक्रमादित्याची लढाई होऊन शेवटच्या लढाईत भोज मारला गेला.[७३] त्याने इ. स. १०८५ ते ११०० या काळात राज्य केले.

भोजानंतर त्याचा भाऊ बल्लाळ याने इ. स. ११०० ते ११०८ या कालावधीत राज्य केले. मारसिंहाचा सर्वात धाकटा मुलगा गंडरादित्य हा बल्लाळाचा उत्तराधिकारी असून तो इ. स. ११०८ च्या सुमारास राज्यावर आला. ताळले ताम्रपटानुसार इ. स. १११० ही गंडरादित्याच्या कारकिर्दीची सर्वात अगोदरची ज्ञात तिथी होय.[७४] कोल्हापूरच्या शिलाहारांच्या ताब्यातील वंशपारंपारिक प्रदेशाशिवाय भोजाने शांतिवर्मन कदंबाचा पराभव करून जिंकलेला दक्षिण कोकण देखील गंडरादित्याच्या राज्यात समाविष्ट होता. चालुक्य सहावा विक्रमादित्य हा गणुरादित्याचा अधिपती असून त्याने आपल्या या शिलाहार मांडलिकास निःशंकमल्ल (निर्भिड पैलवान) या बिरुदाने गौरविले होते.[७५] खुद्द गंडरादित्याच्या कोरीव लेखात त्याचे लोक कल्याणकारी कार्य, लोकोपयोगी योजना आणि सर्व धर्मविषयीचा आदरभाव याविषयीची प्रशस्ती असून

त्याने हिंदू, बौद्ध आणि जैन देवतांची मंदिरे बांधून त्यांच्या चरितार्थासाठी भूमिदाने दिल्याची नोंद करण्यात आली आहे.[७६]

शिलाहार दुसरा भोज याने आपल्या एका कोरीव लेखात आपला पितामह गंडरादित्य याने स्थानक किंवा ठाण्याच्या राजाला त्याची गेलेली सत्ता परत मिळवून दिल्याचा उल्लेख केला आहे.[७७] हे वर्णन गोव्याचा कदंब दुसरा जयकेशी याने केलेल्या उत्तर कोकणवरील स्वारीच्या व तीत आपले राज्य गमाविलेल्या पहिल्या अपरादित्याने मदतीसाठी गंडरादित्यास केलेल्या विनंतीच्या संदर्भातील असावे. चोलांच्या आक्रमणाच्यावेळी आपल्या चालुक्य अधिपतीच्या मदतीसाठी गंडरादित्याने आपला सामंत निंबदेवरस यास सैन्यासह पाठविले होते.[७८]

गंडरादित्यानंतर त्याचा उत्तराधिकारी विजयादित्य हा इ. स. ११३८ च्या सुमारास राज्यावर आला. कारण शके १०६१ मधील एकसांबी येथील शिलालेखात पाडेवाल जिन हा लढाईत मारला गेल्याचा उल्लेख असून त्यावेळी विजयादित्याचे शासन असल्याची नोंद करण्यात आली आहे.[७९] ही तिथी २९ जानेवारी ११३९ या दिवशी येते. त्यावरून विजयादित्याची कारकीर्द ११३८ मध्ये सुरू झाली हे स्पष्ट होते.

विजयादित्याच्या राज्यकाळात कल्याणच्या चालुक्य सत्तेला उतरती कळा लागली होती. सहाव्या विक्रमादित्याचे आक्रमक धोरण आणि एकतंत्री कारभार यामुळे चालुक्यांचे अनेक मांडलिक दुखावले गेले होते. त्यामुळे त्याचे उत्तराधिकारी तिसरा सोमेश्वर, दुसरा जगदेकमल्ल, तिसरा तैल आणि चौथा सोमेश्वर यांना बंडखोर सामंतांनी सर्व बाजूंनी घेरून त्रस्त केले. कोल्हापूरच्या शिलाहारांनी देखील या परिस्थितीचा फायदा घेतला. कारण तिसऱ्या तैलाविरुद्धच्या बंडात बिज्जल कलचुरीस सामील झालेल्या चालुक्य सामंतात शिलाहार विजयादित्याचा समावेश होता.[८०]

बिज्जल कलचुरी आणि कोल्हापूरचे शिलाहार यांच्यातील संबंध पुढे बिनसले. विजयादित्याने बिज्जलास आपला स्वामी मानण्यास नकार दिला व आपण स्वतंत्र आणि सार्वभौम शासक असल्याची घोषणा केली. विजयादित्य बिज्जलाने बोलावले असताना देखील दरबारात हजर झाला नाही. त्यामुळे बिज्जलाने विजयादित्याविरुद्ध मोहीम हाती घेतली. या लढाईत बिज्जल कलचुरीचा विजय झाल्याचे बिज्जल चरित या ग्रंथात म्हटले आहे तर शिलाहार विजयादित्याच्या खिद्रापूर येथील शिलालेखात त्याने आपला सेनापती बोप्पन याचा बिज्जलाला पराभूत केल्याबद्दल गौरव केला आहे.[८१]

विजयादित्याने ठाणे आणि गोवा येथील राजांना त्यांची गेलेली सत्ता परत मिळवून दिल्याची माहिती शिलाहारांच्या दस्तैवजात आढळते. यापैकी ठाण्याचा शिलाहार पहिला अपरादित्य याला करण्यात आलेली मदत गंडरादित्याच्या राज्यकालातील असून तिचा उल्लेख वर आला आहे. गोव्याचा पुनर्स्थापित केलेला शासक बहुधा कदंब

विजयादित्य उर्फ विष्णुचित हा असावा कारण कलचुरी आहवमल्लाने त्याच्या राज्यावर आक्रमण केले होते.[८२]

विजयादित्यानंतर दुसरा भोज हा त्याचा उत्तराधिकारी झाला. तो या राजवंशातील शेवटचा आणि सर्वात पराक्रमी राजा होता. आपल्या शौर्याबद्दल त्याने वीर भोज ही उपाधी प्राप्त केली होती.

भोजाच्या काही कोरीव लेखात जरी त्याचा उल्लेख महामंडलेश्वर म्हणून आला असला तरी तो पारंपरिक असून इतर साधनातील त्याच्या सार्वभौमत्व दर्शक बिरुदावरून तो स्वतंत्र आणि सार्वभौम शासक बनला होता हे स्पष्ट होते. कारण सोमदेवाने जैनेंद्र व्याकरणावरील आपल्या "शब्दार्णव चंद्रिका" या टीका ग्रंथात भोजाला राजाधिराज, परमेश्वर, परमभट्टारक आणि पश्चिम चक्रवर्ती अशा सार्वभौम राजाच्या बिरुदावलीने गौरविले आहे.[८३]

देवगिरीचे यादव दक्षिणेत सत्तेवर आल्यानंतर त्यांच्यात आणि शिलाहार भोजात संघर्ष अटळ होता. यादवनरेश दुसऱ्या सिंघणाने शिलाहारांच्या प्रदेशावर स्वारी केली. दोन्ही सैन्यात खिद्रापूरजवळ निकराची लढाई होऊन शिलाहारांचा तीत केवळ पराभवच झाला असे नव्हे, तर दुसरा भोज पकडला गेला. सिंघणाने पन्हाळगड जिंकून भोजास तिथे बंदिवासात ठेवले.[८४]

अशा प्रकारे इ. स. १२१२ च्या सुमारास यादवांनी कोल्हापूरच्या शिलाहार वंशाचा शेवट करून तो प्रदेश आपल्या राज्यात सामिल करून त्याच्या प्रशासनाची जबाबदारी आपल्या प्रांतिक प्रशासकाकडे सोपविली.

———

## तळटिपा

१ जीमूतवाहनाची मूळ कथा पैशाची भाषेत रचलेल्या गुणाढ्याच्या "बृहत्कथा" या ग्रंथातील असून हा ग्रंथ अनुपलब्ध आहे. त्यावर आधारित असलेल्या सोमदेवकृत "कथासरित्सागर" (XXII, १६–२५७, XC, ३–२०१) आणि क्षेमेंद्रकृत "बृहत्कथामंजिरी" (IV, ५०–१०८, IX, ७६६–९३०) संस्कृत ग्रंथांमध्ये ती आढळते.

२ **इ. आय.,** खंड–२७, पृ. ७०.

३ **सी. आय. आय.,** खंड–६, क्र. ५, ७, ८, ९.

४ कित्ता, खंड–४, पृ. ११०, व त्यापुढे आणि १२३ व त्यापुढे.

५ **इ. आय.,** खंड–३२, पृ. ४८.

६ मिराशी, व्ही. व्ही., "इन्स्क्रिप्शन्स् ऑफ दि शिलाहाराज," **सी. आय. आय.,** खंड–६, पृ. ६.

७ **इ. आय.,** खंड–३८, पृ. १७, **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड–१६, पृ. ५ व त्यापुढे; **जे. ओ. आय.,** खंड–९, पृ. १४१ व त्यापुढे.

८ **सी. आय. आय.,** खंड–६, शिलालेख क्र. १, **इ. आय.,** खंड–१२, पृ. ३००.

९ **सी. आय. आय.,** खंड–४, पृ. १५७.

१० कित्ता, खंड–६, प्रस्तावना, पी. एक्स आणि शिलालेख क्र. १ व ८.

११ **आय. ए.,** खंड–१३, पृ. १३६.

१२ **सी. आय. आय.,** खंड–६, शिलालेख क्र. ८, **आय. ए.,** खंड–१३, पृ. १३४ व त्यापुढे.

१३ **इंपोर्टंट इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम दि बरोडा स्टेट,** खंड–१, पृ. २५ व त्यापुढे.

१४ **आय. ए.,** खंड–९, पृ. ३३ व त्यापुढे.

१५ **सी. आय. आय.,** खंड–६, शिलालेख क्र. ४.

१६ कित्ता, शिलालेख क्र. ५ व ६.

१७ **आय. ए.,** खंड–४०, पृ. ४१.

१८ **इ. आय.,** खंड–१५, पृ. ३३३.

१९ **सी. आय. आय.,** खंड–६, शिलालेख क्र. ८.

२० **इ. आय.,** खंड–११, पृ. १८२ व त्यापुढे; खंड–१८, पृ. ३२२ व त्यापुढे.

२१ **आय. ए.,** खंड–८, पृ. १८.

२२ कित्ता, खंड–५, पृ. २७७.

२३ **जे. आर. ए. एस.,** खंड–४, पृ. २७७.

२४ **हिस्टरी ॲण्ड कल्चर ऑफ इंडियन पिपल,** खंड–५, पृ. १७१.

२५ **इ. आय.,** खंड–२५, पृ. ५३ व त्यापुढे, **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड–९, पृ. २१९ व त्यापुढे.

२६ **इ. आय.,** खंड–१३, पृ. ३१०.

२७ कित्ता, खंड–३२, पृ. ६३.

२८ **आय. ए.,** खंड–९, पृ. ३३.

२९ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड–९, पृ. २६६.

३० कित्ता, खंड–२१, पृ. ५०५.

३१ **श्रीकंठचरित,** अध्याय–२५, पृ. १०९–१०.

३२ तुळपुळे, शं. गो., **प्राचीन मराठी कोरीव लेख,** पृ. ४३.

३३ कित्ता, पृ. ५३, **बॉम्बे गॅझेटिअर,** खंड–१, भाग–२ (जुनी आवृत्ती), पृ. १९.

३४ **कुमारपालचरित,** अध्याय–६, मिराशी, व्ही. व्ही. ४०–७०.

३५ शास्त्री, डी. के., (संपा.), **प्रबंध चिंतामणि,** १९३२, पृ. १३०.

३६ मिराशी, व्ही. व्ही., **सी. आय. आय.,** खंड–६, प्रस्तावना, पृ. १८.

३७ तुळपुळे, शं. गो., पूर्वोक्त, पृ. ७२.

३८ **सी. आय. आय.,** खंड–६, नं. १०, ३४, ३६.

३९ कित्ता, नं. ३७.

४० तुळपुळे, शं. गो., पूर्वोक्त, पृ. १५९.

४१ **हिस्टरी ॲंड कल्चर ऑफ इंडियन पिपल,** खंड–५, पृ. १९२ आणि टोसर, एच. एस., **स्टडीज इन इंडियन प्लेस नेम्स,** खंड–१४, पृ. ३८.

४२ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड–१०, पृ. ३६५–६६ आणि मिराशी, वा. वि., **शिलाहार राजवंशाचा इतिहास व कोरीव लेख,** नागपूर, १९७४, पृ. ४१–४२.

४३ **सी. आय. आय.,** खंड–६, शिलालेख क्र. ४०, ४१, ४२.

४४ **सी. आय. आय.,** खंड–६, शिलालेख क्र. ४०, ४१, ४२.

४५ कित्ता, शिलालेख क्र. ४१, मिराशी, व्ही. व्ही. १७–१८.

४६ कित्ता, प्रस्तावना, पृ. २३ आणि **आय. ए.,** खंड–८, पृ. १८.

४७ **इ. आय.,** खंड–७, पृ. १५३; **ए. आर. आय. इ.,** १९५३–५४, नं.१८

४८ मिराशी, व्ही. व्ही., **स्टडीज इन इन्डोलॉजी,** खंड–४, पृ. १२४ व त्यापुढे **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड–२ (ओल्ड सिरीज), पृ. १२.

४९ **इ. आय.,** खंड–२५, पृ. १६४.

५० **सी. आय. आय.,** खंड–६, प्रस्तावना, पृ. २६.

५१ कित्ता, शिलालेख क्र. ४३, ४८, ४९, ५३, ५४, ५८, ५९, ६०.

५२ **विक्रमाङ्कदेवचरित,** अध्याय–८, व्ही. २.

५३ **सी. आय. आय.,** खंड–६, पृ. २७.

५४ कित्ता, शिलालेख क्र. ४३.

५५ कित्ता, पृ. २८.

५६ कित्ता, शिलालेख क्र. ४६, ओळ ६ वी.

५७ कित्ता, शिलालेख क्र. ४३, ओळ १४ वी.

५८ हेमचंद्र, **दिव्याश्रयकाव्य,** खंड–३२.

५९ **आय. ए.,** खंड–८, पृ. १८.

६० **सी. आय. आय.,** खंड–६, शिलालेख क्र. ४५.

६१ कित्ता, शिलालेख क्र. ५३.

६२ कित्ता, प्रस्तावना, पृ. २९.

६३ कित्ता, शिलालेख क्र. ४३.

६४ **हिस्टॉरिकल इन्स्क्रिप्शन्स ऑफ साऊथ इंडिया,** पृ. ७०, **एस. आय. आय.** खंड–३, पृ. ५६ व त्यापुढे.

६५ **एस. आय. आय.,** खंड–३, पृ. ५८, ६३.

६६ **सी. आय. आय.,** खंड–६, शिलालेख क्र. ५३.

६७ **विक्रमाङ्कदेवचरित,** अध्याय ८, ९.

६८ **बॉम्बे गॅझेटिअर,** खंड–१ (जुनी आवृत्ती), भाग–२, पृ. ३०५.

६९ **सी. आय. आय.,** खंड–६, शिलालेख क्र. ४६.

७० **इ. आय.,** खंड–२४, पृ. १७८.

७१ कित्ता, खंड–२, पृ. २२५.

७२ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड–११ (जुनी आवृत्ती), पृ. २६९.

७३ देसाई, पी. बी., **ए हिस्टरी ऑफ कर्नाटक,** पृ. १७५.

७४ **सी. आय. आय.,** खंड–६, शिलालेख क्र. ४५.

७५ कित्ता, शिलालेख क्र. ४६.

७६ कित्ता, शिलालेख क्र. ४५–५१; **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड–१३, पृ. १ व त्यापुढे; **इ. आय.,** खंड–१९, पृ. ३१ व त्यापुढे; खंड–२३, पृ. २८ व त्यापुढे.

७७ **सी. आय. आय.,** खंड–६, शिलालेख क्र. ६०.

७८ कित्ता, शिलालेख क्र. ४९.

७९ **ए. आर. आय. इ.,** १९५९–६०, नं. ३९६.

८० **सी. आय. आय.,** खंड–६, शिलालेख क्र. ६०, ओळ १८ वी.

८१ कुंदनगर, के. जी., **इन्स्क्रिप्शन्स इन नॉदर्न कर्नाटक ॲण्ड कोल्हापूर स्टेट,** १९३९, पृ. १७५.

८२ **सी. आय. आय.,** खंड–६, प्रस्तावना, पृ. ३३.

८३ **आय. ए.,** खंड–१०, पृ. ७६, क्र. २.

८४ कुंदनगर, के. जी., उपरोक्त, पृ. १७९; **बॉम्बे गॅझेटिअर** (जुनी आवृत्ती), खंड–१, भाग–२, पृ. २५४; **इ. आय.,** खंड–२५, पृ. २०३.

———

## प्रकरण १२

# देवगिरीचे यादव *

कर्नाटकातील इतिहास संशोधक श्री. नृसिंहमूर्ती यांनी देवगिरीचे यादव या सर्वमान्य राजवंशाचा उल्लेख देवगिरीचे सेऊण असा केला आहे.[१] त्यांच्या मते यादव हे नाव पौराणिक असून ते होयसळ, बंगालचे सेन इत्यादी तसेच दक्षिण भारतातील अनेक मध्ययुगीन राजवंशांनी आपल्या घराण्यासाठी उपयोगात आणले आहे,[२] तर सेऊण हे नाव या वंशाचा संस्थापक सेऊणचंद्र याच्या नावाशी संबंधित असून कल्याणचे चालुक्य, काकतीय आणि होयसळांनी त्यांना या नावाने संबोधले आहे. असे असले तरी देवगिरीचे यादव स्वतःचा उल्लेख सेऊण न करता यादववंशीय असाच करतात आणि हेच नामाभिधान बहुतांशी सर्व इतिहासकारांनी मान्य केले आहे. स्वाभाविकपणे देवगिरीचे यादव यांच्या नावाने हा राजवंश नोंदवण्यात आला आहे.

हेमाद्रीच्या चतुर्वर्ग चिंतामणी[३] या ग्रंथात यादवांची संपूर्ण वंशावळ आणि इतिहास नमूद करण्यात आलेला असून या वंशाची उत्पत्ती चंद्रापासून दार्खविण्यात आलेली आहे. सुबाहूचा पुत्र दृढप्रहार हा या वंशाचा मूळ पुरुष द्वारावती (द्वारका, गुजरात) येथून दक्षिणेत आला व राज्य स्थापून श्रीनगर (सिन्नर, जिल्हा नाशिक) ही त्याने आपली राजधानी म्हणून निवडली. असे वर्णन हेमाद्रीने पुढे केले आहे. जिनप्रभासुरीकृत नाशिककल्पाचा[४] प्रभाव असलेल्या यादवांच्या काही कोरीव लेखात[५] दृढप्रहार हा द्वारावतीहून येऊन चंद्रादिव्यपूर (चांदवड, जिल्हा नाशिक) येथे स्थायिक झाल्याचे वर्णन आढळते. या कोरीव लेखानुसार दृढप्रहाराचा मुलगा पहिला सेऊणचंद्र याने सिंदिनगर (सिन्नर, जिल्हा नाशिक) भागातील सेऊणपूर इथे आपली राजधानी स्थलांतरित केली. डॉ. श्रीनिवास रित्ती दृढप्रहार आणि त्याचे द्वारकेहून झालेले स्थलांतर अनैतिहासिक असल्याचे मानतात.[६] ते सेऊणचंद्राने सेऊणपूर इथे राजधानी स्थापन करण्याची घटना ऐतिहासिक मानतात, कारण नंतरच्या काळातील सेऊणचंद्राचे वर्णन ''सेऊणपुरवराधीश्वर'' असे करण्यात आल्याचा ते दाखला देतात.[७] त्यामुळे काही इतिहासकारांना दृढप्रहाराच्या ऐतिहासिकतेविषयी शंका असून पहिला सेऊणचंद्र हाच यादव राजवंशाचा संस्थापक असल्याचा ते दावा करतात.

यादवांच्या प्रारंभीच्या काळातील राजधान्या सिन्नर आणि चांदवड तसेच नंतरच्या काळातील राजधानी देवगिरी (दौलताबाद, जिल्हा औरंगाबाद) या सर्व महाराष्ट्रातील असून देखील नरसिंह मूर्ती आणि श्रीनिवास रित्ती यादवांना महाराष्ट्रीय मानत नाहीत. यादव राजांची नावे, कानडी राजघराण्याशी असलेले त्यांचे सोयरसंबंध, कुंतल आणि

* या प्रकरणाचे मूळ इंग्रजी लेखन डॉ. एस्. जे. मंगलम् (प्राध्यापक, पुरातत्व विभाग, डेक्कन महाविद्यालय, पुणे) यांनी केलेले असून त्याचा मराठी अनुवाद डॉ. हरिहर ठोसर (निवृत्त प्रपाठक, इतिहास विभाग प्रमुख, एल्फिन्स्टन महाविद्यालय, मुंबई) यांनी केला आहे.

कर्नाट देशाचे शासक ही त्यांची पदवी आणि कानडी भाषेतील त्यांचे बहुतेक कोरीव लेख इत्यादी पुराव्यावरून यादव हे मूळचे कानडी मुलखातील होत असा त्यांचा दावा आहे.[८] परंतु या दाव्यात फारसे तथ्य नाही. कारण यादव साम्राज्याचा विस्तार लक्षात घेतल्यास त्यात संपूर्ण महाराष्ट्र समाविष्ट असून कर्नाटकाचा केवळ उत्तर भाग त्यात होता. महाराष्ट्राच्या इतिहासात यादव कालखंडाचे विशेष महत्त्व आहे कारण मराठी कला आणि संस्कृतीच्या जडणघडणीत यादवांचे अतिशय महत्त्वाचे योगदान असल्याबद्दल महाराष्ट्रीयांना यादवांविषयी अभिमान वाटतो.

यादवांच्या उपलब्ध वंशावळीत अनेक गुंतागुंती आहेत. यादवांच्या अखेरच्या राजाचा मंत्री असलेल्या हेमाद्रीने या वंशाचा निर्माता असलेल्या चंद्रापासून आपला आश्रयदाता असलेल्या महादेवापर्यंतच्या राजांची सविस्तर वंशावळ दिली आहे. त्याने यासाठी पारंपरिक साधनांचा आधार घेतलेला असल्यामुळे परस्परांशी प्रत्यक्ष कसलाही संबंध नसलेल्या पुरुषांची नावे या वंशावळीत आलेली आहेत. ही वंशावळ कोरीव लेखातील माहितीशी विसंगत आहे. एवढेच नव्हे तर विविध कोरीव लेखातील माहिती देखील परस्पराशी जुळत नाही. असे असूनही विविध संशोधकांनी केलेल्या कामामुळे या वंशाचे स्पष्ट चित्र रेखाटणे शक्य झाले आहे.

या वंशावळी पहिल्या सेऊणचंद्रापासून सुरू होतात. सेऊणचंद्राचा राज्यकाल इ. स. ८३५ ते ८६० असा गृहीत धरण्यात आलेला आहे. सेऊणचंद्रापासूनच्या त्याच्या उत्तराधिकाऱ्यांनी साडेतीनशे वर्षापर्यंत म्हणजे ९ व्या शतकाच्या मध्यापासून बाराव्या शतकाच्या अखेरपर्यंत अगोदर राष्ट्रकूटांचे व त्यानंतर कल्याणच्या चालुक्यांचे मांडलिक म्हणून आपल्या प्रदेशाचे शासन चालविले. शेवटी कल्याणच्या चालुक्यांचा शेवट करून त्यांनी आपल्या सार्वभौमत्वाची द्वाही फिरविली.

**पहिला सेऊणचंद्र (इ. स. ८३५ ते ८६०)** : हेमाद्रीची प्रशस्ती[९] तसेच कळस बुद्रुक आणि संगमनेर[१०] ताम्रपटातील वंशावळीत पहिला सेऊणचंद्र हाच या वंशाचा मूळ पुरुष असल्याचा उल्लेख असून त्याच्या नावावरून त्याच्या राज्याचा सेऊणदेश असा उल्लेख करण्यात आला आहे. तिसऱ्या भिल्लमाच्या देवळाली ताम्रपटानुसार सेऊणचंद्राने सिंदिनेर भागात सेऊणपूर शहर वसविले.[११] सेऊणचंद्राच्या राज्यकालाची निश्चिती त्याचा चौथा वंशज वद्दिग[१२] आणि वद्दिगाचा स्वामी राष्ट्रकूट तिसरा कृष्ण (इ. स. ९३९ ते ९६७) यांच्यातील समकालीनत्वावर आधारलेली आहे. प्रत्येक राजाचा राज्यकाल सरासरी २५ वर्षे गृहित धरल्यास सेऊणचंद्राचा राज्यकाल इ. स. ८३५ ते ८६० असा येतो. याचा अर्थ राष्ट्रकूट पहिला अमोघवर्ष याचा सेऊणचंद्र हा मांडलिक होता.

सेऊणचंद्राचे पहिले तीन उत्तराधिकारी अनुक्रमे पहिला धाडियप्पा, पहिला भिल्लम आणि राजुगी यांच्या राजकीय जीवनाविषयी माहिती उपलब्ध नाही. राजुगीचा उत्तराधिकारी पहिला वद्दिग हा असून त्याच्या विषयीची माहिती उपरिनिर्दिष्ट संगमनेर

ताम्रपटात देण्यात आलेली आहे. त्यानुसार वद्दिगाचा विवाह महानृप धोरप्पा याच्या कन्येशी झाला होता. कीलहॉर्न यांच्या मते धोरप्पा हे ध्रुव या संस्कृत नावाचे अपभ्रष्ट रूप असून त्या नावाचा राष्ट्रकूट तिसऱ्या कृष्णाचा एक भाऊ होता.[१३] यावरून असा तर्क करण्यात येतो की वद्दिग हा कृष्णाचा पिता तिसरा अमोघवर्ष याचा समकालीन आणि मांडलिक असावा. तिसऱ्या अमोघवर्षाचे मूळ नाव वद्दिग असेच होते. दोघांच्या नामसादृश्यावरून या दोघात निकटचे संबंध असल्याचे जाणवते. वद्दिगाचा राज्यकाल इ. स. ९३५ ते ९७० असा गृहीत धरण्यात आला आहे.

**दुसरा भिल्लम (इ. स. ९७० ते १००५)** : आपल्या राज्यकालाच्या सुरुवातीलाच भिल्लमाला दक्षिणेतील बदलत्या राजकीय स्थितीचा सामना करावा लागला. तिसऱ्या कृष्णाच्या कारकिर्दीनंतर राष्ट्रकूटांच्या सत्तेची घसरण सुरू झाली व लवकरच दुसऱ्या तैलाने या राजवटीचा शेवट करून दक्षिणेत चालुक्य सत्तेची पुनर्स्थापना केली. संगमनेर ताम्रपटानुसार दुसऱ्या भिल्लमाने कल्याणच्या चालुक्यांची अधिसत्ता स्वीकारली. सेऊणदेश हा कल्याण चालुक्य राज्याच्या उत्तरसीमेवर व परमार राज्याच्या सीमेवर असल्यामुळे दुसऱ्या तैलाच्या परमारांविरुद्धच्या मोहिमेत दुसऱ्या भिल्लमास भाग घ्यावा लागला. त्यामुळे परमार मुंजाच्या तैलाकडून झालेल्या पराभवात दुसऱ्या भिल्लमाचा महत्त्वाचा वाटा होता. भिल्लमाची राणी लक्ष्मी उर्फ लच्छिअव्वा ही उत्तर कोकणचा शिलाहार राजा झंझ याची कन्या होती.[१४] ती एक कर्तबगार प्रशासक होती. दुसऱ्या भिल्लमाचा व लक्ष्मीचा मुलगा वेसुगी (इ. स. १००५ ते १०१०) हा अकाली निधन पावल्यानंतर त्याचा अल्पवयीन मुलगा तिसरा भिल्लम याला राज्यावर बसवून लक्ष्मीने राजपालिका म्हणून यशस्वीपणे राज्यकारभार चालविल्याची माहिती दुसऱ्या सेऊणचंद्राच्या वसई ताम्रपटावरून मिळते.[१५]

**तिसरा भिल्लम (इ. स. १०१० ते १०५५)** : कल्याणच्या चालुक्यांच्या कोरीव लेखातील माहितीवरून तिसऱ्या भिल्लमाने चालुक्यांचे स्वामित्व मान्य करण्यास नकार देऊन बंडखोरी करण्याचा प्रयत्न केल्याचे दिसते. चालुक्य जयसिंह[१६] आणि पहिल्या सोमेश्वराच्या[१७] काही कोरीव लेखात काही चालुक्य सेनानींना भिल्लमदिशापट्ट (भिल्लमाचा पराभव करणारा) आणि सेऊणदिशापट्ट (सेऊणदेशाचा विजेता) या पदव्या देऊन गौरविण्यात आलेले दिसते. पहिला सोमेश्वर हा शक्तिशाली असून देखील त्याने तिसऱ्या भिल्लमाच्या औद्धत्याबद्दल त्याला शासन करण्याऐवजी त्याचे सामर्थ्य आपल्या बाजूस वळविण्याच्या दृष्टीने आपली बहीण अव्वलादेवी हिचा तिसऱ्या भिल्लमाशी विवाहसंबंध जुळविला. त्यामुळे पुढील काळात तिसऱ्या भिल्लमाने आपली सर्व शक्ती चालुक्यांच्या पाठीशी उभी केली.[१८]

तिसऱ्या भिल्लमाचा ज्येष्ठ पुत्र दुसरा वद्दिग हा अकाली निधन पावल्यामुळे व त्याचा मुलगा दुसरा सेऊणचंद्र अल्पवयीन असल्यामुळे धाकटा पुत्र दुसरा वेसुगी राज्यावर आला. त्याने इ. स. १०५५ ते १०६८ अशी तेरा वर्षे राज्य केले.

**दुसरा सेऊणचंद्र (इ. स. १०६८ ते १०८०)** : दुसऱ्या वेसुगीच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा चौथा भिल्लम याने राज्याचा खरा वारसदार असलेल्या दुसऱ्या सेऊणचंद्राचा हक्क डावलून काही काळ गादी बळकावली. परंतु दुसऱ्या सेऊणचंद्राने चौथ्या भिल्लमाचा पराभव करून त्याचे अल्पकालीन शासन संपविले व राज्याचा ताबा मिळविला.[१९] सत्ता मिळविण्यासाठी सेऊणचंद्राने कोल्हापूरचा शिलाहार राजा पहिला भोज याची मदत घेतली असावी. कारण गंडरादित्याच्या कोल्हापूर ताम्रपटात भोजाने भिल्लमास ठार केल्याचा उल्लेख आलेला आहे.[२०]

दुसरा सेऊणचंद्र राज्यावर आला त्यावेळी यादवांचे अधिपती असलेल्या चालुक्य दुसरा सोमेश्वर आणि त्याचा भाऊ सहावा विक्रमादित्य यांच्यात गृहयुद्ध सुरू होते. सेऊणचंद्राने सहाव्या विक्रमादित्याचा पक्ष घेतला. शेवटी या संघर्षात विक्रमादित्याचा विजय होऊन त्याला राज्यप्राप्ती झाल्याचा फार मोठा लाभ सेऊणचंद्रास मिळाला. विक्रमादित्याने सेऊणचंद्रास नर्मदा नदीपर्यंतचा प्रदेश बहाल केला. त्यामुळे सेऊणचंद्राची प्रतिष्ठा आणि वैभव या दोन्हीत भर पडली. त्याचा देवळाली ताम्रपट आणि हेमाद्रीची प्रशस्ती या दोन्ही साधनातून वरील घटनेस दुजोरा मिळतो.[२१]

**ऐरम्मदेव (इ. स. १०८० ते ११९०)** : दुसऱ्या सेऊणचंद्रानंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र ऐरम्मदेव हा उत्तराधिकारी झाला. ऐरम्मदेवाने आपल्या पित्याच्या कारकिर्दीत चालुक्य दुसऱ्या सोमेश्वराचा पराभव करून सहाव्या विक्रमादित्यास चालुक्य सिंहासन प्राप्त करून दिले होते. त्यामुळे सेऊणचंद्राप्रमाणे ऐरम्मदेवावर देखील विक्रमादित्याचा वरदहस्त चालू राहिला व यादव राज्याचा विस्तार नर्मदेपर्यंत झाल्याची माहिती ऐरम्मदेवाच्या अश्वी ताम्रपटावरून मिळते.[२२]

**पहिला सिंघण (इ. स. ११९० ते ११४५)** : ऐरम्मदेवानंतर त्याचा धाकटा भाऊ पहिला सिंघण हा उत्तराधिकारी झाला. हेमाद्रीने त्याला सिंहराज म्हटले आहे. कर्नाटकाच्या धारवाड जिल्ह्यातील होन्नती येथील शिलालेखात सिंघणाने महामंडलेश्वर हे बिरुद धारण केले असून सहाव्या विक्रमादित्याचा सामंत म्हणून सेऊणदेश आणि पलियंडा ४००० या प्रदेशांचे प्रशासन चालवीत असल्याची नोंद केली आहे.[२३] पलियंडा म्हणजे महाराष्ट्राच्या उस्मानाबाद जिल्ह्यातील तालुका मुख्यालय परांडा होय. इ. स. ११२४ मधील शिलालेखाचे उपलब्धी स्थान होन्नती हे पलियंडा ४००० मधील १२ गावांचा समावेश असलेल्या प्रशासकीय विभागाचे मुख्यालय होते. कर्नाटकाच्या धारवाड जिल्ह्यापर्यंत यादवांचे अधिकारक्षेत्र कसे पोचले हे समजण्यास मार्ग नाही. पहिल्या सिंघणाच्या कोरीव लेखात त्याने कर्नाट, गुर्जर आणि पांड्यांचा पराभव केल्याचे वर्णन आढळते.[२४] हे त्याने स्वतंत्रपणे प्राप्त केलेले विजय नसून आपला स्वामी सहावा विक्रमादित्य याच्या वतीने केले असावेत व त्याचे बक्षीस म्हणून विक्रमादित्याने सिंघणास पलियंडा ४००० हा प्रदेश देऊन त्याच्या राज्याचा दक्षिणेकडे विस्तार केला असावा.

हेमाद्रीने आपल्या यादव वंश प्रशस्तीत सिंघणाने लांजीपुराहून कर्पूरतिलक नावाचा हत्ती आणून विक्रमादित्यास भेट दिला व त्याच्या कर्पूरवर्णकांतीत भर घातली असे विधान केले आहे.[२५] हे लांजिपूर म्हणजे मध्य प्रदेशातील बालाघाट जिल्ह्यातील आजचे लांजी हे गाव होय.[२६] यावरून असे दिसते की लांजीचा शासक मध्य प्रदेशातील रत्नपूरच्या कलचुरींचा मांडलिक असून त्याने सेऊणदेशावर किंवा चालुक्यांच्या प्रदेशावर आक्रमण केले व सिंघणाने त्याला धडा शिकवून त्याच्याकडून हत्तीचा नजराणा मिळविला व तो विक्रमादित्यास भेट देऊन त्याला आणखी संतुष्ट केले. पहिल्या सिंघणास ३५ वर्षांचा राज्यकाल लाभल्यामुळे सहावा विक्रमादित्य, तिसरा सोमेश्वर आणि दुसरा जगदेकमल्ल या तीन चालुक्य सम्राटांचा तो सामंत होता हे त्याच्या इ. स. ११४२ मधील अंजनेरी येथील शिलालेखातील माहितीवरून स्पष्ट होते.[२७] हीच त्याच्या कारकिर्दीची शेवटची ज्ञात तारीख असून त्यानंतर २-३ वर्षे तो राज्यावर असावा. त्याच्यानंतर त्याचा मुलगा मल्लुगी राज्यावर आला.

**पहिला मल्लुगी (इ. स. ११४५ ते ११५०)** : मल्लुगीने पर्णखेट जिंकल्याची माहिती यादवांच्या कोरीव लेखात आली असून काही संशोधकांनी पर्णखेटाची निश्चिती धुळे जिल्ह्यातील पानखेडशी केली आहे.[२८] परंतु हा प्रदेश यादव राज्यात समाविष्ट असल्यामुळे ही निश्चिती बरोबर नसल्याचे मत काही संशोधकांनी व्यक्त केले असून त्यांनी बुलढाणा जिल्ह्यातील वानखेड हा पर्णखेटचा पर्याय सुचविलेला असून तो अधिक संयुक्तिक वाटतो.

पहिल्या मल्लुगीनंतर इ. स. ११५० मध्ये त्याचा मुलगा अमरगांगेय हा राज्यावर आला. हेमाद्रीच्या प्रशस्तीनुसार अमरगांगेयानंतर त्याचा मुलगा गोविंदराजाची कारकीर्द झाली. या दोघांच्या कारकिर्दी अल्पकालीन असून घटनाशून्य होत्या. गोविंदराजानंतर पहिल्या मल्लुगीचा मुलगा अमरमल्लगी उर्फ दुसरा मल्लुगी हा राज्यावर आला.

**दुसरा मल्लुगी (इ. स. ११५५ ते ११६५)** : सहाव्या विक्रमादित्याच्या नंतरच्या काळात चालुक्य सत्तेला लागलेली घसरण दुसऱ्या मल्लुगीच्या काळात शिगेला पोचली. बिज्जल कलचुरीने या परिस्थितीचा लाभ घेऊन तिसऱ्या तैलास पदच्युत करून सत्ता बळकावली. यादवासारख्या चालुक्य सामंतांनी या परिस्थितीचा लाभ घेणे स्वाभाविक होते. दुसऱ्या मल्लुगीने बिज्जल कलचुरीच्या सत्तेस आव्हान दिले.[२९] दुसऱ्या बाजूस काकतीयांच्या प्रदेशावर आक्रमण केले. परंतु काकतीय रुद्रदेवाच्या अनकोंडा येथील शिलालेखानुसार त्याने मल्लगीचा पराभव केला.[३०] कल्याणच्या चालुक्य सत्तेचा अंत आणि कलचुरींचे अल्पकालीन सत्ताग्रहण यामुळे अस्थिर झालेल्या परिस्थितीचा मल्लुगीने फायदा घेण्याचा प्रयत्न यशस्वी झाला नसला तरी एक दशकानंतर पाचव्या भिल्लमाला यादव राज्य स्थापनेत जे यश लाभले त्याची पार्श्वभूमी दुसऱ्या मल्लुगीने तयार केली असे म्हटल्यास ती अतिशयोक्ती ठरणार नाही.

हेमाद्रीच्या प्रशस्तीनुसार दुसऱ्या मल्लुगीनंतर त्याचा मुलगा कलिय बल्लाळ हा इ. स. ११६५ मध्ये राज्यावर आला. कलिय बल्लाळाच्या अल्पशा कारकिर्दीनंतर

त्याचा मुलगा (याचे नाव ज्ञात नाही) त्याचा उत्तराधिकारी झाला, परंतु बल्लाळाचा धाकटा भाऊ पाचवा भिल्लम याने त्याला पदच्युत करून गादीचा ताबा घेतला. भिल्लम हा पराक्रमी आणि महत्त्वाकांक्षी असून त्याने यादव वंशाच्या सार्वभौम राज्याची स्थापना केली.

**पाचवा भिल्लम (इ. स. ११७३ ते ११९२)** : कल्याणच्या चालुक्यांची सत्ता खिळखिळी झालेली असल्यामुळे पाचव्या भिल्लमाला आपले राजकीय वर्चस्व वाढविण्याची संधी मिळाली, परंतु तरीही परिस्थिती त्याला पूर्णपणे अनुकूल नव्हती. कारण दक्षिणेकडून होयसळ आणि पूर्वेकडून काकतीय हे चालुक्यांचे पूर्वीचे मांडलिक यांच्या प्रदेशावर स्वाऱ्या करीत होते. चालुक्य आणि कलचुरींच्या पाटराख्यांनीही त्यांच्या सत्तेच्या पुनर्स्थापनेचे प्रयत्न चालूच ठेवले होते. त्यामुळे महत्त्वाकांक्षी भिल्लमाला या सर्वांवर मात करून आपले उद्दिष्ट साध्य करावयाचे होते. आपल्या शत्रूविरूद्धचा त्याचा संघर्ष जवळ जवळ १० वर्षांपर्यंत चाललेला होता व त्यात यशापयशाचे अनेक चढउतार त्याला बघावे लागले. या काळातील लढायांची क्रमवार अशी माहिती उपलब्ध नाही. हेमाद्री[३१] आणि जल्हण[३२] यांनी भिल्लमाच्या दिग्विजयांचे वर्णन काव्यात्मक पद्धतीने केले आहे. त्यांचा क्रम पुढीलप्रमाणे ठरविला जाऊ शकतो :– पुण्याजवळील श्रीवर्धनवर ताबा,[३३] प्रत्यंडक (उस्मानाबाद जिल्ह्यातील परांडा किल्ल्यावर) विजय, सोलापूर जिल्ह्यातील मंगळवेढा येथील तिसऱ्या बिज्जल कलचुरीचा पराभव, चालुक्यांची राजधानी कल्याणवर ताबा, होयसळांच्या उत्तरेकडे होणाऱ्या वाटचालीस घातलेला पायबंद, कलचुरी मल्लुगीचा पराभव, चालुक्य चौथा सोमेश्वर याचा सेनापती मुंजे यावर केलेली मात, काकतीय प्रतापरुद्रदेव उर्फ बभ्रु याचा पराभव आणि हैहेय सेनानी मल्ल याच्यावर केलेली मात.[३४]

भिल्लमाने कलचुरींचा केलेला पराभव त्याच्यापेक्षा चालुक्य चौथा सोमेश्वर याला अधिक फायदेशीर ठरला. कारण इ. स. ११८३-८४ मध्ये चौथ्या सोमेश्वराने चालुक्य सत्तेची पुनर्स्थापना केली व उपऱ्या कलचुरींना आपले स्वामित्व स्वीकारण्यास भाग पाडले.[३५] पुढील काळात चौथ्या सोमेश्वराने आपली स्थिती मजबूत केली आणि पाचव्या भिल्लमाच्या सैन्याचा अनेक आघाड्यावर पराभव केला.[३६] परंतु भिल्लमाने आपली बाजू सावरून धरली आणि चौथा सोमेश्वर सत्तेवर असताना आपल्या राज्यात स्वतंत्रपणे राज्यकारभार चालविला. त्याने आपल्या दस्तैवजातील कालोल्लेख आपल्या राज्यारोहण वर्षात लिहिण्याची प्रथा सुरू केली. परंतु त्यात एकवाक्यता नसून इ. स. ११८४ ते ११८७ या चार वर्षांच्या नोंदी त्यात आढळतात.[३७] याचे मुख्य कारण म्हणजे चौथा सोमेश्वर राज्यावर असताना भिल्लमाने स्वतंत्र होण्याचा अनेक

वेळा प्रयत्न केला व सोमेश्वराने त्यात बाधा निर्माण केली. इ. स. ११८६ नंतर मात्र पाचवा भिल्लम हा स्वतंत्र व सार्वभौम शासक झाला.

स्वतंत्र आणि सार्वभौम यादव राज्याची घोषणा केल्यानंतर देखील भिल्लमाला अनेक अंतर्गत आणि बाह्य शत्रूंचा मुकाबला करावा लागला. चालुक्यांचे सामंत असलेल्या कदंब, सिंद, हैहेय आणि इतर प्रमुखांनी भिल्लमाचे स्वामित्व स्वीकारण्यास नकार दिला. होयसळ बल्लाळाच्या रुपाने एका बलाढ्य शत्रूशी भिल्लमाला सतत संघर्ष करावा लागला. हैहेय हे चालुक्यांचे सामंत म्हणून कर्नाटकातील रायचूर जिल्ह्यातील एका छोट्या प्रांताचे प्रशासन चालवीत होते. चालुक्य सत्तेच्या अस्तानंतर ते आपल्या प्रांताचे स्वतंत्र शासक बनले. जल्हणाने भिल्लमाकडून पराभूत झालेल्या ज्या मल्लाचा उल्लेख केला आहे तो बहुधा या हैहेय वंशातील होता. आपल्या कोरीव लेखात या मल्लाने भिल्लमावर विजय मिळविल्याचा दावा केला आहे.[३८] भिल्लमाला या हैहेयांचा कायम पराभव करणे शक्य झाले नाही व शेवटी ते काम त्याचा नातू सिंघण यास करावे लागले.

कोकणाव्यतिरिक्त महाराष्ट्राचा सर्व भाग आपल्या अमलाखाली आणून भिल्लमाने पूर्वीच्या चालुक्य राज्याच्या अर्ध्या भागावर आपले संपूर्ण नियंत्रण प्रस्थापित केले व त्यानंतर दक्षिणेकडून सतत होणाऱ्या होयसळांच्या आक्रमणास पायबंद घालण्याचे काम त्याने हाती घेतले. इ. स. ११८९ च्या अखेरीस भिल्लमाने अन्निगेरीपर्यंतचा कर्नाटकातील धारवाड जिल्ह्यातील प्रदेश आपल्या ताब्यात घेतला.[३९] तेथून त्याने दक्षिणेकडे कूच करून होयसळ बल्लाळाच्या सैन्यावर हल्ला केला. बेलहोळ प्रांतातील सोरातूर येथे दोघात घनघोर लढाई झाली. होयसळ बल्लाळाच्या कोरीव लेखानुसार या लढाईत त्याने भिल्लमाचा संपूर्ण पराभव करून त्याला माघार घेण्यास भाग पाडले.[४०] या कोरीव लेखात पाचवा भिल्लम लढाईत मारला गेल्याचा देखील उल्लेख आहे. परंतु तो सत्यावर आधारित नाही. कारण सोरातूरच्या लढाईनंतर म्हणजे इ. स.११८९ नंतर किमान दोन वर्षे भिल्लम जिवंत असल्याचा पुरावा उपलब्ध आहे.[४१]

कारकिर्दीच्या शेवटी स्वतःची महत्त्वाकांक्षा पूर्ण झाल्याचे समाधान भिल्लमास मिळाले. भोवतालच्या राजकीय अस्थिरतेचा पूर्ण लाभ उठवून सामंतपदी असलेल्या घराण्यास त्याने स्वतंत्र व सार्वभौम राजवंशाचा दर्जा प्राप्त करून दिला. सैनिकी सामर्थ्याच्या बळावर त्याने उत्तरेस नर्मदेपासून दक्षिणेस मलप्रभा नदीपर्यंतचा प्रदेश त्याने आपल्या राज्यात समाविष्ट करण्यात यश मिळविले. कोकण सोडून आजचा

संपूर्ण महाराष्ट्र व कर्नाटकाचा उत्तर भाग यादव राज्यात आणण्यात भिल्लमाचाच महत्त्वाचा सहभाग होता.

**पहिला जैतुगी (इ. स. ११९२ ते १२००)** : जैतुगीच्या कोरीव लेखात राज्यारोहणाच्या संदर्भात इ. स. ११९१ पासून ११९६ पर्यंतचे वेगवेगळे कालोल्लेख आढळतात.[४२] शेवटचे वर्ष चुकीचे असून जैतुगीचे राज्यारोहण इ. स. ११९१ मध्ये झाले. प्रारंभीची काही वर्षे पाचव्या भिल्लमासह त्याने प्रशासनात भाग घेतला असे मानले जाते. जैतुगीने भिल्लमाच्या तुलनेत कमी सैनिकी विजय प्राप्त केले. होयसळ बल्लाळाच्या इ. स. ११९५ मधील एका कोरीव लेखात त्याने जैतुगीचा पराभव करून लक्कुंडीवर ताबा मिळविल्याचा उल्लेख आहे.[४३] पाचव्या भिल्लमाने कर्नाटकातील मलप्रभा नदीपर्यंतचा प्रदेश जिंकल्याची नोंद आहे. जैतुगीने बहुधा मलप्रभा ओलांडून लक्कुंडीचा परिसर जिंकण्याचा प्रयत्न केला व होयसळ बल्लाळाने तो हाणून पाडला असावा असे यावरून सूचित होते.

जैतुगीचा पूर्वेकडील समकालीन राजा काकतीय रुद्र होता. राज्याचा पश्चिमेकडे विस्तार करण्याच्या दृष्टीने तो प्रयत्नशील होता. होयसळ बल्लाळाने जैतुगीचा पराभव केला त्याचवेळी काकतीयांनी सरहद्दीवरील यादवांच्या प्रदेशावर आक्रमण केले. जैतुगीने या प्रयत्नास चोख उत्तर दिले. हेमाद्रीने या संदर्भात यादव प्रशस्तीत असे वर्णन केले आहे की, जैतुगीने समरांगणावर जो नरमेध केला त्यात कित्येक राजांच्या आहुती पडल्या, तैलंग देशाधिप रुद्र याचे वैभव नष्ट केले. या वर्णनावरून भांडारकर यांनी असा तर्क केला की जैतुगीने रुद्रदेवास ठार केले.[४४] रुद्रदेवाच्या कारकिर्दीचे शेवटचे ज्ञात वर्ष इ. स. ११९६ असल्यावरून जैतुगी व काकतीय यांच्यातील लढाई या वर्षात झाली असावी असे इतिहासकार मानतात.

काकतीय रुद्रदेवाचा उत्तराधिकारी व भाऊ महादेव याने आपल्या भावाच्या पराभवाचा बदला घेण्यासाठी यादव राज्यावर आक्रमण करून खुद्द देवगिरीस वेढा घातला. या स्वारीचे वर्णन काकतीय गणपती देवाच्या एका कोरीव लेखात आढळते.[४५] बीदर येथील एका शिलालेखात देखील त्याच्या या स्वारीतील पराक्रमाचे वर्णन करण्यात आले आहे.[४६] गणपतीच्या आणखी एका कोरीव लेखानुसार महादेव या लढाईत ठार झाला.[४७] यादवांच्या कोरीव लेखात देखील जैतुगीने काकतीय महादेवास ठार केल्याची व त्याचा मुलगा गणपती यास अटक करून नंतर त्यास सोडून दिल्याची नोंद आढळते.[४८] ही घटना इ. स. ११९९ च्या पूर्वी घडली असावी, कारण त्यावर्षी गणपतीचे राज्यारोहण झाले. जैतुगीने काकतीयांचा दोन वेळा पराभव केल्यामुळे त्याचा प्रभाव वाढला. महादेव काकतीयाचा पुत्र गणपती याची सुटका करून व त्याला राज्यावर बसवून जैतुगीने मनाचा मोटेपणा दाखविला. यामुळे काकतीयाच्या शिलालेखात जैतुगीची मुक्तकंटाने स्तुती करण्यात आली आहे.[४९]

हेमाद्रीने देवगिरी नगर वसविण्याचे श्रेय पाचव्या भिल्लमास दिले आहे.[50] परंतु त्याचे वास्तव्य देवगिरीस असल्याचा एकही पुरावा उपलब्ध नाही. याउलट त्याच्या कोरीव लेखात तडवलगे (तडवलगा, जिल्हा विजापूर, कर्नाटक) हे त्याचे वास्तव्य स्थान दाखविण्यात आले आहे.[51] यावरून अशी शक्यता व्यक्त केली जाते की, तडवलगा इथे भिल्लमाचे प्रारंभीच्या काळात वास्तव्य होते व राज्याच्या विस्तारानंतर देवगिरीचे भौगोलिक वैशिष्ट्य लक्षात घेऊन तेथे राजधानी करण्याच्या दृष्टीने बांधकाम हाती घेतले. हे काम भिल्लमाचा वारस जैतुगीने पूर्ण केले व आपली राजधानी तेथे हलविली.[52]

**दुसरा सिंघण (इ. स. १२०० ते १२४७)** : जैतुगीनंतर त्याचा मुलगा दुसरा सिंघण देवगिरीच्या सिंहासनावर विराजमान झाला. तो यादव राजवंशातील सिंह म्हणून ओळखला जातो. त्याच्या कारकिर्दीत यादव सत्तेचे वैभव कळसाला पोहोचले. त्याच्या राज्यारोहणकालाच्या बाबतीत देखील कोरीव लेखात परस्पर विसंगत माहिती आढळते.[53] इ. स. ११९८ पासून १२१४ पर्यंतची वर्षे त्याच्या राज्यकालाच्या प्रारंभीची वर्षे असल्याचे उल्लेख आढळतात. परंतु बहुतेक कोरीव लेखात इ. स. १२०० हे सिंघणाचे पहिले राज्यवर्ष असल्याचे दाखवितात. ओ. पी. वर्मा यांच्यामते इ. स. १२०० ते १२१० हा सिंघणाचा युवराजपदाचा काळ असून १२१० मध्ये त्याचे राज्यारोहण झाले[54] असे मानून सिंघणाचा राज्यकाल इ. स. १२१० ते १२४७ असा गृहीत धरला आहे.

राज्यारोहणानंतर सुरुवातीची काही वर्षे सिंघणाने आपली सैन्यशक्ती मजबूत करण्यात व्यतीत केली व होयसळाद्वारे आपला पिता आणि पितामह यांच्या पराभवाचा बदला घेण्यासाठी योग्य संधीची तो वाट पाहू लागला. हंगलचा कदंब कामदेव[55] याच्याशी लढण्यात होयसळ बल्लाळ गुंतला असताना इ. स. १२०६ मध्ये सिंघणाने त्याच्यावर स्वारी केली आणि फारसे कष्ट न घेता धारवाड पर्यंतचा प्रदेश त्याने जिंकला.[56] तेथून त्याने जलद गतीने कूच करून एडेडोरनाडू[57] पादाक्रांत केला आणि त्या पाठोपाठ त्याचे सैन्य बलारी विभागात दाखल झाले.[58] बल्लाळाने यादव सैन्याला रोखण्याचा प्रयत्न केला, परंतु सिंघणाच्या बलाढ्य सैन्यासमोर त्याचा निभाव लागू न शकल्यामुळे त्याचे एकामागोमाग एक प्रदेश यादव सैन्याने व्यापले. इ. स. १२१२ मधील शिमोगा जिल्ह्यातील एका शिलालेखानुसार बंडलिकेवर धाड घालून तेथून अमाप संपत्ती लुटली.[59] होयसळांचा सेनापती बनक याच्यासह असंख्य होयसळ सैनिक या लढाईत मारले गेले.[60] इ. स. १२१७ मध्ये सिंघणाने होयसळ राज्यावर आणखी एक स्वारी केली व शिमोगा परिसरातील नवीन प्रदेश पादाक्रांत केला.[61] अशाप्रकारे इ. स. १२२० मध्ये होयसळ बल्लाळाच्या मृत्यूपर्यंत सिंघणाने शिमोगा आणि बल्लारी जिल्ह्यातील होयसळांचा प्रदेश जिंकून आपल्या राज्यास जोडला.

इ. स. १२२० मध्ये होयसळ नरसिंह हा बल्लाळाचा उत्तराधिकारी बनला. त्याच्या काळातील काही कोरीव लेखात होयसळ सैन्याने यादवांचे सेनापती विक्रमपाल आणि पयुष यांचा पराभव केल्याची माहिती आढळते.[६२] परंतु होयसळांची यादवाविरुद्धची ही सरशी अल्पकालीन म्हणजे इ. स. १२२५ ते १२३१ अशी सहा वर्षांपुरती राहिली.

इ. स. १२३१ नंतर सिंघणाने होयसळाविरुद्ध पुन्हा आक्रमक पवित्रा घेतला. मध्यंतरीच्या काळात त्यांचे परत मिळविलेले प्रदेश यादवांनी पुन्हा जिंकले. याच काळात होयसळ नरसिंहास चोल आणि पांड्याविरुद्धच्या मोहिमात दक्षिणेत अडकून रहावे लागले. या स्थितीचा फायदा घेऊन सिंघणाने आपला नातू कृष्ण याच्या नेतृत्वाखाली होयसळांच्या प्रदेशावर नव्याने स्वाऱ्या सुरू केल्या.[६३]

नरसिंहानंतर राज्यावर आलेल्या होयसळ सोमेश्वराने मुत्सद्दीपणाने व बारकाईने यादवांच्या स्वाऱ्यांचे निरीक्षण केले. यादव सैन्यास आपल्या प्रदेशात रोखण्याऐवजी त्याने यादवांच्या प्रदेशावर स्वारी करून पंढरपूरपर्यंत मजल मारली. पंढरपूर येथील एका शिलालेखाद्वारे त्याने विठ्ठलास दान दिले.[६४] या कोरीव लेखात त्याने आपण सार्वभौम शासक आहोत हे दाखविण्यासाठी अनेक राजबिरुदे आपल्या नावाशी जोडली. या स्वारीत त्याने यादवांचा प्रदेश जिंकणे हे आपले ध्येय टेवले नव्हते, तर यादव सैन्याचे लक्ष वेधून आपल्या प्रदेशावरील त्यांच्या स्वाऱ्यांना पायबंद घालणे हा त्याचा मर्यादित हेतू असल्याचे दिसते. परंतु याचा परिणाम उलट झाला. यादवांनी अधिक आक्रमक पवित्रा घेतला. सिंघणाचा सेनापती बोम्मिसेट्टी याने होयसळांच्या प्रदेशात दूरवर घुसून त्यांची राजधानी द्वारसमुद्र आणि इतर अनेक शहरे जाळल्याचा व पांड्यनाडूचे प्रशासन करणाऱ्या होयसळांच्या कदंब सेनानींचा पराभव केल्याचा दावा केला आहे.[६५] द्वारसमुद्र जाळल्याच्या यादवांच्या दाव्याचा उपोद्बलक पुरावा नाही. परंतु इ. स. १२३९ ते १२४७ या कालावधीतील सिंघणाचे कित्येक कोरीव लेख शिमोगा परिसरात आहेत.[६६] त्यावरून सिंघणाने सोमेश्वरावर पूर्ण मात करून त्याचा बराचसा प्रदेश जिंकल्याची प्रचिती येते.

सिंघणाने अशाप्रकारे बल्लाळ, नरसिंह आणि सोमेश्वर या तीन होयसळ राजांवर मात केली. होयसळाविरुद्धच्या मोहिमात सुरुवातीस सिंघण जातीने लक्ष घालीत असे. परंतु पुढे त्याने ही जबाबदारी आपल्या सेनापतीवर आणि आपल्या कारकिर्दीच्या अखेरीस आपला नातू कृष्ण याच्यावर सोपविली.

इ. स. १२१० मध्ये सिंघणाने माळव्यावर स्वारी केली. या लढाईत माळव्याचा परमार राजा सुभटवर्मा ठार झाला.[६७] त्याचा मुलगा अर्जुनवर्मन याने यादव सैन्याचा प्रतिकार केला. परंतु सिंघणाने त्याचाही पराभव केला.[६८] परमारांचा मांडलिक

असलेल्या लाट किंवा दक्षिण गुजरातचा शासक चहमान सिंह हे सिंघणाचे विरोधी होते. त्यामुळे माळव्यावर चालून गेलेल्या आपल्या सैन्यास त्याने लाट देशाकडे वळविले. चहमान सिंहाने गुजरात मधील चौलुक्य राजा दुसरा भीम याची मदत मिळविली. परमारांचे सहाय्य तर त्याला होतेच. तसेच त्यांच्या इतर मांडलिकांनीही सिंहाला मदत केली. यादवांच्या विरुद्धच्या संयुक्त सैन्याचे नेतृत्त्व सिंह आणि त्याचा पुतण्या संख यांच्याकडे होते. सिंहाने यादव सैन्याशी निकराचा लढा दिला. यादवांचा एक सेनानी सगरॅय्या नायक या लढाईत टार झाल्यामुळे सिंह सिंघणास वरचढ ठरला.[६९] सिंघणाच्या विरुन्द्ध गुजरातेतील संयुक्त सैन्याने जो पराक्रम केला त्याचे सविस्तर वर्णन ''हमीरा मादा मर्दाना''[७०] आणि ''वसंतविलास''[७१] या ग्रंथात आढळते. आता आपला निभाव लागत नाही हे पाहून सिंघणाने गुजरात वरील मोहीम आटोपली. दक्षिणेत होयसळ बल्लाळाने पुन्हा आक्रमक हालचाली सुरू केल्या होत्या. त्यामुळे या मोहिमेत त्याला केवळ परमारावरील विजयातच समाधान मानावे लागले.

होयसळावर मात करून सिंघणाने ती मोहीम इ. स. १२१३ नंतर आपल्या सेनानींच्याकडे सुपूर्द केली. नंतर त्याने कोल्हापूरच्या शिलाहारांकडे आपले लक्ष वळविले. कारण होयसळ आणि यादवातील संघर्षात भोजाने सिंघणास मदत करण्याच्या ऐवजी आपण स्वतंत्र व सार्वभौम असल्याचे घोषित केले होते. इ. स. १२१५ मध्ये यादव सैन्याने शिलाहारांचा प्रदेश पादाक्रांत करून दुसऱ्या भोजाचे वास्तव्य असलेल्या पन्हाळगडास वेढा दिला. शेवटी भोजाचा पराभव करून सिंघणाने त्याला पन्हाळगडावरच कैदेत टेवले.[७२] यापुढील काळातील कोल्हापूरच्या शिलाहाराविषयी काहीच माहिती उपलब्ध नाही. बहुधा सिंघणाने कोल्हापूरच्या शिलाहारांचा प्रदेश आपल्या राज्यात सामील करून घेतला.

कोल्हापूरहून सिंघणाने आपले सैन्य कोकणात उतरविले. यावेळी केशिराज (इ. स. १२०० ते १२४५) हा उत्तर कोकणचा शिलाहार शासक होता. अंबे येथील शिलालेखात या स्वारीच्या संदर्भात वर्णन आले आहे. केशिराजाने यादवांचे मांडलिकत्व स्वीकारल्यामुळे सिंघणाने केशिराजास त्याचे राज्य परत दिले.[७३]

दक्षिणेतील सतत मिळणाऱ्या विजयामुळे सिंघणाचा दबदबा सर्वत्र पसरला. त्याचे मनोधैर्य आणि सैनिकी सामर्थ्य वाढले. आपल्या बहुतेक शत्रूंचा आणि बंडखोर सामंतांचा बीमोड करून दक्षिणेत आपली सत्ता स्थिर केल्यानंतर चहमान सिंह याने पूर्वी केलेल्या पराभवाचा बदला घेण्यासाठी लाट देशावर पुन्हा स्वारी करण्याचे ठरविले. त्यासाटी आवश्यक ती युद्धसज्जता करून आपला पराक्रमी सेनानी खोलेश्वराच्या नेतृत्वाखाली त्याने दक्षिण गुजरातवर सैन्य पाठविले.

यावेळी गुजरातवर मुस्लिम आक्रमणाचे सावट असल्यामुळे चहमान सिंहास सोळंकी किंवा गुजरातमधील इतर राजाकडून मदत मिळाली नाही. यादव सैन्यास त्याला

एकाकी सामोरे जावे लागले. त्यामुळे त्याचा पराभव झाला, लढाईत तो स्वतः आणि त्याचा भाऊ सिंधुराज हे दोघेही ठार झाले. त्याचा मुलगा संख उर्फ संग्रामसिंहास खोलेश्वराने बंदी बनविले.[७४] नंतर सिंघणाने संग्रामसिंहास आपणाशी एकनिष्ठ राहण्याच्या अटीवर सोडून दिले व त्याला चहमान सिंहाचा उत्तराधिकारी बनविले. गुजराती दस्तऐवजात देखील या सर्व घटनांना दुजोरा देण्यात आलेला आहे.[७५]

त्यानंतर सिंघणाने गुजरातमधील सोळंकीच्या प्रदेशावर आक्रमण केले. सोळंकींनी पूर्वी सिंहास मदत केली होती. परंतु यावेळी मुस्लिम आक्रमणामुळे त्यांची सत्ता खिळखिळी झाली होती. परमाराकडून त्यांना मदत मिळणे शक्य नव्हते. कारण यादवांचा अंकित असलेला चहमान संग्रामसिंह याने परमारास आपल्याकडे वळवून घेतले. सोळंकींनी आपणास यादवाविरुद्ध मदत न केल्याचा राग त्याच्या मनात होता. अशाप्रकारे सिंघण, संग्रामसिंह आणि परमार यांच्या संयुक्त सैन्याने चौलुक्यांच्या प्रदेशावर स्वारी केली. यावेळी उत्तरेकडून मुस्लिम आक्रमकांनी चौलुक्याच्या प्रदेशावर आक्रमण केले होते. त्यामुळे चौलुक्य दुसरा भीम याने राजधानीचे प्रशासन वस्तुपाल नावाच्या मंत्र्याकडे सोपवून आपला सेनापती लवणप्रसाद यासह उत्तरेकडे कूच केले होते. वस्तुपालाजवळ मोजके सैन्य राहिल्यामुळे व यादवांच्या नेतृत्वाखालील संयुक्त सैन्य आल्यामुळे त्याची अवस्था बिकट झाली. जयसिंहाच्या "हमीरा मादा मर्दाना" या काव्यात या प्रसंगाचे जे वर्णन आहे,[७६] त्याचा सारांश पुढीलप्रमाणे होय :–

यादव सैन्याचे अचानक आक्रमण झाल्यामुळे चौलुक्यांचा प्रशासक वस्तुपाल याला जबरदस्त धक्का बसला. एवढ्या मोठ्या सैन्याचा प्रतिकार करणे अशक्य असल्यामुळे यादव आणि त्यांच्या मित्रपक्षात फूट पाडण्याची युक्ती योजिली. या कामासाठी त्याने लावण्यसिंह नावाच्या चतुर व्यक्तीची निवड केली. लावण्यसिंहाने शत्रूपक्षात फूट पाडण्याची कामगिरी निपुनग आणि सेवुग या दोन हेरांवर सोपविली. निपुनग याने देवपालाच्या घोडदळात अश्वपालक म्हणून प्रवेश मिळविला आणि सेवुग याने सिंघणाची मर्जी संपादन केली. सेवुग याने सिंघणास असे पटवून दिले की, भीम सध्या मुस्लिम आक्रमकाविरुद्ध लढण्यात गुंतलेला असल्यामुळे त्याच्याविरुद्ध ताबडतोब कारवाई करण्याऐवजी काही काळानंतर करावी. तोपर्यंत भीमाचे सैनिकी सामर्थ्य घटलेले असल्यामुळे त्याचा सहज पराभव होऊ शकेल. सिंघणाने ही सूचना मान्य केली. या हेरांनी नंतर देवपालाचे नामचिन्ह असलेला एक घोडा चोरला व एक बनावट पत्र लिहून तो घोडा संखाकडे पाठविला. त्या पत्रात संखास त्याचा पिता आणि चुलता यांना सिंघणाने ठार केल्याची व त्याचा बदला घेण्यासाठी यादव सैन्यास नष्ट करण्याची सूचना होती. ठरल्याप्रमाणे हे पत्र संखाऐवजी सिंघणाच्या हाती पडण्याची व्यवस्थाही हेरांनी चोख केली होती. या पत्रामुळे सिंघण अतिशय संतप्त झाला. ही बातमी कळताच संख त्याच्या भीतीने रणांगण सोडून पळून गेला. देवपालाला सिंघणाने शिक्षा केली. परंतु बनावट पत्रामुळे हे सर्व घडल्याचे लक्षात आल्यावर सिंघणाने देवपालाला अभय दिले. त्यामुळे त्याला निःशंकपणे परमार राज्याचा कारभार पहाणे शक्य झाले.

या घटनेनंतर सिंघणाने चौलुक्याविरुद्धची मोहीम अधिक गतिमान केली. या स्वारीत झालेल्या गुजरातमधील भयानक जीवित आणि वित्त हानींचे सविस्तर वर्णन सोमेश्वरकृत "कीर्तिकौमुदी" या ग्रंथात करण्यात आले आहे.[७७] कित्येक लोक आपली घरेदारे सोडून देशोधडीस लागले. सोमेश्वर पुढे म्हणतो की, अशा आणीबाणीच्या प्रसंगी चौलुक्यांच्या मारवाडमधील चार सामंतांनी बंड केल्याची बातमी लवणप्रसाद यास मिळाली. त्यामुळे त्याने यादव सैन्यास प्रतिकार करण्याचे स्थगित करून मारवाडकडे कूच केले. सिंघणाने देखील ही मोहीम थांबविली. युद्ध संपवून सिंघण आणि भीम चौलुक्याचा प्रतिनिधी लवणप्रसाद यांच्यात एक तह झाला. त्यानुसार दोहोंनी परस्परांच्या प्रदेशावर आक्रमण न करण्याचे मान्य केले. असे दिसते की प्रदेश मिळविणे हे सिंघणाच्या या स्वारीमागील उद्दिष्ट नसून भीमाने चहमान सिंहास यादवाविरुद्ध जी मदत केली त्याचा बदला घेणे व यापुढे त्याला अशा कृत्यापासून परावृत्त करणे हा हेतू या मागे होता.

चौलुक्य आणि यादव यांच्यातील अनाक्रमणाचा करार इ. स. १२४० पर्यंत टिकला. इ. स. १२४० मध्ये सिंघणाने आपला सेनानी खोलेश्वराचा पुत्र राम याच्या नेतृत्वाखाली पुन्हा गुजरातवर स्वारी केली. यावेळी भीम जिवंत असून देखील राज्याचा कारभार अनभिषिक्त शासक म्हणून वाघेला प्रमुख विशालदेव याच्या हाती गेला होता. रामाने या लढाईत कित्येक सैनिकांना ठार केले पण शेवटी तो स्वतः मारला गेला.[७८] विशालदेवाने दक्षिणच्या ज्या राजाचा पराभव केल्याचा दावा केला आहे तो सिंघणाविषयी असावा.[७९] इ. स. १२६१ च्या एका कोरीव लेखात विशालदेवाचे वर्णन "यादवसैन्यरुपी सागरातील वडवानल" असे करण्यात आले आहे ते देखील या संदर्भातीलच होय.[८०] यादवांच्या दस्तऐवजात या स्वारीविषयी पुढील माहिती मिळत नाही. त्याअर्थी, रामाचा मृत्यू झाल्यावर सिंघणाने आपल्या सैन्यास परत बोलावले असावे.

कर्नाटकातील बनवासीच्या कदंबांनी यादवांचे सार्वभौमत्व अद्यापपर्यंत मान्य केले नव्हते. होयसळ आणि कदंब यांच्यात सतत चकमकी चालूच होत्या. बनवासीचे राज्य यादव आणि होयसळांच्या राज्यांना लागून होते. कदंबांना संरक्षण देऊन उपकृत केल्यास त्याचा उपयोग आपणास होयसळाविरुद्धच्या संघर्षात होऊ शकेल या हिशेबाने सिंघणाने कदंब राज्याच्या संरक्षणाची जबाबदारी उचलली व त्यासाठी बनवासीत सिंघणाने आपला अधिकारी ठेवला, परंतु ही योजना यशस्वी झाली नाही. इ. स. १२३१ मध्ये सिंघणाचे अधिकारी आणि कदंब राजा यांच्यात कुरबूर सुरू झाली.[८१] इ. स. १२३८ मधील रट्टिहल्ली पुराभिलेखात सिंघणास कदंबाचा शत्रू असे बिरुद लावण्यात आले आहे.[८२] यावरून दोहोतील संबंध खूपच ताणले होते हे स्पष्ट होते. इ. स. १२३९ मध्ये सिंघणाने बनवासी येथील आपल्या अधिकाऱ्यांना कदंबास वठणीवर आणण्याचे आदेश दिले. बळाचा फारसा वापर न करताच सिंघणाने मल्लिदेव कदंबास पराभूत करून आपले स्वामित्व स्वीकारण्यास भाग पाडले.[८३]

इ. स. १२१५ मध्ये सिंघणाने केलेली कोल्हापूरवरील स्वारी, शिलाहार दुसऱ्या भोजाचा पराभव करून त्याच्या राज्याचे यादव राज्यातील सामिलीकरण हा शेजारच्या सौंदत्तीच्या रट्टांना दिलेला इशारा होता. त्यामुळे त्यावेळी रट्ट दुसरा लक्ष्मीदेव हा आपण होऊन सिंघणाशी शरण गेला.[८४] परंतु यादव सैन्य उत्तरेकडील मोहिमात गुंतल्याची संधी साधून लक्ष्मीदेवाने परत स्वतंत्र शासक म्हणवून घेण्यास सुरूवात केली. आपल्या राजशासनात त्याने यादवांच्या उल्लेखाऐवजी केवळ आपल्या नावाचा उल्लेख केला.[८५] सिंघणाने आपला सेनापती बिच्चन यास रट्ट लक्ष्मीदेवाविरुद्ध कारवाई करण्याचा आदेश दिला. इ. स. १२२८ ते १२३८ या कालावधीत सौंदत्तीवर आक्रमण करून सिंघणाने रट्ट वंशाचा शेवट केला व त्यांचे राज्य यादव साम्राज्यात समाविष्ट करून घेतले.[८६]

बेलगुत्तीचे सिंद हे होयसळांचे पिढीजात शत्रू होते. सिंघणाने होयसळांचा पराभव केल्याबद्दल त्यांना संतोष झाला व त्यांनी यादवांचे स्वामित्व स्वीकारले. इ. स. १२१५ मध्ये सिंद तिसऱ्या ईश्वरदेवाने आपण यादवांचे मांडलिक असल्याचा उल्लेख आपल्या राजशासनात केला होता.[८७] परंतु पुढील काळात सिंघणाने ईश्वरदेवास पदच्युत करून तो प्रांत आपल्या राज्यात समाविष्ट केला व त्याचा प्रशासक म्हणून बोम्मिदेवरस याची नियुक्ती केली.[८८] त्यामुळे ईश्वरदेव आणि यादव यांच्यात संघर्ष सुरू झाला. इ. स. १२४५ पर्यंत ईश्वरदेवाने व नंतर त्याच्या मुलांनी आपले राज्य परत मिळविण्यासाठी बेलगुत्तीवर धाडी घातल्या. सिंघणाचे सेनापती बप्पूल आणि श्रीधर यांनी सिंदांचा अनेक वेळा पराभव केला. सिंद वीरदेव याने तरीही आपला संघर्ष चालूच ठेवला. त्याने बेलगुत्तीवर ताबाही मिळविला.[८९] इ. स. १२४७ मधील सिंघणाच्या निधनामुळे यादव सैन्यास बेलगुत्तीवरील कारवाई थांबवावी लागली.

सिंघणाचा पिता जैतुगी याच्या उपकारामुळे काकतीय गणपतीदेवास आपले स्वातंत्र्य आणि सिंहासन पुन्हा प्राप्त झाले होते याचे वर्णन वर आलेले आहेच. त्यामुळे वरंगलचे काकतीय आणि यादव सिंघण यांच्यातील संबंध सलोख्याचे होते. तरीही गणपतीदेवाने आपल्या राजशासनात यादवांचा पराभव केल्याचा दावा केला आहे.[९०] तो बहुधा आंध्रप्रदेशातील रायलसीमा (कर्नूल, अनन्तपूर आणि कडाप्पा परिसर) येथील शासक तेलुगूचोळ टिक्क याच्याशी झालेल्या यादवांच्या संघर्षाबाबत असावा. रायलसीमा भागावर काही काळ यादवांचे वर्चस्व होते. पण टिक्क या तेलुगू-चोळ प्रमुखाने तो प्रदेश मुक्त केला. त्याला बहुधा काकतीय गणपतीचा छुपा पाठिंबा असावा. या व्यतिरिक्त सिंघण आणि काकतीय गणपतीदेव यांच्यात प्रत्यक्ष संघर्ष उद्‌भवला नाही.

सिंघण हा यादव वंशातील सर्वश्रेष्ठ राजा असून त्याच्या दिग्विजयामुळे यादव राज्यांचा सर्व दिशांना विस्तार झाला हे अर्थातच त्याला लाभलेल्या खोलेश्वरासारख्या महापराक्रमी सेनापतींच्या सेवेचे फळ होते.[९१] स्वतः सिंघण हा देखील एक शूर योद्धा

आणि कुशल प्रशासक तर होताच, शिवाय तो साहित्य आणि संगीतादि कलांचा भोक्ता आणि आश्रयदाता होता. संगीत रत्नाकर या संगीतावरील महान ग्रंथाचा लेखक आणि संगीततज्ज्ञ शारंगदेव हा सिंघणाच्या दरबारी आश्रित होता.

सिंघणाने आपला ज्येष्ठ पुत्र दुसरा जैतुगी याला इ. स. १२२९ मध्ये आपला उत्तराधिकारी आणि युवराज म्हणून नेमले होते.[९२] युवराज असताना त्याने सिंघणाच्या विविध स्वाऱ्यात भाग घेतला असावा. कोरीव लेखात जैतुगीचे कर्तृत्व, त्याचा सुस्वभाव आणि त्याच्या योग्यतेचा उल्लेख करण्यात आला आहे.[९३] परंतु तो प्रत्यक्ष राज्यावर आल्याचा उल्लेख नाही. बहुधा जैतुगी अकाली निधन पावला व त्यानंतर सिंघणाने आपल्या दुसऱ्या मुलाऐवजी आपला नातू आणि जैतुगीचा ज्येष्ठ पुत्र कृष्ण याची आपला वारस म्हणून निवड केली. अर्जुनवाड शिलालेखात जैतुगीचा सिंघणाचा ज्येष्ठ पुत्र म्हणून उल्लेख करण्यात आला आहे.[९४] त्याअर्थी, सिंघणास जैतुगीशिवाय दुसरा पुत्र होता. काकतीयांच्या एका शिलालेखात सिंघणाचा पुत्र असलेल्या यादव शारंगपाणि देवाचा उल्लेख आला आहे.[९५] त्या आधारे इतिहासकार असे मानतात की सिंघणाच्या मृत्यूनंतर त्याचा दुसरा मुलगा शारंगपाणिदेव आणि नातू कृष्ण यांच्यात गादीचा तंटा सुरू झाला.[९६] या संघर्षात बहुधा इतरांच्या पाठबळावर कृष्णाने शारंगपाणीवर मात केली. त्यामुळे अपमानित शारंगपाणीने काकतीयांचा आश्रय घेतला व काकतीयांनी तो दिला.

सिंघणाच्या राजवटीचा उल्लेख असलेले कोरीव लेख इ. स. १२४७ पर्यंतचे आहेत.[९७] इ. स. १२५३ मधील कृष्णाच्या बेहट्टी शिलालेखात त्याच्या सातव्या राज्यवर्षाची नोंद आहे. या दोन्ही पुराव्यांच्या आधारे कृष्णाचे राज्यारोहण इ. स. १२४७ मध्ये झाले.

**कृष्ण-कान्हरदेव (इ. स. १२४७ ते १२६१)** : यादवांच्या कोरीव लेखात कृष्णाचे नाव कृष्ण, कान्हरदेव आणि कंधार अशा विविध रूपात आलेले आहे. शेजारच्या राज्यांच्या बाबतीत त्याने आपल्या पितामहाचेच धोरण पुढे चालू ठेवले. राज्यावर आल्यावर प्रथम त्याने उत्तरेची मोहीम हाती घेण्याचे ठरविले. कारण सिंघणाने उत्तरेकडे अनेक स्वाऱ्या करूनही यादवांना प्रदेश विस्ताराच्या दिशेने त्याचा फारसा लाभ झाला नव्हता. तसेच सिंघणाच्या कारकिर्दीच्या अखेरीस यादव सेनानींना पत्कराव्या लागलेल्या पराभवामुळे या भागातील यादवांचा दबदबा कमी झाला होता. पहिल्या तीन वर्षात भरपूर तयारी करून इ. स. १२५० मध्ये त्याने माळव्यावर स्वारी केली आणि माळव्याच्या परमारावर विजय मिळविला.[९८] कृष्णाने पराभूत केलेला त्याचा समकालीन परमार राजा देवपालाचा उत्तराधिकारी जैतुगीदेव हा होता. कृष्णाच्या काळातील इ. स. १२५२ आणि १२५३ मधील कोरीव लेखात देखील त्याच्या माळव्यावरील विजयाचा उल्लेख आलेला आहे.[९९] कृष्णाच्या माळव्यावरील

आक्रमणापूर्वी इ. स.१२३४ मध्ये दिल्लीच्या सुलतानांनी माळव्यावरील स्वारीच्या वेळी अनेक शहरे उध्वस्त केली होती.[१००]

माळव्यावरील विजयाने उत्साहित झालेल्या कृष्णाने तेथून गुजरातकडे आपला मोर्चा वळविला. गुजरातमधील वाघेला राजा वीरधवलपुत्र विशालदेव याचा कृष्णाने केलेल्या पराभवाची नोंद हेमाद्रींच्या प्रशस्तीत तसेच यादवाच्या कोरीव लेखातही आढळते.[१०१] या स्वारीत देखील प्रदेशविस्तार हे कृष्णाचे ध्येय नसून पूर्वी नर्मदेच्या लढाईत विशालदेवाने सिंघणाच्या केलेल्या पराभवाचा बदला घेणे हेच त्याचे उद्दिष्ट होय. मुस्लिम आक्रमणाने जर्जर झालेल्या उत्तरेकडील राज्यांना कृष्णाने आणखी विकलांग बनविले.

दक्षिणेकडील होयसळाविरुद्धच्या स्वाऱ्या कृष्णाच्या काळातही चालूच राहिल्या. कर्नाटकाच्या शिमोगा जिल्ह्यातील कृष्णाच्या काळातील इ. स. १२४८ मधील एका कोरीव लेखावरून असे दिसते की माळव्यावरील स्वारीची योजना आखीत असताना कृष्णाने अगोदर दक्षिणेकडील मोहीम हाती घेतली होती.[१०२] या भागातील एका शिलालेखात कृष्णाचा अधिकारी मल्लसुत चामुंड याने होयसळ सोमेश्वराचा पराभव करून त्याचे गर्वहरण केल्याची नोंद आहे.[१०३] या चामुंडाच्या अनेक पराक्रमावरून तो कृष्णाचा प्रमुख विश्वासू सेनानी असल्याचे जाणवते.[१०४] कदाचित त्यामुळेच त्याने होयसळाविरुद्धच्या मोहिमासाठी चामुंडाची खास निवड केली होती. कृष्णाच्या काळात यादव सैन्याने आणखी दक्षिणेकडील प्रदेश मिळविल्याची माहिती या काळातील चित्रदुर्ग जिल्ह्यात सापडलेल्या कोरीव लेखावरून मिळते.[१०५] याचवेळी पांड्य राजा जाटवर्मन सुंदर पांड्य याने होयसळाविरुद्ध आक्रमक पवित्रा घेऊन चोल प्रदेशातील त्यांचे मुख्य ठाणे असलेल्या कन्नानूर-कोप्पम वर ताबा मिळविला.[१०६] पांड्यांच्या आक्रमणाचा मुकाबला करण्याच्या कामात होयसळ सोमेश्वरास आपली सर्व शक्ती लावावी लागल्यामुळे त्याने तूर्त यादवाविषयी नरमाईचे धोरण अवलंबिले. अशाप्रकारे राजकीय स्थितीच्या दबावाखाली सोमेश्वराने कृष्णाशी तह केला व त्यामुळे होयसळ आणि यादवांच्यातील संघर्ष तात्पुरता थांबला.

उत्तर आणि दक्षिण आघाड्यावरील यशामुळे कृष्णाला त्या भागात आपले वर्चस्व प्रस्थापित करण्यात यश मिळाल्यावर त्याने आता आपले लक्ष इतर प्रश्नावर केंद्रित केले. रामचंद्र यादवाच्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटानुसार कृष्णाने दक्षिण कोसल किंवा छत्तीसगडच्या राजावर आपली जरब निर्माण केली.[१०७] कृष्णाला ''त्रिनेत्रत्रिपुरी'' असे बिरुद लावण्यात आले आहे.[१०८] त्रिपुरी ही छत्तीसगड किंवा दक्षिण कोसलची राजधानी होती. त्यावरून कृष्णाने छत्तीसगड प्रांतावर आपले वर्चस्व प्रस्थापित केल्याचे सिद्ध होते. या प्रदेशात त्रिपुरीच्या कलचुरींची सत्ता असून जज्जलानंतर त्या राज्यात कमकुवत राजांचे शासन होते. मिराशींच्या मतानुसार कृष्णाने जज्जलाच्या उत्तराधिकाऱ्यास पराभूत केले असावे.[१०९]

डॉ. ग्रॅहम मोराइस यांच्यामते सिंघणाच्या मृत्यूनंतर गोव्याचा कदंब राजा तिसरा षष्ठदेव याने आपला मेहुणा रट्ट कामदेव याच्या पाठबळावर यादवांचे स्वामित्व झुगारून दिले.[११०] कृष्णाने आपला सेनापती बिचण याला तिकडे पाठवून कदंब राजाचे बंड मोडून काढले. कोरीव लेखात कृष्णाने कोकणातील[१११] कदंब राजाचा पराभव केल्याचा उल्लेख या संदर्भातील असावा.[११२] तसेच कामपालाच्या पराभवाचे श्रेयही कृष्णास देण्यात येते.[११३] तो कामपाल म्हणजे कदंब षष्टदेवाचा मेहुणा रट्ट कामदेव होय.[११४] अशाप्रकारे कृष्णाने गोव्याच्या कदंबास तसेच त्यांना मदत करणाऱ्या सौंदत्तीच्या रट्टास त्यांच्या बंडखोरीबद्दल शासन केले.

यादवांच्या काही कोरीव लेखात कृष्णाला चोलावर विजय संपादन केल्याचे जे श्रेय देण्यात येते ते मात्र सत्यावर आधारित नसावे.[११५] कारण त्यावेळी चोल राज्याचा प्रमुख संपूर्ण दक्षिणेचा स्वामी म्हणून घेणारा महापराक्रमी राजा जाटवर्मन सुंदरपांड्य हा होता.

कृष्णाला सर्व आघाड्यावर विजय मिळवून देण्यात व राज्याचे प्रशासन योग्य प्रकारे सांभाळण्यात त्याचे शूर सेनानी आणि कार्यक्षम मंत्री यांचे महत्त्वाचे योगदान होते. बिचण उर्फ बिचिसेटी आणि त्याचा वडील भाऊ मल्लिसेटी हे सिंघणाचे अधिकारी कृष्णाच्या काळातही सेवेत होते. त्याशिवाय मल्लिसेटीचा मुलगा चाउंडसेटी आणि जनार्दन पुत्र लक्ष्मीदेव हेही त्याचे कार्यक्षम अधिकारी होते. कोरीव लेखात या सेनानींच्या पराक्रमाचे आणि यादव प्रशासनातील त्यांच्या योगदानाविषयी सविस्तर माहिती आढळते.[११६]

कृष्णाच्या कारकिर्दीत चक्रधरस्वामींनी महाराष्ट्रात महानुभाव पंथाची स्थापना केली. या पंथाचा अनुयायी नसतानाही कृष्णाला चक्रधरांविषयी नितांत आदर होता. बुलढाणा जिल्ह्यातील लोणार येथे चक्रधरस्वामींचे वास्तव्य असताना कृष्ण त्यांच्या दर्शनास गेला होता. चक्रधरांच्या जीवनावर आधारित लीळाचरित्र या ग्रंथात या भेटीचे वर्णन आले आहे.[११७] यादव राजाने यावेळी दक्षिणा म्हणून देऊ केलेली सोन्याची नाणी स्वीकारण्यास चक्रधरांनी नकार दिला असाही त्यात उल्लेख आहे.

कृष्णाच्या कारकिर्दीतील कोरीव लेख उत्तरेकडील विदर्भ आणि खानदेशापासून दक्षिणेकडे शिमोगा-चित्रदुर्ग प्रदेशापर्यंतच्या विस्तीर्ण भागात सापडले आहेत. यावरून आपला पितामह सिंघण याने निर्माण केलेले विशाल राज्य कृष्णाने कायम तर राखलेच शिवाय त्यावर आपले दृढनियंत्रण बसविले. कृष्णाच्या कारकिर्दीत राजधानी देवगिरीचे[११८] वैभव वाढत गेले त्या नगराने यादवांच्या मूळ राजधानी असलेल्या दाबरावतीवर (द्वारका, गुजरात) मात केली.[११९] ३० मे इ. स. १२६१ ही कृष्णाच्या राज्यकालाची शेवटची ज्ञात तिथी होय.[१२०]

**महादेव (इ. स. १२६१ ते १२७१)** : रामचंद्राच्या ठाणे ताम्रपटानुसार कृष्णाच्या मृत्यूनंतर त्याचा धाकटा भाऊ महादेव राज्यावर आला.[१२१] इ. स. १२५० मधील कृष्णाच्या ममदापूर शिलालेखात महादेवाचा उल्लेख कृष्णाचा वारसदार म्हणून करण्यात आला आहे.[१२२] महादेव आपल्याशी एकनिष्ठ असून आपला पुत्र रामचंद्र वयात आल्यावर राज्याची सूत्रे त्याच्या हाती सोपवील या विश्वासावर कृष्णाने महादेवास आपला वारस म्हणून नेमले होते. इ. स. १२५० पासून कृष्णाने महादेवास प्रशासनाचे अधिकार दिले होते. तसेच अनेक मोहिमावर देखील महादेवाने कृष्णासह कूच केले असावे.

कृष्ण आणि महादेव यांच्या निश्चित राज्यकालाविषयी यादवांच्या कोरीव लेखात परस्परविरोधी माहिती आलेली आहे. शके ११८५ मधील चौडाडमपूर शिलालेखात महादेवाच्या तिसऱ्या राज्यवर्षाचा उल्लेख आहे.[१२३] आपल्या राज्यारोहणाच्या प्रसंगी इ. स. ११८२ मध्ये महादेवाने आपला काळेगाव ताम्रपट जारी केला होता.[१२४] परंतु वरील उल्लेखाप्रमाणे शके ११८४ पर्यंत कृष्ण राज्यावर असल्याचेही पुरावे सापडले आहेत. याचे कारण म्हणजे कृष्णाच्या राजवटीच्या अखेरीस या दोघांची संयुक्त राजवट अस्तित्वात होती. अमलानंदाच्या "वेदान्तकल्पतरू" या ग्रंथात या दोघांच्या संयुक्त राजवटीचा उल्लेख आढळतो.[१२५] कृष्णाच्या एका कोरीव लेखातील "कान्हरदेव महादेव-विजयराज्ये" या उल्लेखावरून संयुक्त राजवटीस पुष्टी मिळते.[१२६] यावरून कृष्णाने या संयुक्त राजवटीस व महादेवास यादव राजबिरुदे धारण करण्यास संमती दिली होती हे स्पष्ट होते. परंतु शासनाचे संपूर्ण नियंत्रण महादेवाच्या हाती शके ११८४ किंवा इ. स. १२६१ मध्ये कृष्णाच्या मृत्यूनंतरच आले.

राज्याची सूत्रे स्वतंत्रपणे हाती घेतल्यावर पहिल्यांदा महादेवाने कोकणच्या सोमेश्वर शिलाहाराची बंडखोरी मोडून काढण्याचे काम हाती घेतले. हेमाद्रीच्या प्रशस्तीनुसार महादेवाने प्रचंड सैन्यासह कोकणवर स्वारी केली.[१२७] यापूर्वी सिंघणाने सोमेश्वराचा पूर्वाधिकारी केशिराज याला आपले स्वामित्व स्वीकारण्यास भाग पाडले होते. परंतु सिंघणाच्या मृत्यूनंतर शिलाहारांनी परत स्वतंत्रपणे कारभार सुरू केला होता. या स्वारीतील लढाईत सोमेश्वराचा पूर्ण पराभव झाला व त्याने समुद्रातील बोटीचा आश्रय घेतला. महादेवाने आपल्या नौदलाच्या सहाय्याने त्याचा पाठलाग सुरू केला. सोमेश्वराने केलेला प्रतिकार व्यर्थ होऊन महादेवाने त्याच्या नौदलासह सोमेश्वरास समुद्रात बुडविले. अशाप्रकारे शिलाहारांच्या ताब्यातील संपूर्ण कोकणपट्टी महादेवाने यादव राज्यात सामील करून घेतली.[१२८] सिंघणाने यापूर्वीच शिलाहारांच्या कोल्हापूर शाखेचा शेवट करून त्यांचा प्रदेश यादव राज्यात समाविष्ट करून घेतला होता त्यामुळे महाराष्ट्र, गोवा आणि उत्तर कर्नाटकाच्या संपूर्ण किनारपट्टीवर यादवांचे प्रभुत्व प्रस्थापित झाले. बृहन्मुंबईतील बोरीवली स्टेशन जवळील एकसर येथे काही वीरगळ

असून त्यावर सागरी युद्धाची शिल्पे कोरलेली आहेत.[१२९] आळतेकर यांच्या मतानुसार हे वीरगळ महादेव आणि सोमेश्वर यांच्यातील नाविक युद्धात वीरगती प्राप्त झालेल्या सोमेश्वराच्या नौदलातील सैनिकांच्या हौतात्म्याचे स्मारक होत.

रामचंद्राच्या पैठण ताम्रपटानुसार महादेवाने युद्धात विशालदेवाचा पराभव केला.[१३०] हेमाद्रीच्या प्रशस्तीत देखील महादेवाच्या गुर्जर आणि लाटवरील विजयाचे वर्णन करण्यात आले आहे.[१३१] यावरून हे स्पष्ट होते की कोकणच्या शिलाहारांवर गुर्जरांचे राजकीय वर्चस्व होते व महादेवाने कोकणचा समावेश आपल्या राज्यात केल्यामुळे संतप्त झालेल्या गुर्जरराजा विशालदेव याने यादवाविरुद्ध सैन्य पाठविले व महादेवाने विशालदेवाच्या सैन्याचा पराभव केला. मजुमदार यांच्या मते विशालदेव हा इ. स. १२६२ मध्ये मरण पावला.[१३२] त्यावरून महादेव याच्या कोकणवरील स्वारीच्या पाठोपाठ लगेच त्याने विशालदेवाचा पराभव केला असला पाहिजे.

काकतीय गणपती आणि त्याचे समकालीन यादवराजे सिंघण आणि कृष्ण यांच्यातील संबंध काही अपवाद वगळता मित्रत्वाचे होते. परंतु दोन्ही घराण्यातील राज्यकर्त्यांच्या बदलाबरोबर दोहोंतील संबंध बिघडले. गणपतीदेवानंतर त्याची कन्या रुद्राम्मादेवी हिच्या रूपाने एक स्त्री काकतीय राजप्रमुख झाल्याची बाब महादेवास खटकली व दोघात युद्ध सुरू झाले. महादेवाने तेलुंग राजावर मिळविलेल्या विजयाचा उल्लेख हेमाद्रीने केला आहे.[१३३] "सिद्धेश्वर चरितमु" या तेलुगु ग्रंथात देखील असे वर्णन आहे की, काकतीय सिंहासनावर एक स्त्री बसल्याचे पाहून परिस्थितीचा फायदा उठविण्यासाठी महादेवाने तेलुगु देशावर स्वारी केली. परंतु ती विफल करण्यात आली.[१३४] याच ग्रंथात पुढे असेही म्हटले आहे की, रुद्राम्मादेवीने महादेवाचे आक्रमण आपल्या मांडलिकांच्या सहाय्याने केवळ थोपविले एवढेच नव्हे तर नंतर यादव सैन्यास पळवून लावून देवगिरीपर्यंत त्यांचा पाठलाग केला. यात ऐतिहासिक सत्यापेक्षा अतिशयोक्ती अधिक आहे. तथापि एन. व्यंकटरमैय्या आणि एम. सोमशेखर शर्मा या दाक्षिणात्य इतिहासकारांनी तेलुगु वाङ्मयातील या काव्यमय वर्णनास ऐतिहासिक सत्य मानले आहे.[१३५] परंतु दोन्ही राजांच्या राजशासनात या घटनेचा उल्लेख नाही. यावरून असे म्हणावे लागेल की दोन्ही राज्यात शत्रुत्व निर्माण होऊन महादेवाने काकतीय प्रदेशावर केलेले आक्रमण काकतीयांनी निष्फळ केले.

यानंतर महादेवाने होयसळाकडे आपले लक्ष वळविले. होयसळ सोमेश्वराच्या प्रदीर्घ आजारामुळे त्याच्या राज्याचे विभाजन होऊन उत्तर भागावर ज्येष्ठ पुत्र नरसिंह आणि दक्षिण भागावर धाकटा मुलगा रामनाथ यांचा ताबा होता.[१३६] महादेवाने होयसळांवरील बिकट स्थितीचा लाभ घेण्यासाठी स्वारी केली, परंतु तयारीत असलेल्या होयसळ तिसऱ्या नरसिंहाने ती परतवून लावली. अर्थात दोन्ही राजवंश या मोहिमेत आपला विजय झाल्याचा दावा करतात.[१३७]

महादेवाने कृष्णाकडून वारसा हक्काने मिळविलेले यादवांचे राज्य कायम तर राखलेच, शिवाय कोकणचा प्रदेश नव्याने या राज्यात सामील करून घेतला. त्याच्या राज्याच्या सीमा उत्तरेस महाराष्ट्राच्या उत्तर सीमेपासून दक्षिणेस शिमोगा-चित्रदुर्ग परिसरापर्यंत व पश्चिमेस अरबी समुद्रापासून पूर्वेस महाराष्ट्राच्या पूर्व सीमेस भिडल्या होत्या. त्याची अल्पकालीन राजवट इ. स. १२७१ मध्ये संपुष्टात आली.

**आम्मणदेव (इ. स. १२७१) :** महादेवाच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा आम्मणदेव राज्यावर आला. कृष्णाने महादेवास आपला वारस म्हणून नेमले त्यावेळी त्याचा मुलगा रामचंद्र अल्पवयीन होता. तो वयात आल्यानंतर महादेव त्याला आपला उत्तराधिकारी म्हणून निवडील असा कृष्णाचा विश्वास होता. परंतु याच्या उलट महादेवाने आम्मणदेवास आपला वारस बनविले व त्याचा राज्याभिषेक झाला. आम्मणदेवाची कारकीर्द काही महिन्यातच संपली त्यामुळे त्याचा एकही कोरीव लेख उपलब्ध नाही. रामचंद्राने आम्मणास पदच्युत करून गादी मिळविल्याचा उल्लेख त्याच्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात आला आहे.[१३८] महानुभाव वाङ्मयात या घटनेविषयी वेगवेगळे वृत्तांत आढळतात. उदा. लीळाचरित्रात रामचंद्राने आम्मणास पदच्युत करून त्याचे डोळे काढल्याचे वर्णन आले आहे,[१३९] तर स्मृतिग्रंथात आम्मणास टार मारून महानुभाव महंतांचा छळ केल्याचा आरोप रामचंद्रावर करण्यात आला आहे.[१४०] भुवनविलासानुसार रामचंद्राने आम्मणास शिकारीवर असताना पकडले.[१४१] अशाप्रकारचे विविध वृत्तांत या घटनेविषयी महानुभाव ग्रंथात आढळतात. केवळ दोनच पुराभिलेखात या घटनेचा उल्लेख असून ते म्हणजे रामचंद्राचे पैठण आणि पुरुषोत्तमपुरी ताम्रपट.[१४२] आम्मणदेव हा रीतसर वारसदार नसल्यामुळे रामचंद्राने त्याला पदच्युत करून आपला रीतसर असलेला राज्यारोहणाचा हक्क प्राप्त केला असे त्यातील वर्णन आहे. हेमाद्रीच्या प्रशस्तीत आम्मणदेवाच्या नावाचा उल्लेख नाही. तो रामचंद्राचा मंत्री आणि आश्रित असल्यामुळे त्याने तो टाळण्याचे कारण समजू शकते.

**रामचंद्र उर्फ रामदेव (इ. स. १२७१ ते १३१२)** : राजकीय कटाद्वारे रामचंद्राने आपला चुलत भाऊ आम्मण यास पदच्युत करून इ. स. १२७१ मध्ये आपला राज्याभिषेक करवून घेतला. राज्याची सुत्रे हाती घेतल्याबरोबर त्याने माळवा आणि गुजरातची मोहीम हाती घेतली.

परमार जयसिंहाच्या मृत्यूनंतर इ. स. १२७० मध्ये पहिला अर्जुनवर्मन राज्यावर आला. परंतु त्याचा मंत्र्याशी बेबनाव असल्यामुळे राज्यात अव्यवस्था आणि अराजक सुरू झाले. माळव्यात हिंसाचार आणि रक्तपाताचा कळस झाला. ही परिस्थिती बघून राज्यावर आल्याबरोबर रामचंद्राने माळव्यावर स्वारी केली. या स्वारीत रामचंद्राचा विजय झाल्याची नोंद त्याच्या इ. स. १२७२ मधील टाणे ताम्रपट,[१४३] इ. स. १२७१ मधील

पैठण ताम्रपट[१४४] आणि इ. स. १२७६ मधील उदरी शिलालेखात[१४५] करण्यात आली आहे. ठाणे ताम्रपटात रामचंद्राच्या गुजरात विजयाचा देखील उल्लेख आहे.

होयसळांनी यादवांचा सामंत असलेल्या कदंब कावदेव याच्या प्रदेशावर हल्ला केला आणि महादेवाच्या होयसळाकडून झालेल्या पराभवाचा बदला घेण्याची वाट बघत असलेल्या रामचंद्राने सालूव टिक्कमदेव उर्फ टिक्कम याच्या नेतृत्वाखाली दक्षिण मोहीम हाती घेतली. टिक्कमाने होयसळांचा पराभव करून कावदेवास आपला प्रदेश परत मिळवून दिला.[१४६] या विजयाने उत्साहित झालेल्या टिक्कमाने दक्षिणेकडील आगेकूच चालू ठेवली आणि संतार प्रमुख बोम्मरस याचा पराभव करून त्यास यादवांचा सामंत बनविले.[१४७] स्थानिक सामंत आणि प्रमुख अधिकाऱ्यांनी केलेल्या सहकार्यामुळे टिक्कमाचा आत्मविश्वास बळावला.[१४८] त्याने सरळ होयसळांच्या प्रदेशात घुसून राजधानी द्वारसमुद्र जवळ असलेल्या बेलवडी किल्ल्याभोवती वेढा टाकला.[१४९] होयसळास या आव्हानामुळे फार मोटा धक्का बसला. तशाही स्थितीत होयसळ सैन्याने चिक्क कोट्यनायकाच्या नेतृत्वाखाली यादव सेनापती टिक्कम याला जोरदार लढत दिली. टिक्कमाला आपल्या विजयाची खात्री होती व काही क्षणात द्वारसमुद्रवर ताबा मिळवू असा त्याचा दावा होता. परंतु त्याच्या सैन्याला हार खाऊन माघार घ्यावी लागली. होयसळांच्या दस्तेवजात त्यांनी या स्वारीत यादव सैन्याची कशी त्रैधातिरपिट उडविली याचे रसभरीत व काहीसे अतिशयोक्तीपूर्ण वर्णन करण्यात आले आहे.[१५०] याउलट यादवांच्या कोरीव लेखात टिक्कमाचा द्वारसमुद्र विजय, त्याची लूट, होयसळांचे हत्ती व घोडे पकडणे आणि आपल्या विजयाचे स्मारक म्हणून तेथे लक्ष्मीनारायणाचे मंदिर बांधल्याचे वर्णन आढळते.[१५१] त्यामुळे या स्वारीच्या फलनिष्पत्तीविषयी निश्चित अंदाज करणे कठीण आहे. परंतु १२७६ मधील या नंतरच्या काळातील कित्येक कोरीव लेखावरून शिमोगा जिल्ह्यावर यादवांची सत्ता दृढ असल्याचा संकेत मिळतो.[१५२] यावरून या स्वारीत होयसळांनी यादवांचा दारुण पराभव केल्याचा दावा केला आहे. तो पूर्णपणे खरा नाही

पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात रामचंद्राने डहाळ देशाच्या राजाचा पराभव केल्याची, भांडागार येथील राजास शरण आणल्याची, वज्राकार येथील राजास पदभ्रष्ट केल्याची व गवळी राजास युद्धात हरविल्याची नोंद करण्यात आली आहे.[१५३] यापैकी डहाळ देश म्हणजे त्रिपुरीच्या कलचुरींचे राज्य होय. परंतु रामचंद्राने मात केलेल्या कलचुरी राजाचे नाव अज्ञात आहे. भांडागार (भंडारा जिल्हा, महाराष्ट्र) येथील राजा कोण होता हेही अस्पष्ट आहे. वास्तविक विदर्भाचा बहुतेक भाग सिंघणाच्या कारकिर्दीतच यादव राज्यात आला होता. पूर्वेकडील नागपूर-भंडारा परिसराच्या विजयाचे श्रेय

रामचंद्रास द्यावे लागेल. रामटेक येथील आणि बालाघाट (मध्यप्रदेश) जिल्ह्यातील लांजी येथील त्याचे शिलालेख याची पुष्टी करतात.[१५४] वज्राकार म्हणजे चांद जिल्ह्यातील वैरागढ होय, पण रामचंद्राने पदभ्रष्ट केलेल्या तेथील प्रमुखाचे नाव माहीत नाही. रामचंद्राने पराभूत केलेला गवळी राजा म्हणजे खानदेशातील अभी प्रमुख असावा.[१५५]

पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात रामचंद्राच्या दिग्विजयांच्या यादीत पल्ली, कान्यकुब्ज कैलास, माहीम, संगम आणि खेट इत्यादींचा समावेश आहे.[१५६] पल्लीची निश्चिती अद्यापपर्यंत झालेली नसून कान्यकुब्ज आणि कैलासवरील त्याचे विजय म्हणजे केवळ कविकल्पना होय. माहीम म्हणजे मुंबईचे उपनगर माहीम असून संगम म्हणजे सिंधुदु जिल्ह्यातील संगमेश्वर व खेड हे त्याच नावाने आज रत्नागिरी जिल्ह्यातील तालुक्यां मुख्यालय आहे. येथील शासक हे किरकोळ प्रमुख असून यादवांचे वर्चस्व मानल्यामुळे त्यांच्याविरुद्ध कारवाई करण्यात आली असावी.

याच ताम्रपटानुसार रामचंद्राने वाराणशी क्षेत्रास मुस्लिम राजवटीतून मुक्त करू तिथे शारंगपाणीचे मंदिर बांधले.[१५७] ही घटना केव्हा घडली याची नोंद या ताम्रपटा नाही. ओ. पी. वर्मा यांच्या मतानुसार रामचंद्राने ही मोहीम हिंदूची देवस्थाने मुस्लि मूर्तीभंजकांपासून वाचविण्याच्या दृष्टीने हाती घेतली. तिचा काळ अल्लाउद्दि खिलजीच्या दक्षिणेतील इ. स. १२९४ मधील आक्रमणापूर्वीचा व साधारणत इ. स. १२८५ ते इ. स. १२९० या दरम्यानच्या काळातील असावा. कारण त्यावेळ उत्तरेत अराजक आणि गोंधळाची स्थिती निर्माण झाली होती.[१५८]

रामचंद्राचा काकतीयाशी देखील संघर्ष झाल्याचे संकेत मिळतात. अंबादेव नावाच्य काकतीयांच्या सामंताने आपल्या इ. स. १२९० मधील शिलालेखात असे नमूद के आहे की, त्याला देवगिरीच्या राजाकडून सोने आणि जडजवाहीर भेटीच्या स्वरूपा मिळाले होते.[१५९] यावरून हे स्पष्ट होते की या भेटीच्या मोबदल्यात अंबादेवा काकतीयाऐवजी यादवांचे स्वामित्व स्वीकारले. या घटनेमुळे काकतीय रा रुद्राम्मादेवी हिने आपला सेनापती विठ्ठल याच्या नेतृत्वाखाली यादवांनी बळकावलेल प्रदेशापैकी रायचूर जवळील मानवे आणि हालुवे हे किल्ले जिंकून घेतले.[१६०] तरीप या भागात इ. स. १२९७ पर्यंतच्या काळातील यादवांचे कोरीव लेख आढळतात.[१ यावरून काकतीयांना यादवाविरुद्ध निर्णायक विजय मिळाला नव्हता असे दिस

यादव सैन्य काकतीयांच्या प्रदेशावरील मोहिमेत गुंतले असताना रामचंद्र देवगिरीवर झालेल्या अल्लाउद्दिन खिलजीच्या आक्रमणाचा मुकाबला करावा लागल दिल्लीचा खिलजी सुलतान जलालुद्दीन खिलजी याचा पुतण्या अल्लाउद्दिन याने या राजाकडील अमाप संपत्तीविषयी ऐकले होते.[१६२] आपल्या हेराकडून त्याला बात

मिळाली की, यादवांचे मुख्य सैन्य दक्षिणेतील मोहिमेवर असून देवगिरी येथे मोजके सैनिक आहेत.[१६३] त्यामुळे आपल्या चुलत्याच्या परवानगीशिवाय २६ फेब्रुवारी १२९६ रोजी अल्लाउद्दिन याने आपल्या कारा येथील जहागिरीतून देवगिरीस प्रयाण केले. त्यावेळी त्याच्याबरोबर फक्त चार हजार घोडेस्वार आणि दोन हजार पायदळ होते.[१६४] देवगिरीजवळील लासूर इथे यादव सेनानी कान्हा याने अल्लाउद्दिनाचा प्रतिकार केला, परंतु त्याला पराभूत करून अल्लाउद्दिन देवगिरीजवळ आला. बहुतेक सैन्य युवराज पाचव्या सिंघणाच्या बरोबर मोहिमेवर असल्यामुळे रामचंद्राने उर्वरित सैन्यानिशी देवगिरीचे रक्षण करण्याचा प्रयत्न केला. परंतु आपल्या मागून आणखी प्रचंड सैन्य येत असल्याची अल्लाउद्दिनाने पसरविलेली अफवा त्याच्या कानावर आल्यावर मात्र त्याचा धीर खचला. त्यामुळे अखेरीस त्याने तहाची याचना केली.[१६५] अल्लाउद्दिनाने सोने, चांदी आणि जडजवाहिरांच्या रुपात प्रचंड संपत्तीच्या मोबदल्यात तहास मान्यता दिली. पुढे त्याने त्रास देऊ नये म्हणून रामचंद्राने आपल्या कन्येचा विवाह अल्लाउद्दिनाशी लावला असे फारशी साधनात नमूद केले आहे.[१६६] प्रचंड संपत्ती, नववधु आणि वार्षिक खंडणीचे अभिवचन घेऊन २५ दिवसानंतर अल्लाउद्दिन कारास परत गेला.

तथापि, या पराभवापासून बोध घेऊन भावी काळातील आक्रमणाशी मुकाबला करण्यासाठी तयारी करण्याऐवजी किंवा मुस्लिम आक्रमकाविरुद्ध शेजारी राज्यांना विश्वासात घेऊन त्यांच्यासह संयुक्त मोर्चा बनविण्याऐवजी रामचंद्राने होयसळाविरुद्ध मोहीम हाती घेऊन वेळ, शक्ती आणि संपत्ती वाया घालविली. इ. स. १३०३ मध्ये यादव सैन्याने चित्रदुर्गापर्यंत होयसळांचा मुलुख व्यापला. होयसळ तिसऱ्या बल्लाळाने यादवांच्या ताब्यातील नाकिगुंडी किल्ला उध्वस्त करून त्यांच्यावर निर्णायक विजय मिळविला.[१६७] यादवांनीही या लढाईत होयसळावर विजय मिळविल्याचा दावा केला आहे.[१६८] यावरून होयसळ आणि यादव यांच्यातील या शेवटच्या लढाईत देखील यादवांना फारसे यश लाभले नाही हे स्पष्ट होते.

इ. स. १३०६ पर्यंत रामचंद्र नियमितपणे दिल्लीकडे वार्षिक खंडणी पाठवीत होता. यावेळी आपला चुलता सुलतान जलालुद्दिन खिलजीचा वध करून अल्लाउद्दिन सुलतान झाला होता. परंतु त्याच्या सुरुवातीच्या उत्तरेतील लढाया यशदायी ठरल्या नव्हत्या. एवढेच नव्हे तर काकतीय प्रतापरुद्राने वरंगलवरील खिलजीचे आक्रमण परतवून लावले होते. कदाचित या पार्श्वभूमीवर रामचंद्राने खंडणी पाठविण्याचे थांबविले.[१६९] इसामीने लिहून ठेवलेल्या या माहितीपेक्षा वेगळी माहिती रामचंद्राचा समकालीन मुस्लिम इतिहासकार बरनी याने नमूद केली आहे. त्यानुसार रामचंद्र सुलतानाशी एकनिष्ठ राहू इच्छित होता, परंतु युवराज तिसऱ्या सिंघणाने त्याला विरोध करून खंडणी पाठविण्याचे थांबविण्यास भाग पाडले. रामचंद्राने सुलतानास हे कळविले

आणि आवश्यक ती कारवाई करण्याची सूचना केली.[१७०] त्यामुळे नंतर बंदी म्हणून दिल्लीला गेल्यावर देखील सुलतानाकडून त्याला चांगली वागणूक मिळाली.

अल्लाउद्दिनने ताबडतोब मलिक काफूर याला सैन्यासह देवगिरीस पाठविले. युवराज सिंघण, त्याचा भाऊ भिल्लम आणि दोन सेनानी राघव आणि रामदेव यांनी मलिक काफूरशी लढा दिला. शेवटी यादव सैन्याचा पराभव होवून रामचंद्राने शरणागती पत्करली. परंतु त्याची मुले काही सैनिकासह निसटली. रामचंद्र आणि त्याच्या कुटुंबियास मलिक काफूरने बंदी बनवून दिल्लीस नेले.[१७१] अल्लाउद्दिनने रामचंद्राचा आदरसत्कार केला आणि सहा महिन्याच्या त्याच्या वास्तव्यात त्याला योग्य त्या सर्व सुखसोयी पुरविल्या. परत येण्याअगोदर सुलतानाने रामचंद्रास त्याचे राज्य तर परत दिलेच, शिवाय नौसारीची जहागीर आणि वाटखर्ची म्हणून एक लाख टंक दिले.[१७२] या कृपेमागे अल्लाउद्दिनचा स्वार्थ होता. पुढील काळात दक्षिणेतील आपल्या राज्यविस्तारात त्याला रामचंद्राचा उपयोग करून घ्यावयाचा होता. रामचंद्र मात्र आपले स्वातंत्र्य कायमचे गमावून बसला.

दिल्लीहून परत आल्यावर रामचंद्रास अनेक समस्यांना तोंड द्यावे लागले. इ. स. १३१० मधील त्याच्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात त्याच्या अनेक दिग्विजयांचे वर्णन करण्यात आले आहे.[१७३] परंतु त्यातील बहुतेक अल्लाउद्दिनच्या आक्रमणापूर्वीचे असून बाकीचे त्याच्या अनुपस्थितीत बंड करणाऱ्या सामंतावरील स्वाऱ्यांच्या संदर्भातील होत.

इ. स. १३०९ मध्ये काकतीयाविरुद्धच्या मोहिमेसाठी अल्लाउद्दिनने पाठविलेल्या सैन्याचे रामचंद्राने देवगिरीस स्वागत केले व त्यांना आदरातिथ्याने वागविले.[१७४] पुढे वरंगलला जाताना आपल्या राज्याच्या सरहद्दीपर्यंत या सैन्यास सर्व सुखसोयी पुरविल्या.[१७५] अमीर खुश्रोच्या वृत्तांतानुसार रामचंद्राने अल्लाउद्दिनच्या होयसळाविरुद्धच्या मोहिमेत देखील अशाच प्रकारचे सहकार्य दिले.[१७६]

इ. स. १३१२ च्या उत्तरार्धात रामचंद्राचे देवगिरीस निधन झाले. "सिद्धेश्वर चरितमु" या तेलुगु ग्रंथात असे नमूद करण्यात आले आहे की, यादव आणि काकतीयातील संघर्षाच्या वेळी प्रतापरुद्राचा सेनापती अन्नमदेव यानें रामचंद्रास ठार केले. ही माहिती चुकीची आहे कारण या लढाईनंतरही काही वर्षे रामचंद्र जिवंत असल्याचे पुरावे उपलब्ध होतात.

रामचंद्र हा मराठी भाषा आणि वाङ्मयाचा पुरस्कर्ता आणि आश्रयदाता असल्यामुळे त्याच्या काळात मराठी भाषेला वाङ्मयीन भाषेचा दर्जा मिळून ती लोकप्रिय झाली. त्याचा आश्रित असलेल्या नरेंद्र कवीने "रुक्मिणी स्वयंवर" आणि "नागदेव चरित" या मराठी ग्रंथांची रचना केली. ज्ञानेश्वरांनी "ज्ञानेश्वरी" ची

रचनाही त्याच्या कारकिर्दीत म्हणजे इ. स. १२९० मध्ये केली. यादव वंशातील रामचंद्र हा शेवटचा श्रेष्ठ राजा होता. त्याच्या कारकिर्दीतच इ. स. १२९६ मधील अल्लाउद्दिनच्या देवगिरीवरील स्वारीपासून यादव राजवैभवाचा ऱ्हास सुरू झाला. दुर्दैवाने रामचंद्राने मुस्लिम आक्रमणामुळे होणारे राजकीय आणि धार्मिक परिणाम लक्षात घेतले नाहीत. उत्तरेकडील शेजारी राज्यावर वारंवार तुर्कांची आक्रमणे चालू असताना तो गाफिल राहिला. अल्लाउद्दिनची पहिली स्वारी झाल्यानंतरही तो बेफिकीर राहिला. एवढेच नव्हे तर या आक्रमकांना रोखण्याऐवजी त्याने काकतीय आणि होयसळाविरुद्धच्या त्यांच्या मोहिमांत तुर्कांना मदत करून दक्षिणेतील हिंदू राज्यांच्या नाशास मदत केली.

**तिसरा सिंघण** (इ. स. १३१२) : रामचंद्राच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा तिसरा सिंघण राज्यावर आला. त्याचे नाव विविध साधनात विविध प्रकारे (सिंघण, शंकर, संगम) लिहिण्यात आले आहे.[१७७] अल्लाउद्दिनच्या आक्रमणास युवराज असलेल्या सिंघणाने प्रतिकार केल्याचा उल्लेख वर आला आहेच. राज्यावर आल्यावर त्याने खंडणी पाठविणे थांबवून दिल्लीच्या सुलतानाचे वर्चस्व झुगारून दिले. त्यामुळे अल्लाउद्दिनने सिंघणास वटणीवर आणण्यासाठी मलिक काफूरला सैन्यासह पुन्हा देवगिरीस पाठविले.[१७८] इसामीच्या वृत्तांतानुसार सिंघण देवगिरी सोडून पळून गेला. परंतु फरिश्ता म्हणतो की, सिंघणाने निकराची झुंज दिली व त्यात तो ठार झाला. हे खरे असले पाहिजे, कारण सिंघण हा स्वाभिमानी होता, तसेच नंतर त्याच्याविषयी काहीच माहिती मिळत नाही. मलिक काफूर काही काळ देवगिरीस राहिला. त्याने या नगरास दक्षिणेतील मुस्लिम सत्तेचे पहिले केंद्र बनविले.[१७९]

अल्लाउद्दिनच्या आजाराची बातमी आल्यामुळे इ. स. १३१५ मध्ये मलिक काफूरने देवगिरी ऐन–उल–मुल्कच्या हाती सोपवून दिल्लीस प्रयाण केले. इ. स. १३१६ मध्ये अल्लाउद्दिनच्या मृत्यूनंतर दिल्लीच्या तख्तासाठी तंटा सुरु होऊन शेवटी त्याचा तिसरा मुलगा मुबारक खान सुलतान झाला. या गोंधळाचा फायदा घेऊन अनेक हिंदू राजे स्वतंत्र झाले. मुबारक खिलजीने ऐन–उल–मुल्क यास देवगिरीहून दिल्लीस परत बोलावले. रामचंद्राचा जामात हरपालदेव याने या संधीचा लाभ घेऊन मंत्री राघव याच्या सहाय्याने देवगिरीचे राजपद आपल्याकडे घेऊन दिल्ली सल्तनतीविरुद्ध बंड केले. मुबारक खिलजीने इ. स. १३१८ मध्ये देवगिरीवर स्वारी करून राघवास पराभूत केले व जवळच्या डोंगरावर आश्रय घेतलेल्या हरपालदेवास पकडून ठार केले.[१८०] त्यानंतर मलिक याखलखी याची मुबारक खिलजीने देवगिरीचा सुभेदार म्हणून नेमणूक केली.

## देवगिरीच्या यादवांची वंशावळ



## तळटिपा

१ नरसिंहमूर्ती, ए. व्ही., **दि सेवनाज ऑफ देवगिरी, म्हैसूर,** १९७१; एस. एच. रित्ती, **दि सेवनाज,** (यादवाज ऑफ देवगिरी), धारवाड, १९७३.

२ **आय. ए.,** खंड–३८, पृ. ८७, **इ. आय.,** खंड–४, पृ. १४७; **इ. सी.,** खंड–११, डीजी–४१.

३ राजप्रशस्ती पोर्शन ऑफ दि व्रतखंड ऑफ दि कॉम्पेडीयम, **चतुर्वर्ग–चिंतामणी, कलेक्टेड वर्क्स ऑफ भांडारकर,** खंड–३, पृ. १९३, व्ही. व्ही. २०–२२.

४ **इ. आय.,** खंड–३७, पृ. ७४ व त्यापुढे; खंड–३६, पृ. २४९ व त्यापुढे; **आय. ए.,** खंड–१२, पृ. ११९ व त्यापुढे.

५ **आय. ए.,** खंड–१२, पृ. १२४.

६ रित्ती, एस. एच., उपरोक्त, पृ. २४–२५.

७ **एस. आय. आय.,** खंड–२०, नं. २१५.

८ नरसिंहमूर्ती, उपरोक्त, पृ. २७–२९; एस. एच. रित्ती, उपरोक्त, पृ. २५–२७.

९ **आय. ए.,** खंड–१८, पृ. १२० व त्यापुढे; **इ. आय.,** खंड–२, पृ. २१८ व त्यापुढे.

१० **राजप्रशस्ती : कलेक्टेड वर्क्स ऑफ भांडारकर,** खंड–३, पृ. १९३, व्ही. २२.

११ **ए. आर. आय. इ.,** १९५७–५८, परिशिष्ट–ए, नं. १२.

१२ **इ. आय.,** खंड–२, पृ. २१८ व त्यापुढे; ओळ–३७.

१३ कित्ता, पृ. २१५.

१४ **आय. ए.,** खंड–१२, पृ. ११९–२६ व त्यापुढे.

१५ कित्ता, खंड–९, पृ. ११९.

१६ **इ. सी.,** खंड–७, एसए. नं. १०८–१०९.

१७ रित्ती, एस. एच. ॲण्ड जी. सी. शेळके, **इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम नांदेड डिस्ट्रिक्ट,** पृ. ५ व त्यापुढे.

१८ **आय. ए.,** खंड–१२, पृ. १२५.

१९ रित्ती, एस. एच., **दि सेवनाज,** पृ. ५६.

२० खरे, ग. ह. (संपा.) **दक्षिणेच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने,** खंड-१, पृ. ३३ व त्यापुढे.

२१ **इ. आय.,** खंड–३७, पृ. ८४; **राजप्रशस्ती,** व्ही. २९.

२२ **कित्ता** खंड–३६, पृ. २४९ व त्यापुढे.

२३ **ए. आर. एस. आय. इ.,** १९३३–३४, बीके. नं. ८९.

२४ **इ. आय.,** खंड–३२, पृ. ३८.

२५ **राजप्रशस्ती : कलेक्टेड वर्क्स ऑफ भांडारकर,** खंड–३, पृ. १९४, व्ही. ३२.

२६ **जे. आय. एच.,** खंड–३०, पृ. १३०, तळटीप नं. १३८.

२७ **आय. ए.,** खंड–१२, पृ. १२६ व त्यापुढे.

२८ **इ. आय.,** खंड–२८, पृ. २१०.

२९ **गायकवाड ओरिएन्टल सिरीज,** नं. ८२, व्ही. ४ व त्यापुढे.

३० **आय. ए.,** खंड–९, पृ. १२ व त्यापुढे.

३१ **राजप्रशस्ती : कलेक्टेड वर्क्स ऑफ भांडारकर,** खंड–३, व्ही. ३८.

३२ कृष्णम्माचार्य, इ. (संपा.), **सुक्तिमुक्तावली** (लेखक–जल्हण), गायकवाड ओरिएन्टल सिरीज, नं. ३२, बरोडा, व्ही. १२.

३३ **प्रोसिडींग्ज ऑफ इंडियन हिस्टरी कॉंग्रेस,** १९४५, पृ. ९९.

३४ रित्ती, एस. एच., **दि सेवनाज,** पृ. ७२.

३५ **एस. आय. आय.,** खंड–१५, नं. ५८.

३६ **ए. आर. आय. इ.,** १९५९–६०, परिशिष्ट बी. नं. ४४८; **एस. आय. आय.,** खंड–१५, पृ. ५८, ५९.

३७ रित्ती, पूर्वोक्त, पृ. ७५ व त्यापुढे.

३८ **ए. आर. आय. इ.,** १९६०–६१, परिशिष्ट–बी, नं. ५५७.

३९ **एस. आय. आय.,** खंड–१५, नं. १४९.

४० कित्ता, नं. २१६, **इ. सी.,** खंड–११, डीजी. नं. २५.

४१ **आय. एच. क्यू.,** खंड–४, पृ. १२६; **इ. आय.,** खंड–३, पृ. २१७ व त्यापुढे; **ए. आर. आय. इ.,** १९५३–५४, परिशिष्ट–बी, नं. २४०; **एस. आय. आय.,** खंड–१५, नं. १५१, १५२.

४२ **ए. आर. एस. आय. इ.,** १९३३–३४, बीके. नं. १३१; **एस. आय. आय.,** खंड–२०, नं. ४१, १८३.

४३ **इ. सी.,** खंड–५, एके नं. ५.

४४ पूर्वोक्त, **राजप्रशस्ती,** खंड–३, पृ. १९५, व्ही. ४१, तळटीप–५.

४५ **इ. आय.,** खंड–१८, पृ. ३५४, व्ही. १६.

४६ **ए. आर. आय. इ.,** १९५६–५७, परिशिष्ट–बी, नं. १८१.

४७ **इ. आय.,** खंड–३, पृ. ९७ व त्यापुढे; व्ही. ५.

४८ **इ. आय.,** खंड–३०, पृ. ३१ व त्यापुढे; **आय. ए.,** खंड–१४, पृ. ३१४–१९.

४९ **इ. आय.,** खंड–३, पृ. ३.

५० पूर्वोक्त, **राजप्रशस्ती,** खंड–३, पृ. १९५, व्ही. ३९.

५१ **इ. आय.,** खंड–५, पृ. २९, खंड–२८, पृ. ९८.

५२ कुंदनगर, के. जी. (संपा.), **इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम नॉदर्न कर्नाटक ॲण्ड कोल्हापूर,** पृ. १४६; **ए. आर. एस. आय. इ.,** १९३३–३४, बीके. १५७.

५३ रित्ती. एस. एच., **दि सेवनाज,** पृ. १०३–१२.

५४ वर्मा, ओ. पी., **दि यादवाज ॲण्ड देअर टाईम्स,** पृ. ७७–८४.

५५ डेरेट, जे. डी. एम्., **दि होयसलाज,** ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, १९५७, पृ. ९९.

५६ **एस. आय. आय.,** खंड–२०, नं. १८७.

५७ **ए. आर. एस. आय. इ.,** १९५९–६०, नं. ४३७.

५८ **एस. आय. आय.,** खंड–९, भाग–१, नं. ३६४.

५९ **इ. सी.,** खंड–८, एसबी. नं. ३०९.

६० कित्ता, नं. ३७६.

६१ कित्ता, नं. २७६, खंड–७, एसएचआय. नं. ९५, एचआय. नं. ४४.

६२ कित्ता, खंड–५, एचएन नं. ८४, खंड–३, एमडी. नं. १२१.

६३ कित्ता, खंड–४, एनजी, नं. १२१.

६४ डेरेट, उपरोक्त, पृ. २२८.

६५ **ए. आर. एस. आय. इ.,** १९५१–५२, नं. ९५.

६६ **इ. सी.,** खंड–८, एसबी. नं. २१७, ३१९, ३२२, ३८७, ४२५.

६७ खरे, ग. ह. (संपा.), **दक्षिणेच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने,** खंड–१, पृ. ५५.

६८ **इ. आय.,** खंड-३, पृ. ११०-१३, खंड-२५, पृ. १९९-२२५.

६९ कित्ता, खंड-३२, पृ. १४२.

७० दलाल, सी. डी. (संपा.), **हमीरा मादा मर्दाना,** (लेखक-जयसिंह), गायकवाड ओरिएन्टल सिरीज, नं. १०, बरोडा, १९२०, एसीटी-२, पृ. २१.

७१ दलाल, सी. डी. (संपा.), **वसंत विलास,** (लेखक-भालचंद्र), गायकवाड ओरिएन्टल सिरीज, नं. ७, १९१७, अध्याय-५, आर्या २४-४३.

७२ **इ. आय.,** खंड-२५, पृ. २०३.

७३ खरे, ग. ह., **पूर्वोक्त,** खंड-१, पृ. ५५.

७४ शास्त्री, अजयमित्र, **यादव इन्स्क्रिपशन्स फ्रॉम अंबाजोगाई,** दि साकलेश्वर टेंम्पल इन्स्क्रिप्शन्स ऑफ खोलेश्वर, २, ३०-३१, पृ. १२, ३३.

७५ **हमीरा मादा मर्दाना** (गायकवाड ओरिएन्टल सिरीज नं. १०), एसीटी. २, पृ. १७; **वसंत विलास,** (गायकवाड ओरिएन्टल सिरीज नं. ७), अध्याय-५.

७६ **हमीरा मादा मर्दाना,** प्रस्तावना, पृ. ५-९, ९४.

७७ **किर्ती कौमुदी,** अध्याय-४, आर्या ४२-६३.

७८ **ए. एस. डब्ल्यू. आय.,** खंड-३, पृ. ८७.

७९ **इ. आय.,** खंड-१, पृ. २०-३२.

८० **आय. ए.,** खंड-४, पृ. २१०-१३.

८१ **इ. सी.,** खंड-८, एसबी. नं. २२१.

८२ **ए. आर. आय. इ.,** १९५१-५२, नं. ९५.

८३ **इ. सी.,** खंड-८, एसबी. नं. ३१९; **कर्नाटक इन्स्क्रिपशन्स,** खंड-४, नं. ५४.

८४ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड-१२, पृ. ११.

८५ कित्ता, खंड-१०, पृ. २६०.

८६ **कर्नाटक साहित्य परिषद पत्रिका,** खंड-२८, पृ. १.

८७ **इ. सी.,** खंड-७, एचआय. नं. २०, ४८.

८८ **ए. आर. आय. इ.,** १९५८-५९, बी. ५७२.

८९ **इ. सी.,** खंड-७, एचआय. नं. १३, ५४.

९० **इ. आय.,** खंड-७, पृ. ८७.

९१ शास्त्री, अजयमित्र, **यादव इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम अंबाजोगाई,** विश्वेश्वरनंदा इन्स्टिट्यूट, होशियारपूर, १९७२.

९२ **इ. सी.,** खंड-७, एसके. नं. २१७.

९३ **इ. आय.,** खंड-१९, पृ. १९ व त्यापुढे; खंड-२५, पृ. १९९-२२५, खंड-३१, पृ. ३१ व त्यापुढे.

९४ कित्ता, खंड-२१, पृ. १५.

९५ **हैद्राबाद आर्केऑलॉजिकल सिरीज,** नं. १३, पृ. ९८-१०२.

९६ वर्मा, ओ. पी., **दि यादवाज ॲन्ड देअर टाईम्स,** पृ. ११३; नरसिंहमूर्ती, ए. व्ही., **दि सेवनाज ऑफ देवगिरी,** पृ. १०३.

९७ **ए. आर. आय. इ.,** १९५७-५८, परिशिष्ट-बी, नं. २२१.

९८ **इ. आय.,** खंड-१९, पृ. २३.

९९ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड-१२, पृ. ३४, ४६.

१०० वर्मा, ओ. पी., **दि यादवाज ॲन्ड देअर टाईम्स,** पृ. ११४, तळटीप-५.

१०१ **इ. आय.,** खंड-१, पृ. २८; **जे. ए. एस. बी.,** खंड-१२, पृ. ३४ आणि त्यापुढे; **आय. ए.,** खंड-१४, पृ. ३१४ आणि त्यापुढे; **इ. आय.,** खंड-१९, पृ. १९ आणि त्यापुढे.

१०२ **इ. सी.,** खंड-८, एसबी. नं. ४२६.

१०३ **इ. आय.,** खंड-१९, पृ. १९.

१०४ **आय. ए.,** खंड-१४, पृ. ७४.

१०५ **इ. सी.,** खंड-८, डीजी. नं. ४८, ५०, ८८, १०३.

१०६ **इ. आय.,** खंड-२२, नं. १०, शास्त्री, के. ए. एन., **दि पंड्याज किंग्डम,** पृ. १६२.

१०७ **इ. आय.,** खंड-२५, पृ. २०४.

१०८ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड-१२, पृ. ३९.

१०९ **सी. आय. आय.,** खंड-४, भाग-१ पृ. ३१.

११० मॉरिश, जी. एम., **कदंबकुल,** पृ. २०९, बॉम्बे, १९३१.

१११ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड-१२, पृ. ३९.

११२ कित्ता, पृ. ४७.

११३ **इ. आय.,** खंड-२५, पृ. २०४.

११४ वर्मा, ओ. पी., **दि यादवाज ॲन्ड देअर टाईम्स,** पृ. १२०-२१.

११५ **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड-१२, पृ. ३९; **इ. आय.,** खंड-२५, पृ. २०४.

११६ **इ. आय.,** खंड-१९, पृ. २७ आणि त्यापुढे; खंड-३४, पृ. ३४; **आय. ए.,** खंड-१४, पृ. ७४; **जे. बी. बी. आर. ए. एस.,** खंड-१२, पृ. ३१, ४७.

११७ नेने, एच. एन. (संपा.), **लिळाचरित्र,** भाग १, पृ. ३०-३१, नागपूर, १९५४.

११८ **ए. आर. आय. इ.,** १९२९, बीके. नं. १८२.

११९ **कर्नाटक इन्स्क्रिप्शन्स,** २, पृ. १३७, नं. ३९.

१२० कित्ता, पृ. १३९-४०, नं. ४०.

१२१ **इ. आय.,** खंड-१३, पृ. २०५.

१२२ कित्ता, ख्रंड-१९, पृ. १९-२०.

१२३ फ्लीट, जे. एफ. (संपा.), **प्राकृत, संस्कृत ॲन्ड ओल्ड कॅनरेस इन्स्क्रिप्शन्स,** नं. ३, **केलहॉर्नस लिस्ट ऑफ इन्स्क्रिप्शन्स ऑफ सदर्न इंडिया,** नं. ३६४

१२४ **इ. आय.,** खंड-३२, पृ. ३४.

१२५ अमलानंद, **वेदान्तकल्पतरु** (ब्रह्मसूत्र-संस्कार-भाष्य), बॉम्बे १९३८, प्रस्तावना व्ही. १३, अध्याय व्ही. ७.

१२६ **ए. आर. एस. आय. इ.,** १९३४, बीके. नं. १८५.

१२७ हेमाद्री, **चतुर्वर्गचिंतामणी,** श्लोक ४९, ५०.

१२८ **इ. आय.,** खंड-२५, पृ. ३१, खंड-३२, पृ. ३४.

१२९ **इंडियन कल्चर,** खंड-२, पृ. ४१७.

१३० **आय. ए.,** खंड-१४, पृ. ३१४.

१३१ हेमाद्री, उपरोक्त, श्लोक ४८.

१३२ मजुमदार, आर. सी., **दि चालुक्याज ऑफ गुजरात,** पृ. २०७.

१३३ हेमाद्री, उपरोक्त, श्लोक १३.

१३४ लक्ष्मीरंजन, के. (संपा.), **सिद्धेश्वर चरितम्** (लेखक कासे, सर्वाप्पा), १९६०, हैद्राबाद, पृ. १३३-३४.

१३५ याजदानी, जी. (संपा.), **दि अर्ली हिस्टरी ऑफ द डेक्कन,** पृ. ६२६-२७.

१३६ डेरेट, जे. डी. एम., **दि होयसलाज,** पृ. १२८.

१३७ **इ. सी.,** खंड-४, एनजीएम. नं. ३९, खंड-५, सीएलएन. नं. २६९; हेमाद्री, पूर्वोक्त, श्लोक ४८, २ व १३; **ए. आर. आय. इ.,** १९२६, परिशिष्ट-सी., नं. ४४७.

१३८ **इ. आय.,** खंड-२५, पृ. २०५.

१३९ नेने, एच. एन. (संपा.), **लिळाचरित्र,** नं. ७२५; **जे. आय. एच.,** खंड-५, पृ. १९८ व त्यापुढे.

१४० देशपांडे, व्ही. एन., (संपा.), **स्मृतिस्थल,** पृ. २६; **इ. आय.,** खंड-२५, पृ. १९९ व त्यापुढे.

१४१ याजदानी, जी., (संपा.), दि. **अर्ली हिस्टरी ऑफ द डेक्कन,** पृ. ५४९.

१४२ **आय. ए.,** खंड-१४, पृ. ३१४-३१९.

१४३ **इ. आय.,** खंड-१३, पृ. १९८-२०६; **जे. आर. ए. एस.,** खंड-५, पृ. १८३, आणि त्यापुढे.

१४४ **आय. ए.,** खंड-१४, पृ. ३१४ आणि त्यापुढे.

१४५ **म्हैसूर आर्केऑलॉजिकल सर्व्हे रिपोर्ट,** १९२०, पृ. १४३.

१४६ राइस, बी. एल. (संपा.), **म्हैसूर इन्स्क्रिप्शन्स,** बंगलोर, १८७९, नं. २६, पृ. १४६; **इ. सी.,** खंड-११, डीजी. नं. ५९.

१४७ **इ. सी.,** खंड-८, एसए. नं. १३७-४०.

१४८ कित्ता, खंड-६, सीएन. नं. २६९, बीआय. नं. १७६, खंड-८.

१४९ राइस, बी. एल., उपरोक्त, नं. २६; **इ. सी.,** खंड-११, डीजी, नं. ५९.

१५० **इ. सी.,** खंड-५, बीएल. नं. १६०, १६५.

१५१ राइस, बी. एल., उपरोक्त.

१५२ **एम. ए. एस. आर.,** १९२८, नं. ६१, ७३, १९२९, नं. ५७; **इ. सी.,** खंड-७, सीएन. नं. २, २४५.

१५३ **इ. आय.,** खंड-१५, पृ. २०६, व्ही. १०.

१५४ कित्ता, पृ. ७-२०, **हिरालालस् लिस्ट ऑफ इन्स्क्रिप्शन्स इन सी. पी. अँड बेरार,** पृ. २०.

१५५ वर्मा, ओ. पी., **दि यादवाज अँड देअर टाईम्स,** पृ. १४५.

१५६ **इ. आय.,** खंड-२५, पृ. २०६, व्ही. १७.

१५७ कित्ता, व्ही. १८.

१५८ वर्मा, ओ. पी., उपरोक्त, पृ. १४७.

१५९ **एस. आय. आय.,** खंड-२०, नं. ४६५; **इ. आय.,** खंड-२५, पृ. २७०.

१६० रामाराव, एम., **रायचूर इन्स्क्रिप्शन्स इन काकतीय संचिता,** परिशिष्ट. पृ. ८४, राजमुद्रा, १९३५.

१६१ **एस. आय. आय.,** खंड-९, भाग-१, नं. ३८७.

१६२ ब्रिग्ज, जे., **फेरिस्ता,** खंड-१, पृ. ३०९, लंडन, १८२९, पुनर्मुद्रित आवृत्ती, कलकत्ता, १९११.

१६३ एलीयट, एच. एम. अँड जे. डॉसन, **हिस्टरी ऑफ इंडिया ॲज टोल्ड बाय हिज ओन हिस्टोरियन्स,** खंड-३, पृ. ४०, (अकाऊंट बाय वासफ), लंडन, १८६६.

१६४ कित्ता, "वाईड अकाऊंट बाय बरुनी, अमीर खुस्रो, खजान-उल-फतुह": **जे. आय. एच.,** खंड-८, पृ. १, २३८.

१६५ ब्रिग्ज, जे., फेरिस्ता, खंड-१, पृ. ३०७.

१६६ एलीयट, एच. एम., उपरोक्त, नं. १६३. या वैवाहिक संबंधाविषयी फेरिस्ताने लिहिलेले नाही.

१६७ **इ. सी.,** खंड-९, बीएन. नं. ५३.

१६८ कित्ता, खंड-११, जेआय. नं. ९०.

१६९ एलीअट ॲण्ड डॉसन, उपरोक्त, खंड-३, पृ. २००.

१७० इसामी, **फतूह-अस-सलातीन,** आग्रा, १९३८, पृ. २७४.

१७१ **जे. आय. एच.,** खंड-८, पृ. ३७४ (खजान-उल-फतेह) फेरिस्ता, खंड-१, पृ. ३६५, एलीअट ॲण्ड डॉसन, उपरोक्त, खंड-३, पृ. २०१.

१७२ फेरिस्ता, उपरोक्त, खंड-१, पृ. ३६९; **इ. आय.,** खंड-३५, पृ. ५०.

१७३ **इ. आय.,** खंड-२५, पृ. १९९-२२५.

१७४ फेरिस्ता, पूर्वोक्त, खंड-१, पृ. ३७३.

१७५ एलीअट ॲण्ड डॉसन, पूर्वोक्त, खंड-३, पृ. २०२.

१७६ **जे. आय. एच.,** खंड-९, पृ. ५३-५४.

१७७ फ्लीट. जे. एफ; **दि डायनॅसिटीज ऑफ दि कॅनरेसे डिस्ट्रिक्ट ऑफ दि बॉम्बे प्रेसिडेन्सी,** बॉम्बे, १८८२, पृ. ७१, जी. याजदानी (संपा.), **अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन,** पृ. १२९, ५५५.

१७८ फेरिस्ता, पूर्वोक्त, खंड-१, पृ. ३७८.

१७९ इसामी, पूर्वोक्त, (नं. १७०) पृ. ३२७.

१८० एलीअट अँड डॉसन, पूर्वोक्त, (नं. १६३) खंड-३, पृ. ५५८; फेरिस्ता, पूर्वोक्त, खंड-१, पृ. ३८९.

--------




प्राचीन शैलगृहे, व्यापारी मार्ग व नगरे

फलक क्र. वीस



अ) सातवाहन राजा शिवश्री पुळुमावि याचा बनारसी लेख



(ब)



(क)

ब-क) शिवश्री पुळुमावि याचा सन्नती लेख (लिपी ब्राह्मी)

**फलक क्र. एकवीस**

पहिला पत्रा

दुसरा पत्रा

वाकाटक राजा द्वितीय पृथिवीषेणाचा माहुरझरी ताम्रपट
(पेटीकाशीर्ष स्वरुपाची ब्राह्मी लिपी, भाषा संस्कृत)

फलक क्र. बावीस



राष्ट्रकूट राजा द्वितीय कृष्ण याच्या काळातील कंधार शिलालेख
(लिपी देवनागरी, भाषा संस्कृत)
**फलक क्र. तेवीस**



चालुक्य राजा विक्रमादित्य सहावा याचा बिमरा शिलालेख (लिपी कन्नड)

**फलक क्र. चोवीस**



अ) शिलाहार राजा अपराजिताचा जंजिरा ताम्रपट. दुसरा पत्रा-पहिली बाजू
(लिपी देवनागरी, भाषा संस्कृत)



ब) शिलाहार राजा गंडरादित्याचा शक संवत १०३७ चा ताम्रपट. पहिला पत्रा
(लिपी कन्नड, भाषा संस्कृत)

फलक क्र. पंचवीस



यादव राजा रामचंद्रदेव याच्या वेळचा उन्हकदेव शिलालेख
(लिपी देवनागरी, भाषा मराठी)



(अ)



(ब)

(अ) व (ब) चांदीचे पंचमार्कड् नाणे

फलक क्र. सत्तावीस



(अ)



(ब)

(अ) व (ब) यज्ञ सातकर्णीचे चांदीचे नाणे (प्रतिमायुक्त)

फलक क्र. अठ्ठावीस



(अ)



(ब)

(अ) व (ब) सिमुक सातवाहन याचे तांब्याचे नाणे

**फलक क्र. एकोणतीस**



(अ)



(ब)

(अ) व (ब) गौतमीपुत्र विळिवायकुराचे शिशाचे (लीड) नाणे

फलक क्र. तीस



(अ)



(ब)

(अ) व (ब) पश्चिमी क्षत्रप चष्टनाचे चांदीचे नाणे (प्रतिमायुक्त)

फलक क्र. एकतीस



(अ)



(ब)

(अ) व (ब) पश्चिमी क्षत्रप नहपानाचे चांदीचे नाणे



(अ)



(ब)

(अ) व (ब) पश्चिमी क्षत्रप नहपानाचे चांदीचे नाणे (प्रतिमायुक्त)

**फलक क्र. तेहतीस**



(अ)



(ब)

(अ) व (ब) रामचंद्र यादवाचे सुवर्ण नाणे

**फलक क्र. चौतीस**



(अ)



(ब)

(अ) व (ब) सिंघणदेव यादवाचे चांदीचे नाणे

**फलक क्र. पस्तीस**

# प्रकरण १३
# प्रशासन*
## प्रारंभिक ऐतिहासिक काळ ते वाकाटक काळ

**म**हाराष्ट्रात प्रागैतिहासिक काळात विशेषतः ताम्रपाषाणयुगात प्रादेशिक केंद्रे आणि छोटी खेडी असे वसाहतीचे दोन प्रकार होते. प्रादेशिक केंद्राचे त्या भागातील छोट्या वसाहतीवर नियंत्रण असे. अशा द्विदल पद्धतीत नायकशाही (Chiefdom) पद्धतीची शासन व्यवस्था होती असे मानववंश शास्त्रज्ञांनी स्पष्ट केले आहे.[१] अंतर्गत व्यापारावर या नायकशाहीचे नियंत्रण असे. इनामगाव येथील तटबंदी, खंदक, धान्यांची कोठारे इत्यादी सार्वजनिक वास्तूअवशेषांवरून हे स्पष्ट होते. इनामगाव येथील उत्खननात उपलब्ध मातीच्या मुद्रेवरून असे म्हणता येईल की, शासन व्यवस्थेच्या निर्देशक मुद्रा यावेळेपासून अस्तित्वात आल्या. या नायकशाहीचा पुरावा दफनविधीमध्येही मिळतो. इनामगाव येथील एका मोठ्या घराची आणि तेथील दफनाची उपलब्धीही यादृष्टीने लक्षात घ्यावी लागते. सामान्यतः मृताचे घोट्यापासून खालचे भाग तोडून टाकण्याची नेहमीची प्रथा या दफनात पाळलेली नाही. स्वाभाविकपणे ही व्यक्ती वसाहतीचा नायक असावी असे वाटते. अन्य एका मोठ्या घरात उत्तर-जोर्वे कालखंडात अशाच प्रकारचा पुरावा उपलब्ध झाला आहे. नायकशाहीबरोबर ताम्रपाषाण युगात समाज व शासन, सधन शेतकरी, पूर्णवेळ कारागीर आणि भूमिहीन मजूर असे वर्ग निर्माण झाले. खाजगी मालमत्तेची कल्पना आणि वंशपरंपरेने मिळणारा वारसाहक्क यासारख्या कल्पना या काळातच रुढ झाल्या असाव्यात.[२] प्रागैतिहासिक काळानंतर जनपदाचा काळ सुरू होतो.

**जनपद :** वंशिक, भाषिक आणि सांस्कृतिकदृष्ट्या एकात्म अशा समुहांचे स्वायत्त संघराज म्हणजे जनपद. राजकीयदृष्ट्या ही जनपदे कधी स्वतंत्र तर कधी अन्य साम्राज्यात विलीन असत. त्यांच्या सांस्कृतिक एकात्मतेमुळे त्यांचे अस्तित्व शतकानुशतके टिकून होते. अशा ५५ भारतीय जनपदांची नोंद पाणिनीच्या ''अष्टाध्यायी'' या ग्रंथात आली आहे. ''अथर्ववेदा'' मध्ये पृथ्वीला विभिन्न धर्म आणि भाषा धारिणी म्हटले आहे. जनपदांच्यामध्ये मात्र भाषा. धर्म आणि आर्थिक जीवनाची एकात्मता कटाक्षाने पाळली जाई. महाराष्ट्रात प्रारंभिक ऐतिहासिक काळात असलेल्या ज्या जनपदांची नोंद करता येते त्यात महाराष्ट्र, पितनिक, भोगवर्धन, कोंकण, मूलक, अश्मक, नासिक्य, कुंतल, विदर्भ इत्यादि जनपदांचा उल्लेख करावा लागतो. जनपद म्हणजे ग्रामांचा समूह ज्यात केंद्रवर्ती अशा मोठ्या नगराचा अंतर्भाव होई. ताम्रपाषाण संस्कृतिप्रमाणे येथेही नायकशाही ही संकल्पना असावी. तसेच प्रमुख केंद्र व सभोवतालींच्या गावांचा समूह असे जनपदाचे स्वरूप असावे. अशोकाच्या लेखातील

---

*या प्रकरणाचे लेखन डॉ. अ. शं. पाठक (कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, महाराष्ट्र शासन) यांनी केलेले आहे.

नोंदी आधारे असे म्हणता येईल की, महाराष्ट्रामध्ये सातवाहनकाळापर्यंत रठीक, भोजक आणि पेतेनिक या लहानमोठ्या सरंजामदारांची सत्ता असावी.

डॉ. सदाशिव अनंत आळतेकर यांनी "स्टेट ॲण्ड गव्हर्नमेंट इन एन्शन्ट इंडिया" हा ग्रंथ १९४९ साली प्रकाशित केला. या ग्रंथात त्यांनी प्राचीन भारतीय शासनप्रणालीचा विस्ताराने आढावा घेतला आहे. त्यात उपलब्ध पूर्वप्रकाशित साधनांची चर्चा करून राज्य या संकल्पनेचा विकास, त्यांचे विविध प्रकार याविषयी विचार केला. राज्य, नगर व राजा, लोकशाही संकल्पना, केंद्रसत्ता व मंत्रिपरिषद, विविध विभाग, सचिवालय, प्रांतिक, प्रशासन, विभागीय प्रशासन, जिल्हा व शहर प्रशासन, ग्रामीण प्रशासन, न्यायपद्धती, महसूल व करपद्धती, दोन राज्यामधील संबंध या बाबींचा विचार प्राचीन ग्रंथांच्या आधारे केला आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, अथर्ववेद, काश्यपसंहिता, तैत्तिरीय ब्राह्मण, शतपत ब्राह्मण, उपनिषद, गौतम, वशिष्ठ, बौद्धायन ही धर्मशास्त्रे तसेच रामायण, महाभारत, नारदीयसंहिता, कौटिलीय अर्थशास्त्र इत्यादी साधनग्रंथांतील प्रशासनविषयक बाबींआधारे त्यांनी प्राचीन शासन पद्धतीची नोंद घेतली आहे. वेदान्त ते मौर्यकाळ यामध्ये ऋग्वेदकाळ उत्तरकालीनसंहिता व ब्राह्मणे तसेच उपनिषदांचा कालखंड, मगध व मौर्य प्रशासन इत्यादींच्या विस्तृत चर्चेबरोबर प्रारंभिक ऐतिहासिक काळ (इ. स. पू. २०० ते इ. स. ३००) गुप्त कालखंड, हर्षवर्धन व राष्ट्रकूट प्रशासन तसेच दक्षिण भारतीय प्रशासन व्यवस्था यांच्या नोंदी घेतल्या आहेत.[3] या अभ्यासपूर्ण नोंदीतून तत्कालीन प्रशासन व्यवस्थेचा यथार्थ परिचय होत असला तरी महाराष्ट्राच्या संदर्भात आज नव्याने उपलब्ध असलेल्या बहुविध साधनसामग्रीच्या आधारे सातवाहनांपासून यादवांपर्यंतच्या कालखंडातील प्रशासनांचा आढावा येथे घेतला आहे.

महाराष्ट्रातील राज्यपद्धती तत्कालीन शासन व प्रशासन या संदर्भामध्ये आपणाला उपलब्ध होणारी माहिती ही मुख्यतः प्राचीन ग्रंथातून मिळते. साधारणपणे "मनुस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति व शुक्रनितीसार" यात सांगितलेल्या प्रशासनविषयक बाबी पाहताना दिसते की, राज्याच्या भौगोलिक सीमा आणि त्यांची उत्पादनक्षमता लक्षात घेऊन महसूल निश्चित करण्याचे प्रयत्न प्राचीन ग्रंथकारांनी केले आहेत. साधारणतः प्रजेला त्रास न देता ज्या राज्याचे महसुली उत्पन्न वर्षाकाठी एक लक्ष कार्षपर्यंत आहे तो सामंत, तीन लक्ष उत्पन्न असल्यास मांडलिक, वीस लक्ष महसूल उत्पन्नाचे राज्य असेल तो राजा, वीस ते पन्नास लक्ष उत्पन्नाचा महाराजा. तर स्वराटाचे उत्पन्न पन्नास लक्ष ते एक कोटीपर्यंत असे. सम्राटाचे उत्पन्न एक ते दहा कोटीपर्यंत, विराटाचे दहा ते पन्नास कोटी आणि सार्वभौमचे पन्नास कोटी कार्षावर असे, अशी नोंद मिळते. यातील अतिशयोक्तीचा भाग वगळला तरी सामंतापासून सार्वभौम सम्राटापर्यंत एका चढत्या श्रेणीची नोंद मिळते. कौटिल्याने म्हटल्याप्रमाणे राज्याची राजा, अमात्य, मित्र, कोष, देश, दुर्ग व सेनापती ही सप्तांगे आहेत राजाची दैनंदिन दिनचर्या कशी असावी याबद्दलची नोंद याज्ञवल्क्यस्मृतीत आलेली आहे. तसेच सप्तांग प्रकृतीचा विचार स्मृतिग्रंथातून पहावयास मिळतो. ग्राम य

शब्दाला विशिष्ट अर्थ होता. ज्या गावाचे शिवार एक कोस आहे किंवा ज्याचे उत्पन्न राजाला एक हजार रौप्य कार्ष येई त्याला शुक्रनितीत ग्राम म्हटले आहे. या वैशिष्ट्यपूर्ण व्याख्येत आजही मूलतः बदल झालेला नाही. यासारख्या विविध नोंदी मिळत असल्या तरी प्रत्यक्ष महाराष्ट्रात नांदलेल्या राजवंशाच्या राज्यशासनाविषयीची माहिती प्रामुख्याने अभिलेखाच्या आधारे मिळते.

**सातवाहन :** सातवाहन वंशातील प्रारंभिक सम्राट सिमुक याने दक्षिणापथपती अशी पदवी धारण केली होती, हे नाणेघाटातील नागानिकेच्या लेखावरून कळते.[४] या काळात जनपदाचे अस्तित्व काही प्रमाणात होते याचा निर्देश जुनागड येथील रूद्रदामनच्या लेखात आला आहे. जनपदाच्या मोठ्या विभागाला 'राष्ट्र' म्हणत. या प्रदेशावरील अधिकाऱ्याला ''राष्ट्रिक'' अशी संज्ञा असल्याची नोंद मल्हारा ताम्रपटातून आली आहे.[५] प्राकृत भाषेत राष्ट्रिकाला 'रठिक' असे संबोधिले आहे. राष्ट्र विभाग हा आकाराने मोठा असल्यास त्यावरील अधिकाऱ्याला 'महारठी' असे म्हणत. सातवाहनकाळी महारठी व महाभोज हे मोठे जहागिरदार किंवा सामंत असत. त्यांना स्वतःच्या प्रदेशाकरीता नाणे पाडण्याचा अधिकार असे. सदकण कळलाय या महारठीची नाणी कर्नाटकात सापडली आहेत, तर कोल्हापूरजवळ कुरवंशी महारठीची नाणी सापडली आहेत. सातवाहनाच्या लेखावरून कुलाबा जिल्ह्यात महाभोज आणि नाशिक व पुणे जिल्ह्यांत महारठी सरंजामदार होते असे दिसते. यानंतरच्या प्रशासकीय विभागास ''आहार'' ही संज्ञा होती. तत्कालीन आहाराचे उल्लेख कोरीव लेखात मिळतात. उदा. सातवाहनिहार, मामालाहार (मावळ प्रदेशाचा अंतर्भाव यात होता), गोवर्धन आहार, सोपारक आहार अशी नोंद येते. आहारानंतर येणाऱ्या विभागाला ''विषय'' (जिल्हा) म्हणत. विषयापेक्षा लहान विभागाला 'पथ' किंवा ''पथक'' म्हणत. उदा. ''प्रतिष्टानपथ''. राजे स्वतःच्या नावाने नवीन नगरे वसवित. विजय सातकर्णीने आपल्या नावे विजयपूर (सध्याचे नागार्जुनकोंडा) ही नगरी स्थापून तेथे राजधानी वसविली, तर चुटुकुल सातकर्णीची राजधानी वैजयन्ती सध्याची वनवासी होती. प्रारंभिक काळात जुन्नर व नंतर प्रतिष्टान ही सातवाहनाची राजधानी होती. सातवाहन काळामध्ये शुर्पारक (सोपारा), भरूकच्छ (भडोच), कलियाण (कल्याण) व चेऊल (चोल) ही मोठी बंदरे विकसित झाली. नाशिक जवळील गोवर्धन हे स्थान या नावाच्या एका आहाराचे मुख्यालय होते.

राजसत्ता सामान्यतः नियंत्रित असून त्यावर धर्माचा व जनमताचा अंकुश असे. अन्यायी राजाविरुद्ध बंड केल्याची नोंद ''मृच्छकटिक'' या नाटकात मिळते. तसेच या काळात मातेचे नाव मुलाने धारण करण्याची पद्धत रूढ होती. अर्थात ही पद्धत याहीपेक्षा कितीतरी आधीच्या काळात रूढ होती. देवकीपुत्र कृष्ण हे याचे उदाहरण म्हणून सांगता येईल. सातवाहन काळामध्ये गौतमीपुत्र, वासिष्ठीपुत्र, माढरिपुत्र अशी नावे राजांनी धारण केली होती. साधारणतः राजाच्यानंतर त्याच्या ज्येष्ठ मुलाकडे

वारसाहक्क जाई. क्षत्रपांच्या बाबतीत मात्र कौटुंबिक संघर्ष टाळण्यासाठी जोपर्यंत मृत महाक्षत्रपालचे धाकटे भाऊ जिवंत व कर्तबगार आहेत तोपर्यंत राज्याचा वारसा मुलाकडे न जाता त्या भावाकडे वयानुक्रमाने जाई. सातवाहन राजे उत्तरेकडील गुप्त राजांप्रमाणे मोठ्या उपाध्या (बिरुदे) धारण करत नसत. गौतमीपुत्रासारखा समर्थ राजा स्वतःला केवळ 'राजा' म्हणवतो. अपवादात्मकपणे केवळ महाराजा अशी पदवी आढळते. सिमुक पुलुमावि दक्षिणापथपती व दक्षिणापथेश्वर अशी बिरुदे लावी.

**अधिकारी** : राजाला कारभारामध्ये मदत करण्यासाठी अनेक मंत्री व अधिकाऱ्यांची नियुक्ती करावी लागे. असे असले तरी याविषयी अभिलेखीय पुरावे फारसे उपलब्ध नाहीत. रूद्रदामनच्या जुनागड लेखात राजाला सल्ला देणारे "मतिसचिव" आणि त्याची आज्ञा अमलात आणणारे "कर्मसचिव" असे अधिकारी नियुक्त केल्याची नोंद मिळते.[६] कर्मसचिवाला अमात्य म्हणत. अशोकाच्यावेळी याला "महामात्र" अशी संज्ञा होती. याचा उल्लेख सातवाहनाच्या प्रारंभिक शिलालेखात मिळतो.[७] राजाच्या मंत्रिमंडळात असलेल्या सचिवांना "राजामात्य" म्हणत. पुढील पदांविषयीची माहिती सातवाहनाच्या लेखातून मिळते :–'सेनापती'–सेनाप्रमुख, तसेच "रज्जूक"[८]- महसूल विभागाचा मुख्य, "भांडागारिक"[९]- खजिनदार, "पानियघरक"[१०] नगरातील पाणी पुरवण्याची व्यवस्था पाहणारा, "कर्मान्तिक"[११]- बांधकामावर देखरेख ठेवणारा, "आवेशनिक"[१२]- कामावरील नियंत्रक अधिकारी इत्यादी. तसेच प्रतिहारी, महाभोज, महामात्र अशा काही पदांची माहिती मिळते.

सातवाहतकाळात विविध पद व पदव्यांचे स्वरूप निश्चित होऊन रूढ झालेले नव्हते. तर वेगवेगळी कर्तव्ये करण्यासाठी आवश्यक अशा संज्ञा असाव्यात. पुढे त्या उत्क्रांत झाल्या असे मानता येते. म्हणून उत्तर काळात 'उपरिक' (भुक्ति प्रदेशाचे प्रमुख), 'कुमारामात्य' (आय. ए. एस. दर्जाचा अधिकारी), "राष्ट्रिक" हा "राष्ट्र" या प्रशासकीय विभागाचा प्रशासक, "दण्डपाशिक" पोलीस कमिशनर सारखा अधिकारी, "चाट" व "भट" हे अनुक्रमे पोलीस शिपाई व सैनिक असावेत. याशिवाय "दूतप्रेषणिक" आणि "विनियुक्तक" यासारखी पदेही आढळतात.

सातवाहन काळात नगर व ग्राम व्यवस्थेविषयीची अनुषंगिक माहिती मिळते. नगराची व्यवस्था पाहण्यासाठी निगमसभा असे. निगम याचा अर्थ व्यापाऱ्यांचा संघ असाही होतो. या काळात सामान्यतः नदीजवळील प्रदेशातील नावे त्या त्या नदीनामाच्या अंती 'कट' किंवा 'कड' शब्द लावून बनत. उदा. बेनाकट, करहाकट, वरदाकड इत्यादी. तसेच गावाची नावे ग्राम, पद्र यासारख्या पदांत शब्दाने बनत. उदा. चिखलपद्र, पिसाजीपद्र, शाल्मलीपद्र इत्यादी. काही गावे व शेते यक्षाच्या नावानी ओळखली जात. उदा. 'अजकालकिय' हे शेत अलकालक या यक्षाच्या नावे ओळखले जाई. गाथासप्तशती या तत्कालीन 'हाल' राजाच्या गाथेतील नोंदीवरून ग्रामीण भागात पंचायत पद्धती रूढ होती असे दिसते.[१३] ग्राम प्रमुखास 'ग्रामणी' तर, कुटुंब प्रमुखास

'गृहपति' म्हणत असे दिसते. गाथासप्तशतीच्या आधारे खेडे (Village), ग्राम (Town) व शहर (City) असे गावांचे वर्गीकरण असावे. लोकसंख्या व आकाराच्या अनुरोधाने पल्ली, ग्राम व नगर अशा संज्ञा आढळतात. या वेगवेगळ्या नावांवरून त्यात असलेला भेद स्पष्ट होतो. पल्ली हे छोटे व बंदिस्त लढाऊ डोंगरगाव असावे असे वाटते.[१४] तुलनेत ग्राम बरेच मोठे असावे. गावे वेदकालीन ग्रामाप्रमाणे तटबंदीयुक्त असावीत.[१५] गाथेमध्ये ग्रामसीमेवरील तृणपुरुषाचा उल्लेख आला आहे. ग्रामसीमेवर पहारेकरी नियुक्त केलेले असावेत असे दिसते.

निगमांना दाने दिली जात. वृषभदत्त याने आपले दान निगम सभेत जाहीर केले होते.[१६] दिलेले दान प्रथम निगम सभेच्या नोंदणी खात्यात रितसर नोंदविले जाई. नंतर ते संबंधित व्यक्तिकडे सोपविले जात होते. नाशिक लेण्यातील गौतमीपुत्र सातकर्णीच्या लेखात अशा प्रधान भिक्षुकांचा उल्लेख 'महास्वामीक' असा आला आहे.[१७] या लेखातील नोंदीवरून स्पष्ट होते की, जमीन किंवा शेत दान दिल्यावर तेथे राजसेवकांनी प्रवेश करू नये. मीठासाठी खोदू नये. इतकेच नव्हे तर राज्याच्या दंडाधिकाऱ्यानेसुद्धा कुठलाही हस्तक्षेप करू नये याविषयीच्या सूचना देत. यावरून तत्कालीन शासकाची दूरदृष्टी स्पष्ट होते.

कल्याणकारी राज्याची कल्पना यावेळी रूढ होती असे वाटते. वेदश्री सारखे राजे यज्ञयागाप्रमाणे पूर्तकर्म करीत. (वापी, तडाग याची निर्मिती ही लोकोपयोगी काम म्हणून केली जाई.) वृषभदत्तासारखे शकवंशीय शासकही हिंदू संस्कृतीत पूर्णतः समरस झाले होते असे दिसते. भरुकच्छ (भडोच), दशपूर (मंडसोर), गोवर्धन आणि शुर्पारक (सोपारा) येथे सार्थवाह व पथिकांच्यासाठी धर्मशाळा निर्माण केल्याचा उल्लेख आहे. उद्याने व जलाशय याद्वारे पाणवठ्यांची निर्मिती केली जाई. इबा, पारदा, दमण, तापी, करबेना आणि दाहनुका या नद्या पार करण्याकरिता धर्मार्थतरीची सोय केलेली होती. एकूण सातवाहन क्षत्रपकाळात विविध प्रशासकीय विभागांमधून राज्य करणारे शासक हे जनकल्याणाचा हेतू लक्षात घेवून काम करीत होते. यावेळी विविध कामासाठी असलेल्या खात्यांची उत्क्रांती आपणास उत्तर काळात पहावयास मिळते.

**वाकाटक :** सातवाहनांच्या काळातील भौगोलिक नावे प्राकृत भाषेत आढळतात. तर वाकाटकांनी आपल्या कोरीव लेखामध्ये संस्कृतचा उपयोग केल्यामुळे ही नावे संस्कृतमधून आढळतात. राजांनी स्वतः विविध प्रकारच्या पदव्या धारण करणे किंवा मंत्रिपरिषदेच्या संदर्भामध्ये फारसा बदल या काळात झालेला नाही. किंबहुना साधेपणा हे वैशिष्ट्य त्यांनी कायम ठेवले. राज्याच्या विविध प्रशासकीय भागांची माहिती तत्कालीन शिलालेख व ताम्रपट याद्वारे मिळते. आपल्या विस्तीर्ण राज्याचे प्रशासकीय दृष्टीने त्यांनी जे उपभाग केले त्यामध्ये ''राज्य'' किंवा ''राष्ट्र'' हा सर्वात मोठा प्रशासकीय भाग होता, याची नोंद प्रवरसेनाच्या बेलोरा ताम्रपटात मिळते. राष्ट्राचे उपविभाग सध्याच्या जिल्ह्यांप्रमाणे होते. त्यांना 'विषय' ही संज्ञा असे. 'विषयाच्या'

शेवटी सामान्यतः 'कड' किंवा 'कट' हे उपपद लावल्याचे दिसते. उदा. बेन्नाकट, भोजकट, नाङ्गरकटक, नान्दिकट इत्यादी. विषयाचे 'आहार' आणि 'भोग' किंवा 'भुक्ती' असे लहान विभाग असत. बेण्णाकार्परभोग, लोहनयरभोग व हिरण्यपुरभोग अशा भोगांची व असिभुक्ति या भुक्तिचा उल्लेख आहे. हे विभाग आजचे तहसील या महसुली क्षेत्राप्रमाणे असावेत. वाकाटक ताम्रपटात सुप्रतिष्ठित आहार या एकाच आहाराविषयीची नोंद मिळते.[१८] आहार आणि भुक्ती किंवा भोग याचा परस्पर संबंध कसा होता हे फारसे स्पष्ट होत नाही. काही लेखात 'मार्ग' नामक एका प्रशासकीय विभागाची नोंद आहे. हा विभाग विषयपेक्षा लहान आणि भुक्ती पेक्षा मोटा असे. एकूण वाकाटक काळात 'कटक' या नगराच्या स्वतंत्र प्रशासकीय विभागासह 'पथ', 'मार्ग', 'राज्य', 'भोग', 'भुक्ती', 'राष्ट्र' व 'आहार' असे प्रशासकीय विभाग होते.[१९] भोग विभागात नगर, उपनगरे व गावे असत. काही विभागांची नावे त्यात असलेल्या गावांच्या संख्येवरून पडली होती. उदाहरणार्थ, 'प्रवरेश्वरषड्विंशांतिवाटक' ही नोंद द्वितीय प्रवरसेनाच्या बेलोरा ताम्रपटात आली आहे.[२०]

वाकाटक काळातसुद्धा सत्ता परंपरेने ज्येष्ट पुत्रास प्राप्त होई. असे असले तरी त्यांच्या उपशाखांनी स्वतंत्र सत्ता केंद्र निर्माण केल्याचे स्पष्ट झाले आहे. वाकाटक राजांनी सातवाहनांप्रमाणे फार मोटाल्या पदव्या धारण केल्या नाहीत. 'राजन' किंवा 'महाराज' असा उल्लेख ते करत. वाकाटक राजवंशात प्रभावतीगुप्ता या कर्तबगार राणीने प्रशासनावर आपला प्रभाव पाडल्याचे दिसते.

'राष्ट्र' विभागाच्या प्रमुखाची नोंद 'राज्याधिकृत' अशी येते. द्वितीय प्रवरसेनच्या तिरोडी ताम्रपटातील चर्मदास हा 'राज्याधिकृत' आहे.[२१] वाकाटक ताम्रपटात ''सर्वाध्यक्ष'' अशी एक नोंद मिळते. 'सर्वाध्यक्ष' हा तात्कालिक सचिवालयाचा प्रमुख असून त्याला ''कुलपुत्र'' नावाचा आणखी एक अधिकारी नियुक्त करण्याचा व त्यांना राजाज्ञा कार्यान्वित करण्याविषयीचे जरूर ते आदेश देण्याचा अधिकार होता. याविषयीचा तपशील द्वितीय प्रवरसेनच्या जांब ताम्रपटात मिळतो.[२२] वाकाटक कुलपुत्रांना अनेक प्रकारचे काम करावे लागत असे. त्यांचे मुख्य काम राज्यात शांतता आणि सुव्यवस्था टिकविणे असे होते. याकरिता त्यांच्या नियंत्रणाखाली भट (सैनिक) व छात्र अथवा चाट (पोलीस शिपाई) असत. या कुलपुत्र, भट व छात्र यांचे कार्यक्षेत्र आजच्या तहसीलएवढे असावे. ते आपल्या प्रशासकीय प्रदेशात जमिनीचा महसूल जमा करणे व राज्याचे इतरही कर वसूल करणे अशी कामे करीत. भूमि अंतर्गत द्रव्य जप्त करण्याचा, मीटाच्या व अन्य खाणी चालविण्याची व्यवस्था करण्याचा व आवश्यक वेटबिगारी घेण्याचा त्याना अधिकार असे. याच कामाचे स्वरूप द्वितीय प्रवरसेनाच्या जांब ताम्रपटातून स्पष्ट होते.[२३] हे अधिकारी दोऱ्यावर असताना ग्रामस्थांना त्यांची व्यवस्था करावी लागे, पण 'अग्रहार' म्हणून दिलेली गावे त्यांच्या अधिकार कक्षेत येत नसत. अशी गावे अथवा क्षेत्रामध्ये त्यांना प्रवेश करण्यास देखील मनाई करण्यात येई.

अर्थात चोरी, राजद्रोह अशा गुन्ह्यांचा शोध घ्यायचा असेल तर असे बंधन नसे. अर्थात अग्रहार म्हणून मिळालेल्या दानपत्राची माहिती 'कुलपुत्रांना' देणे अपेक्षित होते. मौर्य काळात रूढ असलेले 'रज्जूक' हे एक महत्त्वाचे पदनाम सातवाहन काळातही आढळते. वाकाटकांच्या ब्राह्मी ताम्रपटात 'राहसिक' हे पदनाम आलेले आहे. 'रज्जूक' हा शब्द 'रज्जू' म्हणजे दोर या अर्थाने पाहिल्यास साखळीने जमीन मोजून सारा ठरविण्याच्या कामासाठी हे पदनाम रूढ झाले असावे. तथापि, वाकाटक काळात मात्र राजाचा खास चिटणीस किंवा गुप्त पत्रादिकांचा लेखक या स्वरूपात काम करताना दिसतो. वाकाटकांच्या कोरीव लेखात मुख्य लष्करी व पोलीस अधिकारी म्हणून सेनापती व दंडनायकांचे उल्लेख येतात. 'याज्ञवल्क्यस्मृतित' (अध्याय २, श्लोक ३१९-३२०) मिताक्षरा टिकेमध्ये नोंदविल्याप्रमाणे दानपत्र, लेखक, संधिविग्रहक किंवा परराष्ट्रमंत्री ही कामे सेनापतीकडेच असावीत.[२४] राजाज्ञा सेनापतीच्या कार्यालयात पोहचवणारे 'दृतक' किंवा 'अज्ञाप्ति' असत. प्रसंगी या काळात अधिकाऱ्यांच्या बदल्याही होत.

दशकुमार चरित्रातील आठव्या उच्छवासात वाकाटककालीन स्थितीची नोंद आहे असे मानता येते. मंत्री (सल्लामसलत देणारे) व अध्यक्ष (वेगवेगळ्या खात्याचा मुख्य) यांचा उल्लेख येथे आला आहे. वराहदेव याचा अजिंटा लेणे क्र. १६ मधील लेख यात सचिवाचा निर्देश आला आहे. वराहदेवाच्या अजिंटा लेखाप्रमाणेच घटोत्कच लेण्यातील लेखात त्यावेळी वलूरक येथील सचिव हे वंशपरंपरेने वाकाटकांच्या सेवेत असल्याचे नोंदविले आहे.[२५]

तत्कालीन मांडलिकांची लहान राज्ये होती. त्यांचा उल्लेख दिशेवरून करण्यात येई. भरतबलीच्या ब्राह्मी ताम्रपटात उत्तरराष्ट्राचा अशी नोंद आहे, तर महासुदेश्वराच्या रायपूर ताम्रपटात पूर्वराष्ट्राचा असा उल्लेख आहे. वाकाटकांच्या मांडलिकांचे साधारणपणे तीन प्रकार दिसतात. एक सम्राटाने जिंकण्याचा निश्चय केला असता त्याचे वर्चस्व स्वतःहून मान्य करणारा, दुसरा सम्राटाने चाल केली असता शरणागती पत्करणारा, तिसरा प्रत्यक्ष ज्यांचा सम्राटाने युद्धात पराभव केला आहे असे मांडलिक राजे. उत्तर भारतीय गुप्तांच्यापेक्षा वाकाटकांच्या मांडलिकांना कमी बंधने होती. अर्थात सर्व मांडलिकांना राजाला कारभार द्यावा लागत असे. राजाने युद्ध केले असता मांडलिकांना ससैन्य उपस्थित रहावे लागे. याविषयीची एक नोंद ''दशकुमार चरित्रात'' आली आहे.

वाकाटकांच्या काळात नगराच्या शेवटी 'पूर' किंवा 'नगर' असे उपपद लावत. उदा. अश्वत्थनगर, हिरण्यपूर, चंद्रपूर. नवीन वसवलेल्या नगरांना ते वसविणाऱ्याचे नाव दिले जाई. उदा. प्रवरसेनने वसविलेले प्रवरपूर. गावाच्या नावाच्या शेवटी विविध प्रकारची उपपदे आढळतात. उदा. 'ग्राम' जसे-शीर्षग्राम, मण्डुकिग्राम. 'खेट' किंवा 'खेटक' जसे-वरदाखेट, अश्वत्थखेटक. 'वाटक' जसे-बोथिकवाटक, पवरज्जवाटक इत्यादी. तसेच 'वीरक' जसे-करज्जवीरक, दर्भविरक यासारखी उपपदे लावीत.

ग्रामप्रशासनासाठी 'ग्रामकुट' हा गावपाटलाप्रमाणे असे, तर द्रोणाग्रनायक हा दान दिलेली गावे ज्यात समाविष्ट असत त्या द्रोणाग्रनाचा प्रमुख असावा. ब्राह्मी ताम्रपटात 'देववारिक' नावाच्या अधिकाऱ्यांची नोंद येते. हा 'द्रोवारिक' किंवा 'प्रतिहार' गावातील पोलीस ठाण्याचा मुख्य असून ग्रामकुटाला जमीन महसूल व कर वसूल करण्यासाठी तसेच गावात शांतता व सुव्यवस्था राखण्यासाठी मदत करीत असावा.

वाकाटक राजे आणि अधिकारी यांनी सर्व धर्मांना दाने दिली. बौद्ध चैत्य व विहार खोदविले. तसेच मंदिरांचीही उभारणी केली हे स्पष्ट आहे. अजिंठाच्या १६ क्रमांकाच्या लेण्यामधील लेखात नोंदविल्याप्रमाणे वाकाटकांचे सचिव हे आपल्या उत्कृष्ट शासनामुळे प्रजाजनांना त्याचे माता, पिता व मित्र वाटत असत.[२६] त्यांच्या न्यायप्रियतेमुळे रघुवंशात (स्व. ५, श्लो. ४०) विदर्भ देशाचा 'सौराज्यरम्य' आणि विदर्भ राजधानीचे 'समृद्ध' असे वर्णन मिळते. कवी कुलगुरु कालिदास याने समकालीन वाकाटक नृपतीची उत्कृष्ट राज्य शासनासाठी प्रशंसा केली आहे.[२७]

## बदामीचे चालुक्य ते यादवकाळ

महाराष्ट्रामध्ये वाकाटकांच्या नंतर बदामीचे चालुक्य यांनी आपली सत्ता प्रस्थापित केली. ते स्वतःला ब्रह्मदेवाच्या किंवा हरीतीपंचशिख ऋषिच्या चुलुकातून (ओंजळीतील पाण्यापासून) निर्माण झाले असे मानत. बदामीचे चालुक्य स्वतःला सुर्यवंशी म्हणवत. यांची सत्ता महाराष्ट्राबरोबरच दख्खनच्या बहुतेक भागावर पसरली होती.[२८] साधारणतः यांच्या प्रमुख प्रशासकीय विभागामध्ये 'विषय' हा विभाग प्रधान होता. महाराष्ट्राच्या संदर्भामध्ये नन्दीपुरी विषय, गोपराष्ट्र विषय, नासिक्य विषय, कुराट विषय, वेंती-विषय, अपरान्त विषय, पुरीकोकण, कऱ्हाटक, रामगिरी यासाख्या विषयांची नावे मिळतात. यानंतरचा महत्त्वाचा प्रशासकीय विभाग म्हणून 'भोग' याचा उल्लेख करावा लागेल. तसेच 'देश', 'मंडल' व 'पथक' हे प्रशासकीय विभाग होते.[२९] 'राष्ट्र' हा प्रशासकीय विभाग विशेषत्वाने नोंदविता येईल असे दिसत नाही. या काळात असलेल्या प्रशासकीय विभागात 'विषयाच्या' प्रमुखाला 'विषयपति', 'भोग' या विभाग प्रमुखाला 'भोगिक' व 'ग्राम' या प्रमुखाला 'ग्रामयुक्त' अशी नावे आढळतात. यांचे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी बहुतांश मोठ्या प्रदेशावर आपल्या नातेवाईकांची किंवा जवळच्या मांडलिकांची नियुक्ती केली होती. यांच्या राज्यात एकसारखी राज्यव्यवस्था दिसत नाही. काही ठिकाणी पूर्वी असलेली पद्धत चालू ठेवली होती. 'विषय', 'भोग', 'देश', 'मंडलक', 'पथक' हे प्रमुख प्रशासकीय विभाग अस्तित्वात होते. कोरीव लेखातून सामान्यतः सामंत विषयपति (जिल्हाधिकारी), ग्रामभोगिक (गावचा पाटील) याला कानडी प्रदेशात 'ग्रामवृद्ध' किंवा 'ग्राऊन्ड' म्हणत, यासारख्या अधिकाऱ्यांचा उल्लेख येतो. ग्रामव्यवस्थेमध्ये 'महत्तर' हा गावातील अनुभवी असा वयस्कर नेता असे. उद्योग, व्यापार वर्गाच्या श्रेणीचे प्रतिनिधीपण प्रशासनास मदत करीत. कानडी भाषेत 'नगर'

अशी संज्ञा या संदर्भात येते. यांना विशेष महत्त्व असे. ते स्थानिक न्यायनिवाड्याचे काम करीत असावेत. अशा प्रसंगी राजा आचारव्यवस्था ठरवून देई व त्याप्रमाणे राजपुरुष (अधिकारी) त्याची अंमलबजावणी करी. साधारणतः प्रतिवर्षी देशाधिपतींना वैशाखात आणि श्रेणींना कार्तिकात कर द्यावा लागे. ब्राह्मणांना दिलेला अग्रहार 'ब्रह्मदेय' म्हणून ओळखला जात असून त्याला सर्व प्रकारच्या करातून सूट असे. वाकाटककालिन प्रथेप्रमाणे महसूल वसुलीसाठी चाट (पोलीस) आणि सैनिक यांना अग्रहारात प्रवेश निषिद्ध होता. अर्थात अपवादात्मक स्थितीत हे बंधन लागू होत नसे. विनयादित्य याच्या पुणे ताम्रपटात मंचोह (मंचर) येथे मुलीच्या लग्नप्रसंगी अग्रहार दान दिल्याची नोंद असून हे शासन महासंधिविग्रहिक रामपुण्यवल्लभ याने लिहिले आहे,[३०] तर बोपगाव ताम्रपट यात अग्रहाराचे दान लिहिणारा महासंधिविग्रहक हा निखद्यपुण्यवल्लभ नावाचा अधिकारी आहे.[३१]

या काळात नगर व ग्राम यामधून विविध कराद्वारे महसूल प्राप्त होई. जमिनीच्या साऱ्यास 'क्लुप्त' अशी संज्ञा होती, शिवाय अन्य किरकोळ कर असत त्यांना 'उपक्लुप्त' म्हणत. एका लेखात राजाज्ञेने मीठावरच्या करापासून सूट मिळाल्याचा उल्लेख आहे. अनेक ताम्रपटांमधून असे कर देवालयास त्यांच्या खर्चासाठी लावून दिल्याची नोंद आढळते.[३२]

या काळात शासक व राजे स्वतःस विविध प्रकारच्या पदव्या लावून घेत. सम्राटपद निदर्शक समस्तभुवनाश्रय, श्रीपृथ्वीवल्लभ, महाराजाधिराज, परमेश्वर, परमभट्टारक अशा पदव्या धारण करीत.[३३] चालुक्यांची सोन्याची नाणी असून त्याच्यावर वराहचिन्ह आढळते. चालुक्यांचे सामंत हे बऱ्याच बाबतीत स्वतंत्र असत. त्यांना दानपत्रे देता येत. तसेच त्यांच्याकडे फौजफाटाही असे. सामंतास सम्राटाला नियमितपणे खंडणी द्यावी लागे. राज्यात अनेक मंत्री असत. त्या सर्वांचे मिळून एक मंडल असे. हे मंडल सल्लागार मंडलाप्रमाणे कार्यरत असे. अर्थात अंतिम निर्णय हा राजाचा असे.

## राष्ट्रकूट

राष्ट्रकुटांचे साम्राज्य महाराष्ट्राबरोबर दक्षिण गुजरात, मध्य प्रांताचा काही भाग, आंध्र व कर्नाटकाच्या प्रदेशात विस्तारलेले होते. या मोठ्या साम्राज्याचे राज्यकारभाराच्या सोयीच्या दृष्टीने विविध प्रशासकीय विभाग निर्माण करण्यात आले होते. तसेच त्यावरील प्रमुखांचे वेगवेगळे हुद्देही निर्माण करण्यात आले. राष्ट्रकुटांचे साम्राज्य अनेक राष्ट्रांचे (प्रांतांचे) मिळून बनलेले होते. साधारणतः एका राष्ट्रामध्ये असलेला भूप्रदेश हा आजच्या रूढ पाच-सहा जिल्ह्यांच्या क्षेत्रफळाइतका असावा. "राष्ट्राच्या" प्रशासकीय प्रमुखास "राष्ट्रपती" असे म्हणत. बहुधा राजपुत्राला त्याने युद्धात केलेल्या पराक्रमाच्या प्रित्यर्थ "राष्ट्रपती" या पदावर नियुक्ती मिळे. राष्ट्रपतीचा दर्जा महासामंताच्या किंवा महामंडलेश्वराच्या बरोबरचा असे. तो स्वतःच्या बंदोबस्तासाठी मोठा फौजफाटा

ठेवत असे. त्याचा उपयोग स्थानिक अधिकारी व मांडलिकांवर नियंत्रण ठेवण्यासाठी होई. 'राष्ट्रपती' हाच महसूल खात्याचा प्रमुख असे.[३४] त्याच्या नियंत्रणाखाली असलेल्या प्रशासकीय उपविभागांना "विषय" म्हणत.[३५] त्यावरील नियंत्रक 'विषयपती' तसेच 'भोगपती' यांची नेमणूक बहुधा प्रत्यक्ष सम्राटाकडून होत असे. राज्यकारभारात राष्ट्रपतींना 'राष्ट्रमहत्तर' मदत करीत. विषयपती नंतर येणारा प्रशासकीय अधिकारी 'ग्रामकूट' होता. राष्ट्र प्रमाणे विषय याबाबत महाराष्ट्राच्या संदर्भात 'पूनक विषय' (पुणे), 'करहाटक विषय' (कऱ्हाड), 'नाशिक्य-विषय' असे उल्लेख आढळतात. 'राष्ट्रपतीच्या' नियंत्रणाखाली त्या राष्ट्रांतर्गत प्रशासकीय विभागातील 'विषयपती' आणि 'भोगपती' हेही स्वतःचे सैन्य बाळगत. विषयपती हे मांडलिकांच्या दर्जाचे असत. विषयापतीला महसूल वसुलीचे अधिकार असत. ते राष्ट्र प्रमुखाला जबाबदार समजले जात.[३६] एखाद्या कराची सूट देण्याचा अधिकारही विषयपतींना होता. विषयपतीस राज्यकारभारात मदतीसाठी महत्तराचे (सल्लागार मंडळ) एक मंडळ असे. या मंडळात विषयातील प्रतिष्ठित लोक सहभागी असत. कर्नाटकातील महाजनांप्रमाणे याचा दर्जा असे. विषयाचे क्षेत्र साधारणतः आजच्या जिल्ह्याइतके असावे. त्याचे उपविभाग पडत, त्यास 'भुक्ती' म्हणत. भुक्तीच्या अंतर्गत साधारणपणे शंभर ते पाचशे गावे असत. सध्याच्या तहसील एवढे हे कार्यक्षेत्र असावे. भुक्तीच्या प्रमुखास 'भोगिक' म्हणत. भुक्तीच्या उपविभागांत प्रत्येकी दहा ते तीस गावांचा सहभाग असे. त्यावर प्रमुख म्हणून लष्करी अधिकाऱ्याचीच नेमणूक होई. 'भुक्ती' व 'विषय' यावरील महसूल वसुलीत अधिकाऱ्यांना स्थानिक वतनदारांची मदत होई.[३७] गोविंद तृतीय याच्या झरिका ताम्रपटात विषयपती, राष्ट्रपती, भोगपती, ग्रामकूट यांची नोंद मिळते. राष्ट्रकूट काळात 'देश' हाही एक प्रशासकीय विभाग अस्तित्वात होता. साम्राज्यातील काही मोठी नगरे हा एक स्वतंत्र्य प्रशासकीय भाग (घटक) मानला जाई. यावरील प्रमुखास 'पुरपती' किंवा 'नगरपती' म्हणत.

याशिवाय ग्रामसमूह हा एक स्वतंत्र प्रशासकीय विभाग असावा.[३८] हा विस्ताराने लहान किंवा मोटा असे. उदा. 'वटनगरिका चतुरशीति' व 'करहाट दशसहस्र'. याचा अर्थ वटनगरी नावाचा ८४ गावांचा समूह आणि करहाट नावाचा १० सहस्र गावांचा समूह असा घ्यावा लागतो. दुसरा समूह कदाचित राष्ट्र विभागाइतका मोठा असावा. या संदर्भामध्ये "शुक्रनीति" मध्ये गावाची केलेली व्याख्या ही जास्त समर्पक वाटते. ज्या गावाचे शिवार एक कोसाचे आहे किंवा ज्याचे उत्पन्न राज्याला एक हजार रौप्य 'कर्ष' येते त्यास 'ग्राम' म्हटले आहे. एक सहस्र रौप्य कर्षावरून गावाची मर्यादा ठरवलेली पाहता आपणाला अभिलेखातून मिळणाऱ्या कोकण ९००, वनवासी १२०००, करहाटक ४००० या संख्यादर्शक ग्राम समुहाचा अर्थ महसुली उत्पन्नाच्या दृष्टीने घ्यावा लागतो, किंबहुना एखाद्या क्षेत्राचे महसुली उत्पन्न हे एक सहस्राच्या चौपटीने किंवा दशपटीने अधिक येऊ शकते व या दृष्टीने एकाच गावाची मोजदाद ही १०:४० अशी गणली जात असावी. एकूण राष्टकूट काळामध्ये काही ग्रामसमुहांचे

मिळून स्वतंत्र प्रशासकीय विभाग होत असावेत. गावाच्या समोर येणारी संख्या उदा. वनवासी १२०००; करहाटक ४००० हे अंक ग्रामसंख्येचे नसून त्या गावातील महसुलापोटी जमा होणाऱ्या कर्ष व पुढे निष्क किंवा आहार्त असावेत असे राईस याने म्हटले आहे.[३९] डॉ. अय्यंगार यांच्या मते हे अंक उत्पन्नदर्शक किंवा या क्षेत्रात पेरणी करताना लागणाऱ्या बी-बियाणांचे मापदर्शक असावेत.[४०] याप्रमाणे चि. वि. वैद्यांनी हे अंक उत्पन्नाचा सरकारी तिजोरीत जमा होणारा प्रत्यक्ष वाटा दर्शविणारे होते असे मत व्यक्त केले.[४१] याच संदर्भामध्ये प्राणनाथ यांच्या मते 'ग्राम' हा शब्द इंग्रजीतील इस्टेट (Estate) या अर्थाने भूतकाळात वापरला जाई व हा अर्थ गृहीत धरून कोकण १४००, नोळंबवाडी ३२०००, अशी स्थावर मालमत्ता होती असे मानावे लागते.[४२] आळतेकरांनी फ्लिटच्या मतास मान्यता देऊन हे अंक सकृतदर्शनी वाटतात त्याप्रमाणे लोकसंख्येचे नाहीत तर ते ग्रामसंख्येचे निदर्शक आहेत याविषयी विस्ताराने चर्चा केली आहे.[४३] या संदर्भात पा. वा. काणे यांनी आळतेकरांचे मत मान्य केले आहे.[४४] एकूण राष्ट्रकूट काळात आढळून येणाऱ्या व पुढे शिलाहार–यादव काळात कायम असलेल्या ग्रामनामापुढे संख्या दर्शवण्याच्या पद्धतीबाबतची ही मते विचारात घेता आळतेकरांचे मत योग्य वाटते.

राष्ट्रकूट काळात गावाच्या आकारावरून त्याला काही वेळा बृहद् (मोटे), लघु (लहान) असे विशेषण देत.[४५] एकाच नावाच्या दोन वसाहतींस त्याच्या आकारमानावरून असे विशेषण लावले जाई. उदा. लघु मोथिपद्रक. शिलाहार काळात देखील ही प्रथा कायम असल्याचे दिसते. उत्तर–मध्ययुगापर्यंत गावाच्या आकारमानावरून व काळावरून खुर्द व बुद्रुक अशी विशेषणे लावल्याची दिसतात.[४६]

राष्ट्रकूट साम्राज्यात असलेल्या प्रशासकीय विभागामध्ये 'राष्ट्र', 'राज्य' याबरोबर 'विषय', 'भुक्ती', 'देश' आणि 'मण्डल' यांची निर्मिती झाली होती. असे असले तरी राष्ट्रकूट साम्राज्यामध्ये मांडलिकांचे विशेष महत्त्व होते. सामंत बरेच स्वतंत्र असत. काही मांडलिकांना तर पंचमहाशब्दांचे अधिकार असत.[४७] हे पंचमहाशब्द म्हणजे शृंग, शंख, भेरी, जयघंटा व टमट. याशिवाय सिंहासन, चामर, पालखी, हत्ती ही राजचिन्हे वापरण्यास त्यांना परवानगी असे. मांडलिक राजाच्या सभेत सम्राटाचा दूत (वकील) असे. त्याचे त्यांच्या कारभारावर लक्ष असे. अर्थात सर्व मांडलिक सारख्या दर्जाचे नसत. मांडलिकांवर नियंत्रण ठेवणे हे एक महत्त्वपूर्ण काम सम्राटास करावे लागे. या काळात प्रस्थापित झालेली व्यवस्था पुढील काळात अधिक प्रबळ झाल्याचे जाणवते.

राष्ट्रकूट राजे स्वतःला परमभट्टारक, महाराजाधिराज, परमेश्वर, श्रीवल्लभ, नरेंद्रदेव, जगतुंग[४८] यासारख्या उपाध्या (बिरूदे) लावीत. यांची नावे बऱ्याचदा 'वर्ष' या उपपदाने सुशोभित असत. उदा श्रीप्रभूतवर्ष, अमोघवर्ष, धारावर्ष, अकालवर्ष[४९] इत्यादी. यांच्या विविध ताम्रपटातून अनेक बिरुदांची नोंद आलेली आहे. राष्ट्रकूट काळात वारसाहक्क

साधारणपणे वडिलानंतर ज्येष्ठ पुत्राकडे येई. तो कर्तृत्ववान नसल्यास हा वारसा धाकट्या मुलाकडे जाई. शक्यतो राजाच्या हयातीत युवराजाची निवड होई. मात्र यासाठी राजपुत्र योग्य वयाचा असावा लागे. राष्ट्रकूट युवराजांचा पट्टबंधाभिषेक किंवा राज्याभिषेक समारंभ विशेषत्वाने राजधानीच्या बाहेर होई.[१०]

राष्ट्रकुटांची राजसभा ही पायदळ, रिसाल व हत्तींनी वेढलेली असे. यातून संरक्षणापेक्षा राजसभेचे वैभव व्यक्त होत असावे. राजसभेत युवराज व अन्य राजपुत्र, राजकुळातील प्रतिष्टित पुरुष, मंत्रिमंडळ व लष्कर अधिकारी, याशिवाय ज्ञानी, अभ्यासक, प्रतिभावंत हेही असत. उदा. कवि, ज्योतिर्विद, क्षेणीनायक इत्यादी. या राजसभेचे नियंत्रण स्मृतिग्रंथ व लोकमताचा आदर करून रूढ असलेल्या संकेताप्रमाणे होई. राष्ट्रकूट राजा ध्रुव याचा परराष्ट्र मंत्री हल्ल हा सामंत असून पंचमहाशब्दाचा अधिकारी होता. बहुतांश मंत्री हे चांगले योध्ये असत. मुख्य मंत्री हा महासामंताच्या दर्जाच्या असे व त्याला पंचमहाशब्दाचा अधिकारही असे. त्याच्या आज्ञेने मांडलिकांना देणग्या दिल्याची उदाहरणे आढळतात. राष्ट्रकूट काळात परराष्ट्र मंत्र्याला महासंधिविग्रहक असे म्हटले आहे. शिलाशासनाचा मसुदा तयार करणे व तपासण्याचे काम त्याकडे सोपविलेले दिसते. ''कौटिल्यीय अर्थशास्त्र'' व ''मनुस्मृति'' मध्ये त्याला 'दूत' म्हटले आहे. याज्ञवल्क्यस्मृतिवरील टिकाग्रंथ ''मिताक्षरे'' मध्ये त्याचा उल्लेख मिळतो. या महासंधिविग्रहकास सम्राटाची संपूर्ण माहिती व पूर्वजांच्या पराक्रमाचे ज्ञान असणे अपेक्षित होते.[११] राष्ट्रकुटांनी महासंधिविग्रहकाच्या मदतीसाठी काही संधिविग्रहकसुद्धा नियुक्त केले असावेत. कुठल्याही जागेवर अधिकारी नियुक्त करताना त्याचे लष्करी नैपुण्य, वंशपरंपरा व शिक्षण यासारख्या बाबी विचारात घेतल्या जात असाव्यात. अधिकाऱ्यांना वेतन म्हणून रोख रक्कम तर मिळेच शिवाय इनामेसुद्धा दिली जात किंवा दोन्हीही एकावेळी उपलब्ध करून देण्यात येत असत. गावच्या पाटलाला जी जमीन देण्यात येई तिला 'देशग्रामकूटक्षेत्र' अशी संज्ञा होती. ग्रामाधिपतीची जागा ही बहुधा परंपरेने प्राप्त होई. महाराष्ट्रात ग्रामप्रमुखास 'ग्रामकूट' व कर्नाटकात 'ग्राऊण्ड' असा हुद्दा दिसतो. लष्करी अधिकाऱ्याप्रमाणे विद्वान ब्राह्मणांनाही इनाम मिळत. झरीका ताम्रपटामध्ये 'महाक्षपटलाधिप' म्हणजे क्षेत्र नोंदणी अधिकारी अशी नोंद मिळते. गोविंद तृतीय याच्या नेसरी ताम्रपटात 'दूतक' या ताम्रपट लिहून देणाऱ्या अधिकाऱ्याचा उल्लेख आहे.[१२] देवैय राणक आणि लेखक वत्सराजपुत्र अखणादित्य याचे नाव आले आहे. विषयपतीच्या नियंत्रणाखाली काम करणाऱ्या पोलीस अधिकाऱ्यांना 'चौरोधारणि' व 'दण्डपाशिक' म्हणत.[१३]

राष्ट्रकूट काळात ग्रामरक्षणाची जबाबदारी ही 'ग्रामकुटांवर' होती. बऱ्याचदा लहान–मोठ्या लढायांचे प्रसंग उद्‌भवत, कधी कधी या लढायातून खेडी उध्वस्त होत. खेड्यात असलेल्या लढाऊ पथकाचे नेतृत्व ग्रामकुटना करावे लागत असे. स्थानिक महसूल शेतीशी संबंधित असलेला हा ग्रामप्रमुख ग्रामपंचायतीचाही प्रमुख असे.

स्थानिक कज्जे ऐकून घेणे, त्याचा निकाल देणे ही कामे तो करी. ''मनुस्मृतीत'' नोंदविल्याप्रमाणे गावातून काही विशिष्ट महसूल त्याला मिळत असे. राष्ट्रकुटांच्या ताम्रपटातून 'ग्राममहत्तर' याच्यानंतर 'युक्त', 'आयुक्त', 'नियुक्त' वा उपायुक्त या हुद्यांचा उल्लेख होतो. हे बहुधा लेखनिक असावेत. कुलकर्णी हा हुद्दा राष्ट्रकूट काळात तरी आढळत नाही. ग्रामपंचायतीचे सभासद असणाऱ्या गृहस्थांना 'महत्तर' म्हणत हे गावातील प्रमुख असत. गावातील सार्वजनिक कामे, विद्यालये, मंदिरे यांची व्यवस्था या महाजनांच्या समितीकडून पाहिली जाई. तसेच लहान-मोठे फौजदारी व दिवाणी खटले यांच्यापुढे चालत. ग्रामकूट येसकरांच्या मदतीने चोऱ्यांचा तपास करत. ग्रामीण समाजजीवनाचा भाग बनलेली बलुतेदारी पद्धत याच काळात रूढ झाली असे म्हणता येईल. या पद्धती उत्तरकाळात जास्त प्रबळ झाल्या.

**राष्ट्रकुटांच्या महसुलाविषयीच्या बाबी :** राष्ट्रकुटांच्या महसुलाविषयीच्या बाबींमध्ये पुढील बाबींचा समावेश होई :–नियमित कर, प्रासंगिक कर, दंड, सरकारी मिळकतीचे उत्पन्न तसेच मांडलिकांपासून मिळणारी खंडणी. याचा तपशीलात विचार करता नियमित करांमध्ये उद्रंग, उपरीकर, शुल्क, विष्टि व किरकोळ करांचा समावेश होई. तर प्रासंगिक करांमध्ये चाटभटप्रवेशदंड, राजसेवकांना वसतिदंड, प्रयाणदंड व विशेष प्रसंगी मागावयाचे कर आणि दंड म्हणजे एक शिक्षा म्हणून घ्यावयाचा दंड. तसेच प्रशासकीय मुलखातून प्राप्त होणारा महसूल, यामध्ये शेरी जमीन, पडीक जमीन. झाडे तसेच मीठागरे व खाणी आणि बेवारशी मालमत्ता व गुप्त धनाचा समावेश होत असावा.[१४] नियमित करामध्ये उद्रंग म्हणजे जमिनीबाबत उपकर असे अन्य कर होते. 'भूतपट्टप्रत्यय' किंवा 'शुल्क' नावाच्या कराचा उल्लेख राष्ट्रकूट ताम्रपटातून मिळतो. हा कर जकातीच्या स्वरूपाचा असावा, तर विष्टि म्हणजे वेठ. प्रत्येकास राजासाठी कुठल्यातरी स्वरूपात अशी सेवा द्यावी लागत असावी. याशिवाय प्रसंगोपात् काही भेटवस्तू राजपुरुषास मिळत. राष्ट्रकूट काळात रूढ असलेल्या नाण्यांचे वर्णन डॉ. आळतेकरांनी आपल्या लेखातून केले आहे. त्यात दाम, सुवर्ण, गद्याणक, कळंजू, कासू, मंजडी, अक्कम अशी नावे मिळतात. द्रम्म हे रुप्याचे किंवा सोन्याचे नाणे असे. याशिवाय राजाच्या मालकीच्या म्हणून काही जमिनी विविध ठिकाणी असत. जी गावे राजांनी दिली आहेत ती वगळता अन्य गावे, वनसंपदा ही राजाच्या मालकीची मानली जाई. युद्धात मरण पावलेल्या सैनिकांच्या कुटुंबियांना शासनाकडून मदत मिळत असे. तसेच पराक्रमाबद्दल काही इनाम व बक्षिसेही मिळत. ''राजतरंगिणी'' मध्ये म्हटल्याप्रमाणे जखमी सैनिकांना वाहण्यासाठी डोल्या असत. अशा सैन्यांची वाहतूक करण्यासाठी स्वतंत्र तुकडी राष्ट्रकूटकाळात असे. एकूण जनकल्याणाच्या हेतूने हे राजे दक्षता बाळगत असत.

## कल्याणचे चालुक्य

कल्याणच्या चालुक्यांच्या राज्यात संपूर्ण महाराष्ट्र, कर्नाटक व आंध्रप्रदेशचा पश्चिम भाग समाविष्ट होता. विक्रमादित्य सहावा याच्या काळात मोठ्या प्रमाणामध्ये चालुक्य

सत्तेचा विस्तार झाला. कल्याणच्या चालुक्यांच्या काळात राज्याच्या शासन व्यवस्थेच्या दृष्टीने 'राष्ट्र', 'विषय', 'देश', 'नाडू', 'कंपन' आणि 'टाण' असे प्रशासकीय विभाग केलेले होते. या प्रशासकीय विभागावर अनुक्रमे राष्ट्रपती, विषयपती, नाडरस इत्यादि अधिकारी नेमलेले असत. कल्याणच्या चालुक्याच्या प्रशासकीय विभागांची नोंद अभिलेखांच्या आधारे करता येऊ शकते. त्यात 'देश' उदा. कुण्डिदेश, प्रत्यंडक ४००० देश, तसेच 'कंपन' यामध्ये सावरवली कंपन २४ व मिरीजगंपन ३०० अशी नावे मिळतात. शिवाय 'नाडू' या विभागाची नोंद आहे. नाडूमध्ये तारीकरानाडू, कऱ्हाडनाडू अशी नावे मिळतात, तर विषयमध्ये पेडविषय अशी एक नोंद आहे. यालाच कन्नडमध्ये नाडू अशी संज्ञा असावी. नाडूच्या नावापुढे ३००, ८०० अशा संख्या असत. अवरावाडी ७००, करहाटक ४५००, सकरगे ८०, ८४, ६०, गंगावडी ९६०० हा सर्वात मोठा विभाग; तर वेलुग्राम ७०, बागडगे ७० किंवा कुक्कनूर ३० असे विभाग आढळतात. गंगवाडी, नोलंबवाडी यासारखे मोठ्या संख्या असलेले प्रदेश मांडलिकाचे प्रदेश होते. नाडूच्या उप-विभागास 'कंपन' म्हणत. 'टाण' हा सर्वात लहान प्रशासकीय विभाग होय. नाडूत नाडरस व नाडगावुंड असे दोन अधिकारी असत. नाडगावुंडाकडे त्या त्या प्रदेशातील सारा वसूल करण्याचे काम असे. तर नाडरसाकडे आताच्या जिल्हाधिकाऱ्याप्रमाणे सामान्य प्रशासन असे. कंपनात नगर, पट्टण, पूर, ग्राम याचा अंतर्भाव होई. नगरात अनेक महाजनांच्या संस्था असत. त्यांच्याकडे विविध प्रकारची कामे सोपविलेली होती.

चालुक्य राजे गादीवर बसताना 'मल्ल' शब्दाने शेवट होणाऱ्या पदव्या धारण करीत. मल्ल या शब्दाचा अर्थ कुस्तीगीर, लढवय्या असा आहे. चालुक्यांची जगदेकमल्ल, भूलोकमल्ल, भुवनैकमल्ल,[५५] आहवमल्ल यासारखी नावे आढळत. साधारणपणे चालुक्यांच्यावेळी पित्याच्या मृत्यूनंतर ज्येष्ठ पुत्र गादीवर येई. पुत्रसंतान नसल्यास लहान भावाकडे हा वारसा जाई. अर्थात चालुक्य घराण्यातील सर्वात पराक्रमी राजा सहावा विक्रमादित्य हा आपल्या वडील भावास पदच्युत करून गादीवर आला होता. अशी उदाहरणे अपवादात्मक असत. आपल्या घराण्याशी संबंधित पुरुषांना बरोबर घेऊन त्याना सामंतासारख्या मोठ्या हुद्यावर नियुक्त करण्यात येई. असे सामंत व मांडलिक हे केंद्रसत्ता दुर्बल असल्यास बंड करीत. चालुक्य राजाचा अंत बिज्जल या त्याच्या महाप्रधान व सेनापतीने केला. या काळात राजपुत्रांना उत्तम प्रकारचे शिक्षण देण्याची परंपरा असल्याचे विक्रमादित्य सहावा व सोमेश्वर तिसरा या विद्वान व सर्वगुणसंपन्न राजांच्याकडे पाहून म्हणता येईल. कल्याण चालुक्यांच्या राज्याची वाटणी वंशपरंपरागत मांडलिक आणि अधिकारी यांच्यात झाल्याचे दिसते. महाराष्ट्रामध्ये सेऊल देशाचे यादव, कोकण व कोल्हापूरच्या शिलाहार तसेच गोव्याचे कदम्ब, शिरवळचे छोटे चालुक्य घराणे यांचा समावेश प्रारंभी तरी चालुक्य मांडलिकातच होता. चालुक्य काळात राण्यांच्याकडेही राज्यकारभाराची जबाबदारी दिल्याचे दिसते. सहाव्या विक्रमादित्याची पट्टराणी लक्ष्मीदेवी पिरियरसी ही विक्रमादित्य मोहिमेवर असताना

कल्याण येथे राज्यकारभार पाहात असे. विक्रमादित्य सहाव्याची एक राणी तारादेवी अग्रहाराची व्यवस्था पाहताना दिसते. अशा अग्रहाराचे उत्पन्न त्यांच्या खाजगी मिळकतीचा भाग म्हणून ग्राह्य ठरवले जाई. संस्थानिकांना मांडलिक, महासामंत, मंडलेश्वर, महामंडलेश्वर, महामंडलेश्वराधिपती अशा पदव्या असत. अधिकाऱ्यांच्या हुद्यामध्ये दंडनायक, महाप्रधान, महासेनापती, महादंडनायक, संधिविग्रहिक, अंतःपुराध्यक्ष, धानसवेगाडे अशी पदे असत. धानसवेगाडे म्हणजे महानसावरी मुदपाकखान्यावरील अधिकारी, अर्थात हा कन्नड हुद्दा आहे. दंडनायक याला कानडीमध्ये थिरिये असे म्हणत. दंडनायक ही पदवी सेनापती व न्यायाधीशासाठीही उपयोगात आणत. एकूण विविध प्रकारचे महाप्रधान हे राजाचे सल्लागार म्हणून काम करत. ते स्वतःच्या प्रांताचे प्रमुख प्रशासक असत. कल्याणीचा चालुक्य विक्रमादित्य सहावा याच्या काळात त्याचा महामंडलेश्वर उदयादित्य गंग पेर्माडी हा वनवासी १२००० चा राजा असताना तो बेळहोळ ३०० व पुलिगेरे ३०० या विभागांचा महाप्रधान व दंडनायक म्हणूनसुद्धा कार्यरत होता, तर दुसऱ्या सोमेश्वराच्या काळात महासामंताधिपती केशवादित्य देव आणि बलदेवय्या हे महाप्रधान, संधिविग्रहिक व सेनापती म्हणून कामे पहात असत. अशी अनेक उदाहरणे पहावयास मिळतात. या काळात न्यायदानाच्यावेळी प्रसंगी पक्षकारांना काही दिव्यांचाही अवलंब करावा लागे. कित्तूर येथील कालेश्वर देवाचा आचार्य शिवशक्ती व मुळस्थानदेवाचा आचार्य कल्याणशक्ती याने स्वामित्वाच्या वादावरून केलेल्या दिव्यांची नोंद मुंबई गॅझेटिअरमध्ये दिली आहे.[५६] चालुक्य राजे मंदिर व मठांना दान देऊन त्यांची व्यवस्था करीत. चालुक्य राजा भूलोकमल्ल याने "धर्मापुरी" (जि. बीड) हे नगर वसविले. त्याचा एक अधिकारी श्रीपती याने मुरारी (श्रीकृष्ण) चा मठ बांधला, त्याला 'नगर' म्हणजे व्यापाऱ्यांची श्रेणी किंवा सहकारी संस्था व देशीजन तसेच 'पंचनगरम' (हा मुळात कन्नड शब्द आहे. याचा अर्थ व्यापार श्रेणीतील पंच किंवा प्रमुख महाजन असा होतो.) याच्या उत्पन्नातून संस्थांसाठी दाने व वृत्ती ठरवून दिली होती.[५७] चालुक्य कालीन नाण्यांचे उल्लेख तत्कालीन लेखातून मिळतात. दाम व विसोवे ही नाणी प्रचलित असावीत.

## शिलाहार राजवंश

शिलाहारांच्या प्रभुत्वाखाली असलेल्या प्रदेशाचे एकूण तीन भागात वर्गीकरण करता येते. उत्तर कोकण याला "पुरीकोकण" असे नाव त्याच्या 'पुरी' या राजधानीवरून मिळाले. शिलाहारांच्या या शाखेचा मूळपुरुष कपर्दिन यावरून कपर्दिद्विप असे या प्रदेशास म्हणत.[५८] तथापि, कपर्दिद्विप म्हणजे लक्षद्विप हे अलीकडील कोरीव लेखावरून स्पष्ट झाले आहे. दक्षिण कोकण याला "सप्तकोकण" म्हणून ओळखले जाते. उत्तर कोकणातील एकूण ग्रामांची संख्या १४००० असल्याची नोंद हरिश्चंद्रवंशी भोगशक्ति याच्या अंजनेरी ताम्रपटात केली आहे. परंतु ती १४०० असल्याचे उल्लेख अनेक शिलालेखात आहेत, तर दक्षिण कोकणामध्ये असलेली ग्रामसंख्या ९०० असावी

असे मानले जाते. शिलाहारांची तिसरी शाखा दक्षिण महाराष्ट्रात राज्य करीत होती. तीनही भूप्रदेशातील प्रशासनाच्या वैशिष्ट्यांचा एकत्रितपणे विचार येथे करण्यात आला आहे.

**प्रशासकीय विभाग :** शिलाहार काळात उत्तर कोकणच्या काही प्रारंभिक लेखात राष्ट्रपतींना दानपत्राची माहिती दिल्याचा उल्लेख आला आहे. पूर्वीच्या दानपत्राचे अनुकरण करण्याच्या पद्धतीमुळे तो आला असावा. वास्तवात या काळात 'राष्ट्र' नामक प्रशासकीय विभाग अस्तित्वात नव्हता.[५९] राष्ट्राची जागा 'मंडळ' या प्रशासकीय विभागाने घेतली होती. राज्य शासनामध्ये सर्वात मोठा प्रशासकीय विभाग 'देश' हा होता.[६०] उदा. पूणकदेश,[६१] मैरिंजदेश,[६२] कुण्डीदेश यामध्ये अनुक्रमे पुणे सभोवतालचा प्रदेश, मिरजेजवळील भूभाग आणि बेळगाव सभोवतालचा प्रदेश यांचा समावेश होता. कोकण प्रदेशामध्ये अनेक देशांचा अंतर्भाव होई. त्यामुळे त्याचा उल्लेख 'महादेश' असा करण्यात आला आहे. या काळात देशाच्या उपविभागास 'विषय' अशी संज्ञा होती. तत्कालीन विषयांचे उल्लेख शिलाशासनामधून मिळतात. उदा. 'पाणाडविषय',[६३] 'चिक्खलाडविषय'[६४] 'माहिरीहारविषय' (महागिरीहारविषय), 'वरेटिकाविषय', 'षट्षष्टिविषय' (सहासष्ट गावे असलेला विभाग), 'अणितपल्लाविषय', 'करकूटविषय', 'मन्दरजविषय', आणि 'कटषडीविषय' या उत्तर कोकणातील विषयांची नावे मिळतात, तर दक्षिण कोकण विभागात चिपलुनविषय व प्रणालकविषयाची नोंद उपलब्ध असून पन्हाळा हे या विभागाच्या राजधानीचे केंद्र होते.[६५] कोकण विभागात प्राचीन काळी संस्कृतोद्भव भाषा बोलणाऱ्या राजवंशाचे शासन असल्यामुळे या भागातील प्रशासकीय विभागांची नावे वरीलप्रमाणे रूढ झाली. शिलाहार राजे मात्र मूलतः कन्नड भाषिक असल्यामुळे कोल्हापूर भागातील प्रशासकीय विभागांची नावे कन्नड भाषेत रूढ झालेली आढळतात. 'देश' या प्रशासकीय विभागास 'नाड' किंवा 'खोल्ल' (गोल्ल) असे म्हणत. कोल्हापूर जिल्ह्यास 'एडेनाड' असे नाव होते. याविषयीची नोंद गंडरादित्याच्या तारळे ताम्रपट आणि द्वितीय भोजाच्या कोल्हापूर शिलालेखात मिळते. तसेच 'पणतुरगेखोल्ल', 'आजिरगेखोल्ल', 'कवडेगोल्ल' असे प्रशासकीय विभाग अस्तित्वात होते. याचे 'खंपण' किंवा 'गंपण' असे उप विभाग पडत.[६६] उदा. 'मिरिंजेगम्पण', कोडवल्लिखंपण या बाबतची नोंद अनुक्रमे गण्डरादित्याच्या कोल्हापूर ताम्रपट व कोल्हापूर शिलालेखात आली आहे.

काही प्रशासकीय विभागात विषयातील आणि खोल्लातील गावांची संख्या त्यांच्या नावाबरोबर पुढे जोडली जाई. उदाहरणार्थ षट्षष्टिविषय (सध्याच्या साष्टीचा भूभाग) यासारखे अन्य विषय असल्यामुळे त्यातील मुख्य गावाचे नाव त्याबरोबर लावत. उदा. 'शुपरिकषट्षष्टि' (सोपाऱ्याजवळील भूभाग) तसेच 'स्थानकाभ्यन्तरषट्षष्टि' यामध्ये स्थानक (ठाणे) या राजधानीचा केंद्राचा अंतर्भाव होई. याला केवळ

'अभ्यन्तरषट्षष्टि' असेही म्हणत.[६७] याप्रमाणे 'महिरहारषट्षष्टि' हा सहासष्ट गावांचा विभाग होता, तर 'कोरियला-द्वादश' हा केवळ बारा गावांचा प्रशासकीय विभाग होता. याप्रमाणे देशाच्या नावांना जोडलेल्या संख्येवरून त्यातील ग्रामांची संख्या ज्ञात होई. उत्तर कोकणात १४०० गावे होती. मिरिंजदेशात ती ३००० होती म्हणून त्याचा उल्लेख 'सहस्रत्रितयमिरिंजदेश' असा आहे. करहाट देशात ४००० गावे होती.[६८] याप्रकारे प्रशासकीय विभागाची नोंद मिळते.

**राज्य शासन :** शिलाहार काळात प्रारंभिक काही ताम्रपटातून 'राष्ट्रपती' या शासन प्रमुखाचा उल्लेख आला आहे. प्रत्यक्षात मात्र हे 'पद' किंवा 'राष्ट्र' हा शासन विभाग अस्तित्वात नसावा. 'विषय' विभागाच्या प्रमुखास विषयपती म्हणत. याविषयीची नोंद छद्वैदेवाच्या ताम्रपटात आली आहे. या काळात राज्य शासन 'राष्ट्रपती', 'विषयपती' आणि 'ग्रामपती' यांच्या सहाय्याने चालविले जाई. दिवेआगार ताम्रपटात 'सामंत' (प्रांताधिपती), 'नायक' (विभाग प्रमुख) आणि 'ठाकूर' (जिल्हा प्रमुख) अशी शासकांची पदे नोंदवली आहे. सामान्यतः सेनाधिकाऱ्यांची 'प्रांताधिपती' म्हणून नियुक्ती करण्यात येई. त्यांना 'दण्डाधिपती' असेही म्हणत. उत्तर कोकणच्या शिलाहारांनी दक्षिण कोकणचा काही भाग जिंकून घेतल्यावर त्याचा वेगळा विभाग बनवून 'प्रणालक' येथे राजधानीचे केंद्र स्थापन करण्यात आले. प्रथम अपरादित्याने आपला मुलगा विक्रमादित्याची तेथे नियुक्ती केली. विक्रमादित्याचे स्वतंत्र असे मंत्रिमंडळ होते. त्यामध्ये परराष्ट्रमंत्री म्हणजे संधिविग्रहक होता.[६९] पुढे हा भाग उत्तर कोकणच्या राज्यात विलीन झाल्यावर सुप्रया या 'दण्डाधिपती'ची नेमणूक झाल्याचे दिसते. याविषयीची नोंद मल्लिकार्जूनाच्या चिपळूण शिलालेखात आली आहे. 'ग्रामपती' म्हणजे ग्रामप्रमुख याला गावपाटील असेही म्हटले जाई. 'पटलीक' अशी संज्ञा यासाठी उपयोगात आणल्याचे हरपाल देवाच्या शिलालेखातून दिसते. कोल्हापूरच्या शिलाहारांच्या लेखात 'नागावुंड' याचा विषयपती या अर्थाने उल्लेख केला आहे.[७०] 'गावुंड' म्हणजे 'ग्रामाधिकारी' याविषयीचा उल्लेख विजयादित्याच्या बामणी शिलालेखात आला आहे.[७१]

साधारणपणे राजा हा आपल्या मंत्र्याची व महामात्यांची नियुक्ती करीत असे. त्यांची नावे व शासकीय पदे याचा उल्लेख उत्तर कोकणच्या शिलाहारांच्या लेखातून येतो. उत्तर कोकण विभागात राजाचे पाच प्रमुख सल्लागार असत. याविषयीची नोंद छित्तराजाच्या भांडुप ताम्रपटातून आली आहे. 'महाप्रधान' हा मुख्य प्रधान असून त्याला सर्वाधिकार दिलेले दिसतात. महामात्य हा राज्यकारभाराच्या दृष्टीने प्रमुख होता, महासंधिविग्राहक, प्रथमछेपाटी किंवा मुख्य 'कोषाध्यक्ष', 'द्वितीय छेपाटी' किंवा 'दुय्यम कोषाध्यक्ष' असत. यामध्ये 'महाप्रधान', 'महासन्धिविग्रहिक' यांचा दर्जा इतरांपेक्षा निश्चितच श्रेष्ठ होता. शिलाहारांच्या लेखात संधिविग्रहकाचा उल्लेख पहावयास मिळतो. त्यापैकी छित्तराजाच्या भांडुप ताम्रपटातील परराष्ट्र मंत्री हा 'कोर्णाटसंधिविग्रहक' आहे. तो 'कोर्णाटदेशविषयक' परराष्ट्र खात्याचा प्रमुख असावा, तर पट्टणकुडी ताम्रपटात 'नागरसंधिविग्रहीका' असा उल्लेख आहे. याच्याकडे निश्चित कुठले काम

असावे हे स्पष्ट होत नाही. छेपाटी या कोषाध्यक्षाला नागार्जुनाच्या ठाणे ताम्रपटात 'भांडारगारसेन' म्हटले आहे.[७२] अशाप्रकारे मुख्य व दुय्यम कोषाध्यक्षाचे उल्लेख मिळतात. मुख्य अधिकाऱ्याच्या हाताखाली 'अमात्य', 'सचिव', 'संधिविग्रहिक' यासारखे काम करणारे दुय्यम दर्जाचे अधिकारी असत. गंडरादित्याच्या कोल्हापूर ताम्रपटात 'कडितामात्य' असा उल्लेख आला आहे. हा युद्धखात्याचा प्रमुख असावा. याशिवाय काही लेखात 'राजगुरु'चा उल्लेख आला आहे. यावरून राजगुरुला विशेष स्थान असावे. त्याला महामात्याचा दर्जा असल्याचे द्वितीय अपरादित्याच्या परळ शिलालेखातून स्पष्ट होते. तसेच 'लघुराजगुरु'चा उल्लेख मुम्मुनिराजाच्या अंबरनाथ लेखात मिळतो. 'श्रीकरण' हा सचिवालयाचा प्रमुख असावा.[७३] दक्षिण कोकण आणि कोल्हापूर येथील शिलाहारांच्या लेखातून 'हडप' व 'हडपवल्ल' असाही एक उल्लेख मिळतो. तो राजाचा तांबूलधारक किंवा स्वीय सेवक असावा. याप्रकारे कोकणामधील छद्वैदेवाच्या ताम्रपटामध्ये 'शौल्किक' (जकात अधिकारी), 'गौल्मिक' (सुरक्षाधिकारी) आणि 'चौरोद्धरणिक' (चोरीचा बंदोबस्त करणारा) याचा उल्लेख आढळतो. याप्रकारे विविध अधिकाऱ्यांसंबंधी नोंदी उपलब्ध होतात.

'विषय' आणि 'खोल्ल' यात नगर व ग्राम यांचा अंतर्भाव होत असे. शिलाहारांच्या काही नगरांचा उल्लेख कोरीव लेखातून मिळतो. उत्तर कोकणची प्राचीन राजधानी 'पुरी', शिलाहारांची राजधानी 'स्थानक' (ठाणे) आणि चेमुल्य (चौल) बंदर, तसेच दक्षिण कोकणची राजधानी 'बलीपट्टन' (खारेपाटण), उत्तर विभागाचे मुख्य केंद्र 'प्रणालक' (पन्हाळे) घाटावरील शिलाहारांची राजधानी 'कोल्लापूर' (याला क्षुल्लकपूर असेही नाव होते). 'करहाटक' (कऱ्हाड), मिरंजि (मिरज), एडेनाड (कोल्हापूर जवळील प्रदेश), कुण्डी (बेळगाव) यासारख्या नगरांची नावे उपलब्ध आहेत. प्रणालक (पन्हाळा) हे तटबंदीयुक्त राजधानीचे केंद्र व वल्लवाड (वळीवडे) हे लष्करी छावणीचे टिकाण होते. एखाद्या गावाचा निर्देश करताना त्या गावच्या सिमेलगत असलेल्या गावांचाही उल्लेख तत्कालिन लेखातून आढळतो. या काळात गावांच्या नावामागे विविध प्रकारची उपपदे लावत. उदा. 'पल्ली' किंवा 'पल्लिका' जसे–'मंचकपल्ली' 'चिख्यल्लपल्लिका', 'वल्ली' जसे–'कोटिलेवल्ली', 'वाड' जसे–पाणीवाड, तीरवाड इत्यादी. 'ग्राम' जसे–'वट्टारग्राम', 'बोपग्राम', 'चांडिजेग्राम', 'कशेलिग्राम' इत्यादी उपपदे लावली जात. जेव्हा एखाद्या नावाची दोन गावे सलग असत तेव्हा त्यातील फरक दर्शविण्यासाठी त्याच्या आकारानुसार त्याला 'बृहद्' किंवा 'लघु' अशी विशेषणे लावली जात. उदा. बृहदअडणिका आणि लघुअडणिका. गावास जोडून असलेल्या वाड्यांचा उल्लेख 'खेटक' किंवा 'वाडी' अशी नोंद ताम्रपटातून आढळते. उदा. रट्टराजाचा बलिपत्तन ताम्रपट यामध्ये 'आवाडी' 'नामवाडी' असेही स्पष्टपणे नोंदविले आहे.[७४]

**ग्राम शासन :** नगर व गाव येथील स्थानिक कारभार हा स्थानीय समितीमार्फत केला जात असे. या समितीवर श्रेष्ठी (व्यापारी), कारागीर आणि श्रेणी यांचे प्रतिनिधी सभासद म्हणून असत. समितीच्या सभासदाला महाजन म्हणत.[७५] नागार्जुनाचा ठाणे ताम्रपट शक संवत् ९६१ येथील नोंदीवरून असे स्पष्ट होते की, अशा सभासदांची

संख्या १६ पर्यंत असे. महाजनांना महत्तर असेही म्हणत. कोकण प्रदेशात महत्तर (महाजनास) 'म्हतारा' अशी संज्ञा असावी असे अगाशी व नागाव या लेखातील नोंदीवरून दिसते. म्हतारा म्हणजे महत्तर किंवा ज्येष्ठ प्रतिष्ठित व्यक्ती. ब्रिटिशकालीन गॅझेटिअरमध्ये याचे ग्राम प्रमुख (Head man) असे स्पष्टीकरण केले आहे.[७६] अशा समितीवर धार्मिक संस्थांचे प्रतिनिधी सुद्धा असत. अपराजिताच्या जंजिरा ताम्रपटातील नोंदीवरून पंचमहामठस्थानाचे महत्त्व स्पष्ट होते.[७७] अर्थात याचे निश्चित स्वरूप लक्षात येत नाही. नगर व ग्राम समित्यांना स्थानिक गावुंडाच्या (अधिकाऱ्यांच्या किंवा राजपुरुषाच्या समितींना भूमिदान करता येई.

**शासन :** शिलाहारकालीन शासनप्रणाली व प्रशासनाचा विचार करता असे दिसते की, राजसत्ता निर्णायक असली तरी रूढ परंपरा याज्ञवल्क्यस्मृती, शुक्रनीतिसार यातील नोंदीप्रमाणे राज्यकारभार चालत असे. पित्याच्या मृत्यूनंतर ज्येष्ठ पुत्राला गादी मिळे. काही वेळा राजा स्वतःच आपल्या राज्याची वाटणी करून कनिष्ठ मुलालाही राज्याचा काही भाग देत असे. याविषयीची नोंद विक्रमादित्याच्या पन्हाळे ताम्रपटातून पहावयास मिळते.

गण्डरादित्याच्या कोल्हापूर ताम्रपटातील नोंदीवरून हे स्पष्ट होते की, शिलाहार राजे आपल्या बंधूस प्रांतप्रतिनिधी म्हणून नियुक्त करीत. शिलाहार राजे विविध प्रकारच्या उपाध्या धारण करीत असत. यांच्या तीनही शाखांची शासनपद्धती ही राजसत्ताक पद्धती होती. असे असले तरी मूलतः दक्षिण कोकणातील शिलाहार हे राष्ट्रकुटांचे मांडलिक म्हणून उदयाला आले होते. सत्ता वाढू लागल्यावर त्यांनी 'महासामंतशेखर' किंवा 'महासामंतधिपती' अशा पदव्या धारण केल्याचे प्रारंभिक काळात तरी दिसते. त्यांना विविध बिरुदे धारण करण्याची हौस होती. मुम्मुनीदेवाच्या दिवेआगर ताम्रपटात शक संवत् ९७५ प्रारंभिक दान विषयीक १६ ओळींपैकी ५ ओळीत त्या राजांच्या २० बिरुदांचा उल्लेख आला आहे.[७८] ते राष्ट्रकुटांच्यापेक्षाही मोठाली बिरुदे लावीत असत. उत्तर कोकणचे आणि कोल्हापूरचे शिलाहार राजे स्वतःला 'तगरपूरपरमेश्वर' किंवा 'तगरपुराधीश्वर' असे म्हणवून घेत. यांच्या बिरुदावरून त्या त्या नृपतीचे स्वभाव वैशिष्ट्यही स्पष्ट होते. यांनी स्वतःच्या पुढे ठेवलेले उच्च आदर्शही स्पष्ट होतात. उदा. शौचगांगेय (शुद्ध नैतिक आचरणात भीष्मासारखा), 'कलियुगयुद्धिष्टिर' (कलियुगात युद्धिष्ठिरासारखा), 'सत्यराधेय' (सत्यपालनात कर्णासारखा) आणि 'परनारीसहोदर' (परस्त्रीच्या बाबतीत तिच्या सख्या भावासारखा) ही बिरुदे.[७९] शिलाहारांची बिरुदे ही मोठ्या प्रमाणात संस्कृत भाषेत आहेत. तसेच काही बिरुदे कन्नड भाषेत उपलब्ध होतात. उदा. 'विमलगलगण्ड' (विमल गळ्याचा वीर), 'गण्डरगण्ड' (वीरांमध्ये श्रेष्ठ), 'गण्डवगङ्गर' (वीरांमध्ये सुवर्णासारखा), 'नन्निसमुद्र' (सत्याचा सागर), 'पुसिगंजुवात' (असत्याला भिणारा), 'विल्लविडेङ्ग' (धनुर्विद्येत प्रविण), 'बिरुदंकराम' (बिरुदाधारकांमध्ये रामासारखा) अशा उपाध्या पहावयास मिळतात.[८०] या काळातील खारेपाटण आणि वडवली ताम्रपटातील नोंदी पाहता हे राजे प्रजाहितदक्ष असून लोकहितार्थ कामे करत. तसेच शत्रुंचा संहार आणि स्वतःच्या प्रदेशाचे रक्षण करण्यासाठी पुढाकार घेत.

**शिलाहारांची आयस्थाने :** प्रशासनाचा एक भाग म्हणून राज्याचे महसुली उत्पन्न ज्या बाबीतून प्राप्त होई त्यात प्रामुख्याने जमीन महसुलाचा उल्लेख करावा लागतो. मुम्मुनिराजाच्या लेखात 'सिद्धाय' असा शब्द आला आहे, तर अन्य काही लेखातून 'भूमिदेनक' असा या संदर्भात उल्लेख येतो. स्मृतिग्रंथातून सांगितल्याप्रमाणे उत्पन्नाच्या एकषष्टांश हिस्सा हा महसूल म्हणून राजाला द्यावा लागे. जमीन महसूल हा अंशतः द्रम्मांत व अंशतः धान्यरूपाने दिला जाई. महसुलाचे दुसरे साधन स्थावर मालमत्ता विशेषतः निवासस्थाने असत. हरिपालदेवाच्या माहूल शिलालेखात यास 'गृहदेनक' असे म्हटले आहे. बाजारात विकल्या जाणाऱ्या वस्तुवरही कर असे. याशिवाय विविध गुन्ह्यांसाठीही काही दण्ड वसूल करण्यात येत होता. या विषयीचा अधिक तपशील शुक्रनीतिसार यामध्ये पाहावयास मिळतो. याशिवाय निपुत्रिक गृहस्थांची संपत्तीही राजगामित्व (राजाकडे जमा) होई. या संदर्भात अ. पु. मुजुमदार यांनी शाकुंतल नाटकाच्या पाचव्या अंकाचा संदर्भ देऊन निपुत्रिकाची मालमत्ता खालसा होत असल्याचे म्हटले आहे. येथे निपुत्रिक म्हणजे कुठल्याही प्रकारचा वारस नसलेला असा अर्थ घेणे अपेक्षित ठरते. याशिवाय मांडलिकांची खंडणी, खाणीवरील कर, वनसंपत्तीवरील कर यापासून महसूल प्राप्त होई. मात्र अग्रहार क्षेत्रातून कुठल्याही प्रकारचा कर वसूल केला जात नसे. याशिवाय 'कुमारगद्यान' असा एक कर वसूल होत असल्याचे दिसते. घर किंवा जमिनीच्या करामध्ये सूट दिल्याच्या नोंदी मिळतात. 'कुमारगद्यान' या संदर्भात वा. वि. मिराशी म्हणतात की, राजकुमारांचे पालनपोषण, शिक्षण इत्यादीसाठी हा कर प्रजेवर बसविला असावा.[८१] राजाला त्याच्या कर्तव्यपूर्तीसाठी कर दिला जात असावा. याप्रमाणे विविध महसुली क्षेत्राबरोबर उत्पन्नाची आणखी एक महत्त्वाची बाब म्हणजे जकात होय. कोकणच्या पश्चिम किनाऱ्यावर असणाऱ्या सोपारा, ठाणा, कल्याण, चोल, देवगड, खारेपाटण, मालवण इत्यादी बंदरांतून इतर प्रदेशाशी व्यापार होत असे. त्यावरील जकात हे उत्पन्नाचे साधन मानले जाई. याविषयीच्या नोंदी मुस्लीम प्रवाशांच्या वृत्तांतावरून मिळतात.

## यादव राजवंश

सातवाहन राजवंशापासून ते यादवापर्यंत विविध राजवटीतील प्रशासनाचा पाया किंवा आधारभूत घटक हे स्मृतिग्रंथ आणि रूढ परंपरा हाच दिसतो. "मनुस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति, मिताक्षरा" यासारख्या स्मृतिग्रंथाच्या आधारे एकूण शासन व्यवहार होत होता. काळाच्या ओघात काही परिवर्तन झाले तरी मूळ गाभा कायम असल्याचे दिसते.

**प्रशासकीय विभाग :** यादवपूर्व काळापासून साम्राज्याच्या सोयीच्या दृष्टीने 'राष्ट्र', 'विषय','मंडल', 'भुक्ति' आणि 'पुर' व 'ग्राम' असे एकात एक अंतर्भूत होणारे प्रशासकीय विभाग अस्तित्वात होते. यापैकी 'राष्ट्र', 'मंडल' किंवा 'विषय' याच्या सीमारेषा काळानुरूप कमीअधिक होत असे दिसते. 'पुर' आणि 'ग्राम' याबाबतीही हाच प्रकार होता. सातवाहन काळात 'राष्ट्र', व 'विषय' हे प्रशासकीय विभाग असत. चालुक्य व राष्ट्रकूट काळातही या प्रशासकीय विभागांची नावे मिळत असली तरी त्यांचे

भौगोलिक क्षेत्र बदलत गेल्याचे दिसते. काहीवेळा राष्ट्राएवढ्या मोठ्या प्रशासकीय विभागास 'मंडल' असे म्हटले आहे.[८२] सामान्यपणे आताच्या राज्य, जिल्हा, तालुका आणि गाव याप्रमाणे एकात एक सामावले जाणारे असे प्रशासकीय विभाग असावेत. 'ग्राम' या घटकापेक्षा मोठ्या असणाऱ्या वसाहतीस 'नगर' किंवा 'पूर' म्हणत. याची स्वतंत्र प्रशासन व्यवस्था असे. क्वचित एखाद्या गावाचासुद्धा 'राष्ट्र' असा उल्लेख मिळतो.[८३] राष्ट्रकूट राजा गोविंद तिसराच्या वेळी याच्या एका लेखात प्रतिष्टान भुक्तीचा उल्लेख आहे.[८४] तेराव्या शतकात महानुभव साहित्यात 'प्रतिस्थानाप्रांती' असा उल्लेख आहे.[८५] प्रतिष्टान या लहानशा भुक्तीमध्ये फक्त बारा गावांचा समावेश होता. पण मोठ्या भुक्तीमध्ये शंभरापासून पाचशेपर्यंत गावे असत. तेव्हा कुठल्याही प्रशासकीय घटकांचे आकारमान किंवा भौगोलिक क्षेत्र निश्चित नसे. एखादा प्रशासकीय घटक काळाच्या ओघात कायम राहिला तरी त्याच्या भौगोलिक क्षेत्रात परिवर्तन होत असे. सन ७६७ च्या सुमारास १०,००० गावांच्या करहाटक या विषयात सुमारे तीनशे वर्षांनंतर सन १०५४ मध्ये हे क्षेत्र फक्त ४,००० गावापर्यंत अस्तित्वात असल्याचे दिसते.[८६] करहाटक याचे 'विषय' म्हणून असलेले स्थान सलग तीनशे वर्षे कायम असल्याचे दिसते. याउलट नाशिक विभाग जो 'विषय' या नावाने ओळखला जाई. पुढील ३० वर्षांनी तो 'देश' म्हणून संबोधिला गेला.[८७] यादव काळामध्ये मंडलाप्रमाणे 'कंपन' किंवा 'खंपण' हा प्रशासकीय विभाग पुढे आल्याचे दिसते. तसेच यापूर्वीचा 'भुक्ति' हा प्रशासकीय विभाग पूर्णतः लोप पावल्याचे जाणवते. 'कंपन' हा प्रशासकीय घटक 'विषयापेक्षा' लहान होता. असे रामचंद्र यादवाच्या नेऊरगाव येथील लेखावरून कळते.[८८] 'सेउणदेशान्त पाति निधिवासखम्पणका' या नोंदीवरून यादवकाळात प्रामुख्याने 'देश' व त्यापेक्षा लहान असणारा घटक 'कंपन' हे प्रशासकीय विभाग पुढे आल्याचे दिसतात. वास्तविक पाहता यादवकाळातील 'देश' हा सर्वात मोठा प्रशासकीय विभाग यापूर्वीच्या राजवटीत विशेषतः कलचुरींच्या काळात अस्तित्वात होता. यादवकाळात याची व्याप्ती साधारणतः २० ते २५ चौ. कि. मी. अशी असावी. विठ्ठल देवाच्या पंढरपूर शिलालेखात (शके ११११) विलदेश व मानदेशाची नोंद आहे, तरी आंबे येथील यादवसेनानी खोलेश्वर याच्या लेखात अंबे देश, केज देश, ओस देश आणि उदयगिरी देश अशा एकूण चार देशांचा उल्लेख आला आहे.[८९] कान्हेगाव येथील कृष्णदेव यादवाच्या लेखात 'कंधार देशाचा' निर्देश आहे.[९०] पंढरपूरच्या लेखात 'भूदेशाची' नोंद आहे.[९१] रामचंद्र यादवाच्या वेळापूर लेखात 'मानदेशाची' नोंद आहे.[९२] याचप्रमाणे अन्य लेखातून आपणास याविषयी नोंदी पहावयास मिळतात. एकूण 'देश' व 'मंडल' हे शब्द समानार्थी असावेत. क्वचित 'देश' किंवा 'प्रांत' याअर्थी 'वरण' हा शब्द यादवकाळात आला आहे.[९३] देशाप्रमाणेच विषय हा एक स्वतंत्र विभाग होता. विषयाच्यासाठी बऱ्याचवेळा 'गंपण' हा शब्द आल्याचे दिसते. साधारणपणे या काळात देश हा आजच्या प्रादेशिक विभागासारखा मोठा भाग असून विषय त्याचा उपप्रांत ठरतो. विषयापेक्षा लहान भागास 'खंड' म्हणत. शिलाहार राजवटीतील लेखात 'देऊलेखंड', अशी नोंद आहे, तर रामचंद्र यादवाच्या कालवार

लेखात कावेरखंडाचा उल्लेख येतो.[१४] याविषयी 'वेलित' हा एक अत्यंत लहान असणारा महसूल विभाग असावा असे दिसते. एकूण यादवांच्या काळात 'देश', 'विषय', 'खंड' व 'वेलित' या लहान मोठ्या शासन विभागांची नोंद मिळते. या विभागांच्या मध्यवर्ती टिकाणी राजकीय केंद्र व सैनिकीतळ किंवा छावण्या असाव्यात. राष्ट्रकूट राजा कृष्ण तिसरा याच्यावेळी 'स्कंदावार' (कंधार, जिल्हा नांदेड) येथे मोटा लष्करी तळ होता, तर यादवकाळात आंबे येथील बिडाच्या उल्लेखावरून असे स्पष्ट होते की, यादव काळात आंबे, औसा, उदगिरी व केज या चार देशातील केंद्रस्थानी लष्करी छावण्या असाव्यात. येथील 'चौबिडी'तून मिळणाऱ्या उत्पन्नाचा ठराविक वाटा सकलेश्वर मंदिरास देण्यात आला होता. या लष्करी तळांची शासनव्यवस्था ही अन्य गावातील शासनव्यवस्थेपेक्षा स्वतंत्र असावी. काही गावांच्या समुहाचा मिळून एक शासन विभाग कार्यरत असावा. या विषयीचे उल्लेख शिलाहारांच्या शिलालेखातून मिळतात. यासंदर्भात राष्ट्रकूट काळातील प्रशासकीय विभागात विस्ताराने नोंद केली आहे. गावाच्या आकारमानाप्रमाणे त्याचे पुर, पाटन किंवा नगर, ग्राम किंवा गाव व स्थान असे प्रकार होते. रामचंद्र यादवाच्या नेऊरगाव लेखात डोमेगाऊ, सुरिएगाऊ आणि खेटकग्राम यासारखे उल्लेख येतात.[१५] अन्य ताम्रपटातूनही कपिलग्राम, 'बंडवाडग्राम' यासारखे स्वतंत्र ग्रामनामाचे उल्लेख आहेत.

**ग्रामीण प्रशासन :** ग्राम गाव यांची स्वतंत्र अशी प्रशासन व्यवस्था होती. कलचुरींच्यावेळी 'ग्रामिक' किंवा 'ग्रामभोगीत' असा शब्द आला आहे. ग्रामप्रमुखाला पट्टकिल किंवा पाटील म्हणत. पुणे जिल्ह्यातील मंचर येथील यादवकालीन एका वापी लेखात मणिचर येथील ग्रामप्रमुखाला पट्टेलवर्य असे म्हटले आहे.[१६] महाराष्ट्राच्या वसाहतीबाबत वि. का. राजवाडे म्हणतात, "शकपूर्व १०० पासून शकोत्तर पंधराशेपर्यंतच्या सोळाशे वर्षात महाराष्ट्रिकांचा मुख्य हेतू स्वधर्मरक्षणार्थ नवीन वसाहती करणे हा होता. नवीन वसाहत करून तेथे पाचपंचवीस गावे वसवावी व तेथील पट्टकीलपणा आणि देशमुखपणा स्वयमेव स्वीकारून आनंदाने कालक्रमण करावी असा महाराष्ट्रिकांचा व्यवसाय होता. महाराष्ट्रिकांनी वसाहती वसविण्याचे काम मात्र नमुनेदार केले.[१७] ही बाब पाहता ग्रामवसाहती इतकेच पाटीलपद किंवा ग्रामप्रमुखपद जुने असावे हे स्पष्ट होते." इसवी सनाच्या ९ ते १३ व्या शतकात व विशेषकरून यादव काळामध्ये या प्रवृत्तींचा विकास होऊन धडाडी असणाऱ्या ग्रामप्रमुखांमधूनच पुढे लहानमोठ्या सामंतांचा व माडलिकांचा उदय झाला. पुढे हा क्रम वतनदार व जहागिरदारच्या स्वरूपात शिवकालापर्यंत रूढ असल्याचे दिसते. ग्रामातील वसाहतीचे प्रश्न सोडविण्यासाठी गावातील ज्येष्ट 'महत्तरा'ची पंचायत असे. ग्रामपंचायत आणि गावाची प्रतिष्ठा वाढविणारी एक मोटी वेस व गावासभोवतालचा कोट ही तत्कालीन वसाहतीची वैशिष्ट्ये. मट-मंदिरातून किंवा झाडाच्या पारावर बसून ही पंचमंडळी स्थानिक प्रश्न सोडवित. प्रत्यक्ष राजाचा येथील दैनंदिन जीवनाशी फारसा संपर्क नव्हता. ग्रामकूट किंवा ग्रामप्रमुख हा सर्वार्थाने त्या वसाहतीचा स्वामी असे. तसेच तो गावाची काळजी वाहत असे. स्वतः गावातील महसूल वसूल करणे, शासनाकडे त्याचा भरणा करणे

तसेच वरिष्ठ प्रशासकीय अधिकारी आले असता त्यांची व्यवस्था करणे इत्यादि कामे ग्रामप्रमुखामार्फत होत. अशा प्रकारच्या कामांसाठी यादवांच्या लेखात "राजसेवकांना वसतिप्रमाणदण्डौ" अशी नोंद आहे.[९८] गावातील मालमत्तेचा तपशील कुलकर्णी ठेवत असे. यादवकाळात हे पद असल्याचे स्पष्ट दिसते. मार्डी येथील लेखात याविषयी नोंद मिळते.[९९] राष्ट्रकूट काळात रूढ झालेली पद्धत यादव काळात स्थिर झाली होती व यातून ग्रामीण प्रशासनाला एक स्वयंपूर्णता प्राप्त झाली. असे असले तरी अग्रहार व राजांनी दिलेल्या विशेष दानाविषयीची स्वतंत्र अशी व्यवस्था असे.

**शासन :** राजा हा सर्वश्रेष्ठ असून त्यामध्ये ईश्वरी अंश आहे. किंबहुना इंद्र, वायू, यम, सूर्य, अग्नि, वरुण, चंद्र आणि कुबेर यांच्या अंशापासून परमेश्वराने राजाची निर्मिती केली. तो श्रेष्ठ व शक्तिमान आहे, ही "मनुस्मृती" ची संकल्पना यावेळपर्यंत दृढ असली तरी या श्रेष्ठ सम्राटाला आपल्या मांडलिक व सामंतावर लक्ष ठेवावे लागत असे. राज्यकारभार पाहण्यासाठी मंत्रिमंडळ असून मंत्र्यांच्या सहाय्याने तो काम पाही. ९ व्या ते १३ व्या शतकातील राजे आपल्या अभिरुचीप्रमाणे विविध प्रकारच्या उपाध्या धारण करीत. अर्थात या उपाध्या (बिरुदे) मधून त्यांचा पराक्रम आणि कर्तृत्व यांचे दर्शन होत असे. देवगिरीच्या यादवांनी "पृथ्वीवल्लभ" आणि "श्रीवल्लभ" हे मान्यखेटकाच्या राष्ट्रकुटांचे बिरुद स्वतः धारण केले असे दिसते. सिंघण यादवाने "पृथ्वीवल्लभ" ही पदवी धारण केली. देवगिरी यादवांचा अच्युतनायक हा सामंत स्वतः मांडलिक पितामह म्हणवून घेतो. सेऊनचंद्र तिसरा हा यादवराजा सामंत पितामह आणि सामंत जमरात ही पदवी धारण करतो. कृष्णदेव यादव याने कान्हेगाव लेखात 'अरिरायउरशल्य' किंवा 'अरिरायउरसेल्ल' हे बिरुद धारण केले (याचा अर्थ शत्रुराजाच्या उरातील शल्य असा होईल). भिल्लमयादव याने 'सेल्लविदेग' (सेल्ल भाला) असे म्हणून घेतले. यासारख्या पदव्या धारण केल्याची नोंद मिळते.[१००] यापेक्षा मोठी पदवी पण स्वतःच्या नावामागे लावत. चक्रवर्ती, प्रौढप्रतापचक्रवर्ति, समस्तचक्रवर्ति, महाराजाधिराज, महामंडलेश्वराधिपति इत्यादि विशेषणे लावीत. रामचंद्र यादवाने पंढरपूर येथील शिलालेखात मात्र "पांडरीफडमुख्य" हे धार्मिक प्रवृत्तीदर्शक बिरुद धारण केले होते.[१०१] यादवांचे मांडलिकही पदव्या धारण करीत. राजाला मदत करण्यासाठी अमात्य, महाअमात्य, प्रधान, महाप्रधान, मंत्री मदतीस असत. यादवकाळात 'दण्डनायक', 'भांडारिक', 'चोरोद्धरणिक' अशी पदेही रूढ होती. यानंतर देशमुख तसेच ग्रामकुट हे प्रत्यक्षाप्रत्यक्ष शासनास मदत करीत. सम्राटाप्रमाणे मांडलिकाचे स्वतंत्र असे मंत्रिमंडळ असे. महासंधिविग्रहक याचे महत्त्व पूर्वीप्रमाणे काही काळात कायम होते. श्रीकरणाधिप (chief of the record office) व साहणि (सल्लागार councellor), न्यायाधीश असे अधिकारी असत. हेमाद्रि हा प्रसिद्ध श्रीकरणाधिप होता. आंबे येथील लेखातील नोंदीप्रमाणे दावरस हा सिंघणाचा 'पट्टसाहणी' होता. उनकदेव लेखात भावकदेव हा 'हाथिसाहणि' असल्याची नोंद मिळते. नरेंद्राच्या "रुक्मिणी स्वयंवर" मध्ये 'साहणि' हा शब्द सेनापती या अर्थाने येतो.[१०२] याशिवाय 'दंडनायक' याचीही नोंद मिळते. गुण आणि कर्तबगारी पाहून मंत्र्यांची नेमणूक केली जाई. राजांना

स्वतःच्या मंत्र्याविषयी आदर असे. सिंघण यादव हा आपला दण्डनायक लक्ष्मीदेव याला स्वतःचा 'दक्षिणभुजादंड' समजत असे,[१०३] तर कृष्णदेव यादव आपला महाप्रधान याविषयी आदर व्यक्त करताना दिसतो. या पदाशिवाय 'निरोपिता' म्हणजे मुतालिक किंवा उप अधिकारी, देसेनायक म्हणजे देसाई-नायक असावा. तसेच मठगाव, वेळूस, आगास, पंढरपूर येथील लेखात 'गोसावी', 'जुजीपती' (युद्धपति ?), 'मुष्यग्रळा पुरुष' म्हणजे प्रमुख पुरुष तसेच 'वेव्हारिआ' (व्यवहारक) अशा काही अधिकाऱ्याविषयीच्या नोंदी उपलब्ध होतात.

एकूण सातवाहन काळापासून यादव काळपर्यंत असलेले शासन व प्रशासन, काळानुसार होणारे लहान-मोठे बदल विचारात घेऊनसुद्धा प्रामुख्याने 'राजा' या केंद्राभोवती फिरणारे व त्याच्या कर्तृत्वानुसार प्रसंगी थोडेफार परिवर्तीत होणारे दिसते. 'राष्ट्र', 'विषय', 'पथ', 'भोग', 'भुक्ति', 'आहार', 'देश', 'मंडल', 'कंपण', 'गंपण', 'नाड', 'खंड', 'वेलित' यासारख्या प्रशासकीय विभागांची निर्मिती होऊन काळानुसार त्याच्या सीमारेषा कमी अधिक होत गेल्याचे दिसते. काही प्रशासकीय विभाग पूर्णतः लोप पावले असले तरी बहुसंख्य प्रशासकीय विभागांना कमी अधिक प्रमाणात सातत्य लाभल्याचे दिसते. असे असून सुद्धा महाराष्ट्रातील सर्वात मोठा घटक जो ग्रामीण भागात वसलेला होता तो स्थिर जीवन जगणारा असून त्यांच्या मूलभूत संकल्पनेत फारसे परिवर्तन झालेले नाही. तसेच राजे हे स्मृतिग्रंथ व शास्त्रनिर्देश पाळत. यातून 'अग्रहार' या संकल्पनेस सातत्य लाभल्याचे दिसते. विविध धर्मांना दाने मिळत होती व पूर्त कर्माच्या हेतूने लोकहितार्थ कामे करण्याकडे शासकांचा कल राहिल्याचे स्पष्ट होते.

————

## तळटिपा

१ **अमेरिकन अँटीक्वेरी,** खंड ४२, १९७७, पृ. ४२१-४८.

२ ढवळीकर, म. के., ''प्रागैतिहासिक महाराष्ट्र'', **त्रैमासिक,** भा. इ. सं. मं., पुणे, अंक ६२, पृ. २८-२९.

३ आळतेकर, ए. एस., **स्टेट अँड गव्हर्नमेंट इन एन्शंट इंडिया,** तिसरी आवृत्ती, दिल्ली, १९७७.

४ मिराशी, वा. वि. **सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास आणि कोरीव लेख,** मुंबई, १९७९, लेख क्र. ३, ओळ २.

५ कित्ता, लेख क्र. ६४, ओळ ३४.

६ जुनागड येथील रुद्रदामनाचा लेख, वर्ष ७२, ओळ १७; ल्युडर्स एच. (संपा.), **लिस्ट ऑफ ब्राह्मी इन्स्क्रिशन्स,** क्र. ९६५.

७ नाशिक लेण्यातील कृष्णाच्या काळातील लेख, ओळ २; **ल्युडर्स लिस्ट.** क्र. ११४४.

८ चुटुकुलानंद सातकर्णीचा मळवळी येथील स्तंभ लेख, संवत्सर १, ओळ १; **ल्युडर्स लिस्ट.** क्र. ११९५.

९ भट्टपालिकेचा नाशिक लेण्यातील लेख, ओळ २३; **ल्युडर्स लिस्ट.** क्र. ११४१.

१० शिवमकसद याचा अमरावती येथील खंडीत लेख, ओळ १; **ल्युडर्स लिस्ट.** क्र. १२७९.

११ हरितीपुत्र चुटुकुलानंद सातकर्णीचा वनवाशीचा लेख, संवत्सर १२, ओळ ३; **एपिग्राफिया इंडिका,** दिल्ली, खंड ३४, पृ. २३८ ; मिराशी वा. वि., पूर्वोक्त. लेख क्र. ३७, ओळ. २.

१२ सातकर्णीच्या काळातील सांची स्तूपाच्या दक्षिण तोरणावरील लेख, ओळ २; **ल्युडर्स लिस्ट.** क्र. ३४६.

१३ जोगळेकर, स. अ. (संपा.), **गाथासप्तशती,** पुणे, १९५६, प्रस्तावना, पृ. १३२.

१४ कित्ता, गाथा क्र. ७०४.

१५ कित्ता, गाथा क्र. ७०५.

१६ ऋषभदत्ताचा नाशिक लेण्यातील लेख, ओळ ४; **ल्युडर्स लिस्ट.** क्र. ११३३.

१७ **ल्युडर्स लिस्ट,** क्र. ११२५; **इ. आय,** खंड ८, पृ. ७१, ओळ क्र. ४.

१८ **इ. आय.** (१९१९-२०), खंड १५, पृ. ३२-४४ ; मिराशी, वा. वि., **वाकाटक नृपति आणि त्यांचा काळ,** नागपूर, १९५७; प्रभावती गुप्ताचा पुणे ताम्रपट, ओळ १० व १७.

१९ महाजन, मालती, **कल्चरल हिस्टरी ऑफ महाराष्ट्र ॲण्ड गोवा,** १९८९. नागपूर, पृ. ९७ ; महाजन, मालती, "ॲडमिनिस्ट्रेटिव्ह डिव्हीजन ऑफ द वाकाटका," **द एज ऑफ द वाकाटका,** (संपा. अजय मित्र शास्त्री), नागपूर १९९२, पृ. ८४.

२० मिराशी, वा. वि., प्रवरसेनाचा बेल्लोरा ताम्रपट, **वा. नृ. का.** ओळ १४, पृ. २११; **इ. आय.,** दिल्ली, १९३७-३८, पृ. २४, २६४.

२१ द्वितीय प्रवरसेनाचा तिरोडी ताम्रपट, मिराशी, कित्ता, पृ. २६५, ओळ ३२.

२२ मिराशी, पूर्वोक्त ओळ २०, द्वितीय प्रवरसेनाचा जाम ताम्रपट; **इ. आय.,** दिल्ली, १९४१-४२, खंड २६, पृ. १५५-६१.

२३ कित्ता.

२४ पणशीकर, वा. ल. **याज्ञवल्क्यस्मृती (मिताक्षरासह),** मुंबई १९२६, अ. २, श्लोक ३१९-२०.

२५ अजिंठा लेणे क्र. १६ मधील वराहदेवाचा लेख, ओळ १५, मिराशी, वा. वि., **कॉर्पस् इन्स्क्रिप्शनम् इंडिकेरम,** उटकमंड, १९६३, खंड ५, पृ. १०१-११, मिराशी, वा. वि., **वा. नृ. का.,** लेख २४, पृ. ३४५.

२६ मिराशी, वा. वि., पूर्वोक्त, अजिंठा लेख क्र. २४, ओ. १२, पृ. ३५३.

२७ मिराशी, वा. वि., **वा. नृ. का.,** पृ. ७९.

२८ दीक्षित, डी. पी., **पॉलिटिकल हिस्टरी ऑफ चालुक्य ऑफ बदामी,** नवी दिल्ली, १९८०. पृ. १.

२९ महाजन, मालती, पूर्वोक्त, पृ. ९५ व १०५.

३० वत्स, मा. स्व., **इ. आय.,** दिल्ली, १९३९-४०, खंड २५, पृ. २८९-९२.

३१ दीक्षित, का. ना., **त्रैमासिक,** भा. इ. सं. मं., पुणे, वर्ष १, भाग २, पृ. १ ते ६.

३२ कित्ता; फ्लिट (संपा.) चालुक्य नृपति सत्याश्रय पुलकेशिचा ताम्रपट, **इ. आय.,** १९१४-९५, खंड ३, पृ. ५०-५३.

३३ दीक्षित, डी. पी., पूर्वोक्त.

३४ आळतेकर, ए. एस., **राष्ट्रकूट ॲण्ड देअर टाईम्स**, पुणे, १९३४, पृ. १३६.

३५ कोलते, वि. भि., "राष्ट्रकूट नृपति तिसरा गोविंद याचा नेसरी ताम्रपट", विदर्भ संशोधन मंडळ, **वार्षिक अंक**, नागपूर १९५९ श्लोक ७२.

३६ आळतेकर, ए. एस., पूर्वोक्त. पृ. १३५-३६.

३७ कोलते, वि. भि. (संपा.), गोविंद तृतीय याचा झरिका ताम्रपट, विदर्भ संशोधन मंडळ, **वार्षिक अंक**, नागपूर, १९५८, पृ. ११४.

३८ आळतेकर, ए. एस., पूर्वोक्त, पृ. १८८.

३९ भांडारकर, आर. जी., **अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन डाऊन टू मोहम्मद कॉनक्वेस्ट.** कलकत्ता, १९२८, खंड १, पृ. २३८-३९.

४० अय्यंगार, एस. कृष्णस्वामी., **एन्शंट इंडिया**, मद्रास, १९११, पृ. ७८.

४१ वैद्य, चि. वि., **मध्ययुगीन भारत**, भाग २, पुणे, १९२३, पृ. ३३८-६९.

४२ आळतेकर, ए. एस., पूर्वोक्त, १९३४, पृ. १४१-४२.

४३ कित्ता, पृ. १३९-४९.

४४ काणे, पी. व्ही., **जे. बी. बी. आर. ए. एस.**, मुंबई, १९१२, अंक २४, पृ. ६३

४५ अमोघवर्ष प्रथमचा जवखेडा ताम्रपट, विदर्भ संशोधन मंडळ, वार्षिक अंक, नागपूर, १९६०, पृ. ५१.

४६ गोविंद तिसरा याचा झरिका ताम्रपट, पूर्वोक्त. श्लोक ७२.

४७ गोविंदराज तृतीय याचा झरिका ताम्रपट, पूर्वोक्त, वि. सं. मं.. वार्षिक अंक श्लोक ७२.

४८ राष्ट्रकूट राजा गोविंद तृतीय याचा नेसरी ताम्रपट, पूर्वोक्त, श्लोक ७३-७५.

४९ कोलते, वि. भि. (संपा.), **महाराष्ट्रातील काही ताम्रपट व शिलालेख,** मुंबई, १९८७, पृ. २०६.

५० गोविंद चौथा याचा अंदुरा ताम्रपट, वि. सं. मं., वार्षिक अंक, १९६२, श्लोक ४८, पृ. १६.

५१ आळतेकर, अ. स., पूर्वोक्त, पृ. १६६.

संधिविग्रहाकारी तु भवेद्यस्तस्य लेखक :

स्वयं राज्ञा समादिष्टटस्य लेखेद्राजशासनम् ॥

अशी या संदर्भात नोंद येते. **याज्ञवल्क्यस्मृति** श्लोक १, पृ. ३१९-२०.

५२ राष्ट्रकूट राजा गोविंद तृतीय याचा नेसरी ताम्रपट. पूर्वोक्त, श्लोक ७३-७४.

५३ आळतेकर, पूर्वोक्त, पृ. २४६.

५४ आळतेकर, पूर्वोक्त, पृ. २१२ व आळतेकर, ए. एस., **स्टेट अ‍ॅण्ड गव्हर्नमेंट इन एन्शंट इंडिया**, १९४९, पृ. ३५६-६४ वरील नोंद.

५५ कोलते, वि. भि., ''धर्मापुरी शिलालेख'', भारतीय इतिहास आणि संस्कृति, **त्रैमासिक**, मुंबई. वर्ष ९, पृ. ३३.

५६ **गॅझेटिअर ऑफ दि बॉम्बे प्रेसिडेन्सी** ''एन्शंट पिरिअड'', खंड १, भाग २, पृ. ५७१.

५७ ''धर्मापुरी शिलालेख'', पूर्वोक्त, श्लोक २४, **अ‍ॅन्युअल रिपोर्ट ऑन इंडियन एपिग्राफी**, १९६१-६२, नं. ९३, पृ. ४६१.

५८ ''**एपिग्राफिया इंडिका**''. खंड २३, पृ. ३१६-२३.

५९ मिराशी, वा. वि., कित्ता, पृ. ६१.

६० मिराशी, वा. वि., **शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख**, नागपूर, १९७४, पृ. ६१.

६१ अपराजिताचा जंजिरा ताम्रपट क्र. १, शक संवत ९१५; मिराशी, वा. वि., **शि. रा. इ. को. ले.,** लेख क्र. ५, ओ. ४०, इंपोर्टंट इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम द बरोडा स्टेट, खंड १, पृ. ३५ व पुढे.

६२ मारसिंहाचा मिरज ताम्रपट, शक संवत ९८०; मिराशी, वा. वि., पूर्वोक्त, लेख क्र. ४३, ओळ ११; **जे. आर. ए. एस.** (जुनी मालिका), खंड ४, पृ. २८१ व पुढे.

६३ छद्‌देवाचा प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम ताम्रपट, आणि छित्तराजाचा भोईघर ताम्रपट, शक संवत ९४६; मिराशी, वा. वि., कित्ता, लेख क्र. ४, ओळ. ४४ आणि लेख क्र. ६१. पृ. ३४१ वर नोंद आहे.

६४ अपराजिताचा जंजिरा ताम्रपट (क्र.१), शक संवत ९१५; मिराशी, वा. वि., कित्ता, लेख क्र. ५ ओळ ६१, इंपोर्टंट इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम द बरोडा स्टेट, खंड १, पृ. ३५ व पुढे.

६५ विक्रमादित्याचा पन्हाळे ताम्रपट, शक संवत १०६१; मिराशी, वा. वि., पूर्वोक्त, लेख क्र. २३. ओळ ७१.

६६ मिराशी, वा. वि., कित्ता, पृ. ६२.

६७ कित्ता, पृ. ६३.

६८ याजदाणी, जी. (संपा.), **अर्ली हिस्टरी ऑफ डेक्कन,** १९६०, खंड १, पृ. ५६.

६९ मिराशी, वा. वि., पूर्वोक्त, पृ. ७०.

७० गंडरादित्याचा कोल्हापूर ताम्रपट, शक संवत १०३७; मिराशी, वा. वि., पूर्वोक्त, लेख क्र. ४६, ओळ ४८; **एपिग्राफिया इंडिका,** खंड २७, पृ. १८०-८१.

७१ विजयादित्याचा बामणी शिलालेख, शक संवत १०७३; मिराशी, वा. वि., पूर्वोक्त, लेख क्र. ५४, ओळ १६-१७; **एपिग्राफिया इंडिका,** खंड २४, पृ. १४-१५.

७२ नागार्जूनाचा ठाणे ताम्रपट, शक संवत ९६१; मिराशी, वा. वि., कित्ता, लेख क्र. १३, ओळ ८७; **एपिग्राफिया इंडिका,** खंड ३७, पृ. २५०-५१.

७३ सोमेश्वराचा रानवड ताम्रपट, शक संवत ११८१; तुळपुळे, शं गो., **प्राचीन मराठी कोरीव लेख,** पृ. १५६, प्रतिमा क्र. ३४, ओ. ४.

७४ रट्टराजाचा बलिपत्तन ताम्रपट, शक संवत ९३२; मिराशी, वा. वि., पूर्वोक्त, लेख क्र. ४२, ओ. ५१-५२.

७५ **इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टरली,** खंड ४, पृ. २०३ व पुढे. कित्ता, ओळ क्र. ४७, महाजन : असा शब्द आला आहे.

७६ **गॅझेटिअर ऑफ दि बॉम्बे प्रेसिडेन्सी,** ठाणे डिस्ट्रिक्ट. व्हॉ. XIII, भाग II, पृ. ५५२ वरील टीप क्र. ८.

७७ रट्टराजाचा बलिपत्तन ताम्रपट, शक संवत ९३२; मिराशी, वा. वि., पूर्वोक्त, लेख क्र. ४२, ओ. ३५., **इंडियन हिस्टॉरिकल क्वार्टरली,** खंड ४, पृ. २१४-१५.

७८ मुम्मुणिराजाचा दिवे आगार ताम्रपट, शक संवत ९७५; मिराशी, वा. वि., पूर्वोक्त, लेख क्र. १६, ओळ ३ ते ६.

७९ मिराशी, वा. वि., कित्ता, पृ. ६९.

८० कित्ता, पृ. ६६.

८१ कित्ता, पृ. ७६.

८२ मुळे, सुमती, **स्टडिज इन द हिस्टॉरिकल ॲण्ड कल्चरल जिऑग्राफी ॲण्ड इथनोग्राफी ऑफ दि डेक्कन,** पुणे, १९५४, पृ. ९६.

८३ देशपांडे, य. खु. (संपा.), **श्रीचक्रपाणी चरित्र,** यवतमाळ, १९३६, पृ. ३८.

८४ किलहाल, **इ. आय.,** १८९४, ९५, खंड ३, पृ. १०३-१०.

८५ कोलते, वि. भि. (संपा.), **लीळाचरित्र,** पूर्वार्ध, लीळा, ५७४, पृ. ३२३.

८६ पानसे, मु. ग., **यादवकालीन महाराष्ट्र,** पुणे, १९६३, पृ. ५१.

८७ पानसे, मु. ग., **यादवकालीन महाराष्ट्र,** पुणे, १९६३, पृ. ५१.

८८ दीक्षित, मो. ग. (संपा.), **महाराष्ट्रातील काही प्राचीन ताम्रपट व शिलालेख,** पुणे, १९४७, पृ. ९९.

८९ तुळपुळे, शं. गो. (संपा.), **प्राचीन मराठी कोरीव लेख,** पुणे, १९६३, लेख क्र. २३, ओ. ३६, पृ. १२२.

९० कित्ता, लेख क्र. ३१, ओळ २९, पृ. १५५.

९१ कित्ता, लेख क्र. ३४, ओळ ७-९, पृ. १७२.

९२ कित्ता, लेख क्र. ४५, ओळ ८, लेख क्र. ४७, ओ. ५, लेख क्र. ५०, ओ. ४.

९३ कित्ता, लेख क्र. ५२, ओळ ३, पृ. २६९.

९४ कित्ता, तुळपुळे, लेख क्र. ४०, ओळ १४, पृ. २१५.

९५ दीक्षित, मो. ग, पूर्वोक्त, पृ. ९० ते ९४.

९६ पाठक, अ. शं. **महाराष्ट्रातील बारव स्थापत्य,** मराठवाडा संशोधन मंडळ लातूर, २००१, परिशिष्ट–ओळ १३.

९७ राजवाडे, वि. का., **राधामाधवविलासचंपू,** प्रस्तावना, पुणे, शके १८४४, पृ. १८१.

९८ **आय. ए.,** खंड १४, पृ. ३१९.

९९ खरे, ग. ह. **दक्षिणेच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने,** भाग १, पुणे, १९३०, पृ. ५१.

१०० देशपांडे, ब्रह्मानंद, **शोधमुद्रा,** औरंगाबाद, १९७६, पृ. १७८-७९.

१०१ पूर्वोक्त, तुळपुळे, लेख ३४, ओळ १, पृ. १७७.

१०२ कोलते, वि. भि. (संपा.), **नरेंद्रकृत रुक्मिणी स्वयंवर,** क्र. ७३४.

१०३ **एपिग्राफीया इंडिका,** खंड १९, पृ. ३५-४८.

---

## प्रकरण १४

# प्रारंभिक ऐतिहासिक काळ ते वाकाटक काळ*

## साहित्यातील प्रारंभिक उल्लेख

**पू**र्वी दक्षिणापथ म्हणून ओळखल्या जाणाऱ्या दख्खनचा बराच मोठा भाग उत्तर भारतीयांना पूर्वीपासून माहीत होता याविषयी सबळ पुरावा उपलब्ध आहे. विदर्भ हा प्रदेश भौगोलिकदृष्ट्या सर्वांत जवळचा असल्यामुळे स्वाभाविकच त्याचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष[१] उल्लेख प्राचीन साहित्यात आढळतो.'ऐतरेय ब्राह्मण' (७.३४ असे सांगते की, पर्वत आणि नारद या ऋषीकडून विदर्भाचा राजा भीम वैदर्भ याला त्याच्या इतर समकालीन राज्यप्रमुखांप्रमाणेच उपदेश प्राप्त झाला होता. 'जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण' (२.४४०) वरून समजते की, वाघांना ठार करणाऱ्या माचल नामक शिकारी कुत्र्यांच्या जातीसाठी विदर्भ प्रसिद्ध होता. आश्वलायनाचा समकालीन असलेला विदर्भाचा भार्गव नामक ऋषी प्रश्नोपनिषदाला (१.१, २.१) ज्ञात होता. विदर्भाचा ऋषी कौंडिण्य याचा उल्लेख 'बृहदारण्यक उपनिषदात' आढळतो. कौंडिण्य या नावाची व्युत्पत्ती कुण्डिना नगरीच्या नावापासून झालेली असून पुराणांनुसार कुण्डिना ही विदर्भाची राजधानी होती. महाराष्ट्राच्या अमरावती जिल्ह्यातील हे कौंडिण्यपूर होय. तेथे झालेल्या उत्खननात प्राचीन कालीन समृद्ध लोकवस्तीचे अनेक पुरावे मिळाले आहेत.[२] भोज हा सात्वत राजांचा किताब होता. 'ऐतरेय ब्राह्मणाच्या' (८.१४) काळापर्यंत हे राजे उत्तरेकडील आपल्या मूळ स्थानापासून निघून विदर्भात स्थलांतरित झाले होते. भोज आणि सात्वत दोघेही यदु वंशाचे होते व विदर्भात वास्तव्य करून होते[३] हे पुराणांवरून समजते. अशोकच्या कोरीव लेखात एक लोकसमूह म्हणून भोजाचा उल्लेख पैतनिक म्हणवणाऱ्या प्रतिष्ठानाच्या लोकांसमवेत येतो.[४] जोडूनच असलेला एक निषध नावाचा प्रदेश शतपथ ब्राह्मणामध्ये (३.२.१,२) नोंदविला आहे. त्यात निषधाचा राजा नड (नल) असा निर्देश केला आहे.

मराठवाड्याचाही अप्रत्यक्ष उल्लेख प्राचीन परंपरांमधून आढळतो. पाणिनीला अश्मक माहिती होते. त्याच्या निश्चित ठावठिकाणाबद्दल मात्र माहिती मिळत नाही.[५] 'सुत्तनिपात' या प्रारंभिक बौद्ध ग्रंथाच्या पारायणवग्गातून या मुद्यावर थोडा प्रकाश पडतो. गोदावरी नदीच्या दक्षिणेस अस्सक नामक हा भाग आहे. त्याच्या उत्तरेस अलक किंवा मूलक राज्य होते. त्याची राजधानी पतिट्ठान (संस्कृत प्रतिष्ठान, आधुनिक पैठण, जिल्हा औरंगाबाद, महाराष्ट्र) येथे होती. या दोन्ही राज्यांचा निर्देश अंधक किंवा अंध्रक असा करण्यात आला. सकृतदर्शनी हा संदर्भ महाराष्ट्रातील मराठावाडा आणि आंध्रप्रदेशातील तेलंगण या प्रदेशांचा वाटतो. अशाप्रकारे महाराष्ट्राच्या बऱ्याच मोठ्या भूभागाचे उल्लेख प्राचीन भारतीय वाङ्मयातून मिळतात. हे सर्वच उल्लेख केवळ अनुषंगिक स्वरुपाचे आहेत.[६]

---

*या प्रकरणाचे मूळ इंग्रजी लेखन डॉ. अजयमित्र 'शास्त्री (निवृत्त इतिहास विभाग प्रमुख व जेष्ठ नाणे संशोधक, नागपूर विद्यापीठ, नागपूर) यांनी केले असून त्याचा मराठी भाषेतील अनुवाद डॉ. भा. ल. भोळे (राज्यशास्त्र विभाग प्रमुख, नागपूर विद्यापीठ, नागपूर) यांनी केला आहे.

## संदर्भ साधने

संस्कृत, प्राकृत किंवा पाली भाषेतील कोणताच प्राचीन ग्रंथ महाराष्ट्रात रचला गेल्याचे दिसत नाही. आपस्तंबकल्पसूत्राचा एक भाग असलेला 'आपस्तंबधर्मसूत्र' हा सूत्र प्रवर्गातील एकमात्र ग्रंथ आहे की, ज्याचा या प्रदेशाशी थोडाफार संबंध असावा. तो जवळच्या प्रदेशात रचला गेला आहे.[७] चरणव्यूहाच्या एका कडव्यावरून असे लक्षात येते की, कृष्ण-यजुर्वेदाच्या तैत्तिरीय-संहितेच्या खांडिकीय परंपरेतील हे सूत्र असल्यामुळे या ग्रंथाला दक्षिण भारतात गोदावरीपासून समुद्रापर्यंत आणि आग्नेयेत, विशेषतः आंध्र प्रदेशात बरेच महत्त्व प्राप्त झाले असावे.[८] आपस्तंबशाखेच्या ब्राह्मणांचा उल्लेख जसा या प्रदेशातील अनेक भूदानपत्रांतून आढळतो, तसा तो उत्तर भारतातील अभिलेखात आढळत नाही. आपस्तंवधर्मसूत्राच्या काळासंबंधी पां. वा. काणे यानी संपूर्ण पुराव्यासह निर्वाळा दिला आहे की, ख्रिस्तपूर्व ६००-३०० या दरम्यान कधीतरी त्याची रचना झालेली असावी.[९] जॉर्ज वूल्हेर[१०] आणि एम्. विंटरनिट्झ[११] यानीही यास दुजोरा दिला आहे. सातवाहन राजा हाल याने एक कोटी गाथामधून सातशे गाथा संकलित केलेली 'गाहासत्तसई' (गाथासप्तशती)[१२] इसवी सनाच्या प्रारंभिक शतकात रचली गेली असावी व नंतर त्यात काही गाथांची भर पडली असावी.[१३] विद्यमान स्वरुपात हा ग्रंथ इसवी सनांच्या पाचव्या-सहाव्या शतकात तयार झालेला दिसतो. वत्सगुल्म शाखेचा सर्वसेन[१४] आणि नंदिवर्धन शाखेचा युवराज दिवाकरसेन व प्रवरसेन (द्वितीय) यांच्यासह काही वाकाटक राजे हे प्रख्यात कवी होते. त्यांनी महाराष्ट्री प्राकृतात अनेक काव्यरचना केल्या आहेत.[१५] सर्वसेनाचे काव्य 'हरिविजय' जरी आज उपलब्ध नसले आणि नंतरच संदर्भावरूनच ज्ञात असले[१६] तरी प्रवरसेनाचे सेतुबंध रावणवहो हे नंतरच्या टीकाकारांनी गौरविलेले[१७] काव्य उपलब्ध आहे, पण समकालीन जीवनाच्या विविध अंगांवर उत्तम प्रकाश टाकणाऱ्या आधीच्या दोन ग्रंथांच्या तुलनेत ही काव्ये ऐतिहासिकदृष्ट्या फारशी महत्त्वाची नाहीत. वात्स्यायनाचे 'कामसूत्र', शुद्रकाचे 'मृच्छकटिक', बौद्ध ग्रंथ 'महावंश' आणि इतरही काही साहित्यकृती जरी महाराष्ट्रात रचल्या गेल्या नसल्या तरी प्रतिपाद्य कालखंडातील या प्रदेशाच्या सांस्कृतिक इतिहासाच्या विविध पैलूंवर त्या प्रकाशझोत टाकतात. ग्रीक-रोमन प्रवाशांनी लिहिलेले वृत्तांत विशेषतः अनामिकाने लिहिलेला 'पेरिप्लस ऑफ दि एरिथ्रीयन् सी'[१८] यासारखे ग्रंथ तत्कालीन आर्थिक परिस्थितीवर प्रकाश टाकत असल्यामुळे महत्त्वाचे ठरतात. अर्थातच संख्येने थोड्या आणि काळाबाबत अनिश्चित असलेल्या एतद्देशीय साहित्यिक संसाधनापेक्षा पुरातत्त्वीय पुराव्यांतून अधिक विश्वासनीय तथ्य हाती लागू शकते. दगडांवरचे लहान-मोठे तसेच धातूंच्या वस्तुंवरचे कोरीव लेख सामाजिक, आर्थिक व धार्मिक परिस्थितीबाबत महत्त्वपूर्ण माहिती पुरवितात. ती इतर साधनांमधून बहुधा उपलब्ध नसते. अस्तित्वात असलेली अनेक स्मारके, त्यावरील शिल्पे व चित्रकृती तत्कालीन सामाजिक धार्मिक जीवनाचा दृक्प्रत्यय देतात. विशेषतः केशभूषा, वेशभूषा, दागदागिने, प्रसाधनगृहे भांडीकुंडी, घरेदारे, सामानसुमान इत्यादि बहिर्गत तपशील

त्यातून दिसतात. साहित्यात वर्णिलेल्या बाबी येथे प्रत्यक्ष पाहता येतात. ब्रह्मपुरी (कोल्हापूर), नाशिक, नेवासा, भोकरदन, पौनी, पवनार, मांढळ, अडम, आरणी, आरम्भा, मनसर, वाशिम इत्यादि महत्त्वाच्या ठिकाणी झालेल्या पुरातत्त्वीय शोधमोहिमा आणि उत्खनने यातून समकालीन समाजाच्या विविध स्तरांच्या एकूण जीवनमानाच्या आकृतिबंधासंबंधीची माहिती स्पष्ट झाली आहे. अनेक ठिकाणी अल्प किंवा विपुल प्रमाणात सापडलेल्या नाण्यांवरून तत्कालीन आर्थिक परिस्थितीची, वित्तीय व्यवहारांची व चलनपद्धतीची बरीच माहिती मिळते.

**कालखंड** : आजच्या महाराष्ट्राचा बराच मोठा भाग ब्राह्मण ग्रंथांच्या रचनेच्या काळापासून म्हणजे जवळपास ख्रिस्तपूर्व दुसऱ्या सहस्त्रावधीच्या प्रारंभिक काळापासून प्रकाशात होता. वैदिक धर्म व उपासनापध्दतींचे त्यावेळेपर्यंत ते केंद्र झाले होते. तरीपण तेथील सामाजिक, आर्थिक आणि धार्मिक जीवनाविषयी तुलनने अधिक माहिती मिळू लागते ती ख्रिस्तपूर्व सुमारे सहाव्या शतकापासून पुढे. अशाप्रकारे पूर्वकालीन वाङ्मयीन संदर्भ उपलब्ध असूनही प्रस्तुत प्रकरणचा कालखंड बराचसा ख्रिस्तपूर्व सहाव्या शतकातील महाजनपदांच्या युगापासून ते इसवी सनाच्या सहाव्या शतकापर्यंत अशा बारा शतकांना व्यापणारा आहे.

## समाज

**सामाजिक संघटन** : भारताच्या सामाजिक संरचनेच्या उभारणीचा पारंपरिक पाया मुळात आदर्श श्रमविभागणी व सामाजिक कार्ये या स्वरूपात अस्तित्वात आलेली चातुर्वर्ण्यव्यवस्था हा होता आणि वर्ण हे स्वाभाविकच सामाजिक प्रतिष्ठेच्यादृष्टीने उतरंडवजा होते. पूर्वोक्त वैदिक आणि बौद्ध साहित्यकृतींत असलेल्या प्रासंगिक उल्लेखांवरून आपणास असे दिसते की, वर्णव्यवस्था दख्खन भागात बऱ्याच आधीपासून दृढ झाली होती. बावरि ब्राह्मण आपल्या शिष्यांसह कोसलहून अस्सक (अश्मक) येथे आल्याची नोंद सुत्तनिपात या बौद्ध ग्रंथात मिळते. त्याने विदर्भ आणि मूलक हे प्रदेश तसेच कदाचित ऋषिकही पार केले असावे. चातुर्वर्ण्य व्यवस्था दख्खनच्या भागात प्रारंभिक ऐतिहासिक काळापासून सातवाहनांच्या काळापर्यंत अस्तित्वात असल्याची साक्ष आपस्तंबधर्मसूत्रावरूनही मिळते. सामाजिक परंपरा अस्तित्वात आल्यावर सामान्यतः काही शतके त्या टिकून रहातातच. फक्त बदलत्या कालमानानुसार काही किरकोळ फेरफार त्यात होत जातात.

एकंदरीत असे दिसते की, "ब्राह्मण" आपल्या नियत कर्मांचे पालन करीत होते. समाजाच्या धार्मिक आणि विद्याविषयक, परंपरेची जोपासना करीत होते. या विषयावर प्रारंभिक मौर्य व सातवाहन कोरीव लेखांतून फारच थोडा प्रकाश पडतो. वेदिश्रीच्या नाणेघाट कोरीव लेखावरून एवढाच बोध होतो की, सातवाहन राजा सातकर्णि आणि त्याची पत्नी नागनिका यांनी केलेल्या श्रौत यागात ब्राह्मणांचा सक्रिय सहभाग होता.

हे याग अत्यंत दीर्घकाळ चालणारे होते. लागणाऱ्या वस्तुंच्या किंमती, ऋत्विजा (पुरोहित) दक्षिणा आणि अन्य अतिथींच्या भेटवस्तू इत्यादिमुळे ते खर्चिक होते.[१९] ब्राह्मणांच्या अध्ययनाबाबत सातवाहन अभिलेखांतून काहीच माहिती मिळत नाही. त्यातील बहुतेक अभिलेख बौद्ध संघाना दिलेल्या देणग्यांची व दानधर्मांची नोंद घेण्याशीच संबंधित आहेत. वाकाटकांचे कोरीव लेख हे व्यावहारिक विधानांच्या स्वरुपाचे असले तरी दानग्राही ब्राह्मणांनी केलेल्या वैदिक अध्ययनासंबंधी ते अत्यंत मोलाची माहिती सांगतात. चार वेदांपैकी कुठलीही एक संहिता पूर्ण मुखोद्‌गत करणे हे जरी प्रत्येक ब्राह्मणाचे कर्तव्य असले तरी चार, तीन आणि दोन वेदांवर प्रभुत्व मिळविणाऱ्या ब्राह्मणांच्या नावांमागे अनुक्रमे चतुर्वेद,[२०] त्रिवेद,[२१] आणि द्विवेद[२२] अशा उपाधी लावलेल्या आढळतात.[२३] हीच पदनामे काही शतकानंतर कुटुंबांच्या आडनावांत रूपांतरित झाली. यजुर्वेदाचा, विशेषतः त्याच्या तैत्तिरीय शाखेचा संदर्भ वारंवार दिलेला आढळतो.[२४] त्यात काही संदर्भ वाजसनेय शाखेचेही आढळतात.[२५] ऋग्वेद,[२६] सामवेद[२७] आणि अथर्ववेद[२८] यात ब्राह्मणांशी संबंधित प्रत्येकी एक संदर्भ असून अनेक ब्राह्मण गोत्रांचाहि उल्लेख आहे. त्यावरून त्यांची अल्पसंख्या कळून येते. स्वतः वाकाटक राजे विष्णुवृध्द गोत्राचे होते. मुंडपुत्र[२९] आणि कुंभकर्ण[३०] यांच्या अभिलेखातून वर वर्णिलेल्या परिस्थितीचेच प्रतिबिंब दिसते. अनुदानांची उद्दिष्टे जरी नमूद नसली तरी त्यांच्यापैकी काही अनुदाने धर्मविषयक तसेच लौकिक शिक्षणाला प्रोत्साहन देण्याशी संबंधित असावीत असा तर्क आदात्याने प्रभुत्व मिळविलेल्या वेदांच्या निर्देशांवरून करता येतो. पहिल्या प्रवरसेनाने केलेल्या अनेक श्रौत यागातील ऋत्विज विद्वान ब्राह्मणच असावेत. कालकुट्ट नामक गण-याग (गण-याजिन) करणाऱ्या ब्रह्मचारी ऋत्विजाचे नाव मात्र पहिल्या प्रवरसेनाच्या जांब ताम्रपटावरून समजते.[३१] विष्णू वाचनाचे (विषुव संक्रांतीच्या प्रसंगीच्या मंत्रांचा)[३२] आणि श्राध्द विधींचे[३३] अनुष्ठाने केलेल्या आणखी दोन ब्राह्मणांची माहिती दुसऱ्या प्रवरसेनाच्या अभिलेखातून मिळते.

वाकाटक, मुंडपुत्र[३४] आणि कुंभकर्ण[३५] यांच्या ताम्रपटातील लेखात नोंदविलेल्या जवळपास सर्वच निधींचे आदाता (आदाता (donee) म्हणजे सच्छिल व श्रेष्ठ अशी विद्वान सत्पात्र व्यक्ति, जी याचक असत नाही) म्हणून विद्वान ब्राह्मणांचे उल्लेख आहेत. भारतीयीकरण झालेल्या प्रारंभिक कालीन परकीय राज्यकर्त्यांनाही ब्राह्मणांविषयी खूप आदर होता. क्षहरात महाक्षत्रप नहपान याचा जावई शक ऋषभदत्त ब्राह्मणांना सोळा खेडी दान दिल्याचे आणि आठ ब्राह्मण वधुंचे विवाह करून दिल्याचे[३६] तसेच वर्षभरात विविध ठिकाणी एक लक्ष ब्राह्मणांना भोजन दिल्याचे आणि प्रसंगोपात तीन लक्ष व पाच लक्ष गायी आणि सत्तर हजार कार्षपण नाणी दान दिल्याचे अभिमानपूर्वक सांगतो. ब्राह्मणांचा उल्लेख तो भगवंत असा करतो,[३७] पहिला कार्दमक महाक्षत्रप रुद्रदामन् प्रथम हासुध्दा त्याना बहुमान देतो आणि त्यांच्या हिताच्या काही धर्मार्थ गोष्टीही करतो.[३८]

भेटवस्तू आणि देणग्या यांचा स्वीकार करणे हे ब्राह्मणाचे एक विहित कर्तव्यच असले तरी काहीजण मात्र त्याला कमीपणाचे मानत आणि स्वतःला दानधर्म न स्वीकारणारे (अप्रतिग्राहक किंवा अप्रतिग्राहिन) असे गर्वाने म्हणवून घेत असत. दुसऱ्या प्रवरसेनाच्या सोळाव्या वर्षातील मांढळ ताम्रपटाचा[३९] आदाता मातृस्वामिन् याचा पिता असलेला अनामिक उपाध्याय हा यापैकीच होता. दुसरा महापुरुष नावाचा एक ब्राह्मण होता पण त्याने मात्र याच राजाच्या एकोणिसाव्या वर्षातील मासोद ताम्रपटाद्वारे दिल्या गेलेल्या जमिनीचे दोन खंड प्रत्यक्षात स्वीकारले होते.[४०] मुंडपुत्र या ब्राह्मण घराण्याच्या मुंड नामक तिसऱ्या वंशजाचे 'अप्रतिग्राहक' विशेषतः ज्यांचे हात दानग्रहणाने मलिन झालेले नव्हते अशांपैकी एक असे वर्णन आहे.[४१] ब्राह्मणांनासुद्धा आपल्या उच्च सामाजिक स्थानाची जाणीव होती आणि त्याचा त्यांना अभिमानही होता. गौतमीपुत्र सातकर्णीचे वर्णन त्याचा मुलगा वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या राजवटीच्या एकोणिसाव्या वर्षातील नाशिक येथील कोरीव लेखात गर्वाने असे केले आहे की, तो क्षत्रियांची मगरुरी व अहंभाव चिरडून टाकणारा (खतिय-दप-मान-मदण) "अनन्य ब्राह्मण" (एक बम्हण) आहे.[४२] "आगमांचे निवासस्थान" (आगमान निलय) अशीही त्याची प्रशंसा केली आहे.[४३]

जरी बहुतेक ब्राह्मण आपल्या विहित कर्तव्यांना चिकटून असले तरी त्यांच्यापैकी काही मात्र कर्तव्यपराङ्मुख होऊन अन्य वर्णाचे व्यवसाय करू लागले. त्यांना चाचणीच्या हेतूनेही शस्त्राला स्पर्श करण्यास आपस्तंबधर्मसूत्राने (१.१०.२९.६) मनाई केली आहे. मात्र पुढे परिस्थिती बरीच बदलली आणि मनूने (४.३४८) त्यांना केवळ तशी परवानगीच दिली नाही. तर प्रतिकूल परिस्थितीत शस्त्र धारण करण्याची आज्ञाही केली आहे. असे करण्यातून मनू फक्त तत्कालीन परिस्थितीचे प्रतिबिंबच पुढे ठेवतो.[४४] शुंग, काण्व किंवा काण्वायन, सातवाहन, वाकाटक, मुंडपुत्र, कदंब, पल्लव, गुप्त इत्यादी[४५] अनेक शक्तिशाली ब्राह्मण घराणी मौर्योत्तर काळात उदयास आली. त्यांनी राज्यसत्ता धारण केली, एवढेच नव्हे तर केवळ क्षत्रियांनीच करायचे असे अश्वमेधासारखे यज्ञही केले.[४६] प्राचीन परिभाषेत त्यांना ब्रह्म-क्षत्रिय म्हणता येईल. लष्करी जीवनक्रम स्वीकारण्याची त्यांची स्वतःची काही कारणे असतील. त्यापैकी एक म्हणजे राज्यसत्तेचा मोह आणि त्यासोबत येणारा डामडौल हे असून धर्मावरचे कथित गंडांतर हे केवळ दिखाऊ कारण असावे. कदंब राज्याचा संस्थापक मयूरशर्मन् याचे उदाहरण या संदर्भात बोलके आहे.

या आणि इतर घराण्यांच्या सत्तेतील अनेक वरिष्ठ लष्करी व प्रशासकीय पदे या वर्णाच्या लोकांनी पटकावली असावीत असे अनुमान सहज काढता येते.[४७] फक्त एकाच ठिकाणी 'ब्राह्मणांनी बळकावलेले' असे वर्णन एका मंत्रिकुलाचे केलेले दिसते. घटोत्कचाकडून आणि अजिंठा येथील वाकाटकांच्या वत्सगुल्म शाखेच्या शेवटच्या ज्ञात

सदस्याच्या म्हणजे हरिषेणाच्या राजवटीतील एका कोरीव लेखावरून एका वल्लूर (आताचे वेलूर, जिल्हा करीमनगर, आंध्रप्रदेश)[४८] निवासी ब्राह्मणाच्या कुटुंबात वंशपरंपरा चाललेल्या मंत्रिपदाची माहिती मिळते. त्या कुटुंबाने किमान दोन राजवटींच्या काळात म्हणजे देवसेन आणि त्याचा पुत्र हरिषेण यांच्या कारकिर्दीत अत्यंत महत्त्वाची भूमिका पार पाडली होती.[४९] काही ब्राह्मण व्यापार आणि शेतकी ह्या वैश्यांच्या क्षेत्रात शिरले. शुद्रकाच्या मृच्छकटिक नाटकाचा नायक चारुदत्त व्यापार हा आपला व्यवसाय बनविणाऱ्या ब्राह्मणांचा प्रतिनिधी ठरतो.[५०] ब्राह्मण हे अनेक राज्यकर्त्यांनी दिलेल्या ताम्रपटदानाचे लाभार्थी असल्याचे इसवी सनाच्या चौथ्या आणि त्यानंतरच्या शतकांत आढळते. तत्पूर्वी ही परंपरा कायम असावी. काही भूदानपत्रात नमूद केलेल्या आदात्यांच्या प्रशासकीय व बऱ्याचदा न्यायालयीन अधिकारांचा वापर केल्यामुळे ब्राह्मणांपैकी अनेकजण जमीनदार बनले. जमिनीची मालकी आणि विल्हेवाट करणाऱ्या ब्राह्मणाचे एकमात्र उदाहरण नोंदविलेले आढळते. शक ऋषभदत्त यांच्या नाशिक येथील कोरीव लेखात याबाबत नोंद मिळते ती अशी की, त्याने वाराहीपुत्र अश्विभूति नामक ब्राह्मणाकडून चांदीच्या चार हजार कार्षापण नाण्यांच्या बदल्यात जमीन विकत घेतली.[५१]

धर्मशास्त्र संहितांनी जरी शर्मन् किंवा देव या शब्दांने शेवट होणारी नावे ब्राह्मणाची असत असे म्हटले[५२] असले तरी अशा नावाची प्रत्यक्ष उदाहरणे फारशी दिसत नाहीत. काही आदाता ब्राह्मणांची नावे शर्मन् शब्दाने संपतात. पण हा आदेश मोडणाऱ्या नावाची संख्या पुष्कळच मोठी आहे. उदा. अश्विभूती हे नाव वैश्यांमध्ये चपखल बसणारे होते. कुंतलच्या कदंब राजघराण्याचा संस्थापक मयूरशर्मन् याचे एकमात्र उदाहरण सोडल्यास एकाही ब्राह्मण राजघराण्याच्या नावाच्या अखेरीस शर्मन् आढळत नाही. मयूरशर्मन् यानेही पुढे शर्मनच्या जागी वर्मन असा बदल केलाच होता. वर्मन हा प्रयोग क्षत्रियांनाच साजेसा होता. दख्खनमधील राजघराण्यापैकी कोणत्याच राज्यकर्त्यांनी ही प्रथा पाळल्याची दिसत नाही. सातवाहनांपैकी जरी काहींची व्यक्तिगत नावे ब्राह्मणी देवता, एकूण यज्ञसंस्था, प्रदेश आणि अमूर्त गुणवत्ता यांच्याशी संबंधित असली तरी नामकरणाचा निश्चित असा आकृतिबंध दिसत नाही. वाकाटकांची सर्वच नावे सेन या उत्तरपदाने संपतात. बहुधा राज्याभिषेकाच्या प्रसंगी मूळ नावांना सेन हे उपपद लावले जात असावे.[५३] मुंडपुत्र घराण्यात प्रारंभी निश्चित नामचौकट नव्हती. पहिल्या तीन वंशजांची नावे नंदिसोम, वर्धन आणि मुंड अशी असली तरी राज्यसत्ता ग्रहणानंतर त्यांनी महाराज किंवा नुसतेच राज अशा शब्दाने संपणारी नावे धारण केली. गुप्त घराण्याने आपल्या संस्थापकाचे नावच आपले कुलनाम म्हणून त्यांचा तिसरा वंशज पहिल्या चंद्रगुप्त याच्या काळापासून घेतले. अनेक दानपत्रांतील ब्राह्मण आदात्यांच्या नावाशेवटी शर्मन् असते. तर काहींच्या नावात शर्मन् आणि आर्य यांचा वापर आढळतो. अन्य काहींमध्ये आर्य[५४] किंवा स्वामिन् असाही प्रयोग त्याच हेतूने केलेला दिसतो. तर काही नावे आकृतिबंध नसलेली आढळतात. सातवाहन काळात शर्मन्ने

संपणारे एकच नाव आपल्याला दिसते,[५५] तर ज्यांचा काहीच बोध होत नाही असे (अयितिलू)[५६] आणखी एक नाव आढळते.

वाकाटक राजा दुसरा प्रवरसेन याच्या अभिलेखांमध्ये ब्रह्मपुराक[५७] आणि ब्राह्मणवाटक[५८] या खेड्यांचा उल्लेख आहे या नावांवरून ती मुख्यत्त्वे ब्राह्मणांची वसतिस्थाने असावीत असे दिसून येते.

वाङ्मयीन संदर्भसाहित्यावरून दिसून येते की, अनेक ब्राह्मणांनी बौद्धधर्म स्वीकारला होता. काहीजण धर्मांतरानंतरही आपले ब्राह्मणी मूळ विसरले नव्हते अशांची काही उदाहरणे पुरालेखात दिसतात. कुडा येथील कोरीव लेखात कोण्या अयितिलू नामक ब्राह्मण उपासकाची पत्नी भायिला हिने चैत्यगृहासाठी दान दिल्याची नोंद आहे.[५९] दुसऱ्या एका भिक्खूने धर्मांतर आणि प्रव्रज्या झाल्यानंतरही आपले शर्मन् पदान्त नाव तसेच ठेवले होते. भदसम (भद्रशर्मन्) नावाच्या भिक्खूने दिलेल्या देणग्यांचे आकडे कार्ल्याच्या काही अभिलेखात सापडतात.[६०] कोल्हापूर येथे सापडलेला बौद्ध परंपरेतील करंडा एका अज्ञात ब्राह्मणाने (ब्रह्म) भेट म्हणून दिला आहे.[६१] पश्चिम भारतातील प्रारंभिक प्राकृत कोरीव लेखांतून आढळणारा हा ब्राह्मवर्णाचा एकमेव उल्लेख आहे हे येथे नमूद करायला हवे.

सामाजिक उतरंडीत यानंतर येणाऱ्या "क्षत्रियांनी" वेदाध्ययन, यज्ञ-याग, दानधर्म या त्रैवर्णिकांच्या सर्वसाधारण कर्तव्याबरोबरच परंपरेने काही राजकीय, प्रशासकीय व लष्करी जबाबदाऱ्या पार पाडायच्या असत आणि त्या पार पाडण्याचा ते निःसंशय प्रयत्न करीत. काही राज्यकर्त्यांच्या जीवनशैली भपकेदार व रुबाब गाजविणाऱ्या होत्या असे दिसते. त्यामुळेच आपस्तंबधर्मसूत्र (२.९.२५.१०) राजाला असा सल्ला देते की, त्याने आपल्या गुरुजनांपेक्षा व अमात्यांपेक्षा वैभवशाली वाटेल असे जीवन जगू नये. परंपरेने क्षत्रियांच्या नावातच उत्तरपद वर्मन् असावे असा संकेत असल्यामुळे[६२] असे मानता येते की, दुसऱ्या प्रवरसेनाच्या कारकिर्दीत अकराव्या ते सतराव्या वर्षात दिलेल्या दानपत्रात ज्याचा सेनापती म्हणून उल्लेख आहे तो चित्रवर्मन् क्षत्रिय होता.[६३] त्याच काळातील प्रभावतीगुप्ताच्या ऋध्दपूर ताम्रपटाचा लेखक प्रभुसिंह हाही क्षत्रिय असावा.[६४] मात्र चमिदास,[६५] नमिदास,[६६] वाप्पदेव,[६७] कात्यायन,[६८] आणि माधप्प[६९] हे इतर सेनापती क्षत्रिय नसावेत. ते इतर जातींचे असण्याची शक्यता आहे.[७०]

अर्थात क्षत्रियांपैकी किमान काही जणांनी तरी इतर व्यवसाय केले याचा निश्चित असा अभिलेखात्मक पुरावा उपलब्ध आहे. गजसेन आणि गजमित्र या दोन क्षत्रिय बंधुंनी व्यापार हा आपला व्यवसाय[७१] म्हणून निवडला आणि कान्हेरी येथे एक चैत्य गुंफा खोदून त्यानी ती थेरवादी बुध्दधर्माच्या भदायनीय शाखेच्या हवाली केली[७२] अशी माहिती यज्ञ सातकर्णीच्या कारकिर्दीतील कान्हेरी येथील कोरीव लेखातून मिळते.

अशी शक्यता आहे की, ज्यांची नोंद तत्कालीन अभिलेखात आहे असे किमान काही महारथी, महाभोज, मंत्री आणि लष्करी अधिकारी या वर्णाचे असावेत. अनेक लढाऊ दलांची भंरती या वर्णातून झाली असावी.

वर्णव्यवस्थेच्या तिसऱ्या क्रमांकावरील "वैश्यांनी" वेदाध्ययन, यजन (यज्ञ-याग) व दानधर्म या त्रैवर्णिकांच्या विहित कर्तव्यांबरोबरच शेतकी, पशुपालन आणि व्यापार यासह इतर आर्थिक कार्ये पार पाडावीत अशी परंपरागत अपेक्षा होती. अभिलेखांतून अशी कामे करणाऱ्या लोकांचे उल्लेख असले तरी त्यांच्या जातीय दर्जाबद्दल मात्र माहिती मिळत नाही. नामांतांचीही या संदर्भात फारशी मदत होत नाही. कारण धर्मशास्त्र संहितांची जरी गुप्त, भूति आणि दत्त अशी उत्तरपदे वैश्यांसाठी ठेवली असली[५३] तरी तशी नावे धारण करणाऱ्या व्यक्तींची[५४] जातीय ओळख केवळ त्यांच्या नावांवरून करणे दिशाभूलकारक होईल.

"शूद्र" या चौथ्या वर्णाने अन्य वर्णांसाठी शरीरकष्टाची कामे आणि विविध कला व हस्तकौशल्ये अवगत करायची असे धर्मशास्त्राने आदेश विहित केले आहेत. वैश्य आणि शूद्र यांच्या कामांची प्रत्यक्षात प्रचंड सरमिसळ झाली व परंपरेने द्विजाति (द्विज) या प्रवर्गात असलेल्या वैशांच्या कर्मकांडासंबंधी सामाजिक दर्जावर याचा विपरित परिणाम झाला. विज्ञानेश्वराने उद्धृत केल्याप्रमाणे देवलांच्या मते शूद्रांसाठी पुढील कार्ये मुक्रर केली होती : द्विजांची सेवा, धान्योत्पादन, पशुपालन, ओझी वाहून नेणे, वस्तूंचा व्यापार, चित्रकला, नृत्य, गाणे, वीणा, सारंगी, 'मुरज', ढोल आणि इतर वाद्ये वाजविणे इत्यादि.[५५] हस्तकला (शिल्प) आणि सेवा ही शूद्रांच्या उपजीविकेची साधने म्हणून वायुपुराणात (८,१७१) सांगितली आहेत. द्विजांची सेवा, सर्व हस्तकला आणि सर्व वस्तुंची विक्री ही कामे उशनाने शूद्रांसाठी ठरवून दिली आहेत.[५६] शांतिपर्वात (२९५.४) असे दृढकथन केले आहे की, उपजीविकेचे इतर साधनच नसल्यास शूद्राने व्यापार, पशुपालन आणि हस्तकला यांचा आधार घ्यावा. शंख स्मृती (१.५) नुसार द्विजसेवा व सर्व हस्तकला ही कामे शूद्रांनी करावीत.[५७] अशा तऱ्हेने वैश्यांची म्हणून ठरवून दिलेली कामे करण्याची परवानगी मिळाल्याचा परिणाम शूद्रांचा सामाजिक दर्जा उंचावण्यात झाला. विशुद्ध शूद्राला इतर वर्णासोबत भोजन करण्याची परवानगी आपस्तंब देतो.[५८] इतर काही लेखक मात्र याच्या विरोधात होते. फक्त आपापली विहित कर्मे करणाऱ्या इतर जातीनाच सहभोजनाची ते अनुमती देतात.[५९] जाणकारांच्या निगराणीखाली वैश्वदेवासाठीच अन्न शिजविण्यासही शूद्रांना आपस्तंब परवानगी देतो.[६०] कोरीव लेखांतून शूद्रांना वर्ण म्हणून उल्लेख आढळत नाही. वस्तुतः अनेक हस्तकलाकार, शेतकरी व नांगरे वगैरे लोक शेवटच्या दोन वर्णाचेच असले पाहिजेत. पण या वर्णाच्या कामामध्ये कमालीची सरमिसळ झाल्यामुळे कोणाचा वर्ण कोणता हे नेमकेपणाने सांगणे जवळपास अशक्य होते. त्यांच्यापैकी ज्या कोणाची नावे दास या उपाधीने संपतात ते बहुधा शूद्रवर्णीय असावेत. स्थानिक बौद्ध भिक्षुसंघाला गुहेचे दान

देणाऱ्या मुगूदासाचा (मृगदास) उल्लेख नाशिकच्या कोरीव लेखात आहे.[८१] तो कोळी (दासक) होता असे म्हणतात.[८२] कुडा येथील बौद्ध भिक्षुसंघाला देणगीदाखल पाण्याचा हौद (पोढी) देणारी दुसरी एक समनामधारी व्यक्ती व्यवसायाने माळी (मालाकार) होती.[८३] यावरून असे दिसते की, त्यापैकी किमान काहीजण तरी एवढ्या खर्चीक देणग्या देण्याइतपत सधन होते. दासान्त नावे धारण करणाऱ्या ज्या काही लेखकांचा निर्देश वाकाटक अभिलेखात येतो ते याच जातीचे असावेत. चमिदास, नमिदास वगैरे ज्या सेनापतींची नावे वर आली आहेत त्यांच्या नावांवरून ते बहुधा या वर्णातील असावेत. या वर्ण किंवा जातीतून मोठ्या प्रमाणावर सैनिकांची भरती झाल्याचे पाहता हा तर्क बरोबर वाटतो. अर्थात केवळ नामान्तांच्या आधारे वर्णविषयी काढलेल्या अशा अनुमानांबाबत खात्री बाळगता येत नाही. कारण या संदर्भात धर्मशास्त्रानी दिलेल्या आज्ञा कधीच काटेकोरपणे पाळल्या जात नाहीत याचा उल्लेख वर केलाच आहे. नांगरे (हलिक), अत्तार (गंधिक), सुतार (वढकि), पाथरवट (सेल-वढकि), माळी (मालाकार), सोनार-लोहार (कर्मार आणि लोहवाणिज), तेली (तिल-पिषक), विणकर (कुलरिक), जलसंचलित यंत्रांचे कर्ते (ओदयांत्रिक) इत्यादिंनी उघडपणे आपापल्या उपजाती तयार केल्या होत्या. त्यांचा प्रारंभिक प्राकृत कोरीव लेखांत वारंवार उल्लेख येतो. त्या सगळ्या तत्त्वतः याच वर्णात मोडतात. त्यांच्यापैकी काहींनी स्वतःला श्रेणींमध्ये संघटित केले होते आणि त्या स्वरुपात तत्कालीन सामाजिक चौकटीत अतिमहत्त्वाचे आर्थिक कार्य पार पाडले होते. याबद्दलचे विवेचन पुढे ओघाने येईलच. गाहासत्तसई (गाथासप्तशती) (५.८०४) मध्ये ज्यांचा उल्लेख आहे ते गुराखीही (अहीर किंवा आभीर) याच प्रवर्गातील असावेत. या वर्गातील काहीजण कार्दमक क्षत्रपांच्या[८४] आणि आंध्रप्रदेशाच्या किनारपट्टी भागातील इक्ष्वाकुंच्या[८५] कारकिर्दीत सेनापतीपदापर्यंत वर चढले होते आणि पुढे नाशिक भागात[८६] सत्ताधीशही झाले होते. शूद्रांमधील काही खालचे वर्ग एव्हाना अस्पृश्य ठरले होते. चांडाळ[८७] आणि चांभार (चर्मकार)[८८] यांचा त्यात अंतर्भाव होता. विधिक नामक एका चांभाराने आपल्या आई, पत्नी, भाऊ आणि मुलगा नाग यांच्यासह अमरावतीच्या बौद्ध भिक्षुसंघाला एक ओसंडून वाहणारा कलश (पूर्ण घट) कोरलेला शिल्पपट दान दिला.[८९] काळाच्या ओघात व्यवसाय पिढीजात झाल्यामुळे यातील अनेकांचे रुपांतर जाती आणि उपजातींत झाले आणि धर्मशास्त्रकारांनी आंतरवर्णीय अनुलोम (निम्नवर्णीय स्त्रीशी उच्चवर्णीय पुरुषाने केलेला) आणि प्रतिलोम (उच्चवर्णीय स्त्रीशी निम्नवर्णीय पुरुषाने केलेला) असे विवाहाचे प्रकार गृहीत धरून त्यांना वर्णसिध्दान्ताच्या चौकटीत सामावून घेण्याचा प्रयत्न केला.[९०] पण या व्यावसायिक जातींनी स्वतःच आपले तत्कालीन कोरीव लेखात केलेले उल्लेख पाहता हा प्रयत्न यशस्वी झाला नाही हेच स्पष्ट होते.

शूद्र वर्गातील काही व्यक्तींनी स्वतःची राज्ये स्थापन केली होती. अभिजात लेखक वायव्येकडील ज्या सोद्राइ राज्याचा उल्लेख करतात ते पातंजलीला व महाभारताला ज्ञात असलेल्या[९१] शूद्र जनजातीपैकी असावेत. नंद राजे निम्नजातीय होते यावर

एकमत आहे. भारतीय परंपरेत तसेच अभिजात साहित्यातही तसा उल्लेख आढळतो.[९२] वर उल्लेख केल्याप्रमाणे नाशिक भागात आभीर सत्तेवर आले. त्यांनी गुप्तकाळात मध्यभारतातही आपले मांडलिक राज्य स्थापन केले होते. त्यामुळे इतर सत्तांबरोबर त्यांनाही आपले तावेदार करणे समुद्रगुप्ताला गरजेचे झाले होते.[९३] मनूलाही (४.६१) शूद्र राजांची माहिती होती. प्रारंभिक आणि सरत्या मध्ययुगीन काळात दक्षिण भारतात अनेक शूद्र घराणी सत्तेवर आली. त्यांच्यातील काहींनी स्वतःला अभिमानपूर्वक चतुर्थ-वर्ण असे म्हणूनही घेतले होते.[९४]

जुन्नरच्या कोरीव लेखात मुधकिय मल आणि गोलिकिय अनाद यांनी संयुक्तपणे स्थानिक बौद्ध भिक्षुसंघाला स्वागतकक्ष (उपठाण) देणगी म्हणून दिला अशी नोंद आहे.[९५] बूल्हेरच्या मते मुधकिय हे संस्कृतातील मूर्धकीयचे रूप असून त्याचा अर्थ "मूर्धक जातीचा" असा होतो. त्यातून क्षत्रिय वर्ण सूचित होतो.[९६] हे कथन अचूक असेल तर हे नाव महत्त्वाचे ठरते. कारण त्याच्या आधारे परंपरेने का होईना, क्षत्रियांचे स्थान चातुर्वर्णाश्रम व्यवस्थेत सर्वांत वर होते असे म्हणता येऊ शकेल. ज्या प्रारंभिक बौद्ध परंपरेत वर्णांचा उल्लेख करताना क्षत्रियांचा उल्लेख प्रथम केला जाई तिचा हा संदर्भ असू शकेल.[९७] गोलिकिय हे नाव बूल्हेरच्या मते आताच्या गवळी किंवा गुराखी जातीचे असावे.[९८] यावरून असे दिसते की, त्यांना आभीरांपेक्षा वेगळे समजले जाई. याचाच अर्थ गवळी, गुराखी व आभीर हे गायीचे मालक असावेत.

दख्खनमधील सामाजिक रचनेची गुंतागुंत येथे जवळपास मौर्यकाळापासून आलेल्या परकियांमुळे वाढली. स्थूलमानाने मौर्यपूर्वकाळात दख्खन भागात रचल्या गेलेल्या आपस्तंबधर्मसूत्रात त्यांची मुळीच दखल घेतलेली दिसत नाही. तत्कालीन दख्खनी समाजाचे ते जर घटक वनले असते तर असे झालेच नसते. परदेशी वंशाच्या ज्या तीन लोकांनी या काळात दख्खनमध्ये प्रवेश केला आणि सामाजिक, धार्मिक व आर्थिक जीवनात ज्यांनी महत्त्वाची भूमिका पार पाडली त्यामध्ये यवन (ग्रीक), शक (सिथियन) आणि पहलव (पार्थियन) हे होते. यवनांचा पहिला आढळ पश्चिम भारतात मौर्य सम्राट अशोकाच्या कारकिर्दीत होतो. तुषास्क नामक यवन राजाला त्या काळात गिरनार (प्राचीन गिरिनगर) येथील सुदर्शन तलाव आढळला होता. या तलावाला नहर काढून दिला होता आणि राजेशाही अधिसत्तेला साजेसे असे बांधकाम केले होते.[९९] "पेरिप्लस ऑफ एरिथ्रियन सी" वाचल्यावर असे लक्षात येते की, बॅरिगाझा (भडोच) येथे आणि भोवतालच्या प्रदेशात भारतीय व ग्रीक दोन्ही देशांची नाणी या साहित्यकृतीची रचना होईपर्यंतच्या काळात म्हणजे इसवी सनाच्या पहिल्या शतकाच्या तिसऱ्या पादापर्यंत व्यवहारात होती.[१००] इंडो-ग्रीक राजे अपोलोडोटस् आणि डायोनिसस् तसेच क्षहरात महाक्षत्रप नहपान यांची नाणी असलेले नाणक संचय गुजरातेतील भावनगर जिल्ह्यातील गोधरा नामक प्राचीन बंदराच्या ठिकाणी सापडले, त्यामुळे या विधानाला

पुरातत्त्वीयही समर्थन मिळाले आहे.[१०१] इंडो-ग्रीकांचे पश्चिम भारताशी नेमके काय संबंध होते हे आज सांगता येणार नाही. पण यवनांचा उल्लेख मात्र नाशिक, कार्ले आणि जुन्नर या पश्चिम भारतातील ठिकाणी सापडलेल्या अनेक लेण्यांमधील इसवी सनाच्या प्रारंभिक शतकांपासूनच्या कोरीव लेखांत आढळतो. ग्रीक-रोमन संबंध स्पष्ट करणाऱ्या कित्येक पुराणवस्तू महाराष्ट्रातील अनेक प्राचीन ठिकाणी सापडल्या आहेत. नाशिकच्या १७ क्रमांकाच्या लेण्यातील कोरीव लेखातील उल्लेखानुसार धर्मदेवाचा पुत्र इंद्राग्निमित्र याने हे लेणे खोदून घेतले आणि आपला मुलगा धर्मरक्षित याच्या समवेत त्याने ते सर्व बुद्धाच्या सन्मानार्थ तेथील बौद्ध भिक्षुसंघाला अर्पण केले.[१०२] त्याचे वर्णन उत्तरनिवासी (ओतराह) योनक दत्तामित्रीचा (दातामितियक) रहिवाशी असे केले जाते. दत्तामित्री हे अरकासियातील डेमेट्रियसचे भारतीय रूप असावे हा कयास बरोबर आहे.[१०३] या कोरीव लेखावरून असे दिसते की, तेथे आधीच येऊन वसलेल्या यवनांच्या नंतरही उत्तरेकडून यवन महाराष्ट्रात येतच राहिले होते. स्पष्टपणे परकीय नावे धारण करणाऱ्या आणि बाहेरून कोठून तरी आलेल्या अशा यवनांचा उल्लेख कार्ले येथील कोरीव लेखात मिळतो. अबुलामाचा रहिवासी सेतफरणाचा मुलगा हरफरण याने महासांधिकाच्या ताब्यात असलेल्या कार्ल्याच्या (प्राचीन काळी वेलूर म्हणून ओळखल्या जाणाऱ्या) बौद्ध भिक्षुसंघाला नऊ दालनांचा मंडळ (नवगभमंडव) दान केल्याची नोंद कार्ले येथील कोरीव लेखात आहे.[१०४] ही सर्व नावे स्पष्टपणे परकीय आहेत. कार्ले व जुन्नर येथील अभिलेखात अशी इतरही अनेक उदाहरणे आहेत की, जेथे निखळ भारतीय नावे धारण करणाऱ्या आणि वरवर पाहता भारतीय धर्म अनुसरणाऱ्या पण अद्याप आपल्या मूळ यवनकुळीचा विसर न पडलेल्या यवनांनी श्रद्धेने दिलेल्या देणग्यांची नोंद आढळते. या कोरीव लेखावरून धेनूकाकट इरिल, गर्त आणि उमेहनगर अशा प्रयत्न करूनही स्थलनिश्चिती होऊ न शकलेल्या त्यांच्या काही मुख्य केंद्रांची माहिती मिळते.[१०५] त्यांना समाजात बरेच प्रभावशाली स्थान असावे असे या कोरीव लेखातून दिसते. त्यांनी आपल्या स्वतःच्या बळावर आणि परकीय वंशाच्या शक-पहलवादी लोकांच्या बरोबर आपली प्रभावक्षेत्रे निर्माण केली आणि सातवाहन राजा गौतमीपुत्रापुढे गंभीर धोका उभा केला याविषयी आश्चर्य वाटायला नको. गौतमीपुत्रानेच त्यांचे सर्वांचे पुढे उच्चाटन केले.[१०६] स्थानिक राजघराण्यांवर मात करून महाराष्ट्राच्या नाशिक-पुणे भागात तसेच गुजरात व माळवा प्रदेशात आपले राज्य स्थापन करण्यात शकांना यश मिळाले होते. त्यापैकी या प्रदेशात दीर्घकाळ सत्तेवर राहिलेल्या क्षहरात व कार्दमक या घराण्यांचे पूर्णपणे भारतीयीकरण झाले. त्यांनी भारतीय धर्म, भाषा व साहित्य यांना आश्रय दिला. सातवाहन राजा सातकर्णि याचा समकालीन पण कनिष्ठ असलेला नहपान हा सातवाहनासाठी गंभीर संकट ठरला होता आणि गौतमीपुत्र सातकर्णि याला गमावलेल्या प्रदेशावर आपल्या घराण्याची सत्ता स्थापन करण्यासाठी त्यांचा निर्वंश करणे भाग पडले. पहलवांनाही बरेच वरचे स्थान मिळाले होते आणि त्यांच्यापैकी

काहीजणांना राज्यकर्त्यांची लोभस प्रतिष्ठा लाभली होती असे कार्दमक महाक्षत्रप पहिला रुद्रदामन् याच्या जुनागढ कोरीव लेखावरून समजते.[१०७] त्यांचेही संपूर्णपणे भारतीयीकरण झाले होते. भारतीय समाजाचे घटक झालेल्या या परकियांना पारंपरिक भारतीय सामाजिक रचनेत त्यांच्या प्रतिष्ठेला साजेसे सन्मानपूर्ण स्थान देणे भाग होते आणि या प्रयत्नात प्राचीन भारतीय सामाजिक विचारवंतांना यश आले. त्यानी असा सिद्धांत रचला की, हे परकीय लोक मुळात क्षत्रिय जातीचे होते. पण आपली विहित कर्मे त्यांनी न केल्यामुळे (क्रिया-लोप) आणि त्याचा ब्राह्मणांशी संपर्क न राहिल्यामुळे (ब्राह्मणादर्शन)[१०८] त्याना शूद्रांचा दर्जा प्राप्त झाला;[१०९] पण काही प्रायश्चित विधी करून त्या वर्णात त्याना परत घेतले जाऊ शकते. अशाप्रकारे त्यांना क्षत्रिय दर्जा दिला गेला. काहींनी त्यांचा अंतर्भाव अशा विशुध्द शूद्रांच्या 'अनिरवासित' प्रवर्गात केला की, जे आर्यावर्ता वाहेरचे नव्हते. ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकाच्या मध्यातील पुष्यमित्र शुंगाचा समकालीन असलेल्या पातंजलीचे हेच मत होते.[११०] त्यांना पारंपरिक सामाजिक व्यवस्थेत वरचे स्थान दिले गेले होते. हे त्यांचे भारतीय राजघराण्यांशी झालेल्या वैवाहिक संबंधावरून स्पष्ट होते. इसमहिस (ईशमहिष) हा त्याच्या नाण्यावरून ज्ञात झालेला आणि बहुधा क्षहरात नहपान याचाच प्रतिस्पर्धी असलेला राजा वसिष्ठ गोत्रात जन्मलेल्या स्त्रीचा मुलगा होता आणि त्यामुळे त्याचा वासिठीपूत असा[१११] उल्लेख होतो. बहुधा सातवाहनांशी त्याचा वैवाहिक संबंध झाला असावा. स्वतःला एक श्रेष्ठ ब्राह्मण मानणारा आणि धार्मिक संहितांचा (आगम) वस्तीस्थान असणारा, कीर्तीमान गौतमीपूत्र सातकर्णि याचा मुलगा आणि वारसदार वासिष्ठीपुत्र सातकर्णि याचा विवाह कार्दमक महाक्षत्रप पहिला रुद्रदामन याच्या मुलीशी झाला होता हे आपल्याला तिच्या कान्हेरी येथील कोरीव लेखावरून समजते.[११२] त्याचप्रमाणे विजयपुरीच्या इक्ष्वाकुंनीही त्या वंशाच्या काही राजकन्यांना आपले जोडीदार म्हणून निवडले होते. अशाच रीतीने वीरपुरुषदत्ताने या वंशातील रुद्रधरभट्टारिका नामक स्त्रीशी विवाह केला होता आणि तिच्यापासून झालेल्या मुलाला रुद्र या अभिधानाने सुरू होणारे नाव (रुद्रपुरुषदत्त) दिले होते.[११३] महाक्षत्रपाची कन्या वर्मभटा नामक स्त्री बृहत्फल गोत्राची असल्याची सांगितले जाते. कार्दमकानी ते गोत्र स्वतःचे म्हणून निवडले[११४] आणि त्यामुळे पारंपरिक सामाजिक व्यवस्थेशी त्यांचे नाते अधिक दृढ झाले. शेवटी क्षत्रिय म्हणून त्यांचा स्वीकार झाला.

**आश्रम** : भारतीय समाजाची जशी उतरंडवार विभागणी चार वर्णात झाली होती तशी ती आयुष्याच्या आश्रम नामक चार टप्प्यांमध्येही झाली होती. वर्ण व आश्रम या ब्राह्मणी सामाजिक व्यवस्थेच्या जुळ्या संस्था होत्या. आश्रमपद्धती लोकप्रिय होती याबद्दल आपस्तंब व अन्य धर्मशास्त्रकारांच्या संहिता शंकेला जागाच ठेवीत नाहीत. ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास या चार अवस्थांपैकी शेवटच्या दोहोंमधील फरक वैदिक परंपरेतही फारसा स्पष्ट नव्हता. नंतरच्या काळात तो स्पष्ट झाला. त्यांचे संयुक्त संन्यासी स्वरुप स्वीकारून जैन व बौद्ध पंथांनी अनुक्रमे मुनी व भिक्खू या नावांनी त्यांना लोकप्रिय केले. तरीही ब्राह्मणी चतुराश्रम व्यवस्थेचे असे स्पष्ट उल्लेख पुरालेखात अगदीच अल्प प्रमाणात आढळतात. जुन्नरच्या कोरीव लेखात ब्राह्मण

संन्याशाचा उल्लेख आहे. नंदबालिका नामक स्त्रीने केलेल्या दानाची नोंद त्यात आहे. ऋषि मूलस्वामिन् याची ती पत्नी होती असा उल्लेख आहे. जुन्नरच्या बौद्धभिक्षुसंघाला तिने पाण्याचा हौद (पोढी) दान दिला त्यावेळी मूलस्वामिन् याने सर्वसंगपरित्याग केला होता आणि तो संन्यासी (ऋषि) झाला होता हे उघडच आहे.[११५] तिने किंवा तिच्या पतीने बौद्ध धर्माचा स्वीकार केला होता असे दाखविणारा कोणताच पुरावा नाही. वाकाटक काळात किमान काही भागात तरी आश्रम व्यवस्था प्रचलित होती असे दिसते. अर्थात स्पष्ट उल्लेख एकच आढळतो तो दुसऱ्या प्रवरसेनाच्या जांब येथील ताम्रपटात. गणयागाचा कर्ता, कौंडिण्य गोत्राचा ब्राह्मण आणि कृष्ण (काळा) यजुर्वेदाच्या तैत्तिरीय शाखेचा अध्यायी असलेल्या कालकुट्ट नामक ब्रह्मचाऱ्याला भूदान केल्याची नोंद तेथे आहे.[११६] मिराशी सुचवितात त्याप्रमाणे तो बहुधा आजन्म ब्रह्मचारी राहिला असावा.[११७]

**मातृनामानुवर्ती नामकरण** : गोत्रनामाच्या आधारे एखाद्या स्त्रीच्या संततीला ओळखण्याची प्रथा लोकांमध्ये बरीच रूढ होती. सातवाहन राजघराण्याच्या उत्तरकालीन वंशजांपैकी गौतमीपुत्र[११८] आणि वासिष्ठीपुत्र[११९] ही दोन मातृनामानुवर्ती नामे सर्वाधिक लोकप्रिय होती. माढरीपुत्र व कौत्सीपुत्र[१२०] अशी आणखी दोन नावे सातवाहनांनी क्वचित धारण केलेली आढळतात. या चौघांपैकी पहिला गौतमीपुत्र सातकर्णि[१२१] हा आपल्या मातृनामानेच ओळखला जातो. त्याच्या अनेक वारसदारांबद्दलही हेच दिसते.[१२२] काहींच्या बाबतीत मात्र त्याची व्यक्तिगत नावेही वापरात होती.[१२३] कदाचित ही प्रथा राजघराण्यातील आधीच्या वंशजांमध्येही असावी; पण सलग अभिलेखीय पुराव्याच्या अभावी स्पष्ट मत नोंदविता येत नाही.[१२४] वाकाटकांच्या काळात राजघराण्यातील व्यक्तींमध्ये ही प्रथा दिसत नाही. वाकाटक उत्तरकालीन अभिलेखांवरून असे दिसते की, पहिल्या प्रवरसेनाच्या चार मुलांपैकी फक्त एकानेच गौतमीपुत्र हे मातृनाम धारण केले होते. त्याचे व्यक्तिगत नाव विस्मृतीत जाऊन अज्ञात राहिले. या राजघराण्याच्या दुसऱ्या कोणत्याच वंशजाना मातृनाम धारण केल्याचे दिसत नाही.[१२५] आंध्र किनारपट्टीतील इक्ष्वाकु राजे आणि त्यांचे महासेनापती व महातलवर हेसुद्धा मातृनामी होते. त्या राजघराण्याचा पहिला ज्ञात राजा चांतमूल, त्याचा नातू इहुबुल चांतमूल आणि पणतू रुद्रपुरुषदत्त हे सगळे वासिष्ठीपुत्र होते, तर वीरपुरुषदत्त हा माढरीपुत्र म्हणून ओळखला जातो आणि तेच व्यक्तिगत नाम धारण करणारा त्याचा नातू स्वतःस हारितीपुत्र म्हणवतो. वनवासी येथील कदंब आणि कर्नाटकातील बदामी यांच्यातही हे हारितीपुत्र मातृनाम खूप लोकप्रिय होते. पण पुढे त्याचे खरे महत्त्व नष्ट झाले आणि त्याला केवळ प्रथेचे स्वरुप प्राप्त झाले. येथे आपण ही प्रथा ज्यांच्यात खूप लोकप्रिय होती अशा दख्खन भागातील राजघराण्यातील व्यक्ती आणि अमीर, उमराव यांचाच केवळ विचार केला आहे. या प्रथेचे अनुसरण करणाऱ्या राज्यकर्त्यांची उदाहरणे भारतात इतरत्रही बरीच आढळतात. उदाहरणार्थ, हेलिओडोटसच्या बेसनगर येथील गरुडस्तंभावरील कोरीव लेखात उल्लेख असलेला विदिशेचा राजा भागभद्र याने काशीपुत्र असे मातृनाम धारण केले होते.[१२६] त्याचप्रमाणे कोसल व कौशंबी येथील मघ

राजांनीही मातृनामे घेतली होती. अशा रीतीने भीमवर्धन हा वासिष्ठिपुत्र, तर त्याचा पुत्र व वारसदार पोठशिरी (प्रौष्ठश्री) हा कौत्सीपुत्र होता. त्याचा सहोदर भाऊ भद्रमघ याचेही नाव तसेच होते. पहिला शिवमघ हाही कौत्सीपुत्र होता आणि त्या नंतरचा समनामधारी (दुसरा शिवमघ) हा गौतमीपुत्र होता. वस्तुस्थिती अशी आहे की, दोन शिवमघांच्यामधील वेगळेपणाचा मुख्य आधार ते वापरीत असलेल्या मातृनामांमधील फरक हाच होता[१२७] मातृनामीप्रथा दख्खनचे भारतीयीकरण झालेल्या परकीय राज्यकर्त्यामध्येही लोकप्रिय झाली होती. इसमहिस (ईशमहिष) नावाच्या क्षहरात प्रमुखाने वासिष्ठीपुत्र हे मातृनाम घेतले होते.[१२८]

अर्थात मातृनामदर्शक वापर केवळ राजेमहाराजे आणि अमीर उमरावांपुरताच सीमित नव्हता, तर सामान्य लोकांतही प्रचलित होता हे दर्शविणारा पर्याप्त पुरावा उपलब्ध आहे. त्यानुसार अशीच एक वासिष्ठीपुत्र आनंद नामक व्यक्ती तिसरा सातवाहन राजा सातकर्णि याच्या राज्यात मुकादम होती,[१२९] वाराहीपुत्र हे मातृनाम धारण करणारा अश्विभूति नामक एक ब्राह्मण होता, त्याच्याकडून नहपानाने भूखंड विकत घेतला होता,[१३०] कोण्या वासिष्ठीपुत्र कटहादीने अजिंठा येथे दान दिले होते,[१३१] थोर वैय्याकरणी पाणिनी हा परंपरेने दाक्षीपुत्र म्हणून ओळखला जात असे, इत्यादि बाबी ज्ञात होतात.[१३२] अशाप्रकारे मातृनामांचा वापर देशी व विदेशी वंशावळींच्या राजघराण्यात, अमीर-उमराव कुटुंबात तसेच सामान्य लोकांतही अतिप्राचीन काळापासून संपूर्ण भारतीय उपखंडात लोकप्रिय होता. विचित्र दिसणाऱ्या या सामाजिक घटिताचे स्पष्टीकरण देण्याचे नानाविध प्रयत्न झाले आहेत. काहींच्या मते दख्खन आणि दक्षिण भारत या भागात प्रागैतिहासिक काळापासून प्रचलित असलेल्या मातृसत्ताक पद्धतीचा तो परिणाम आहे. परंतु ज्या कुटुंबामध्ये ही पद्धत होती असे दिसते, ती सर्व निश्चितच पितृसत्ताक होती. म्हणजे तेथील वारसाहक्क निर्विवादपणे बापाकडून मुलाकडे चालत आला होता. पां. वा. काणे यांच्या मते "जेव्हा काही वेळा व्यक्तीचे नाव आईवरून किंवा आईच्या बापाच्या गोत्रावरून ठरते तेव्हा त्यातून एवढेच सूचित करायचे असते की, पुरुष आणि स्त्री या दोन्ही बाजूंनी सदर व्यक्ती मान्यवर पूर्वजांची वारसदार आहे."[१३३] अलीकडे या प्रश्नाचा तपशीलवार अभ्यास करून आय. के. शर्मा अशा निष्कर्षाप्रत आले की, या नावाचा गोत्रांशी काहीही संबंध नव्हता तर केवळ मूलबाळ हवे यासाठी एखाद्या ऋषीबद्दल संबंधित बालकाच्या मातापित्यांनी बाळगलेल्या भक्तिभावनेतून निष्पन्न झालेली ती पारंपरिक आडनावे असतात. मातृकांच्या पूजेच्या धर्तीवर या पुरोहितांची पूजा करण्याची प्रथा प्रारंभिक काळात बहुधा असावी. वसिष्ठाच्या अनुग्रहाने झालेला मुलगा हा वासिष्ठीपुत्र, तर गौतमाच्या कृपेने झालेला गौतमीपुत्र ठरायचा. मुलगी झाल्यास तिचे नाव फक्त गौतमी एवढेच असायचे, जसे: गौतमीपुत्र सातकर्णीच्या आईचे नाव गौतमी बलश्री होते.[१३४] विजय नामक राज्यकर्ते गौतमीपुत्र आणि वासिष्ठीपुत्र म्हणूनही ओळखले जातात याचे समर्थन असे केले जाते की, त्याला "त्या दोन ऋषींचे दुहेरी वरदान लाभले होते".[१३५]

ही मते अर्थातच पूर्णतया अस्वीकारार्ह आहेत आणि व्यावहारिक दृष्टिकोनातून या प्रश्नाचा विचार होणे अगत्याचे आहे. मातृनामे वापरण्याची गरज का पडली असावी याचे समाधानकारक उत्तर म्हणजे त्याकाळी सर्व वर्णांच्या, विशेषतः राजेमहाराजांच्या व अमीर-उमरावांच्या कुटुंबात मोठ्या प्रमाणावर प्रचलित असलेल्या बहुपत्नीक विवाह पद्धतीतून या प्रथेचा प्रादुर्भाव झाला असावा हे होय. यामुळे निरनिराळ्या राण्यांपासून झालेल्या मुलांना वेगळे करण्याची निकड भासली आणि म्हणून त्यांच्या मातेच्या माहेरच्या गोत्रावरून त्यांना संबोधून यातून मार्ग काढला गेला. सामान्यतः विवाहानंतर वधूला आपल्या पित्याचे गोत्र सोडावे लागते आणि पतीचे गोत्र अंगिकारावे लागते, असे असले तरी काही उदाहरणात असे दिसून येते की, लग्नानंतरही वधू आपल्या पित्याचे गोत्रच कायम ठेवत असत.[१३६] त्यातून सामाजिक आव्हानाला तोंड देणे शक्य होऊन एक महत्त्वाचे सामाजिक कार्य पार पडले. हीच प्रथा किंचित सुधारित स्वरूपात देशाच्या विविध भागातील राजघराण्यात कालपरवापर्यंत प्रचलित होती.

**विवाहसंस्था** : प्राचीन भारतीय विचारवंतांच्यादृष्टीने विवाहसंस्था ही सामाजिक-धार्मिक दृष्टीने अतिशय महत्त्वपूर्ण होती. सामान्यतः विवाह हे बहुधा जातीअंतर्गतच होत असत. आंतरजातीय विवाह फारसे प्रचलित नव्हते. पण काहीवेळा तसे विवाह होण्यास प्रतिबंध घालणे अगदीच अशक्य होत असे. अनेक प्रकारचे घटक या विवाहांना प्रेरक ठरायचे. मुलाने निम्न जातीच्या मुलीशी लग्न करण्याच्या अनुलोम म्हणून ओळखल्या जाणाऱ्या प्रकाराला त्यांचा विरोध नव्हता. त्यातून सामाजिक सुसंवाद टिकून राहण्यास मदत होते असे मानले जाई. पण याच्या उलट म्हणजे वरच्या वर्णाच्या मुलीशी होणाऱ्या प्रतिलोम नामक विवाहास मात्र तीव्र विरोध होत असे. त्यातून विद्यमान समाजव्यवस्था केवळ विस्कळीतच होत नाही तर निकालात निघते अशी समजूत होती. पण असे विवाह मोठ्या प्रमाणात होत असत याची साक्ष विविध वर्णसंकारांची किवा मिश्रजातींची जी सविस्तर वर्णने आढळतात त्यातून मिळते. अर्थात असा युक्तीवाद शक्य आहे की, अनेक कारणांमुळे अशा अनेक जाती अस्तित्वात आल्या होत्या. त्यात सर्वाधिक महत्त्वाची कारणे व्यवसायविषयक होती. पण त्या काळच्या सामाजिक विचारवंतापुढे प्रश्न होता तो त्या जातींना पारंपरिक सामाजिक संरचनेत सामावून घेण्याचा. त्यांनी जातींच्या उत्पत्तीची वेगळी स्पष्टीकरणे देऊन तो प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला. समान दर्जाची कुटुंबे निवडण्याची दक्षताही घेतलेली दिसून येते. नाशिकच्या लेण्यातील कोरीव लेखाचे उदाहरण येथे देता येईल. त्यात आपल्याला असे कळते की, महाहकुसिरीची[१३७] नात आणि शाही मंत्र्याची (राजामात्य) मुलगी भटपालिका हिचा विवाह खजिनदाराचे पद (भांडागारिका) सांभाळणाऱ्या दुसऱ्या शाही मंत्र्याशी झाला होता.[१३८] शक हे परकीय होते, पण त्यांचे पूर्णपणे भारतीयीकरण झाले होते आणि त्यांच्यापैकी काहीजण राज्यसत्तेपर्यंत वर चढले होते. धर्मशास्त्रकारांनी त्यांना पारंपरिक व्यवस्थेत क्षत्रिय दर्जा दिला होता.[१३९] स्वतःला अनन्य ब्राह्मण म्हणवणाऱ्या सातवाहनांनी त्यांच्याशी वैवाहिक संबंध जोडले होते. अलीकडेच प्रकाशात

आलेल्या काही नाण्यांवरून राजा इसमहिस (ईशमहिष) याची माहिती मिळते. तो महाखतप (महाक्षत्रप) होता आणि वासिष्ठीपुत (वासिष्ठीपुत्र) म्हणून विख्यात होता. इसवी सनाच्या पहिल्या शतकाच्या प्रारंभी सातवाहन राजकन्येपासून त्याचा जन्म झाला असावा. दुसरे उदाहरण गौतमीपुत्र सातकर्णीचा मुलगा वासिष्ठीपुत्र सातकर्णि याच्या कार्दमक महाक्षत्रप पहिला रुद्रसेनच्या मुलीशी झालेल्या विवाहाचे आहे.[१४०] आपण चार वर्णांच्या संकराला आळा घातला (विनिवतित-चातुवण-सकर)[१४१] असल्याचा दावा गौतमीपुत्र सातकर्णि याने अभिमानपूर्वक केला होता याचा उल्लेख करणे आवश्यक वाटते. तरीसुद्धा शक हे क्षत्रिय होते हे मान्य केले तरी तो अनुलोम विवाह होता व धर्मशास्त्रकारांनी त्याचा तीव्र निषेध केला होता. येथे रुद्रधरभट्टारिका आणि वर्मभटा या कार्दमक राजकन्यांचाही उल्लेख करता येईल. पूर्व दख्खन भागात सातवाहनांचे वारसदार असलेल्या काही इक्ष्वाकु राजपुत्रांनी त्यांना आपले जोडीदार म्हणून नेले होते. तिसरा सातवाहन राजा सातकर्णि याचा नागनिका हिच्याशी झालेला विवाहही या संदर्भात लक्षणीय ठरतो. नागनिका ही क्षत्रियकुळीच्या मानलेल्या अंगिय-कुलातील महारठीची मुलगी होती व ती नागवंशीय होती.

वाकाटक सम्राट पहिला प्रवरसेन याचा विवाह मध्य भारतातील भारशिव नाग राजा भवनाग याच्या कन्येशी झाला होता. तिच्यापासून त्याला गौतमीपुत्र नावाचा मुलगा झाला होता.[१४२] हासुद्धा अनुलोमच विवाह असावा. वाकाटक राजा दुसरा रुद्रसेन याचा विवाह गुप्त राजकन्या प्रभावतीगुप्ता हिच्याशी झाला होता. गुप्त सम्राट दुसरा चंद्रगुप्त याची ती कन्या होती. त्याची पट्टराणी कुबेर नागा हिच्यापोटी तिचा जन्म झाला होता. ही राणी नागवंशीय होती. या वैवाहिक संबंधाचा साभिमान निर्देश वाकाटकांच्या पद्मपूर नंदिवर्धन-प्रवरपूर शाखेच्या सर्व दानपत्रांत नेहमीच केला गेला आहे. सर्व इतिहासकार गुप्त या आडनावाच्या आधारे गृहीत धरतात त्यानुसार गुप्त हे जर वैश्य असतील तर हा विवाह अनुलोम ठरेल. पण यापूर्वीच उल्लेख केल्याप्रमाणे आडनावावरून ती धारणा करणाऱ्यांच्या वर्णाचा अचूक बोध होत नाही आणि त्यामुळे गुप्त हे ब्राह्मण असण्याचीही शक्यता आहे. वाकाटकांचा ज्ञात असलेला उपांत्य राजा नरेंद्रसेन याचा कुंतल किंवा कदंब येथील राजकन्येशी[१४३] झालेला विवाह दुसरा पृथिवीषेण याच्या अभिलेखात नोंदविलेला आहे. तो सवर्ण विवाह होता. त्या घराण्याच्या वत्सगुल्म शाखेच्या राजकन्येशी विष्णुकुंडी राजा दुसरा माधववर्मन् याच्या झालेल्या विवाहाबद्दल निश्चित सांगता येत नाही. या माधववर्मनचा मुलगा विक्रमेंद्रवर्मन हा (विष्णुकुंडी आणि वाकाटक) उभय कुटुंबाचे भूषण मानला जातो.[१४४] विष्णुकुंडी ब्राह्मण किंवा क्षत्रियही असू शकतात. त्यांच्या स्वतःच्या अभिलेखांत त्यांनी आपले वर्णन "ब्रह्म-क्षात्र-तेजो-भृत्[१४५] किंवा ब्रह्म आणि क्षात्र तेजाने जे युक्त आहेत किंवा ज्यांचे पोषण झाले आहे असे" अशा शब्दात केले आहे. हा विवाह बहुधा अनुलोम पद्धतीचा आंतरजातीय विवाह असावा.[१४६]

**कुटुंबसंस्था** : समाजाच्या उत्क्रांतीत कुटुंबसंस्थेची निर्मिती हा पहिला टप्पा मानला जातो. धर्मशास्त्र संहितांमधून या पायाभूत संस्थेविषयी सविस्तर माहिती आढळते. एकूण त्यांचा कल एकत्र कुटुंबपद्धतीकडे असतो. मनु मात्र (९.१११) नाखुशीने का होईना विभक्त कुटुंबांबद्दल सहिष्णुता दाखवतो. त्यातल्या प्रत्येक कुटुंबात होमासह सर्व विहित धर्मविधी केले जाऊन धर्माची वाढ होण्यास मदत होईल असे कारण तो त्यासाठी देतो. काही कर्त्या मुलांची प्रवृत्ती आईवडिलांपासून वेगळे होण्याकडे असली तरी एकंदरीत एकत्र कुटुंबपद्धतीचेच अनुसरण लोक करीत असत असे दर्शविणारे पुरालेखात्मक व वाङ्मयीन पुरावे उपलब्ध आहेत. जुन्नरच्या कोरीव लेखात अशी नोंद आहे की, अससम (अश्वशर्मन) याचे पुत्र आणि भरुकच्छ येथील रहिवाशी बुद्धमित्र आणि बुद्धरक्षित या बंधुंनी स्थानिक बौद्ध भिक्षुसंघाला दोन दालनाची गुहा दान केली होती. यावरून हे स्पष्ट दिसते की, पित्याच्या निधनानंतरही हे दोघे भाऊ एकत्रच रहात होते.[१४७] कान्हेरीचा दुसरा शिलालेख असे नमूद करतो की, गजसेन आणि गजमित्र या दोन क्षत्रिय बंधुंनी चैत्य कोरवून घेतला. हे दोन्ही बंधू एकत्र रहात असावेत असे दिसते.[१४८] त्याच जागी गौतमीपुत्र यज्ञ सातकर्णिच्या कारकिर्दीतील आणखी एक अभिलेख आहे. आनंदपुत्र अपरेणु याने आपली पत्नी, पुत्र आनंद, सून या कुटुंबियासह आपल्या जन्मदात्यांना पुण्यलाभ व्हावा या हेतूने एक गुहा आणि एक मंडप दान दिल्याचा त्यात उल्लेख आहे. यावरून दिसते की, अपरेणु आणि त्याचा मोठा मुलगा आपापल्या बायकांसह एकत्र रहात असले पाहिजेत आणि जर अपरेणुने जन्मदात्यांना पुण्यप्राप्ती व्हावी म्हणून दानधर्म केला त्यावेळी ते हयात असतील तर तीन पिढ्या सुखाने एकत्र नांदत होत्या याचा तो पुरावा ठरेल.[१४९] गाहा-सत्त-सई (गाथासप्तशती) मध्ये असे अनेक संदर्भ आहेत की, ज्यावरून मोठी मुले त्यांच्या बायकांसह आईवडील व भाऊ यांच्याबरोबर एकत्र रहात असत हे स्पष्ट होते. सासू (श्वश्रू) आणि सून (स्नुषा) यांच्यातील संबंधाचे संदर्भ अनेक गाथांमधून मिळतात. कधी सासू आपल्या सुनेची मुलीप्रमाणे काळजी घेताना दिसते, तर कधी तिच्यावर कडक सत्ता गाजवताना आणि तिच्या हालचालींवर बारीक नजर ठेवताना दिसते.[१५०] सासरा हा कुटुंबाचा प्रमुख (गृह-स्वामिन्) दिसतो. कुटुंबातील सदस्यांच्या हालचालींवर त्याचेही सतत लक्ष असे आणि घरात प्रवाशांना आसरा देण्यापासून इतर सर्वच कुटुंबविषयकबाबतीत त्याची आज्ञा अंतिम असे. कुटुंबियाच्या कल्याणाची तो काळजी वाहात असे.[१५१] वहिनी व दीराचे (नवऱ्याचा भाऊ) उल्लेखही वारंवार आले आहेत. त्यांचे परस्परांशी संबंध व दृष्टिकोन शृंगारिक स्वरूपाचे असल्याचे अनेक जागी सांगितले गेले आहे.[१५२] नवरा (पती) आणि बायको (जाया आणि वधू)[१५३] यांच्यातील संबंध सामान्यतः स्नेहाचे असत. पत्नीच्या अंगी पाककौशल्यासह घरकामदक्षता असावी[१५४] आणि तिने कुटुंब एकत्र व अविभक्त राखावे[१५५] अशी अपेक्षा होती.

जावई (जामातृ)[१५६] आत्या (पितृश्वसृ),[१५७] मावशी (मातृश्वसृ),[१५८] बायकोची आई (वधूमातृ)[१५९] आणि मामी किंवा आईच्या भावाची पत्नी (मातुलानी)[१६०] अशा आणखी

काही नातेसंबंधांचा उल्लेख गाहा-सत्त-सई मध्ये सापडतो. हे सर्व संदर्भ प्रारंभिक काळातील आहेत. पण हीच कुटुंबव्यवस्था नंतरच्या काळातही अस्तित्वात राहिली असावी.

**वारसाहक्क** : पितृसत्ताक समाजव्यवस्थेत बापाकडून मुलाकडे वारसाहक्क जाणे स्वाभाविकच होते. धर्मशास्त्रकारांनीही ते मान्य केले आहे. फक्त मोठ्या मुलालाच संपूर्ण मालमत्ता मिळावी की सर्वच मुलांना त्यात आपापला वाटा मिळावा या एकाच मुद्यावर मतभेद होता. काहींच्या मते ज्येष्ठ पुत्रालाच संपूर्ण मालमत्ता मिळावी; तर इतरांना वाटते की, त्याला मोठा वाटा देऊन उरलेल्या मालमत्तेचे समान वाटप इतर मुलांमध्ये केले जावे. या विषयावरील विविध मते नोंदवून आपस्तंब धर्मसूत्रात असा अभिप्राय आहे की, नपुंसक, वेड्या आणि अप्रतिष्ठित मुलांचा अपवाद वगळता इतर सर्व मुलांना पैतृक मालमत्तेचा समान वाटा मिळाला पाहिजे (२.६.१४.१, ११). पती-पत्नी अविभाज्य असल्यामुळे त्यांच्यात मालमत्तेची वाटणी करणे आपस्तंब धर्मसूत्रास अमान्य होते. कोणीही सपिंड उपलब्ध नसेल तर त्या परिस्थितीत मुलीला वारसाहक्क देण्यास तो नाखुषीने तयार होतो, पण पत्नीचा मात्र तो या संदर्भात उल्लेखच करीत नाही (२.६.१४,२,४). पण याचा अर्थ तिच्या या हक्काला मान्यताच नव्हती असा केला जाता कामा नये. ख्रिस्तपूर्व सुमारे सहाव्या शतकाच्या आसपास यास्क त्याच्या निरुक्तात अशी माहिती देतो की, स्त्रीचा नवरा मरण पावल्यास व ती अपत्यहीन असल्यास दक्षिणेत मृताची स्त्रीच संपूर्ण धनसंपत्तीची हक्कदार ठरते.[१६१] धर्मशास्त्रीय विवादात याज्ञवल्क्यस्मृती दक्षिणेतही निर्णायक समजली जात असे. याज्ञवल्क्यस्मृतीनुसार (२.१३५) पुत्रविहिन स्त्री ही आपल्या मृत पतीच्या मालमत्तेची पहिली वारसदार असते. प्रापंचिक जीवन व्यतीत करणाऱ्या किंवा त्याचा त्याग करून बौद्ध भिक्षुणी झालेल्या अशा अनेक स्त्रियांनी दिलेल्या अनेक देणग्या आणि दानांची नोंद पश्चिम भारताच्या गुंफांमधील कोरीव लेखात आढळते.[१६२] आर्थिक सुस्थितीतील समाजघटकांमध्ये मुलींना त्यांच्या आईवडिलांच्या संपत्तीचा वाटा मिळत असणे संभवनीय आहे. हालाच्या शाही मंत्र्याची मुलगी,[१६३] कुड्याच्या महाभोजाची मुलगी[१६४] तसेच पितळखोऱ्यातील राजवैद्याची मुलगी[१६५] यांनी दिलेली दाने कदाचित त्यामुळेच शक्य झाली असावीत. शिवाय स्त्रियांना त्यांच्या माहेरच्यांनी व नवऱ्याने दिलेल्या भेटवस्तू (स्त्रीधन) मिळायच्या. त्याचा विनियोग आपल्या इच्छेनुसार करायला त्या स्वतंत्र असत. अर्थात मुलाला बापाची संपत्ती वारसाहक्काने मिळणे हीच सार्वत्रिक रीत होती हे "पुत्र-पौत्र-अनुगामिन्" म्हणजे मुलगा आणि नातू यांच्याकडे सोपवीत आहे या उद्गारातून स्पष्ट दिसते. वाकाटकांच्या ताम्रपत्रांत नोंदविलेल्या सर्व भूदानपत्रात हे विधान निरपवादपणे आढळते.

**स्त्रियांचे स्थान** : संदर्भसाधनांमध्ये स्त्रियांच्या सामाजिक दर्जासंबंधी फारच थोडी तथ्ये उपलब्ध असून त्यांच्यासंबंधी बरीच मनोरंजक माहिती गाहा-सत्त-सईमधून मिळते. बहुपत्नीकत्वाची प्रथा मोठ्या प्रमाणावर प्रचलित होती आणि सवतीचे (सपत्नी)[१६६]

तसेच अनेक पत्नी असलेल्या पुरुषांचे (बहुवल्लभ)[१६७] अनेक संदर्भ आढळतात. शिकारी[१६८] आणि गुराखी[१६९] यांच्यासारखे हलके समाजघटकही या दोषापासून मुक्त नव्हते. दुसरा विवाह आणि परिणामी पहिल्या पत्नीची उपेक्षा असेही उल्लेख आढळतात.[१७०] शाही कुटुंबातसुद्धा हे होत असे. सर्वांत ज्येष्ठ राणी पट्टराणी मानली जायची. तिला अग्र-महिषी असे म्हणत. प्रभावतीगुप्ता ही वाकाटक राजा दुसरा रूद्रसेन याची अशी अग्र-महिषी होती.[१७१] या प्रथेमुळे कौटुंबिक जीवन कलुषित होण्यावरोबर त्यांच्या सामाजिक स्थानालाही धक्का पोहचला असावा.

काही स्त्रिया सरकारी नोकऱ्यांमध्ये होत्या. अशीच एक पोटा नामक स्त्री धारावसुली खात्याची मुख्य कारभारी (प्रतिहारी) होती. गौतमीपुत्र सातकर्णि याने बौद्धसंघाला जमीन दान केली तेव्हा या संबंधित शाही आज्ञा तिने घेतली होती असे नाशिक येथील एका कोरीव लेखावरून समजले.[१७२] गाहा-सत्त-सईमधून असे स्पष्ट होते की, काही स्त्रिया माळीकाम (मालाकारी)[१७३] करीत, काही गुराखिणी (गोपी)[१७४] होत्या, तर काहीजणी सार्वजनिक पाणपोयांवर (प्रपा-पालिका)[१७५] पाणी वाटपाचे काम करीत असत. काही स्त्रिया आपल्या शेतकरी नवऱ्यासाठी भाकरी बांधून नेत (भक्तहारिणी)[१७६] आणि पिके वाढल्यावर शेतीची राखण करीत.[१७७] वेश्याव्यवसाय तेव्हा लोकांना माहीत होता आणि प्रचलितही होता. कसबिणी[१७८] आपल्या व्यवसायातच नव्हे तर कलांमध्येही निपुण होत्या.[१७९]

बहुसंख्य स्त्रिया निरक्षर होत्या. आपल्या नवऱ्यापासून दुरावल्यानंतर किती दिवस झाले हे त्या केवळ रेषा काढूनच मोजू शकत असत,[१८०] किंवा त्यांना हाताची व पायाची बोटे यांच्या पलीकडे आकडे मोजता येत नसत,[१८१] परंतु काही स्त्रियांची मात्र आपल्या प्रियकरांना पत्र लिहीत असल्याची किंवा त्यांची चित्रे काढीत असल्याची वर्णने आढळतात.[१८२] काही स्त्रिया केवळ साक्षरच नसून उत्तम कवयित्रीही होत्या. गाहा-सत्त-सई मध्ये त्यांच्या रचना समाविष्ट आहेत. अनुलक्ष्मी (१७७, १७८, २२८, २६३, २७४), माधवी (९१), पृथिवी (७६, ८६), रेवा (८७, ९०), रोहा (१६३) आणि शशिप्रभा (३०४) अशी त्यांची नावे आहेत. काही बौद्ध धर्मग्रंथावर प्रभुत्व मिळवून सहकारी भिक्षुणींना शिकविणाऱ्या काही बौद्ध भिक्षुणींचे अनेक उल्लेख आढळतात. अमीर-उमरावांच्या कुटुंबात स्त्रियांची स्थिती, तत्कालीन एकूण परिस्थिती आणि त्यांची क्षमता यानुसार सापेक्षतः चांगली होती. सातवाहनांच्या काळात तिसरा राजा सातकर्णि याची पट्टराणी नागनिका ही आपल्या पतीसोबत अनेक श्रौत यज्ञांच्या प्रसंगी हजर होती. तिचा पुत्र वेदिश्री हा त्याच्या पित्याच्या निधनप्रसंगी अज्ञान वयाचा असल्यामुळे त्याला सिंहासन मिळवून देण्यात तिने महत्त्वाची भूमिका पार पाडली होती. त्यामुळे बहुधा या कुटुंबाचा नाणेघाट येथील प्रतिमागृहात तिच्या निधनानंतर पतीसोबत तिचाही पुतळा उभारला असून त्यात पतीच्या डाव्या बाजूला पत्नीची जागा असल्याची

भारतीय परंपरा मोडून तिला पतीच्या उजव्या बाजूला उभे करण्यात आले आहे.[१८३] महान गौतमीपुत्र सातकर्णीची माता गौतमी बलश्री हिचे स्थानही बरेच वरचे होते आणि तिचा मुलगा व नातू तिला नेहमीच खूष ठेवण्याच्या प्रयत्नात असायचे.[१८४] ती विधवा होती आणि धर्मशास्त्रांनी विधवांसाठी ठरवून दिलेले उपासतापास करीत मर्यादशील जीवनक्रम व्यतीत करीत होती.[१८५] आपल्या नवऱ्याच्या अखेरच्या दिवसात तो आजारी असताना आणि त्याचे सिंहासन डळमळीत झाले असताना तिने त्याला मदत केली असावी. विदर्भात आणि शेजारच्या प्रदेशात आंध्र सातवाहनानंतर गादीवर आलेल्या वाकाटकांमध्ये दुसरा रुद्रसेन याची पत्नी प्रभावतीगुप्ता हिने पतीच्या निधनानंतर मोठा मुलगा दिवाकरसेन अज्ञान वयाचा असताना तब्बल तेरा वर्षेपर्यंत वाकाटक साम्राज्य सांभाळले. तिचा हा मुलगा बहुधा राजपुत्र म्हणूनच मरण पावला आणि त्यानंतर तिने तिचा दुसरा मुलगा दामोदरसेन यांच्या वतीने कारभार केला असावा. दामोदरसेन पुढे राजा झाला. त्याच्यानंतर सत्तेवर आलेला तिचा पुत्र दुसरा प्रवरसेन आणि तिची अज्ञान मुलगी यांच्याकडून प्रभावतीगुप्ताला खूप मान मिळत असे. या कन्येने आपल्या आईच्या निधनानंतर तिच्या स्मरणार्थ मंदिर बांधले आणि त्यास प्रभावतीगुप्तास्वामिन् असे नाव दिले असे त्या मंदिरातील शिलालेखावरून समजते. रामगिरी म्हणजे आजचे नागपूर जवळचे रामटेक होय. येथे आज हे मंदिर केवल नरसिंह मंदिर म्हणून ओळखले जाते.[१८६] अजिंठा, कार्ले, कान्हेरी, अमरावती इत्यादि अनेक ठिकाणी मिळालेल्या सातवाहन कालीन शिल्पांतून व चित्रांतून मोकळेपणाने सामाजिक-धार्मिक उपक्रमांत सहभागी होणाऱ्या स्त्रिया दिसतात. गाहा-सत्त-सईमध्ये स्त्रियांविषयी विविध बाबतीतील कित्येक संदर्भ आले आहेत, पण पडदापद्धतीचा मात्र पुसटसाही उल्लेख नाही.

सती या नावाने ओळखल्या जाणाऱ्या प्रथेचे समर्थन तत्कालीन कोणत्याही धर्मशास्त्र ग्रंथाने केलेले नाही, किंवा तसा प्रसंगही इतक्या विपुल कोरीव लेखांत कोठेही नोंदविलेला नाही. आपस्तंब, मनु आणि याज्ञवल्क्य तशा घटनेचा उल्लेख तर करीत नाहीतच, उलट विधवांनी साधेपणाने जीवनक्रम कसा आचरावा, यम, नियम आणि व्रते यांचे पालन कसे करावे यावद्दलचे संकेत घालून देतात. सातवाहनांच्या गतभर्तृका राण्या म्हणजे नागनिका आणि गौतमी वलश्री यांची उदाहरणे येथे देता येतील. वेदिश्रीच्या नाणेघाट येथील तसेच वासिष्ठीपुत्र पुळुमावीच्या नाशिक येथील उपरोक्त कोरीव लेखांतून त्यांची माहिती मिळते. प्रभावतीगुप्ता ही वाकाटक राणी असली तरी तिचीही हीच परिस्थिती असावी. गाथासप्तशतीमधील ज्या कडव्यांमध्ये (४०७, ४४९, ६३३, ८७६) या प्रथेच्या मंदर्भ आणि विधवा झालेल्या आणि पतीच्या पाठोपाठ त्याच्या चितेवर जाण्यास निघालेल्या पत्नींच्या वेषभूषेचे व प्रसाधनाचे वर्णन आहे, त्यांचे नेमके स्पष्टीकरण देणे कठीण आहे. त्यावरून एवढेच म्हणता येईल की, समाजाच्या काही भागात ती प्रथा असावी.

**शिक्षण आणि पांडित्य :** निरक्षरतेचे नेमके प्रमाण किती होते याचा उल्लेख नसला तरी ते बरेच मोठे असावे असे मानता येईल. निरक्षर स्त्रियांचे काही निर्देश आढळतात. त्यांना हातापायाच्या बोटांपेक्षा जास्त आकडेमोड जमत नसे म्हणून दिवस मोजण्यासाठी त्या आपल्या घराच्या भिंतीवर रेघा मारीत असत असे उल्लेख येतात. बहुसंख्य ब्राह्मण आणि बौद्ध भिक्षु व भिक्षुणी यांचा विशेषतः धर्मग्रथांचा अभ्यास होता. वाकाटक, मुंडपुत्र आणि कुंभकर्ण यांच्या कोरीव लेखांत अनेक ब्राह्मण आदात्यांचा त्यांची ज्या वेदांमध्ये आणि त्यांच्या शाखांमध्ये पारंगतता आहे त्यासह उल्लेख केलेला आहे. अश्मक (अस्सक) येथील ब्राह्मण बावरि आणि त्याचे जे विद्यार्थी श्रावस्तीला गेले ते अत्यंत विद्वान असले पाहिजेत. पश्चिम भारतातील तसेच आंध्रप्रदेशातील अमरावती आणि विदर्भातील पौनी येथील बौद्ध गुंफामधील अनेक कोरीव लेखांत बौद्धधर्मीय साहित्यातील विशिष्ट संहितांवर प्रभुत्व मिळविलेल्या भिक्षुंचे व भिक्षुणींचे संदर्भ दिलेले आढळतात. ज्यांना धार्मिक साहित्यात रुची नसे अशा व्यक्ती काव्यादी शास्त्रांचा आणि इतर तंत्रज्ञानात्मक लौकिक साहित्याचा व्यासंग करीत. सर्ववर्मन हा व्याकरणाचा थोर विद्वान होता आणि त्याने कालाप किंवा कातंत्र नामक व्याकरणग्रंथ रचल्याचे प्रसिद्ध आहे. गुणाढ्याने पैशाची भाषेत बृहत्कथा नावाने सुप्रसिद्ध असलेले काव्य रचले होते. अनेक प्राकृत कवी व कवयित्री विविध गाहा (गाथा) रचण्यात व्यस्त होत्या. हाल नामक राजकवीने त्यातील सातशे गाथा गाहा-सत्त-सई नामक संग्रहात संकलित केल्या असून तो ग्रंथ प्राकृत काव्यातील अद्वितीय निर्मिती मानला जातो. आजही त्याचे आकर्षण अतुलनीय आहे. नंतरच्या साहित्यसमीक्षकांनीही त्याचा गौरव केला असून ते त्याचा निर्देश कोश किंवा गाथाकोश असा करतात. अनेक कवींची नावे केवळ समकालीन किंवा उत्तरकालीन संहितांमधील उल्लेखांवरून समजतात. संस्कृत साहित्यही भरभराटीच्या अवस्थेत होते. संस्कृत गद्यकाव्याचा एक सुंदर नमुना जुनागढ येथील प्रसिद्ध कोरीव लेखात आहे. शक महाक्षत्रप पहिला रुद्रदामन याच्या काळातील हा कोरीव लेख आहे. सातवाहन राजा वासिष्ठीपुत्र पुळुमावि याच्या एकोणिसाव्या वर्षातील नाशिक प्रशस्ति हा प्राकृतातील तसाच मौल्यवान नमुना आहे.

ब्राह्मण बावरि याने आपल्या विद्यार्थ्यांसह अस्सक येथे वस्ती केली, यावरून प्रारंभिक ऐतिहासिक काळात तेथे गुरुकुल पद्धतीची शैक्षणिक संस्था असली पाहिजे. संदर्भसाधनात त्याच्याबद्दलची माहिती उपलब्ध नसली तरी अशाच धार्मिक व लौकिक शिक्षण देणाऱ्या संस्था सातवाहनाच्या व नंतरच्या काळात इतरत्र असाव्यात. बौद्ध धर्मग्रंथांतील काहींमध्ये पारंगत असलेल्या बौद्ध भिक्षु व भिक्षुणी यांच्या काही पिढ्यांची (गुरु-शिष्य-परंपरा) जी वर्णने कोरीव लेखातून आढळतात त्यावरून असे म्हणता येते की, शैक्षणिक केंद्रे असलेल्या विहारांचेच पुढे नालंदा विक्रमशीला यासारख्या मान्यताप्राप्त संस्थांमध्ये रूपांतर झाले. सामुहिक निवासस्थाने किंवा अधिवास यांनीही असेच कार्य पार पाडले असावे. वत्सगुल्म येथील सात्वत चरण याच्या अनुयायांचे असे दोन अधिवास (विहार) होते. वाकाटक राजा दुसरा प्रवरसेन याच्या मांढळ येथील

ताम्रपटातील दानपत्रात त्यांचा उल्लेख आहे. हे दोन विहार नागपूर जिल्ह्यातील मांढळच्या जवळपास अस्तित्वात असावेत.[१८७] ब्राह्मणी पांडित्याची मोठी केंद्रे म्हणून प्रसिद्ध झालेल्या उत्तरकालीन ब्राह्मणी मठांचे हे पूर्वावतार मानावे लागतील. वाकाटकांच्या काळात आणि तत्पूर्वी तसेच नंतरही वैदिक अध्ययनाची केंद्रे अस्तित्वात असावीत, तेथे वैदिक संहितांचा व्यासंग चालत असावा असे गृहीत धरण्यास वाव आहे.

**उत्सव, संमेलने** : नित्याच्या धकाधकीच्या जीवनातील औदासिन्य उत्सवाच्या प्रसंगाने दूर होते आणि लोकांना आनंद साजरा करण्याची त्यातून संधी मिळते. त्यातील ज्या दोहोंचा उल्लेख साहित्यातून व कोरीव लेखांतून वारंवार आढळतो ते आहेत 'क्षण' (सण) आणि 'समाज' (संमेलन). अशोकाच्या पहिल्या शिलालेखावरून आणि समृद्ध साहित्यिक पुराव्यावरून समाजाच्या प्रचंड लोकप्रियतेचा प्रत्यय मिळतो. ही संमेलने बहुधा राजेमहाराजे आयोजन करीत असत आणि त्याप्रसंगी आपल्या प्रजाजनांना ते मांस आणि अन्य स्वादिष्ट पदार्थ वाटत असत, तसेच कुस्त्या व इतर मनोरंजनाचे कार्यक्रम करून त्यांचे मनोरंजन करीत असत. गौतमीपुत्र सातकर्णि[१८८] आणि कलिंग राजा खारवेल[१८९] हे समाजाचे आयोजन करून आपापल्या प्रजाजनांचे रंजन करीत असत. अशोकाला या संमेलनांमध्ये अनेक दोष आढळले. त्याने त्यांच्यावर बंदी आणली आणि त्यांच्या ऐवजी समाजाचा दुसरा प्रकार सुरू केला. लोकांना सन्मार्गावर आणणारे आदर्श प्रसंग व दृष्ये त्यात दाखविली जात.[१९०] आपस्तंबाने समाज व सभा यात भाग घेण्यास विद्यार्थ्यांना मनाई केली आहे.[१९१]

गौतमीपुत्र सातकर्णीलाही क्षण (सण) साजरे करण्याचा छंद होता असे त्याचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुळुमावि याच्या कारकिर्दीच्या एकोणिसाव्या वर्षातील नाशिकच्या कोरीव लेखावरून समजते. गाहा-सत्त-सईमध्ये क्षणांचे अनेक संदर्भ आढळतात ते असे–लोक त्यांची उत्सुकतेने वाट पहायचे, पण ते जवळ आले की, त्यांचा उत्साह संपायचा (६८), लोक आपली शरीरे तऱ्हेतऱ्हेचे अलंकार व आभूषणांनी सजवायचे (३४,८२०), वाद्ये अशाप्रकारे वाजविली जायची की सहभाग घेणाऱ्यांनी तल्लीन व्हावे (५३५), स्त्रिया धान्य कांडून त्याचे पीठ करीत. अशावेळी त्यांचे अंग शुभ्र होत असे (६२४, ८२०). प्रेमदैवत असलेल्या मदनाच्या सन्मानार्थ उत्सव होत असे. त्यावेळी खेड्यातल्या तरुण स्त्रिया कुसुंबी रंग लावलेली वस्त्रे परिधान करीत (५४५), धम्मिल्ल पद्धतीची केशरचना करीत आणि सुरा पीत (६४४).[१९२] फाल्गुन महिन्यात फल्गुक्षण नामक सण साजरा होत असे, त्यात लोक एकमेकांच्या अंगावर रंग फेकत असत. तरुणींच्या अंगावर अगदी चिखल फेकणेही आक्षेपार्ह मानले जात नसे (३६९). उत्सवांच्या वेळी घरांच्या प्रवेशद्वारावर फुलांच्या कमानी (वंदन–मालिका) लावल्या जात (२६२), अतिथी आणि आप्तस्वकीय लांबच्या प्रवासावरून परत आल्यावर त्यांच्या स्वागतासाठी दरवाजाशी मंगलकलश ठेवले जात (२५६, १४०), असाच कलश जेव्हा त्याचे तोंड

पानांनी झाकले जाई तेव्हा ती सूचना प्रिय व्यक्तीच्या निघून जाण्याची असे (प्रस्थान-कलश), (१४३, ८३१). नांगरणीचा पहिला दिवस हा शेतीप्रधान समाजात खरा उत्सवाचा प्रसंग होता. त्यादिवशी नांगराला शुभचिन्हांनी सुशोभित केले जाई (१६५). काही रात्रोत्सव असायचे तेव्हा लोक रात्रभर जागे रहात (उज्जागरक, ५८) आणि गोदावरीसारख्या नद्यांच्या प्रवाहात स्नान करीत. त्यांनी आपल्या शरीरावर हळदीचा लेप लावलेला असल्यामुळे नद्यांचे पाणी पिवळे व्हायचे (५८). वैदिक देव इंद्र याच्या सन्मानार्थ जो उत्सव होई त्यात देवाचा ध्वज उभारणे आणि त्याला निरोप देणे असे विधी असत. प्राचीन काळापासून राजे लोक साजरा करीत आलेल्या या इंद्रमह (इंद्रध्वज) नामक उत्सवाला कमालीचे सामाजिक-धार्मिक महत्त्व प्राप्त झाले होते. तो भाद्रपद महिन्याच्या शुक्ल पक्षाच्या आठव्या दिवशी सुरू व्हायचा आणि कृष्ण पक्षाच्या पहिल्या दिवशी संपायचा.[१९३] नाट्यप्रयोगासारखे अनेक कार्यक्रम आठवडाभर सलग सुरू असत.[१९४] शूद्रकाच्या मृच्छकटिक नाटकात आणि वराहमिहिराच्या बृहज्जातकात यासंबंधीचे सविस्तर वर्णन आले आहे.[१९५]

जुगाराची (द्यूत) प्राचीन काळापासून चालत आलेली लोकप्रियता तशीच कायम राहिलेली दिसते. आपस्तंब धर्मसूत्र (२,९,२५, १२–१३) असे सांगते की, मोठ्या सभागृहात टेबल मांडून त्याची व्यवस्था केली जावी. त्याचे चित्र मृच्छकटिकात येते. हरणारा जुगारी तेथे वैराग्यवृत्तीने बुद्धधर्म स्वीकारतो असे दाखविले आहे.

**खाद्य आणि पेये** : तत्कालीन कालखंडातील लोकांच्या खाद्यसवयींबद्दल आपली संदर्भसाधने फारच थोडी माहिती पुरवितात. गाहा-सत्त-सई, कोरीव लेख आणि पुरातत्त्वीय उत्खनने यातून काही माहिती मिळते. यापुढील विवेचन याच आधारावर केलेले आहे. गाहा-सत्त-सईमध्ये धान्यांच्या पिकांमध्ये यव (जव, ४०२), साळ (शाली, ९, ५६७, ५६८, ६८९, १००३), व्रीहि (९५२) व कलम (६९०, ६९१) आणि रागी (राजिका, १७१), तेलबियांपैकी फक्त तिळाचाच (तीळ, ८, ६९३, ७६३) आणि डाळींपैकी तुरीचा (तुवरी, ३५८) उल्लेख आढळतो. महाराष्ट्रात झालेल्या उत्खननात या व इतर पिकांचे सातवाहनपूर्व, सातवाहन व वाकाटक काळातील पुरावे मिळाले आहेत. पवनार येथे तांदूळ, ज्वारी व अन्नधान्य अवशेष सापडले. सातवाहनपूर्व व सातवाहन काळात तांदळापेक्षा ज्वारी अधिक प्रमाणात असावी, तर वाकाटक काळात मात्र तांदूळ जास्त असावा असे दिसते.[१९६] कौंडिण्यपूर येथे अनेक प्रकारच्या तांदळाच्या जाती, मका[१९७] आणि डाळी व कडधान्ये[१९८] तसेच नेवासा येथे पुढील धान्यांचे पुरावे मिळाले आहेत. गहू, ज्वारी, बाजरी, हरभरा त्याचप्रमाणे धने, करडई, लांग किंवा लाख, नागली किंवा नाचणी, वाल, वाटाणा किंवा मटार, करडीच्या तेलबिया आणि कोद्रा प्रकारचा तांदूळ.[१९९] ते ज्या थरात सापडले ते चौथ्या व पाचव्या काळातील म्हणजे अनुक्रमे प्रारंभिक ऐतिहासिक व इंडो–रोमन काळातील आहेत. भोकरदनच्या उत्खननात गहू, तांदूळ, ज्वारी, मका, रागी, कॉमन पी, पीजन पी, मसूर, हरभरा, ग्रास पी, वाल आणि उडिद[२००] यांचे पुरावे मिळाले आहेत. गाहा-सत्त-सईमध्ये शिकाऱ्यांचा संदर्भ अनेक जागी येतो. उत्खननातून मिळालेला बराच पुरावा तत्कालीन

समाजात होणाऱ्या मोठ्या प्रमाणावरील मांसभक्षणावर प्रकाश टाकतो. ज्या प्राण्यांचे मांस लोक हमखास खात त्यात पाळीव बोकड, पाळीव मेंढ्या, बैल, ताज्या पाण्यातील कालव, ताज्या पाण्यातील बिव्हाल्व, मासे, नदीतील मऊ पाठीचे कासव, पाळीव कोंबडा, स्वॅम डिवर, पाळीव डुक्कर,[२०१] रेडा इत्यादींचे पुरातत्त्वीय पुरावे हाती आले आहेत.[२०२] गुराढोरांना भारतात मिळणारे पवित्र स्थान पाहता त्यांची जी क्षारभूत हाडे उत्खननात सापडली ती एखाद्या कर्मकांडाची गरज म्हणून तिथे ठेवली गेली असावीत. अर्थात क्वचित जागी काही वाङ्मयात त्यांचा खाद्य म्हणूनही उल्लेख मिळतो.[२०३]

वर उल्लेखिल्याप्रमाणे काही संदर्भ स्वयंपाकघराचे (महानस) आणि पाकक्रियेचे (रांधन–कर्म) मिळतात. हे स्त्रियांचे काम होते. कोल्हापूरातील ब्रह्मपुरी येथील प्राचीन स्थळी झालेल्या उत्खननात सातवाहन काळातील स्वयंपाक घराचे अवशेष मिळाले आहेत. येथे खड्डा क्रमांक १ मध्ये "आपल्याला १०" X ६". ६' आकाराचे मोठे स्वयंपाकगृह आढळते. त्यात वायव्येस दोन चुली आणि आग्नेयेस जमिनीत पुरलेला पाण्याचा रांजण आहे. मधल्या जागेत विटांची फरसबंदी असून काही भाग गायीच्या शेणाने सारवलेला आहे"[२०४] घरगुती सामानापैकी सूप (शूर्प, ५५७), मुसळ, (मुसल, ५०१), मातीची घागर (कूट २२९) आणि दळणाचे जाते याचा उल्लेख गाहा-सत्त-सईमध्ये मिळतो. पुरातत्त्वीय शोध जेथे घेतला गेला त्या ठिकाणी अशी उपकरणे मिळाली आहेत. खास सातवाहन पद्धतीचे चार पायांचे पाटे पवनार, पवनी, तेर, भोकरदन, कोल्हापूर (ब्रह्मपुरी), नाशिक, कौंडिण्यपूर, नेवासा, अडम इत्यादि स्थळी मिळाले आहेत. त्याचबरोबर पाटे-वरवंटे पुष्कळ प्रमाणात सापडले आहेत.[२०५] यापैकी काही ठिकाणी याच कालखंडातील पिठाची जाती मिळाली आहेत, त्यांचे मूळ स्थान आणि प्रेरणा परकीय आहे असे काही वेळा मानले जाते.[२०६]

कोरीव लेखांत[२०७] तसेच साहित्यातही[२०८] मिठाचे उल्लेख आढळतात. त्याचा वापर आजच्या प्रमाणेच तेव्हाही अन्न स्वादिष्ट करण्यासाठी करीत असत. अन्न शिजविण्यासाठी वापरल्या जाणाऱ्या लाकडी कोळशाचा (अंगार) उल्लेख वाकाटकांच्या जवळपास सर्वच ताम्रपटांत विशेषतः आदात्यांना दिलेल्या सवलतींच्या संदर्भात आला आहे. लाडू (लड्डूक, गाहा-सत्त-सई, ६४१) हा पदार्थ बराच आवडीचा असावा. पिकलेला आंबा (आम्र, ५९५), बोर (बदर, २००, २४०, ४१९), जांभूळ (जांबू-फल, ५३१), काकडी (कर्कटी, १०, ५३४) आणि पिकलेला मलूरा (५७९) किंवा अन्य अशा काही खाद्य फळांची नावे गाहा-सत्त-सईमध्ये आढळतात.

पेयांमध्ये काही फळांचे रस लोकप्रिय असले पाहिजेत. दूध आणि दुधापासून होणारे पदार्थ मोठ्या प्रमाणावर खाल्ले जात असावेत. वाकाटकाच्या जवळपास सर्वच दानपत्रांत आदात्यांना ज्या मुभा किंवा सवलती दिल्या आहेत त्यात दूध (क्षीर) हमखास समाविष्ट असल्याचे दिसते. पेयांचे अप्रत्यक्ष उल्लेखही त्यात अनेक ठिकाणी आढळतात. क्षहरात महाक्षत्रप नहपान याने कापुर जिल्ह्याच्या चिखलपद्र या खेड्यात

त्रिरश्मी (नाशिक जवळची पांडुलेण टेकडी) येथील बौद्ध संघाला नारळाच्या झाडाची आठ हजार रोपे (नालिगेरा) दिली होती.[२०९] असे दिसते की, एक फळ म्हणून तसेच त्याचे पाणी आणि तेल अशा विविध स्वरुपात नारळाचा वापर तेव्हाच्या लोकांच्या खाण्यापिण्यात मोठ्या प्रमाणावर असावा. ऊसाचे उत्पन्न मोठ्या प्रमाणावर घेतले जाई. ऊसाचा रस हे पेय लोकांच्या आवडीचे होते. ऊसाच्या घाण्या (जत) चा तसेच रस आटवून गूळ तयार करण्याचा उल्लेख (गाहा-सत्त-सई ५४१, ५४४, ७६९–७७०) अनेकदा आला आहे. ऊसाचा पुंड्रक नामक प्रकार विशेष असल्याचे मानले जात असे (गाहा-सत्त-सई ७३४). त्याला हे नाव पश्चिम बंगालातील पुंड्र या त्याच्या उगमस्थानामुळे पडले असावे. कांजिका (गाथा, २८६) म्हणजे तांदळाची आंबविलेली पेज लोक पीत असत.

ब्राह्मण, बौद्ध व जैन भिक्षु–भिक्षुणींचा अपवाद वगळता समाजातील इतर सर्वसामान्य लोक आणि अभिजन यांच्यात सर्वाधिक लोकप्रिय पेये ही अर्थातच मादक स्वरुपाची होती. तत्कालीन साहित्यातून तसेच पुरातत्त्वीय तथ्यांमधून हे स्पष्ट झाले आहे. सामान्यतः दारु गाळण्यासाठी लागणारी मधूक किंवा मोहाची (Bassiaatifolia) फुले गोळा करण्याचे काम अलीकडेपर्यंत स्त्रिया करीत (गाथा, १०४, ८७१) हे काम अगदी रात्री–बेरात्री करीत असत (६६६, १५९). ते करताना कधीकधी त्यांना चोरांचा व घुसखोरांचा मुकाबलाही करावा लागत असे. केवळ पुरुषच नव्हेत तर स्त्रियांही मद्यपान करीत असत हे त्यांच्या मुखांना येणाऱ्या मदिरेच्या वासाच्या उल्लेखावरून (गाथा, ५४४) दिसते. परस्परांविषयीचा प्रेमभाव उत्तेजित करण्यात या पेयाचा बराच वाटा असायचा (गाथा, २७०, ५५०). आंबविण्यासाठी लागणाऱ्या किण्व नामक द्रव्याचा उल्लेख मनू (८, ३२६) करतो. वाकाटकांच्या दानपत्रातही तो आढळतो. नीलकमळाच्या पाकळ्यांनी मद्य सुगंधित केले जात असे (नीलोत्पल–परिमल–वासिता, गाथा, ५३४). ही पद्धत पुढे बराच काळ सुरू होती हे श्यामिलककृत 'पाद–पाडितक', वराहमिहिराची 'बृहत्संहिता' आणि श्रीहर्षरचित 'नागानंद' या ग्रंथातून आलेल्या उल्लेखावरून स्पष्ट होते.[२१०] हे पेय चपकांतून (गाथा, ९११) पीत असत. चषक कधीकधी स्फटिकाचे असत (गाथा, ९२७) आणि पिण्याचे नियमित गुत्ते (पान--कुटी, गाथा २२७) असत. 'पेरिप्लस ऑफ दि एरिथ्रियन सी' वरून असे दिसते की, इसवी सनाच्या प्रारंभिक शतकात महत्त्वपूर्ण ठरलेल्या बॅरिगाझा (भरूच) या व्यापारी केंद्रात आयात होणाऱ्या वस्तुंमध्ये केवळ उंची मद्याबरोबरच मुख्यतः इटालियन लाओडिकन आणि अरेबियन मद्यांचा समावेश असायचा.[२११] ही मद्ये अत्यंत किंमती असावीत आणि सधन अभिजनांची ती आवड असावी असे दिसते. इसवी सनाच्या प्रारंभिक शतकांचे जे अवशेष उत्खननांत हाती आले आहेत त्यामुळे या माहितीला पुष्टी मिळते. महाराष्ट्रात व भोवतालच्या प्रदेशात अनेक पुरातत्त्वीय ठिकाणी निरनिराळ्या प्रकारचे मद्यकुंभ मिळाले आहेत. भूमध्य प्रदेशात असे कुंभ मद्य साठविण्यासाठी वापरले जात असत. तिथून आयात केलेले अनेक कुंभ नेवाश्याला सापडले असून अशांपैकी एकाच्या तुकड्याच्या आतल्या बाजूस लागलेल्या

काळ्या अवसादाचे (deposit) विश्लेषण केल्यावर स्पष्ट झाले की, भांड्याची सच्छिद्रता कमी करण्यासाठी लावलेला तो लेप डांबरसदृश्य राळ या पदार्थाचा असावा. अशी पद्धत रोमन लोकातही होती. ते हा पदार्थ मद्य टिकवण्यासाठीही त्यात घालायचे.[२१२] ही पद्धत भोकरदन,[२१३] नाशिक[२१४] आणि पवनार[२१५] यासारख्या वसाहतींमध्येही लोकप्रिय झाली होती असे तेथे आढळलेल्या मद्यकुंभांच्या तुकड्यावरून दिसते.

**पोषाख, अलंकार आणि प्रसाधनगृहे** : शिवलेले व न शिवलेले असे दोन्ही प्रकारचे कपडे वापरात असले तरी न शिवलेलेच कपडे अधिक लोकप्रिय होते. पुरुषाचा पारंपरिक वेष म्हणजे वर उत्तरीय वस्त्र आणि खाली आज जे धोतर म्हणून ओळखले जाते तसे अंतरीय वस्त्र. ही दोन्ही न शिवलेलीच असायची. बौद्ध भिक्षुंच्या नेहमीच्या वेषात तीन वस्त्रांचा (त्रि-चीवर) अंतर्भाव असायचा ती म्हणजे-(१) आंतरवासक, ज्याला युवान श्वांग निवसन असे म्हणतो. हे कमरेभोवती मेखलेने वांधलेले निम्न वस्त्र, (२) उत्तरासंग किंवा संकक्षिका हे उत्तरीयाप्रमाणे धारण केलेले वरचे वस्त्र आणि (३) संघाटी हे लांब पायघोळ अंगरख्यासारखे शिवलेले वस्त्र. शिवलेले कपडेही बरेच वापरात होते. यातले सर्वांत नित्याचे होते कंचुक. त्याचा आकार स्त्री आणि पुरुष यांच्यासाठी वेगवेगळा असायचा. आपस्तंब धर्मसूत्राने (१.२, ८.२) स्नातकास कंचुक घालण्याची परवानगी दिली आहे. विद्यार्थ्याला ते परिधान करण्याची मनाई होती. ते वस्त्र पुरेसे लांब आणि सैलघोळ असायचे. त्यावरूनच राजाच्या अंतःपुरातील अधिकाऱ्याला कंचुकिन हे अभिधान प्राप्त झाले. स्त्रियांबावत त्या वस्त्राचे प्रयोजन मुख्यत्वेकरून वक्ष झाकण्यासाठी असायचे. गाहा-सत्त-सईमध्ये स्त्रियांच्या संदर्भात त्याचा कंचुक (३९५, ६७२) व कंचुकिका (५४५, ६२०) अशा दोन्ही प्रकारे तसेच कूर्पास (७२३, ८०५) असाही उल्लेख पुष्कळदा आला आहे. वक्षांचा बराच भाग त्यातून उघडा रहात असे (३९५, ६२०). आज त्याला चोळी म्हटले जाते. समकालीन शिल्पकलेत आणि चित्रकलेत विशेषतः अजिंठ्याच्या लेण्यात वक्षांचा वरचा भाग सामान्यतः अनावृत्त दाखविला आहे. त्यातून बहुधा नग्नतेपेक्षा वस्त्राची पारदर्शकताच सूचित होत असावी. गुप्तांच्या नाणककलेत राण्या व देवता यांच्यासह ज्या स्त्रिया दाखविल्या आहेत त्या सगळ्या काचोळ्या किंवा कंचुकिका घातलेल्या अशा असून वक्षांच्या मध्यभागी त्यांच्या गाठी मारल्या आहेत. निम्नवस्त्र, जे बहुधा साडी हेच असते, तिचे अस्तित्व जाणवते ते सहज दिसणाऱ्या तिच्या काठांमुळे. स्त्री व पुरुष अशा दोहोंचीही शिरवेष्टने सर्वत्र आढळतात. ती जणू काही एक अपरिहार्य बाबच समजली जात असावी. स्त्रियांच्याबाबतीत ती साधी म्हणजे केवळ कपाळपट्टी किंवा डोक्याचा फक्त समोरचा भाग झाकणारी व दोन्ही बाजूंनी आणखी खाली उतरलेली असे, तर काहीवेळा अत्यंत मौल्यवान हिरेमाणके खोवून अलंकृत केलेली असे. पुरुषांच्या शिरवेष्टनाबद्दलही असेच दिसते. समाजाच्या उच्च, सधन घटकात त्याचे स्वरूप सजविलेल्या फेट्याचे किंवा तुरा लावलेल्या घट्ट टोपीचे असते. अजिंठा लेण्यातील

चित्रात इंद्राच्या डोक्यावर पहिल्या प्रकारचे शिरवेष्टन आढळते, तर चांदीच्या नाण्याच्या दुसऱ्या बाजूवर असलेल्या गौतमीपुत्र यज्ञ सातकर्णीच्या चित्रात दुसऱ्या प्रकारचे शिरवेष्टन आढळते. काही सातवाहन राजे मात्र असे शिरवेष्टन घालीत नसत, तर रत्नतुरा खोवण्यासाठी रिबीनीप्रमाणे एक पट्टी बांधत असत. शकांनी कधीकधी शंक्वाकार निमुळती शिरवेष्टने धारण केलेली दिसतात. क्षहरात महाक्षत्रप नहपान याचे मात्र त्याच्या चांदीच्या नाण्यांवर जे चित्र आहे त्यात त्याने पन्हाळीदार फेटा परिधान केला आहे. कार्दमकांची शिरवेष्टने त्यांच्या चांदीच्या नाण्यांवर जी आढळतात ती पोलादी शिरस्त्राणासारखी दिसणारी आहेत. घरातल्या घरात कोणते शिरवेष्टन घालावे यासंबंधी काही निश्चित संकेत होते असे दिसत नाही, ज्याच्या त्याच्या व्यक्तिगत आवडीनुसार ही निवड केली जात असे.[२१६]

शरीराच्या जवळपास प्रत्येक अवयवासाठी दागिने होते, स्त्री व पुरुष यांची जणू दागिन्यासाठी स्पर्धाच असायची. समाजातील सर्व स्तरातील स्त्रियांच्या संदर्भात अशा अनेक दागिन्यांची नोंद गाहा-सत्त-सईमध्ये केलेली आहे. चेहऱ्यावरच्या आभूषणांना मुखमंडन असे म्हटले जाई. त्यात कानातील कुंडलांचा (४४६) समावेश होता. बहुधा ती रत्नजडित असायची (रत्न-कुंडल, ३९८). त्यांच्यामुळे गाल सुंदर दिसायचे. कानात घालायच्या आणखी एका अलंकाराचा (कर्णाभरण, ३०२, कर्णावतंस, ४३९) उल्लेख आढळतो. त्यात कधी कधी नीलमणी (इंद्रनील, ३०२) खोवलेला असायचा. कंठहार (हार, ६६९, हारलता, ४४६, कंठिका, ७५), करभूषणे (वलय, १३३, २०५, २८३, ५३९, ८१६, ९२२, ९५३), हिरेजडित कमरपट्टा (मेखलिका, ४६३, मेखला, ५७४), सोनसाखळी (कनकदोरा, २११) आणि पैंजण (नूपुर, १८८) यांचे विविध प्रकार नोंदविलेले दिसून येतात. कंकण हे सौभाग्यलक्षण (५३९) मानले जाई. ज्यांचे पती दूर जात त्या स्त्रिया पतिविरहाने कृश होत असत आणि त्यांची कंकणे सैल होत असत असे म्हटले जायचे (१३३, २८३). पैंजणांचा अपवाद वगळता ही सर्व आभूषणे आणि बाजूबंदासारखे (केयूर) आणखी काही अलंकार, स्त्रियांप्रमाणेच पुरुषांच्याही अंगावर तत्कालीन शिल्पकृतीतून व अजिंठ्याच्या चित्रांमधून दाखविलेले आढळतात. ही शिल्पे व चित्रे सातवाहन आणि वाकाटक यांच्या काळातील आहेत. शाहीवर्तुळातील लोक मौल्यवान दागदागिन्यांचे खूप शौकिन होते. चांदीच्या नाण्यांवरील सातवाहन राजे आकर्षक चुडामणि व सुंदर कर्णभूषणे धारण केलेले आहेत. नथ हा अलंकार आज जसा स्त्रियांमध्ये खूप प्रचलित आहे तसा तो प्राचीन भारतात नव्हता. जेथे इतर सर्व अलंकार ठळकपणे दाखविलेले आहेत अशा शिल्पात व चित्रात तो कोठेही आढळत नाही किंवा समकालीन साहित्यातही त्याचे फारसे कोठे वर्णन केलेले दिसत नाही.[२१७] मात्र नागार्जुनकोंडा येथील प्राचीन सुवर्ण पदकावरील स्त्रीच्या नाकात तो अलंकार आहे आणि बहुधा त्याचाच ओराणी असा उल्लेख **अंगविज्जा** नावाच्या कुशाणकालीन प्राकृत ग्रंथात आला आहे.[२१८] पादत्राणांचे कितीतरी प्रकार समकालीन कलांमधून तसेच प्रारंभिक भारतीय साहित्यातून आढळतात.

महाराष्ट्र आणि आजूबाजूंच्या भागात अनेक ठिकाणी जी पुरातत्त्वीय उत्खनने किंवा शोधमोहिमा झाल्या त्यात विशेषतः मोठ्या प्रमाणावर स्वस्त तसेच मौल्यवान द्रव्यांचे आणि निरनिराळ्या आकाराचे अनेक मणी सापडले आहेत. विविध अलंकार तयार करण्यासाठी त्यांचा वापर होत असावा मणी तयार करण्याच्या कारखान्यांच्या अनेक जागाही सापडल्या आहेत. या काळात प्रचंड प्रमाणात भारतात आलेली सोन्याचांदीची सुंदर रोमन नाणी लोकांना इतकी आवडली की, त्यांनी तीच किंवा त्यांच्या धातुच्या वा मातीच्या प्रतिकृती अलंकार म्हणून वापरल्या. विविध ठिकाणी अशा अलंकारांचे कित्येक प्रकार सापडल्याच्या नोंदी आहेत.

वेषभूषा व आभूषणे याप्रमाणेच केशरचनेबाबतही अनेक मुबलक पुरावे प्रतिपाद्य काळापर्यंत मागे जाणाऱ्या अनेक चित्रात्मक व शिल्पात्मक आविष्कारातून हाती आले आहेत. चिकुर-भार (२९९, ५७२), धम्मिल्ल (२९१, ५४४, ९९२), लंबालक (५६६) आणि वेणी (२७३) अशा नावांनी ओळखल्या जाणाऱ्या केशरचनांचे उल्लेख गाहा-सत्त-सईमध्ये येतात. आजच्या उच्चतंत्र फॅशनकर्त्यांनाही लाजवील इतकी त्यांची विविधता कलाविष्कारांतून आढळते.[२१९]

सर्वच माणसे, विशेषतः स्त्रिया काजळ, चंदनलेप, लाक्षारस, सुगंधी लेप आणि चुर्णे लावून व पुष्पालंकार वापरून सुंदर दिसण्याचा प्रयत्न करीत असल्याचे दिसते. गाहा-सत्त-सईतील एका कडव्यात (१६९) स्त्रीच्या कपाळावरील तिलकचिन्हाचा उल्लेख आहे. केवळ सौभाग्य लेणे म्हणून ते सूचित केलेले नाही. कलाविष्कारातही ते अधूनमधून दिसते पण नेहमीच आढळत नाही.[२२०]

**मृतांची स्मारके :** तत्कालीन लोक मृतांची स्मृती टिकवण्याचे अनेक मार्ग अवलंबित असल्याचे आपल्याला कोरीव लेखांवरून कळते. एकंदरीत त्यांचे स्वरूप खालीलप्रमाणे असायचे–

(१) कुटुंबाच्या मूर्तिगृहात (प्रतिमागृह किंवा देव-कुल) पुतळा उभारणे. सातवाहन घराण्याच्या प्रारंभिक सदस्यांकडून हा मार्ग अवलंबिला जात असे. या घराण्याचा दुसरा सदस्य कण्ह (कृष्ण) याने आपला मृत भाऊ सिमुक सातवाहन याचा पुतळा नाणेघाट येथील गुहेत उभारून या प्रथेचा प्रारंभ केला. ती गुहा आता त्या कुटुंबाचे प्रतिमागृह झाली आहे.[२२१]

(२) मृत व्यक्तीला आवडणाऱ्या देवदेवतांचे मंदिर उभारून त्याला त्याचे/तिचे नाव देणे. अखेरचा सातवाहन राजा वासिष्ठीपुत्र पुळुमावि (पुळहामवि असे काही नाण्यांवर आहे) याने आपला मृत भाऊ वासिष्ठीपुत्र चंड साति (सातकर्णि) याच्या स्मरणार्थ एक शैव मंदिर उभारून त्याला चंडाशिव असे नाव दिले अशी माहिती त्याच्या वासना येथील कोरीव लेखातून मिळते.[२२२] त्यावरून चंड हा शैव असल्याचा आणखी एक पुरावा मिळतो. असेच एक स्मारक मंदिर वाकाटक राजा दुसरा रुद्रसेन याची गतभर्तृका

राणी प्रभावतीगुप्ता हिच्या स्मरणार्थ तिची मुलगी आणि मुलगा दुसरा प्रवरसेन यांनी उभारले. तिच्या वैष्णवपंथी श्रद्धा लक्षात घेता ते वैष्णव मंदिर होते आणि त्याला प्रभावती स्वामिन असे नाव तिच्या नावावरून देण्यात आले होते. हे रामटेकच्या केवल नरसिंह मंदिराच्या उजव्या भिंतीवर लावलेल्या काव्यबद्ध संस्कृत शिलालेखावरून समजते.[२२३] दुसरे उदाहरण वाकाटक इतिहासातून प्रवरेश्वर नामक शिवमंदिराचे देता येईल. ते प्रवरसेनाच्या स्मरणार्थ बांधले आहे. त्या मंदिरावरूनच सव्वीस खेड्यांचा प्रशासकीय महसुली गट प्रवरेश्वर–षड्विंशति–वाटक या नावाने ओळखला जातो.[२२४]

(३) ज्याचे स्मारक उभारावयाचे त्याची प्रतिकृति असलेली दगडी शिळाही उभारणे हाही स्मारकाचा एक प्रकार होता. तिला छायास्तंभ आणि छायाप्रस्तर अशी नावे आहेत. स्मारक खांबासारखे असल्यास छायास्तंभ म्हणत. आपल्या पट्टराणीच्या (महादेवी) स्मरणार्थ तिचा पती वासिष्ठीपुत्र शिवश्री पुळुमावि याने छायाप्रस्तर उभारले होते असे त्याच्या वनवासी कोरीव लेखावरून समजते.[२२५] या राणीचे नाव मात्र चुकून कोरायचे राहून गेले आहे. कोरीवकाम केलेला दुसरा एक स्तंभ महाक्षत्रपाचा मुलगा (कुमार) रुपियम्म याच्या स्मरणार्थ पवनी येथे उभारला आहे.[२२६] विजयपुरीच्या इक्ष्वाकुंनी असे अनेक छायास्तंभ नागार्जुनकोंडा येथे उभारले होते.[२२७]

(४) स्मारक शिळा किंवा स्तंभ उभारणे म्हणजे मृताचे स्मरण टिकवून ठेवण्याची ही पद्धत गुजरातेतील कच्छ भागात बरीच लोकप्रिय होती. स्मारक शिळांना यष्टी, लष्टी इत्यादी नावांनी ओळखले जाई. बहुधा मृत व्यक्तीचे आप्त किंवा मित्र त्याच्या/तिच्या स्मरणार्थ असे स्तंभ उभारीत. चष्टनाच्या कारकिर्दीत अंढाऊ आणि दौलतपूर येथील सर्व ज्ञात कोरीव लेखात काही व्यक्तींनी त्यांच्या मृतांच्या स्मरणार्थ उभारलेल्या अशा स्तंभाची नोंद आढळते.[२२८] कार्दमकांच्या काळातील आणखी काही अभिलेखांबाबतही हीच परिस्थिती आहे.[२२९]

(५) बौद्धांमध्ये त्यांच्या पूज्य गुरूंच्या स्मरणार्थ स्तूप बांधण्याची प्रथा होती. बुद्धाच्या शारीरिक अवशेषांवर किंवा त्याच्या वापरात असलेल्या वस्तूंवर बुद्धाच्या स्मरणार्थ बांधलेले असे स्तूप पश्चिम भारतातील गुहांमध्ये व अन्यत्र आढळले आहेत. ख्रिस्ताब्द सुरू होण्याच्या सुमारास ही प्रथा महाराष्ट्रात लोकप्रिय झाली आणि त्यानंतर अनेक शतके ती कायम राहिली असे दिसते. भाजा, बेडसा आणि कान्हेरी येथे या प्रथेच्या अस्तित्वाचा प्रत्यय मिळतो.[२३०] कान्हेरी येथे एकाच गुहेत (क्र. ८७) सत्तावीस पुरालेख आहेत. ती त्याच कामी वापरली असून तिला खऱ्या अर्थाने गुरुंचे स्मरणदालन म्हटले जाऊ शकते. ज्यांच्या स्मरणार्थ स्तूप बांधले त्या गुरुंची व्यक्तीशः नावे त्यांच्या उपाधींसह या पुरालेखांमधून दिली आहेत.

## अर्थव्यवस्था

**जमीनमालकी** : आजच्या प्रमाणे तेव्हाही शेती हाच लोकांच्या उपजीविकेचा मुख्य आधार होता. दख्खनमध्ये आज प्रचलित असलेल्या रयतवारी पद्धतीत आढळते तसेच

जमीनवाटपाचे स्वरूप पूर्वापार चालत आले आहे. मालकीहक्क व्यक्तींच्या स्वाधीन असून जमिनीचा आकार व्यक्तीच्या सामाजिक-आर्थिक स्थानानुरुप नेहमीच वेगवेगळा असल्याचे दिसते. अमीर-उमराव व सधन लोकांच्या ताब्यात सामान्य शेतकऱ्यांपेक्षा मोठाल्या जमिनींची मालकी असे. राज्यकर्त्यांच्याही मालकीच्या जमिनी असत.[२३१] आणि राज्य बरखास्त झाले किंवा आधीच्या राजाच्या जमिनी विजेत्याने हिरावून घेतल्या म्हणजे ही मालकीही हस्तांतरित व्हायची. सातवाहन सम्राट गौतमीपुत्र सातकर्णि याच्या राजवटीच्या अठराव्या वर्षीच्या नाशिक कोरीव लेखावरून असे समजते की, अपरकखडी नामक खेड्यातील दोनशे निवर्तने आकाराची जमीन या सम्राटाने नहपानाचा जावई ऋषभदत्त[२३२] याचा पराभव केल्यानंतर त्याच्याकडे आली आणि त्याने ती त्रिरश्मी (पंडुलेणा टेकड्या) येथे बौद्ध भिक्षुंना दान दिली.[२३३] जेव्हा एखादा सत्ताधीश दुसऱ्याच्या मालकीचा एखादा जमिनीचा तुकडा कोणाला भेट देऊ इच्छित असे, तेव्हा आधी त्याला तो मूळ मालकाकडून विकत घ्यावा लागत असे. अशाप्रकारे ऋषभदत्ताने (बहुधा गोवर्धन किंवा नाशिक) गावाच्या वायव्येकडील सरहद्दीवर असलेली जमीन तिचा ब्राह्मण मालक वाराहीपुत्र अश्विभूति याच्याकडून ४००० कार्षापण देऊन विकत घेतली आणि मग ती बौद्धसंघाला दान केली.[२३४] वाकाटक राजा दुसरा प्रवरसेन याच्या राज्यात चंद नामक एका व्यापाऱ्याने (वाणिजक) अर्धे खेडे विकत घेतले आणि ते काही ब्राह्मणांना दान दिले.[२३५] स्वतः दुसऱ्या प्रवरसेनाला जेव्हा प्रभावतीस्वामिन मंदिर (आजचे रामटेक येथील केवल नरसिंह मंदिर) बांधायचे होते आणि कदलीवाटक येथे सुदर्शन नावाचा तलाव खोदायचा होता तेव्हा त्याला त्यासाठी मालक/मालकांकडून जमीन विकत घ्यावी लागली होती असे अलीकडेच सापडलेल्या रामटेक कोरीव लेखावरून समजते.[२३६] इसवी सनाच्या प्रारंभिक शतकात जुन्नर येथे काही व्यक्ती जमिनीचे काही तुकडे तेथील बौद्धभिक्षुसंघाला करंज, वड, जांबू, ताड-माड आणि शाल वृक्षांची लागवड करण्यासाठी दान देत होते[२३७] असे दिसते.

**जमिनीचा बाजारभाव** : जमिनीच्या भावासंबंधी संदर्भसाधनातून माहिती मिळत नाही. ऋषभदत्ताने ४००० कार्षापण देऊन जमीन विकत घेतल्याची नोंद आहे, पण त्या जमिनीचे मोजमाप किती हे नमूद केले नसल्यामुळे प्रस्तुत संदर्भात त्याचा उपयोग होत नाही. वाकाटक अभिलेखात जेथे भूखंडांच्या खरेदीबद्दल उल्लेख आहेत तेथे किंमत किंवा मोजमापे याबद्दल तपशील दिलेले नाहीत. अर्थात जमिनीची किंमत तिची सुपीकता व स्थान यानुसार कमीजास्त होत असे. नाशिकच्या एका कोरीव लेखानुसार असे कळते की, अपरकखडी गावातली ती उपर्निर्दिष्ट जमीन लागवडीयोग्य नसल्यामुळे ते गाव ओसाड पडले होते. तेव्हा गौतमीपुत्र सातकर्णीने आपल्या राजवटीच्या चोविसाव्या वर्षात त्या २०० निवर्तने क्षेत्राच्या बदल्यात गोवर्धन गावाच्या सीमेलगतचे त्याच्या निम्मे आकाराचे (१०० निवर्तने) क्षेत्र दिले.[२३८]

**जमिनीची मोजमापे** : त्याकाळात रूढ असलेल्या जमीन मोजण्याच्या प्रमाणकांबद्दलही निश्चित काहीच सांगता येत नाही. जमिनीचे सर्वात लोकप्रिय मोजमाप निवर्तन हेच

असल्याचे सातवाहन आणि वाकाटक अभिलेखांवरून दिसते.[२३९] मात्र निवर्तनाची व्याख्या केलेली नाही. वस्ती-वस्तीत त्याच्या निश्चित आकारात तफावत दिसते;[२४०] एवढेच नव्हे तर एकाच प्रदेशात त्याचे वेगवेगळे अर्थ होत असे दिसते. अशाप्रकारे काही वाकाटक कोरीव लेख, ते सर्व दुसऱ्या प्रवरसेनाच्याच कारकिर्दीतील असूनही भूखंडाच्या दानांबद्दलच्या नोंदी करताना ती मोजमापे राजा-मानिकमान[२४१] राजक्य-मान[२४२] आणि राजन्य-मान[२४३] या शाही मोजमापानुसार निवर्तनांच्या स्वरुपात नोंदवितात.[२४४]

**भूदाने :** प्रत्यक्षात जरी जमिनींवर व्यक्तींची मालकी असली तरी तत्त्वतः शासनाचा त्या जमिनीवर अधिकार होता. कारण त्या जमिनीवर महसूल गोळा करण्याचा शासनालाच अधिकार होता आणि ते त्याचे उत्पन्नाचे मुख्य साधन होते. राज्यकर्ते संपूर्ण गाव बौद्ध विहारांना देत असे दाखले बहुसंख्य सातवाहन कोरीव लेखांत आढळतात. उदाहरणार्थ, नहपानचा जावई ऋषभदत्त याने बौद्धांना व ब्राह्मणांना गावे दिल्याच्या किंवा वाकाटकांच्या व नंतरच्या अभिलेखात ब्राह्मणांना किंवा शैव-वैष्णव मंदिरांना अशा देणग्या दिल्याच्या नोंदी आहेत. अशावेळी गावाच्या जमिनी नव्हेत तर फक्त त्यावरील शेतसारा गोळा करण्याचे व इतर काही विशेषाधिकार शासनाकडून आदात्यांना दिले जात असत. याचा अर्थ असा की, त्यानंतर दान जमिनींच्या मालकांनी राज्यसंस्थेऐवजी आदात्यांना सर्व कराचे पैसे द्यायचे. गावाच्या संधीभूत मंडळांकडेही गावांची मालकी असल्याची उदाहरणे आहेत. नाशिकच्या कोरीव लेखात नाशिकच्या 'लोकांनी' दंभिक नामक खेडे दान दिल्याची नोंद आहे.[२४५] 'लोंकानी' याचा अर्थ 'त्यांच्या प्रातिनिधिक मंडळाने' असा होतो. पडीक जमिनी लागवडीखाली आणण्याच्या आणि शेतमालाचे उत्पादन वाढवून वाढत्या लोकसंख्येशी मेळ घालण्याच्या दृष्टीने या भूदानांनी महत्त्वाची भूमिका पार पाडल्याचे दिसते.

जमिनी आणि गावे जेव्हा धार्मिक संस्थांना किंवा व्यक्तिगत प्रतिग्रहीना धार्मिक कारणासाठी दान मिळे तेव्हा राज्यसत्तेला किंवा तिच्या प्रतिनिधींना मिळणारे विशेपाधिकार आणि सवलती (परिहार) दान घेणाऱ्यांना लाभत असत. ख्रिस्ताब्दाच्या प्रारंभिक शतकांमध्ये त्यात 'चाट' आणि 'भट' (पोलीस व सैनिक), तसेच अन्य सरकारी अधिकारी यांच्या प्रवेशापासून मुक्तता, सरकारी हस्तक्षेपापासून सूट तसेच मिठासाठी जमीन खोदली जाण्यास प्रतिबंध आणि इतर सवलतींचा लाभ (सव-जात-परिहारेहि) या बाबींचा अंतर्भाव होता. या मुद्यावर वाकाटकांच्या कोरीव लेखात अधिक तपशील आहेत. त्यानुसार ब्राह्मणांना दान दिलेल्या खेड्यांसोबत ज्या प्रमाणभूत सवलती व विशेषाधिकार असत (चातुर्वेद-ग्राम-मर्यादा) त्यात पुढील गोष्टी होत्या– कर देणे, रूढीनुसार गायी व बैल, फुले व दूध, गवत पुरविणे, दौऱ्यावरच्या सरकारी अधिकाऱ्यांना निवास सोयी व जळणाचा कोळसा देणे, आंबवलेल्या मद्याच्या खरेदीवर कर देणे यापासून मुक्तता, मिठासाठी खोदकाम करण्यातून तसेच सक्तीने करावयाच्या कोणत्याही प्रकारच्या कामातून सूट, सर्व गुप्तधनांचे व साठ्यांचे हक्क, लहान-मोठ्या करांची सूट आणि दान दिलेल्या या खेड्यांचे व जमिनींचे हे लाभ दान घेणाऱ्याप्रमाणेच

पुढे त्यांच्या मुलांना व नातवंडानाही मिळण्याची हमी.[२४६] अर्थात हे स्पष्ट करायलाच हवे की, जमीनदानातून फक्त पूर्वी राज्यसत्तेकडे असलेले हक्क आदात्याकडे हस्तांतरित होत असत; पण जमिनीच्या कायदेशीर मालकीबावत काहीच फरक पडत नसे. ती शेतकरी मालकांकडेच कायम रहात असे. नेहमीचे कर आणि इतर पैसे त्यांना शाही दानपत्रांचे जे प्रतिगृहाचे आहेत त्यांना द्यावे लागत एवढेच.

**शेतीची कामे आणि शेतमाल** : या विषयी कोरीव लेखांत फारच थोडी माहिती आढळते. वत्सगुल्म शाखेचा वाकाटक राजा देवसेन याच्या इंडिया ऑफिस ताम्रपटात नांगर-वाटक नावाच्या खेड्याचा उल्लेख येतो.[२४७] त्याचा अर्थ ते खेडे नांगर निर्मितीच्या उद्योगासाठी प्रसिद्ध होते की, उत्तम नांगरणी करणाऱ्या माणसांसाठी की, शेतकऱ्यांसाठी हे नक्की सांगता येत नाही. पण हे नाव शेतीशी संबंधित आहे हे निश्चित. इसवी सनाच्या प्रारंभिक शतकाच्या दोन काम्य अभिलेखांत आपली शेते नांगरून घेणाऱ्यांचा (हालायिक)[२४८] आणि नांगरणाऱ्यांचा (हालिक)[२४९] उल्लेख आढळतो. सर्वांत महत्त्वाचा उल्लेख वाकाटक राजा दुसरा प्रवरसेन याच्या अखेरच्या ज्ञात वर्षातील (३२) पवनी येथील दानपत्रात सापडतो. या राजाने अचलपूर नामक खेड्यात दुसऱ्या एका जमिनीच्या बदल्यात एक भूखंड व घराची जागा दिल्याची नोंद या दस्तऐवजात केली आहे. हे अचलपूर कृष्णालेशालि–कटक नामक प्रशासकीय विभागात असल्याचे सांगितले जाते.[२५०] वि. भि. कोलते यांनी या अभिलेखाचे संपादन केले आहे. लेखातील कृष्णालेशालीच्या कटकात हे खेडे असून ते तेव्हा साळीच्या भरपूर पिकासाठी प्रसिद्ध असावे हे आता सर्वज्ञात झाले आहे. खरे तर त्या नावावरून आपल्याला काली कमोद किंवा काली मूंछ अशा तांदळाच्या उत्तम प्रकारांची नावे ज्ञात होतात. अशाच एखाद्या साळीच्या प्रकारावरून हे नाव पडले असावे असे वाटते. तांदळाच्या उदंड पिकासाठी हा प्रदेश विख्यात असावा. आजही भंडारा हा भाग महाराष्ट्रातील तांदळाचे आगर मानला जातो.[२५१]

या विषयाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण असलेली वरीचशी माहिती गाहा-सत्त-सईमध्ये विखुरलेल्या सूचक उल्लेखांमधून मिळते. त्यात नांगराची (१६५, ३२४) व नांगरणाऱ्यांची (गाथा क्र. ८४, १०७, १८०) अशी २१ वेळा नोंद येते. तसेच पिके कापणीला आल्याचे व त्यांच्या थप्प्या खळ्यात लावल्याचे (५६८) व उत्तम पीक आल्याने शेतकरी आनंदीत झाल्याचे (५६७) संदर्भही आहेत. वार्ली, तांदळाच्या विविध जाती, तेलबिया व डाळी अशा विविध पिकांचे तसेच कापूस (कर्पास, ३५९, ३६०) आणि अंबाडी (शण, ९) या पिकांचाही उल्लेख आला आहे. खरेतर महाराष्ट्र कापसाच्या उत्पादनासाठी नेहमीच प्रसिद्ध होता. कारण येथील जमीन त्या पिकाच्या लागवडीसाठी अत्युत्तम आहे. 'पेरिप्लस ऑफ दि एरिथ्रियन सी' मधील नोंदीप्रमाणे इसवी सनाच्या पहिल्या शतकात जेव्हा बॅरिगाझा (आधुनिक भरुच) बंदर जेव्हा या प्रदेशात अंतर्भूत होते तेव्हा ठिकठिकाणाहून कापसाचे प्रचंड साठे येथे यायचे आणि येथून ते पश्चिमी बाजारात निर्यात व्हायचे.[२५२] तगर (आजचे उस्मानावाद जिल्ह्यातील तेर)

हे गाव सामान्य प्रतीच्या कापसाचा प्रचंड पुरवठा करीत असे.[२५३] तेव्हा मिन्नर म्हणून ओळखले जाणारे जुन्नर (जिल्हा पुणे) हे गावही कापूस पुरविणारे असले पाहिजे. नहपानाच्या राजधानीच्या गावातून मोठ्या प्रमाणावर सुती कापडाची "निर्यात" बॅरिगाझा येथे होत असे[२५४] असा स्पष्ट निर्देश नसला तरी राजधानीच्या जवळपासच्या अनेक ठिकाणाहून कापसाचा भरपूर पुरवठा होत असला पाहिजे. महाराष्ट्र, गुजराथ, आंध्रप्रदेश आणि मध्य प्रदेशातील छत्तीसगढ येथील उत्खननातील पुराव्यांनुसार ख्रिस्तपूर्व काही शतकांत आणि इ. स. च्या प्रारंभिक शतकांत संपूर्ण दख्खनचा भाग आणि मध्यभारत कापसाच्या पिकाने समृद्ध असल्याचे दिसून येते.

**शेतकरी आणि त्यांची आर्थिक स्थिती** : अनेक प्रारंभिक कोरीव लेखांत आढळणाऱ्या गहपती (गृहपती) आणि कुटुंबिन संज्ञांचा 'शेतकरी' असा अर्थ घेतला जातो.[२५५] या दोन्ही संज्ञा खेड्यात वा शहरात राहणाऱ्या गृहस्थाचा[२५६] किंवा कुटुंब प्रमुखाचा निर्देश करतात.[२५७] प्रारंभिक काम्य पुरालेखामध्ये त्यांचा वापर मुख्यत्वे दानधर्माच्या, विशेषतः धार्मिक स्वरुपाच्या कृतीच्या संदर्भात झालेला दिसून येतो.[२५८] त्यांच्यापैकी बहुतेकजण शेतकरी होते आणि समकालीन अर्थव्यवस्थेचे प्राधान्येकरून शेतकी स्वरूप पाहता ते स्वाभाविकही होते. गुंफा, राहण्याची खोली किंवा पाण्याचा हौद आणि तत्सम बाबींचे महाराष्ट्र व आंध्रप्रदेश भागात इतस्ततः विखुरलेल्या बौद्ध भिक्षुसंघांना इसवी सनाच्या प्रारंभिक शतकात त्यांनी उदारहस्ते दान केलेले दिसून येते. त्यामुळे त्यांच्यापैकी किमान काहीजण तरी प्रतिष्ठित असावेत.

**जलसिंचन** : शेतीची पिके काढण्यासाठी जलसिंचन आवश्यकच होते. पावसाळी पाणी साठवून उपयोगात आणता यावे यासाठी तळी खोदणे गरजेचे होते. तशी ती खोदल्याचे पुरावे सापडले आहेत. ख्रिस्तपूर्व-चौथ्या शतकात चंद्रगुप्त मौर्याच्या राजवटीत त्याचा प्रांतिक राज्यपाल वैश्य पुष्यगुप्त याने जुनागढ येथे सुदर्शन नामक तलाव (किंवा धरण) खोदला होता. त्याला पुढच्या शतकात चंद्रगुप्ताचा नातू अशोक मौर्य याच्या कारकिर्दीत राजाच्या कीर्तीला शोभतील असे कालवे तुषास्प नामक त्याचा यवन राष्ट्रीयाने (यवन-राजा) काढले होते. इसवी सनाच्या दुसऱ्या शतकात शक महाक्षत्रप रुद्रदामन (पहिला) याच्या काळात प्रचंड चक्रीवादळाने तलाव व कालवे उध्वस्त झाले. त्यांना मोठमोठाली खिंडारे पडली होती. ती बुजविण्यासाठी येणारा खर्च प्रचंड होता. ते पुन्हा उभारण्याला मंत्रिगण अनुकूल नव्हते, उलट ते न करण्याचाच सल्ला देत होते. तरीपण रुद्रदामनने ते उभारले व अधिक बळकट केले. कुलैपाचा मुलगा पहलव मंत्री सुविशाख याची आनर्त व सुराष्ट्र या संपूर्ण प्रदेशांचा शासक म्हणून नेमणूक झालेली असताना त्याने त्या तलावाचा तीनदा विस्तार केला आणि त्याला अधिक शोभनीय (सुदर्शनतर) केले. त्यासाठी त्याने प्रजाजनांवर अधिकतर करांचा भार टाकला नाही. तेव्हाच्या प्रथेनुसार विनामेहनताना सक्तीचे श्रम मात्र घेतले. या धरणाची किंवा तलावांची कहाणी आणि पहिल्या रुद्रदामनने केलेली त्यांची पुनर्बांधणी याचे रोचक वर्णन त्याच्या गिरनार-प्रशस्तीत आले आहे; किंबहुना तोच गिरनार-प्रशस्तीचा

मुख्य विषय आहे. ही प्रशस्ती म्हणजे संस्कृत काव्याचा उत्तम नमुना असून संस्कृत गद्यकाव्याच्या इतिहासातील तो महत्त्वपूर्ण टप्पा आहे.[२५९] तसा स्पष्ट उल्लेख नसला तरी हे धरण किंवा तलाव जलसिंचनाच्या दृष्टीने निःसंशयपणे अत्यंत उपयुक्त ठरला असावा.

हा प्रचंड व सुंदर तलाव इतका प्रसिद्ध पावला की, विदर्भात काही शतकानंतर खोदलेल्या तळ्यांना त्याचे नाव देण्यात आले. अशाच एका छोट्या तळ्याचा उल्लेख रामटेक येथे सापडलेल्या कोरीव लेखात मिळतो.[२६०] वाकाटक राणी प्रभावतीगुप्ता हिच्या स्मरणार्थ तिचा पुत्र दुसरा प्रवरसेन याच्या कारकिर्दीत हा तलाव खोदला होता आणि त्यास सुदर्शन हे नाव दिले होते. दुसरे एक तळे इसवी सनाच्या उत्तरार्धात अकोला जिल्ह्यातील हिस्से बोराळा येथे त्याच राजघराण्याच्या वत्सगुल्म शाखेचा राजा देवसेन याच्या राज्यात त्याच्या स्वामिल्लदेव नामक अधिकाऱ्याने खोदून घेतले होते. अशी माहिती त्याच्या त्या जागी मिळालेल्या कोरीव लेखात मिळते. वाकाटकांचा शककाळातील हा एकमात्र अभिलेख आहे. तळे बांधणारा हा अधिकारी बहुधा मुळचा सौराष्ट्राचा असावा आणि त्यामुळे त्याला सुदर्शन नावाच्या प्रसिद्ध तलावाची माहिती असावी.[२६१] ही सर्व तळी जलसिंचनासाठी तसेच पिण्याच्या पाण्यासाठीही वापरली जात असावीत.

हे स्रोत व इतर जलाशय आणि तलाव याबरोबरच जलसिंचनासाठी पाण्याचे इतर स्रोतही वापरले जात असावेत. दुसऱ्या पृथिवीषेणाच्या माहुरझरी ताम्रपटांमध्ये पृथिवीसमुद्रचा उल्लेख आहे. तो माहुरझरी येथील मोठा तलावच असावा आणि त्यावरूनच या गावाचे ते नाव पडले असावे. अलंकारिक अर्थानेच त्याला समुद्र संबोधले असावे आणि इतरत्र दर्शविल्याप्रमाणे दुसऱ्या पृथिवीषेणाच्या नावावरून त्याचे पुनर्नामांकरण झाले असावे.[२६२] पाटणा येथील वस्तुसंग्रहालयात दुसऱ्या प्रवरसेनाच्या कारकिर्दीतील जी ताम्रपत्रे आहेत त्यात मधुकझ्झरी नामक खेड्याचा किंवा ओढ्याचा उल्लेख आहे. शिवाय तेथे त्याच नावाचे तळेही असले पाहिजे.[२६३] पायऱ्यांच्या छोट्यामोठ्या व विनपायऱ्यांच्या विहिरी, असंख्य पाण्याचे हौद आणि नद्या यांचाही वापर गरजेनुसार पिकांना पाणी पुरविण्यासाठी होत असावा. जलसंचालित उद्योगातील कर्मचारी व अभियंते (औद्यांत्रिक) यांनी या साठ्यांमधून पाणी खेचण्याची यांत्रिक उपकरणे शोधून शेतीविकासाच्या कामी हातभार लावलाच असेल. गाहा-सत्त-सईमध्ये (६२८) उन्हाळ्यात पाणी कमी होणाऱ्या पायऱ्यांच्या विहिरीचा उल्लेख आहे. तसेच पिकांना पाण्याचा पुरवठा नियंत्रित करण्यासाठी मातीचे बंधारे-पाळे (केदार) असल्याचाही निर्देश आहे (६९०).

**फलोद्यान** : मौर्य सम्राट अशोकाच्या[२६४] शिलालेखावरून (राजाज्ञा क्रमांक दोन) असे समजते की, त्याने जनसामान्यांच्या व प्राण्यांच्या वैद्यकीय इलाजाची सोय केली होती, दुर्मिळ औषधांची रोपटी जेथे असतील तेथून आणून साम्राज्यात सर्वत्र लावली होती. कंदमुळांची व फळझाडांची त्याने अशीच सोय केली होती आणि यात्रेकरुंच्या व प्राण्यांच्या सोयीसाठी रस्त्यांच्या दुतर्फा झाडे लावली होती. त्याच्या स्तंभलेखात

(राजाज्ञा क्रमांक सात) याबद्दलचा आणखी तपशील आहे तो असा–रस्त्याच्या कडेला प्राण्यांना व माणसांना सावली मिळावी म्हणून त्याने वडाची झाडे लावली, आमराया लावल्या,[२६५] पाणपोया सुरू केल्या, अनेक विहिरी खोदल्या, दर अर्ध्या कोसावर विश्रामगृहे बांधली[२६६] इत्यादी.

झाडे लावणे आणि बागा तयार करणे हे 'पूर्त' कार्य मानले जाऊ लागले. प्राचीन भारतीय धर्मग्रंथांनी त्यास पुण्यप्रद ठरविले. अनेक सत्ताधीशांनी आणि सामान्य व्यक्तींनी ते कार्य हिरिरीने पुढे नेले. ऋषभदत्ताच्या नाशिक येथील एका कोरीव लेखात त्याने नारळाच्या झाडाची ८,००० रोपे कर्पूर जिल्ह्यातील चिखलपद्र या खेड्यात लोकांना वाटली असा उल्लेख आहे.[२६७] येथील आणखी एका पुरालेखात[२६८] तो असे सांगतो की, नानंगोला नावाच्या दुसऱ्या गावात नारळाचीच ३२,००० रोपे त्याने चरक पंथाच्या संन्याशांना दान दिली.[२६९] इसवी सनाच्या प्रारंभिक शतकांच्या काळातील जुन्नरच्या काही कोरीव लेखात त्या गावच्या काही व्यक्तींनी तेथील बौद्ध भिक्षु-संघाला जमिनीचे काही लहान तुकडे करंजा, वड, आंबा, जांभुळ, शाल आणि इतर झाडे लावण्यासाठी दान दिले अशी नोंद केलेली दिसते.[२७०]

प्रारंभिक कोरीव लेखात काही वस्त्यांची नावे एखाद दुसऱ्या वनस्पतीवरुन दिलेली आढळतात. त्यावरून तेथे जाणीवपूर्वक विशिष्ट झाडांची लागवड केली असल्याचे सूचित होते. हे अभिलेख सातवाहन, वाकाटक आणि त्यानंतरच्या काळातील असून सातवाहनोत्तर काळात त्यांची संख्या वाढत गेलेली आहे. वनस्पतींपासून ज्यांच्या नावाची व्युत्पत्ती झाली आहे अशी ठिकाणांची किंवा विभागांची काही नावे इसवी सनाच्या प्रारंभिक शतकांमध्ये आढळतात. ती अशी– शाल्मलीपद्र,[२७१] विदर्भ,[२७२] शाख,[२७३] मूलक,[२७४] कर्पूराहार,[२७५] नानंगोला,[२७६] पिंडीतकावड,[२७७] महावनसल,[२७८] कामवन,[२७९] इत्यादी. वाकाटकांच्या कोरीव लेखात अशी आणखी कितीतरी नावे येतात. उदाहरणार्थ, अजकर्ण,[२८०] बदरीग्राम,[२८१] दर्भपथ,[२८२] दर्भविरक,[२८३] दर्भमलक,[२८४] कोविदारिका,[२८५] कोशंबक,[२८६] कोशंबखंड,[२८७] अंजनवाटक,[२८८] कदंबसरक,[२८९] अश्वत्थखेटक,[२९०] अश्वत्थनगर,[२९१] चिंचपल्ली,[२९२] एकार्जुनक,[२९३] करंजविरक,[२९४] वटपूरक,[२९५] पद्मपुर,[२९६] श्रीपर्णक,[२९७] श्रीपर्णिका,[२९८] जातीखेटक,[२९९] कदलीवाटक,[३००] नीलीग्राम,[३०१] आराम,[३०२] इत्यादी. मुंडपुत्र राजा आदित्यराज याच्या वाकाटकोत्तर मल्हारा ताम्रपत्रात आम्रगर्तिका, आम्रवाटक, चिंचपल्लिका, शंशपादिका आणि निग्गोंडीज्जरा या नावाच्या खेड्यांचा उल्लेख आढळतो.[३०३] द्रोणस्वामिन हे त्याकाळी अत्यंत लोकप्रिय असलेले व्यक्तिनामसुद्धा वनस्पतीवरूनच पडलेले आहे. कुंतल येथील कदंब राजघराण्याचे नाव कदंब वृक्षापासून तर शालिवाहन हे नाव साळीवरून पडलेले होते. कमळाचा उल्लेख असलेली व्यक्तिनामेही आढळतात.[३०४]

**प्राणिजात** : वनस्पतींप्रमाणेच महाराष्ट्र व जवळचे प्रदेश प्राणिसृष्टीबाबतही समृद्ध होते. अनेक व्यक्तिनामे व स्थलनामे प्राणिसृष्टीतून घेतलली आहेत. उदाहरणार्थ, इसवी सनाच्या प्रारंभिक शतकात आपल्याला पुढील प्राण्यांशी व पक्षांशी संबंधित नावे

आढळतात–गुरेढोरे,[३०५] हत्ती,[३०६] म्हशी,[३०७] सिंह,[३०८] कोल्हे,[३०९] हरीण,[३१०] डुकरे,[३११] कुत्री,[३१२] सापासारखे सरपटणारे प्राणी,[३१३] उंदीर,[३१४] आणि मोर,[३१५] चकोर,[३१६] वलाहक,[३१७] यांच्यासारखे पक्षी. वाकाटकांच्या पुरालेखांत या प्राण्यांवरून आलेल्या नांवाच्या,[३१८] जोडीलाच बेडूक,[३१९] कोकीळा,[३२०] मासे,[३२१] पाळीव डुकर,[३२२] गिधाडे,[३२३] इत्यादींवरुन तयार झालेली नावेही दिसून येतात.

वरील विवरणावरून असे म्हणता येते की, दख्खन आणि मध्यभारत या प्रदेशातील वनस्पतींची व जंगली आणि पाळीव प्राण्यांची संख्या बरीच मोठी होती.

**गुलामगिरी व मजुरी** : शेतात आणि उद्योगधंद्यात तसेच नानाविध सेवांमध्ये राबण्यासाठी अंगमेहनत करण्याऱ्या मोठ्या वर्गाची गरज होती. संदर्भसाधनांत गुलामगिरीचा एकही निर्देश नाही. पण धर्मशास्त्रांच्या संहितांमध्ये[३२४] दासांबद्दल जे काही सूक्ष्म तपशील आढळतात त्यावरून प्राचीन भारतात ती प्रथा मोठ्या प्रमाणावर अस्तित्वात होती असे दिसते महाराष्ट्राचाही त्याला अपवाद नसावा. पण त्यांना मिळणारी वागणूक इतकी मानवतापूर्ण व सौम्य होती की, मेगॅस्थेनीससारख्या परकीयाची अशी समजूत झाली की, येथे गुलामगिरी नव्हतीच.[३२५]

विनावेतन सक्तीचे श्रम (विष्टी) घेण्यास प्राचीन भारतीय विचारवंतांची संमती होती. काही कोरीव लेखात त्याचा उल्लेख आहे. शक महाक्षत्रप पहिला रुद्रदामन आपल्या जुनागढ कोरीव लेखात असे अभिमानपूर्वक नमूद करतो की, त्याने सुदर्शन तलाव विष्टीचा अवलंब न करता पुन्हा पूर्ववत केला.[३२६] त्यावरून त्या काळात वेठबिगारीचे काम करून घेण्याची प्रथा किमान सार्वजनिक उपयोगाच्या कामाबाबत तरी सर्रास प्रचलित होती. वाकाटकांचा सर्व जमिनींच्या दानपत्रात एक विधान ठोस स्वरुपात येते ते म्हणजे ही दाने सर्व प्रकारच्या विष्टीपासून मुक्त होती (सर्व-विष्टी-परिहार-परिहृत). दुसऱ्या प्रवरसेनाच्या दुदिया येथील ताम्रपत्रांमध्ये जेथे अंगमेहनती लोक रहातात अशा कर्मकारग्रामाचा उल्लेख आहे,[३२७] तर गाहा-सत्त-सई (६९२) मध्ये नुकत्याच नेमल्या गेलेल्या शेतमजुराचा असा उल्लेख आहे की, कुठल्या तरी चित्तविक्षेपामुळे त्याचे लक्ष नांगरणीवरून अन्यत्र वळले होते.

**उद्योगधंदे** : त्याकाळी उद्योगधंदे भरभराटीस आले होते. पुरालेखात आणि वाङ्मयीन साधनांमध्ये औद्योगिक आधार असलेल्या अनेक व्यवसायांचे संदर्भ आढळतात. ऊसाची लागवड मोठ्या प्रमाणावर होत असे. पुण्ड्रक हा त्याचा प्रकार अति रसदार होता असे दिसते.[३२८] ऊसाचा रस काढण्याचे यांत्रिक घाणे असायचे.[३२९] रसापासून गूळ बनवित असत.[३३०] गाहा-सत्त-सईमध्ये आलेल्या ठळक वर्णनावरून असे दिसते की, गूळ उद्योग पश्चिम महाराष्ट्रात, विशेषतः खेड्यांत बराच तेजीत होता. नंतरच्या काळातही रत्नागिरी-कोल्हापूर भाग या उत्पादनासाठी प्रसिद्ध होता. त्या भागात सापडलेल्या कोरीव लेखात ऊस आणि गूळ ही विशेषणे लावून तयार

झालेली गावांची अनेक नावे आढळतात. काही खेड्यांचे तर ऊसाचे पीक आणि गूळ उद्योग हेच उत्पन्नाचे मुख्य साधन होते.[३३१]

सूतगिरण्यांमधून सामान्य पोषाखांची तशीच महागड्या परिधानांचीही वस्त्रे विणली जात असत. विणकरांचा (कोलिक) तो ऐन बहराचा काळा होता आणि त्यांना त्यांच्या प्रतिष्ठेमुळे व निष्ठेमुळे उज्ज्वल कीर्ती लाभलेली होती. गोवर्धन येथे त्यांचे मध्यवर्ती केंद्र होते. तेथे विणकरांची मोठी संख्या होती. त्यांच्या दोन श्रेणी तेथे अस्तित्वात होत्या आणि त्या केवळ सामान्य जनतेच्याच नव्हे तर राज्यकर्त्या वर्गाच्याही विश्वासास पात्र ठरल्या होत्या.[३३२] कापसाचे भरपूर पीक आणि कापूस व सुती वस्तू यांना थेट देशाबाहेरूनही येणारी प्रचंड मागणी या कारणांमुळे सूतगिरणी उद्योगांची भरभराट सहज लक्षात येऊ शकते. "पेरिप्लस ऑफ दि एरिथ्रियन सी" ग्रंथात या संबंधीचे स्पष्ट उल्लेख आलेलेच आहेत.

तेलघाण्याचा (तिलपिषक) उद्योगही तेजीत होता, कारण समाजाच्या सर्व स्तरांच्या विविध प्रकारच्या तेलांच्या दैनंदिन व प्रासंगिक गरजा तो भागवीत होता. काही तेली लोकांनी आपली श्रेणी (तिल-पिषकश्रेणी) गोवर्धन येथे काढली होती. त्यांच्या प्रतिष्ठेमुळे व निष्ठेमुळे धर्मादाय प्रयोजनांसाठी त्यांना देणग्याही मिळाल्या होत्या.[३३३]

साधारण प्रतिच्या भांड्यांपासून सुबक भांड्यांपर्यंत कमालीची विविधता असलेली मातीची भांडी व मातीच्या भाजलेल्या वस्तू यांचे विपुल पुरावे बहुतेक प्राचीन भारतीय स्थळी सापडले आहेत. समाजाची एक महत्वाची गरज भागविण्याबाबत मोलाची भूमिका कुंभार (कुलाल किंवा कुलरिक) पार पाडीत असे. नाशिक येथे त्यांची स्वतःची श्रेणी होती. लोकांचा तिच्यावर एवढा विश्वास होता की, धर्मादाय प्रयोजनासाठी लोकांकडून या श्रेणीला भरपूर आर्थिक मदत मिळत असे.[३३४]

उद्योगधंदे व व्यापार यांच्या भरभराटीतून उदयास आलेल्या अतिसधन वर्गाच्या खुशालचेंडू जीवनक्रमाच्या कधीच न भागणाऱ्या गरजांची परिपूर्तता करता करता अत्तारी लोकांचे दिनक्रम अत्यंत व्यस्त असत. दान देणारा धेनुकाकट येथील एक अत्तार (गांधिक) कार्ले येथे [३३५] दान लेखात आढळतो. प्रतिष्ठान (आताचे औरंगाबाद जिल्ह्यातील पैठण) येथील अत्तार कुटुंब तेच कार्य करताना पितळखोरा येथे आढळते.[३३६] अत्तारांच्या दानधर्माची नोंद घेणारे अशाच प्रकारचे चार दोन काम्य अभिलेख आंध्रप्रदेशातील अमरावती येथे सापडतात.[३३७] त्यातील उल्लेखांवरून प्रतिष्ठान आणि धान्यकटक (आताचे आन्ध्रातील अमरावती) येथे अत्तारी उद्योग भरभराटीस आला असावा असे दिसते.

सुतारकामाच्या उद्योगातही बराच पैसा होता. धेनुकाकट येथील एका सुताराने (वढकि, संस्कृत वर्धकिन) कार्ले येथील लेण्याच्या दरवाजाची सजावट केली होती.[३३८] गाहा-सत्त-सई (१५३) मध्ये कापण्यासाठी (करपत्रपाटण) करवतीचा उपयोग केल्याचा उल्लेख आहे, तसाच सुताराच्या दैनंदिन वापरातील मोजण्याच्या दोऱ्याचाही

(प्रमाण-सूत्र) उल्लेख आहे. बांधकामाच्या उद्योगातील माणसांच्या जोडीने सुतार आपले काम करीत असला पाहिजे.

लौकिक व धार्मिक अशा दोन्ही क्षेत्रातील बांधकाम त्या काळात झपाट्याने सुरु होते. त्यात व्यस्त असणाऱ्या कामगारांची माहिती कोरीव लेखांतून मिळते. बांधीव आणि पाषाणात कोरलेल्या अशा दोन्ही प्रकारची मंदिरे आणि निवासी गुंफा तयार केल्याचेही दिसते. अद्याप त्यापैकी काही टिकून आहेत. नवे बांधकाम पूर्ण करण्याचा अधिकार धारण करणाऱ्या भिक्षुस नवकर्मिक म्हणत. त्याचे उल्लेख काही अभिलेखांत आढळतात.[३३९] अशाच कामाशी संबंधित 'आवेशनिन' नामक कामकारांचा मुकादम या अन्य एका अधिकाऱ्याची नोंद पुरालेखांमध्ये आढळते.[३४०] उपरखित किंवा उपरक्षितृ हा बहुधा कामाचा निरीक्षक असावा.[३४१] बांधकामक्षेत्रात पाषाणातील वास्तुकलेला प्राधान्य असल्यामुळे अनेक 'सेलवढकी' (संस्कृत, शैल-वर्धकिन्) किंवा 'पाषाणमिस्त्री' यांची गरज भासत असावी, कान्हेरी येथील बौद्ध संघाचा उपकारकर्ता म्हणून अशाच एका मिस्त्रीचा उल्लेख मिळतो.[३४२] प्रचंड संख्येने आढळणाऱ्या पाषाण शिल्पाचे कोरीव काम (शैल-रूप-कर्मन) [३४३] अनेक पाथरवटांना व्यस्त ठेवीत असावे. पाषाणांना चकाकी आणणाऱ्या लोकांनाही (मीठिक) खूपच मागणी असावी.[३४४] विटा पाडण्याचा उद्योग वाकाटकांच्या काळात विशेष तेजीत असल्याचे दिसते. वाकाटक राजा दुसरा पृथिवीषेण याच्या मांढळ येथील एका दानपत्रात इष्टापक नावाचे एक खेडे नोंदविले आहे. ते तिथल्या विटांसाठी प्रसिद्ध असावे.[३४५]

जलसंचालित यंत्रांना (उदकयंत्र) बरीच मागणी असावी. कारण पश्चिम भारतीय गुंफांना पाणीपुरवठा करणाऱ्या अनेक जलकुंडांचे पुरावे उत्खननात हाती आले आहेत.[३४६] तसेच या यंत्रांच्या सहाय्याने जेथील पाण्याचा उपसा करून ते पिण्यासाठी वा पिकांसाठी वापरले जाई असे पाण्याचे अनेक मोठाले साठेही सापडले आहेत. 'औद्यांत्रिक' (प्राकृत-औदंत्रिक) म्हणून ओळखल्या जाणाऱ्या अभियंत्यांनी ही यंत्रे सिध्द केली होती. या अभियंत्यांची गोवर्धन येथे स्वतंत्र श्रेणी होती. या संघटित स्वरूपात त्यांना श्रेष्ठ सन्मान तर प्राप्त झाला होताच. शिवाय धर्मादाय कारणांसाठी विश्वस्त निधी म्हणून ठेवी मिळत होत्या.[३४७]

समकालीन कलांमध्ये चित्रित केलेल्या चामड्याच्या वस्तुंचे अनेक नानाविध प्रकार पाहता चामड्याचा क्षेत्रातील कामगार लोक लोकांच्या मागण्या पुरविण्यात फारच व्यस्त रहात असतील आणि आर्थिकदृष्ट्या सुखवस्तुही असतील यावद्दल शंकेला जागाच रहात नाही. एका चांभाराने (चर्मकार) केलेल्या काही दानधर्माचा संदर्भ असलेला एक कोरीव लेख अमरावती येथे मिळाला आहे.[३४८] एका खेड्याचे चर्माक असे नाव वाकाटक राजा दुसरा प्रवरसेन याच्या चम्मक ताम्रपत्रामध्ये आढळते. ते तेथील उत्तम गुणवत्तेच्या (आणि विपुल प्रमाणातील) चामड्यावरून आणि चांभारकामाच्या लौकिकावरून पडले असावे.[३४९] आजचे चम्मक हे नावही तोच वारसा सांगते.

लोहार आणि सोनारकाम या दोन उद्योगांविषयी कोरीव लेखांतून आणि साहित्यातून माहिती मिळते. दागदागिन्यांचे जे असंख्य उल्लेख समकालीन संदर्भसाधनात विखुरलेले आहेत ते हेच दाखवितात की, आजच्याप्रमाणे तेव्हाचीही भारतीय माणसे आपल्या शरीराचे सर्व भाग आभूषणाने सजविण्याचे शौकीन होते. सुवर्णकार[३५०] आणि हिरण्याकार[३५१] म्हणून ओळखल्या जाणाऱ्या सोनारांचे अनेक उल्लेख सापडतात. दुसऱ्या प्रवरसेनाच्या दुदिया ताम्रपटामध्ये एका जिल्ह्याचे (भोग) आणि एका गावाचे नाव सोन्याशी[३५२] संबंधित असलेले दिसते. तो प्रदेश तेथील सोन्याच्या खाणींसाठी आणि सुवर्णाधारित उद्योगांसाठी प्रसिद्ध असला पाहिजे. खानदेशाच्या एका भागातील अनामिक वस्तीत सोनारांची दाटी झाली होती. एक खेडे तर खास त्यांच्यासाठी प्रसिद्ध होते व ते सुवर्णकारग्राम म्हणूनच ओळखले जात होते असे हरिषेणाच्या थाळनेर ताम्रपटावरून समजते.[३५३] काही वाकाटक ताम्रपट सोनारांनीच कोरले होते. त्यावरून ते सोन्याखेरीज इतर धातुंचेही काम करीत असल्याचे स्पष्ट होते. जुन्नर येथे काश्याचे (कांस्य) काम करणारे कारागीर कासकार म्हणून ओळखले जात. त्यांची वेगळी श्रेणी होती.[३५४] दोन-तीन पुरालेखांवरून इसवी सनाच्या प्रारंभिक शतकांत कल्याण[३५५] आणि कराड[३५६] ही ठिकाणे तेथील लोहार कामासाठी आणि लोखंडी वस्तुंच्या व्यापारासाठी विख्यात होती. वाकाटक काळात एका वस्तीचे नाव लोहनगर[३५७] असे होते. ते तेथील कच्चे लोखंड वितळविण्याच्या भट्टीसाठी किंवा लोखंडाच्या उद्योगासाठी प्रसिद्ध असल्यामुळेच पडले असावे. अशाच एका लोखंडी तलवारीवरून एका प्रशासकीय विभागास असिभुक्ती[३५८] हे नाव प्राप्त झाले होते. संदर्भसाधनात ज्यांचा उल्लेख आहे अशी इतरही शस्त्रे लोहारच घडवीत असावेत. दुसऱ्या रुद्रसेनाच्या अलीकडेच प्रकाशात आलेल्या मांढळ ताम्रपटात अरग्रामक[३५९] असे एका खेड्याचे नाव आढळते. येथील लोहारांनी तयार केलेले आरे (अर) उत्तम प्रतीचे असले पाहिजेत. रथांची चाके किंवा इतर उद्योगांत वापरली जाणारी किंवा शस्त्र म्हणून वापरली जाणारी चक्रे बनवण्यासाठी या आऱ्यांचा वापर केला जात असावा. अनेक ताम्रपट आणि राजमुद्रा घडविण्याची जबाबदारी तांबटांवर असावी. त्यानी इतर कारागिरांच्या मदतीने त्यावरील दस्तऐवज कोरले असावेत. लोहारकाम आणि तांबटकाम ही दोन्ही अत्यंत विकसित स्थितीत होती याचा प्रत्यय धातुंची जी कित्येक उपकरणे व आभूषणे पूर्वाश्मकालीन दफनात आणि अनेक ऐतिहासिक ठिकाणच्या उत्खननात सापडली आहेत, त्यावरून येतो.

मौल्यवान दगडांचे मणी घडवून त्यांना चकचकीत करण्याचे व त्यांच्यावर संस्कार करण्याचे काम बहुधा मणिकारांचे असावे. सोपारा (शूर्पारक) येथील एका मणिकाराचे नाव कान्हेरीच्या कोरीव लेखात तेथील बौद्ध भिक्षु संघासाठी केलेल्या धर्मादाय कृतींच्या संदर्भात आले आहे.[३६०] सोपारा हे जवाहिरी उद्योगासाठी विख्यात होते. गाहा-सत्त-सईमध्येही जवाहिऱ्यांच्या कामाचे काही तपशील आले आहेत. सोन्याची गुणवत्ता कसाच्या दगडावर घासून तपासण्याचे (कनक-कप-पट्ट, ६२६) तसेच पाचू (मरकत, ६२७) सारख्या हिऱ्यांची परीक्षा करण्याचे असे काही संदर्भ तेथे आहेत.

पाचूच्या वेधणीने मोती वेधण्याचाही उल्लेख (३९४) आहे. रत्नांची पारख करण्याचे रत्नपरीक्षा नामक शास्त्र प्रगत अवस्थेत होते. त्यातील जाणकारांचा **(रत्न परीक्षक)** उल्लेख आढळतो (६२७).[३६१] पाचू काही प्रसंगी भांडी सुशोभित करण्यासाठी (मरकत-भाजन) वापरले जात असे. अशा भांड्यांमध्ये कधीकधी शंख किंवा शिंपले ठेवत असत (४). शंखिका नावाची एक-दोन खेडी दुसऱ्या रुद्रसेनाच्या मांढळ ताम्रपटामध्ये उल्लेखिलेली आहेत. ती बहुधा तेथील शंख कवचांच्या उद्योगासाठी प्रसिद्ध असावीत. जेथे प्राचीन वस्तू सापडल्या त्याच्या जवळपास प्रत्येक ठिकाणी शिंपल्यांच्या बांगड्या विशेष मोठ्या प्रमाणात आढळल्या आहेत हे नमूद करणे आवश्यक आहे.

इसवी सनाच्या प्रारंभिक शतकात हस्तिदंती वस्तू समाजातील सधन वर्गात लोकप्रिय असल्याचे बरेच पुरातत्त्वीय पुरावे सापडले आहेत. हस्तिदंताचे काम करणाऱ्या विदिशेच्या कामगारांचा (दंतकार) फक्त एकच उल्लेख सांची येथे मिळाला[३६२] असला तरी हस्तिदंताच्या बऱ्याच वस्तू महाराष्ट्रात आढळणे ही त्या वस्तूंच्या लोकप्रियतेचीच खूण ठरते. काजळ घालण्यासाठीच्या अनेक काड्या (अंजनशलाका), बांगड्या, कानातील आभूषणे, कंगवे, द्यूतातील फासे इत्यादी हस्तिदंती वस्तू औरंगाबाद जिल्ह्यातील भोकरदन[३६३] प्रमाणेच इतरही अनेक ठिकाणी सापडल्या आहेत. सूक्ष्म बारकाव्यांसह या काळात कोरलेल्या मुग्ध कुमारिकांच्या अतिसुंदर हस्तिदंती बाहुल्या तेर (प्राचीन तगर) येथे तसेच भोकरदन येथेही[३६४] स्तरीय संदर्भात[३६५] सापडल्या आहेत. प्राचीन रोमन लोकांना या मूर्तींनी इतकी मोहिनी घातली होती की, त्या त्यांनी भारतातून विशेषतः दख्खनमधून आयात केल्या होत्या. अशी एक मूर्ती इटलीतील पॉम्पे येथील सुदूरच्या पुरातन स्थळी उत्खननात सापडली.[३६६] रोमन जगात भारतीय हस्तिदंती कामाला खूप मागणी होती हे नमूद करायला हवे, बॅरिगाझा बंदरातून तसेच अन्य दक्षिण भारतीय बंदरांतून निर्यात होणाऱ्या वस्तूंच्या यादीत हस्तिदंती वस्तूंचा अंतर्भाव 'पेरिप्लस ऑफ दि एरिथ्रियन सी' या पुस्तकात केली आहे.[३६७] भारतीयांना हस्तिदंती वस्तूंची एवढी आवड होती की, जेव्हा हत्तींची येथे वानवा भासली तेव्हा त्यांनी इथिओपिया (आफ्रिका) येथून हस्तिदंतांची आयात केली असे दृढ कथन इसवी सनाच्या सहाव्या शतकाच्या मध्यावर भारतात परिभ्रमण केलेल्या कॉसमॉस इंडिको प्लायस्टसने केले आहे.[३६८]

पूर्वी नोंदविल्याप्रमाणे या काळातील भारतीयांना मद्यप्राशनाची आवड होती. वाकाटकांच्या ताम्रपटात दान दिलेल्या खेड्यांविषयी एक उल्लेख हमखास येतो की, त्यांना किण्व खरेदी करण्याच्या राजाच्या अधिकारातून सूट देण्यात आली आहे. किण्व हे अशा औषधी द्रव्याचे किंवा बियांचे नाव आहे की, ज्याचा उपयोग मद्यार्क तयार करताना आंबविण्याच्या कामी केला जात असे.[३६९] दुसऱ्या प्रवरसेनाच्या पांढुर्णा दानपत्रात कल्लार असे एका खेड्याचे नाव आहे.[३७०] दारू गाळणाऱ्यांचीच तेथे मुख्यत्वे वस्ती असल्यामुळे त्यास हे नाव पडले असावे.[३७१]

मीठ ही सर्वच लोकांची दैनंदिन गरजेची वस्तू होती. महाराष्टात किमान काही ठिकाणी मिठागरे असल्याचे पुरावे सापडतात. आज विदर्भातील बुलढाणा जिल्ह्यात लोणार म्हणून प्रसिद्ध असलेल्या खेड्याचे प्राचीन नाव लवणाकर होते कारण तेथे मिठागर होते. मिठासाठी जमीन खोदण्याचा मक्ता राजाकडे असायचा पण दान दिलेली खेडी त्यातून मुक्त केली जायची असे उल्लेख वाकाटकांच्या जवळपास सगळ्याच ताम्रपटातील लेखांत आढळतात.[३७२]

मासेमारीच्या धंद्यात कोळ्यांनाही (दासक, संस्कृतात दाशक) बराच आर्थिक लाभ होत असावा असे दिसते. नाशिकच्या बौद्ध संघाला एक गुहा एका कोळ्याने दान दिल्याची नोंद आहे.[३७३] मत्सकद्रह (आताचे नागपूर जिल्ह्यातील काटोल तहसिलातील मासोद) हे खेड्याचे नाव दुसऱ्या प्रवरसेनाच्या मासोद ताम्रपटात आढळते.[३७४] ते त्या ठिकाणी असलेल्या मासेमारीच्या तळ्यामुळे (मत्स्यक-ह्रद) पडले असावे. त्या तळ्यानेच तिथल्या अनेक रहिवाश्यांना उपजीविकेचे साधन आणि मांसाहरी लोकांना खाद्य पुरवले असावे.

इतर व्यवसायांपैकी काही व्यवसायांचा उल्लेख सापडतो. उदा. लेखापाल (गणपक),[३७५] चिकित्सक (वैद्य किंवा वेज्ज),[३७६] लिपिक (लेखक),[३७७] माळी पुरूष (मालाकार),[३७८] किंवा स्त्रिया (मालाकारी),[३७९] स्त्री-द्वारपाल (पतिहारखी),[३८०] गवळी (गोप)[३८१] आणि स्त्रिया (गोपी),[३८२] शिकारी (व्याध),[३८३] न्हावी (नापित),[३८४] चंडिल[३८५] इत्यादी. हे आणि ज्यांची नाद नाही अशा अनेक उद्योगधंदे व व्यवसायांनी कित्येक लोकांना प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे रोजगार पुरविला असावा.

**श्रेणी** : यापैकी काही उद्योगधंद्याना महत्त्वाच्या शहरात अग्रेसर स्थान होते. औद्योगिक कामगारांनी तेथे श्रेणी,[३८६] निकाय,[३८७] आणि गण[३८८] अशा नावांनी आपल्या संघटना स्थापन केल्या होत्या. या संघटनांचे प्राथमिक हेतू अर्थातच त्यांचा उद्योग आणि व्यापार वृद्धिंगत करणे, संघटितपणाच्या बळावर समाजात प्रतिष्ठा मिळविणे आणि राज्यसत्तेकडून लाभ पदरात पाडून घेणे हेच होते. आधुनिक काळातील चेंबर ऑफ ट्रेड अँड कॉमर्सशी त्यांची तुलना होऊ शकेल. त्यांचे स्वतःचे असे नियम आणि संकेत असत. राज्यसत्ताही त्यांना प्रमाण मानत असे आणि त्यांचे संरक्षण करत असे. धर्मशास्त्रावरील ग्रंथात त्यांच्या कामकाजाचे तपशीलवार वर्णन आढळते. या संस्था अत्यंत महत्त्वाची सामाजिक-आर्थिक भूमिका पार पाडीत असत. दीर्घायु जीवित्वासाठी आणि निष्ठावंतपणासाठी त्यांचा मोठा लौकिक होता. अमीर-उमरावांकडूनही त्यांना कायम स्वरुपाच्या ठेवी (अक्षयनीवी) धर्मादाय प्रयोजनांसाठी मिळत असत. अशाप्रकारच्या विणकरांच्या दोन श्रेणी (कोलिक-निकाय) गोवर्धन येथे होत्या. त्या दोहोंपाशी नहपानाचा जावई व बहुधा त्याचा राजप्रतिनिधी असलेल्या ऋषभदत्त याने ठेव म्हणून काही कार्षापण नाणी मासिक व्याजाच्या वेगवेगळ्या दराने ठेवली होती. त्याने खोदून दिलेल्या गुहेत राहणाऱ्या बौद्ध भिक्षुंच्या काही गरजा त्या व्याजातून भागाव्यात असा हेतू होता.[३८९] थोड्याच कालावधीनंतर इसवी सनाच्या तिसऱ्या

शतकात आभीर राजा माढरीपुत्र ईश्वरसेन याच्या कारकिर्दीत विष्णुदत्ता नामक एका उपासिकेने काही रक्कम अक्षयनीवी (कायम विश्वस्तनिधि) भिन्न-भिन्न व्यावसायिकाच्या गोवर्धन येथील श्रेण्यांकडे जमा केली होती असे नाशिकच्या कोरीव लेखावरून समजते.[३९०] कुलरिक-श्रेणीकडे एक हजार कार्षापण गुंतविले,[३९१] औद्यांत्रिक श्रेणीकडे (जलसंचालित यंत्रज्ञांची श्रेणी) दोन हजार कार्षापण ठेवले,[३९२] पाचशे कार्षापण अन्य अशा एका श्रेणीकडे गुंतविले आणि आणखी एक रक्कम[३९३] तेलघाणेवाल्यांच्या श्रेणीकडे (तिल-पिषक-श्रेणी) ठेवली. या चार ठेवींच्या मासिक व्याजातून (मास-वृद्धी) त्रिरश्मी पर्वतावर राहणाऱ्या चतुर्दिशीय भिक्षुसंघाच्या वैद्यकीय उपचारांचा खर्च व्हावा अशी सोय होती. या श्रेणींचा निर्देश 'आगत अनागत' किंवा 'भूत आणि भविष्य'[३९४] असा केला जातो. त्यावरून या श्रेणी संघटनेचे स्थायी स्वरूप सूचित होते. जुन्नर येथे धान्य व्यापाऱ्यांची स्वतःची श्रेणी (धान्यिक-श्रेणी) होती आणि तिने तेथील बौद्ध संघाला देणगी दिली होती.[३९५] बांबूचे काम करणारे बुरुड व कासार (कांस्यकार-श्रेणी) यांच्याही स्वतंत्र श्रेणी जुन्नरमध्ये होत्या. त्यासुद्धा ठेवी स्वीकारीत, पण त्यांच्याकडे येणाऱ्या ठेवी तसेच त्यांचा व्याजदर आणि ज्या प्रयोजनांसाठी ठेवी ठेवल्या जात त्याचा तपशील शिलालेखावरून कळू शकला नाही.[३९६] विदर्भातील पवनी येथे सोनारांनी (हेरनिक, संस्कृतात हैरण्यक) त्यांच्या सामुहिक अधिकारात तेथील एका बौद्ध स्तुपाच्या संदर्भात धार्मिक हेतूने काही कामे केली होती असे त्यांच्या अनेकवचनी नामोल्लेखावरून लक्षात येते. त्यांची नावे मात्र तेथे नोंदविलेली नाहीत.[३९७] त्यांनी स्वतःला श्रेणीच्या किंवा अन्य स्वरूपात संघटित केले असावे. त्यांची संघटना व्याजाने ठेवी ठेवत असे की नाही हेही तशा पुराव्याअभावी सांगणे कठीण आहे. एकंदरीत, महाराष्ट्रासह दख्खन भागातील प्रचलित प्रथा पाहता तेही बहुधा तसे करीत असावेत. जुन्नर येथे आणखी काही श्रेणी होत्या, पण त्यांचे निश्चित स्वरूप कसे होते हे उपलब्ध माहितीच्या आधारे सांगता येत नाही. निश्चित कोण याची नोंद नसलेल्या कामगारांची/व्यापाऱ्यांची एक श्रेणी कोणचिक नामक खेड्यात होती असे जुन्नरच्या कोरीव लेखावरून समजते.[३९८] अपजित म्हणवणाऱ्यांची 'गण' नामक एक श्रेणीसदृश संघटना होती. पंघरा निवर्तने आकाराची जमीन आणि काही कार्षापणांची रक्कम तिने स्वीकारली होती.[३९९] अपराजितांचा सिद्धगण नामक गण होता. त्याने काही जमिनीचे दान बहुधा काही झाडे लावण्यासाठी घेतले होते.[४००] या श्रेणींचे व गणांचे निश्चित ठिकाण सांगणे कठीण असले तरी ते बहुधा जुन्नर येथेच असावे.

**ठेवी आणि व्याजदार** : या सर्व नोंदीवरून हे स्पष्ट होते की, अनेक औद्योगिक कामगार आणि व्यापारी यांच्या स्वतंत्र श्रेणी होत्या. त्या आजच्या बँकांप्रमाणे कायम ठेवी कोणत्यातरी धर्मादाय प्रयोजनासाठी स्वीकारण्याचे काम करीत असत. पण अल्पमुदतीच्या ठेवी व्याजावर स्वीकारणे किंवा व्याजावर पैसा देणे यासारखीही कामे करीत असत काय हे पुरेशा पुराव्याच्या अभावी समजू शकत नाही. पण बहुतेक त्या ही

कामे करीत असाव्यात. एक गोष्ट तर निश्चित आहे, ती म्हणजे एकाच व्यवसायातील सहकामगारांना एकत्र आणून समकालीन आर्थिक जीवनात एक महत्त्वाची भूमिका त्या निभावीत होत्या आणि अर्थव्यवस्थेच्या किमान काही गरजा तरी भागावीत होत्या. झपाट्याने होणाऱ्या औद्योगिक आणि व्यापारी हालचालींना प्रोत्साहन देण्यात त्यांचा मोठा वाटा असला पाहिजे. या हालचालीच अंशतः तरी इसवी सनाच्या प्रारंभिक शतकांच्या एकूण जीवनचौकटीचे व्यवच्छेदक वैशिष्ट्य असलेल्या आर्थिक विकासाला व भरभराटीला कारणीभूत ठरल्या असाव्यात. निश्चित हेतूंसाठी कायम ठेवी घेऊन इतरांचे धर्मादाय कार्यक्रम जसे त्या पुढे नेत असत तसे स्वतःचेही काही धर्मादाय उपक्रम राबवत असत.[४०१] गुप्त सम्राट पहिला कुमारगुप्त याच्या काळातील मंदसोर अभिलेखाचा या संदर्भात उल्लेख करावयास हवा. रेशीम-विणकरांच्या एका श्रेणीच्या कार्यकलापांचे हुबेहूब वर्णन त्यात आले आहे. या श्रेणीचे सदस्य मूळचे गुजरातमधील लाट होते. ते काही कारणांमुळे दशपूर (आताचे मंदसोर) येथे स्थलांतरित झाले. तेथे त्यांनी सूर्य मंदिर बांधून पुढे त्याची डागडूजीही केली होती.[४०२] पुढच्या काळात या संस्थेच्या भौगोलिक कार्यकक्षा बऱ्याच विस्तारल्या आणि आपल्या सभासदांवरचे तिचे नियंत्रणही वाढले. औद्योगिक उत्पादन आणि वाणिज्य यांचे नियमन ती करू लागली.[४०३] यावरून असे दिसते की, या संस्थांच्या सातत्याबद्दल लोकांना विश्वास वाटत होता. काही जुन्या श्रेणीनंतर आपल्यापेक्षा व्यवसाय आणि भौगोलिक क्षेत्र या दोन्ही दृष्टींनी मोठा व्याप असलेल्या श्रेणींमध्ये विसर्जित झाल्या असणेही शक्य आहे.

श्रेणींकडे ठेवलेल्या ठेवींची संख्या बरीच मोठी असल्याचे समजते, पण व्याजदरासंबंधी मात्र फारच थोडी माहिती मिळते. परंतु व्याजाचा हिशेब मासिक असायचा. नहपानाचा जावई ऋषभदत्त याने गोवर्धन येथील विणकरांच्या दोन श्रेणीकडे गुंतवणूक केली होती.[४०४] एकूण गुंतवणूक ३००० कार्षापणांची होती. दोन भागात ती २००० आणि १००० कार्षापण (१ टक्के) मासिक व्याजावर कायम संचयी ठेव म्हणून एका श्रेणीकडे तर तीन चतुर्थांश कार्षापण दरमहा दरशेकडा व्याजाने दुसऱ्या श्रेणीकडे गुंतवणूक केली होती. अशाप्रकारे एकाच जागच्या एकच व्यवसायाशी संबंधित असलेल्या दोन श्रेणींमध्ये केलेल्या गुंतवणुकींवरील व्याजदरात एक चतुर्थांशाची दरमहा तफावत होती. हा फरक त्यांच्या आपापल्या प्रतिष्ठा आणि किर्ती यावरून ठरत होता. आजच्या प्रमाणेच जेवढी प्रतिष्ठा व किर्ती मोठी तेवढा व्याजदर कमी असे वार्षिक व्याजदर अनुक्रमे ४२ टक्के व ९ टक्के असे. गुंतवणुकी कायम स्वरूपाच्या असत. म्हणजे ठेवीची रक्कम कधीच परत केली जात नसे.[४०५] फक्त ठराविक प्रयोजनांसाठी व्याजाची रक्कम दिली जायची. पहिल्या गुंतवणुकीपासून मिळणाऱ्या व्याजातून वीस भिक्षुंच्या कपड्यांचा खर्च (चीवरिक) दरवर्षी दरडोई बारा कार्षापण याप्रमाणे केला जात असे, तर दुसऱ्या गुंतवणुकीच्या व्याजातून त्याच भिक्षुंचा वैद्यकीय खर्च भागवला जात असे.[४०६] आभीर ईश्वरदत्ताच्या कारकिर्दीतील नाशिकच्या उत्कीर्णलेखात दोन

शतकानंतरच्या काळातील विभिन्न व्यवसायांच्या एकाच ठिकाणच्या विविध श्रेणींमध्ये केलेल्या गुंतवणुकींचे बारीकसारीक तपशील दिले आहेत. व्याजदर दिले असावेत असे वाटते तो शिलालेखाचा भाग दुर्दैवाने खराब झालेला आहे. जुन्नरच्या एका श्रेणीकडे काही कार्षापणांची गुंतवणूक केल्याचा निर्देश आणखी एका कोरीव लेखात आढळतो; पण तेथे व्याजाचा दर दिलेला नाही. त्यामुळे माहिती मिळते ती फक्त नाशिक येथील ऋषभदत्ताच्या कोरीव लेखातूनच. तत्कालीन व्याजदर दरसाल दर शेकडा १२ आणि ९ टक्के मासिक बोलीवर असायचा. हा दर धर्मसूत्र संहितांनी ठरवून दिलेल्या दराशी सुसंगतच होता. असुरक्षित कर्जावर १/८० (वसिष्ठ) ते दोन टक्के (मनु आणि नारद) दरम्यान हा दर धर्मसूत्रकारांनी सांगितला आहे.[४०७] हे व्याज वित्तीय गुंतवणुकीवर असल्यामुळे पूर्णतया सुरक्षित होते हे लक्षात घेता ते वस्तुतः वाजवीपेक्षा कमीच होते असे म्हणावे लागेल.[४०८] यावरून असे म्हणता येईल की, श्रेणी त्यांच्याकडे ठेवलेल्या ठेवींवर फारच कमी दराने व्याज देत असत. अर्थात याचे कारण बहुधा त्यांची सुरक्षितता आणि चिरकाळ सातत्य हे असावे. सर्वसामान्य लोक तसेच सत्ताधीशही त्यांच्यावर कायम स्वरुपी विश्वास ठेवू शकत होते. अभीर ईश्वरसेनाच्या काळातील नाशिक येथील अभिलेखात त्यांचा जो 'भूत आणि भविष्य' (आगतअनागत) असा उल्लेख आढळतो त्यावरून हे स्पष्ट होते. गुंतवणुकी अधिक सुरक्षित करण्याच्या हेतुने त्यांची नगरभवनात (निगम-सभा) घोषणा केली जायची आणि लाकडी फळ्यांवर किंवा नोंदणी कार्यालयात (फलक-वार) त्यांची नोंद व्हायची. ऋषभदत्ताच्या नाशिक येथील कोरीव लेखात तसा स्पष्ट उल्लेख आहे.[४०९] हीच पद्धत भूमिदान व ग्रामदानाच्या वेळीही अवलंबिली जात असे हे सातवाहनाच्या समकालीन अभिलेखांवरून दिसते.[४१०]

या सहकारी संस्था काही खाजगी व्यक्तीनाही ठेव निधी देत असत. पण त्याना बऱ्याच चढ्या दराने व्याज आकारले जाई असे धर्मशास्त्रावरील ग्रंथातून लक्षात येते.[४११] ज्या सेठींचा (श्रेष्ठिन्) उल्लेख अनेक समकालीन संदर्भसाधनांत येतो.[४१२] ते बहुधा खाजगी सावकार असत आणि जबर व्याजाने पैसे कर्जाऊ देत असत. उत्तरकालीन साहित्यात त्यांच्या अनेक उद्‌बोधक गोष्टी वाचायला मिळतात.

**व्यापार आणि वाणिज्य** : उपरोक्त शेतकरी, पशुपालक आणि औद्योगिक कष्टकऱ्यांच्या श्रमातून तयार झालेल्या मालाचा व्यापार करून काही लोक आपला उदरनिर्वाह करीत असावेत. त्यांच्यापैकी किमान काही व्यापारी तरी ऐषआरामाचे जीवन व्यतीत करीत आणि विविध पंथांच्या धार्मिक उपक्रमांना भरपूर देणग्याही देत. वणिज,[४१३] वाणिजक,[४१४] वाणिय,[४१५] नेगम[४१६] आणि नेकम[४१७] अशा नावांनी व्यापाऱ्यांचे उल्लेख संदर्भसाधनात आढळतात. त्यापैकी "वणिज" शब्दाशी संबंधित संज्ञांचा संदर्भ सर्वसाधारणपणे सामान्य व्यापाऱ्यांशी निगडीत असतो, तर "निगम" वर आधारित शब्दांना शहरी छटा असते.[४१८] काफिल्यानी व्यापार करण्याची पद्धत चांगलीच रूढ झाली होती. काफिल्याच्या प्रमुखांना सार्थवाह म्हणत असत.[४१९] सार्थवाहांचे कार्य स्थानिक बाजारांना

इतर भागातील उत्पादनांचा पुरवठा करण्याचे होते. ही उत्पादने ते गोळा करीत आणि दूरदूरच्या ठिकाणी पोचवीत. हा माल वाहून नेण्यासाठी ते बैलगाड्यांचा तसेच इतर ओझेवाहू प्राण्यांचा वापर करीत.

इसवी सनाच्या पहिल्या शतकाच्या उत्तरार्धातील व्यापाराबद्दलची विश्वसनीय आणि अत्यंत मोलाची माहिती आपल्याला 'पेरिप्लस ऑफ दि एरिथ्रियन सी' या पुस्तकातून मिळते. ओझेन (उज्जैन), पीथान (पैठण), आणि तगर (तेर, जिल्हा उस्मानाबाद) ही या काळातील अत्यंत महत्त्वाची तीन व्यापारी ठाणी असावीत आणि तेथून बॅरिगाझा (भरुच) या सर्वांत महत्त्वाच्या बंदराकडे अनेक व्यापारी वस्तुंचा मोठ्या प्रमाणावर पुरवठा होत असावा असा ठसा आपल्या मनावर पेरिप्लसमुळे उमटतो. गोमेद किंवा शिवधातूचे (Onyx) पाषाण, चिनीमातीची भांडी, उत्तम मलमल, मध्यरक्तनील रंगाची मलमल आणि भरमसाठ सुती कापड उज्जैन पुरवीत असे, तर उत्तर भारतातून किनारपट्टीकडे पाठविण्यासाठी विविध प्रकारचे जटामांसी, सुगंधी कुष्ठ आणि गुग्गुल वृक्षांची रोपटी ह्या वस्तू येत असत.[४२०] पैठण ही पेठ अधिक महत्त्वाची होती. तेथे शिवधातूचे (Onyx) दगड विपुल होते. ते सगळे किंवा त्यांचा काही भाग भरोच (भरूच) येथे पाठविला जायचा.[४२१] तगरचे वर्णन देशातील फार महत्वपूर्ण शहर असे[४२२] केले आहे. सामान्य सुती कापडाचे ते आगर होते. मलमलीचे तेथे नाना प्रकार असत आणि मध्यरक्तनील रंगाचे कापड भरपूर प्रमाणात होत असे. शिवाय किनारपट्टीच्या भागांतून स्थानिक उत्पादित वस्तू तेथे येत असत.[४२३] स्थानिक लोकांच्या गरजा भागविण्यासाठी तसेच पश्चिमेकडे निर्यात करण्यासाठी या वस्तुंचा उपयोग होत असे. कल्याण आणि शूर्पारक (सोपारा) ही बंदरे व बाजारपेठा महत्त्वाच्या होत्या आणि भारतातून पश्चिमेकडे होणाऱ्या निर्यातीत त्यांची महत्त्वाची भूमिका होती. पश्चिम भारतातील व्यापारपेठांची ही जी माहिती पेरिप्लसने दिली आहे ती त्याला एका नावाड्याच्या दृष्टिकोनातून दिसलेली आहे. कोरीव लेखात व्यापारी शहरे व खेडी यांची भारतीय दृष्टिकोनातून जी माहिती मिळते ती अत्यंत गौरवास्पद आहे. त्यात नाशिक, गोवर्धन, कल्याण, चेमूल (चौल), करहाटक (कऱ्हाड), वैजयंती (वनवासी, जिल्हा उत्तर कन्नड, कर्नाटक), धेनुकाकट, वलूरक (आजचे कार्ले), शूर्पारक, प्रतिष्ठान, भोगवर्धन (भोकरदन), धान्यकटक, भरोच आणि दशपूर (मंदसोर) ही नावे आढळतात.[४२४] भोकरदनच्या उत्खननात सापडलेल्या शिक्क्यावर ठानेनगर असा उल्लेख आहे तो आजच्या ठाणे या शहराचा असावा.[४२५] ही सगळी गावे तसेच जेथे त्यांचे उल्लेख सापडले त्यांच्यापैकी किमान काही ठिकाणे ही महत्त्वाची व्यापारी केंद्रे असावीत.

पेरिप्लसवरून असा समज होतो की, महाराष्ट्र आणि गुजरात राज्यातील या व्यापारी केंद्रांना जोडणारे रस्ते अत्यंत दुष्कर होते.[४२६] अर्थात ही थोडी अतिशयोक्ती आहे, तिचा अर्थ रस्त्यांची स्थिती त्याच्या अपेक्षेइतकी चांगली नव्हती. बौद्ध जातकांमध्ये तसेच इतर ललित ग्रंथांमध्ये देशभर झपाट्याने वावरणाऱ्या काफिल्यांची वर्णने, दख्खनला प्राप्त झालेले दक्षिणापथ हे व्यापारी मार्गावर आधारित नाव आणि

अतिदूरच्या वस्त्यांना प्रत्यक्ष भेटी दिल्याच्या कोरीव लेखातून मिळणाऱ्या पुराव्यांवरून असा निष्कर्ष निघतो की, रस्त्यांची स्थिती पुष्कळच चांगली असावी. सुत्तनिपातच्या पारायणवग्गामध्ये बावरीच्या शिष्यांनी प्रतिष्ठानाहून श्रावस्तीला प्रयाण केल्याचा संदर्भ आहे. रस्त्यावरच्या महत्त्वाच्या विश्रांती स्थळांचीही नोंद तेथे घेतली आहे. प्राचीन धान्यकटक (अमरावती, जिल्हा गुटूंर, आंध्रप्रदेश) येथील कोरीव लेखावरून असे समजते की, राजगृह आणि पाटलिपुत्र अशा दूरवरच्या ठिकाणचे यात्रेकरू तेथे येत असत आणि देणग्या देत असत.[४२७] भोगवर्धनहून लोक सांचीला येत असल्याचे तेथील कोरीव लेखात नोंदविले आहे.[४२८] बारहुत येथील कोरीव लेखात जी दात्यांची नावे आहेत त्यात भोगवर्धन[४२९] आणि कर्नाटक[४३०] येथील रहिवाश्यांचीही नावे आढळतात. पश्चिम भारतीय गुहांमधील दुर्मिळ अभिलेख तर यावर आणखीच प्रकाश टाकणारा आहे. त्यावरून हे स्पष्ट दिसते की, दाते विविध ठिकाणचे असत. काही अतिदूरच्या भागातील असत. कान्हेरी येथे पुढील गावच्या लोकांचे उल्लेख आढळतात–नाशिक,[४३१] कल्याण,[४३२] सोपारा व धेनुकाकट[४३३] आणि चेमुल.[४३४] कुडा येथे करहाटक[४३५] गावच्या तर कार्ले येथे वैजयंती,[४३६] धेनुकाकट,[४३७] शूर्पारक[४३८] आणि अबुलामा[४३९] येथून आलेल्या यात्रेकरूंचे उल्लेख आहेत. नाशिकहून आलेल्यांचा बेडसा येथे,[४४०] तर शूर्पारक[४४१] आणि कामवन[४४२] येथून आलेल्यांचा नाणेघाट येथे निर्देश आढळतो. शेलारवाडी येथे धेनुकाकट[४४३] येथून तर, नाशिक येथे दात्तामित्री[४४४] आणि दशपुरहून (मंदसोर मध्यप्रदेश)[४४५] आलेल्या लोकांची नोंद आढळते. जुन्नर येथे भरूकच्छ[४४६] व कल्याण[४४७] येथून आलेल्या यात्रेकरूंची नोंद असून पैठणवरून आलेल्या लोकांची नोंद पितळखोरा येथे उपलब्ध होते.[४४८] पवनी येथील रुपियम्माचा कोरीव लेख असे दाखवितो की, तो शक-क्षत्रपांचे राज्य असलेल्या पश्चिम भारतातून तेथे आला होता.[४४९] इसवी सनाच्या प्रारंभिक शतकात पश्चिम भारतात जे वैभव होते त्यात बराचसा वाटा रोमन साम्राज्याशी असलेल्या त्याच्या व्यापाराचा होता. पेरिप्लसमध्ये त्याची तपशीलवार वर्णने आढळतात. त्यावरून आपल्याला समजते की, जरी इतर अनेक बंदरे या व्यापारात शिरण्याचा प्रयत्न करीत असली तरी बॅरिगाझा हेच या व्यापाराचे मुख्य ठाणे होते. इजिप्तहून बोटी बॅरिगाझाकडे जुलै महिन्यात यायच्या. या बंदरातून रोमन साम्राज्याला निर्यात होणाऱ्या मालात जटामांसी, सुंगधी कुष्ठ, गुग्गुल, हस्तिदंत, शिवधातू, चिनीमातीची भांडी, सर्व प्रकारचे सूती कापड, रेशमी कापड, मध्यरक्तनील रंगाचे कापड, रेशीमधागा, लांब मिरे आणि शेजारच्या बंदरातून पुरवण्यात आलेल्या इतर वस्तू यांचा समावेश असायचा. पश्चिमेकडून ज्या वस्तू आयात होत असत त्यात मुख्यतः इटालियन, लाओडिसियन आणि अरेबियन मद्य, पितळ आणि तांबे, जस्त, शिसे, पोवळे, सोने किंवा पीताश्म, सर्व प्रकारचे साधे व संमिश्र कापड, अर्धा वार रूंदीचे रंगीबेरंगी कंबरपट्टे, शिलारस, गोड वाटाणे, शुभ्र काच, सँडारकचा डिंक, नेत्रांजन, सोने, चांदी, स्वस्त व माफक प्रमाणातील सुंगधी द्रव्ये व उटणी इत्यादी समाविष्ट असत. राजाला नजराणे देण्यासाठी मौल्यवान चांदीची भांडी, पात्रे, संगीत वाद्ये, जनानखान्यासाठी सुंदर युवती, उंची मद्य, साधेच पण महाग पोषाख आणि अत्यंत निवडक उटणी आयात केली जात असत.[४५०] पाश्चिमात्याच्या

लेखणीतून उतरलेले हे तपशील असल्यामुळे त्यात निर्यात वस्तुविषयी अतिशयोक्ती नसावी. यापूर्वीच उल्लेख केल्याप्रमाणे भारतीय बनावटीची एक सुंदर हस्तिदंती बाहुली इटलीत पॉम्पे शहरात सापडली आहे. भारतातून रोमन साम्राज्यात होणाऱ्या निर्यातीला दुजोरा देणारा हा पुरावा मानावा लागेल.

बॅरिगाझा या बंदराचे "पहिल्या प्रतीचे आयात-निर्यातीचे बंदर" म्हणून असलेले सर्वश्रेष्ठ स्थान हे सातवाहन आणि क्षहरात यांच्यातील हेव्यादाव्याचे उगमस्थान ठरले होते आणि या व्यापारावर वर्चस्व बसविण्याची आकांक्षा हे त्यांच्यातील वैराचे मुख्य कारण हेते. असे म्हणतात की, सातवाहनांनी शूर्पारक (सोपारा) आणि कल्लैना (कल्याण) ही बंदरे विकसित करून त्यांना एक बाजारपेठ म्हणून बॅरिगाझाचा बरोबरीचा दर्जा मिळवून देण्याच्या बराच खटाटोप केला होता. जरी ज्येष्ठ सारार्गेनस (सातकर्णि) याला या प्रयत्नात यश मिळाले असले तरी सँडानेस किंवा सँडारेस (सुंदर सातकर्णि) राजा झाल्यावर या बंदरातून होणाऱ्या व्यापारावर बराच ताण पडला. कारण अपघाताने का होईना तेथे गेलेली ग्रीक जहाजे रक्षक बळजबरीने बॅरिगाझाकडे घेऊन जात.[४५१] नहपानाचे सुरुवातीला पारडे जड असले तरी अल्पावधीतच सातवानांची सरशी झाली. गौतमीपुत्र सातकर्णीने क्षहरातांचा केवळ पराभवच केला असे नाही तर त्यांच्या राज्याचा सौराष्ट्र किंवा काठियावाड आणि कदाचित भरूच (भरोच) बंदर यासह काही भाग खालसाही केला,[४५२] पण सातवाहनही हे प्रदेश आपल्याकडे फार काळ टिकवून ठेऊ शकले नाहीत. थोड्याच काळाने बहुधा त्याचा पुत्र व वारसदार वासिष्ठीपुत्र पुळुमाविच्या कारकिर्दीत कार्मदक क्षत्रपांनी ते त्यांच्याकडून हिरावून घेतले. मात्र त्यानंतर बंदर म्हणून भरुचचे महत्त्वच संपुष्टात आले.

दक्षिणेतील किमान काही सधन भारतीयांना पाश्चिमात्य कलाविष्कारांनी प्रचंड मोहिनी घातली होती. जागोजाग सापडलेले रोमन घडणीचे ब्राँझचे पुतळे याची साक्ष देतात. त्यात ब्रह्मपुरी (कोल्हापूर) येथे सापडलेली हर्क्युलीसची लहान प्रतिमा[४५३] आणि अलीकडेच जुन्नर येथे आढळलेली इरॉस नामक रोमन प्रेमदेवतेची पानाच्या पार्श्वभूमीवरची प्रतिमा[४५४] यांचाही त्यात अंतर्भाव होतो. या भागातील भारतीयांना रोमन मद्य आणि भांडी यांचीही फार आवड लागली होती हे अनेक ठिकाणी आढळलेल्या मद्यकुंभाच्या तुकड्यांचा चिकटलेल्या मद्याच्या राळेच्या अवशेषांवरून तसेच जी मेगॅरियन धर्तीची व इतर प्रकारची मातीची भांडी आणि त्यांच्या प्रतिकृती ठिकठिकाणी सापडल्या आहेत त्यावरून स्पष्ट होते.

अर्थात असे असले तरी रोमन लोकांना भारतीय हस्तीदंत, सुती वस्त्रे आणि मसाले यांचे इतके वेड लागले होते की, या सागरी व्यापाराचे झुकते माप भारताच्याच बाजूने होते. व्यापारातील खोट नगद चलन देऊन रोमन लोक भरून काढीत असत. सुखोपभोगांच्या बदल्यात भारताकडे प्रचंड प्रमाणावर सोने पाठवावे लागते अशी तक्रार रोमन सम्राट टायबेरियस (इ. स. १४-३७) याला सिनेट सभागृहापुढे करणे भाग पडले. प्लिनी आणि डायन क्रिसोस्टोन यांनाही तेच करावे लागले होते.[४५५]

दक्षिण भारतातील सर्व प्रदेश या व्यापारात सहभागी असल्याचे दिसते. त्याकाळीही आजच्या प्रमाणेच भरपूर प्रमाणात कापूस पिकवीत असलेल्या विदर्भाने सुती कापडाची निर्यात करून या व्यापारात आपले योगदान दिले होते. त्याच्या बदल्यात येथील

व्यापाऱ्यांना रोमची सुवर्ण नाणी मिळत असत. नागपूर जिल्ह्यातील अडम येथे अशी नाणी सापडली आहेत.[४५६] रोमन साम्राज्यातून आयात केलेल्या किंवा त्यांची नक्कल असलेल्या अनेक वस्तू अडम येथे अलीकडे झालेल्या उत्खननात हाती आल्या आहेत.[४५७] रोमन नाण्यांच्या धातूच्या किंवा मातीच्या प्रतिकृती बुले म्हणून ओळखल्या जात आणि दागिने म्हणून त्या लोकप्रिय होत्या. अनेक ठिकाणी त्या मोठ्या प्रमाणावर सापडल्या आहेत.

**चलन व नाणी** : मौर्यकाळात तांब्याच्या व चांदीच्या स्थानिक आहतमुद्रा चलनात होत्या आणि अशा चांदीच्या आहतमुद्रांचे अनेक संचय सापडले आहेत. सर्वसाधारणपणे कार्षापण नावाने ओळखली जाणारी आणि प्रत्येकी ३२ रत्ती (किंवा ५६ ग्रेन) एवढ्या वजनाची अनेक नाणी महाराष्ट्र, आंध्रप्रदेश, कर्नाटक व गुजरात येथील विविध ठिकाणी सापडली आहेत.[४५८] हीच दख्खनमधील नाणी पुढील काळात सातवाहनांनी पुन्हा प्रसारात आणली होती असे पूर्वी मानले जात असे, कारण मधल्या काळात दख्खनमध्ये कोठेही दुसरी नाणी प्रचलित असल्याचा पुरावा नव्हता. पण अलीकडेच लेखविरहित ओतीव अशी तांब्याची नाणी अनेक पुरातत्त्वीय महत्त्वाच्या ठिकाणी सापडली आहेत.[४५९] त्यावरून असे प्रस्थापित झाले आहे की, भारतीय उपखंडात जवळपास सर्वत्र सर्वसाधारण नाणेविषयक इतिहास सारखाच होता. आहतमुद्राच्या नंतर लेखरहित ओतीव प्रकारची नाणी प्रसारात आली होती ती आहतमुद्रांच्या शेवटच्या काळात प्रचलित झाली.[४६०] विदर्भ व तेलंगण या दख्खनच्या प्रांतात आणि माळवा-डाहल या मध्यप्रदेशच्या प्रांतात मौर्योत्तर काळात अनेक राजवटी होवून गेल्या. त्यातील अखेरच्या राजवटींची माहिती त्यांच्या हलक्या धातूच्या मोठ्या प्रमाणातील नाण्यांवरून समजते.[४६१] मौर्यांचे चांदीचे कार्षापण विलक्षण मोठ्या संख्येने प्रसारात आले होते. टाकसाळीतून बाहेर पडल्यापासून जवळपास हजार वर्षे ते चलनात असावे. त्या प्रकारच्या नाण्यांचे जे अनेक साठे नंतरच्या काळातील नाण्यांच्या जोडीने किंवा सुट्या स्वरुपात उत्खननात सापडले त्यावरून हा निष्कर्ष निघतो.[४६२] काही विधिनिषेधशून्य कारागीर खोटी नाणी पाडत असत.[४६३] भारतीय उपखंडाच्या जवळपास सर्वच भागात मौर्योत्तर राजघराण्यांकडून चांदीची नाणी प्रसारात आणणे थांबले किंवा अगदीच माफक प्रमाणात ते सुरू होते. या वस्तुस्थितींतून पुढच्या काळात इसवी सनाच्या सुमारे दुसऱ्या शतकात मिळालेल्या मातीच्या साच्यांचे गूढ उकलते. इसवी सनाच्या प्रारंभिक शतकातील तीन मुख्य राजघराणी म्हणजे सातवाहन, क्षहरात आणि कार्दमक यांनी वित्तीय अर्थव्यवस्थेच्या गरजा पूर्ण करण्यासाठी प्रचंड प्रमाणावर नाणी प्रसारात आणली. कारण लोक या प्रकारच्या अर्थव्यवस्थेला सरावले होते. सातवाहनांची प्रमुख चलनावळ तांबे, शिसे यासारखे स्वस्त धातू किंवा पोटिन नामक संमिश्र धातू यापासून बनलेली होती असे आतापर्यंत समजले जात असे. पण आता त्यांची चांदीची नाणी विपुल संख्येने मिळाली आहेत.[४६४] उरलेल्या दोन राजघराण्यांची हजारोच्या संख्येत आढळलेली नाणी[४६५] चांदीची आहेत. तांबे इत्यादी सारख्या हलक्या धातूची नाणी अगदीच क्वचित दिसतात.[४६६]

नाणेघाट येथे सातवाहन राजा वेदिश्री[४६७] याचा यज्ञविषयक जो पुरालेख आहे त्यात त्याच्या जन्मदात्यांनी यज्ञाची मौल्यवान दक्षिणा दिल्याची नोंद आढळते. त्यात इतर गोष्टींबरोबरच विविध श्रौत यज्ञ करण्यासाठी दिलेल्या २४४००, ६००१, १४०००, १००००(+) २,[४६८] १०१ आणि १०००१ कार्षापण नाणी अशा रकमा अंतर्भूत आहेत. हे कार्षापण म्हणजे नक्की काय ते सांगता येत नाही. काही विद्वानांच्या मते भारतात होणारा चांदीचा अल्प पुरवठा लक्षात घेता ती तांब्याची असली पाहिजेत.[४६९] तथापि, तांब्याची (किंवा अन्य कोणत्याही हलक्या धातूची) नाणी कितीही दिली तरी त्यासोबत ज्या अतिमौल्यवान वस्तूंची नावे आहेत त्यांच्या तुलनेत हे दान अगदीच किरकोळ ठरेल. त्यामुळे ही जुन्या काळची चांदीचीच आहत प्रकारची नाणी असावीत. ती टांकसाळीतून बाहेर पडणे बंद झाल्यानंतरही दीर्घकाळपर्यंत प्रचारात होती. दुसरी बाब म्हणजे सातकर्णि आणि नागनिका यांनी आपली संयुक्त चांदीची नाणी प्रसारात आणल्याचे समजते. त्यांच्या नाण्यांचे वजन ६.५ ग्रॅम म्हणजे नेहमीच्या ३२ रत्ती वजनाच्या कार्षापणाच्या दुप्पट होते. पण तरीही ते नाणे पाणिनेने वर्णन केलेले ३२ मासे किंवा अदमासे ६० रत्ती वजनाचे त्रिंशत्क प्रकारचे कार्षापण म्हणून चालू शकत होते.[४७०] ही नाणीही तेथे अभिप्रेत असू शकतील, मात्र ती एवढ्या मोठ्या प्रमाणात प्रसारात होती का याबद्दल खात्रीशीरपणे सांगता येत नाही.[४७१] त्यानंतर यामध्ये खंड पडलेला दिसतो. काहीशा खंडानंतर सातवाहनांनी पुन्हा चांदीची चलनावळ प्रसारात आणली. मोठ्या प्रमाणावर चांदीची नाणी प्रसारात आणणाऱ्या क्षहरातांचा निःपात केल्यामुळे निर्माण झालेली पोकळी भरून काढण्यासाठी सातवाहनांना हे करावे लागले, पण त्यात त्यांच्या चलनावळीचे स्वरुपच संपूर्णतया पालटले होते. मात्र उपलब्ध माहितीनुसार गौतमीपुत्र सातकर्णि याने[४७२] किंवा त्याचा मुलगा आणि वारस वासिष्ठीपुत्र पुळुमावि याने या नंतरच्या मालिकेचा प्रारंभ केला असावा आणि राजघराण्याच्या नंतरच्या सदस्यांनी तोच कित्ता फक्त काही किरकोळ फेरफारांसह पुढे गिरविला असावा.[४७३] त्या चलनावळीचे नाव काय होते हे ठरवणे कठीण आहे. परंतु इतर काही समकालीन मालिकांप्रमाणे तीसुद्धा कार्षापण म्हणूनच ओळखली जात असेल ही शक्यता पूर्णपणे नाकारता येणार नाही. हे नमूद करायला हवे की, नहपानाच्या चांदीच्या नाण्यांची जागा हिरावून घेण्यासाठी ही नाणी अस्तित्वात आली होती.[४७४] नहपानाची नाणी कार्षापण म्हणून ओळखली जात होती.

हलक्या धातूची सातवाहन नाणी विभिन्न आकारांची असून त्यांच्या वजनात इतकी तफावत आहे की, त्यात वजनाचे कोणते मोजमाप अवलंबिले आहे आणि त्यांची नावे कोणकोणती आहेत हे ठरविणे कठीण होते.

चांदीची क्षहरात नाणी मोठ्या प्रमाणावर पाडली जात असत.[४७५] त्यात जरी युक्रेटाइडसूने सुरू केलेले ३४ ते ३६ ग्रेन्स वजनाचे लघु ड्रॅक्मा प्रमाणक अवलंबिले असले[४७६] तरी त्यांना कार्षापण असेच नाव नहपानाच्या काळातील कोरीव लेखात आढळते.[४७७] ही हजारो नाणी जशी दान दिली होती, तशी नाशिक येथील श्रेणींमध्ये ठेवीरूपाने गुंतवलीही होती. ही नाणी हजारोंच्या संख्येत मिळाली आहेत.[४७८] त्यावरून

ती किती प्रचंड प्रमाणावर प्रसारात आली असतील याची कल्पना येऊ शकते. अशाप्रकारे कार्षापण ही शेकडो वर्षांपासून चालत आलेली नाणक संज्ञा आहे. तिचा मूळ अर्थ ३२ रत्ती किंवा सुमारे ५८ ग्रेन्स वजनाची चांदीची नाणी तसेच बहुधा ८० रत्ती किंवा सुमारे १४६ ग्रेन्स वजनाची तांब्याची नाणी असा होता. तिचा वापर क्षहरातांच्या बऱ्याच हलक्या वजनाच्या चांदीच्या नाण्यांसाठी केला जाऊ लागला होता.[४७९] कार्दमकांच्या अभिलेखात कोणत्याही चलनांचा उल्लेख नाही, पण तरीही सबळ कारणाने असे गृहीत धरता येते की, चष्टन आणि त्याच्या वारसदार यांची चांदीची नाणी कार्षापण म्हणूनच ओळखली जात असावीत,[४८०] असे मानण्यास सबळ कारणे आहेत, पण या नाण्यांचे वजन पारंपरिक कार्षापणांच्या वजनाशी जुळत नव्हते आणि ती जुनी नाणीही चलनात होती. एकाच वेळी प्रचलित असलेल्या त्या दोन्ही चलनांचे वेगळेपण प्रस्थापित करण्यासाठी नवी संज्ञा तयार करण्याची गरज होती. इसवी सनाच्या सुमारे तिसऱ्या शतकात संकलित केल्या गेलेल्या आणि गुप्तकाळात संस्कारित झालेल्या अंगविज्जा या जैन-प्राकृत ग्रंथात 'बाल-काहावण' किंवा 'नवकाहापण' (म्हणजे नवकार्षापण) या नाण्याचा उल्लेख येतो. तो नव्या क्षत्रप चांदीच्या चलनाचा असून जुन्या कार्षापणांपासून वेगळेपण दाखविण्यासाठी तो केला असावा. जुने ३२ रत्ती वजनाचे कार्षापण आता 'आदिमूल-काहापण' म्हणजे 'मूळ कार्षापण' अशा नावाने ओळखले जाऊ लागले होते. त्याच ग्रंथात आढळणारी दुसरी संज्ञा खत्तपक (क्षत्रपक) ही सुद्धा शक-क्षत्रपांच्या चांदीच्या नाण्यांसाठीच असावी-[४८१] बुद्धघोषाच्या 'सामंत-पसादिका' आणि 'विनयवत्थुमंजूसा'मधील एक परिच्छेद आणि सारिपुत्राच्या सारत्थदीपनी (सारार्थ-दीपिनी) मधील अन्य परिच्छेद चष्टन व त्याचे वारसदार यांच्या चांदीच्या नाण्यांचा निर्देश रुद्रदामक किंवा रुद्रदामकादि असा करतात. तो या घराण्याचा सर्वात प्रसिद्ध व समर्थ राजा पहिला रुद्रदामन् याच्या नावावरून आणि जुन्या आहतमुद्रांचे क्षत्रपांच्या रजत कार्षापणापासून वेगळेपण सूचित करण्यासाठीच केला असावा. जुनी नाणी "नील-काहापण" म्हणून ओळखली जात होती. असे नाव त्यांच्या पृष्ठभागावर साचलेल्या हिरवट गंजामुळे दिले असावे.[४८२] "सारत्थदीपनी"नुसार मूल्य आणि वजन या दोन्ही दृष्टीने रुद्रदामक हे नाणे नील काहापणाच्या तीनचतुर्थांश होते.[४८३]

इसवी सनाच्या प्रारंभिक शतकात या भागातील कोणत्याही राजघराण्याने सोन्याची नाणी पाडल्याचा उल्लेख नाही. तरी सुद्धा सुवर्ण नावाचे एक सोन्याचे नाणे किंमतीला ३५ कार्षापणाएवढे असते असा एक संदर्भ सापडतो. सत्तर हजार कार्षापणांची उदार देणगी देवांना आणि ब्राम्हणांना दिल्याची नोंद नाशिकच्या एका कोरीव लेखात आहे. त्यात असे म्हटले आहे की, एक सुवर्ण म्हणजे पस्तीस कार्षापण या हिशोबाने देणगीचे एकूण मूल्य दोन हजार सुवर्ण होते.[४८४] या प्रदेशातील राजघराण्याने किंवा अन्य कोणत्याही सत्ताधारी कुटुंबाने सोन्याची नाणी प्रसारात न आणल्यामुळे हा संदर्भ कुशाण सम्राटांच्या सुवर्ण नाण्यांचा असावा असा निर्वाळा विद्वानांनी दिला आहे. पश्चिमी क्षत्रप हे त्या सम्राटांचे मांडलिक होते असे मानले जाते. म्हणूनच कुशाणांचे नाणे पश्चिम

भारतात चलनात होते आणि ते सुवर्ण नावाने परिचित होते[४८५] अशी एक समजूत आहे. ही दोन्ही गृहिते संपूर्णतः निराधार आहेत, कारण याविषयी पुरावा उपलब्ध नाही. दुसरे गृहीतक पाहता पश्चिमी क्षत्रप कोणाचेही ताबेदार असल्याचा कुठलाही संकेत त्यांच्या कोरीव लेखात सापडत नाही.[४८६] ते कुशाणांचेही मांडलिक नव्हते. डी. आर. भांडारकर यांचा असा अभिप्राय आहे की, कुशाणमूळ या ऋषभदत्ताच्या नाशिक कोरीव लेखात[४८७] आढळणाऱ्या संज्ञेचा संदर्भ कुशाण या नाण्याशी असावा. पूर्वी प्रतिक म्हणून ज्याचा उल्लेख आला आहे ते नाणे नहपानाचे चांदीचे नाणे होते. कुशाण अधिराजा पहिला कडफाइसेस याच्या वतीने त्याने ते प्रसारात आणले होते आणि कुशाणमूल (कुषाण-मुल्य) शब्दाचा अर्थ "कुशाणांचे मुल्य"[४८८] असा होता, पण अशा ह्या स्पष्टीकरणास काहीच आधार नाही. वा. वि. मिराशी यांनी अनुमान केल्यानुसार[४८९] कुशलमूल या शब्दाचे ते चुकीचे रूप असावे. शिवाय कुशाणांची नाणी आणि क्षत्रपांनी प्रसारात आणलेली नाणी यांच्यात मुळीच साधर्म्य नाही. पहिल्या गृहीतकास स्पष्ट पुरावा नाही, कारण दख्खनमध्ये व पश्चिम भारतात पुरातत्त्वीयदृष्ट्या महत्त्वाच्या ठिकाणी अनेक लहान-मोठी उत्खनने व शोधमोहिमा होऊनही कुशाण नाण्यांचा कोठे मागमूसही लागलेला नाही. या भागात जर कुशाणांची सुवर्णनाणी वापरात असती तर असे झालेच नसते.[४९०]

सुवर्ण हे कशाचे परिमाण होते हा प्रश्न शिल्लकच राहतो. परंपरेने ८० रत्ती किंवा सुमारे १४५ ग्रेन्स वजनाची ती नाणी नव्हेत, कारण गुप्त पूर्वकाळात अशी नाणी नव्हती. ती सोन्याची रोमन नाणीच (aurei) असली पाहिजेत. कारण तीच सोन्याची नाणी इतर चांदीच्या आहतमुद्रांच्या जोडीने मोठ्या प्रमाणावर सापडली आहेत. थेट ऑगस्टस् सीझर आणि तिबेरियस यांच्या काळापासून ही नाणी दख्खन भागात व दक्षिण भारतात येत होती आणि हा ओघ बराच काळापर्यंत सुरू होता, कारण समाजातील अमीर-उमरावांच्या व विशेपतः स्त्रियांच्या मागणीवरून रोमन व्यापाऱ्यांना येथील महागड्या वस्तू विकत घेणे भाग पडत होते. राजांनी आणि सामाजिक विचारवंतांनी तीव्र टीका आणि निषेध करूनही ही मागणी कमी होत नव्हती. ही नाणी बाजारात प्रचलित होती आणि दुसरे सोन्याचे स्थानिक चलन अस्तित्वात नसल्यामुळे ती बाजारात घेतली जात होती. चांदीचे रोमन दीनार (denarii) दख्खन भागात त्यानंतरही काही शतके चलनात राहिले होते हे इक्ष्वाकुंच्या काही कोरीव लेखांतील "दीनारी" आणि "दीनारी–माषाक" अशा उल्लेखांवरून दिसते. ही बहुधा इक्ष्वाकुंची शिश्याची नाणी असावीत.[४९१] या संदर्भात पेरिप्लसमध्ये जी रोमाची चांदीची व सोन्याची नाणी बॅरिगाझा[४९२] मुझिरी व नेल्सिंडा[४९३] बंदरात आयात झाल्याची नोंद आहे ती विचारात घेणे आवश्यक आहे. तेथे असेही ठाम विधान येते की, अगदी या काळापर्यंत अपोलोडोटस आणि मेनांडेर यांचे ग्रीक कोरीव लेख असलेली जुनी ग्रीक ड्रँक्मा नाणी बॅरिगाझा येथे चलनात आहेत,[४९४] पण गुजरातच्या भावनगर जिल्ह्यातील घोघा या प्राचीन बंदरानजीक नहपानाच्या चांदीच्या नाण्यांच्या जोडीला अपोलोडोटस आणि

डायोनिसस यांच्या चांदीच्या नाण्यांचे संचय आणि सौराष्ट्रात व दक्षित गुजरातेत मेनांडेर व युक्रेटिडीस यांच्यासारख्या इंडोग्रीक राजांची नाणी प्रत्यक्ष सापडली नव्हती तोपर्यंत या विधानाची सत्यता शंकास्पद होती.[४९५]

या विवेचनावरून दिसते की, महाराष्ट्र, गुजरात आणि आंध्रप्रदेश येथील इसवी सनाच्या प्रारंभिक शतकांतील वित्तीय व्यवस्था अत्यंत गुंतागुंतीची होती. कारण सातवाहन, क्षत्रप, इंडो-ग्रीक आणि रोमन चांदीची नाणी तसेच रोमची सोन्याची नाणीही एकाच वेळी बाजारात प्रचलित होती. सोन्याच्या आणि चांदीच्या रोमन नाण्यांचा (aurei) तौलनिक वापर अगदीच क्वचित म्हणजे जमिनीची खरेदी–विक्री यासारख्या मोठ्या व्यवहारांच्या प्रसंगीच होत असे, चांदीची नाणी तुलनेने लहान सौद्यांमध्ये वापरली जात, तर हलक्या धातुंची नाणी लोक आपल्या दैनंदिन जीवनाच्या गरजांच्या परिपुर्ततेसाठी वापरीत असत. खरेदी-विक्रीच्या व्यवहारानुसार त्याचे बाजारमूल्य ठरत असावे. आज त्या विषयी अंदाज बांधता येणे कठीण आहे.

इसवी सनाच्या चौथ्या ते सहाव्या शतकांच्या कालावधी व्यापणाऱ्या वाकाटक-त्रैकुटकांच्या काळात परिस्थिती बरीच कमी गुंतागुंतीची असती तरी फारशी सोपी किंवा साधी होती असे म्हणता येणार नाही. अलीकडेपर्यंत वाकाटकांची अशी नाणी मिळाली नव्हती आणि अशी समजूत होती की, स्वतःची चलनावळ नसल्यामुळे त्यांनी इतर समकालीन सत्तांच्या चलनांच्या वापराला परवानगी दिली होती. पश्चिमी क्षत्रपांची नाणी सतत मोठ्या प्रमाणावर संचयाच्या तसेच फुटकळ स्वरूपात मिळत राहिल्यामुळे असे गृहीत धरले गेले होते की, वाकाटकांच्या राज्यात तीच चलनावळ प्रसारात होती.[४९६] वाकाटक राजा पृथिवीषेण[४९७] आणि बहुधा नरेंद्रसेन याची हलक्या धातूची नाणी इतर सर्वसाधारण वाकाटक प्रकारच्या नाण्यांसोबत वर्धा भागात, विशेषतः पवनार येथे काही वर्षापूर्वी सापडली.[४९८] नागपूर जिल्ह्यातील मनसर,[४९९] अकोला जिल्ह्यातील वाशिम (प्राचिन वत्सगुल्म)[५००] येथील उत्खननात अशीच नाणी सापडली आहेत. आतापर्यंत वाकाटकांची फक्त हलक्या धातूंचीच नाणी सापडली असली तरी आता आपण ठामपणे असे म्हणू शकतो की, वाकाटकांची स्वतःची चलनावळ होती.

अर्थात ही नाणी हलक्या धातूंची असल्यामुळे ती फक्त दैनंदिन सामान्य व्यवहार करतानाच वापरता येत असतील. उच्च पातळीवरच्या व्यापारासाठी तसेच मौल्यवान वस्तूंच्या खरेदी-विक्रीसाठी ती फारशी उपयोगाची नसतील. या संदर्भात एक-दोन वाकाटक पुरालेखांमध्ये उल्लेखिलेल्या जमीन खरेदीचा विशेष संदर्भ देता येईल. उदा. (१) दुसऱ्या प्रवरसेनाच्या कारकिर्दीच्या तेवीसाव्या वर्षातील इंदूर पट्टिकांमध्ये चंद्र नामक व्यापाऱ्याने अर्धे खेडे (वाटक) विकत घेतल्याची व दान केल्याची नोंद आहे.[५०१] (२) रामटेक येथील (केवलनृसिंह मंदिरातील) खंडीत शिलेवरील कोरीव लेखात प्रभावतीगुप्ताचा मुलगा (बहुधा दुसरा प्रवरसेन) याने आपल्या आईच्या स्मरणार्थ

प्रभावतीस्वामिन नामक मंदिर बांधण्यासाठी आणि सुदर्शन नामक तळे खोदण्यासाठी जमिनीचा तुकडा विकत घेतल्याची नोंद आहे.[५०२] असे व्यवहार तांब्याची नाणी देऊन झाले असणे शक्यच नाही तर त्यासाठी चांदीची व सोन्याची मौल्यवान नाणीच वापरात आणली असली पाहिजेत. आजपर्यंत तरी वाकाटकांची तशी नाणी सापडलेली नाहीत. पण त्यांनी किमान चांदीची तरी नाणी काढली असावीत. अर्थात त्यांनी ती न काढली असण्याची शक्यताही नाकारता येत नाही. त्यांच्या उत्तरेतील व दक्षिणेतील काही समकालीनांनीही सोन्याची किंवा चांदीची नाणी काढली नव्हती. पण मोठ्या व्यवहारात कोणती नाणी वापरली जात हे सांगणे कठीण असले तरी बाजारात चांदीच्या नाण्यांची मुळीच वाण नव्हती. प्राचीन भारतात एकदा प्रसारात आलेली नाणी शतकानुशतके बाजारात प्रचलित रहात असत. दीर्घकाळ वापरल्यानंतर त्यांचे वजन घटले तरच ती रद्दबातल होत असत. चांदीच्या आहतमुद्रा किमान प्रारंभिक मध्ययुगीन काळापर्यंत तरी वापरात होत्या असे निश्चित पुरावे आहेत. अनेक राजघराण्यांनी चांदीची नाणी प्रसारात न आणल्याचे कारण या विचित्र वस्तुस्थितीत सापडते. त्याचप्रमाणे ज्या राजघराण्यांनी ती प्रसारात आणली होती त्यांची ती नाणीही तुलनेने दुर्मिळच आहेत. इसवी सनाच्या दुसऱ्या शतकापासूनच्या कोरीव लेखांत आणि वाङ्मयीन कृतींमध्ये पुराण या अर्थपूर्ण नावाने त्यांचा उल्लेख दिसतो[५०३] आणि नील-काहापण (निळसर कार्षापण) म्हणून इसवी सनाच्या किमान पाचव्या शतकापर्यंत तरी त्याचा संदर्भ दिलेला आढळतो.[५०४] कर्नाटकाच्या रायचूर जिल्ह्याच्या कोपल तालुक्यातील चिक सांडोगी नामक खेड्यात तांब्याच्या भांड्यात ठेवलेल्या ५,५३४ चांदीच्या आहतमुद्रांचा संच सापडला. भांड्यावर ब्राह्मी लिपितील निर्देश असून त्याचा काळ इसवी सनाचे तिसरे शतक असा निर्धारित केला गेला आहे.[५०५] चांदीच्या आहतमुद्रांचा दुसरा एक ४४० नाण्यांचा संच इंडो-ससानियन नाण्यांच्या सोबत मिळाला असून सध्या तो लखनौच्या राज्य वस्तुसंग्रहालयात ठेवला आहे. यावरून या नाण्यांची मध्ययुगापावेतो लोकप्रियता टिकून असल्याची साक्ष मिळते.[५०६] व्ही. एस्. अग्रवाल यांनी असा रास्त निष्कर्ष काढला आहे की, चांदीच्या आहतमुद्रा आणि कार्षापण यांची परंपरा थेट मध्ययुगीन काळापर्यंत टिकून होती.[५०७] पूर्वी सातवाहनांच्या वर्चस्वाखाली असलेल्या वाकाटक वसाहतींमध्ये सातवाहनांची चांदीची नाणीही चलनात राहिली असावीत.[५०८] पश्चिमी क्षत्रपांची नाणी अत्यंत मौल्यवान होती. संचय व सुट्या अशा दोन्ही स्वरुपात ती त्यांच्या राज्यापासून सुदूरच्या प्रदेशात सापडली आहेत.[५०९]

यांच्या बरोबर गुप्तांची सोन्याची व चांदीची नाणीही विपुल प्रमाणात असलीच पाहिजे. विशेषतः त्यांच्याशी असलेले मैत्रीचे संबंध विचारात घेता त्याचा परिणाम व्यापारी एका भागातून दुसऱ्या भागात जाण्यात झाला असावा. तत्कालीन त्रैकुटक चांदीची नाणीही वापरात होती.[५१०] ही सगळी नाणी वाकाटक काळात प्रचारात असावीत आणि व्यापारी व राजे यांच्यासह सर्वच लोक त्यांचा सढळपणे वापर करीत असावेत. अशाप्रकारे वाकाटककालीन वित्तीय व्यवस्था अत्यंत गुंतागुंतीची होती.

विपणन शक्तीच (market force) त्यांचे सापेक्ष मूल्य व विनिमय दर निर्धारित करीत असत.

## धर्म

या काळातील धर्मकारण काहीसे गुंतागुंतीचे होते. विविध धर्मपंथांचे दिग्गज विद्वान जरी एकमेकांशी युक्तिवाद व वादंग करीत असले तरी सामान्य माणसे एकमेकाशी शांततापूर्वक व गुण्यागोविंदाने वागत असत. त्यांच्या सर्वसाधारण धर्मश्रद्धा व व्यवहार यात गंभीर स्वरुपाची तफावत प्रथम दर्शनी तरी दिसत नव्हती. सर्वच समकालीन धर्मांचा कर्माच्या प्रभावक्षमतेवर आणि पुनर्जन्मावर विश्वास होता. त्यांची श्रद्धास्थाने पंथवार निरनिराळी असली आणि सर्व पंथांचे आपापले अधिकृत धर्मग्रंथ व संकल्पना असल्या तरी त्या सर्वांची उपासनेची पद्धती सारखीच होती. खाद्य व पेये, पोषाख व आभूषणे आणि उत्सव व करमणूक प्रकार व सर्व बाबतीत भिन्नपंथीय लोकांच्या जीवनांचा सर्वसाधारण आकृतिबंध एक सारखाच होता. सुसंवादी संबंध आणि इतरांच्या दृष्टिकोनाबद्दल सहिष्णुता असे एकूण चित्र होते. एका पंथाचे अनुयायी अन्य धर्मांना उदार हस्ते देणग्या देताना दिसून येतात.

**वैदिक-पौराणिक धर्म :** वैदिकी संकल्पनांमधून पौराणिक देवदेवता व धार्मिक विधी याकडे होणारे संक्रमण हे या काळाचे ठळक वैशिष्ट्य होते. वेद व देवदेवता यांच्याबद्दल उघडपणे वाद होत नसला तरी लोकप्रियता व महत्त्व याबाबत वैदिक देवांपेक्षा पौराणिक देवदैवतांचे महत्त्व निश्चितपणे वाढले होते. हा खऱ्या अर्थाने संक्रमण काळ होता. जुन्या प्रथा सुरू असल्या तरी क्षीण झाल्या होत्या आणि त्याजागी नव्या साकार होऊन त्यांची लोकप्रियता वाढत होती. वैदिक यज्ञयाग करीत असतानाच काही लोक त्याचवेळी नव्या दैवतांचीही उपासना करीत. मंदिरांची उभारणी, पौराणिक कर्मकांडाप्रमाणे पूजा करण्यासाठी दैवी प्रतीकांची वा प्रतिमांची प्रतिष्ठापना, तीर्थक्षेत्रांच्या यात्रा आणि इष्टाप्रतीसारख्या विधींचे पालन या पौराणिक धार्मिक आचरणांचा ते अत्यंत उत्साहाने अंगिकार करू लागले होते.

**श्रौत यज्ञविधी व वैदिक अध्ययने :** वेदिश्रीच्या नाणेघाट कोरीव लेखात त्याचा पिता सातकर्णि यांच्या हयातीत त्याच्या आई-वडिलांची संयुक्तपणे केलेल्या श्रौत यज्ञविधीचे सविस्तर तपशील मिळतात. अर्थात त्या कोरीव लेखातील खंडीत कामामुळे फारच थोडी माहिती मिळते. त्यांनी केलेल्या यज्ञविधींमध्ये पुढील विधींचा अंतर्भाव होता- अग्न्याधेय, अन्वारंभणीय, अंगारिक,[५११] राजसूय, किमान दोन अश्वमेध,[५१२] भगलदशरात्र, गर्गत्रिरात्र, गवामयन,[५१३] अतुयाम शब्दाने ज्याचे नाव संपते असा यज्ञ, अंगिरसामयन, तसेच शतात्रिरात्र, अंगिरसात्रिरात्र,[५१४] छंदोपवमानात्रिरात्र आणि ज्यांची नावे अगदी जुळवूनही लावता येत नाहीत असे इतरही अनेक विधी. यापैकी काही विधी तर एकापेक्षा अधिक वेळा केले असावेत असे दिसते.[५१५] या यज्ञविधींच्या ऋत्विजांना आणि

निमंत्रिताना ज्या अत्यंत मौल्यवान दक्षिणा आणि भेटवस्तू दिल्या जात होत्या त्यांची बारकाईने नोंद करून ठेवली आहे. त्यात पुढील गोष्टी होत्या- हजारो गायी, घोडे, कार्षापण नाणी, चांदीची भांडी, काही हत्ती, अश्वरथ, सोन्याची आभूषणे, खेडी इत्यादी.[५१६] वाकाटक सम्राट पहिला प्रवरसेन हाही वैदिक यज्ञयागाचा मोठा आश्रयदाता होता. त्यानेही अग्निष्टोम, आप्तोर्याम, उक्थ्य, षोडशिन, अतिरात्र, वाजपेय, बृहस्पतिसव, साद्यस्क, चार अश्वमेध याबरोबरच कित्येक श्रौत यज्ञविधी केले होते.[५१७] त्यांचे व्याही भारशीव यांनी दहा अश्वमेध[५१८] केले. त्याचा कनिष्ठ समकालीन गुप्त सम्राट समुद्रगुप्त यालाही एकाहून आधिक[५१९] (बहुधा दोन) अश्वमेध केल्याचे श्रेय दिले जाते.[५२०] वाकाटकांच्या प्रवरसेन शाखेची जागा घेतलेल्या मुंडपुत्रांनीही अश्वमेध यज्ञ साजरा केल्याची माहिती मिळते.[५२१] आंध्र किनारपट्टीत सातवाहनांच्या नंतर सत्तेवर आलेले इक्ष्वाकु राजेही वैदिक यज्ञयागांच्या बाबतीत मागे नव्हते. राजा शांतमूल याने अग्निहोत्र, अग्निस्टोम, वाजपेय आणि अश्वमेध यज्ञ केल्याची माहिती नागार्जुनकोंडा येथील अनेक कोरीव लेखातील परिच्छेदावरून कळते.[५२२] या काळात वैदिक धर्माची लोकप्रियता अनेक राजांमध्ये, अगदी लहानसहान राजांमध्येही असल्याचे दिसून येते. त्यांनी श्रौत यज्ञविधी, विशेषतः अश्वमेध केला असल्याचा दावा केला जातो. त्यांच्या राजकीय अधिसत्तेची ती घोषणा मानली जात होती. अशाप्रकारे त्रैकुटक राजा दहूसेन,[५२३] शालंकायन राजा विजयदेववर्मन्,[५२४] कर्नाटकचा कदंब राजा कृष्णवर्मन्[५२५] विष्णुकुंडिन् माधववर्मन् जनाश्रय,[५२६] पल्लव राजा शिवरस्कंदवर्मन् आणि तामिळनाडूतील कांचीच्या सिंहासनावरचे त्याचे काही वंशज[५२७] यांना इतर श्रौत यज्ञविधींवरोबरच अश्वमेध केल्याचेही श्रेय दिले जाते.

वाकाटक, मुंडपुत्र आणि कुंभकर्ण यांच्या ताम्रपत्रात आदात्य ब्राह्मणाचे जे वर्णन आहे त्यावरून वैदिक पांडित्य अतिलोकप्रिय असल्याचे आणि राज्यकर्ते जमिनींच्या उदार देणग्या देऊन या कार्याचा कैवार घेत असल्याचे लक्षात येते. चारही वेदांचे अध्ययन चालत असे, पण त्यातही कृष्ण यजुर्वेदाची तैत्तिरीय शाखा सर्वाधिक लोकप्रिय होती.[५२८] वेदांशी संलग्न अशा ब्राह्मणे, आरण्यके, प्रातिशाख्ये व वेदांगे यासारख्या पूरक वाङ्मयाचाही सखोल अभ्यास होतच असावा.

**पौराणिक धर्म** : पुराणे आणि पूरक धर्मग्रंथ वैदिक उपासनाविधींच्या विरूद्ध नाहीत. पण मंदिरातील पूजाविधी, तीर्थयात्रा, दानधर्म, पूर्तकर्म म्हणून ओळखले जाणारे लोकोपयोगी उपक्रम, सण-उत्सव आणि विशिष्ट देवदेवतांचे ठराविक दिवशीचे उपवास या वैदिकोत्तर बाबींचे ते केवळ समर्थनच करीत नाहीत तर त्याच्यावर कमालीचा भर देतात. लोकांच्या सश्रद्ध वृत्तीमुळे नवनव्या देवता त्यांच्या पूजापाठाच्या कर्मकांडासह अस्तित्वात आल्या, वेदातील इंद्र, वरुण, सोम इत्यादी सर्वाधिक समर्थ देवांची लोकप्रियता घटून त्यांना दुय्यम स्थान प्राप्त झाले आणि दुय्यम वैदिक देवतांचे

जनमानसातील स्थान उंचावले. ज्या व्यक्ती वैदिक यज्ञयाग करायच्या त्याच आता पुराणोक्त विधी करू लागल्या. अशाप्रकारे जो बदल घडला तो देवतांच्या बाबतीतल्या दृष्टिकोनातील होता. परिणामतः तो संघर्षरहित परिवर्तनाच्या स्वरुपाचा होता. सेमिटिक धर्माबाबत घडला तसा तो भूतकाळाशी सपशेल काडीमोडाच्या स्वरुपाचा नव्हता. भारतीय संस्कृतीचे वेगळेपण यातच सामावलेले आहे. याच्याशीच संबंधित दुसरे तितकेच ठळक वैशिष्ट्य म्हणजे इतर धर्माबद्दल केवळ सहिष्णुताच नव्हे तर त्यांना उदार तात्त्विक दृष्टिकोनातून तसेच व्यावहारिक आश्रय देण्याची येथील अनन्य परंपरा हे होय. वासुदेव, संकर्षण आणि स्कंदकुमार किंवा महासेन यासारख्या नव्या देवदेवता उदयास आल्या; एवढेच नव्हे तर लोकांमध्ये त्यांची लोकप्रियता खूपच वाढली. वैदिक कर्मकांडाचे अनुयायीच ते कर्मकांड सांभाळून या नव्या देवतांचेही उपासक बनले होते हे विलक्षणच म्हणावे लागेल. सातकर्णि राजाने श्रौत यज्ञविधी मोठ्या थाटामाटाने साजरे केले होते. मौल्यान भेटवस्तू व नजराणे देऊन प्रचंड खर्च केला होता; पण ते त्याच्या नवीन उपासनेच्या मुळीच आड आले नाही. वैदिक यज्ञविधींचा ज्या शिलालेखात तपशीलामध्ये उल्लेख केला आहे त्याची सुरुवात प्रजापती, धर्म, इंद्र, संकर्षण, वासुदेव, चंद्र, सूर्य, यम, वरूण, कुबेर आणि वासव, चार दिशांचे बलशाली लोकपाल आणि कुमारांमधील जो सर्वोत्तम असेल तो (किंवा कुमार जो सर्वोत्तम असेल) यांना केलेल्या अभिवादनाने होते. यापैकी धर्म, संकर्षण, वासुदेव, चार लोकपालांची संकल्पना, कुबेर, कुमार (स्कंद) या देवता वैदिकोत्तर असून सापेक्षतः नंतरच्या आहेत, तर वरुण, जो सर्वात समर्थ वैदिक देवतांपैकी एक होता तो येथे यम, कुबेर, वासव यांच्या बरोबरीने पश्चिम दिशेचा रखवालदार मात्र झाला आहे. इंद्र आणि वासव ही खरे तर एकाच वैदिक देवाची दोन नावे आहेत. ऋग्वेदकाळात तो एक महाबलाढ्य देव मानला जात असे. आश्चर्य म्हणजे सातकर्णीच्या हयातीत इसवी सनपूर्व व इसवी सनाच्या पहिलया शतकात त्या दोन स्वतंत्र देवता मानल्या जाऊ लागल्या होत्या. सातवाहनांचे ज्ञातिदृष्ट्या व व्यक्तिगत नावांच्या दृष्टिकोनातून विश्लेषण करणे यादृष्टीने उद्बोधक ठरेल. पुराणात ज्यांचा उल्लेख अंध्र किंवा अंध्रजातीय असा केला आहे आणि सातवाहनांच्या अभिलेखात ज्यांचा निर्देश आहे असे राजे जर आपण विचारात घेतले तर त्यापैकी सातकर्णि व नागानिका यांचा पुत्र वेदिश्री आणि त्याच घराण्यातील एक वंशज यज्ञ सातकर्णि यांची नावे यज्ञविधीशी निगडीत आहेत. वेदिश्रीचे आईवडील यज्ञविधीचे कमालीचे चाहते असल्यामुळे त्यांनी आपल्या मुलाला ते नावे दिले असावे. पण जेव्हा एकही सातवाहन राजा यज्ञयागाशी संबंधित नसताना आणि पौराणिक श्रद्धा व धर्मविधी अधिकाधिक लोकप्रिय होत असताना यज्ञ हे राजाचे नामाभिधान कोणत्या कारणाने पडले असावे याबद्दल ठामपणे काही सांगता येणार नाही. इतर ज्ञात नावे पौराणिक देवदेवतांच्या लोकप्रियतेशी सुसंगत अशीच आहेत.[५२१] संस्थापकाचे नाव सिमुक (किंवा छिमुख) हे जर संस्कृतोद्भव नाव असेल तर श्रीमुखचे ते प्राकृत रूप असावे आणि त्याचा वैष्णव हा

संप्रदाय असावा किंवा राजा दिसायला सुस्वरुप होता एवढाच त्याचा अर्थ असावा. उरलेल्या नावांपैकी सहा नावे स्कंदाशी निगडीत आहेत. पुळुमावि हे त्यापैकीच एक होय. सातवाहनांवरील प्रकरणात त्याचा नामोल्लेख केलाच आहे. पुळुमावि हा शुद्ध तेलगु शब्द असून त्याचा अर्थ बोरुतून जन्मलेला किंवा संस्कृत भाषेत शरवण-भव असा होतो. दुसऱ्या राजाचे नाव हे कृष्णाचेच नाव असून ज्याला वेदिश्रीच्या उपरोक्त नाणेघाट कोरीव लेखात प्रारंभिच अभिवादन केले आहे त्या वासुदेवाशी ते जुळणारे आहे. सातकर्णीच्या दुसऱ्या एका मुलाचे नाव शक्ती असे होते. त्याचा संदर्भ त्याच नावाच्या देवतेशी असावा किंवा बळ या अर्थानेच केवळ ते ठेवले असावे. उरलेल्या नावांपैकी एकाचा संदर्भ लंबोदर या नामरुपात गणपतीशी तर इतर तिघांचा शिवाशी आहे. त्यात नुसताच शिवा असा शब्द आहे किंवा इतर शब्दाला जोडून तो आला आहे. त्या जोडनावापैकी शिवस्कंद[५३०] या नावातून पुळुमावि या नावाप्रमाणेच शैव आणि स्कंद दैवतकथांचा संदर्भ जाणवतो.[५३१] अलीकडेच सापडलेल्या दासन येथील कोरीव लेखातून असे समजते की, या घराण्यातील शेवटचा राजा वासिष्ठीपुत्र पुळुमावि याने त्याचा मृत भाऊ राजा चंड याच्या स्मरणार्थ-चंडशिव नामक महादेवाचे मंदिर बांधले होते.[५३२] या विवेचनाचे तात्पर्य असे की, वेदिक कर्मकांडाने पौराणिक धर्मविधींशी मिळते जुळते घेतले होते आणि नंतरच्या काळात पौराणिक धर्म अधिक लोकप्रिय झाला होता. काळ बदलला तसतशी पौराणिक धर्माची लोकप्रियता अधिकाधिक वाढत गेली. दोहोंचे पालन एकाचवेळी करण्यास कोणालाही प्रतिबंध नव्हता.

त्यानंतरच्या वाकाटकांच्या काळातही हीच स्थिती होती. वैदिक यज्ञयाग करायचे आणि त्याचवेळी पौराणिक देवतेची भक्तीही करायची यात कोणत्याही प्रकारचा अंतर्विरोध त्यांना दिसत नव्हता. पहिला प्रवरसेन अनेक यज्ञविधी करायचा पण राजघराण्याच्या दोन ज्ञात शाखांमधील त्याचे अनेक वारसदार मात्र बदलत्या काळानुरुप अधिकाधिक लोकप्रिय होत असलेल्या पौराणिक धर्मपंथाला चिकटून होते. त्याचा नातू पहिला रुद्रसेन शिवाचेच रूप असलेल्या स्वामी महाभैरवाचा निःस्सीम भक्त होता आणि बहुधा त्यानेच त्या देवाचे चिकंबुरि नामक खेड्यात मंदिरही बांधले होते.[५३३] त्याचा मुलगा आणि उत्तराधिकारी पहिला पृथिवीषेण हा महान शिवभक्त होता आणि त्यामुळेच शैवपंथाच्या इतर राजांप्रमाणेच त्यालाही परममाहेश्वर म्हटले जात असे. राजघराण्याच्या वत्सगुल्म शाखेच्या वंशजांच्या धार्मिक, कलाविषयी काही माहिती नाही. पद्मपूर-नंदिवर्धन-प्रवरपूर शाखेतील राजांपैकी दोघेजण वगळता बाकी सर्व शैव पंथाचे होते. दुसऱ्या प्रवरसेनाची अशी श्रद्धा होती की, शंभूच्या कृपेमुळेच तो कृत युगाची (सुवर्णयुगाची) सुरुवात करू शकला.[५३४] या शाखेचे फक्त दोनच राजे म्हणजे दुसरा रुद्रसेन आणि दुसरा पृथिवीषेण हे भागवत (वैष्णव) पंथाचे पुरस्कर्ते होते. दुसऱ्या रुद्रसेनाची पत्नी प्रभावतीगुप्ताही याच पंथाची होती. दुसऱ्या पृथिवीषेणाचा पिता नरेंद्रसेन याचा धार्मिक कल कोणत्या बाजूने होता हे स्पष्ट होत नाही. कारण नरेंद्रसेनाचा स्वतःचा असा कोणताच अभिलेख अजून मिळालेला नाही. त्याचा पुत्र व

उत्तराधिकारी दुसरा पृथिवीषेण याच्या अभिलेखांवरून नरेंद्रसेनाची माहिती मिळते. हे अभिलेख त्याच्या धार्मिक दृष्टिकोनाविषयी माहिती देत नाहीत. दुसरा पृथिवीषेण परमभागवत म्हणूनही ओळखला जातो.[५३५] दुसरा रुद्रसेन बहुधा आपली पत्नी प्रभावती-गुप्ता हिच्या प्रभावाखाली शैवपंथाकडून वैष्णव पंथाकडे वळला असावा. तिला वैष्णव पंथाचा वारसा तिच्या माहेरच्यांकडून, विशेषतः पिता दुसरा चंद्रगुप्त याच्याकडून मिळाला असावा. तिच्या ज्ञात ताम्रपटात[५३६] तिचा निर्देश ' अत्यंत भगवद्‌भक्ता ' (भगवंताची निष्ठावंत भक्त)[५३७] असा केलेला आढळतो. ' जितं भगवता ' या वैष्णवपंथीय मंगलाचरणाने तिच्या अभिलेखांची सुरवात होते. त्या सूत्राचा अर्थ " भगवंताचा विजय झाला आहे " असा होतो. ते बहुतेक अभिलेख रामगिरी (आजचे रामटेक, जिल्हा नागपूर) येथे विराजमान झालेल्या रामाच्या पदचिन्हांपासून प्रसृत केलेले आहेत.[५३८] या दानपत्रांपैकी[५३९] एक आदाता चनालस्वामिन्[५४०] हा होता. भगवद्‌भक्त असा त्याच्याबद्दल स्पष्ट उल्लेख आहे. रिद्धपूर दानपत्राच्या इतर ब्राह्मण आदातांच्या धर्मश्रद्धांविषयी काहीही नोंदविलेले नाही. हे दोन्ही ताम्रपट वैष्णवपंथीय ज्याला पवित्र मानतात अशा दिवशी दिलेले आहेत. एका दानपत्राचा[५४१] कर्ता चक्रदास (चक्राचा दास) या नावाचा होता. हे नाव शुद्ध वैष्णव पंथाचे आहे. तर दुसऱ्याचा दूतक[५४२] देवनंदस्वामिन् नावाचा होता. त्या नावाच्या अखेरीस स्वामिन् असल्यामुळे तोही वैष्णवच असावा असा तर्क सहज करता येतो. दुसऱ्या रुद्रसेनाला त्याच्या परममाहेश्वर पित्याने शैवपंथीय नाव दिले होते. पण त्यांचे वर्णन ' ज्याने आपली कीर्ती सुदर्शन चक्र धारण करणाऱ्या प्रभूच्या कृपेने संपादन केली आहे असा ' असे केले आहे.[५४३]

दुसऱ्या रुद्रसेनाच्या कारकिर्दीचे ठळक वैशिष्ट्य म्हणजे विदर्भात भागवत संप्रदायाची लोकप्रियता हे होय. बहुधा त्यानेच येथील एका मोंदा (आजचे मौदा किंवा मांढळजवळचे डोंगर मौदा, नागपूरपासून ७५ कि. मी. अंतरावर) नामक खेड्यात वैष्णव मंदिर उभारले आणि त्याला गावाच्या नावावरून मोंदस्वामिन् असे नाव दिले. हे मंदिर बहुधा विष्णूच्या अनंतशायी रुपाचे असावे. त्याचे फार सुंदर वर्णन करण्यात आले आहे. मांढळ येथील त्याच्या कारकिर्दीच्या पाचव्या वर्षात काढलेला ताम्रपट हे त्याचे एकमात्र संदर्भसाधन असून त्यात या प्रकारचे फार सुंदर वर्णन आढळते ते असे– 'सर्पराज अनंत अद्वितीय अशा (एकार्णव) महासागराच्या जलपृष्ठावर पसरला होता. त्यावर देव योगनिद्रेत पहुडला होता. त्याच्या हाती शंख, चक्र व तरवार (असि) होती. तो देवाधिदेव (देव–देव) होता'. हे चतुर्भुज अनंतशायिन् (किंवा शेषशयन) विष्णुच्या मोंदस्वामिन् नामक प्रतिमेचे वर्णन आहे. अशा प्रतिमेचा हा सर्वात जुना कोरीव लेखात्मक संदर्भ आणि पहिलेच मूर्तिशास्त्रीय वर्णन असावे. देवाने तीन हातात धारण केलेल्या चिन्हांचा त्यात स्पष्ट निर्देश असला तरी उरलेल्या चौथ्या हाताचा उल्लेख नाही. या हातात काहीही नसावे आणि तो देवाने आपल्या कलत्या शिराखाली ठेवलेला असावा. दुसरे आणि यापेक्षा आधीचे अष्टभुज शेषशायिन् प्रतिमेचे तितकेच रेखीव

वर्णन वल्खाच्या महाराजांपैकी एक असलेल्या भुलुंड राजाच्या गुप्त कालखंडाच्या (इसवी सन ३६७) सत्तेचाळीसाव्या वर्षात काढलेल्या बाघ ताम्रपत्रात[५४४] आढळते. हे बाघ म्हणजे बहुधा आजचे मध्यप्रदेशातील धार जिल्ह्यातील बाघ हेच गाव असावे.[५४५] त्या ताम्रपत्रात नर्मदेच्या डाव्या किनाऱ्यावरील पाच खेड्यांचे दान बळी आणि चरू या विधीसाठी तसेच विष्णू या देवाच्या सन्मानार्थ अन्नछत्र (सत्र) चालविण्यासाठी दिल्याची नोंद करण्यात आली आहे. त्यात विष्णूचे वर्णन तेव्हाच्या समजुतीप्रमाणे त्याच्या व्यक्तिमत्त्वाचे जे विविध पैलू होते त्याच्या गुणवर्णनाच्या स्वरुपात केलेले आढळते. हे वर्णन वैष्णव संप्रदायाच्या कालक्रमाच्या दृष्टीने फारच महत्त्वाचे आहे. त्यानुसार विष्णू एकमेव महासागरावर (एकार्णव) पहुडला आहे. त्याला आठ हात आहेत (अष्ट-बाहू-शालिन्). त्यात त्याने शंख, शर, भाला, चक्र, नंदक तलवार, दंड व बरची ही लांच्छने धारण केली आहेत. ही त्याच्या सात हातातील लांच्छने झाली. त्याचा आठवा हात त्याने डोक्याखाली आधारासाठी घेतला असावा. शेषशयन प्रतिमामध्ये सामान्यतः तो तसाच आढळतो.[५४६] या वर्णनावरून हे स्पष्ट होते की, अष्टबाहू व चतुर्बाहू शयन प्रतिमा मध्यभारतात व दख्खन भागात इसवी सनाच्या सुमारे चौथ्या शतकापासूनच माहीत होत्या. मात्र या वर्णनावरहुकूम प्राचीन काळचा प्रत्यक्ष नमुना अजून सापडलेला नाही. शेषशयन स्वरूपात विष्णूच्या प्रतिमा इसवी सनाच्या पाचव्या-सहाव्या शतकांपासून सापडतात. अशी एक सुप्रसिद्ध प्रतिमा उत्तर प्रदेशात ललितपुर जिल्ह्यात देवगढ येथील दशावतार मंदिरात आढळते. अर्थात त्यांच्यापैकी एकही हुबेहूब वरील वर्णनांशी जुळणारी नाही.

दुसऱ्या रुद्रसेनाच्या मांढळ दानपत्राच्या निर्मितीच्या काळात सात्त्वत हे वैष्णव संप्रदायाचे महान पुरस्कर्ते विदर्भ प्रदेशात बरेच क्रियाशील असल्याचे दिसते. वत्सगुल्म येथील सात्त्वतचरणाच्या दोन मठांना आधीच दान दिलेली जमीन वगळून (वत्सगुल्मक-सात्त्वत-चरण-अधिवास-द्वयस्य-अपूर्व-दत्त्या)[५४७] काही खेडी विविध गोत्रांच्या व चरणांच्या (वैदिक परंपरेतील) अनामनिर्दिष्ट ब्राह्मणांना दान केल्याची नोंद या कोरीव लेखात आहे. वाकाटक राजा दुसरा रुद्रसेन याच्या उदार आश्रयाने विदर्भ प्रदेशात भागवत संप्रदायाच्या प्रसार कार्यात आपल्या दोन मठामधून सात्त्वत पंथानुयायी जबाबदारीचा वाटा उचलत होते. सात्त्वतांनी वत्सगुल्म हे आपल्या हालचालींचे मुख्य केंद्र केले होते. तेथून ते मांढळ भागातील अनेक ठिकाणांवर आपला प्रभाव ठेवीत होते हे या कोरीव लेखावरून स्पष्ट होते. तसेच मांढळ ताम्रपत्रामध्ये त्यांना लावलेला 'चरण' हा प्रत्यय हे सिद्ध करतो की, वैदिकेतर संप्रदाय म्हणून त्यांना लागलेला कलंक इसवी सनाच्या चौथ्या-पाचव्या शतकापर्यंत दूर झालेला होता. त्यांना वैदिक संप्रदाय म्हणून मान्यता मिळाल्यामुळे त्यांनी केलेल्या भागवत संप्रदायाच्या प्रसाराचे वैदिक परंपरेच्या अतिनिष्ठावंत अनुयायांसह सर्वांकडूनच स्वागत झाले असावे.[५४८] दुसरा प्रवरसेन हा स्वतः शैव पंथाचा अनुयायी असला आणि स्वतःला परममाहेश्वर म्हणवून घेत असला तरी त्याने बहुधा रामाची महान भक्त असलेल्या त्याच्या

वैष्णव पंथीय आईला प्रसन्न ठेवण्यासाठी रामकथेवर सेतुबंध नामक महाकाव्य प्राकृतातून रचले होते. रामटेक येथील केवल-नरसिंहाच्या मंदिरात उजव्या भिंतीवरील कोरीव शिलालेख वाचल्यावर हे स्पष्ट होते की, तो आपली आई प्रभवतीगुप्ता हिच्याबद्दल कमालीचा पूज्यभाव बाळगून होता आणि तिच्या धार्मिक भावनांचा व श्रद्धांचा कमालीचा आदर करीत होता. तो आणि त्याची आजपर्यंत अज्ञात राहिलेली भगिनी यांनी मिळून प्रभावतीस्वामीन् नावाचे मंदिर उभारले होते आणि सुदर्शन नामक तळे खोदले होते. त्यासाठी त्यांनी कदलीवाटक या खेड्यात खाजगी व्यक्तीकडून जमिनीचा तुकडा विकत घेतला होता.[५४९] आताचे केवल-नरसिंह मंदिर हेच कदाचित मुळात प्रभावतीगुप्ताच्या स्मृतिप्रित्यर्थ बांधलेले आणि प्रभावतीस्वामिन् असे अन्वर्थक नाव लाभलेले मंदिर असावे, कारण ते एक वैष्णवपंथीय मंदिर आहे.

वा. वि. मिराशी यांनी दुसऱ्या प्रवरसेनाला प्रवरपूर (पवनार, जिल्हा वर्धा) येथे रामाचे मंदिर बांधल्याचे श्रेय दिले आहे. रामकथेतील प्रसंगांशी जुळणारी सुंदर शिल्पे तसेच खराब झालेले काही शिल्पपटही त्यांनी शोधून काढले होते.[५५०] अन्य काही विद्वानांनी यावर मतभिन्नता नोंदविली असून त्यांच्यामते ती चित्रशिल्पे कृष्ण व बलराम यांच्या भागवतात व इतर संहितांत वर्णन केलेल्या कथांची आहेत.[५५१] असे असले तरी त्या चित्रशिल्पांमधून वैष्णवपंथीय कथानके आलेली आहेत. दुसरे एक महापुरुष (विष्णू) देवाचे मंदिर अश्वत्थखेटक (आजचे पट्टण, जिल्हा वैतूल, मध्यप्रदेश) या ठिकाणी आहे. तेथे देवाची पदचिन्हे पूजेसाठी ठेवलेली आहेत. दुसऱ्या प्रवरसेनाने तेथे अन्नछत्र (सत्र) चालविण्यासाठी ४०० निवर्तने जमीन दान दिली होती.[५५२]

दुसऱ्या प्रवरसेनाच्या काही अभिलेखात शैवसंप्रदायाशी संबंधित काही जागांचा निर्देश आढळतो. उदाहरणार्थ, बेलोरा ताम्रपटात प्रवरेश्वर-षड्विंशति-वाटक[५५३] येथील रहिवाशी असलेल्या ब्राह्मणाला दान दिल्याची नोंद आहे; तर पांढुर्णा दानपत्र प्रवरेश्वर-देवकुल नावाच्या मंदिरामधून प्रसृत केले आहे.[५५४] या दोहोंचा संबंध पहिल्या प्रवरसेनाने त्याच्या स्मरणार्थ बांधलेल्या मंदिरात स्थापित शिवलिंगाच्या आणि भोवतालच्या सव्वीस खेड्यांच्या मिळून झालेल्या विभागाच्या प्रशासकीय मुख्यालयाच्या उल्लेखावरून सूचित होतो.

वाकाटकांच्या व्यक्तिनामांचे विश्लेषण सांप्रदायिक दृष्टिकोनातून उद्‌बोधक ठरते. धार्मिक कल दाखविणाऱ्या नावांपैकी रुद्रसेन व दामोदरसेन ही नावे प्रवरपूर शाखेत आढळतात. ती त्यांच्या मातापित्यांच्या ज्ञात पंथीय कलाशी सुसंगतच आहेत. त्यांनीच ती ठेवली असावीत. आजपर्यंत जो केवळ एक तर्क होता तोही यावरून सिद्ध होतो की, पहिला प्रवरसेन हा शैवपंथीय होता. वत्सगुल्म शाखेत धार्मिक स्वरुपाचे असे एकच नाव आढळते ते म्हणजे अखेरचा राजा हरिषेण याचे. त्याचा पिता देवसेन हा वैष्णवपंथी असावा हे यावरून सुचित होते.[५५५]

वाकाटकोत्तरकालीन मुंडपुत्र अश्वमेधादी वैदिक यज्ञयागात आणि वेदाध्ययनात व्यस्त असले तरी त्यांचा कल वैष्णव पंथाकडे होता. या राजघराण्याचा उपलब्ध

असलेला एकमात्र अभिलेख पुरुषोत्तम (विष्णू) नमनापासून प्रारंभ होतो. त्यात उल्लेशिलेला घराण्याचा आदिपुरुष नंदिसोम याचे परमभागवत असे वर्णन आढळते.[५५६] अश्वमेध साजरा करणाऱ्या शांतमूल या इक्ष्वाकु राजावर विरुपाक्षाचा अधिपति महासेन (स्कंद-कार्तिकेय) या पौराणिक देवतेची कृपा होती (परिगृहीत) असे म्हटले जाते.[५५७] वर उल्लेख केल्याप्रमाणे विष्णुकुंडिन राजा माधववर्मन जनाश्रय याने अकरा अश्वमेध यज्ञ केल्याचा दावा केला आहे. पण त्याचे कुलदैवत मात्र श्रीपर्वतस्वामिन् हे विरूद धारण करणारा विष्णूच होता हे त्या कुटुंबाच्या बहुतांश दानपत्रांवरून स्पष्ट होते. यावरून हे सिद्ध होते की, श्रौत यज्ञयाग साजरे करणे आणि वासुदेव, संकर्षण, स्कंद-कार्तिकेय, विष्णु, शिव यासारख्या देवतांभेवती उभ्या राहिलेल्या संप्रदायांचे अनुयायी असणे यात अंतर्विरोध तर नव्हताच, उलट त्या दोहोंचे एकाचवेळी पालन करणे सहज शक्य होते.[५५८]

वैष्णव व शैव या दोन संप्रदायांचे भारतात स्थायिक झालेल्या परकियांना विशेष आकर्षण होते. ज्या बहुतेक शक क्षत्रपांची नावे रुद्र/शिव यांच्यावरून दिलेली होती, ते शैवपंथीय होते.[५५९] तक्षिलेचा इंडो-ग्रीक राजा अंतिअलकीदास (Antialkidas) याचा काशिपुत्र भागभद्र राजाच्या दरबारातील वकील हेलिओडोरस हा अभिमानाने स्वतःला भागवत (भगवंताचा भक्त) म्हणवून घेत असे. त्याने देवाधिदेव वासुदेवाच्या गौरवार्थ गरुडध्वज उभारला होता.[५६०] नागार्जुनकोंडा येथील आभीर वसुषेण याच्या काळातील कोरीव लेखात वैष्णव पंथाविषयी अत्यंत मौलिक माहिती सांगितलेली आहे. कलचुरी कालखंडाच्या तिसाव्या वर्षी म्हणजे इसवी सन २७८ च्या सुमारास तयार करण्यात आलेला हा कोरीव लेख आहे. त्यात आठ हात असलेली आणि अष्टभुजास्वामिन् हे अन्वर्थक नाव असलेली विष्णूची प्रतिमा श्वेतगिरि (प्राकृतात सेडगिरी) नामक उंच टेकडीवर प्रतिष्ठापित केल्याचा व टेकडीची तटबंदी महाग्रामिक महातलवर महादंडनायक कौशिक गोत्राचा शिवशेप याच्यासह इतर काही लोकांच्या गटाने रंगविल्याचाही उल्लेख आहे. त्याचप्रमाणे संजयपूरचा यवन राजा, अवंतीचा शक रुद्रदामन् आणि वनवास येथील विष्णूरुद्र शिवलानंद सातकर्णि यांनी महानंद नामक विहीर स्वच्छ केल्याची, सेटगिरीवर आणि मुडेरा येथे दोन तलाव खोदल्याची तसेच तालवृक्षाची वनराई लावल्याचीही नोंद आहे. हा कोरीव लेख भगवान नारायणाच्या नमनापासून सुरू होतो. देवाचे वर्णन त्यात देवांचा सर्वश्रेष्ठ देव आणि आदिम पुरुष असे केले आहे. वैष्णव संप्रदायातील त्याच्या स्वरुपाशी हे जुळणारेच आहे.[५६१] प्रतिष्ठापनेच्या समारंभात सहभागी झालेला म्हणून ज्याचा उल्लेख आहे तो अवंतीचा शक रुद्रदामन् हा त्याच नावाचा दुसरा कार्दमक राजाच असावा आणि तो इसवी सनाच्या चौथ्या शतकाच्या मध्याच्या सुमारास ऊर्जितावस्थेस आला असावा.[५६२] त्यामुळे या संदर्भसाधनात उल्लेखिलेले वर्ष ज्या कालखंडाशी जोडले जाते त्याचा पुनर्विचार करावा लागतो. यात्रा किंवा महान व्यक्तींच्या जीवनाशी संबंधित प्रसंग किंवा दैवी घटना अशा कारणाने पवित्र मानल्या गेलेल्या ठिकाणी नियमितपणे हजेरी लावणे हे पौराणिक धर्माचरणाचे

अविभाज्य अंग होते आणि ते या काळात अत्यंत लोकप्रिय होते याचे सुस्पष्ट कोरीव-लेखात्मक पुरावे मिळाले आहेत. बाहेरून येऊन भारतीय संस्कृतीचा स्वीकार केलेले जे परकीय होते ते तर या तसेच इतरही कर्मकांडांचे अधिकच उत्साहपूर्वक आचारण करीत असत. शक महाक्षत्रप नहपानाचा जामात ऋपभदत्त हा पवित्र स्थळांच्या केवळ यात्राच करीत नव्हता, तर त्या ठिकाणी तो अनेक धर्मदाय गोष्टीही करायचा असे त्याच्या नाशिक येथील अभिलेखांवरून समजते. त्याने ब्राह्मणांना तीन लाख गायी, सुवर्णमुद्रा आणि सोळा गावे दान दिली होती, वर्णाशा (आधुनिक नाव बनास) नदीवर घाट (तीर्थ) बांधला होता, प्रभास (आजचे प्रभास पाटण) येथील पवित्र तीर्थस्थानी आठ ब्राह्मण मुलींचे विवाह समारंभ साजरे केले होते, दरवर्षी शूर्पारक (आजचे सोपारा), चेचिम्ना, दहानुकानगर, केकापूर, भरुकच्छ, अनुगामी, उज्जैन आणि शख[५६३] इत्यादी ठिकाणी लाखो ब्राह्मणांना भोजने घातली होती,[५६४] भरुकच्छ दशपूर (आजचे मंदसोर), गोवर्धन (नाशिकजवळ) आणि शूर्पारक या ठिकाणी (यात्रेकरूंसाठी) चौसोपी विश्रामगृहे बांधून ती दान केली होती; इबा, पारदा, दमण, तापी, करवेणा आणि दहानुका या नद्या पार करण्यासाठी फेरींची मोफत व्यवस्था केली होती, त्या नद्यांच्या दोन्ही काठांवर तसेच पिंडीतकावड, गोवर्धन, सुवर्णमुख, शूर्पारक व रामतीर्थ येथेही पाणपोया लावल्या होत्या आणि चरकांच्या मंडळांना बत्तीस हजार नारळाची रोपटी दिली होती, मालयांनी (मालवानी) वेढा दिलेल्या उत्तमभद्रांना सोडविण्यासाठी तो राजस्थानात गेला होता आणि ती मोहीम फत्ते केल्यावर अजमेरनजीकच्या सुप्रिद्ध पुष्कर तीर्थावर जाऊन तेथे त्याने अभिपेक केला होता, त्या प्रसंगी पौरोहित्य केलेल्या तसेच इतरही ब्राह्मणांना त्याने एक लाख गायी आणि एक खेडे दान दिले होते.[५६५] या यात्रा भौगोलिकदृष्ट्या अर्थातच नहपानाच्या राज्याच्या भूभागापुरत्या व प्रभावक्षेत्रापुरत्या सीमित होत्या. सर्वच पवित्र स्थळांची नावे त्यात नाहीत. गंगा किंवा भागीरथी व काशी ही त्याकाळी अतिपवित्र स्थाने मानली जात असावीत. भारशिवाने भागीरथीच्या पवित्र पाण्यात समारंभपूर्वक स्नान केले असल्याचे आणि काशीला दहा अश्वमेध यज्ञ केले असल्याचे अनेक वाकाटक दानपत्रात नमूद केले आहे. दहा अश्वमेध त्याने काशिलाच केले असावेत. या यज्ञांचे स्मरण देणारा दशाश्वमेध नामक घाट गंगेच्या काठावर आजही अस्तित्वात आहे.

वाकाटकांच्या काळात पवित्र गणली गेलेली आणखीही काही ठिकाणे होती. त्रिपुरी (तेवर, जिल्हा-जबलपूर, मध्यप्रदेश) हे त्यापैकीच एक असावे. तेथे दुसरा प्रवरसेन त्याच्या कारकिर्दीच्या तेवीसाव्या वर्षात काही काळ येथे राहिला होता आणि या त्याच्या तात्पुरत्या निवासाहून (त्रिपुरीवासक) त्याने एका खेड्याचे दान देणारा इंदूर ताम्रपट प्रसृत केला. हे दान अभिषेकानंतरचे असावे.[५६६] विदर्भातदेखील काही स्थळे पवित्र मानली जात. त्यांचा निर्देश वाकाटकांच्या अभिलेखात आढळतो. सर्वाधिक पवित्र स्थळांपैकी रामटेक हे एक असून तेथे स्थलनामानुसारी रामगिरिस्वामिन् मंदिर आढळते. हे फार पवित्र स्थान होते. प्रभावतीगुप्ताने तिचे ऋद्धपूर दानपत्र या ठिकाणाहून प्रसृत

केले. प्रभु रामचंद्राच्या पदचिन्हांची (पादमूल) येथे पूजा होते.[५६७] पुणे ताम्रपट आदात्याला देण्यापूर्वी येथे अर्पण केला होता.[५६८] दुसऱ्या पृथिवीषेणाच्या मांढळ ताम्रपटाचा पहिला संच रामगिरीच्या मंदिरातून दिला गेला.[५६९] पवनार हे जर पूर्वीचे प्रवरपूर असेल तर तेसुद्धा एक महत्त्वाचे धार्मिक केंद्र होते. पहिल्या प्रवरसेनाच्या स्मरणार्थ तेथे मंदिर उभारले असून त्यात बहुधा शिवलिंगांची प्रतिष्ठापना केली होती. या मंदिरामधूनच त्याचा समनामधारी वारस दुसरा प्रवरसेन याने आपले पांढुर्णा दानपत्र प्रसृत केले होते.[५७०] याच राजाच्या दोन बेलोरा दानपत्रांचा आदाता हा प्रवरेश्वर-षडविंशति-वाटक[५७१] या प्रशासकीय विभागाचा रहिवाशी होता. हा विभाग या मंदिराभोवतीच्या सव्वीस खेड्यांचा मिळून तयार करण्यात आलेला असावा. विभागाला स्मारक मंदिराच्या नावावरून अत्यंत समर्पक नाव दिलेले दिसते. अशी स्मरणार्थ देवकुळे देशाच्या इतर भागात बऱ्याच आधीपासून अस्तित्वात असलेली आढळतात. दुसऱ्या प्रवरसेनाच्या तिरोडी ताम्रपटाचे स्थळ नरत्तंगवारिस्थान[५७२] हे सुद्धा यात्रेची आणखी एक जागा असली पाहिजे हे त्याच्या नामान्ती असलेल्या स्थान या प्रत्ययावरून स्पष्ट होते. ते एखाद्या जलौघाच्या जवळ असावे हे मधल्या (वारि) शब्दावरून दिसते. पण ते नेमके कोठे असावे हे निश्चित करता आलेले नाही.[५७३] वेणा किंवा आजची वैनगंगा नदी फार प्राचीन काळापासून पवित्र मानली जात होती आणि तिच्या काठावरचा प्रदेश एका प्रशासकीय विभागात विकसित झालेला होता. बेण्णाकट किंवा बेण्णातट असा त्याचा उल्लेख काही वाकाटक अभिलेखात आढळतो. दुसऱ्या पृथिवीषेणाचा मांढळ ताम्रपट वेणातट्ट स्थानाहून प्रसृत झाला होता.[५७४] हे ध्यानात घेतल्यास या भागाला तीर्थस्थानाची प्रतिष्ठा लाभल्याचे लक्षात येते. त्याची स्थलनिश्चिती झालेली नसली तरी ते वैनगंगेच्या काठीच असले पाहिजे. दुसऱ्या पृथिवीषेणाने जेथून आपला माहुरझरी ताम्रपट प्रसृत केला ते पृथिवीसमुद्र हेही स्थान एक महत्त्वाचे तीर्थक्षेत्र होते.[५७५] पृथिवीसमुद्र हे नाव माहुरझरी येथील एका बारमाही तलावाला (झरी) दिले असावे. फार पूर्वीपासून ते पवित्र स्थान मानले जात असावे. नव्या नावाप्रमाणेच त्याचे प्राचीन नावही मातृदेवतेशी संबंधित असावे. पुढे राजघराण्यातील दोन पृथिवीषेणांपैकी एकाने त्या दिव्य स्थानाला दिलेल्या भेटीच्या प्रसंगी त्याचे पृथिवीसमुद्र असे नामकरण केले असावे. या जलाशयात स्नान करूनच त्याने हे दानपत्र दिले असावे. त्या जलाशयाचा आकार त्यावेळी आजच्यापेक्षा बराच मोठा असला पाहिजे. नवे नाव बहुधा दुसऱ्या पृथिविषेणानेच दिले असावे असे दिसते. तो त्याच्या वंशाचा शेवटचा (ज्ञात) पुरुष होय. त्याने दिलेले जलाशयाचे हे नाव पुढेही कायम राहिले.[५७६] वाकाटकांच्या दुसऱ्या एका शाखेच्या राज्यात असलेले आणखी एक पवित्र स्थान वत्सगुल्म (वाशिम, जिल्हा-वाशिम) हे होते. या शाखेच्या राजधानीचे ते शहर होते आणि तेथूनच त्यांची बहुतेक दानपत्रे प्रसृत झालेली दिसून येतात. वाङ्मयीन पुराव्यांवरून असे दिसते की, या स्थानाचे माहात्म्य फार पूर्वीपासून चालत आलेले असावे.[५७७] राजघराण्याची वत्सगुल्म किंवा प्रवरपूर अशी मुख्यालये येथे नसताना

वाकाटक राजांनी तेथे जाऊन स्नान करून किंवा पूजा करून किंवा अभिषेक आणि पूजा करून उक्त दानपत्रे दिली असावीत. वाकाटक काळात तीर्थक्षेत्रे असा लौकिक असलेली ही बहुतेक ठिकाणे वाकाटकांच्या पुरालेखांवरूनच समजतात.[५७८]

काही तीथीसुद्धा विशेष पवित्र मानल्या जाऊ लागल्या होत्या. विविध पौराणिक संप्रदायांचे अनुयायी त्या दिवशी पूजापाठ, उपास आणि दानधर्म करीत.[५७९] उत्तरकालीन कोरीव लेखात अशा प्रसंगांची तपशीलवार वर्णने आली आहेत. उपलब्ध तथ्यांवरून या कालखंडात धार्मिक श्रद्धेने ज्या तिथी पाळल्या जात त्या पाहणे महत्त्वाचे ठरेल. इसवी सनाच्या प्रारंभिक शतकांतील कोरीव लेख या दृष्टीने फारसे उपयोगाचे नाहीत हे येथे नमूद करायला पाहिजे. वाकाटक अभिलेखसुद्धा अशा तिथींचे पावित्र्य खास करून वर्णन करीत नाहीत, फक्त त्या दिवशी केलेल्या भूदानांची नोंद करतात. इतर ज्ञात साधनांच्या आधारे त्या तिथी पवित्र गणल्या जाऊ लागल्या होत्या. कदाचित सर्वच दाने शुभ गणल्या गेलेल्या मुहूर्तावरच केलेली असावीत, पण त्यांचे ते माहात्म्य आज आपणास अज्ञात असावे. असे दिसते की, केवळ आठ[५८०] दानपत्रे एकादशीच्या पारण्याच्या दिवशी केलेली आहेत. आजही अनेक पुराणमतवादी कुटुंबात हा दिवस पाळला जातो. अभिलेखात ज्या एकादशींचा उल्लेख आहे त्या विशेष पवित्र समजल्या जात. नंतरच्या धर्मशास्त्र संहितांमधून त्यांचा उल्लेख येतो तो असा-ज्येष्ठ शुक्ल एकादशी (तीच आता निर्जला म्हणूनही ओळखली जाते),[५८१] आश्विन शुक्ल एकादशी (तिला पाशांकुश असे म्हणतात),[५८२] कार्तिक शुक्ल एकादशी (तिला प्रवोधिनी म्हणतात),[५८३] माघ कृष्ण एकादशी (षट-तिला)[५८४] व फाल्गुन शुक्ल एकादशी (आमलकी या नावाने ती ओळखली जाते)[५८५] इत्यादी. यापैकी प्रबोधिनी नामक कार्तिक शुक्ल एकादशीच्याच दिवशी चार दानपत्रे झाली आहेत. वैष्णवपंथीयासाठी ती अधिकच पवित्र असते, कारण त्यांच्या पुराणकथेनुसार विष्णू त्या दिवशी त्याच्या चातुर्मासाच्या सागरी गाढ निद्रेतून जागा होतो. या चार पैकी दोन दानपत्रे रामगिरी येथे प्रभावतीगुप्ता या गतभर्तृका राणीने रामाच्या पदचिन्हांची पूजा करून दिली आहेत. राम हा विष्णूचाच अवतार मानला जातो. दुसऱ्या प्रवरसेनाची अलीकडेच मिळालेली दोन दानपत्रेही एकादशीच्याच दिवशी दिली गेलेली आहेत.

प्रभावतीगुप्ताचा मिरेगाव (तहसील साकोली, जिल्हा नागपूर) येथील अप्रकाशित[५८६] ताम्रपट तिचा पुत्र दुसरा प्रवरसेन याच्या कारकिर्दीच्या विसाव्या वर्षी हेमंत ऋतूत पौष (पुष्यमास) महिन्याच्या शुक्ल पक्षातील द्वादशीला दिला होता.[५८७] अलीकडेच प्रकाशात आलेले त्याचे यवतमाळ दानपत्र या वाकाटक सम्राटाने आपल्या राजवटीच्या सव्वीसाव्या वर्षी 'उन्हाळ्यातील चौथ्या पंधरवड्यात अकराव्या दिवशी' प्रसृत केले[५८८] आहे. उन्हाळ्याचा प्रारंभ केव्हाही धरला तरी हा दिवस महिन्याच्या शुल्क पक्षातील एकादशीचा होता. यावरून असे दिसते की, एकादशीचा उपवास आणि त्याचे दुसऱ्या दिवशीचे पारणे हे दोन्ही दिवस पवित्र व धार्मिक कार्यासाठी उत्तम समजले जात

असत. संक्रांत किंवा एका राशीतून दुसऱ्या राशीत होणारे सूर्याचे संक्रमण हाही दानधर्मासाठी अत्यंत सुयोग्य मुहूर्त समजला जात असे. वडगाव दानपत्र हे दुसऱ्या प्रवरसेनाने विष्णूचे पारायण करणाऱ्या (विष्णूववाचनक)[५०९] ब्राह्मणाला दिल्याचे दिसते. त्यावरून तो मुहूर्त महासंक्रांतीचा असावा असे सूचित होते. या संदर्भात प्रस्तुत असलेली एक लक्षवेधक पारिभाषिक संज्ञा दुसऱ्या प्रवरसेनाच्या मांढळ दानपत्रात आहे. त्याच्या कारकिर्दीच्या सोळाव्या वर्षी कार्तिक महिन्याचा 'प्रदोषाच्या' मुहुर्तावर संबंधित ताम्रपट दिले असल्याची नोंद आहे.[५१०] प्रदोष म्हणजे सूर्यास्तानंतरच्या तीन ते सहा घटिकांचा अवधी. ही वेळ उपवास सोडण्यासाठी अत्युत्तम समजली जाते.[५११] दुर्दैवाने या ताम्रपटातील लेख तिथीरहित आहे. तिथी असती तर आज अनुपलब्ध असलेली काही मौल्यवान माहिती आपल्याला मिळाली असती. श्राद्धविधी हा दानधर्माची संधी देणारा आणखी एक प्रसंग होता. पांढुर्णा ताम्रपट 'तिलवाचनक' प्रसंगी दिला गेला. तो बहुधा श्राद्धविधीचाच भाग असावा.[५१२] सूर्यग्रहणाच्या व चंद्रग्रहणाच्या प्रसंगी केल्या जाणाऱ्या दानधर्माची बरीच प्रशंसा या काळातील वाङ्मयामधून आढळते. उत्तरकाळातील अनेक दानपत्रेही अशा प्रसंगांना अनुलक्षून केलेली दिसून येतात. तथापि, प्रस्तुत काळात या विषयीची अभिलेखीय नोंद आढळत नाही.

पुराणे व महाकाव्ये (रामायण व महाभारत) ही केवळ रचली गेली होती एवढेच नव्हे; तर त्यांना प्रचंड लोकप्रियता लाभली होती. महाकाव्यांतील पौराणिक व्यक्तिरेखांच्या रुपाने लोकांनी शिरोधार्य मानावेत व अनुसरण करावेत असे आदर्श उभे राहिले होते. उदाहरणार्थ, पराक्रम व तेजस्विता या बाबतीत गौतमीपुत्र सातकर्णिची तुलना राम (बलराम), केशव, अर्जुन आणि भीमसेन या उक्त महाकाव्यांतील नायकांशी, तसेच नाभाग, नहुष, जनमेजय, सगर, ययाति, राम (दशरथी राम) आणि अंबरीष या पुराणे व महाकाव्ये यांच्यातील व्यक्तिरेखांशी केली आहे.[५१३] अनेक वाङ्मयीन कलाकृतींना त्यांनी कथावस्तू पुरविल्या आहेत. साहित्यगुण अंगी असलेल्या किमान दोन तरी वाकाटक सम्राटांनी त्या विषयांवर काव्यरचना केल्याचे नमूद आहे. वत्सगुल्म शाखेचा सर्वसेन याने[५१४] कृष्णाच्या जीवनातील काही प्रसंगांवर आधारित प्राकृत महाकाव्य रचले होते, तर पद्मपुर-नंदिवर्धन-प्रवरपुर शाखेतील प्रवरसेन याने[५१५] सेतुबंध किंवा रावणवहो नामक प्राकृत काव्यरचना करून त्यात समुद्रात सेतू बांधून, रावणाला मारून सीतेला मुक्त केल्याचा रामकथेचा उत्तरार्ध वर्णन केला होता. सर्वसेनाचे काव्य कालौघात नष्ट झाले असून उत्तरकालीन वाङ्मयातील विखुरलेल्या संदर्भावरूनच त्याची माहिती मिळते. सेतुबंध काव्य मात्र उपलब्ध आहे. ही दोन्ही काव्ये त्यांच्या उत्तम काव्यात्म गुणवत्तेसाठी सुविख्यात असून साहित्य समीक्षकांनी त्यांची वाखाणणी केली आहे.[५१६]

अशा अनेक पौराणिक कथावस्तूंवर आणखीही काही साहित्यकृती आधीच्या तसेच वाकाटकांच्या काळात रचल्या गेल्या असण्याची शक्यता आहे.[५१७]

# अवैदिक धर्मसंप्रदाय

## जैन धर्म

अवैदिक धर्मसंप्रदायांपैकी जैन धर्म हा आज ज्ञात असलेला सर्वात जुना धर्म आहे, पण आपण ज्या काळाची येथे चर्चा करीत आहोत त्या काळच्या महाराष्ट्रात तो अस्तित्वात असल्याचा ठोस पुरावा मात्र उपलब्ध नाही. पाले (जिल्हा पुणे) येथील एक कोरीव लेख जैनांचा असावा असा निर्वाळा ह. धि. सांकलिया आणि शोभना गोखले यांनी दिला असून पुराभिलेखविद्येनुसार या लेखाचा काळ पहिल्या शतकाचा ठरतो.[५९८] त्यांच्या मते हा पश्चिम महाराष्ट्रातील जैन विहाराच्या अस्तित्वाचा एकमात्र पुरावा ठरतो.[५९९] परंतु हा निष्कर्ष केवळ अभिलेखाच्या प्रारंभी येणाऱ्या 'नमो अरहंतानम्' या वचनावरून काढण्यात आला असून त्यामागील गृहीत असे आहे की, अर्हत् हा शब्द बौद्धांमध्ये फारसा लोकप्रिय नव्हता. पण हे मत पूर्णपणे ग्राह्य नाही. प्रारंभिक बौद्धांमध्ये अर्हत्चा प्रचार बऱ्याच प्रमाणात आढळतो. काही उदाहरणे येथे देता येतील. अर्हदगुप्त हा देवदूत होता आणि त्याने शुद्धोधनाच्या राजवाड्याला आपल्या सर्व लवाजम्यासह भेट देऊन नवजात राजपुत्र बोधिसत्त्व (गौतम)-याचे अभिष्टचिंतन केले होते.[६००] थेरवादी बौद्धजन अर्हत्पदाचा आदर्श शिरोधार्य मानत. त्याजागी महायान्यांनी बोधिसत्वपदाची प्रतिष्ठापना केली.[६०१] आषाढसेनाच्या ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकातील पभोसा कोरीव लेखात (क्रमांक १) थेरवादाच्या कस्सपीय (काश्यपीय) शाखेच्या भिक्षुंचा उल्लेख अर्हत् (अहरंत) असा केला आहे.[६०२] याशिवाय बुद्धाला अर्हत् असे संबोधणाऱ्या एकमात्र कोरीव लेखाचे उदाहरण खाजगी गुहालेखातून मिळाले आहे.[६०३] त्यामुळे प्रस्तुत लेखकास हा बौद्ध कोरीव लेख मानणे श्रेयस्कर वाटते. बुद्धांना अर्हत् असे संबोधून केलेल्या नमनापासून त्याचा प्रारंभ होतो. हे मान्यच करायला हवे की, नमो अरहंतानम् या मंगलाचरणाने सुरू होणारा कोणताही बौद्ध अभिलेख अद्याप हाती आलेला नाही. मात्र काही संभाव्य बाबी अशा की, जेव्हा स्वतः कट्टर जैनपंथीय असलेला खारवेल विदर्भावर चालून आला तेव्हा त्याने आपल्यासोबत काही जैनांना आणले असेल आणि त्यांनी जैनमताचा प्रसार तेथे केला असेल. खारवेल याचा सद नामक वारसदार आंध्रप्रदेशाच्या पश्चिम गोदावरी भागावर इसवी सनाच्या पहिल्या शतकात राज्य करीत होता आणि बहुधा स्वतः खारवेल यानेच तो भाग आपल्या ताब्यात घेतलेला असावा असे मानण्यास सबळ कारण आहे. गुंटुपल्ली येथे हुबेहूब कोरीव लेख असलेले चार स्तंभ सापडले आहेत. त्यात सद राजाचा उल्लेख महामेघवाहन आणि कलिंग व माहिषक या प्रांतांचे स्वामी असा केला आहे.[६०४] खारवेलाशी त्याचे जवळचे नाते यावरून स्पष्ट होते. कारण त्याचेही महामेघवाहन आणि कलिंगाधिपति असे वर्णन त्याच्या हाथी गुंफा कोरीव लेखात केलेले आढळते.[६०५] बहुधा त्याच राजाचा दुसरा एक कोरीव लेख आंध्रप्रदेशाच्या गुंटुर जिल्ह्यातील वेलपुरु येथे सापडला असून त्यात त्याचे नाव महासद असे आहे. खारवेलप्रमाणे ऐर या पदवीने

त्याचा गौरव त्यात केला आहे.[६०६] सद राजाची नाणी मोठ्या संख्येने गुंटूर प्रदेशात सापडली आहेत. त्याच्या अधिपत्याखाली वड्डमाणू (वर्धमान) नामक एक सुविख्यात जैन श्रावक संघ अस्तित्वात येऊन भरभराटीस आला असे अलीकडे त्या जागी झालेल्या उत्खननावरून स्पष्ट झाले आहे. त्या उत्खननातच जैन स्तूपांच्या अस्तित्वावरही प्रकाश पडला.[६०७] अशाप्रकारे खारवेल आणि त्याचे काही वारस यांनी आंध्रप्रदेशात जैनमताचा प्रसार करण्यात महत्त्वपूर्ण भूमिका पार पाडली. विदर्भाबद्दल आणि महाराष्ट्राच्या इतर भागाबद्दलही हीच परिस्थिती असावी असे आपण सकारण विधान करू शकतो. केवळ कोणत्याही ठोस व दृश्य पुराव्यांपर्यंत आपण अजून पोहोचू शकलो नाही एवढ्यावरून महाराष्ट्रात जैनधर्म अस्तित्वातच नव्हता अशा निष्कर्षाप्रत आपण जाऊ नये. तो येथे असण्याची संभाव्यता अधिक आहे.

## बौद्ध धर्म

केवळ दृश्य पुराव्याआधारे बोलायचे तर या कालखंडाच्या प्रारंभिक भागात बौद्ध धर्माला प्रचंड लोकप्रियता लाभली होती असे म्हणता येईल. पाषाणात कोरलेल्या बाराशेहून अधिक बौद्धगुंफा महाराष्ट्रभर विखुरलेल्या आहेत. त्यात जसे विहार आहेत तशी चैत्य गृहेही आहेत. प्रत्येकात मोठ्या संख्येने कोरीव लेख आहेत. संपूर्ण महाराष्ट्र आणि लगतच्या आंध्र प्रदेशाचा भाग बौद्ध धर्माने पादाक्रांत केल्याचे दिसते. त्याचे जनतेला प्रचंड आकर्षण होते आणि ज्यांनी बौद्ध धर्माचा औपचारिक स्वीकार केला नव्हता त्यांनीही त्यास उदार आश्रय दिला होता.

सुत्त निपाताच्या पारायण वग्गात वर्णन केलेल्या प्रसंगावरून महाराष्ट्रातील मराठवाडा आणि लगतच्या आंध्रप्रदेशातील तेलंगण या भागांना बुद्धाच्या शिकवणुकीची कल्पना त्याच्या काळातच आली होती असे म्हणावे लागेल. ब्राह्मण बावरी याने आपल्या शिष्यांना श्रावस्ती येथे बुद्धाकडून काही शंकाचे निरसन करून घेण्यासाठी पाठविले होते. परंतु मौर्य सम्राट अशोकाच्या आधी दखखन भागात बौद्ध धर्माचा प्रसार झाल्याचा पुरावा आज उपलब्ध नाही. सिलोनी इतिवृत्तांवरून ("दीपवंश", प्रकरण आठवे; "महावंश", प्रकरण पाचवे) स्पष्ट होते की, मौर्य सम्राटाच्या कारकिर्दीच्या अठराव्या वर्षी पाटलिपुत्र येथे महाथेर मोग्गलिपुत्त तिस्साच्या अध्यक्षतेखली बौद्धांची तिसरी परिषद भरली होती आणि तिने विविध देशांकडे बौद्ध धर्माच्या प्रचारासाठी धर्मप्रसारक पाठविले होते. उदाहरणार्थ अपरांत प्रदेशात (उत्तर कोकण) धर्मरक्षित, महाराष्ट्रात महाधर्मरक्षित, महिषमंडळात (आंध्र प्रदेशातील किनारपट्टीचा भाग) महादेव, वनवासीमध्ये (आधुनिक बनवासी भोवतालचा प्रदेश, जिल्हा-उत्तर कन्नड, कर्नाटक), रक्षित असे काही धर्मप्रसारक दखखन प्रांतात आणि दक्षिण भारतात रवाना केले होते. महानारदकस्सप जातकातील गोष्टीवरून समजते की, महाधर्मरक्षिताने ८४,०००[६०८] लोकांना दीक्षा देऊन आपल्या धर्मात आणले आणि १३,००० जणांना भिक्खुसंघात दाखल केले. धर्मप्रसारकांना देशोदेशी धाडल्याचे वर्णन बरेचसे विश्वसनीय आहे हे सांची-सोनारीच्या

कोरीव लेखात जी दोन धर्मप्रसारकांना हिमालयाच्या (हेमवत) भागात पाठविल्याची नोंद आहे तिच्यावरून स्पष्ट होते.[६०९] पाषाणात कोरलेल्या अशोकाच्या राजाज्ञांमधूनही त्यास पुष्टी मिळते. तेरावी राजाज्ञा असे सांगते की, भोज (विदर्भाचे लोक), पितनिक (पैठण प्रदेशाचे लोक) आणि आंध्र (तेलुगुभाषिक लोक), त्याचप्रमाणे अतिदक्षिणेत साम्राज्याच्या सरहद्दीबाहेर राहणारे चोल आणि पांड्य हेसुद्धा त्याच्या सूचनांचे पालन करत आणि त्याचे दूत त्याच्या शिकवणुकीचा त्यांच्यात प्रसार करत.[६१०] वर उल्लेख केल्याप्रमाणे राजाज्ञा कोरलेल्या पाषाणांचे काही तुकडे सोपारा येथे सापडले आहेत. हा प्राचीन अपरांत प्रदेशाचा एक भाग होता. आंध्रप्रदेशात अमरावती येथे व कर्नाटकात अनेक ठिकाणी अशोकाच्या कित्येक राजाज्ञा आजही विद्यमान आहेत. अशोकाच्या महामात्राचा कोरीव लेख खंडित अवस्थेत (नंतरच्या कोरीव लेखाला जागा करून देण्यासाठी तो छिन्नीने खोदून काढल्यामुळेही काही अंशी तसा आहे) विदर्भाच्या चांदा जिल्ह्यातील देवटेक येथे सापडला आहे.[६११] अशोकाने जवळपास संपूर्ण दक्षिण व पश्चिम भारतात बौद्धधर्माचा प्रचार केला होता याचे हे पुरावे आहेत. अशोकाच्या खडकात कोरलेल्या काही राजाज्ञा[६१२] त्याच्या राज्याभिषेकानंतरच्या बाराव्या[६१३] किंवा तेराव्या[६१४] वर्षी प्रसृत केलेल्या आहेत. म्हणजे त्याच्या कारकिर्दीच्या १६-१७ व्या वर्षी त्या प्रसृत केल्या गेल्या असाव्यात, कारण सिलोनी बौद्ध परंपरा असे समजते की, त्याच्या राज्यारोहणानंतर चौथ्या वर्षी त्याचा राज्यभिषेक झाला होता.[६१५] म्हणजे तिसऱ्या बौद्ध परिषदेचा जो काळ सिलोनी इतिवृत्तांमध्ये येतो त्याच सुमारास हे झाले असले पाहिजे. यावरून असा निष्कर्ष निघतो की, अशोकाचे अथक प्रयत्न आणि त्याला त्याच्या सहधर्मी उपासकांनी तितक्याच उत्साहाने-चालविलेल्या धर्मप्रसाराच्या हालचालींचे मिळालेले पाठबळ यातून बौद्धधर्माला दख्खन प्रांतात व पश्चिम भारतात लोकप्रियता लाभली. सुदैवाने या धर्माला शासक राजसत्तांकडून उदार पाठिंबा प्राप्त झाला व तो त्यांनी स्वतःचाच धर्म म्हणून घोषित केला होता. काही मोजकी उदाहरणे येथे या संदर्भात देता येतील. सातवाहन राजे आणि त्यांचे वारसदार, विशेषतः आंध्राच्या किनारपट्टी प्रदेशातील इक्ष्वाकु, विदर्भ-मराठवाडा आणि महाराष्ट्रानजीकच्या भागातील वाकाटक हे वैदिक-पौराणिक धर्माचे कडवे पुरस्कर्ते होते. वैदिक यज्ञविधी करण्यात त्याना अभिमान वाटत होता. तरीसुद्धा त्यांनी बौद्ध धर्माला सढळ हाताने मदत आणि नैतिक पाठिंबा दिल्याचे दिसते. पश्चिम भारतातील क्षहरात व कार्दमक आणि काही यवन यासारखे जे परकीय राज्यकर्ते पश्चिम भारतात स्थिर झाले आणि ज्यांनी पौराणिक धर्म अंगिकारला, त्यांनीसुद्धा बौद्धधर्माला राजाश्रय दिला. याचे अनुसरण जनसामान्यांकडूनही झालेले दिसते. बौद्ध प्रतिष्ठानांना देणग्या देणाऱ्या ज्या अनेक दात्यांची नावे पश्चिम भारतीय गुहा कोरीव लेखांतून कळतात त्यापैकी अनेकजण हे स्वतः बौद्ध नव्हते. कान्हेरी, महाड, कार्ले, बेडसा, नाशिक, जुन्नर, कोल्हापूर आणि अजिंठा येथे जे काही अनेक कोरीव लेख मिळाले त्यात एकतर दानकर्ते बौद्ध असल्याचा निर्देश नाही किंवा ते बौद्ध धर्मानुयायी नव्हते हे सिद्ध करणाऱ्या ठोस बाबी नमूद केलेल्या आहेत.[६१६] मात्र बौद्ध धर्माला जनमानसात एवढा

भक्कम आधार मिळाला की, राजे-राण्यांपासून सामान्य चर्मकारापर्यंतची माणसे बौद्धांना आपापल्या परीने दान करण्यात परस्परांशी चढाओढ करताना दिसतात. कोरीव लेखांमधून उपकारकर्त्या व्यक्तींची नावे मोठ्या संख्येने आढळतात. विविध प्रदेशांचे रहिवाशी असलेल्या आणि विभिन्न व्यवसाय करणाऱ्या या सर्वांनी बौद्ध धर्माचे कार्य पुढे नेण्याचा खटाटोप नेटाने केला होता आणि त्याला आपला पाठिंबाही दिला होता. शेतकरी, शेतमजूर, विणकर किंवा कोष्टी, तेली, कुंभार, अत्तार, सुतार, गवंडी व पाथरवट, जलसंचालित उद्योगांतील कामगार, सोनार, जवाहिरे, कांस्यकार किंवा कासार, तांबट, लोहार, हस्तिदंत कारागीर, कलाल, मच्छिमार, अंकेक्षक, वैद्य, लिपिक, माळी, द्वारपाल, गुराखी, शिकारी, नाभिक, बुरूड इत्यादी सर्वांचा त्यात भरणा होता. उद्योगपती व व्यापारी यांना बौद्ध धर्माचे विशेष आकर्षण होते. ते आपली धनसंपदा बौद्धांना व त्यांच्या प्रतिष्ठानांना मोठाल्या देणग्या देऊन सत्कारणी लावीत असत.[६१७] इसवी सनाच्या प्रारंभाच्या सुमारास संपूर्ण महाराष्ट्रात व दख्खन भागात बौद्ध धर्माचा खूप प्रसार झाला होता आणि अनेक महत्त्वाची केंद्रे अस्तित्वात आली होती. त्यातील विशेष महत्त्वाची केंद्रे पुढीलप्रमाणे सांगता येतील–महाराष्ट्रातील पवनी, नाशिक, कल्याण, कान्हेरी, कार्ले, भाजे, नाणेघाट, अजिंठा, कुडा, वेडसा, जुन्नर, महाड, आंध्रप्रदेशात अमरावती, भट्टिप्रोलु, गुंटपल्ली, नागार्जुनकोंडा आणि कर्नाटकात वनवासी, सन्नत्ति इत्यादी. बाहेरगावांहून या केंद्रांना भेटी देण्यासाठी येणारे लोक तेथे कटाक्षाने काही ना काही धर्मदान हमखास करायचे. त्यातील काही केंद्रांना तर यात्रास्थळांचेही माहात्म्य प्राप्त झाले असणे शक्य आहे. विशेषतः अजिंठा, कान्हेरी, कार्ले, नाशिक, पवनी, अमरावती इत्यादी केंद्रांचा यासंबंधाने उल्लेख करता येईल. या स्थळांनी फार दूरवरच्या यात्रेकरुंनाही आकर्षित केले होते.[६१८]

धर्मांतरणाची ही प्रक्रिया खिस्ताब्दाच्या प्रारंभापर्यंत जोमाने सुरू होती असा निष्कर्ष व्यक्तीनामांच्या चिकित्सक तौलनिक विश्लेषणातून निघतो. अनेक प्रकरणी दात्यांची नावे बौद्ध धर्माशी निगडित आहेत. त्यात बुद्ध, धम्म व संघ असे शब्द आढळतात. त्यांच्या आईवडिलांची नावे मात्र वैदिक-पौराणिक धाटणीची असतात. काही प्रकरणी आई-वडिलांची आणि दात्यांची अशी दोहोंचीही नावे या ना त्या प्रकारे लोकसंप्रदायांशी किंवा वैदिक-पौराणिक संप्रदायांशी संबंधित असल्याचे दिसते. अशा प्रकरणी धर्मांतरे त्यांच्या आईवडिलांच्या उत्तरायुष्यात किंवा स्वतःच्याच हयातीत झालेली होती हे स्पष्ट होते. दोन्ही प्रकरणी धर्मांतरितांना बदललेल्या धर्माशी जुळवून घेण्यासाठी आपली नावे बदलण्याची कोणतीही निकड जाणवली नव्हती. त्यांनी आपली मूळ नावे तशीच ठेवली होती. जेथे जन्मदाते व त्यांची अपत्ये या दोहोंची नावे बौद्ध परंपरेतील होती त्यांच्याबाबत धर्मांतर बहुधा आधीच्या पिढीत किंवा त्याही अगोदर झाले असावे असे गृहीत धरता येते. अर्थात काही प्रकरणांमध्ये धर्मांतरित व्यक्तींनी आपल्या सांप्रदायिक परिवर्तनाशी सुसंवादी नावे स्वतःसाठी घेतली असावीत. त्यामुळे केवळ नावांच्या आधारे काढण्यात आलेले निष्कर्ष निर्णायक मानले जाऊ शकत नाहीत.[६१९]

वैदिक-पौराणिक धर्माच्या अनुयायांना बौद्ध धर्म स्वीकारावासा वाटण्यामागे एक महत्त्वाचा घटक वर्ण-जाती व्यवस्थेला बौद्धधर्माचा विरोध हा असला तरी नवधर्मांतरित नेहमीच स्वतःला त्या व्यवस्थेशी पूर्वापार असलेल्या आपल्या संबंधापासून मुक्त करू शकले नाहीत. कुडा येथील कोरीव लेखातून आपणास समजते की, उपासक अयितिलूची पत्नी भायिला हिने चैत्यगृहाचे दान केले. ती दोघे बौद्ध धर्मांतरित झालेली असूनही त्यांचा उल्लेख ब्राह्मण असा केला आहे. अशाच प्रकारे कार्ले येथे एक भिक्खू प्रव्रज्या घेतल्यानंतरही आपले 'शर्मन्' पदान्त नाव (भद्रशर्मन) तसेच कायम ठेवतो.[६२०]

**बौद्ध प्रतिष्ठाने** : बौद्ध धर्माची वाढती लोकप्रियता आणि परिणामी भिक्षु–भिक्षुणी व सामान्य उपासक-उपासिका यांच्या संख्येत सतत पडणारी भर या कारणांमुळे दख्खन प्रांतात व पश्चिम भारतात विहार आणि चैत्यगृहे बांधणे निकडीचे झाले होते. हे आव्हान पेलण्याबाबतही नवदीक्षित इतर कोणाच्याही मागे नव्हते असे दाखविणारे अनेक पुरावे आहेत. बौद्धांना तीन प्रकारच्या बांधकामाची गरज होती. (१) स्तूप, (२) विहार आणि (३) चैत्यगृहे. अशा या तिन्ही प्रकारची बांधकामे या भागात भरपूर प्रमाणात आढळतात. विदर्भातून बौद्ध धर्माचा प्रसार दख्खनच्या इतर भागात झाला. बौद्धांचा प्राचीनतम बालेकिल्ला असलेल्या पवनी येथे आकाराने सर्वात मोठे व विटांनी बांधलेले दोन स्तूप सापडले असून त्यांचा काळ ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकाचा आहे. विटांचे चौक आणि थर ("बॉक्स" अँड "टायर") अशा तंत्राचा वापर करून कारागिरांनी चाळीस मीटर व्यासाचे हे भव्य स्मारक उभारले आहे. मातीची रंगीत भांडी मृताच्या अस्थी सुरक्षित झाकून ठेवण्यासाठी वापरली आहेत. एक कुंडाच्या आकाराचे बांधकाम असून त्यात ते भांडे व त्याच्या बाजूला एक लाकडी "यष्टी" (काठी) ठेवली आहे. या बांधकामाचे अवशेष उत्खननात सापडले आहेत.[६२१] या स्तूपांपैकी एका स्तूपाच्या सभोवती भारहुत स्तूपाच्या धर्तीचा कोरीव काम केलेल्या दगडांचा कठडा आहे. दख्खन प्रांतातील अमरावती, भट्टीप्रोलू आणि नागार्जुनकोंडा इत्यादी अनेक ठिकाणी तसेच नंतरच्या काळात आंध्रप्रदेशातही अशाच स्वरुपाचे स्तूप उभारले गेल्याची माहिती मिळते. विटांचे बांधकाम मुख्यत्वे सपाट प्रदेशात केलेले आहे. महाराष्ट्राच्या विदर्भ भागात आणि आंध्रप्रदेशात असे प्रदेश उपलब्ध होते. या उलट सह्याद्री पर्वताचा डोंगरी प्रदेश विटांच्या बांधकामासाठी मुळीच सोयीचा नव्हता. तेथे खडकांच्या सुळक्यामधून स्तूप कोरून काढण्याचे काम आश्रयदात्यांनी करवून घेतले. बौद्ध धर्माशी संबंधित स्तूपांचे तीन प्रकार असल्याचे उल्लेख बौद्ध वाङ्मयात मिळतात ते असे-(१) शारीरिक किंवा बुद्धाच्या देहावशेषांवर बांधलेले स्तूप, (२) "पारिभोगिक" किंवा बुद्धाच्या वापरात असलेल्या एखाद्या वस्तूवर उभारलेला स्तूप आणि (३) "औद्देशिक" किंवा प्रतिकात्मक स्तूप. यातील पहिल्या दोन प्रकारचे स्तूप माती व विटांनी केलेल्या संरचनात्मक बांधकामाचेच असणे शक्य होते, तर खडकात कोरलेले स्तूप हे तिसऱ्या प्रकारचे म्हणजे प्रतीकात्मक होते. बौद्धांच्या संदर्भात असे आढळते की, केवळ खुद्द बुद्धाच्या किंवा बुद्धांच्या शरीरावशेषांवर किंवा त्यांच्या स्मरणार्थ मूळ स्तूप

उभारले होते. पुढे मात्र हा विशेषाधिकार इतरही श्रेष्ठ मान्यवर व श्रेष्ठ बुद्ध भिक्षुनांही दिला जाऊ लागला. सांची[६२२] व सोनारी[६२३] च्या कोरीव लेखांवरून असे समजते की, अशी बांधकामे कस्सपगोत, मज्झिम व दुदुंभिसार यांच्या सन्मानार्थही केली गेली होती. या तिघांना तिसऱ्या बुद्ध परिषदेने हिमाच्छादित प्रदेशात धर्मप्रसारक म्हणून पाठविले होते. अर्थात तेथे त्यांनी उत्तम कामगिरी बजावली असावीच. मुंबईजवळच्या कान्हेरी येथील एका गुंफेत एकूण सत्तावीस बौद्ध गुरुंच्या स्मरणार्थ पाषाणात कोरून जे स्तूप घडविले आहेत त्यांचा काळ इसवी सनाचे सहावे शतक असा आहे.[६२४] भाजे आणि बेडसा येथे मिळालेल्या पुराव्यावरून ही प्रथा तत्पूर्वीच्याही काळात अस्तित्वात असल्याचे दिसते.

बांधीव विहार पवनी येथे नक्कीच असतील, पण तेथील उत्खनन अत्यंत मर्यादित स्वरूपाचे असल्याने असे अवशेष आढळले नाहीत. अनेक बांधीव बौद्ध विहारांचे अवशेष आंध्र प्रदेशात आढळले आहेत. पश्चिम महाराष्ट्रात मात्र पाषाणातील वास्तुकामच बौद्धांमध्ये सर्वाधिक लोकप्रिय होते. कारण येथील खडकाचे पोत विशेषतः त्या कामासाठी सर्वोत्कृष्ट होते. सपाट प्रदेशात बांधीव वास्तुकाम अधिक प्रचलित होते.[६२५] खडकात खोदलेल्या विहारांच्या इमारतींचा विकासक्रम समजून घ्यायचा तर एक वस्तुस्थिती आपल्याला लक्षात ठेवावी लागते ती अशी की, व्यक्तीगत संन्यासाच्या आदर्शापासून आश्रमाच्या आदर्शापर्यंतची वाटचाल क्रमशः एका प्रक्रियेतून झाली असून तिचे प्रतिबिंब खडकातील विहारांच्या रचनेत उमटले आहे. विहारांच्या वास्तुकलेतील हे टप्प्याटप्प्याने घडून आलेले परिवर्तन फर्ग्युसनने "दि रॉक-कट टेम्पल्स ऑफ इंडिया" या ग्रंथाच्या प्रस्तावनेत (पृष्ठ पंधरा-सोळा) फार सुंदर रेखाटले आहे.[६२६] तो म्हणतो, "सर्वांत जुन्या विहारात फक्त एकच कक्ष असतो, केवळ एका भिक्षुच्या वास्तव्यासाठी असलेल्या छोट्या मठीचे त्याचे स्वरुप असते. विहारांच्या दुसऱ्या प्रवर्गात एक मोठा व्हरांडा आणि त्याच्यामागे एक कक्ष असा त्यांचा विस्तार झालेला आढळतो. त्यांना बाहेर उघडणारे अनेक दरवाजे दिसतात. मध्ये विभाजक (Partition) घालून बहुधा त्यांचे भाग पाडलेले असावेत. विहारांच्या तिसऱ्या वर्गातच बहुसंख्य विहारांचा समावेश होतो. लहान कक्षाचे रूपांतर येथे मोठ्या सभाकक्षात झाले असून सर्वसाधारणपणे मध्यावर त्याला स्तंभ असतात. भोवताली भिक्षुंचे कक्ष काढलेले आढळतात. व्हरांड्याच्या कोणत्या तरी एका टोकाला सामान्यतः मठाधिपती किंवा त्याच्या खालचा अधिकारी याचे कक्ष आहेत." या संदर्भात हे लक्षात घेण्याजोगे आहे की, ख्रिस्तपूर्व शतकातील कोरीव पुराभिलेख हे विहारांबाबत स्पष्ट माहिती देत नाहीत. याचे एक कारण कदाचित असेही संभवते की, जरी संन्याशांच्या एकत्रित निवासस्थानांच्या बांधकामांना परवानगी मिळाली असली तरी भिक्षुंच्या आधीच्या व्यक्तीगत संन्यस्तपणाच्या सवयींचे निरसन अजून पुरते झाले नसावे. पण इसवी सनाच्या प्रारंभापासून मात्र विहारांचे अधिकाधिक संदर्भ मिळू लागतात. विहार वास्तव्याचे आदर्श क्रमशः लोकप्रिय होण्याच्या प्रक्रियेचा प्रत्यय यातून येतो. कल्याण येथे भिक्षुणींसाठी अंवालिका नामक विहाराची

उभारणी झाल्याची नोंद कान्हेरीच्या कोरीव लेखात आढळते. संस्थापक स्त्रीच्या नावावरून विहाराचे हे नाव पडले असावे.[६२७] जुन्नरच्या कोरीव लेखात धर्मोत्तरीय पंथाचा भिक्षुणीविहार (भिखुणी-उपसय) आणि सिवपालितनिकाचा भिक्षुणीविहार यांचे संदर्भ आले आहेत.[६२८] कान्हेरी पुरालेखांमध्ये प्रतिप्ठान येथील तेरा कक्षीय विहाराचा तसेच सडसेवजुच्या विहारात आवश्यक त्या दाननिधीसह एका संघारामाचाही निर्देश आहे.[६२९] विहार, कक्ष (ओवरक), पाण्याचे हौद आणि इतर संलग्न गोप्टी यांचे दान विविध स्तरांतील लोकांनी आपापल्या परिस्थितीनुसार केले असल्याच्या कित्येक नोंदी आढळतात.[६३०] आंध्रप्रदेशात ठिकठिकाणी असलेल्या बांधीव विहारांचे अनेक संदर्भ कोरीव लेखात आलेले आहेत. उदाहरणार्थ कट्टहाराम (हे कट्टहारसुत्त वर आधारित कट्टहारआरामचे संक्षिप्त रूप मानले जाते. युवान श्वांगने इसवी सनाच्या सातव्या शतकात त्याचे वर्णन केले आहे.),[६३१] धनकटक (अमरावतीजवळचे धरणीकोटा)[६३२] येथील महाविहार, अमरावती येथील वहुधा चचुली नामक व्यक्तीने स्थापन केलेला चचुलिसंघ[६३३] आणि विजयापुरी (नागार्जुनकोंडा) येथील कुलहविहार आणि सिहलविहार (चिनी भिक्षुंचे विहार).[६३४] यातील अखेरचे दोन इक्ष्वाकु काळातील आहेत. आंध्र प्रदेशातील काही प्रारंभिक कोरीव लेखात विहारांचे आणखी काही निर्देश आहेत.[६३५] मुळात विहार ही भिक्षु-भिक्षुणींची निवासस्थाने होती आणि प्रारंभिक विहारात पूजापाठाची सोय नव्हती. पुढे विचारप्रणाली वदलली आणि महासांघिक परंपरेतील काही संप्रदाय व नंतरच्या काळातील महायान यांच्या पुरस्कर्त्यांनी प्रार्थनागृहे वांधून त्यांच्या पार्श्वभिंतीजवळ मध्यभागी वुद्धाच्या प्रतिमेची प्रतिप्ठापना केली. नंतरच्या काळातील सर्वच विहारात तसे आढळते. कान्हेरी आणि अजिंठा येथे हा वदल विशेपकरून लक्षात येतो. कारण तेथे वैचारिक व सांप्रदायिक परिवर्तनातील टप्पे किंवा वैशिष्ट्ये चटकन नजरेत भरतात. मंत्री वराहदेव याने खोदून घेतलेल्या सोळाव्या व सतराव्या क्रमांकांच्या विहारगुंफामध्ये आणि इसवी सनाच्या पाचव्या शतकाच्या अखेरीस वत्सगुल्म शाखेतील वाकाटक राजा हरिपेण याच्या ऋपीका नामक पोटजहागिरीमध्ये[६३६] तसेच आठव्या लेण्यात[६३७] हे नंतरचे वैशिष्ट्य प्रत्ययास येते.

खडकात खोदून काढलेले सभामंडप बौद्धधर्माच्या दृप्टीने महत्त्वाच्या असलेल्या सर्वच ठिकाणी आढळतात. या विपयीचे वर्णन "एज ऑफ इंपीरियल युनिटी" या ग्रंथात आलेले आहे.[६३८] आजही अजिंठा, कार्ले, कान्हेरी, भाजा, कुडा, महाड, नाशिक, जुन्नर इत्यादी जागी ते अस्तित्वात आहेत. आधीच्या आणि नंतरच्या उदाहरणांमध्ये एकमेव फरक आहे तो असा की, उत्तरकालीन चैत्य गृहात स्तूपाच्या जोडीलाच वुद्धाच्या मूर्तीही असतात. अशी चैत्यगृहे खोदल्याची नोंद कोरीव लेखात वारंवार आढळते.[६३९] खडकात कोरलेल्या चैत्यगृहांच्या जोडीलाच अगदी प्रारंभिक काळापासून त्याच धाटणीचे वांधीव सभामंडपही अस्तित्वात असले पाहिजेत. पण त्यांचे फारसे नमुने शिल्लक उरलेले नाहीत. तरीसुद्धा तेर (जिल्हा उस्मानाबाद) आणि आंध्र प्रदेशातील चेझर्ला या गावाने इसवी सनाच्या पाचव्या शतकापासूनची विटांची अशी बांधकामे जतन करून ठेवल्याचे

दिसते. त्यांचे रूपांतर वैदिक देवदेवतांच्या मंदिरात झाल्यामुळेच हे शक्य झाले. नेहमीच्या चैत्य सभामंडपांची बहुतांशी वास्तुशास्त्रीय वैशिष्ट्ये त्यात दिसून येतात.[६४०] खडकात कोरलेली काही (भाजा व कार्ले) चैत्यगृहे लाकडी मूलप्रतिमेची नक्कल करून घडविली आहेत; एवढेच नव्हे तर लाकडी संरचनांचे अंधानुकरण करून प्रत्यक्ष लाकडाचा वापरही त्यात केला गेला आहे.

मोठाल्या सभामंडपांची गरज सामुदायिक प्रार्थनेसाठी आणि उपोसथ बैठकींसाठी पडत असे. दोन बैठकींच्या मधल्या अवकाशात विनय नियमावलीचा भंग ज्या भिक्षु-भिक्षुणींकडून होत असे ते या बैठकीत कबुलीजबाब देत असत. त्यामुळेच जेथे भिक्षु व भिक्षुणी मोठ्या संख्येने असत तेथे असे सभामंडप बांधले किंवा खोदून काढले जात असत. अर्थात बाकीच्या अवांतर बाबी किंवा सुशोभन वैशिष्ट्ये विहाराच्या धार्मिक-सांप्रदायिक गरजा भागविण्याच्या दृष्टीने किंवा सौंदर्यवर्धनासाठी घडविल्या जात.

**पंथाची निर्मिती** : बौद्ध संघामध्ये त्याच्या स्थापनेनंतर अल्पावधीतच खुद्द बुद्धाच्या हयातीतच मतभेदांना सुरुवात झाली होती. पण बुद्धाच्या प्रेरणादायी व भव्य व्यक्तिमत्वाच्या प्रभावामुळे त्यांनी गंभीर स्वरुप धारण केले नव्हते. बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर संघाला एकत्र धरून ठेऊ शकेल असा कोणीही नव्हता. बौद्ध धर्माचा अफाट भूभागावर झालेला प्रसार आणि विविध सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक पार्श्वभूमीच्या लोकांना धर्मांतराद्वारे मिळालेला प्रवेश यामुळे परिस्थिती अधिकच विकट होऊन संघात दुफळी पडली. बुद्धाच्या मृत्यूनंतर शतकभराने तिचे आयाम चिंताजनक झाले. पौर्वात्यांनी घालून दिलेल्या विनय नियमांपासून दूर होणाऱ्यांना सामावून घेणे पुराणमताभिमानी बौद्धांना अंवघड होऊन बसले आणि यातून बौद्धसंघात दोन तट (निकाय) पडले. थेरवादाची (स्थविरवाद) भूमिका विनय नियमांचे काटेकोर पालन व्हावे अशी होती, तर महासंघिकांच्या मते या विहित आज्ञांमध्ये दहा किरकोळ आज्ञाभंग क्षम्य होते. महासांघिक नावावरूनच स्पष्ट होत असल्याप्रमाणे या गटाला मिळालेला पाठिंबा बराच मोठा होता. पुढच्या एखाद्या शतकात अशोकाच्या कारकिर्दीपूर्वीच या दोन गटांची विभागणी व उपविभागणी होऊन अठरा मुख्य पंथ आणि उपपंथ निर्माण झाले असावेत.[६४१] त्याशिवाय नंतरच्या काळात कित्येक प्रादेशिक पंथ निर्माण झाले ते निराळेच.[६४२] सिलोनी इतिवृत्तांमध्ये संघाच्या फाटाफुटीची कहाणी तपशीलवार सांगितली आहे.[६४३] इसवी सनाच्या पूर्वीची काही शतके ते इसवी सनाच्या नंतरची काही शतके या काळातील प्रारंभिक कोरीव लेखांमधून यापैकी अनेक पंथाचे संदर्भ भारतभर सापडतात. त्यावरून सिलोनी इतिवृत्तांमधील वर्णनाला एकंदरीत पुष्टीच मिळते.[६४४]

पुढे थोड्याफार कालावधीनंतर बौद्ध धर्मात आणखी सांप्रदायिक गट पडले. पूर्वी बोधीवृक्ष, स्तूप, पादुका इत्यादींची प्रतीकात्मक पूजा होत असे त्याजागी आता बुद्धाची सगुण स्वरुपात पूजा केली जाऊ लागली. ख्रिस्तपूर्व/ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकात बुद्धाची

पहिली मूर्ती मथुरा येथे घडविली गेली. काही पंडित मात्र याचे श्रेय गांधार कलापंथाला देतात. त्या पंथातील कलावंतांनी ग्रीक व रोमन परंपरेतील वैशिष्ट्ये आत्मसात केली होती. याखेरीज आणखीही काही तत्त्ववैचारिक नवे संप्रदाय उदयास आले होते. उदाहरणार्थ (१) धर्मशून्यता (वस्तूमात्राचे अस्तित्व न मानणे) आणि पुद्‌गल शून्यता (आत्म्यासारखा एखाद्या गोष्टीचा अभाव) यावर विश्वास ठेवणारे, (२) अनेक बुद्ध श्रेष्ठ व वोधिसत्व यांच्या अस्तित्वावर श्रद्धा असणारे, (३) देव-देवतांची उपासना करणारे आणि (४) मोक्षप्राप्तीच्या दृष्टीने मंत्राच्या सामर्थ्यावर विश्वास बाळगणारे इ. आणखी एक लक्षणीय बाब म्हणजे व्यक्तिगत निर्वाण या सर्वोच्च आदर्शाची जागा बोधिसत्वपदाची प्राप्ती या ध्येयाने घेतली. या नव्या ध्येयानुसार आपल्या स्वतःच्या मुक्तीसाठी झटण्याऐवजी सर्व सजीवांच्या मुक्तीसाठी अनेकानेक जन्मांच्या फेऱ्यातून जाणे अधिक श्रेयस्कर मानले गेले होते. या तत्वप्रणालीशी निगडीत परिवर्तनांचे पर्यवसान महायान पंथांच्या उदय होण्यात झाले. त्या पंथाने बौद्धांच्या विचारात व अभिवृत्तीत कमालीचा बदल घडवून आणला. प्रत्यक्षात हा पंथ म्हणजे महासंघिकप्रणित भूमिकेचेच अधिक प्रगल्भ तात्त्विक स्वरुप होते. त्यामुळे त्यास महायान पंथाचे पूर्वसुरी मानले जाऊ शकते. इसवी सन सुरू होण्यापूर्वीच ही घडामोड होऊन गेली असावी. कारण त्यांचा उल्लेख प्रज्ञापारमितांमध्ये आढळतो, या पंथाच्या संहिता इसवी सनाच्या पहिल्या शतकात नक्कीच अस्तित्वात होत्या. त्यांच्यापैकी एकीचे चिनी भाषेत भाषांतर इ. स. १४८ मध्ये झाले होते. त्यातील सर्वात जुनी संहिता "अष्टसाहस्त्रिका प्रज्ञापारमिता" ही आहे. यामध्ये महायान उपदेशाची सुरुवात दक्षिणापथात होईल, तेथून तो पौर्वात्य देशात जाईल आणि उत्तरेत भरभराटीस येईल असा उल्लेख आहे. महासंघिकाशी संलग्न असलेल्या शैल संप्रदायाची स्वतःची अशी प्रज्ञापारमिता प्राकृतात होती असे सांगणाऱ्या तिबेटी परंपरेतून. त्याचप्रमाणे अंग येथील अर्हत् नंदाचा उल्लेख महायान तत्त्वज्ञानाचा थोर पंडित म्हणून करणाऱ्या सुप्रसिद्ध तिबेटी बौद्ध लेखक तारानाथाकडून वरील विधानाला पुष्टी मिळते.[६४५] कनिष्काच्या कारकिर्दीत पुरुषपूर (आजचे पेशावर, पाकिस्तान) येथे किंवा काश्मीर येथील कुंडलवनविहारात वसुमिहिराच्या अध्यक्षतेखाली झालेल्या चौथ्या बौद्ध परिषदेत महायानाचा वरचष्मा होता आणि त्यांचीच तेथे सरशी झाली होती. थोर बौद्ध गुरु नागार्जुन याचा जन्म विदर्भात झाला होता आणि सातवाहन काळात त्याची भरभराट झाली होती. तो महायान पंथाचा (शून्यवादाचा) महान अभिव्याख्याता होता. त्याने त्या पंथास लोकप्रियता मिळवून देण्याचे कार्य मोठ्या नेटाने करून या पंथाचे रूपांतर एका लोकप्रिय संप्रदायात केले. महायान (योगाचार्य पंथ) पंथाचा दुसरा अभिव्याख्याता असंग हाही पेशावरचाच होता. प्रारंभिक भागात मात्र हीनयान बौद्ध धर्मालाच[६४६] उदंड लोकप्रियता मिळत राहिली. अपवादाला काही बुद्ध प्रतिमा अमरावती व इतर काही ठिकाणी सापडल्या आहेत. काही काळानंतर मात्र अजिंठा,[६४७] कुडा[६४८] व कान्हेरी[६४९] येथील कोरीव लेखात महायान पंथाचा स्पष्ट संदर्भ

नसला तरी त्या पंथाशी संबंधित चिन्हे आढळतात. हे कोरीव लेख काहीशा नंतरच्या काळातील म्हणजे सुमारे इसवी सन पाचव्या-सहाव्या शतकातले आहेत. प्रारंभिक पुरालेखांमध्ये स्थविरवाद आणि महासंघिक आणि त्यांचे पंथ याविषयीचे अनेक संदर्भ आढळतात. त्यांची येथे थोडक्यात नोंद केली आहे.

नागार्जुनकोंडा हा शैव पंथाचा बालेकिल्ला असला तरी तेथे इक्ष्वाकु आमदानीत थेरवाद्यांशी संलग्न असे काही विहार होते. त्यांना तेथे थेरीय असे म्हणत असत. गजपृष्ठाकार मंदिरातील एका शिलालेखात सिलोनचे थेरीय आचार्य आणि त्यांचा सिंहल विहार विस्तृत प्रदेशात धर्माच्या प्रसार कार्यात मोलाची भूमिका पार पाडत असल्याचा उल्लेख आहे.[६५०] त्याचप्रमाणे विभाज्यवादिन (म्हणजे थेरवादिन) आणि महाविहारवासिन् या थेरियांच्या विहारात बुद्धाच्या पदचिन्हांची प्रतिष्ठापना केल्याचीही नोंद आहे.[६५१] नागार्जुनकोंड्याचा दुसरा (निखळून पडलेला कोरीव स्तंभ लेख-एफ्) महीशासक आचार्याचा संदर्भ देतो.[६५२] राजा वासिष्ठीपुत्र पुळुमाविच्या चोविसाव्या वर्षातील कार्ले येथील कोरीव लेखात दात्याचे सोवसक (सुवर्पक) असे नाव नमूद आहे. ते काश्यपीय पंथाचेच दुसरे नामाभिधान आहे.[६५३] कार्ले येथील सातवाहनकालीन कोरीव लेखात (क्र. ८ आणि ९) शूर्पारक येथील धर्मोत्तरीय पंथाच्या स्थविराचा संदर्भ आला आहे.[६५४] तर धर्मोत्तरीयांना एक गुंफा, टाके आणि भिक्षुणी विहार दान केल्याचा संदर्भ जुन्नर येथे आढळतो.[६५५] भद्रयानिकांची केंद्रे कान्हेरी[६५६] व नाशिक[६५७] येथे होती आणि त्यांना सातवाहन राजांचे पाठबळ होते. उक्त पुराव्यांमध्ये गौतमीपुत्र सातकर्णि व त्याची आई गौतमी बलश्री यांनी लेणी खोदली असून त्यांच्या सजावटीसाठी वासिष्ठीपुत्र पुळुमावि याने अर्थसाह्य केले असे नोंदविलेले आहे. महासंघिकांना कार्ले येथे मोठा आश्रय लाभला. तेथे मिळालेल्या दोन पुरालेखांमध्ये वासिष्ठीपुत्र पुळुमावि याने खेडे दान केल्याची[६५८] आणि त्यांच्या संघासाठी एका पार्थियन याने नऊ दालनाचा सभामंडळ खोदून काढल्याच्या नोंदी आहेत.[६५९] अयिर हंग (आर्य संघ) या नावाने त्याचा उल्लेख नागार्जुनकोंडा येथील कोरीव लेखात आढळतो.[६६०] या पंथाला अमरावती येथेही उत्तम प्रतिसाद मिळाला असल्याचाही पुरावा आहे.[६६१] दीपवंशात (५.३२-३८) अशी माहिती मिळते की, महासंघिकांच्या आपल्या स्वतःच्या आचारनियम संहिता होत्या. यास अमरावतीला सापडलेल्या अभिलेखातूनही पुष्टी मिळते. त्यात काही भिक्षुणींचा विनयधरा असा आणि भिक्षुंचा महाविनयधर[६६२] व संयुत भाणक[६६३] असा निर्देश केला आहे. नागार्जुनकोंड्याच्या काही कोरीव लेखांवरून असा समज होतो की, महासंघिकांचे स्वतःचे धम्मपिठक असावे. काही भिक्षु दीर्घ व मझिम या सुत्तनिपाताच्या दोन महत्त्वाच्या भागांवर प्रभुत्व मिळवून त्यांचा तसेच मातृकांचा किंवा विनय नियमांचा प्रचार करीत होते असाही उल्लेख सापडतो.[६६४] महासंघिकाशी संलग्न असलेल्या शैलपंथाचे हे सर्व संदर्भ आहेत. विनय, अभिधम्म व निकाय ही सर्व त्यांची स्वतःची अशी वेगळी तत्त्वे दीर्घ व मझिम या दोन निकायांचा येथे नामोल्लेख आहे.[६६५] बहुश्रुतीयांचे केंद्र इक्ष्वाकुंच्या काळात नागार्जुनकोंडा येथे होते असे एका कोरीव

लेखावरून (निखळून पडलेला स्तंभलेख-जी) दिसते. राज्यकर्त्या इक्ष्वाकु कुटुंबाने या पंथाच्या आचार्यासाठी विहार प्रस्थापित केल्याचा त्यात उल्लेख आहे.[६६६] चैत्यवादिन किंवा चैत्यक हे सातवाहनांच्या काळात अमरावती भागात व पश्चिम महाराष्ट्रात बरेच लोकप्रिय होते असे त्याचे जे अनेक संदर्भ कोरीव लेखात आले आहेत त्यावरून स्पष्ट होते. नाशिक,[६६७] जुन्नर[६६८] आणि अंजिठा[६६९] येथील पुरालेखामध्ये तसेच वासिष्ठीपुत्र पुळुमावि याच्या कारकिर्दीतील अमरावती येथील कोरीव लेखात[६७०] त्यांचा उल्लेख आढळतो. दख्खन भागातील कोरीव लेखात बहुधा सर्वाधिक उल्लेख याच पंथाचे असावेत. अमरावती येथील काही कोरीव लेखांत राजगिरीनिवासिका[६७१] किंवा राजशैल[६७२] आणि सिदत्थिक[६७३] यांचे संदर्भ आहेत. ते बहुतेक महासंघिकाचे उपविभाग असावेत. शैलपंथ ही चैत्यकांची एक शाखा[६७४] होती. पौर्वात्य (पूर्व) व पाश्चात्य (अपर) असे त्यांचे उल्लेख कोरीव लेखात आढळतात. पूर्व शैलचा उल्लेख अमरावती,[६७५] नागार्जुनकोंडा,[६७६] आणि अल्लुरू[६७७] येथील अभिलेखात, तर अपर शैलपंथाचा उल्लेख कान्हेरी,[६७८] अमरावती[६७९] आणि नागार्जुनकोंडा[६८०] येथील कोरीव लेखात आढळतो. नागार्जुनकोंडा येथे त्याचे नाव अपरमहाविनासेलिय असे कोरलेले आहे. शैलपंथाचा उगम आणि प्रारंभिक इतिहास यावर कोरीव लेखातून चांगलाच प्रकाश पडतो. त्यांनी बहुधा आपली सुरुवात अमरावती नजीकच्या प्रदेशात मूळ महावनशैलपंथ म्हणून केली असावी आणि नंतर त्यांची विभागणी पौर्वात्य व पाश्चात्य उपपंथात होऊन त्यांना अनुक्रमे पूर्वमहावनशैल आणि अपरमहावनशील अशी नावे प्राप्त झाली असावीत. मधल्या महत शब्दाचा लोप होऊन त्यांची लघरूपे प्रचारात राहिली.[६८१]

अखेरचे चार पंथ राजगिरिक, सिद्धत्थक, पुब्ब आणि अपरसेलिय हे अंधक नावाने ओळखले जातात. कारण दीर्घकाळ त्यांचे वास्तव्य तेलुगुभाषिक प्रदेशातच राहिले होते. त्यांच्यात फारसे गंभीर, तात्त्विक व वैचारिक मतभेद नसल्यामुळे इसवी सनाच्या सातव्या शतकापर्यंत ते अंतर्धान पावले असावेत. युवान श्वांगच्या "सि-यू-कि" मध्ये त्यांचा उल्लेख आढळत नाही.

काही कोरीव लेखात अशा काही बौद्ध पंथावर प्रकाश पडतो की, त्यांचे स्वरुपच निश्चित करता येत नाही. कारण दुसऱ्या कोणत्याही संदर्भसाधनात त्यांचा उल्लेख नाही. जुन्नर येथील काही कोरीव लेखात अपगुरिय,[६८२] अपराजित,[६८३] लंकुडिय[६८४] असे शब्द आहेत, तर अमरावतीच्या पुरालेखांमध्ये जडिकिय,[६८५] उतयिपभाहिन[६८६] आणि पुसिलिय[६८७] असे शब्द आहेत. इसवी सनाच्या प्रारंभिक शतकात आणि आधीच्या काही काळात महाराष्ट्रात व आंध्रप्रदेशात अस्तित्वात असलेल्या बौद्ध पंथांची ती नावे असू शकतात.

एक पंथाचे अनुयायी इतर पंथांच्या अनुयायांना दानधर्म करताना दिसतात. विशेषतः स्थविरवादी पंथाच्या अनुयायांनी महासंघिकांना दानधर्म केल्याचे आढळते.

त्यांचे वास्तव्य एकाच केंद्रात होते असेही दिसते. यावरून असे म्हणता येईल की, प्रसंगी त्यांच्यातील मतभेदांनी गंभीर वळण घेतले असले तरी एकंदरीत त्यांचे आपापसातील संबंध सलोख्याचे होते.[६८८]

**संघ** : बौद्ध धर्माच्या त्रिरत्नांमध्ये बुद्ध आणि धम्म यांच्या जोडीला संघाचा अंतर्भाव केला आहे यावरून त्या धर्मात संघाला असलेले महत्त्व स्पष्ट होते. संघाची रचना चार मंडळांची किंवा परिसांची (संस्कृतात परिषदांची) मिळून होते. ती मंडळे अशी :- (१) भिक्खू, (२) भिक्खुणी, (३) उपासक आणि (४) उपासिका. अर्थात संघात उपासक व उपासिका यांचा अंतर्भाव हा केवळ एक उपचार होता. कारण विहारांचे बांधकाम व परिरक्षा यासाठी आणि भिक्षु-भिक्षुर्णींच्या चरितार्थासाठी देणग्या देणे, विहाराच्या बाह्य प्रशासनात भाग घेणे त्याचबरोबर विहारांमध्ये ठराविक दिवशी दिल्या जाणाऱ्या धार्मिक प्रवचनांचा भाग घेणे यापलीकडे त्यांना संघात फारशी भूमिकाच नव्हती. त्यामुळे संघाचे खरे घटक भिक्षु व भिक्षुणी हेच होते.[६८९] कोरीव लेखातून संघाच्या प्रशासकीय यंत्रणेविपयी अशी काही मोलाची माहिती मिळते की, जी इतर कोणत्याच संदर्भसाधनात आढळत नाही. राजा कुबेरक (ख्रिस्तपूर्व तिसरे-दुसरे शतक) याच्या काळातील भट्टिप्रोलु अवशिष्ट धातुमंजुषा या कोरीव लेखात अर्हतांची गोष्ठी (अरहादिनानगोठिया),[६९०] सिंहगोष्ठी (प्राकृतात सीहगोठी),[६९१] गोष्ठी व तिच्या सदस्यांची नावे आणि प्रमुखाचे म्हणजे त्यावेळी राज कुबिरकाचे नाव[६९२] यांचा संदर्भ सापडतो. श्रमण हे जिचे सदस्य असत ती अर्हतांची गोष्ठी बहुधा विहाराच्या धर्मप्रकरणविषयक तसेच अंतर्गत प्रशासनासाठी जबाबदार असावी, तर दुसरी जी गोष्ठी नामक समिती होती ती त्यांच्या बहिर्गत प्रशासनाची जबाबदारी पार पाडत असावीत.[६९३] या मंडळांखेरीज काही अधिकाऱ्यांचाही उल्लेख आढळतो. जेव्हा नव्या विहाराचे बांधकाम करायचे असेल किंवा डागडुजी करायची असेल तेव्हा ठराविक आध्यात्मिक-धार्मिक अगत्याच्या बाबी पूर्ण केल्या जातील हे पाहणे अत्यावश्यक असे. त्याच कारणाने काही ज्येष्ठ भिक्षु (स्थविर किंवा महास्थविर) या कामांचे पर्यवेक्षण करण्यासाठी नियुक्त केले जात असत. त्यांना नवकार्मिक[६९४] किंवा उपरक्षितृ[६९५] असे म्हणत. त्यांच्या जोडीला अभिलेखांवरून असेही दिसते की, काही स्त्री नवकार्मिकांचीही नेमणूक भिक्षुणी विहाराच्या विशेष व्यवस्थांकडे लक्ष देण्यासाठी केली जात असे.[६९६] नाशिक येथील प्रारंभिक कोरीव लेखात आढळणारी महासामिन् ही संज्ञा[६९७] काहीशा नंतरच्या काळातील काशिया (जिल्हा गोरखपूर, उत्तरप्रदेश) येथील कोरीव लेखातील महाविहारस्वामिन्[६९८] या संज्ञेसाठी आणि उपरोक्त भट्टिप्रोलु पुरालेखामधील पामुख या संज्ञेसाठी वापरण्यात आली असावी. तिचा अर्थ विशिष्ठ विहाराचा मुख्य प्रभारी अधिकारी असा असावा. त्याच्या हाताखाली विहारस्वामिन् हा काही लेखात निर्दिष्ट असलेला अधिकारी असावा. याहून मोठी शक्यता अशी आहे की, महाविहारस्वामिन् हा मोठ्या (महा) विहाराचा प्रभारी असावा आणि विहारस्वामिन् हा अन्य विहाराचा प्रभारी असावा. पण हा फरक अगदी तर्कसंगत असेलच असे नाही.[६९९] त्यामुळे नाशिक येथे महाविहारस्वामिन्च्या प्रभाराखालील मोठा विहार अस्तित्वात होता असे म्हणता येईल.

भिक्षु व भिक्षुणींना विहारात प्रवेश असे. पावसाळा त्यांना तिथे राहून व्यतीत करता येत असे. कारण पावसाळ्यात भ्रमण करणे अवघड जायचे आणि भ्रमणामुळे सजीवांच्या जिवाला अपाय होण्याचीही शक्यता असायची. कोरीव लेखात वर्षाकालाचे आणि बौद्ध भिक्षुंची या काळात निवासाची व उदरनिर्वाहाची सोय करण्यासंबंधीचे उल्लेख आढळतात. तसेच त्यात लेणी खोदल्याच्या आणि तेथे पावसाळ्यात आश्रयास येणाऱ्या भिक्षुंच्या गरजांच्या पूर्ततेसाठी काही आर्थिक निधी दिल्याच्या नोंदी आहेत. उदाहरणार्थ, नाशिक येथे लेणे क्र. १७ मध्ये एक गुहा दान दिल्याची नोंद असून शंभर कार्षापणांची एक अक्षय नीवि (कायम ठेव) संघाकडे ठेवल्याचीही नोंद आहे. पावसाळा व्यतीत करण्यासाठी येऊन राहणाऱ्या भिक्षुंच्या वस्त्रासाठी (चीवर) त्यातून बारा कार्षापण देण्याची तरतूद होती.[७००] काही कान्हेरी कोरीव लेखात भिक्षुंच्या कपड्यांवरील खर्चासाठी दिलेल्या दानांची नोंद करताना वस्सकाल हा उतुकाल (ऋतुकाल) असल्याचे म्हटले आहे.[७०१] लेणे क्रमांक १८ वरून आपणास समजते की, तेथे पावसाळ्याची सुरुवात आषाढ पोर्णिमेच्या दुसऱ्या दिवसापासून होत असावी.[७०२]

भिक्षु व भिक्षुणी यांनी साधेपणाचे जीवन व्यतीत करावे असा दंडक होता. विहारात राहण्याची पद्धती संघात सुरू झाल्यानंतरसुद्धा सुवर्ण किंवा चांदी यांच्या मुद्रा स्वीकारण्यास त्यांना प्रतिबंध होता. तरीसुद्धा कान्हेरी,[७०३] कुडा,[७०४] कार्ले,[७०५] बेडसा,[७०६] नाशिक,[७०७] आणि जुन्नर[७०८] येथे, त्याचप्रमाणे सांची[७०९] आणि भारहुत[७१०] या ठिकाणी अशी अनेक उदाहरणे मिळतात की, जेथे भिक्षु व भिक्षुणी यांनी गुहा, पाण्याची हौद, स्तूप, विहार किंवा त्यांचे भाग दान केले होते. याची अनेक स्पष्टीकरणे दिली गेली आहेत.[७११] तथापि, याबाबत असे म्हणता येईल की, जरी भिक्षु व भिक्षुणी यांनी स्वतःची मालमत्ता करावी किंवा इतरांकडून मालमत्ता किंवा पैसा स्वीकारावा असे अपेक्षित नसले तरी ते आपल्या आप्तांना व अनुयायांना विशिष्ट कारणासाठी दान देण्यासाठी निश्चितच प्रवृत्त करू शकत होते. कामे करवून घेणाऱ्यांना हा पैसा भिक्षु किंवा भिक्षुणींकडून मिळाल्यामुळे त्यांची नावे दानकर्ते म्हणून नोंदवली गेली. असे आजही अनेकदा घडते. यासंदर्भात हे लक्षणीय आहे की, अशा भिक्षु-भिक्षुणींच्या जोडीने बऱ्याचदा काही आप्तांची आणि इतर सामान्य लोकांचीही नावे नमूद केलेली आढळतात आणि तेच खरे दाते असावेत.

दानाशी सलग्न आणखी एक मुद्दा नाशिक व कान्हेरी येथील कोरीव लेखात आहे तो म्हणजे भिक्षुंच्या वस्त्रासाठी (चिवरिक) दिलेल्या पैशाचा. उषवदात याने तीन हजार कार्षापणांचा कायम निधी विणकरांच्या दोन श्रेणींकडे निरनिराळ्या व्याजदरावर ठेवला होता. त्याच्या व्याजातून प्रत्येकी बारा कार्षापण या दराने त्या गुंफेत रहात असलेल्या वीस भिक्षुंना वस्त्रासाठी पैसे देण्याची तरतूद होती. अशाच प्रकारची आभीर राजा

ईश्वरसेन याच्या राजवटीत भोगवर्धन येथील काही श्रेणींकडे निश्चित व्याजदराने गुंतवणूक करून वस्त्रांवर व आरोग्य सुविधांवर होणाऱ्या खर्चाची व्यवस्था केली होती. कान्हेरी येथे काही रकमा दान दिल्या होत्या आणि त्यातून दरमाणशी दहा किंवा सोळा कार्षापण या दराने तंतुकालात किंवा पावसाळी वास्तव्यासाठी राहायला येणाऱ्या भिक्षुंच्या वस्त्रखर्चाची सोय केली होती.[७१२] प्रस्तुत लेखकास असे वाटते की, अशा प्रकरणी प्रत्यक्ष रोकड रक्कम देण्याऐवजी त्या किंमतीची वस्त्रे दिली जात असावीत.

संघात भिक्षुणींचाही अंतर्भाव असायचा. संदर्भसाधनामध्ये त्यांचे अनेक निर्देश आले आहेत. (भिक्षु) भिक्खूंप्रमाणेच भिक्षुणींचे सुद्धा थेरी[७१३] आणि भदन्ती[७१४] असे सन्मानोल्लेख होत असावेत. दखखन भागातील कोरीव लेखात तसा स्पष्ट उल्लेख आढळत नसला तरी त्यांच्यासाठी 'आर्य' हे संबोधनही प्रचारात असले पाहिजे. बोधगया येथील किमान पंधरा कोरीव लेखांत कुरंगीचा तसा उल्लेख आलेला आहे.[७१५] भिक्खुणीचे उल्लेख अनेक असले तरी केवळ एक भिक्षुणीविहार (भिक्खुणी उपसय) धर्मोत्तरीयाचा आणि दुसरा भिक्षुणीविहार शिवपालितानिकांचा असल्याची माहिती जुन्नरच्या कोरीव लेखात मिळते.[७१६] दख़्खन भागात जेथे भिक्खुणींचे वारंवार उल्लेख येतात अशा महत्त्वाच्या बौद्ध केंद्रात अनेक भिक्षुणी विहारनिश्चितच अस्तित्वात असले पाहिजेत. भिक्षुणी काही श्रमणांच्या शिष्या असल्याचे जसे अनेक उल्लेख आहेत तसेच काही भिक्षुणी स्वतः आचार्य असल्याचेही उल्लेख आहेत. एखादा भिक्षु हा भिक्षुणीचा शिष्य असल्याचे उदाहरण उपलब्ध नाही. भिक्खुणींना संघात प्रवेश देण्यासंबंधी बुद्ध प्रथम फार अनुकूल नव्हता. भिक्षुंचे व भिक्षुणींचे जे एकूण संदर्भ प्राप्त झाले आहेत त्यांचे संख्याशास्त्रीय विश्लेषण केल्यास भिक्षुणींचे उल्लेख भिक्षुंच्या तुलनेत खूपच कमी आलेल आहेत.

मुळात बुद्धाच्या संकल्पनेतील संघ हा चार घटकांचा मिळून झालेला होता. त्यात जे भिक्खू झाले आहेत आणि पुढे होणार आहेत (आगत-अनागत-चातुदिस-भिक्खू-संघ) त्यांचाही समावेश होता. अशा संघाला विहारांचे दान राजगृह येथील सेट्ठींनी व अनाथपिंडकने दिले होते. बुद्धाचा असा कटाक्ष असण्याचे कारण कदाचित स्थानिक व व्यक्तिगत मतभेद बळावून संघ फुटण्याची त्याला भीती वाटली असावी. आश्चर्य म्हणजे हे वर्णन देवानामप्रिय तिस्साचा पुत्र गामिनी तिस्स याच्या दंबुल विहार कोरीव लेखात आले आहे. संघाला एक मोठे लेणे दान दिल्याची नोंद त्यात आहे. त्यातील सुरुवातीचे आगत-अनागत हे शब्द वगळून त्या वर्णनाचा वारंवार प्रयोग भारतीय कोरीव लेखांतही झालेला आढळतो. त्यामुळे नाशिक,[७१७] कार्ले,[७१८] आणि कान्हेरी[७१९] येथे चार दिशीय (चतुर्दिश भिक्षु संघ) संघाला गुहांचे दान केल्याच्या अनेक नोंदी सापडल्या आहेत, पण कधी कधी हे काही वस्त्या किंवा विहार[७२०] किंवा पंथ[७२१] यांच्यापुरते सीमित असल्याचे दिसते. म्हणजे विशिष्ट गुहेत[७२२] किंवा विहारात रहाणाऱ्या भिक्षुंना विशिष्ट पंथाची खास मालमत्ता[७२३] म्हणून चार दिशीय संघाला दान दिलेले असते. एका बाजुस वस्तीचे किंवा पंथाचे बंधन आणि त्यावेळी वैश्वीकरणाचा आग्रह यांचा परस्परांशी मेळ बसणे कठीण होते. परंतु मुळात पावसाळी

निवासस्थाने म्हणून असलेले विहार भिक्षु/भिक्षुणींची जवळपास कायम वास्तव्यस्थाने झाली होती आणि विशिष्ट पंथाची किंवा स्थानिक भिक्षु/भिक्षुणींची ही मालमत्ता मानली जाऊ लागली होती. या विचित्र वस्तुस्थितीचे स्पष्टीकरण करण्याचे अनेक प्रयत्न झाले आहेत. पण सर्वसाधारणपणे (१) जेथे आदात्यांची विशिष्ट वस्ती किंवा पंथ स्पष्ट उल्लेखिलेला नाही आणि संघाला चातुदिस असे विशेषण लावलेले आहे तेथे दानकर्ता कोणत्याही विशिष्ट वस्तीचा/पंथाचा पक्षपाती नव्हता आणि त्याला चार दिशीय संघाच्या बाजूनेच अनुग्रह अभिप्रेत होता. (२) जेथे चातुर्दिस या विशेषणाच्या जोडीलाच विशिष्ट पंथ किंवा वस्ती उल्लेखिलेली असेल तेथे दानकर्त्यांचा कल त्यांच्यापैकी एकाच्या बाजूने असल्याचे स्पष्ट सूचित होते. चातुदिस या विशेषणाचा वापर केवळ रुढी म्हणून किंवा शुभचिंतन म्हणूनच केलेला असतो. (३) जेथे पंथ आणि वस्ती या दोहोंचा स्पष्ट निर्देश असतो तेथे दात्याला विशिष्ट पंथाच्या वस्तीच्या संघालाच दानधर्म करायचा असतो, चार दिशीय संघाला नव्हे. अशाप्रकारे चातुदिस हा शब्द दात्याच्या मनोरचनेचा निदर्शक आहे.

## जन संप्रदाय

वरीलप्रमाणेच असंख्य जनदेतांचीही उपासना व आराधना केली जात असे. सर्वच धार्मिक प्रवाहांच्या घटकांमध्ये या देवतांचे प्रस्थ होते. यक्ष आणि नाग या संप्रदायांची लोकप्रियता सर्वच धर्मांच्या अनुयायांमध्ये आढळणाऱ्या व्यक्तिनामांवरून स्पष्ट जाणवते. काही पंथात तर यक्ष व नाग यांचे सर्वसाधारण उल्लेखही आढळतात. काहींच्या मते गौतमी सातकर्णि याच्या कारकिर्दीच्या अठराव्या वर्षीच्या नाशिक कोरीव लेखात जो 'अजकलाकीय' असा शब्दप्रयोग आला आहे[७२४] ते दान दिलेल्या क्षेत्राचे 'अजकालक' या यक्षाच्या नावावरून पडलेले स्थलनाम आहे.[७२५] त्या राजाचा पुत्र व वारसदार वासिष्ठीपुत्र पुळुमावि याच्या कारकिर्दीच्या १९ व्या व २२ व्या वर्षीच्या नाशिक कोरीव लेखात एका खेड्याचे 'सुदिसणा' (सुदर्शना) असे नाव आढळते.[७२६] ते त्याच नावाच्या यक्षिणीवरून पडले असावे. त्याच राजाने त्याच ठिकाणी त्याच्या राजवटीच्या १९ व्या वर्षी दिलेल्या कोरीव लेखात पवन, गरुड, सिद्ध, राक्षस, विद्याधर, भुत्ते, गंधर्व, चारण, चंद्र, सूर्य, तारापुंज व ग्रह इत्यादींच्या जोडीने यक्षांनीही गर्दी केल्याची नोंद आढळते.[७२७] सातवाहनांचा नाग संप्रदायाशी खास संबंध असावा हे त्याच्या उत्पत्तिविषयक पुराणकथांवरून स्पष्ट होते. या राजघराण्याच्या तिसऱ्या वंशजाची, सातकर्णीची राणी ही बहुधा नाग जमातीतील असून तिचे नागनिका असे नाव होते. यावरून असे दिसते की, प्राचीन काही पक्षी आणि नाग तसेच इतरही काही देव संवर्गही जनादरास पात्र ठरले होते आणि त्यांची पूजा-अर्चाही होत असे.

आणखी एक जनसंप्रदाय मातृदेवतेभोवती साकार झालेला होता. मातृदेवतेच्या दगडाच्या व मातीच्या प्रमिता फार मोठ्या संख्येत बहुतेक सर्वच प्राचीन महत्त्वाच्या ठिकाणी सापडल्या आहेत. त्या सातवाहन आणि वाकाटक काळातील व नंतरच्याही काळातील आहेत. या आकृती सामान्यतः स्त्री शरीराच्या असून जननेंद्रिये व वक्षाचा

भाग विशेप उठावदार केलेला आढळतो. अपवादात्मक पाय आणि डोळे ठळकपणे घडविलेल्या काही प्रतिमाही आढळल्या आहेत. सामान्यतः त्या लज्जा या नावाने ओळखल्या जातात वहुधा शिवाशी त्यांचा संबंध जोडला जातो. जनपदधर्मातील देवतांना वैदिक-पौराणिक धर्माच्या चौकटीत सामावून घेण्याच्या जाणीवपूर्वक केलेल्या प्रयत्नांचे ते फलीत होते. आताचे माहूरझरी खेडे हे मातृदेवतेच्या संप्रदायाचे महत्त्वाचे केंद्र होते. हे त्या गावच्या नावातील पहिल्या पदावरून स्पष्ट होते. माहूर हा आधुनिक शब्द मातृपुर या शब्दाचे बदललेले रूप आहे. वाकाटकांच्या काळात ते यात्रेचे स्थान होते. दुसरा पृथिवीषेण हा वाकाटक राजा तेथे यात्रेसाठी आला होता आणि त्याने आपल्या नावावरून पृथिवीपूर असे त्या स्थानाचे नामांतर केले. नांदेड जिल्ह्यातील माहूर हेही त्याच पंथाचे महत्त्वाचे केंद्र असावे. आज तेथे रेणूकादेवीची मातृदेवता म्हणून उपासना केली जाते.

वाकाटक–गुप्त अमदानीत गंगा व यमुना या नदींची देवता म्हणून लोकांकडून पूजा होत असे. त्यांच्या सुंदर स्थानक प्रतिमा प्रवेशद्वारांच्या बाजूला बांधीव व कोरीव अशा दोन्ही प्रकारच्या मंदिरांमधून दिसतात. अजिंठा येथे तर बौद्ध चैत्यगृहांमध्येही अशा प्रतिमा आढळतात. पवनार येथे गंगेची एक अप्रतिम मूर्ती सापडली असून तिच्या घडणीतील सूक्ष्म व मोहक रेषांमधून कलावंताची त्या शिल्पप्रकाराबद्दलची आस्थाच व्यक्त होते. "गंगा भगवती" असा वाकाटक कालीन पेटिकाशीर्ष ब्राह्मी अक्षरातील नामवाचक लेख त्या मूर्तीवर आहे. मुळात ती मूर्ती नक्कीच एखाद्या मंदिराचे प्रवेशद्वार शोभिवंत करीत असावी.

---

## तळटिपा

१ अगस्त्य ऋषी व त्यांची पत्नी लोपामुद्रा यांनी काही ऋचा रचल्या अशी परंपरा आहे. ऋग्वेदात आणि इतर संहितांमध्ये लोपामुद्रेचा उल्लेख आढळतो.. परंपरेनुसार ती विदर्भ राजकन्या होती असे मानले जाते.

२ छोटेखानी उत्खनने श्री. मो. ग. दीक्षित यांनी केली. त्यांच्या अहवालासाठी पहा : मो. ग. दीक्षित, "**कौंडिण्यपूर**", महाराष्ट्र शासन, मुंबई, १९६८.

३ भोज या शब्दाने सुरू होणारी भूभागांची नावे (उदाहरणार्थ भोजकट) वाकाटक अभिलेखात आढळतात. काही आदात्यांच्या संदर्भातही तसेच आढळते. **सी. आय. आय.**, ५, सूची, पृ. १३२.

४ सरकार, डी. सी., "**सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स बेअरिंग ऑन इंडियन हिस्टरी ॲन्ड सिविलायझेशन**"–१, २ री आवृत्ती, १९६५, कलकत्ता, पृ. ३६. पितनिकांचा उल्लेख रथिकांच्या सोबत शिलालेख पाचमध्ये आढळतो. कित्ता, पृ. २२.

५ **अष्टाध्यायी**, ४.१.१७३; व्ही. एस. अग्रवाल, "**इंडिया ॲज नोन टु पाणिनी**", १९६३, पृ. ३९, ६३, ४२७. मात्र अग्रवाल त्याची राजधानी प्रतिष्ठान होती असे चुकीचे म्हणतात. कारण पाली पुराव्यांवरून हे समजते की, प्रत्यक्षात ते स्थान अलक किंवा मूलक येथे आहे.

६ उपाध्याय, भरत सिंह, **बुद्धकालीन भारतीय भूगोल** (हिंदी), पृ. ३२-३३, १५९, ४४७, पाली परंपरेत अस्सकाच्या उत्तरेस असलेल्या जनपदाचे नाव अलक असे दिलेले आहे. म्यानमार (ब्रह्मदेशी) परंपरेनुसार ते मूलक असे दुरूस्त करण्यात आले आहे.

७ ब्यूल्हेर, जी. (संपा.), **सॅक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट, खंड-२**, बॉम्बे संस्कृत सिरीज १८९२, (इंग्रजी भाषांतर–जी. बुल्हेर).

८ मिराशी, व्ही. व्ही., **एच. आय. एस. डब्लू. के.**, पृ. १५०, तळटीप १. प्रस्तुत लेखकाचे भाषांतर त्यांच्याहून काहीसे भिन्न आहे.

९ **एच. डी. एस.**, खंड १, पृ. ४४-४५.

१० **एस. बी. इ.**, खंड २, पृ. ४३.

११ **हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर**, खंड ३ (इंग्रजी भाषांतरकार- श्रीमती केतकर, कलकत्ता विद्यापीठ), पृ. ३३९.

१२ इंग्रजी भाषांतरासह मूळ संहितेसाठी पहा–बसाक, आर. जी., दि **एशियाटिक सोसायटी अंडर बिब्लिओथेका इंडिका**, कलकत्ता, १९७१; मराठी भाषांतरासाठी पहा–जोगळेकर, अ. स. (संपा.), **गाथासप्तशती**, १९५६, पुणे.

१३ मिराशी, व्ही. व्ही., **स्टडीज इन इंडॉलॉजी**, खंड १, दुसरी आवृत्ती, विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर, १९६८, पृ. ८८-१०१. यांनी संहितेचा मूळ काळ व त्यात पडलेली भर याची विस्ताराने चर्चा केली आहे.

१४ पण आता या वाकाटक शाखेचे एक नव्हे तर दोन राजे आपल्याला ठाऊक झाल्यामुळे त्या दोहोंपैकी ज्याने ही कविता रचली तो सर्वसेन कोण याचा निर्णय करणे अवघड होऊन बसले आहे.

१५ प्रस्तुत पुराव्याचे शंकास्पद स्वरूप पाहता याच ग्रंथातील वाकाटक प्रकरणात दाखविल्याप्रमाणे हे अगदीच अनिश्चित वाटते.

१६ मिराशी, व्ही. व्ही., 'इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि वाकाटकाज", **सी. आय. आय.**, ५, पृ. ५४-५६.

१७ कित्ता, पृ. ५६-५७.

१८ **पेरिप्लस मारिस इरिथ्रंएइ**, इंग्रजी भाषांतर व टीपा, डब्ल्यू. एच. शॉफ, लंडन, १९१२; **सी. ए. आय.**

१९ कोरीव लेखासाठी पहा : **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ५-१६. मिराशी वा. वि. यांनीच हा अभिलेख वेदिश्रीचा असल्याचे सर्वप्रथम दाखवून दिले असताना त्यांनीच त्याचे वर्णन "नागनिकांचा" असे करणे विचित्र वाटते.

२० **चातुवेज्जा = चातुर्विद्या**. देवसेनाचा बीदर (हैद्राबाद) ताम्रपट. **ए. व्ही.**, पृ. २४९; चतुर्वेद व दुसऱ्या प्रवरसेनाच्या मासोद दानपत्रासाठी पहा : अजयमित्र शास्त्री व चंद्रशेखर गुप्त, "मासोदा कॉपर प्लेट चार्टर ऑफ प्रवरसेन सेकंड", **जे. इ. एस. आय.**, १०, पृ. ११३.

२१ दुसऱ्या प्रवरसेनाचा तिरोडी ताम्रपट, **सी. आय. आय.**, ५, ५०. १.१८. आदात्याचे विरूद त्रिवेदी असे असले तरी त्याचा स्वतःचा वेद अथर्ववेद होता.

२२ दुसऱ्या प्रवरसेनाचा वडगाव ताम्रपट, कित्ता, पृ. ५५, ११. २१-२२. जरी आदात्याने वेदांवर प्रभुत्व मिळविले असले तरी प्रत्यक्षात तो यजुर्वेदाच्या वाजसनेय शाखेचा होता.

२३ चातुर्विद्य-आग्रहार-मर्यादा : ही नेहमीची शब्द रचना असते.

२४ मिराशी, वा. वि., **वाकाटक नृपति व त्यांचा काळ**. या ग्रंथात संपादित दानपत्र ताम्रपट पुढीलप्रमाणे-जांब, पृ. १२; बेलोरा संच अ आणि ब, पृ. १९; सिवनी, पृ. ३०; ऋद्धपूर, पृ. ३६; पाटणा वस्तुसंग्रहालय, पृ. ७१; मांढळ, पृ. ७४; यवतमाळ, पृ. ३४ व मांढळ, पृ. १६७. या आठ दानपत्रांपैकी शेवटचे वगळता इतर सर्व दुसऱ्या प्रवरसेनाची असून शेवटचे दानपत्र त्याचा नातू दुसरा पृथिवीषेण याचे आहे.

४६८ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. १३. १०,००० नंतरचे काही अंक अस्पष्ट असल्यामुळे निश्चित आकडा किती हे समजू शकत नाही. तो १०,००० पेक्षा मोठा होता एवढेच कळते.

४६९ कित्ता, पृ. १७३. पी. व्ही. काणे यांचे मत येथे ग्राह्य मानले आहे. **एच. डी. एस.**, ३, पृ. १२०-२६.

४७० शास्त्री, अजय मित्र, "सातवाहन सिल्व्हर कॉइनेज", **एस. एस. आय. सी.**, १, पृ. ४६-४७.

४७१ आतापर्यंत दोनच चांदीची नाणी उपलब्ध आहेत. त्यापैकी एक पी. जे. चिन्मुलगुंद यांनी ("ए युनिक सिल्व्हर कॉइन ऑफ सातकर्णी ॲण्ड नागनिका", **जे. एन. एस. आय.**, ३७, भाग १, पृ. ६-११), तर दुसरे शोभना गोखले यांनी प्रकाशित केले आहे.

४७२ त्याने नहपानाच्या चांदीच्या नाण्यांवर स्वतःची चिन्हे व लेख पुनरांकित केले. अशी नाणी काही काळ त्याची स्वतंत्र रौप्य नाणी मानली गेली. प्रस्तुत लेखकानेही तसेच मानले (**एस. एस. आय. सी.**, १, पृ. ४७-४८). मात्र आता हे सर्व समज चुकीचे ठरले आहेत. अंजनेरीच्या इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ रिसर्च इन न्युमिस्मॅटिक स्टडीजचे अमितेश्वर झा यांनी हे लक्षात आणून दिले.

४७३ सर्वसाधारण चिकित्सक इतिवृत्तासाठी पहा–**एस. एस. आय. सी.**, १, पृ. ४८-६०. या नाण्याच्या प्रकाशन संदर्भासाठी पहा : अजय मित्र शास्त्री, "ए न्यू व्हरायटी ऑफ स्कंद सातकर्णीज सिल्व्हर कॉइन्स", **एन. एस.**, १, पृ. ५६, संदर्भ क्र. १-१०.

४७४ शास्त्री, अजय मित्र, "इम्पॅक्ट ऑफ वेस्टर्न क्षत्रप कॉइनेज ऑन अर्ली इंडियन इंडिजीनस कॉइन्स", **फॉरेन एलेमेन्टस इन इंडियन इंडिजीनस कॉइन्स**, मेमॉयर्स सिरीज, क्र ६, न्युमिस्मॅटिक सोसायटी ऑफ इंडिया, वाराणसी, १९८३, पृ. ३५-३६.

४७५ नहपानाचा जावई ऋषभदत्त याने ३००० कार्षापण नाशिकच्या दोन विणकरांच्या श्रेणींमध्ये गुंतवले होते आणि ७०,००० कार्षापणाचे दान दिले होते (**एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ९८-९९). शिवाय ४००० कार्षापणांना जमीनही विकत घेतली होती (कित्ता, पृ. ११२).

४७६ काही नाणी मात्र ३९.३ ग्रेन्स इतकी वजनदार आहेत. **बी. एम. सी., ए. डब्ल्यू. के.**, पृ. ६६, क्र. २४६. ए. एन. लाहिरी यांनी असे सुचवले आहे की, युक्रेटिडीस प्रथम मेगॅस याने प्रथम सुरू केलेले २० रत्तीचे मानक पाश्चात्य सत्रपांनी (सुभेदार) स्वीकारले. **जे. ए. आय. एच.**, १, पृ. ६०-६१.

४७७ आळतेकर (**एम. एस. जी. एच.**, १, पृ. १८२) असे नोंदवतात की, ऋषभदत्ताच्या नाशिक कोरीव लेखात त्याच्या नाशिक येथील दोन श्रेणींकडे गुंतवणूक करण्याच्या संदर्भात उल्लेखिलेल्या कार्षापणाचे वजन ५० ग्रेन्स होते. म्हणजे ते चार आण्याच्या रौप्य नाण्यांपेक्षा जड होते. पण याच ग्रंथात अन्यत्र ते त्याला नहपानाचे रौप्य नाणे मानतात. कित्ता, पृ. १८१.

४७८ नहपानाच्या सुमारे १३,२५० चांदीच्या नाण्यांचा साठा जोगलथेंबी खेड्याच्या जवळ १९०६ मध्ये सापडला. कदाचित त्यात यापेक्षा अधिक नाणी असतील. कारण साठा बराच आधी सापडला होता. त्यामुळे काही नाणी आधीच विकली/वितळली गेली असण्याची शक्यता आहे. रेव्ह. एच. आर. स्कॉट, "दि नाशिक (जोगलथेंबी) होर्ड ऑफ नहपानाज कॉईन्स", **जे. बी. बी. आर. ए. एस.**, २२, १९०७, पृ. २२५-४४. इतर काही फुटकळ नाणी व साठेही त्यानंतरच्या काळात सापडले आहेत.

४७९ नहपानाच्या कारकिर्दीतील कोरीव लेखांत त्यांचा उल्लेख आहे.

४८० ते नहपानाचीच वजन प्रमाणके अनुसरतात. पहा : आभीर ईश्वरसेनाचा नाशिक कोरीव लेख, **इ. आय.**, ८, पृ. ८८. काही श्रेणींकडे कार्षापणांच्या स्वरूपात कायम स्वरूपात ठेवलेल्या ठेवींचा यात उल्लेख आहे.

४८१ अग्रवाल, व्ही. एस., "कॉईन नेम्स् इन दि अंगविज्जा", **जे. एन. एस. आय.**, १९, भाग-१, १९५७, पृ. २४-२५.

४८२ चॅटर्जी, सी. डी., **बुध्दिस्टीक स्टडीज**, ४ (संपा. बी. सी. लॉ), कलकत्ता व सिमला, १९३१, पृ. ३८९-९५, ४१९-३७: डी. सी. सरकार, **स्टडीज् इन इंडियन कॉइन्स**, दिल्ली, पृ. ९७.

४८३ रूद्रदामेन उप्पादितो रूद्रदामको, सो किल नी-कहापणस्स तिभागं अग्घेति, **बुध्दिस्टीक स्टडीज**, पृ. ३८३.

४८४ कार्षापण-सहस्त्राणि सतारि ७०००० पंचत्रिशक सुवर्ण कृत दिन सुवर्ण-सहस्त्रेणं मूल्यम, **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ९९.

४८५ रॅप्सन, ई. जे., **बी. एम. सी.**, **ए. डब्ल्यू. के.**, पृ. ५८,१८५; डी. सी. सरकार, **एस. आय.**, खंड १, पृ. १६३, तळटीप ५, पृ. १६२, तळटीप १. येथे त्यांनी ते रॅप्सनचे मत आहे असा उल्लेख केला आहे. ए. एस. अळतेकर, **एम. एस. जी. एच.**, १, पृ. १८१; व्ही. व्ही. मिराशी, **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. १७४. इतर अनेक विद्वानांनी या सिद्धान्ताला प्रथमदर्शनी मान्यता दिली आहे.

४८६ या ग्रंथातील "पश्चिमी क्षत्रप" या प्रकरणात या विषयी चर्चा केली आहे.

४८७ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ९८-९९.

४८८ **कार्मिकेल लेक्चर्स ऑन एन्शंट इंडियन न्युमिस्मॅटिक्स**, कलकत्ता विद्यापीठ, १९२१, पृ. १९९.

४८९ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. १७१-७६.

४९० शास्त्री, अजय मित्र, **मंजुषा**, पृ. १३२., वायव्य भारताच्या नैर्ऋत्य टोकाचा भाग (गुजरात) आणि दख्खन भागात मिळालेल्या नाण्यांचे सविस्तर सर्वेक्षण केल्यानंतर एस. सी. रे हे सुध्दा कुशाण नाणी अस्तित्वात नसल्याच्याच निष्कर्षावर येतात. पहा : **कॉइन्स ॲण्ड कल्चर**, अंकोर पब्लिशर्स, नवी दिल्ली, १९९४, पृ. ४४ व १९२.

४९१ शास्त्री, अजय मित्र, "रोमन कॉन्टॅक्टस ॲण्ड अर्ली करन्सी सिस्टीम ऑफ दि डेक्कन", **मंजुषा**, पृ. १३०-३७; "इंपेरियल रोमन कॉइन्स इन अर्ली डेक्कनीज इन्स्क्रिप्शन्स", **एस. एस. आय. सी.**, २, पृ. ७७-८७; "अर्ली तमिळ इकॉनॉमी ॲण्ड करन्सी सिस्टीम", **एन. एस.**, २, पृ. १२३-३८; "रोमन कॉइन्स इन इंडिया : सम रिफ्लेक्शन्स", भारतात आढळणारी परदेशी नाणी या विषयावर अंजनेरी (नाशिक) येथील इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ रिसर्च इन न्युमिस्मॅटिक स्टडीजमध्ये ८-१० जानेवारी १९९५ रोजी भरलेल्या चौथ्या आंतरराष्ट्रीय परिषदेत वाचलेला निबंध.

४९२ **सी. ए. आय.**, पृ. ३०४.

४९३ कित्ता, पृ. ३०५.

४९४ कित्ता, पृ. ३०३.

४९५ जॉन, एस. डेयेल, "इंडो-ग्रीक ॲण्ड क्षहरात कॉइन्स फ्रॉम गुजरात सी कोस्ट", **एन. डी.**, १०, १९८६, पृ. १६-३५.

४९६ मिराशी, व्ही. व्ही., **स्टडीज इन इंडॉलॉजी**, ३, नागपूर विद्यापीठ, १९६२, पृ. ९५-९६; ४, वाराणसी, १९६६, पृ. २२३-२२४. तोच निष्कर्ष विदर्भात अलीकडे सापडलेल्या त्रैकूटक नाण्यांविषयीही काढला आहे आणि त्यावरून विदर्भाचा काही भाग त्रैकूटकांच्या ताब्यात असावा असा निर्वाळा दिला आहे. **लिटररी ॲण्ड हिस्टॉरिकल स्टडीज इन इंडॉलॉजी**, दिल्ली, १९७५, पृ. १८०-८५.

४९७ एकाच नावाचे दोन राजे एक-दोन पिढ्यांच्या अंतराने होऊन गेल्यामुळे या नाण्यांचा प्रसारकर्ता नेमका कोण हे सांगणे कठीण आहे. पण त्यापैकी दुसऱ्यानेच हे केले असावे असे वाटते. तसे वाटण्याची कारणे येथे देण्याची गरज नाही.

४९८ शास्त्री, अजय मित्र, "वाकाटक कॉइन्स", **ए. व्ही.**, पृ. २८५-९४.

४९९ डॉ. अमरेन्द्र नाथ यांनी या नाण्यासंबंधीचा निबंध भारतीय नाणकशास्त्र संस्थेच्या कोचिन अधिवेशनात (३१ ऑगस्ट ते ४ सप्टेंबर, १९९५) सादर केला.

५०० वाशीम उत्खननविषयीच्या नोंदीच्या आधारे.

५०१ **सी. आय. आय.**, ५, पृ. ३८.

५०२ या कोरीव लेखाच्या सारांशासाठी पहा : अजय मित्र शास्त्री, "न्यू वाकाटक इन्स्क्रिप्शन्स", **ए. व्ही.**, पृ. २५३-५७.

५०३ हे नाव (कुशाण काळाच्या २८ व्या वर्षीच्या) मथुरा कोरीव लेखात येते. कुशाण राजा हुविष्क याचा ही कोरीव लेख व मनुस्मृति हे दोन्ही इ. स. च्या दुसऱ्या शतकातील आहेत.

५०४ बुध्दघोष **सामंत पासादिका** मध्ये, ज्यावर कालक्रमात निळा गंज चढला अशा चांदीच्या आहतमुद्रा नाण्याचा नील-काहापण असा उल्लेख करतो. सी. डी. चॅटर्जी., "सम न्यू न्युमिस्मॅटिक टर्मस् इन पाली टेक्स्टस्", **जे. यू. पी. एच. एस.**, ६, १९३३, पृ. १५६.

५०५ शास्त्री, अजय मित्र, अध्यक्षीय भाषण, **पी. आय. एच. सी.**, २, १९७८, पृ. ९६८-६९.

५०६ गुप्ता, पी. एल., "फेब्रिकेशन ऑफ एन्शंट इंडियन पंच-मार्क्ड कॉइन्स," **इंडियन न्युमिस्मॅटिक क्रॉनिकल,** खंड ३, पृ. १३३.

५०७ "कॉइन डेटा इन दि दिव्यावदान," कित्ता, पृ. १४८-५०.

५०८ सातवाहनांची अनेक व्यक्तिचित्रधारी नाणी विदर्भात अलीकडे सापडली.

५०९ आंध्रप्रदेशातील पेदलूरपालेम, महाराष्ट्रात पुण्याजवळचे रांजणगाव आणि कर्नाटकातील काही वस्त्या येथे क्षत्रप नाणी सापडली आहेत. काही ठिकाणी ती नाणी पाडण्याचे साचेही आढळले आहेत. यावरून त्यांची लोकप्रियता व मागणी लक्षात येते.

५१० मिराशी, व्ही. व्ही., **लिटररी ॲण्ड हिस्टॉरीकल स्टडीज इन इंडॉलॉजी,** पृ. १८०; **एन. डी.**, ३ (१), पृ. ७-९.

५११ सध्या फक्त अखेरची "रिक", ही दोनच अक्षरे शाबूत आहेत, आधीची अक्षरे पुराशास्त्रज्ञांनी अंदाजाने ठरविली आहेत.

५१२ या कोरीव लेखात दुसऱ्या अश्वमेधाचा संदर्भ आहे. त्यामुळे आणखीही काही अश्वमेध साजरे झाले असल्याची शक्यता नाकारता येत नाही.

५१३ जतन केलेल्या भागाचा दोनदा (ओळ क्र. १४ व १५) उल्लेख आहे, पण त्याने तो पुन्हा तिसऱ्यांदा केलाच नसेल असे खात्रीने म्हणता येणार नाही.

५१४ गवामयन प्रमाणेच अंगिरसामयन याचाही उल्लेख दोनदा असा (ओळ १५ व १७) आहे. त्यावरून एवढाच निष्कर्ष निघतो की, या नावाचे दोन यज्ञ केले गेले होते आणि किमान दोन अंगिरसातिरात्र साजरे झाले असावेत असा अंदाज अभिलेखाच्या शाबूत भागातील त्याच्या दोन संदर्भावरून (ओळ १५ व १६) काढता येतो.

५१५ संहितेसाठी पहा : **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ११-१५.

५१६ त्यांचे जे वर्णन गवामयनांच्या संदर्भात आले त्यावरून प्रत्येक यज्ञासाठी ठराविक दक्षिणा होती असा निष्कर्ष सहज काढता येतो. प्रत्येक यज्ञाच्या वेळी दिल्या गेलेल्या देणग्यांची इतकी काळजीपूर्वक यादी देणाऱ्या प्रारंभिक अभिलेखातील हाच एकमेव दाखला आहे हे येथे नमूद करायला हवे.

५१७ **सी. आय. आय.**, ५, पृ. १२. या राजघराण्यांच्या दोन्ही ज्ञात शाखांच्या जवळपास सर्वच दानपत्रात त्या पुनरुक्त झाल्या आहेत.

५१८ कित्ता, पृ. १२. वाकाटकांच्या बहुतेक ताम्रपटांवर त्या पुनरुक्त झाल्या आहेत. भारशिवांचा असा एकही अभिलेख अजून प्रकाशात आलेला नाही. बहुधा वाराणसीचा दशाश्वमेध घाट या यज्ञांची स्मृती देतो.

५१९ पुणे व ऋध्दपूर येथील वाकाटक राणी प्रभावतीगुप्ताचे ताम्रपट त्याला अनेक (एकाहून जास्त) अश्वमेधांचे श्रेय देतात.

५२० त्याच्या अश्वमेध प्रकारच्या नाण्यांमुळे या विधानाला पुष्टी मिळते. या नाण्यांचे त्यांच्या आख्यायिकांनुसार दोन गट पडतात. एकातील नाण्यांवर विजित्य, तर दुसऱ्यातील नाण्यावर अवित्व असा शब्द आहे.

५२१ या कुटुंबाला अश्वमेधयाजिन म्हटले जाते. **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. १६२. बहुधा मुंडाने तो साजरा केला असावा. त्याच्यावरूनच राजघराण्याचे नाव पडले आहे. त्याने केलेल्या यज्ञांमुळे "वासव देव प्रसन्न होऊन त्याने संपत्तीचा वर्षाव केला" असे त्याचे वर्णन केलेले आहे. असे अन्य कोणाचेही वर्णन आढळत नाही. कित्ता, पृ. १६३, चरण ३.

५२२ **इ. आय.**, २०, पृ. ४, १८ (संहितांसाठी).

५२३ इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि कलचुरी-चेदी इरा, **सी. आय. आय.**, ४, पृ. २४, (दऱ्हसेनाचा पार्डी ताम्रपट, वर्ष २०७).

५२४ **इ. आय.**, ९, पृ. ५८ (विजय-देववर्मनचा एलूर ताम्रपट, वर्ष १३).

५२५ मजूमदार, आर. सी. ॲण्ड ए. डी. पुसाळकर, (संपा.), **हिस्टरी ॲण्ड कल्चर ऑफ दि इंडियन पिपल,** खंड ३, दि क्लासिकल एज, मुंबई, १९५४ पृ. २७३.

५२६ शंकरनारायन, एस., **दि विष्णुकुण्डिनस् ॲण्ड देअर टाइम्स,** पृ. १५९ (दुसऱ्या माधववर्मनचा इपूर ताम्रपट (संच-१) वर्ष ३७). त्याने एक हजार अग्निष्टोम केले होते आणि अकरा अश्वमेध करून जगातील पाप नष्ट केले होते असे म्हणतात. या संदर्भात हे नमूद करायला हवे की, त्याचे वाकाटांशी वैवाहिक संबंध होते. त्याने वाकाटक राजकन्येशी विवाह केला होता. तिच्यापासून त्याला झालेला पुत्र पहिला विक्रमेन्द्रवर्मन हाच त्याचा वारसदार होता.

५२७ महालिंगम्. टी. व्ही., "**इन्स्क्रिप्शन्स ऑफ दि पल्लवाज**", आगम कला प्रकाशन दिल्ली, १९८८, पृ. ३३, ३९, ४०, ४४, ८०, २०३, २३६.

५२८ याच प्रकरणातील समाजजीवनासंबंधी ब्राह्मणांचे वर्णन पहावे. पण वाकाटकोत्तर काळात आपल्याला नंदिसोम नामक ब्राह्मणाचे एक वेगळेच उदाहरण आढळते. राजा मुंडाचा तो पूर्वज होता. ब्रह्माला त्याने वेदविद्येत मागे टाकले होते. ब्रह्माने आपल्या चार मुखांतून चार वेदांवर प्रभुत्व मिळवले होते, तर त्याने एकाच मुखातून हे साध्य केले होते आणि त्याला त्याचे मुळीच आश्चर्य वाटत नव्हते. **जे. इ. एस. आय.**, ४, पृ. ३७, चरण १.

५२९ अशी अनेक नावे आहेत की, ज्यांचा पुराणात झालेल्या प्रक्षिप्त संहिताच्या नोंदीमुळे निश्चित अर्थ सांगणे दुरापास्त होऊन बसते.

५३० पुराणात शिवस्कंध असे रूप आढळते. त्यातील "ध" हे महाप्रणोच्चारण हस्तलिखित नकलणाऱ्याने केले असावे. नाण्यांवर मात्र ती प्रसारात आणणाऱ्याचे स्कंद असेच नाव आहे. शिव हे उपपद येथे केवळ सन्मानार्थी असावे.

५३१ अनेक राजांनी हे धारण केलेले दिसते. पुराणात काही जागी ते पुलोमा असे येते. त्यामुळे पुराणकारांना हे विशुद्ध तेलगू नाव समजले नसावे हे उघडच आहे.

५३२ शर्मा, एम. जे., "वासन इन्स्क्रिप्शन्स ऑफ वासिष्ठीपुत्र सिरि पुळुमावि", **इ. आय.**, ४१, पृ. १५४-५८; संहिता, पृ. १५८.

५३३ त्याचा देवटेक कोरीवलेख, **सी. आय. आय.**, ५, पृ. ४. पण तो त्याचा असेल की नाही शंका आहे, कारण तो त्याचा नातू दुसरा रुद्रसेन याचा मानण्याच्या विरोधात काहीच पुरावा नाही. **अत्यंत-स्वामी-महाभैरव-भक्त** या त्याच्यासाठी त्याचा पणतू दुसरा प्रवरसेन याच्या काळी अभिलेखात वापरलेल्या सांप्रदायिक शीर्षकावरून त्याच्या धर्मश्रद्धांची कल्पना येते.

५३४ **शंभो : प्रसाद-धृत कार्त्तयुग** ही मूळ शब्दरचना असून दुसऱ्या प्रवरसेनाच्या बहुतेक दानपत्रात ती आढळते.

५३५ त्याचा पिताही वैष्णव असणे शक्य आहे. त्याच्या मुलाने त्याच्याकडूनच सांप्रदायिक श्रद्धेचा वारसा मिळविला असावा.

५३६ तिची तीन दानपत्रे (उदा. पुणे, ऋद्धपूर व मिरेगाव) मिळाली आहेत. त्यापैकी फक्त पहिली दोनच संपूर्णपणे प्रकाशित झाली आहेत, तर तिसऱ्याच्या फक्त शिक्क्यावरील कोरीव लेखांची संक्षेपाने दखल घेतली गेली आहे. अजयमित्र शास्त्री, **ए. व्ही.**, पृ. २३३-३४; "दि वाकाटका किंग्ज दामोदरसेन ॲण्ड प्रवरसेन सेकंड", **जे. इ. एस. आय.**, १४, १९८७, पृ. ३८-४०.

५३७ पुणे ताम्रपट व ऋद्धपूर ताम्रपट **भगवतपाद-अनुध्याता** असे अधिक सोपे रूप वापरतात.

५३८ ऋद्धपूर ताम्रपटात ते स्पष्टच म्हटले आहे, तर पुणे दानपत्रात फक्त एवढाच उल्लेख आढळतो की, हे खेडे प्रथम भगवत चरणी अर्पण केले होते. त्यात वस्तीचे नाव नाही.

५३९ पुणे ताम्रपट.

५४० स्वामिन् ने शेवट होणारी नावे वैष्णवांमध्ये, तर ईश्वर किंवा इश ने शेवट होणारी नावे शैवांमध्ये लोकप्रिय होती.

५४१ पुणे ताम्रपट.

५४२ ऋद्धपूर ताम्रपट.

५४३ 'भगवतश-चक्रपाणे : प्रसाद उपार्जित-श्री-समुदयस्य' हा वाक्यप्रयोग दुसरा प्रवरसेन व दुसरा पृथिवीषेण यांच्या ताम्र दानपत्रात नेहमीच आढळतो. मात्र त्याने आपल्या राजवटीच्या पाचव्या वर्षात काढलेल्या व अलीकडे प्रकाशात आलेल्या मांढळ ताम्रपटात थोडा वेगळा वाक्प्रचार आहे. अजयमित्र शास्त्री व चंद्रशेखर गुप्त. "भगवतश-चक्र-लक्ष्म-प्रतिष्ठित-शासनस्य" **संशोधनाची क्षितिजे**, पृ. २२७. दोन्ही वाक्प्रचार जवळपास सारखेच आहेत, फक्त दुसऱ्यात चक्र हाती धारण केलेले नसून ते त्याचे चिन्ह आहे असा उल्लेख आहे.

५४४ वलखा महाराजांच्या अभिलेखांच्या कालनिश्चितीबाबत वाद आहे. वा. वि. मिराशी व अन्य काही विद्वान असे म्हणतात की, त्यांचा काळ कलचुरी-चेदी (इ. स. २४८-२४९ पासून सुरू होणाऱ्या) युगाचा आहे. हे मत जर वरोबर असेल तर या कोरीव लेखाचा काळ इ. स. २९६-९७ हा असेल.

५४५ **जे. इ. एस. आय.**, १८, १९९२, पृ. १२८.

५४६ दुसऱ्या रुद्रसेनाच्या मांढळ ताम्रपटासाठी पहा : **संशोधनाची क्षितिजे**, पृ. २२३-२९; भुलुंडाच्या बाघ ताम्रपटासाठी पहा : के. व्ही. रमेश आणि एस. पी. तिवारी, **ए कॉपर प्लेट होर्ड ऑफ दि गुप्त पिरिएड फ्रॉम बाघ, मध्यप्रदेश,**

आर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया, नवी दिल्ली, १९९०, पृ. १; चर्चेसाठी पहा : अजयमित्र शास्त्री, "अनंतशयन विष्णू : अर्लीयेस्ट एपिग्राफिक इव्हिडन्स", **ए. बी. ओ. आर. आय.**, १९९४, पृ. १११-२०.

५४७ **संशोधनाची क्षितिजे**, पृ. २२८. वत्सगुल्मक या शब्दाचा सामान्यतः अर्थ असा होतो की, ते दोन विहार वत्सगुल्म येथे असावेत. पण वस्तगुल्म हे वत्सगुल्म शाखेच्या राजधानीचे गाव असल्यामुळे तसे असणे अगदीच अशक्य आहे. तेव्हा त्याचा अर्थ सात्वत चरण जेथील रहिवासी होता ते ठिकाण असा घ्यायला पाहिजे.

५४८ **ए. व्ही.**, पृ. २२८-३०.

५४९ कित्ता, पृ. १५३-५७. या अभिलेखाच्या आशयाचा सारांश.

५५० मिराशी, व्ही. व्ही., **स्टडीज इन इंडॉलॉजी**, खंड २, सोलापूर, १९६१, पृ. २७२-८४; **सी. आय. आय.**, ५, पृ. ४१.

५५१ गुप्त, चंद्रशेखर, "पवनार अंडर दि वाकाटकाज", **ए. व्ही.**, पृ. १४६.

५५२ **सी. आय. आय.**, ५, पृ. ६०. हेही नमूद करायला हवे की, राजघराण्याशी संबंधित नारायणराज नामक व्यक्तीच्या विनंतीवरून हे दान केले आहे.

५५३ कित्ता, पृ. १९, (संच अ), पृ. १९, (संच ब).

५५४ कित्ता, पृ. ६५.

५५५ कित्ता, पृ. १८, ६४-६५; चंद्रशेखर गुप्त, **ए. व्ही.**, पृ. १२४.

५५६ **जे. इ. एस. आय.**, ४, पृ. २७.

५५७ **इ. आय.**, २०, पृ. १६. शांतमूलचा नातू वासिष्ठीपुत्र शांतमूल (शांतमूल दुसरा) याने अग्निहोत्र, अग्निष्टोम, वाजपेय व अश्वमेध केल्याचे सांगितले जाते. **इ. आय.**, २१, पृ. ३, ६४ (वीरपुरुषदत्त याचा नागार्जुनकोंडा कोरीवलेख).

५५८ दहा अश्वमेध करणाऱ्या भारशिवांची अशी श्रद्धा होती की, त्यांचे राजघराणे प्रत्यक्ष शिवाने तयार केले असून शिवलिंग खांद्यावर धारण केल्यामुळे तो त्यांच्यावर प्रसन्न होता.

५५९ त्यांच्यापैकी दहांची नावे "रुद्र" ने सुरू होणारी आहेत. पहिला रुद्रदामन हा त्यांच्यातील पहिला होय.

५६० **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स**, १, पृ. ८८-८९.

५६१ सरकार, डी. सी., "नागार्जुनकोंडा इन्स्क्रिप्शन ऑफ दि टाइम ऑफ अभीर वसुषेण, इयर ३०", **इ. आय.**, ३४, पृ. २०२-०३ (संहिता व भाषांतर यासाठी).

५६२ कित्ता, पृ. १९८-९९.

५६३ **एच. आय. एस. डब्ल्यू, के.**, पृ. १०२.

५६४ कित्ता, पृ. १०४.

५६५ कित्ता, पृ. १११-१२. या धार्मिक कार्याची पुनरुक्ती ऋषभदत्ताच्या नाशिक व कार्ले येथील काही कोरीव लेखांत आढळते.

५६६ अलिकडेच सापडलेल्या इंदूर दानपत्राच्या पहिल्या ताम्रपटासाठी पहा : मिराशी, व्ही. व्ही., **इंडॉलॉजीकल रिसर्च पेपर्स**, पृ. ७२ (पूर्व प्रकाशित); उर्वरित ताम्रपटांसाठी पहा : **सी. आय. आय.**, ५, पृ. ४०-४१; **ए. व्ही.**, पृ. २३४-३६; तीर्थ या दृष्टीने त्रिपुरीसाठी पहा : अजयमित्र शास्त्री, **त्रिपुरी** (हिंदी), भोपाळ, १९७१, पृ. १६७-६८.

५६७ **सी. आय. आय.**, ५, पृ. ३५, **रामगिरी-स्वामिनः पादमूलात** अशी मूळ शब्दरचना आहे. राम हा पूर्वीपासूनच विष्णूचा अवतार मानला जात असे हे वाङ्मयीन व पुराभिलेखीय पुराव्यांनी स्पष्ट झाले आहे. अजयमित्र शास्त्री, "राम : हिज डिव्हिनिटी इन लिटरेचर ॲण्ड एपिग्राफी", **न्यू ट्रेन्डस् इन इंडियन आर्ट ॲण्ड आर्किऑलॉजी**, पृ. १९३-२००; "अयोध्या आणि राम" **पुरातत्व**, क्र. २३, पृ. ३५-३९; "राम कल्ट-अर्लीयेस्ट एपिग्राफिक एव्हिडन्स", **जे. इ. एस. आय.**, २०, पृ. १-३.

५६८ **सी. आय. आय.**, ५, पृ. ७, **(भगवत-पाद-मूले-निवेद्य)**.

५६९ **इ. आय.**, ४१ पृ. १६५. मूळ शब्दरचना **रामगिरि स्थानात्** अशी आहे. त्यातील "स्थान" चा संदर्भ केवळ यात्रास्थळाशी असावा, तेथील मंदिराशी नव्हे.

५७० **सी. आय. आय.**, ५, पृ. ६५.

५७१ कित्ता, पृ. १० (संच अ) व पृ. १४ (संच ब).

५७२ कित्ता, पृ. ५०.

५७३ मिराशी त्यांचा संबंध आज वारी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या स्थळाशी जोडतात. भैरवगड म्हणूनही ते ओळखले जाते. अकोला जिल्ह्यातील अकोट तहसीलमध्ये वायव्येस दूर टोकाला वाण किंवा वाण नदीच्या तीरावरचे ते आज ओस पडलेले खेडे आहे. त्यापासून पूर्वेकडे सुमारे १८ मैलावर नरनाळ्याचा जुना किल्ला आहे.

आजही ते स्थान पवित्र मानले जाते. ते कदाचित प्राचीन नरत्तंग असावे किंवा नंरच्या अभिलेखांत येणाऱ्या नागपूर-नंदिवर्धन यासारखे जोडनाव असावे आणि नरत्तंगजवळचे वारि असा त्याचा अर्थ असावा. कित्ता, पृ. ४९.

५७४ **इ. आय.**, ४१, पृ. १७५.

५७५ **ए. बी. ओ. आर. आय.**, ५३, पृ. १९२.

५७६ पिल्ग्रिमेज स्टडीज क्र. ३, पृ. १०१-०६; "माहुरझरी प्लेटस् ऑफ पृथिवीषेण सेकंड : सम आब्झर्वेशन्स", **ए. बी. ओ. आर. आय.**, ७६.

५७७ काही पुराव्यांसाठी पहा : **सी. आय. आय.**, पृ. २९.

५७८ **एच. डी. एस.**, ४, पुणे. १९५३, पृ. ५१६-८२७ (महत्त्वाच्या तीर्थांच्या मुख्यत्त्वे वाङ्मयाधारित पुराव्यांसाठी).

५७९ काणे, पी. व्ही., **एच. डी. एस.**, ५, भाग-१, पुणे, १९५८.

५८० मिराशी (**सी. आय. आय.**, ५, पृ. ४२-४३) अशा दानपत्रांची संख्या नऊ देतात. कारण भरतवलाच्या (खरे तर शूरबल उदिर्णवैराच्या) बाम्हनी ताम्रपटाचा ते वाकाटक अभिलेखात अंतर्भाव करतात. मेकला येथील पांडव वाकाटकांचे अंकित होते असे त्यांना वाटत होते. पण हे मत चुकीचे असल्याचे वाकाटकांवरील प्रकरणात स्पष्ट केले आहे. लवकरच हे स्पष्ट होईल की, (**सी. आय. आय.** ५ च्या प्रकाशनानंतर) प्रकाशित/शोधित अशी आणखी काही दानपत्रेसुध्दा एकादशीच्या दिवशीच दिली होती.

५८१ कित्ता, क्र. ६.

५८२ कित्ता, क्र. ३.

५८३ कित्ता, क्र. २, ४, ५ व ८.

५८४ कित्ता, क्र. ११.

५८५ कित्ता, क्र. ७.

५८६ प्रस्तुत लेखकाने केवळ शिक्क्याचे चित्राविना प्रकाशन केले आहे. **ए. व्ही.**, पृ. २३३-३४.

५८७ डॉ. अ. प्र. जामखेडकर यांनी पुरविलेल्या माहितीवर आधारित.

५८८ **इ. आय.**, ४२, पृ. ३४.

५८९ **सी. आय. आय.**, ५, पृ. ५५.

५९० **इ. आय.**, ४१, पृ. ७४.

५९१ काणे, पी. व्ही., **एच. डी. एस.**, ५, भाग १, पृ. १०२ व २३०.

५९२ **सी. आय. आय.**, ५, पृ. ६६.

५९३ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ४५.

५९४ या नावाने दोन राजे वत्सगुल्म शाखेत होते. पण त्यांच्यापैकी "हरिविजय" कोणी रचले हे ठरविणे कठीण आहे. अर्थात येथे ते महत्त्वाचेही नाही.

५९५ या शाखेच्या दोन सभासदांनी प्रवरसेन हे नाव धारण केले होते. उदाहरणार्थ, पहिला प्रवरसेन हा विंध्यशक्तीचा पुत्र व वारसदार होता आणि राजघराण्याचा संस्थापक होता, तर दुसरा प्रवरसेन हा त्याच्या एकसमान नाव धारण करण्याऱ्या राजानंतरच्या चौथ्या पिढीतला होता. "सेतूबंध" ची रचना त्या दोहोंपैकी एकाने केली असणे शक्य आहे. पण त्यातही दुसऱ्या राजाकडून ती झाली असावी असे साधारणपणे मानले जाते.

५९६ **सी. आय. आय.**, ५, पृ. ५३–५९.

५९७ अनेक विव्दानांचे असे मत आहे की, रामायण कथेवरील रघुवंश काव्याचा रचयिता महाकवी कालिदास या काळात होऊन गेला. पण ते बरेच शंकास्पद आहे.

५९८ "ए ब्राह्मी इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम पाले", **इ. आय.**, ३८, पृ. १६७–६८.

५९९ कित्ता, पृ. १६८.

६०० शास्त्री, अजय मित्र, **ॲन आऊटलाइन ऑफ अर्ली बुध्दिझम**, वाराणसी, १९६५, पृ. ६–७.

६०१ कित्ता, पृ. ३९–४०.

६०२ कित्ता, पृ. ७९. मूळ कोरीव लेखासाठी पहा : ए, फुहीर, "पभोस इन्स्क्रिप्शन्स", **इ. आय.**, पृ. २४०-४२.

६०३ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ९५९.

६०४ सरकार, डी. सी., "सम एपिग्राफिक ॲण्ड मॅन्युस्क्रिप्ट रेकॉर्डस् : ॲन ॲलेज्ड इन्स्क्रिप्शन ऑफ खारवेल", **जे. ए. आय. एच.**, ३, पृ. ३०–३६.

६०५ **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स**, १, पृ. २१४.

६०६ सरकार, डी. सी. "टू इन्स्क्रिप्शन्स फ्रॉम गुंटूर डिस्ट्रिक्ट : १, वेलपुरू इन्स्क्रिप्शन ऑफ अैर-मा-न-सद", **इ. आय.**, ३२, पृ. ८२, ८७; अजयमित्र शास्त्री, "ऑन वेलपुरू पिलर इन्स्क्रिप्शन ऑफ महासद", **जे. इ. एस. आय.**, १९, पृ. १३-१४.

६०७ शास्त्री, टी. व्ही. जी. व इतर, **"वद्दमनू एक्स्कॅवेशन्स"**, बिर्ला इन्स्टिट्यूट ऑफ आर्किऑलॉजिकल ॲण्ड कल्चरल रिसर्च, हैदराबाद, १९९२ (उत्खननांच्या फलितांसाठी). इ. स. च्या सहाव्या शतकात आंध्रच्या किनारपट्टीत भरभराटीस आलेल्या महामेघवहन नामक व्यक्तीसाठी पहा : व्ही. व्ही. कृष्ण शास्त्री, "थ्री कॉपर प्लेटस् ग्रँटस् ऑफ पृथिवी-श्री-मूलराज फ्रॉम कोंडविडु", **जे. इ. एस. आय.**, १६, पृ. ७६.

६०८ दर्शनीमूल्यावर या आकड्यांना घेतले जाऊ नये. बौध्दांमध्ये, विशेषतः सिलोनच्या बौध्दांमध्ये ४००० हा आकडा विशेष प्रिय दिसतो. अशोकाने बांधलेल्या स्तूपांची संख्या तेवढीच सांगितली जाते. त्याचा अर्थ फार मोठ्या संख्येने एवढाच घ्यावा.

६०९ या परिषदेच्या संक्षिप्त वर्णनासाठी व पुरावशेषीय समर्थनासाठी पहा : अजय मित्र शास्त्री, **ॲन आऊटलाइन ऑफ अर्ली बुध्दीझम**, पृ. ५५-५८.

६१० सरकार, डी. सी., **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स**, १, भाग १, पृ. ३६. यापैकी चोड व पंड्या यांचा उल्लेख शिळेवरील दुसऱ्या राजाज्ञेत (कित्ता, पृ. १७) येतो. त्याला जोडून सतियपुत (उत्तर तामिळनाडू) आणि केते (र) लपुत ही नावे याच संदर्भात आली आहेत. उदाहरणार्थ, औषधीवृक्ष व रोपटी जेथे उपलब्ध नसतील अशा जागी ती बाहेरून आणून लावणे आणि माणसांना व जनावरांना वैद्यकीय सुविधा पुरवणे इत्यादी.

६११ या अभिलेखाची संहिता व चर्चेसाठी पहा : व्ही. व्ही. मिराशी, **स्टडीज इन इंडॉलॉजी**, १, दुसरी आवृत्ती, विदर्भ संशोधन मंडळ, नागपूर, १९६८, पृ. १२५-३४. अलीकडेच चंद्रपूरनजीकच्या जंगलमय प्रदेशात अशोकाची आणखी एक राजाज्ञा मिळाल्याचे समजते. ही बैरात राजाज्ञेची दुसरी प्रत असावी.

६१२ या राजाज्ञांसाठी पहा : ई., हुश, "इन्स्क्रिप्शन्स ऑफ अशोक", **सी. आय. आय.**, १, लंडन, १९२५.

६१३ शिळेवरील राजाज्ञा ३-४ ह्या त्याच्या राज्याभिषेकानंतरच्या बाराव्या वर्षी कोरल्या गेल्या. डी. सी. सरकार, **सिलेक्ट इन्स्क्रिप्शन्स**, १, पृ. १८, २१.

६१४ कित्ता, पृ. २ (शिलालेख क्र. ५). येथे असे ठाम विधान आहे की, त्याने धर्ममहामात्राचे पद आपल्या राज्याभिषेकानंतरच्या तेराव्या वर्षी निर्माण केले.

६१५ वा. वि. मिराशी यांनी परिषदेच्या सिलोनी इतिवृतांतील तारखांचा त्याच्या राजाज्ञांच्या तारखांशी मेळ घालण्याचा प्रयत्न या आधारे केला आहे (**एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. १३७-१३८). पण सिलोनी संदर्भसाधनांचे त्यांनी दिलेले चुकीचे हवाले (ते म्हणतात की, "अशोकाच्या राजवटीच्या सतराव्या वर्षी हे घडले", कित्ता, पृ. १३७) अनावश्यक आहेत. कारण अशोकाच्या राजाज्ञेत "राज्याभिषेकानंतर तेराव्या वर्षी" असा उल्लेख आहे. म्हणजे ते सालमजकूर चौदावे वर्ष होईल व सिलोनी परंपरेशीही सहज जुळेल. त्यासाठी परिषद भरण्याचे वर्ष बदलण्याची गरज भासणार नाही.

६१६ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. १००० (कान्हेरी), १०५७ (कुडा), १०७२ (महाड), १०८८, ११०९ (कार्वे), ११११ (बेडसा), १११९, ११२० (नाणेघाट), ११२१ (सिलार), ११२७, ११३८ (नाशिक), ११७३, ११७४, ११७६ (जुन्नर), ११८५ (कोल्हापूर), ११९७ (अजिंठा). ११८५ चा दाता बम्ह किंवा ब्रह्म असल्याचे स्पष्ट म्हटले आहे.

६१७ या प्रकरणात आधी आलेल्या "उद्योगधंदे व अन्य व्यवसाय" या भागात याबाबत तपशील दिला आहे. जवळपास सगळेच संदर्भ बौद्ध केंद्रांना दिलेल्या दानांची नोंद करणाऱ्या कोरीव लेखांत मिळतात.

६१८ याच प्रकरणातील "व्यापार व वाणिज्य" हा भाग पहावा. तेथे बौद्ध प्रतिष्ठानात सापडलेल्या कोरीव लेखांच्या आधारे एका भागातील लोकांनी दुसऱ्या भागांना दिलेल्या भेटींचे तपशील दिले आहेत.

६१९ या नावांचा स्वतंत्रपणे अधिक अभ्यास होण्याची गरज आहे.

६२० संदर्भ क्र. ५९ व ६० पहावेत.

६२१ देव, एस. बी. ॲण्ड जे. पी., जोशी, **पवनी एक्स्कॅवेशन**.

६२२ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ६५४-५६.

६२३ कित्ता, क्र. १५६-५८. अजय मित्र शास्त्री, **ॲन आऊटलाइन ऑफ अर्ली बुध्दीझम**, पृ. ५७-५८.

६२४ गोखले, शोभना, **कान्हेरी इन्स्क्रिप्शन्स**, पृ. १११-३६.

६२५ शास्त्री, अजय मित्र, **ॲन आऊटलाइन ऑफ अर्ली बुद्धीझम**, पृ. ११९-२०.

६२६ जे फर्ग्यूसन व जे. बर्जेस, लंडन, १८८०.

६२७ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ९८८; **ए. एस. डब्ल्यू. आय.**, ५, पृ. ७६, क्र. ५. दुसऱ्या एका कान्हेरी कोरीव लेखात (ल्यूडर्स लिस्ट, क्र. ९९८) उल्लेखित कल्याणचा विहार म्हणजेच कदाचित अबालिका विहार असावा.

६२८ कित्ता, क्र. ११५२.

६२९ कित्ता, क्र. ९८८.

६३० **ल्यूडर्स लिस्ट**, ८९८, ९९४, ९९५, ९९६, ९९८, १००२, १०१३, १०२४ (कान्हेरी), १०३७, १०३९, १०४१, १०४८, १०५१, १०५८, १०६०, १०६६ (कुडा), १०७२ (महाड), १०७५, १०७७ (कोल), १०७८-१०७९ (भाजा), १०८७, ११०६, ११०७, १११९, ११२१ (कार्ले), ११२७, ११२८, ११३२, ११३४, ११३८, ११४०, ११४४, ११४८, ११४९, ११५० (नाशिक), ११५२, ११५४, ११५५, ११५७, ११७३, ११७७, ११८०, ११८२, ११८४ (जुन्नर), ११९८ (अजिंठा) इत्यादी.

६३१ **इ. आय.**, १८, पृ. ११३०.

६३२ कित्ता, २४, पृ. २५९.

६३३ कित्ता, १५, पृ. २६७.

६३४ कित्ता, २०, पृ. २२ (सेकंड अप्सिडल टेम्पल इन्स्क्रिप्शन, क्र. एफ).

६३५ **इ. आय.**, २०, पृ. २३-२४; क्र. २१, पृ. ६२; क्र. ३३, पृ. २४७. विहारांच्या उल्लेखांसाठी पहा : **ॲन आऊटलाइन ऑफ अर्ली बुद्धीझम**, पृ. १२५-२६.

६३६ अजिंठ्यातील उत्खननाची नोंद घेणाऱ्या दोन कोरीव लेखांसाठी पहा : **सी. आय. आय.**, ५, पृ. १०३-११. घटोत्कच जवळच्या दुसऱ्या एका विहाराच्या उत्खननाची वराहदेवाने केलेली नोंद दुसऱ्या अभिलेखात आढळते. कित्ता, पृ. ११२-११९.

६३७ ढवळीकर, एम. के., "अजंठा केव्ह ८-ए : वाकाटका एडिफाइस", **ए. व्ही.**, पृ. २०३-०८.

६३८ सर्वसाधारण वर्णनासाठी पहा : एस. के. सरस्वती, **ए. आय. यू.**, पृ. ४९४-९५.

६३९ **ल्यूडर्स लिस्ट** क्र. ९७८, ९८८, १०५०, १०५८, १०७२, ११४०, ११४१, ११५३, ११७८, ११७९, ११८२, १२१६, १२७६ इत्यादी. चैत्य सभागृहांचे संदर्भ विहारांच्या तुलनेत कितीतरी कमी आहेत आणि तसे ते असणेही स्वाभाविकच आहे.

६४० पर्सी ब्राऊन, **इंडियन आर्किटेक्चर (बुद्धीस्ट ॲण्ड हिंदू पिरीएड)**, तिसरी आवृत्ती, मुंबई १९५६, पृ. ५०-५१.

६४१ थेरवादाचे पंथ असे आहेत--(१) महीशासक, (२) वृजिपुत्रक, (३) धर्मोत्तरीय, (४) भद्रयानिक, (५) छंदागारिक, (६) सम्मितीय किंवा वात्सीपुत्रीय, (७) सर्वास्तिवाद, (८) धर्मगुप्तिक, (९) कश्यपीय, (१०) संक्रांतिक आणि (११) सूत्रवाद. महासंधिकांचे पंथ असे आहेत–(१) गोकुलिक, (२) एक व्यवहारिक, (३) चैत्यवाद. (४) प्रज्ञाप्तिवाद आणि (५) बाहुलक, थेरवाद (स्थविरवाद) व महासंधिक मिळून पारंपरिक अठरा हा आकडा बनतो. त्यांच्या आंतरसंबंधांसाठी पहा : अजय मित्र शास्त्री, **ए. ओ. बी.**, पृ. ६४. मिराशी, (**एच. आय. एस. डब्ल्यू. के.** पृ. १४४) आग्रहपूर्वक सांगतात की, स्थविरवाद पंथ हा महासंधिकानंतर शतकभराने अस्तित्वात आला. पण ते चूक आहे.

६४२ त्यात (१) हेमवत, (२) राजगिरिया, (३) सिद्धार्थक, (४) पूर्वशैल, (५) अपरशैल आणि (६) वाजिरिय यांचा अंतर्भाव होतो. अशोकाच्या कारकिर्दीत तिसरी बौद्ध परिषद भरल्यानंतर महासंधिकाचे आणखी काही उपपंथ उदाहरणार्थ- वैतुल्यक, अंधक आणि अन्यमहासंधिक अस्तित्वात आले. अन्यत्र दाखविल्याप्रमाणे पूर्वशैल (पूर्वमहावनशैल) आणि अपरशैल (अपरमहावनशैल) हे प्रत्यक्षात मूळ महावनशैल पंथापासूनच निर्माण झाले आहेत. "फ्रेश लाईट ऑन दि ओरिजिन ऑफ शैल स्कूलस् ऑफ बुध्दीझम", **पी. ए. ओ. सी.**, २० वे अधिवेशन, भुवनेश्वर, १९५९, पृ. ७९-८६.

६४३ **दीपवंश**, प्रकरण ५; **महावंश**, प्रकरण ५.

६४४ या पंथावावतच्या पुराभिलेखीय संदर्भासाठी पहा : अजयमित्र शास्त्री, "बुद्धीस्ट स्कूल्स ॲज नोन फ्रॉम इन्स्क्रिप्शन्स", **भारती**, बुलेटिन ऑफ दि कॉलेज ऑफ इंडॉलॉजी, क्र. २, बनारस हिंदू युनिव्हर्सिटी, पृ. २६-५७.

६४५ दत्त, नलिनक्ष, **ए. आय. यू.**, पृ. ३८५-८९.

६४६ "निम्न वाहन" अर्थाचे नाव आधीच्या बौद्ध धर्माला नंतरच्या स्वतःला "महान वाहन" अर्थवाचक संज्ञा स्वीकारणाऱ्या धर्माच्या अनुयायांनी दिले होते हे उघडच आहे.

६४७ अजिंठा येथील सहाव्या-सातव्या शतकातील कोरीव लेखात (बुद्ध) मंदिराच्या स्थविर अचल याने केलेल्या उत्खननाची तसेच नंतर त्यात स्थविर बुद्धभद्र याने भिक्षु धर्मदत्त व त्याचा परात्पर शिष्य भद्रबंधू यांच्या निगराणीखाली तिघांसाठी व जगासाठी महाबोधी (महान प्रवुद्धत्ता) प्राप्त करून घेण्याच्या उद्देशाने घातलेली भर यांची नोंद आहे. **ए. एस. डब्ल्यू. आय.**, ४, अजिंठा कोरीव लेख क्र. ६, पृ. १३४, चरण ६. युवान श्वांगने (ह्यू-एन-त्संग Yuan chwang) या लेण्याचा निर्देश इ. स. च्या सातव्या शतकात केला आहे. याशिवाय पहा : कोरीवलेख क्र. ७, पृ. १३६ (पितरांच्या पुण्यासाठी व सर्व प्राण्यांच्या अनुत्तर-ज्ञान-आवाप्तीसाठी); चितारलेला कोरीवलेख क्र. ७ (सर्व सचेतन प्राण्यांची दुःखातून मुक्तता होण्यासाठी), कोरीव लेख क्र. १४-१५ (त्याचे जन्मदाते व सर्व सचेतन प्राणिमात्र यांच्या अनुत्तर-ज्ञान आवाप्तीसाठी). यातील बहुतेक कोरीव लेखांनी बुद्ध प्रतिमांच्या प्रतिष्ठापनेचा उल्लेख केला आहे.

६४८ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. १०४७ (प्रतिमेची प्रतिष्ठापना आणि दिवाबत्तीची सोय).

६४९ कित्ता, क्र. ९९० (महायान पंथ), क्र. ९९२ (सर्व प्राणी बुद्ध होवोत).

६५० **इ. आय.**, २०, पृ. १.

६५१ कित्ता, ३३, पृ. २४७. रामचंद्रन, टी. एन., "नागार्जुनकोंडा", **एम. ए. एस. आय.**, क्र. ७१, पृ. ३६-३७.

६५२ **इ. आय.**, २०, पृ. २४.

६५३ **ए. एस. डब्ल्यू. आय.**, ४, पृ. ११३, क्र. २१.

६५४ **इ. आय.**, ७, पृ. ५४, ५५, क्र. ८ व १०. दोन्ही अभिलेखात भिक्षू हा सोपारका येथील रहिवासी असल्याचा संदर्भ आहे. यावरून असे म्हणता येते की, ते धर्मोत्तरीय पंथाचे एक केंद्र होते. मात्र कार्ले सुद्धा या पंथाच्या समर्थकांचे प्रमुख केंद्र होते की काय हे ठरवणे कठीण आहे.

६५५ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ११५२.

६५६ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ९८७.

६५७ कित्ता, ११२३, ११२४; **इ. आय.**, ८, पृ. ६०-६५, ६६. भद्रयानिक ही सर्वास्तिवादाची शाखा होती आणि पवनी (जिल्हा भंडारा) येथे त्यांना बरेच महत्त्वाचे स्थान लाभले होते या मिराशी यांच्या मताला (**एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. १५४) कोणताही आधार सापडत नाही. त्यातील दुसरा तर्क गौतमीपुत्र सातकर्णीचा बेणाकटस्वामिन् असा जो त्याच्या कारकिर्दीतील अठराव्या वर्षीच्या नाशिक कोरीव लेखात उल्लेख आहे त्यावर आधारित आहे (कित्ता, पृ. २६). बेणाकट म्हणजेच पवनी हा साम्यभाव फारच ओढून ताणून जोडलेला आहे.

६५८ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ११०५; **इ. आय.**, ७, पृ. ६४.

६५९ **इ. आय.**, ७, पृ. ७१; **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ११०६.

६६० आयक स्तंभ कोरीव लेख क्र. सी–१ आणि सी–२; **इ. आय.**, २०, पृ. १७, १९-२०.

६६१ बहुदा अमरावती येथे त्यांचा संदर्भ हंघिका असा आला आहे. **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. १२४०; पुराव्याच्या चर्चेसाठी **ए. ओ. बी.**, पृ. ९०.

६६२ जे. बर्जेस, **नोटस् ऑन अमरावती स्तूप**, पृ. ३७; **बुद्धीस्ट स्तुपाज ऑफ अमरावती ॲण्ड जगय्यापेट**, पृ. १६२.

६६३ **बुद्धीस्ट स्तुपाज ऑफ अमरावती ॲण्ड जगय्यापेट**. पृ. ९१, १०५.

६६४ आयक स्तंभ कोरीव लेख क्र. सी–१ आणि सी–२; **इ. आय.**, २०, पृ. १७, १९. चर्चेसाठी पहा : **ए. ओ. बी.** पृ. ९२-९३.

६६५ कित्ता.

६६६ निखळलेला कोरीव स्तंभ लेख "जी"; **इ. आय.**, २०, पृ. २३-२४, क्र. २१, पृ. ६२.

६६७ नाशिक लेणे कोरीव लेख क्र. २२; **इ. आय.**, ८, पृ. ७७; **ल्यूडर्स लिस्ट** क्र. ११३०.

६६८ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ११७१.

६६९ **ए. एस. डब्ल्यू. आय.**, १०, पृ. ८५.

६७० **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ५९.

६७१ जे. बर्जेस, **बुद्धीस्ट स्तुपाज ऑफ अमरावती ॲण्ड जगय्यापेट**, पृ. ५३.

६७२ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. १२८०; बर्जेस, उपरोक्त, पृ. १०४.

६७३ बर्जेस, उपरोक्त पृ. ११०, **नोटस् ऑन अमरावती स्तूप**, पृ. १९.

६७४ चर्चेसाठी पहा : **ए. ओ. बी.**, पृ. ९६-९७.

६७५ कित्ता, पृ. ९६, तळटीप ३.

६७६ सेकंड ॲप्सिडल टेम्पल इन्स्क्रिप्शन्स, 'एफ'. (**इ. आय.**, २०, पृ. २२). यात पुवसेल हे स्थलनाम म्हणून आले आहे.

६७७ **ए. एस. आय., ए. आर.**, १९२३-२४, पृ. ९३, ९७.

६७८ **आय. एच. क्यू.**, १८, पृ. ६०. **ल्यूडर्स लिस्ट** मध्ये हे क्र. १०२० आहे, पण ल्यूडर्सने अपरसेलेसु या शब्दावर भाष्य केलेले नाही.

६७९ जे. बर्जेस, **अमरावती ॲण्ड जगय्यापेट**, पृ. १०५, क्र. ४९.

६८० आयक कोरीव स्तंभ लेख, क्र. सी–१ (**इ. आय.**, २०, पृ. १७); सी-२ (कित्ता, पृ. १९), फर्स्ट ॲप्सिडल टेम्पल इन्स्क्रिप्शन्स, 'इ' (कित्ता, पृ. २०). अपरमहाविनसेलियासाठी १५० दिनारीमाशकांसह ठेवीच्या उभारणीची नोंद घेणारा जो नागार्जुनकोंडा कोरीव लेख नंतरच्या काळात शोधला गेला त्याच्या उल्लेखासाठी पहा : कित्ता, ३४, पृ. २१०. अपरसेलिय असा संक्षिप्त स्वरूपात त्याचा संदर्भ आंध्र किनारपट्टीतील घंटसाल (प्राचीन कंटकशैल) येथील कोरीव लेखात आला आहे. कित्ता, २७, पृ. १, क्र. डी. ४.

६८१ कित्ता, पुवसेलिय साठी अमरावती, अल्लुरु, नागार्जुनकोंडा कोरीव लेख.

६८२ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ११५२, ११५५.

६८३ कित्ता, क्र. ११६३.

६८४ कित्ता, क्र. ११६९.

६८५ कित्ता, क्र. १२४४; **नोटस् ऑन अमरावती स्तूप**, पृ. २२.

६८६ **नोटस् ऑफ अमरावती स्तूप**, पृ. ५५, टीप २; **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. १२७६.

६८७ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. १२०७.

६८८ बौद्ध पंथासंबंधीच्या पुराभिलेखीय पुराव्यांच्या चर्चेसाठी–**ए. ओ. बी.**, पृ. ६३-१११.

६८९ कित्ता, पृ. ११६.

६९० **इ. आय.**, २, पृ. ३२९, क्र. ९.

६९१ कित्ता, २, पृ. ३२८, क्र. ४.

६९२ कित्ता.

६९३ कित्ता, २, पृ. ३२७, क्र. ३ सांचीच्या काही प्रारंभिक दुर्मिळ कोरीव लेखांतही (कित्ता, पृ. ९९-१००, क्र. २५-२६, १०२, ५१) बौद्ध गोष्ठी व वरुलमिसान गोष्ठी यांचा उल्लेख आहे. त्यातील पहिल्या समितीचा संबंध निश्चितपणे बौद्ध प्रतिष्ठानांच्या कामकाजासंबंधी होता. **ए. ओ. बी.**, पृ. १२६-२८.

६९४ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ९८७ (कान्हेरी); **इ. आय.**, २०, पृ. २२ (नागार्जुनकोंडा)

६९५ कित्ता, क्र. ९८७.

६९६ **इ. आय.**, १५, पृ. २७०, क्र. ४०. तिच्यावर भिक्षुणी-विहाराच्या पर्यवेक्षणाचे काम सोपवले होते हा केवळ तर्क आहे.

६९७ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ११२५.

६९८ फ्लीट, जे. एफ., **सी. आय. आय.**, ३, पृ. २७२.

६९९ अलीकडे हे अगदी ठामपणे सुचविण्यात आले आहे की, विहारस्वामिन्, महाविहारस्वामिन् आणि विहारस्वामिनी यांचा अर्थ अनुक्रमे विहाराचा प्रभारी भिक्षू, महाविहाराचा प्रभारी भिक्षू आणि विहाराची प्रभारी भिक्षुणी असा होतो. पहा : अश्विनी अग्रवाल, “दि टर्मस् विहारस्वामीन ॲण्ड विहारस्वामिनी इन दि बुद्धीस्ट इन्स्क्रिप्शन ऑफ कुशाण ॲण्ड गुप्त पिरियडस्”, **विश्वंभरा : प्रोबिंग्ज इन ओरिएन्टॉलॉजी** (प्रा. व्ही. एस. पाठक गौरवग्रंथ) संपा. अजयमित्र शास्त्री व इतर, नवी दिल्ली, १९९५, पृ. ११६-१९. पण साधार युक्तिवादांसह करण्यात आलेली ही सूचना स्वीकारणे कठीण आहे. कारण तोरमानच्या काळातील कुरा येथील कोरीव लेखात भिक्षू नसलेल्या एकाचा उल्लेख अनेक विहारस्वामिन् असा केला आहे. पहा : **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ५.

७०० **इ. आय.**, ८, पृ. ९०.

७०१ **ए. एस. डब्ल्यू. आय.**, ५, पृ. ७९, क्र. १५; पृ. ८१-८२, क्र. १८; पृ. ८३, क्र. २१; पृ. ८५, क्र. २८.

७०२ कित्ता, पृ. ८१-८२. पारंपरिक समजुतीनुसार (**ए. ओ. बी.**, पृ. १३६, तळटीप ३), पावसाळी निवासस्थानांना प्रारंभ श्रावण महिन्याच्या पौर्णिमेनंतर होतो.

७०३ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ९८९, ९९०, ९९९, १०१२, १०२६, १०३४ (भिक्षू), १००६, १००९, १०१४, १०१५, १०२०, १०२५ (भिक्षुणी).

७०४ कित्ता, क्र. १०४०, १०४४, १०४६, १०४७ (भिक्षू), १०४१, १०५९, १०६० (भिक्षुणी).

७०५ कित्ता, क्र. १०८१, १०९४, १०९५, ११०१, ११०२, ११०८ (भिक्षू), १०९८, ११०४, ११०७ (भिक्षुणी).

७०६ कित्ता, क्र. १११० (भिक्षू).

७०७ कित्ता, क्र. ११३० (भिक्षू), ११२८ (भिक्षुणी).

७०८ कित्ता, क्र. ११७१ (भिक्षू).

७०९ **इ. आय.**, २, पृ. ८७, ३६८-६९. दाते म्हणून किमान ८० भिक्षू व ७० भिक्षुणी यांचे निर्देश या कोरीव लेखात आहेत.

७१० वरुआ, बी. एम. ॲण्ड जी. सिन्हा, **बारहूत इन्स्क्रिप्शन्स**, कलकत्ता, १९२६. बऱ्याच मोठ्या संख्येने असलेल्या अभिलेखांसाठी.

७११ **ए. ओ. बी.**, पृ. १३८-३९.

७१२ **ए. एस. डब्ल्यू. आय.**, ५, कान्हेरी कोरीव लेख क्र. १५, २१, २८, उषवदात आणि आभिर ईश्वरसेन यांच्या कारकिर्दीतील नाशिक कोरीव लेखाच्या संदर्भासाठी "अर्थव्यवस्था" हा भाग पहावा.

७१३ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. १००६ (कान्हेरी).

७१४ कित्ता, क्र. १२४० (अमरावती).

७१५ वरुआ, बी. एम. **गया ॲण्ड बोधगया**, २ (इन्स्क्रिप्शन्स), कलकत्ता, १९३४, पृ. ६७; **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ९३९-४२. अशा सन्मानदर्शक उपाधींचा वापर भिक्षुंच्या तुलनेत भिक्षुंणींच्या वाबतीत होणे ही बाब लक्षणीय आहे.

७१६ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ११५२.

७१७ कित्ता, क्र. ११२७, ११२८, ११३७, ११३९, ११४०, ११४६.

७१८ कित्ता, क्र. १०९९, ११०६.

७१९ कित्ता, क्र. ९९८, १०२०, १०२४; शोभना गोखले, **कान्हेरी इन्स्क्रिप्शन्स**, क्र. ४३.

७२० नाशिक लेणे कोरीव लेख क्र. १०, ओळ ४, (**इ. आय.**, ८, पृ. ७८) किंवा त्रिरश्मी पर्वतावरचा विहार.

७२१ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ११०६ (कार्ले). दान हे महासंधिका पंथाची विशेष मालमत्ता असल्याची नोंद यात आहे.

७२२ **इ. आय.**, ८, पृ. ७८, क्र. १०, **इतो मम लेणे वसथानम् चतुदिसस् भिक्खु संघस मुखाहारो भविशति.**

७२३ **ल्यूडर्स लिस्ट**, क्र. ११०६.

७२४ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. २६.

७२५ हे मत मान्य करता येण्याजोगे नाही.

७२६ **एच. आय. एस. डब्ल्यू. के.**, पृ. ५३.

७२७ कित्ता, पृ. ४५.

---

## प्रकरण १५

# बदामीचे चालुक्य ते यादव काळ *

**वा**काटक सत्तेच्या अस्तानंतर बदामीचे चालुक्य, राष्ट्रकूट, कल्याणीचे चालुक्य, शिलाहार आणि यादव या वंशांनी महाराष्ट्रावर संयुक्तपणे किंवा स्वतंत्ररित्या सत्ता गाजविली. या कालखंडाचा इतिहास समजण्यासाठीची प्रमुख साधने म्हणजे या वंशातील राजांनी वेळोवेळी दिलेले कोरीव लेख, समकालीन वाङ्मय आणि परदेशी प्रवाशांनी लिहिलेले वृत्तांत ही होत. याशिवाय तत्कालीन भौतिक संस्कृतीच्या आकलनासाठी महाराष्ट्रात निरनिराळ्या ठिकाणी पुरातत्त्वीय उत्खननाद्वारे प्राप्त झालेला पुरावा तसेच गुहाशिल्पे व चित्रकला यातील पुरावेही लक्षात घेणे आवश्यक आहे. तत्कालीन सामाजिक, आर्थिक व धार्मिक परिस्थितीचे पूर्ण आकलन होण्यासाठी प्राप्त झालेला पुरावा दुसऱ्या साधनाद्वारे प्राप्त झालेल्या माहितीशी पडताळून पहावा लागतो. या पार्श्वभूमीवर तत्कालीन समाज घटकांचा विचार येथे करण्यात येत आहे.

**समाज व समाजरचना :** पूर्वीपासूनच हिंदू समाजाचे चातुर्वर्ण्य पद्धतीमुळे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार प्रमुख वर्णांमध्ये विभाजन झालेले होते. चिनी प्रवासी ह्यू-एन-त्संग याला समाजात अस्तित्वात असलेले हे चार प्रमुख वर्ण, त्यांचे व्यवसाय व त्यांच्यामध्ये अस्तित्वात असलेली आंतरजातीय विवाह पद्धती यांचे ज्ञान होते.[1]

दक्षिण भारताशी प्रत्यक्ष संबंध आलेल्या काही मुस्लिम लेखकांपैकी इब्न खुर्दाव्द[2] हा साब्कुफ्रीय, ब्रह्म, कतरीय, सुदरीय आणि वैसुरा या पाच वर्णांचा जात म्हणून उल्लेख करतो. याबरोबरच तो संदालिअ व लहुड ह्या जातींचेही अस्तित्व असल्याचे सांगतो. याप्रमाणे तो पूर्वापार चालत आलेल्या चार वर्णांऐवजी सात वर्णांची जात म्हणून नावे देतो. या सात जातींचे या कालात आलेला दुसरा प्रवासी अल इद्रिसी[3] याने सांगितलेल्या जातींशी साम्य दिसते. परंतु हा दुसरा प्रवासी लहुडच्या ऐवजी झक्य या जातीचे नाव देतो. या लेखकांच्या ब्रह्म, सुदरीय आणि बैसुरा ह्या जाती म्हणजे अनुक्रमे ब्राह्मण, शुद्र व वैश्य हे वर्ण होत. कतरीय हे क्षत्रिय तर साब्कुफ्रीय हे विद्वानांच्या मते सत्क्षत्रिय असावेत. कारण उपरोक्त दोन्ही लेखकांच्या वर्णनाप्रमाणे या वर्गातील लोकांमधूनच राजाची निवड होत असे. क्षत्रिय वर्णाचे हे दोन वर्गामधील वर्गीकरण क्षत्रिय आणि राजन्य या वर्गांची आठवण करून देतात. यापैकी क्षत्रिय हे सामान्यपणे सैनिकी व्यवसायात असलेले लोक व राजन्य म्हणजे आरंभीच्या काळातील राजकुलातून आलेल्या अमीर, उमराव वगैरे घराण्यातील व्यक्ती होत. यावरून असे दिसते की, क्षत्रिय वर्णाचे आधीपासून दोन वर्गातील विभाजन या कालात चांगलेच रुजले होते. या ठिकाणी मुस्लिम प्रवाशांनी उल्लेखिलेल्या संदालिअ व लहुड किंवा झक्य ह्या जाती अस्पृश्य आहेत. यापैकी संदालिअ हे चाण्डाल असावेत, तर लहुड किंवा झक्य या

---

* या प्रकरणाचे लेखन डॉ. मालती महाजन (निवृत्त प्राध्यापिका, नागपूर विद्यापीठ, नागपूर) यांनी केलेले आहे.

जातीचे लोक पेशाने नर्तक, डोंबारी आणि विविध वाद्यवादक असावेत. यावरून इ. स. १० व्या शतकाच्या बऱ्याच आधी कनिष्ठ प्रकारचा व्यवसाय करणाऱ्या लोकांना अस्पृश मानले जात होते. अल्बेरुणीच्या वर्णनावरुन ह्या जातीची संख्या सांप्रत काळाच्या अखेरपर्यंत बऱ्याच मोठ्या प्रमाणात वाढली होती असे दिसते. अल्बेरुणीने चार प्रमुख वर्णांबरोबर अंत्यज या पाचव्या जातीचा उल्लेख केलेला आहे. तो पुढे या जातीची (१) धोबी, (२) जोडे बनविणारे किंवा चांभार, (३) गारुडी, (४) टोपल्या बनविणारे अथवा बुरूड व चिलखत किंवा ढाल बनविणारे, (५) नाविक किंवा खलाशी, (६) कोळी, (७) जंगली प्राण्यांची आणि पक्ष्यांची शिकार करणारे आणि (८) विणकर अथवा कोष्टी अशा आठ वर्गांमध्ये किंवा गटांमध्ये विभागणी करतो. मुख्य गोष्ट अशी की, उपरोक्त चार प्रमुख वर्णांचे लोक या अंत्यजांबरोबर एकाच गावात जवळजवळ किंवा एकत्र राहत नव्हते, तर अंत्यजांची वस्ती नेहमी मुख्य शहराबाहेर किंवा गावाबाहेर असे. या वर्णनावरून चार प्रमुख वर्ण अंत्यज समाजातील लोकांना अस्पृश्य समजत असावे असे म्हणता येईल. अल्बेरूणीच्या म्हणण्याप्रमाणे हादी, डोंब, चाण्डाल आणि वघातौ या लोकांचा अंत्यजांच्या या आठ गटांमध्ये अंतर्भाव होत नव्हता. तसेच या आठ गटांतील सर्व गटांचा दर्जाही समान नव्हता. यापैकी चांभार, धोबी आणि कोष्टी यांना बाकीच्या गटातील लोक स्वतःपेक्षा कनिष्ठ दर्जाचे समजत. यावरून असे म्हणता येईल की, अल्बेरूणीने जेव्हा भारताला भेट दिली तेव्हा गारुडी, टोपली विणणारे व ढाल बनविणारे, खलाशी किंवा नाविक, कोळी व शिकारी हे पूर्णपणे अस्पृश्य ठरले नसले तरी ते अस्पृश्यांप्रमाणेच होते. अंत्यजांच्या दुसऱ्या वर्गातील म्हणजे हादी, डोंब, चाण्डाल व वघातौ ह्या समाजांचे लोक गावची साफसफाई, स्मशान स्वच्छ ठेवणे यावरोबरच इतर अस्वच्छ कामे करीत असल्यामुळे त्यांचा स्वतंत्र असा एक वर्ग निर्माण झाला होता.[४]

**अभिलेखीय नोंदी** : या कालखंडातील निरनिराळ्या राजवंशातील राजांनी दिलेल्या काही ताम्रपट व शिलालेखांमध्येही काही जाती व श्रेणीबद्दल माहिती मिळते. उदा., सोमेश्वर देवाच्या पैठण लेखातील 'वर्णत्रय बोने'[५] हे शब्द स्पष्टपणे ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांच्या बोण्यांचा निर्देश करतात. त्याचप्रमाणे कल्याणीचा चालुक्य राजा जनमेजय याच्या चिकुर्डे ताम्रपटात व राजा वीर सत्याश्रयदेव याच्या मिरज ताम्रपटामध्ये[६] न्हावी व धोबी यांचा उल्लेख आहे. या दोन्ही ताम्रपटांची तिथी शके १०७६ असावी. शिलाहार नृपति गण्डरादित्य याचा शक संवत् १०५८ चा कोल्हापूर लेख व राजा विजयादित्य याचा शक संवत् १०६५-६६ चा मिरज लेख[७] यामध्येही सोनार, चांभार, कुंभार, बुरूड, कातडी कमावणारे यांचा करांच्या संदर्भात उल्लेख आलेला आहे. शके ११९५-११९९ या कालखंडातील पंढरपूर शिलालेखामध्ये[८] शिंप्याने दिलेली एक गद्याणाची देणगी नमूद केली आहे. प्रथम पाहिल्याप्रमाणे कुंभार, कोष्टी, बास्केट बनविणारे, पितळी धातुचे काम करणारे आणि तत्सम इतर कामे करणाऱ्या लोकांच्या स्वतःच्या श्रेणी होत्या. या श्रेणी त्यांची संघटना, सचोटी व स्थैर्य

यासाठी प्रसिद्ध होत्या. वरेच लोक दान धर्मासाठी आपल्या मोठमोठ्या रकमांच्या कायम ठेवी या श्रेणींजवळ ठेवीत. आळतेकरांच्या मते या काळात अशा प्रकारच्या श्रेणी अस्तित्वात असाव्यात. आळतेकरांनी इ. स. ७७५ च्या लक्ष्मेश्वर लेखात[९] आलेल्या विणकरांच्या श्रेणीचा या संदर्भात उल्लेख केलेला आहे. शिलाहार राजाच्या शक संवत् १०५८ च्या कोल्हापूर लेखात व शक संवत् १०६५-६६ च्या मिरज लेखात[१०] वीर बणंज नावाने विख्यात असलेल्या व्यापारी श्रेणीच्या कामकाजासंबंधी माहिती दिलेली आहे. कल्याणीच्या चालुक्य राजांनी दिलेल्या काही लेखांमध्ये व्यापारी श्रेणीचा व तिने दिलेल्या देणग्यांचा उल्लेख केलेला आहे. उदाहरणार्थ चालुक्य राजा त्रिभुवनमल्ल व वीर सोमेश्वरदेव यांच्या काळातील लेखामध्ये वीर बणंज या श्रेणींचा उल्लेख आहे.[११] हा ताम्रपट या श्रेणीने दिला होता. चालुक्य राजा त्रैलोक्यमल्ल याच्या आठव्या शासनवर्षीच्या व रायमुरारी सोईदेव याच्या चौथ्या शासनवर्षीच्या भाळवणी कानडी लेखामध्ये काही लोक व व्यापारी श्रेणीने येथील गवरेश्वर मंदिराला जमीन दान दिल्याचे, त्याचप्रमाणे काही करांचे दान दिल्याचे नमूद केले आहे. भाळवणी येथे मिळालेल्या शक संवत् १०९६ च्या लेखामध्ये या गावचे काही नेते, व्यापारी श्रेणींनी व त्यांच्या मुख्याधिकाऱ्यांनी भाळवणी येथील जैन विहाराच्या पूजेप्रीत्यर्थ काही जमीन दान दिल्याचा उल्लेख आहे.[१२]

याज्ञवल्क्य,[१३] नारदस्मृति, नीतिवाक्यामृत आणि मनुस्मृति या प्राचीन ग्रंथांमध्येही श्रेणींच्या कार्यपद्धतीवद्दल माहिती मिळते. प्रत्येक श्रेणीची स्वतःची कार्यकारी समिती असे. शिलाहार राजा गण्डरादित्य याच्या शक संवत् १०५८ च्या कोल्हापूर लेखामध्ये व राजा विजयादित्य याच्या शक संवत् १०६५-६६ च्या मिरज लेखामधील वर्णनानुसार चार जिल्ह्यातील लोक वीर बणंज या व्यापारी श्रेणीचे सभासद होते. याच जिल्ह्यांमधील १५ सभासदांची मिळून या श्रेणीची कार्यकारी समिती बनली होती. श्रेणीचे सामर्थ्य हे श्रेणीची सभासद संख्या व श्रेणीचे कार्यक्रम यावर अवलंबून असे.[१४] याज्ञवल्क्य आणि नारद[१५] हे श्रेणीच्या व त्यासारख्या इतर संस्थांच्या रूढी मोडण्यास प्रतिबंध करावा आणि त्यांना त्यांचे परंपरागत व्यवसाय कायम करू द्यावे असे राजाला सांगतात, तर राजाने श्रेणींचे कायदे व नियम जर ते समाजहिताच्या विरोधी नसतील तर त्यांचा आदर करावा असे याज्ञवल्क्य व मनुस्मृति सांगतात.[१६] मिताक्षराच्या[१७] वर्णनाप्रमाणे निरनिराळ्या जातीचे परंतु एकाच प्रकारचे काम करून आपला निर्वाह करणारे लोक हे श्रेणीचे घटक असतात. मिताक्षराचे श्रेणीची व्याख्या करताना पान विक्रेत्यांची श्रेणी, कुविन्द (कोष्टी), चर्मकार (जोडे बनविणारे) यासारख्या श्रेणींचा उल्लेख केला आहे. वाङ्मयीन उल्लेखांवरूनही निरनिराळे व्यवसाय करणाऱ्या लोकांच्या स्वतःच्या संघटना होत्या असे दिसते. तसेच त्यांच्या स्वतःच्या वसाहती देखील होत्या. प्रत्येक संघटनेची एक कार्यकारी समिती असे आणि या समितीची शक्ती संघटनेच्या सभासदांच्या संख्येवर त्याचप्रमाणे संघटनेच्या कार्यावरही अवलंबून असे.

## मुसलमान

वेगवेगळ्या जातींच्या आणि संघटनांच्या व्यतिरिक्त काही राजवंशांच्या लेखांमधील उल्लेखांवरून तसेच अबु इश्ताक अल् इश्तखी, इब्न हौकल यासारख्या मुसलमान लेखकांच्या आणि अल्बेरुणीच्या वर्णनावरून मुसलमान लोक देखील तत्कालीन समाजाचे घटक होते असे समजते. राष्ट्रकूट राजा इंद्र तृतीय याच्या शके ८४८ च्या चिंचणी लेखानुसार राजा कृष्ण याच्याकडून मधुमत नामक शासकाला पूर्ण संयान मंडळ मिळाले होते.[१८] मधुमत याला या ठिकाणी तापिक म्हणजे अरब असे म्हटले आहे. यावरून कोकण प्रदेशावर राष्ट्रकूट घराण्याच्या शासन काळात अरब मांडलिकांचे शासन होते असे दिसते. त्याचप्रमाणे शिलाहार राजा छित्तराज याच्या शक संवत् ९५६ च्या चिंचणी लेखातील वर्णनाप्रमाणे अल्लिय, महर व मधुमत हे संयान येथील प्रभावी नागरिक होते. मिराशींच्या मते हे मुसलमान व्यापारी होते.[१९] यादव राजा रामचंद्र याच्या शके १२१९ च्या कोपराड लेखानुसार महामंडलेश्वर कन्हरदेवाचा अधिकारी मुहमद याने आपल्या अधिकाराखाली असलेल्या प्रदेशातील जमीन देवीला दान दिली होती.[२०] वर उल्लेखिलेल्या मुस्लिम लेखकांच्या वर्णनाप्रमाणे राजा बल्हार याचे राज्य कॅम्बे ते सैमुरपर्यंत पसरले होते.[२१] या प्रदेशात बरेच हिंदू राजे होते आणि त्यांच्यावर बल्हारच्या वतीने हिंदू नव्हे तर मुसलमान अधिकारी शासन करीत असत. अल्बेरुणीच्या वर्णनाप्रमाणे हिंदूंचे धर्मवेड हिंदू धर्मिय नसलेल्या म्हणजे परदेशी लोकांशी वागताना प्रकर्षाने जाणवत असे.[२२] ते परदेशी लोकांना म्लेंच्छ म्हणजे अपवित्र समजत व त्यांच्याशी कोणताही संबंध ठेवीत नसत. याठिकाणी निरनिराळ्या राजवंशांच्या राजांनी दिलेल्या लेखांमध्ये काही स्थलनामांनी निर्देशित केलेल्या टोळ्यांच्या अस्तित्वाचीही दखल घेतली पाहिजे. उदाहरणार्थ, बदामीच्या चालुक्य वंशाच्या शके ६२७ च्या कुंडल लेखात आलेले पुलिंद हे नाव पुलोदांचे वसतीस्थान असले पाहिजे,[२३] तर राजा विजयादित्य याच्या बोपगांव ताम्रपटात[२४] उल्लेखिलेले दविलग्राम या प्रदेशातील द्रविड लोकांचे अस्तित्व सांगते. भोगशक्तीच्या कलचुरी संवत् ४६१ मधील अंजनेरी ताम्रपटाद्वारे मैरिक लोकांचे अस्तित्व जाणवते[२५] आणि शके ११९० व ११९७ च्या साग्रोली ताम्रपटातील[२६] सवरवल्ली हे स्थलनाम शबर लोकांच्या वस्तीचा निर्देश करते. त्याचप्रमाणे वट्टारिका,[२७] वट्टारग्राम[२८] आणि वट्टार[२९] ही अनुक्रमे विष्णुकुंडिन राजाचा खानापूर लेख, राष्ट्रकूट राजा इंद्र तृतीय याचा शके ८३६ चा वजीरखेडा लेख आणि चालुक्य राजाचा शके ९३० चा कौयेम लेख यामध्ये आलेली ही स्थलनामे वट्टार या भटक्या जमातीच्या वसाहतीचे अस्तित्व दर्शवितात. तसेच कोलपद्र,[३०] कोलमरुह,[३१] कोलपल्लिका[३२] ही अनुक्रमे राष्ट्रकूट राणी शिलमहादेवी हिचा शके ७०८ चा जेठावी लेख, यादव बल्लाळराय याचा शके ९२५ चा कोल्हापूर लेख आणि शिलाहार राजा छित्तराज याचा भोईघर लेख यामध्ये उल्लेखिलेली ग्रामनामे कोल लोकांच्या वस्तीचे अस्तित्व दर्शवितात. राष्ट्रकूट राजा इंद्र तिसरा याच्या शके ८४८ च्या चिंचणी लेखामध्ये एका शासन विभागाचे कोलीमहार असे नाव दिले आहे.[३३]

या विभागाचे तादात्म्य ठाणे जिल्ह्यामध्ये कोली व महार यांची वस्ती असलेल्या प्रदेशाशी करणे शक्य आहे. याप्रमाणे नावे असलेली बरीच स्थलनामे आहेत. ही नावे या स्थळी तेथे पहिल्याने वस्ती करण्यास आलेल्या लोकांवरून पडली असण्याची शक्यता आहे. या लोकांशिवाय बाहेरच्या देशातून आलेले लोकही महाराष्ट्रातील तत्कालीन समाजाचे घटक होते. नाशिक आणि कार्ले येथील शैलगृह लेखांमध्ये[३४] यवन आणि शक लोकांचा देणगीदारांमध्ये अंतर्भाव होतो. यांच्यापैकी बरेच लोक याही काळात येथे रहात असावेत. यावरून या काळी चार प्रमुख वर्णांचे लोक, त्याचप्रमाणे अस्पृश्य समजले जाणाऱ्या लोकांसह वेगवेगळे व्यवसाय करणारे लोक, रानटी लोक व परदेशीय हे तत्कालीन महाराष्ट्रीय समाजाचे घटक असले पाहिजेत. या घटकांच्या सामाजिक दर्जाचा ऊहापोह खाली केला आहे.

## ब्राह्मण

चार प्रमुख वर्णांपैकी पहिल्या तीन वर्णांना समाजामध्ये उच्च दर्जा होता. यांच्यापैकी ब्राह्मणांना समाजात खास मान मिळत असे. या काळातील ब्राह्मण समाजाची व्यवसायाच्या आधारावर दोन गटांमध्ये विभागणी झाली होती. पहिल्या गटातील लोक आपली नियत कर्तव्ये करीत, तर दुसऱ्या गटातील लोक निरनिराळ्या प्रकारचे व्यवसाय करीत. त्यापैकी पहिल्या वर्गातील ब्राह्मणांना वेद, वेदांगाचे अध्ययन व धर्मविधी करण्याकरिता जमिनी व ग्रामे (गाव) यांच्या देणग्या मिळत असत. चालुक्य राजाच्या इ. स. ५७८ च्या गोडची ताम्रपटात उल्लेखिलेला दान घेणारा ब्राह्मण क्षिरस्वामिन् हा वेदविद्येमध्ये पारंगत होता (वेद-वेदांग-पारगह) आणि सर्व अतिथींचे (सर्वातिथी) स्वागत करणारा होता.[३५] राजा पुलकेशी द्वितीय याच्या शके ५३६ च्या कंदलगाव ताम्रपटामध्ये[३६] बलि, चरु, वैश्वदेव वगैरे धर्मविधी करणाऱ्या ब्राह्मणाला दान दिल्याचा उल्लेख आहे. याच वंशाच्या शके ५५२ च्या लोहनेर लेखामध्ये गोवियाणक ग्राम दाम दीक्षित नामक ब्राह्मणाला पाच याग करण्याकरिता दिले होते.[३७] हे गाव राजघराण्याला येथून मिळणाऱ्या सर्व उत्पन्नासह दान दिले होते. राष्ट्रकूट राजा ध्रुव याच्या इ. स. ७७९ च्या धुळे ताम्रपटात[३८] उल्लेखिलेला दान घेणारा ब्राह्मण वेद, वेदांगे, इतिहास, पुराणे, व्याकरण, मिमांसा, तर्कशास्त्र, निरुक्त आणि पूजाविधी इत्यादि विद्यांमध्ये पारंगत होता असे स्पष्ट होते. शिलाहार नृपति मुम्मुणिराज याच्या शक संवत् ९७१ मधील प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियम ताम्रपटामध्ये ब्रह्मपुरी अग्रहारातील १२ ब्राह्मणांना पाच महायज्ञ करण्याकरिता मंदरज विषयातील किइच्छिता ग्राम दान दिल्याचा उल्लेख आहे.[३९] यादव राजा सिंघण याच्या वेळच्या पुळूंज कानडी लेखामध्ये पुळूंज येथील ब्राह्मण वस्तीचा उल्लेख आहे.[४०] लेखातील वर्णनाप्रमाणे येथील महाजन हे वेद, वेदांगे आणि तत्त्वज्ञानात पारंगत होते. ते श्रीमंत, विद्यासंपन्न होते आणि यजन, याजन, अध्ययन, अध्यापन, दान आणि प्रतिग्रह या सहा कर्मात मग्न होते. अल्बेरुणी अशा ब्राह्मणांना "इस्टिन" असे नाव देतो.[४१] अल इद्रिसी "इस्टिन" ब्राह्मणाचे वर्णन 'वाघाचे आणि इतर पशुंचे कातडे परिधान करणारे व लोकांच्या जमावाला परमेश्वर व

त्याचे महत्त्व सांगणारे'[६२] असे करतो. काही वेळेस वेदअध्ययन केलेल्या ब्राह्मणांचे कौतुक करण्याकरिता तसेच धर्मग्रंथांचे अध्यापन करण्यासाठी ब्राह्मणांना दाने देत. उदाहरणार्थ, राष्ट्रकूट राजा दंतिदुर्ग याच्या शके ६६३ किंवा ६६४ च्या वेरूळ ताम्रपटामध्ये चंदनपुरी विषयातील दिप्पलाल हे गाव अग्निहोत्र आणि यासारखे इतर धार्मिक विधी करण्याकरिता ब्राह्मणाला दान दिल्याचा उल्लेख आहे.[६३] स्मृतिंमध्ये सांगितलेल्या ब्राह्मणांच्या सहा कर्तव्यांपैकी अध्यापन हे एक त्यांचे कर्तव्य होते. उपलब्ध लेखांमध्ये उल्लेखिलेली काही अग्रहार ग्रामे या काळात विद्येची व उच्च शिक्षणाची केंद्रे बनली होती. राष्ट्रकूट राजा गोविंद चतुर्थ याच्या कळस लेखानुसार कळस हे अग्रहार ग्राम होते व या ठिकाणी संस्कृत विद्यालय होते.[६४] येथील दोनशे गृहस्थाश्रमी ब्राह्मण हे व्याकरण, राज्यकारभार शास्त्र (Politics), साहित्य शास्त्र (literary composition), पुराणोक्त कथा (legendary lore), एकाक्षरा संथाचे तर्कशास्त्र आणि भाष्यशास्त्र यामध्ये प्रविण होते. या लेखांमध्ये सांगितल्याप्रमाणे देणगीचा काही भाग शिक्षकांचे वेतन देण्यासाठी राखून ठेवलेला असे.[६५] त्याचप्रमाणे १४ शास्त्रांमध्ये प्रविण असलेल्या १००२ ब्राह्मण वस्तीचे कुक्कुनुरू अग्रहार (स्थळ) यादव शासनकालात प्रसिद्ध होते.[६६] पुळूंज लेखानुसार येथील महाजन वेद, वेदांग व तत्त्वज्ञान या विषयांमध्ये पारंगत होते.[६७] त्यांच्या विचारांचे प्रतिबिंब स्मृति, पुराणे, काव्य, नाटके यामध्येही पडलेले दिसते. शिलाहार राजांच्या कोरीव लेखांमध्येही अग्रहारांचा उल्लेख मिळतो.[६८] याप्रमाणे चालुक्य राजवंशापासून यादव वंशापर्यंतच्या राजांनी दिलेल्या लेखांद्वारे ब्राह्मणांना वेगवेगळ्या उद्देशांनी दिलेल्या दानाची माहिती मिळते. या लेखांमधील वर्णनावरून समाजामध्ये वेदविद्येमध्ये पारंगत असलेल्या व आपली सहा कर्तव्ये पार पाडत असलेल्या ब्राह्मणांना समाजात आदराचे व मानाचे स्थान होते आणि फक्त याच ब्राह्मणांची दानाकरिता निवड होत असे हे स्पष्ट होते.

**ब्राह्मण अधिकारी** : स्मृतिमध्ये सांगितलेल्या सहा कर्मांव्यतिरिक्त ब्राह्मण समाजातील लोक इतर व्यवसायही करीत. समाजातील विद्यासंपन्न व्यक्ती म्हणून त्यांची राज्य शासनाच्या कार्यातही मदत होत असे. बऱ्याच ब्राह्मणांनी सरकारी नोकरीत प्रवेश केला होता आणि ते राजाचे सल्लागार, मंत्री म्हणून तसेच मुलकी खात्यातही (Civil Services) नोकरी करीत. परंतु कोरीव लेखांमध्ये दरबारी अधिकाऱ्यांची जात क्वचितच दिलेली असते. त्यामुळे अधिकाऱ्यांच्या पदांवर कामे करणाऱ्या ब्राह्मणांबद्दलची माहिती फारच मर्यादित आहे. वर्तमान काळाप्रमाणे पंतप्रधानाचे पद उच्च प्रतीचे होते. शुक्रनीतिमध्ये पंतप्रधानाचे सर्वदर्शीत किंवा मंत्रिमंडळाचा प्रमुख व्यवस्थापक असे वर्णन केलेले आहे.[६९] यावरूनही या पदाच्या दर्जाची कल्पना येते. त्याचा प्रधान हा हुद्दा आता महाप्रधान असा बदलला होता. बदामीच्या चालुक्य राजांच्या दरबारी, विद्येच्या सर्व शाखांमध्ये पारंगत असलेले ब्राह्मण महाप्रधानाच्या पदावर काम करीत होते. चालुक्य नृपति कीर्तिवर्मन प्रथम याच्या १२ व्या शासन वर्षीच्या गोडची ताम्रपटात[७०] उल्लेखिलेला त्याचा प्रधान महाब्राह्मण व्याघ्रस्वामिन् हा सर्व वेद, राजनीति, शास्त्र, व्याकरण, काव्य इत्यादि विषयांमध्ये प्रविण होता. ऐतिहासिक वाङ्मय, संगीत व पुराणे

याविषयीचे त्याचे ज्ञान अलौकिक असे होते. तो त्याच्या काळचा बृहस्पती मानला जाई. आळतेकरांनी म्हटल्याप्रमाणे राष्ट्रकूट राजाच्या दरबारी बरेच ब्राह्मण मंत्रीपदावर होते.[५१] कल्याणीच्या चालुक्य दरबारी असलेला मुख्यमंत्री धल्ल हा ब्राह्मण होता[५२] व मुख्यमंत्री म्हणून पूर्ण राज्याच्या राज्यकारभाराची जबाबदारी त्याच्यावर होती. त्याचप्रमाणे चालुक्य विक्रमादित्याच्या गदग लेखामध्ये ज्याचे वर्णन महाप्रधान म्हणून आलेले आहे, तो सोमेश्वर भट्टोपाध्याय सर्व विद्याशाखांमध्ये पारंगत होता. मिराशींच्या मते शिलाहार राजांच्या लेखामध्ये उल्लेखिलेल्या ज्या महाप्रधान, महाअमात्य, भांडागारिक सेन यासारख्या अधिकाऱ्यांची नावे आर्य पदान्त आहेत ते अधिकारी ब्राह्मण असावेत. उदाहरणार्थ, केशपार्य, झंझपैय[५३] इत्यादि. त्यांचे हे मत ग्राह्य धरले तर राजा अनंतदेव प्रथम याच्या विहार लेखामधील महाप्रधान नागनैय हाही ब्राह्मण असला पाहिजे.[५४] यादव वंशीय राजे विद्यासंपन्न विद्वान ब्राह्मणांना जबाबदारीच्या पदांवर नियुक्त करीत. उदाहरणार्थ, यादव राजा भिल्लम तृतीय याच्या शके ९४८ च्या कळस बुद्रुक लेखात[५५] उल्लेखिलेला त्याचा महाप्रधान मानवनायक हा श्रीभट्टाचा पणतु होता. अर्थशास्त्र व मनुस्मृति यामध्ये परराष्ट्र मंत्र्याचे वर्णन दूत असे केलेले आहे.[५६] उपलब्ध असलेल्या बहुतेक सर्व लेखांमध्ये त्याचा उल्लेख दूत ऐवजी महासंधिविग्राहिक (किंवा सांधिविग्रहिक) म्हणून केलेला दिसतो. या संज्ञेचा शब्दशः अर्थ शांति आणि युध्दकर्ता असा होत असल्यामुळे त्याची नियुक्ती परराष्ट्राशी संबंधित कार्ये करण्यासाठी होत असावी. या भूमिकेतून त्याला शत्रूराष्ट्रे तसेच मांडलिक व अंकित राष्ट्रांशीही व्यवहार करावे लागत असावेत. यामुळे परराष्ट्रीय संबंध हाताळण्यासाठी आवश्यक असलेल्या कौशल्याखेरीज त्याला बऱ्याच भाषा व लिपी अवगत असाव्यात, महत्त्वपूर्ण घटनांचे ज्ञान असावे, तसेच सर्व समस्यांवर उपाय शोधण्याचे कसबही त्याच्याकडे असावे अशी **मानसोल्लास** या ग्रंथामध्ये अपेक्षा व्यक्त केली आहे.[५७] यावरून वर्तमान काळाप्रमाणे सांधिविग्रहिकाचे पद या काळातही राजकीयदृष्ट्या महत्त्वाचे होते हे स्पष्ट होते. जेजुरी,[५८] मानोर,[५९] कासारशिरसी,[६०] एलापूर[६१] आणि नरवण[६२] या लेखांनुसार चालुक्य दरबारी महासंधिविग्राहिकाच्या पदासाठी ब्राह्मणांचीच निवड होत होती असे दिसते. यापैकी राजा विनयादित्य याचा शके ६०९ चा जेजुरी ताम्रपट महासंधिविग्राहिक रामपुण्यवल्लभ याने लिहिला आहे. परंतु याच राजाच्या शके ६१३ च्या मानोर ताम्रपटाप्रमाणे सांधिविग्राहिक भट्ट रुद्रनाग हा तीन अधिकार पदे सांभाळीत होता असे स्पष्ट होते. कासारशिरसी या शके ६१९ च्या विजयादित्याच्या लेखामध्ये महासंधिविग्राहिक रामपुण्यवल्लभ याचा उल्लेख आहे, तर एलापूर ताम्रपट (शके ६२९) निरवध पुण्यवल्लभ हा सांधिविग्राहिक होता म्हणून सांगतो. राजा विक्रमादित्य याचा शके ६६४ चा नरवण ताम्रपट महासंधिविग्राहिक अनिवारित पुण्यवल्लभ याने लिहिला होता. या सर्व लेखांमध्ये उल्लेखिलेले महासंधिविग्राहिक हे पुण्यवल्लभ वंशाचे होते[६३] व त्यांची निरवध ही पदवी होती. वर उल्लेखिलेल्या मानोर ताम्रपटाचा लेखक रुद्रभाग हा कुमारस्वामि दीक्षितचा पुत्र होता. त्याचा उल्लेख निरवध परमेश्वर असाही केलेला आहे.

हा ब्राह्मण होता त्याअर्थी, सर्व निरवध पुण्यवल्लभ ब्राह्मण असावेत असे डी. पी. दीक्षित सुचवितात. शिलाहार राजा छित्तराज याच्या शक संवत् ९४८ च्या भांडूप ताम्रपटामध्ये[६४] उल्लेखिलेला सिहपैय आणि राजा अनंतदेव प्रथम याच्या शक संवत् १०१६ च्या खारेपाटण ताम्रपटामध्ये[६५] ज्याचे नाव महासंधिविग्राहिक म्हणून आलेले आहे तो ऋसिभट्ट हे ब्राम्ह्मण असावेत असे त्यांच्या ऐय (आर्य आणि भट्ट) पदान्त नावावरून वाटते. उपलब्ध कोरीव लेखानुसार महसूल अधिकाऱ्यांना महाअक्षपटलिक असे म्हणत. तसेच शासनाधिकारी अशीही संज्ञा होती. त्याने शेतजमिनीची मालकी, वहिवाट इत्यादिसंबंधी सर्व व्यवहार पहावे अशी अपेक्षा असे. काही वेळेस एकच व्यक्ती सांधिविग्राहिक आणि महाअक्षपटलाधिप म्हणून काम करीत असे. उदा. चालुक्य राजा विनयादित्याच्या शके ६१३ च्या मानोर ताम्रपटातील भट्ट रुद्रनाग हा दिविरपति होता,[६६] तसेच अक्षपटलाधिकरणाधिपति व सांधिविग्राहिकही होता. त्याच्या नावावरून तो ब्राह्मण असावा. दंडनायक या बहुतेक न्यायदानाशी संबंधित पदावरही ब्राह्मण काम करत असावेत. कल्याणीच्या चालुक्य राजांच्या काही लेखांमध्ये दंडनायकाचे काम करणाऱ्या ब्राह्मणांची नावे मिळतात. यांच्यापैकी काहीजण लेखांचा मसुदाही तयार करीत. राजा विक्रमादित्याचा धर्माधिकारी सोमेश्वर भट्टोपाध्याय हा महाप्रधान होता, त्याचप्रमाणे दंडनायकही होता.[६७] पुरोहित या अधिकाऱ्याला जरी या काळातील मंत्रिमंडळात स्थान नसले तरी राजदरबारी त्याला महत्त्वाचे स्थान होते. धार्मिक आणि नैतिक बाबी त्याच्याकडे सोपविलेल्या असत. शुक्रनीतिमध्ये सांगितलेल्या धर्म आणि नितिमंत्र्याशी त्याचे साम्य असावे. हा अधिकारी आरंभिच्या राष्ट्रकूटांच्या काळीही ज्ञात होता.[६८] आळतेकरांच्या मते तो अशोकाच्या धम्ममहामात्य, आंध्रांचा समनमहामात (नाशिक लेख) आणि वैशाली येथे मिळालेल्या मुद्रेवर उल्लेखिलेल्या गुप्तकालीन विनयस्थितिस्थापक या अधिकाऱ्यांप्रमाणे असावा. राष्ट्रकूट राजा नन्न याच्या मूलताई लेखामध्ये[६९] या अधिकाऱ्याचा उल्लेख आहे. तसेच प्रतापशील याच्या सुमारे आठव्या शतकातील खामखेड लेखामध्ये ईश्वरभट्ट व नागम्भट्ट या पुरोहितांची नावे आहेत.[७०] त्यांची भट्ट पदान्त नावे ते ब्राह्मण असावेत असे सुचवितात. शिलाहारांच्या काळात कौटिल्याने सांगितलेला समाहर्ता व शुक्राने उल्लेखिलेला सुमंत ही खजिनदारांची पदेही ब्राह्मणांकडेच होती असे राजा छित्तराजाच्या शक संवत् ९४९ च्या दिवेआगर आणि इतर लेखांवरून दिसते.[७१] शिलाहाराच्या लेखांमध्ये[७२] त्याला भाण्डागारसेन म्हटलेले आहे.

**ब्राह्मण सैनिक** : काही ब्राह्मणांनी सैनिकी पेशाही स्वीकारला होता. मानोर ताम्रपटातील महाबलाधिकृत भट्ट रुद्रनाग हा ब्राह्मण होता.[७३] कल्याणीचा चालुक्य राजा तैल द्वितीय याच्यानंतर येणाऱ्या राजांच्या शासनकाळात पुढे आलेला नागदेव धल्लचा पुत्र हा उत्तम सैनिक होता.[७४] तसेच चालुक्य राजा आहवमल्ल सोमेश्वर प्रथम ह्याच्या दरबारी असलेला शूर योद्धा व राजनीतिज्ञ मधुवरस हा परंपरेने सैनिक आणि राजनितिज्ञ असणाऱ्या मूळ ब्राह्मण घराण्यातील होता. त्याने आपल्या राजाला बरीच

प्रसिद्धी मिळवून दिली. राष्ट्रकूट राजा गोविंद चतुर्थ याच्याकडे रेवदास दीक्षित व विशोत्तर दीक्षित हे सेनापती होते,[७५] तर यादव राजदरवारी शके ११५० चा आंबे लेख देणारा खोलेश्वर हा ब्राह्मण सेनापती होता.[७६] तसेच यादव नृपति रामचंद्र याच्या शके ११९४ च्या ठाणे लेखाप्रमाणे प्रसिद्ध कवी हेमाद्रि याने झाडीमंडल जिंकले होते.[७७]

**ब्राह्मण शेतकरी** : या काळामध्ये शेती करणे हाही ब्राह्मणांचा एक आवडता व्यवसाय होता. वेगवेगळ्या राजवंशाच्या राजांनी दिलेल्या वहुतांशी दानपत्रांमध्ये धार्मिक पुण्य मिळविण्याच्या उद्देशाने ब्राह्मणांना जमिनी व गावे दान दिल्याची माहिती मिळते. ही दाने मूलतः अन्नधान्य प्राप्ती आणि महसूल वाढविण्यासाठी दिली जात असावीत. या दान दिलेल्या जागी वस्तीला आलेले ब्राह्मण कनिष्ठ जातीच्या व कामकरी वर्गाच्या लोकांसह वस्ती करून राहत आणि त्यांच्या मदतीनं शेतीची कामं करीत. यामुळे ब्राह्मणांची नावे असलेली शेते व गावे अस्तित्वात आली असावीत. शिलाहार राजांच्या काही लेखांमध्ये ब्राह्मणांची नावे असलेल्या शेतांचा उल्लेख आहे. उदाहरणार्थ, राजा छित्तराज याच्या शक संवत् ९४८ च्या भांडूप लेखातील[७८] वोडणिभट्टाच्या शेताचा उल्लेख.

याठिकाणी उपलब्ध वाङ्मयीन पुराव्याचाही या दृष्टीनं विचार करावा लागेल. आरंभिच्या धर्मशास्त्रांनी ब्राह्मणांना अडचणीच्या प्रसंगी त्यांच्या नेमून दिलेल्या व्यवसायांव्यतिरिक्त निर्वाहासाठी इतर व्यवसाय करण्याची परवानगी दिली होती. परंतु कालांतराने हे ब्राह्मणांचे सामान्य उद्योग वनले. या काळामध्ये निर्माण झालेल्या स्मृति-ग्रंथांना या व्यवसायांसंवंधी ब्राह्मणांवर असलेले निर्बंध काही प्रमाणात काढून घ्यावे लागले. निरनिराळ्या वेळी ग्रंथकरांनी या व्यवसायांचा वेगळ्या दृष्टीने विचार केलेला दिसतो. त्यामुळे याविपयी वेगवेगळी मते असणे स्वाभाविकच आहे. काही वेळेस ही मते परस्परविरोधीही आढळतात. उदाहरणार्थ, काही स्मृतिकारांच्या मते ब्राह्मणांनी मुळीच नोकरी करू नये, तर मनुच्या मते मंत्री व न्यायाधीश या पदांवर केवळ ब्राह्मणांचीच नियुक्ती करावी.[७९] आपस्तंब धर्मसूत्र हे ब्राह्मणांनी सैनिकी पेशा स्वीकारण्याच्या विरुद्ध आहे, तर गौतम धर्मसूत्र अडचणीचे प्रसंगी हा पेशा ब्राह्मणांनी स्वीकारावयास हरकत नाही असे सांगते. काही ग्रंथकार तर काही विशिष्ट उद्दिष्टे साध्य करण्यासाठी हा पेशा ब्राह्मणांनी स्वीकारावा असे मत व्यक्त करतात.[८०] अशी परस्परविरोधी मते जरी प्रचारात असली तरी प्राचीन काळापासून ब्राह्मण हे सेनापती व राज्य संस्थापक असल्याची उदाहरणे मिळतात.[८१] ही प्रथा ह्या काळातही अस्तित्वात होती. असाच प्रकार ब्राह्मणांनी वैश्य व्यवसाय करण्याबावतही आढळतो. गौतम धर्मसूत्र ब्राह्मणांना दुसऱ्याच्या द्वारे वस्तुविक्रय व सावकारी करून आपला निर्वाह करावयास परवानगी देते, तर वसिष्ठ धर्मसूत्र, आपस्तंव धर्मसूत्र व नारदस्मृति अडचणीच्या प्रसंगीही ब्राह्मणांना सावकारी करण्याची परवानगी देत नाहीत. परंतु बृहस्पती मात्र सावकारी हा ब्राह्मणांसाठी उत्तम व्यवसाय असल्याचे सांगतो. बृहस्पती, हारित पाराशर आणि कूर्म पुराण, मनुच्या विरुद्ध जाऊन शेती हा ब्राह्मणांसाठी सामान्य उद्योग असल्याचे

सांगतात. आपस्तंब धर्मसूत्र शेती, पशुपालन हे व्यवसाय आपत्धर्म व्यवसाय सांगण्याऐवजी सामान्य उद्योग असल्याचे सांगते.[८२] बृहतृपाराशर ब्राह्मण शेतकऱ्यांचा करांच्या संदर्भात उल्लेख करतो.[८३] स्कंद पुराणाच्या सह्याद्री खंडामध्ये ब्राह्मण शेतकऱ्यांबद्दल मनोरंजक माहिती मिळते. याठिकाणी दिलेल्या कथेप्रमाणे राजा मयूरवर्मन याने बऱ्याच ब्राह्मणांना गोव्यामध्ये वस्ती करण्यास पाचारण केले. या ब्राह्मणांनी वाघ, नाग वगैरे रानटी जनावरांनी व घनदाट जंगलांनी व्याप्त असलेली ३२ गावे वसविली. त्यांना मदत करण्याकरिता म्हणजे जंगल वगैरे साफ करण्याकरिता गावडा, कुणबी, खालच्या जातीचे शेतकरी यासारख्या मूळ रहिवाशांना बोलावले आणि ब्राह्मण व हे लोक यांच्यामध्ये झालेल्या कराराप्रमाणे त्यांनी आपापसात फायदा वाटून घ्यावा असे ठरले. याप्रमाणे जमिनी प्रत्यक्ष ताब्यात असणाऱ्या लोकांच्या व जमिनीवर प्रत्यक्ष काम करणाऱ्या लोकांच्या नवीन व वेगळ्या अशा वसाहती अस्तित्वात आल्या. कालांतराने शेतकरी व कामकरी यांच्या वसाहतीतून स्वतंत्र गावे अस्तित्वात आली. शासनकर्त्यांनी वेळोवळी ब्राह्मणांना दान दिलेल्या जमिनी व गावांपैकी निदान जमिनी व गावे तरी ह्या कथेमध्ये वर्णिलेल्या गावांच्या प्रकारची असावीत किंवा याप्रमाणे उदयाला आली असावीत. लेखांमध्ये उल्लेखिलेली ब्रह्मपुरी नाव असलेली काही गावे ब्राह्मण शेतकऱ्यांची असावीत. हे ब्राह्मण शेतकरी स्वतंत्र वसाहती असणाऱ्या कामगारांच्या मदतीने शेतीची कामे करीत असावेत.[८४]

**परदेशी प्रवाशांची इतिवृत्ते** : प्रसिद्ध परदेशी प्रसावी अबुझैद याच्या निरीक्षणाप्रमाणे बहुतांश न्यायाधीश, गणितज्ञ, कवी, तत्त्ववेत्ते हे ब्राह्मण समाजातील होते.[८५] अल्बेरुणीच्या मताप्रमाणे इ. स. ११ व्या शतकामध्ये काही ब्राह्मणांनी वैश्य लोकांना प्रत्यक्ष व्यापारउद्योग करण्याकरिता ठेऊन व्यापारामध्ये अप्रत्यक्षरित्या प्रवेश केला होता.[८६] मार्को पोलो मोत्यांचा आणि हिऱ्यांचा व्यापार करणाऱ्या लाट ब्राह्मणांचा उल्लेख करतो.[८७]

**ब्राह्मण आणि कर पद्धती** : राजाने ब्राह्मणांकडून कोणताही कर घेऊ नये असे बहुतांश स्मृति सांगतात. तरीही एक गोष्ट या ठिकाणी लक्षात घेतली पाहिजे की, मूलतः ही करमाफी फक्त श्रोत्रिय किंवा विद्यासंपन्न ब्राह्मणांनाच दिली होती. परंतु वसिष्ठ आणि विष्णू धर्मसूत्रांप्रमाणे ही करमाफी सर्व ब्राह्मणांनाच दिली होती. ब्राह्मणांनी धार्मिक विधी वगैरे करून जे धार्मिक पुण्य मिळविलेले असते त्यामध्ये राजाच्याही हिश्शास मान्यता होती. वसिष्ठच्या म्हणण्याप्रमाणे ब्राह्मणांनी यज्ञविधी करून व जनकल्याणासाठी दाने देऊन जे पुण्य संपादन केलेले असते त्या पुण्यामध्ये राजाचा १/६ भाग किंवा हिस्सा असतो. विष्णू धर्मसूत्रानुसार ब्राह्मण धार्मिक पुण्याच्या रूपाने कर भरतात. मनुच्या मते राज्याच्या संरक्षणाखाली श्रोत्रिय ब्राह्मण जे धार्मिक पुण्य संपादन करतात त्यायोगे राजाचे आयुष्य, संपत्ती व राज्य यांची वृद्धि होते. थोडक्यात, रचनाकारांच्या मते करमाफीचा विशेष हक्क हा फक्त विद्वानं ब्राह्मणांनाच द्यावयास हवा. शांतिपर्वामध्ये ब्राह्मणांची ब्रह्मसम, देवसम, क्षत्रसम आणि वैश्यसम अशी

चार वर्गामध्ये विभागणी केलेली आहे. यात पुढे असेही सांगितले आहे की, जेव्हा राजाची तिजोरी रिकामी असेल तेव्हा राजाने ब्रह्मसम व देवसम या वर्गातील ब्राह्मणांना वगळून सर्व ब्राह्मणांवर कर लावावे. त्याचप्रमाणे जे श्रेत्रिय ब्राह्मण नाहीत व जे अग्निजी पूजा करीत नाहीत त्या ब्राह्मणांवर कर लावावे[८८] असाही सल्ला येथे राजाला दिलेला आढळतो. याशिवाय जे ब्राह्मण व्यापार आणि उद्योगात शिरले आहेत त्यांच्यावर पूर्ण कर लावावेत असेही स्पष्ट सांगितले आहे.[८९] या माहितीवरून असे दिसते की, इतर ब्राह्मण वगळून श्रेत्रिय ब्राह्मणांना करमाफी, असावी याबद्दल सर्व प्राचीन सर्वमान्य लेखकांमध्ये एकमत होते. प्राचीन शासनकर्त्यांनीही त्यांच्या शिफारशींचे पालन केलेले दिसते. सर्व विद्याशाखांमध्ये आणि निरनिराळ्या शास्त्रांमध्ये पारंगत असणाऱ्या व आपली नेमून दिलेली सहा कार्ये व्यवस्थित पार पाडणाऱ्या ब्राह्मणांना जमिनी व गावे त्यांच्यापासून राजघराण्याला मिळणाऱ्या सर्व उत्पन्नासह दान दिल्याची नोंद काही कोरीव लेखांमध्ये मिळते. उदा. चालुक्य राजा पुलकेशी दुसरा याच्या शके ५५२ च्या लोहनेर लेखानुसार अशाप्रकारे गोवियाणक ग्राम दान दिले होते.[९०] तसेच राजा विनयादित्यानेही दोन गावांचे करमुक्त उत्पन्न व दाने गावांमधील प्रत्येकी ५०-५० निवर्तने जमीन ब्राह्मणांना दान दिली होती असे त्याच्या शके ६१५ च्या कोल्हापूर लेखावरून समजते.[९१] आळतेकरांच्या म्हणण्याप्रमाणे[९२] ब्रह्मदेय देणगी मिळणाऱ्या विद्वान ब्राह्मणांना तेथील रहिवाशांकडून राजाला मिळणारे सर्व करांचे उत्पन्न मिळत असे व या ब्राह्मणांना स्वतः राजाला काहीही कर द्यावे लागत नसत असे राष्ट्रकूट राजांच्या कित्येक कोरीव लेखांद्वारे स्पष्ट होते. कल्याणीचा चालुक्य राजा आहवमल्ल सोमेश्वर याच्या दरबारी असलेला सांधिविग्रहिक रविदेव याने त्याला राजाकडून मिळालेली तीन गावे त्या त्या गावच्या ब्राह्मणांना कायमची करमुक्त करून दिली होती.[९३] त्याचप्रमाणे यादव राजा सिंघण याच्या धारवाड ताम्रपटातील[९४] वर्णनाप्रमाणे मल्लिश्रेष्ठीने १८० निर्वतने जमीन वेगवेगळ्या गावांच्या कित्येक ब्राह्मणांना करमुक्त करून दिली होती. धर्मशास्त्रामध्ये नोंदवलेले श्रेत्रिय ब्राह्मण या प्रकारचे असावेत. उपलब्ध लेखामध्ये सर्व ब्राह्मणांना करमाफी होती असे कोठेही म्हटलेले नाही. अशा परिस्थितीत वेगवेगळ्या धर्मातील उद्योग, व्यवसाय करणाऱ्या सामान्य ब्राह्मणांना पूर्ण करमाफी होती असे म्हणता येणार नाही.

**ब्राह्मण आणि मृत्युदंड :** बऱ्याच स्मृतिकारांनी ब्राह्मणांला देहान्त शिक्षा न भोगण्याचा विशेष अधिकार दिलेला आहे. प्राचीन काळी ब्रह्महत्या किंवा ब्राह्मण वध करणे हे पाप समजले जात असे. मनुने अपराधी व्यक्तींच्या यादीत ब्राह्मणांचाही समावेश केलेला आहे. परंतु मनु त्याचप्रमाणे विष्णू-धर्मसूत्र व मत्स्यपुराण यांची आततायी ब्राह्मणांचा वध करण्यास हरकत नव्हती. मिताक्षरा, अपरार्क आणि आपस्तंव यांच्या मते सुमन्तु सारख्या अधिकारी लेखकाची आततायी ब्राह्मणांना देहदंड देण्याची किंवा देहांताची शिक्षा देण्याची तयारी नव्हती.[९५] इतर जातीच्या व्यक्तीला ज्या गुन्ह्यासाठी ही सजा दिली जाई त्या गुन्ह्यासाठी ब्राह्मणाला अंध करून हद्दपारीची शिक्षा द्यावी असे आपस्तंव धर्मसूत्र सांगते.[९६] तत्कालीन राजांनी ब्राह्मणांना ही सजा देण्याचे टाळले असे दिसते.

अल्बेरुणी आणि बुचेट (Bouchet) यांच्या वर्णनावरूनही ही गोष्ट सिद्ध होते. त्यांच्या वर्णनाप्रमाणे उत्तर भारतामध्ये इ. स. च्या अकराव्या शतकामध्ये ब्राह्मणांना अतिशय कडक शिक्षा देत नसत आणि दक्षिण भारतामध्ये इ. स. च्या १७ व्या शतकापर्यंत ब्राह्मणांना कडक शिक्षा देण्याची प्रथा नव्हती. ब्राह्मणाला मृत्यूदंड दिला जात नसे. परंतु त्याची सर्व संपत्ती जप्त करून त्याला शिक्षा म्हणून हद्दपार करण्याची प्रथा होती असे अल्बेरुणी सांगतो.[९७] ब्राह्मणाने मौल्यवान व किंमती वस्तू चोरण्याचा गुन्हा केला तर त्याला आंधळे करून त्याचा उजवा हात व डावा पाय कापण्याची शिक्षा देत. यावरून असे म्हणता येईल की, जरी तत्कालीन शासक ब्राह्मणांना देहांताची सजा देण्याचे टाळत असले तरी धर्मशास्त्रांनी देहांताऐवजी सांगितलेल्या शिक्षा फारच कडक होत्या. याशिवाय देहांतशिक्षा न मिळण्याच्या विशेष अधिकाराचेही काटेकोरपणे पालन होई असे म्हणता येत नाही. उदाहरणार्थ, देशद्रोही ब्राह्मणाला पाण्यात बुडविण्याची शिक्षा व्हावी असे कौटिल्य सांगतो.[९८] राजतरंगिणिमध्ये जुलमी राजांनी काही वेळेस ब्राह्मणांना फाशी दिल्याचीही उदाहरणे मिळतात.[९९] शिवाय सैन्यामध्ये नोकरी करणाऱ्याला हा विशेष अधिकार मिळणे शक्यच नव्हते. ब्राह्मण वर्गाची नेमून दिलेली कामे न करता इतर व्यवसाय करणाऱ्या ब्राह्मणांना सामान्य नागरिकांप्रमाणेच वागणूक मिळत असली पाहिजे.

**उपजाती व कुलनाम** : उपलब्ध उत्किर्ण लेखातील माहितीवरून या काळातील ब्राह्मण एका प्रदेशातून दुसऱ्या प्रदेशात कायम राहण्यासाठी निर्भयपणे जात होते असे दिसते. चालुक्य राजा पुलकेशी प्रथम याच्या लोहनेर ताम्रपटातील दान स्वीकारणारा ब्राह्मण गिरनारहून आला होता.[१००] राष्ट्रकूट नृपति गोविंद दुसरा याच्या अळस ताम्रपटाप्रमाणे आणि गोविंद तृतीय याच्या दिंडोरी ताम्रपटाप्रमाणे वेंगीहून आलेल्या ब्राह्मणांना दाने दिली होती.[१०१] शिलाहार राजा विक्रमादित्य याच्या शक संवत् १०६१ मधील पन्हाळे लेखात वाराणसीहून आलेल्या ब्राह्मणांचा, तर राजा मुम्मुणिराज याच्या शक संवत् ९७१ च्या ताम्रपटामध्ये गौंड, मध्यदेश आणि मुंजस्थानाहून आलेल्या ब्राह्मणांचा उल्लेख आहे. याच राजाच्या शक संवत् ९७० च्या ठाणे ताम्रपटात उल्लेखिलेले ब्राह्मण करहाट व मध्यदेशामधून आले होते.[१०२] या ब्राह्मणांना जमिनी व गावे दान मिळाल्यामुळे ते येथे कायम वसती करून राहिले. यातूनच पुढे कऱ्हाडे, देशस्थ, गुजराथी अशाप्रकारच्या प्रांतीय जाती निर्माण झाल्या आणि नंतरच्या काळात त्या समाजात रूढ झाल्या. शिलाहार राजा भोज दुसरा याच्या शक संवत् ११९२-११९३ च्या कोल्हापूर सनदेमध्ये दान घेणाऱ्या ब्राह्मणाचा उल्लेख करहाटचा प्रभाकर असा आहे.[१०३] यादव राजा सिंघण याच्या इ. स. १२२२ च्या बहाळ लेखाचा लेखक नागर ज्ञातीय ब्राह्मण होता असे नोंदविले आहे.[१०४] या पुराव्यावरून असे म्हणता येईल की, इ. स. च्या ११ व्या शतकाच्या शेवटी किंवा इ. स. च्या १२ व्या शतकाच्या प्रारंभी समाजामध्ये ब्राह्मणांच्या उपजाती उदयास येण्यास आरंभ झाला. शिलाहार राजांच्या काही लेखांमध्ये सेणवई[१०५] आणि सहवासी[१०६] ब्राह्मणांचा उल्लेख येतो. नंतरच्या काळामध्ये या ब्राह्मणाच्या उपजाती म्हणून ओळखण्यात येऊ लागल्या.

ब्राह्मणांच्या उपनामांबाबत उपलब्ध लेखांमध्ये ब्राह्मणांचा उल्लेख नेहमी पित्याच्या आणि गोत्राच्या नावाबरोबर केलेला असतो. काही ठिकाणी पाठक, उपाध्ये, उपासनी, जोशी, उपाध्याय,[१०७] दीक्षित, सेणवई, पंडित[१०८] इत्यादि संज्ञाही ब्राह्मणांच्या नावाबरोबर जोडलेल्या आढळतात.[१०९] या संज्ञा त्या ब्राह्मणांचा व्यवसाय दर्शवितात. परंतु त्या आडनावाचा बोध करीत नाहीत. त्याचप्रमाणे क्रमविद्, चतुर्वेदी, द्विवेदि इत्यादि संज्ञा त्यानंतरच्या काळात उपनावे म्हणून रूढ झाल्या. त्या संज्ञा लेखांमध्ये केवळ त्या त्या ब्राह्मणांची विद्वत्ता दर्शवितात. शिलाहार राजा अपराजित याच्या संवत् ९१५ च्या जंजिरा ताम्रपटामध्ये दिलेले दान क्रमविद् ब्राह्मणाला दिले होते.[११०] राजा गण्डरादित्याच्या शक संवत् १०५८ च्या कोल्हापूर लेखानुसार दान घेणाऱ्या ब्राह्मणांपैकी चतुर्वेदी भट्टोपाध्याय हा एक होता.[१११] तर राजा विक्रमादित्य याच्या शक संवत् १०६१ मध्ये दिलेल्या पन्हाळे ताम्रपटातील दान घेणारा ब्राह्मण द्विवेदी भट्टोपाध्याय याचा मुलगा होतो.[११२] लेखांमध्ये आलेली सहवासी व भागवत ही नावे बहुधा त्या ब्राह्मणांच्या धर्माची निदर्शक असावीत. नंतरच्या काळात ही सर्व आडनावे बनली व ती आजही अस्तित्वात आहेत.

## क्षत्रिय

ब्राह्मणांप्रमाणेच क्षत्रियांनाही तत्कालीन समाजामध्ये मानाचे स्थान होते. मागच्या कालखंडाप्रमाणे या काळातीलही बरेच राजे क्षत्रिय होते. चालुक्य, राष्ट्रकूट, शिलाहार आणि यादव हे क्षत्रिय होते. यापैकी शिलाहारांना आपल्या क्षत्रियत्वाचा अभिमानही होता. राजा भोज द्वितीयचे शक संवत् ११९३ च्या कशेळी ताम्रपटामध्ये "क्षत्रिय शिखामणि" असे वर्णन मिळते.[११३] या राजांनी नागरी आणि सैनिकी क्षेत्रातील महत्त्वाच्या पदांवर क्षत्रियांची नियुक्ती केली असावी. परंतु पूर्वीप्रमाणे आता राजपद भोगणे ही फक्त क्षत्रियांची मक्तेदारी राहिली नव्हती. ही गोष्ट चिनी प्रवासी ह्यू-एन-त्संग (Yuan Chwang) याच्या वृत्तांतावरून चांगलीच स्पष्ट होते. त्याच्या वर्णनाप्रमाणे त्याने भारताला भेट दिली तेव्हा पाच क्षत्रिय, तीन ब्राह्मण, दोन वैश्य व दोन शूद्र राजे राज्य करीत होते.[११४] धर्मशास्त्रातील वर्णनाप्रमाणे तीनही उच्च जातींना अध्ययन, यज्ञविधी व दान देणे ही समान कर्तव्ये होती. याशिवाय क्षत्रियांना शस्त्रे धारण करणे व लोकांचे रक्षण करणे ही विशेष कर्तव्ये सांगितली होती.[११५] परंतु या काळामध्ये क्षत्रियांच्या परंपरेने चालत आलेल्या सैनिकी व्यवसायाचे महत्त्व कमी झाले होते. या काळातील सर्व क्षत्रिय हे योध्दे नव्हते. क्षत्रियांबरोबरच ब्राह्मण, वैश्य, शूद्र समाजातील लोकांचीही भरती लष्करामध्ये होत असे. आळतेकरांच्या म्हणण्याप्रमाणे राष्ट्रकूटांच्या सैन्यामध्ये जैन लोकही होते.[११६] प्रजेचे कल्याण, संरक्षण ही क्षत्रियांची कर्तव्ये होती असे मानले जाई हे विविध कोरीव लेखांतील माहितीवरून कळते. चालुक्य राजा कीर्तिवर्मन प्रथम हा जैन क्षत्रिय राजा आपल्या प्रजेचे रक्षण करून तिला समाधानी ठेवीत होता. त्याने वातापी व त्याच्या राज्यातील इतर ठिकाणी काही

बांधकामेही केली. राजा विजयादित्याने आलमपूर प्रशस्तीमध्ये वर्णन केल्याप्रमाणे निरनिराळ्या भागात तलाव खोदले होते. शिग्गाव लेखाप्रमाणे त्याने किमान अकरा तलाव खोदले होते. तसेच त्याने ब्राह्मणांना खेडी व उपनगरे दान दिली होती. मंदिरांची दुरुस्ती व नवीन मंदिरे बांधणे यासाठीही तो प्रसिध्द होतो. राजा कीर्तिवर्मन दुसरा याच्या इ. स. ७०४ च्या पट्टदकल लेखानुसार त्याने पट्टदकल येथील विजयेश्वर देवालय बांधले.[११७] कलचुरी संवत् ४६१ च्या अंजनेरी लेखानुसार भोगशक्तीने मंदिरे बांधली, तलाव खोदले, अन्नछत्रे स्थापन केली आणि पाणपोई उघडल्या.[११८] याशिवाय त्याने नारायण मंदिराला आठ गावे दान दिली आणि या गावांचे उत्पन्न मंदिराला जोडून असलेले अन्नछत्र चालविण्यासाठी आणि मंदिरामध्ये नृत्य, संगीत, वाद्यसंगीत समारंभ आयोजन करण्यासाठी दिले. राष्ट्रकूट राजाने स्वतःच्या राज्यातील साथीच्या रोगांच्या संकटापासून रक्षण करण्यासाठी आपल्या एका हाताचे बोट संजान येथील देवीला अर्पण केले होते.[११९] शक संवत् १०१६ चा खारेपाटण व शक संवत् १०४८ चा वडवली ताम्रपट हे अनुक्रमे शिलाहार राजा अनंतदेव आणि अपरादित्य प्रथम यांनी शिलाहार राज्यावर आक्रमण करणाऱ्या यवनांचा पराभव केल्याची माहिती देतात. शिलाहार राजा गण्डरादित्य याने शक संवत् १०३३ च्या ताळले लेखात सांगितल्याप्रमाणे मिरिंज देशात इरुकुडी येथे गण्डसागर नामक तलाव खोदला होता.[१२०] यादव महादेश याच्या शके ११८२ च्या कालेगाव लेखामध्ये राज्याच्या भरभराटीसाठी त्याने कालेगांव दान दिल्याचा उल्लेख आहे.[१२१] यादव राजा रामचंद्र हा जाती संस्थेचा पुरस्कर्ता होता.[१२२] त्याचा मंत्री पुरुषोत्तम याने सर्व राजद्रोह्यांचा नाश करून सर्व प्रजेला वर्ण-आश्रम संस्थेचे नियम पाळण्यास भाग पाडले. यादव राजे प्रजेच्या कल्याणाबद्दल फार दक्ष होते. प्रजेचा छळ करणाऱ्या अधिकाऱ्यांना त्यांचे वरिष्ठ अधिकारी कडक शिक्षा देत असत. विभाग अधिकारी ब्राह्मणांना दान दिलेल्या गावांचे पावित्र्य राखीत आणि त्यांच्याकडून कोणताही कर वसूल करीत नसत. परकियांच्या आक्रमणामुळे किंवा सैन्याच्या हालचालीमुळे गावांच्या झालेल्या नुकसानीची भरपाई केली जात असे.[१२३]

**धर्म आणि क्षत्रिय** : क्षत्रियांच्या धार्मिक दर्जाचा विचार केल्यास असे आढळून येते की, जे वैदिक यज्ञविधी बदामीच्या चालुक्य राजांच्या शासनकाळात केले जात होते असे त्यांच्या कोरीव लेखांवरून समजते,[१२४] ते यज्ञविधी राष्ट्रकूट सत्तेच्या आगमनापर्यंत समाजात कालबाह्य झाले होते. स्मृति व पुराणामध्ये सांगितलेल्या तत्त्वांचा धार्मिक जीवनावर चांगलाच प्रभाव पडला होता. राष्ट्रकूट काळात राजांनी वैदिक यज्ञविधी केल्याची नोंद मिळत नाही.[१२५] यादव वंशाच्या काळापर्यंत स्मृतिग्रंथ मागे पडून पुराणांचा प्रभाव वाढू लागला होता. राजा भिल्लम तिसरा याला निरनिराळी व्रत्ते करण्याची फार आवड होती. अल्बेरुणीच्या माहितीप्रमाणे जरी क्षत्रिय वेदांचे अध्ययन करीत असले तरी क्षत्रियाचा मूळ सामाजिक दर्जा कमी झाल्याचे दिसते.[१२६]

## रक्षणाचा विशेषाधिकार

धर्मशास्त्रांत क्षत्रियांना देहान्त दंडाच्या शिक्षेपासून संरक्षण देण्याबावत कुठलाही विशेषाधिकार दिलेला नाही. अल्बेरुणीच्या वर्णनाप्रमाणे क्षत्रिय ह्या विशेषाधिकाराचा उपभोग घेत होते. तो पुढे असेही सांगतो की, चोरीच्या गुन्ह्याबद्दल क्षत्रियांना ऊजवा हात व डावा पाय तोडण्याची शिक्षा दिली जाई. परंतु त्यांना ब्राह्मणांसारखे आंधळे करीत नसत.[१२७] आरंभापासून क्षत्रियांचे प्रत्यक्ष शासक आणि या राजघराण्यावर अवलंबून असलेले त्याचे नातलग व सामान्य, क्षत्रिय असे दोन वर्ग अस्तित्वात होते. या दोन वर्गापैकी पहिल्या गटातील सभासदांना समाजात उच्च स्थान असले पाहिजे. तसचे अल्बेरुणीने सांगितलेले देहान्त दंडापासून संरक्षणही फक्त याच वर्गाला मिळत असावे. दुसऱ्या गटातील क्षत्रियांची परिस्थिती मात्र यापेक्षा भिन्न होती. राजघराण्याशी संबंध नसलेल्या क्षत्रियांना सामान्य नागरिकांप्रमाणे वागणूक मिळत असावी.[१२८]

## क्षत्रिय उपजाती

क्षत्रियांचे सूर्यवंशी आणि चंद्रवंशी असे दोन गट अस्तित्वात होते. सूर्यवंशी क्षत्रिय आपली उत्पत्ती सूर्यापासून, तर चंद्रवंशी क्षत्रिय आपली उत्पत्ती चंद्रापासून झाली असे सांगतात. ज्या अग्निकुलोत्पन्न क्षत्रियांनी उत्तर आणि पश्चिम भारताच्या इतिहासात महत्त्वपूर्ण भूमिका बजावली ते क्षत्रिय दक्षिण भारतामध्ये ज्ञात नव्हते असे म्हणावे लागते.[१२९]

## नवीन जाती

या काळात कायस्थ नावाची जात प्रभावी होती. हा समाज फार प्रभावशाली होता. सोढ्ढलाच्या मताप्रमाणे कायस्थ हे क्षत्रिय होते. त्याने आपल्या उदयसुंदरीकथा या ग्रंथामध्ये या जातीचा कल्पक वृत्तांत दिला आहे.[१३०] स्मृति आणि धर्मशास्त्रांमध्ये इ. स. पू. ५०० ते इ. स. १००० या कालखंडातील ज्ञात असलेल्या जातींच्या यादीमध्ये कायस्थ जातीचा उल्लेख केलेला आहे. राजाने राजदरबारात अथवा कार्यालयात नियुक्त केलेल्या कायस्थाने लिहिलेला व कार्यालयाच्या अधीक्षकाने सही केलेला लेख म्हणजे सार्वजनिक दस्तऐवज अशी विष्णुधर्मसूत्रामध्ये दस्तऐवजाची व्याख्या केलेली आहे. मिताक्षराने कायस्थांचा उल्लेख हिशेब ठेवणारा व कारकून असा केला आहे.[१३१] हे राजाला फार प्रिय असतात व धूर्त असतात असेही सांगितले आहे. या काळामध्ये कारकुनाखेरीज जबाबदारीच्या पदांवरही कायस्थ काम करत होते. शिलाहार राजा अपरादित्य याच्या शक संवत् ११०८ च्या परळ लेखामध्ये वालिग पंडित याचा कायस्थ म्हणून उल्लेख आहे.[१३२] शके ११२८ च्या वेळापूर लेखामध्ये[१३३] कायस्थ मलसेठीचा उल्लेख आहे. शके ११९५-९९ च्या पंढरपूर लेखामध्ये[१३४] कायस्थांचा संघाचा उल्लेख या समाजाच्या स्वतःच्या संघटनेचे अस्तित्व दर्शवितो. याशिवाय उच्च पदावर काम करणारेही काही कायस्थ होते. यादव राजा रामचंद्र याच्या काळच्या शके १२०१ च्या उन्हकदेव लेखात[१३५] कायस्थ सोमदेव पंडित याला हेमाद्रीने आपला गव्हर्नर म्हणून नियुक्त केले होते अशी माहिती मिळते.

## वैश्य

या वर्गाचे लोक प्रामुख्याने शेती, स्थानिक व्यापार व देशा-देशातील व्यापार हे व्यवसाय करीत. समाजावर या वर्गाचा मोठा प्रभाव असे. वेद अध्ययन, यज्ञविधी आणि दानधर्म ही त्यांची नेमून दिलेली कामे होती. मुख्यतः निर्वाहाकरिता शेती, पशुपालन आणि सावकारी हे त्यांचे व्यवसाय सांगितलेले आहेत.[१३६] त्यांच्या नेमून दिलेल्या कर्तव्यांपैकी वेदांचा अभ्यास हे कर्तव्य त्यांनी या काळापर्यंत सोडून दिले होते आणि फक्त स्मार्त विधी करण्यास प्रारंभ केला होता. वेद अध्ययन थांबविल्यामुळे त्यांचा उच्च वर्गातील दर्जा घसरण्यास या काळाच्या बऱ्याच आधी प्रारंभ झाला होता. श्रीकृष्णाने वैश्यांचा उल्लेख शूद्रांबरोबर केला आहे आणि त्यांना मागासलेले म्हटले आहे. वैश्य आणि शूद्र हे दोन्हीही वर्ग सेवा आणि शेती व्यवसाय करीत असल्यामुळे बौधायन धर्मसूत्रामध्ये वैश्यांनाही शूद्रांचाच दर्जा दिलेला आहे. याशिवाय या दोन्हीही वर्गामध्ये अस्तित्वात असलेली व सारासार विचार न करता पाळण्यात येणारी विवाह पद्धतीही या दोन्हीही जातींना एकाच पातळीवर आणण्यात बरीच कारणीभूत झाली असावी.[१३७] संबंधित काळामध्ये या दोन्ही जातींच्या दर्जामध्ये फारसा फरक राहिलेला नव्हता. मात्र अल्बेरुणीच्या वर्णनाप्रमाणे[१३८] वैश्य व शूद्र यापैकी कोणीही वेदपठण करताना आढळल्यास त्याची जीभ कापण्याची सजा त्याला देण्यात येत असे.

### वैश्य व्यापारी आणि शेतकरी

वैश्यांपैकी बरेच जण व्यापारामध्ये शिरले होते. वस्तुंची खरेदी-विक्री करणारे व्यापारी आणि घाऊक व्यापारी (Traders and Merchants) यांना श्रेष्ठी आणि त्यांच्या संघटनेला नखर[१३९] किंवा श्रेणी अशी संज्ञा होती. यादव राजा सिंघण याच्या एका लेखामध्ये यांचे 'वैश्य कुलांत जन्मलेले आणि खरेदी विक्रीचा व्यवसाय करून संपत्ती वाढविणारे' असे वर्णन केले आहे. गावाच्या आणि शहराच्या आर्थिक जीवनावर व्यापारी म्हणून त्यांचा प्रभाव होता आणि त्यांच्या संघटनेमुळे समाजात त्यांना बहुमान मिळत असे.[१४०] प्रसिद्ध व्यापारी संस्था वीर बणंज चे ऐहोळे हे प्रमुख स्थान होते. या संस्थेचा उल्लेख कल्याणीच्या चालुक्य[१४१] व शिलाहार[१४२] राजांच्या उत्किर्ण लेखांमध्ये मिळतो. वणंज हा शब्द वणिक किंवा वणिज या संज्ञेपासून निघालेला दिसतो. शिलाहार राजांच्या लेखातील पुराव्यावरून असे दिसते की, या श्रेणीच्या बाजाराच्या दिवशी आठवडी सभा होत असत. विक्रेत्यांकडून वस्तुंच्या विक्रीवर विक्रीकर गोळा केला जात असे. अशा प्रकारे वसूल केलेला कर हिंदू आणि जैन मंदिराला देणगी म्हणून दिला जात असे. यासारख्या मोठ्या श्रेणींनी स्वतःच्या रक्षणाकरिता स्वतःचे सैन्य ठेवलेले असे. काही वैश्यांनी सरकारी नोकरीतही प्रवेश केला होता. उदाहरणार्थ, यादव लेखांमध्ये उल्लेखिलेला मल्लश्रेष्ठी हा गव्हर्नर होता. काही वैश्यांनी सैन्यामध्येही नोकरी स्वीकारली होती.[१४३]

## शूद्र

स्मृतिकारांनी शूद्रांना वेद अध्ययनाचा अधिकार दिलेला नव्हता. सर्व प्राचीन ग्रंथकारांनी उच्च वर्णियांची सेवा हा एकच व्यवसाय शूद्रांकरिता सांगितलेला होता, परंतु तो आता कालबाह्य ठरला होता. मिताक्षराच्या वर्णनाप्रमाणे देवलने शूद्रांनी द्विजातीयाची सेवा करावी असे सांगितले आहे, पण त्यावरोबर ते शेती, पशुपालन, भारवाहक, वस्तुविक्री हे ही व्यवसाय करू शकतात असेही म्हटले आहे. याशिवाय चित्रे काढणे, नृत्य, संगीत तसेच वेणू, वीणा, मृदंग आणि ढोलके वगैरे वाद्ये वाजवण्याच्या कलांचाही विकास करू शकतात.[१४४] हे सर्व उल्लेख शूद्रांनी निर्वाहासाठी करावयाच्या व्यवसायाच्या बाबतीत बरीच प्रगती केली होती असे दर्शवितात. काही शूद्रांनी सैनिकी पेशाही पत्करला होता. ह्यू. एन. त्संग उर्फ युवान श्वांग यांनी केलेल्या उल्लेखानुसार काही शूद्र राजेही झाले होते.

### विशेष धार्मिक हक्क

नंतरच्या काळातील स्मृतिकारांनी शूद्रांची सत्‌शूद्र आणि असत्‌शूद्र अशा दोन गटांत विभागणी केलेली आहे. या स्मृतिकारांनी यापैकी पहिल्या वर्गातील शूद्रांना श्राद्ध, संस्कार आणि पाकयज्ञ करण्याचे अधिकार दिले होते. नीतिवाक्यामृताच्या जैन लेखकाने आंतर्बाह्य शुद्धता ही शूद्रांना सुद्धा देव, ब्राह्मण आणि संन्यासी जीवनाशी संबंधित पवित्र कर्तव्ये करण्यासाठी पात्र बनविते असे मत व्यक्त केले आहे. या काळाशी संबंधित उत्किर्ण लेखांमध्ये यावावत काहीही माहिती मिळत नाही. त्यामुळे या काळातील शूद्रांना हे विशेषाधिकार होते किंवा नाही याबावत निश्चित मत व्यक्त करता येत नाही. स्मृतींनी पुरवलेल्या पुराव्यावरून शूद्र लोक श्राद्ध, संस्कार आणि इतर स्मार्त विधी करीत होते आणि त्यांनी हे विधी पौराणिक मंत्रोच्चारासह ब्राह्मणांच्या द्वारे करावे असा नियम होता असेच फक्त म्हणता येईल.[१४५]

### परदेशी लोक

या चार प्रमुख जातींच्या व्यतिरिक्त आधी उल्लेखिल्याप्रमाणे काही परदेशी लोकही तत्कालीन समाजाचे घटक होते. राष्ट्रकूट वंशाच्या शासनकाळात पश्चिम किनाऱ्यावर काही अरब वसाहती होत्या आणि अरबांचे इतर लोकांबरोबर मित्रत्वाचे संबंध होते. मुसलमान लेखकांनी लिहिल्याप्रमाणे मुसलमानांच्या वैयक्तिक कायद्यांच्या पालनासाठी राष्ट्रकूट राज्यामध्ये मुसलमान शासकच नियुक्त केलेले होते.[१४६] शिलाहारांच्या राज्यात देखील काही मुसलमान लोक होते. यापैकी काही खलाशी (नोरिक कर्मकार), तर काही शेतकरी होते. शिलाहार मांडलिक चामुण्डराज याच्या चिंचणी लेखामध्ये उल्लेखिलेले अल्ली, यमहर, मधुमत हे व्यापारी मुसलमान असावेत.[१४७]

समाजातील या विभाजनामुळे लोकांमध्ये सामाजिक संबंधाच्या बाबतीत वेगळेपणाची भावना निर्माण झाली होती. ब्राह्मणाला शूद्राचे घरी भोजन करण्याची परवानगी नव्हती त्याचप्रमाणे हिंदुना म्लेच्छांकडे पाणी पिण्याची किंवा अन्न घेण्याची परवानगी नव्हती असे अल्बेरुणी सांगतो.[१४८]

### अस्पृश्यता

अरब भूगोलवेत्यांनी वर्णिलेल्या अस्पृश्य जातीच्या सामाजिक दर्जाबाबत अल्बेरुणीने त्यांचा उल्लेख अत्यंज असा केला आहे.[१४९] आश्चर्याची गोष्ट अशी की, अंगिरस, बृहद्‌यम्, अत्रि आणि आपस्तंब या नंतरच्या काळातील स्मृतिंच्या लेखकांनी यातील

बहुतेक सर्व जातींचे वर्णन अस्पृश्य म्हणून केलेले आहे. अल्बेरुणीने या वर्गात समाविष्ट केलेल्या जातींपैकी धोबी, जोडे बनविणारे, गारुडी, कोळी, चाण्डाळ आणि टोपल्या विणणारे किंवा बुरूड हे स्मृतींमध्ये दिलेल्या अनुक्रमे रजक, चर्मकार, नट किंवा शैलुब, कैवर्त, चाण्डाल आणि वेणुजीविन या जातींशी साम्य दर्शवितात. यापैकी धोबी, जोडे बनविणारे, कोळी, चाण्डाळ या जातींना त्यांच्या व्यवसायाच्या स्वरूपामुळे प्रारंभापासून ते वर्तमान काळापर्यंत अस्पृश्य समजत असत. आळतेकरांच्या मताप्रमाणे हे व्यवसाय प्रारंभी पूर्णपणे अनार्य लोकांच्या हातात होते म्हणून गारुडी व टोपल्या विणणारे यांना अस्पृश्य समजत असावेत.[१५०] गारुडी किंवा नट हे लोक व्यवसायाने नर्तक किंवा डोंबाऱ्याचे काम करणाऱ्या कोल्हाटी लोकांप्रमाणे असावेत.[१५१] बाकीच्या जातींपैकी खलाशी व रानटी पशू-पक्षांची शिकार करणाऱ्या शिकाऱ्यांची तुलना मनुने दिलेल्या मारगव व आयोगन या जातींशी करता येईल. मनु या जातींचे वर्णन प्रतिलोम संतती म्हणून करतो. त्यांनी खलाशी आणि शिकारीचा व्यवसाय करावा असे सांगतो.[१५२] अल्बेरुणीच्या विणकरांचा स्मृतींमध्ये अस्पृश्य म्हणून कोठेही उल्लेख नाही.[१५३] मात्र त्यांचा उशनसन विणकर म्हणून दिलेल्या आयोगवांशी काही संबंध आहे किंवा नाही हे ठरविणे कठीण आहे. हादी, डोंब, बघातौ या जातींपैकी हादींचा दर्जा वरचा होता[१५४] असे दिसते. त्यांच्याकडे ग्रामसफाईचे वगैरे काम असे. पराशराने डोंब व चाण्डाळ या दोन्ही जातींचा व्यवसाय स्मशान व प्रेत यांच्याशी संबंधित असल्यामुळे त्यांना समान दर्जा दिला होता असे अपरार्काने पराशराच्या दिलेल्या उताऱ्यावरून दिसते.[१५५] अल्बेरुणीचा बघातौ हे कदाचित गुन्हेगारांना फाशी देण्याचे काम करत असणाऱ्या वधकचे भ्रष्ट रूप असावे आणि बहुतेक त्याच्या कामाच्या स्वरूपामुळे धर्मशास्त्रांनी त्याला अस्पृश्य ठरविले असावे.[१५६] याप्रमाणे हिंदू जातीसंस्थेवर असलेल्या या अस्पृश्यतेच्या कलंकाचा उगम हिंदुंच्या मनात असलेल्या अस्वच्छतेबद्दलच्या अतिभयातून झाला असावा. या भयामुळे हिंदू समाजाने झाडू मारणे, चामड्याचे काम करणे, प्रेतरक्षक आणि स्मशान रक्षक वगैरे सारखे खालच्या प्रतीचे व्यवसाय करणाऱ्या लोकांना वेगळे ठेवले. प्रारंभी मेधातिथीने सांगितल्याप्रमाणे फक्त चाण्डाळांनाच अस्पृश्य समजत.[१५७] कालांतराने इतर लोकांपासून स्वतःला वेगळे जपण्याची भावना आणि धर्मविधीचे पावित्र्य याबद्दलच्या अतिशयोक्तिपूर्ण कल्पना यामुळे अस्पृश्य जातींची संख्या वाढत गेली. अल्बेरुणीच्या वेळेपर्यंत हादी, डोंब, चाण्डाळ आणि बघातौ या जाती अंत्यजांपासून पूर्णपणे वेगळ्या झाल्या होत्या आणि त्यांच्या श्रेणीसारख्या संघटनाही नव्हत्या.[१५८] या कालखंडाच्या अखेरीपर्यंत अस्पृश्यतेची कल्पना पराकोटीला पोहोचली होती. अल्बेरुणीने उल्लेखिलेल्या बहुतेक सर्व जाती अस्तित्वात आल्या होत्या. अस्पृश्य जातींमध्ये रंगारी, धोबी, शिकारी, धीवर, खाटिक, नट, सुराविक्रेता यांचा समावेश झाला होता. महानुभाव साहित्यामध्ये उच्च वर्गांनी शूद्रांना दिलेल्या वागणुकीची उदाहरणे अस्पृश्यतेचे या काळातील अस्तित्व सांगतात.[१५९] अस्पृश्य जातीच्या वस्त्या गावाबाहेर असत. या काळाशी संबंधित उपलब्ध कोरीव लेखांमध्ये आलेली व्यवसायदर्शक स्थलनामे या सत्याला पुष्टी देतात. उदाहरणार्थ, कुंभारगेरे[१६०] व कुंभारग्राम[१६१] ही अनुक्रमे बहुतेक चालुक्य वंशीय सोमदेवाच्या कोल्हापूर लेखात व राजा बर्म याच्या शके ११९० च्या तोरगल ताम्रपटामध्ये आलेली कुंभारांची नावे असलेली गावे आहेत, तर

बदामीचा चालुक्यवंशीय राजा विनयादित्य याच्या शिग्गान ताम्रपटामध्ये[१६२] चांभार आणि जातिबहिष्कृत केलेल्या जातींच्या वेगळ्या वस्तीचा उल्लेख आहे. तसेच वाकाटक, बदामीचे चालुक्य व राष्ट्रकूट राजांच्या उत्किर्ण लेखांमध्ये अनुक्रमे चर्मांक,[१६३] कुराट[१६४] व वध्रिर[१६५] ही गावे चांभारांच्या स्वतंत्र वसाहतींचे अस्तित्व दर्शवितात. शिलाहारांच्या शक संवत् ९३९ च्या ठाणे लेखामध्ये आलेले कटियालकग्राम[१६६] हे शिकाऱ्यांच्या वस्तीचा बोध करते, तर यादव राजे भिल्लम, जैतुगि आणि सिंघण यांच्या मार्डी लेखामध्ये वर्णिलेले कसयग्राम[१६७] हे खाटिकांच्या वस्तीकडे निर्देश करते. लोहाराग्राम,[१६८] लोहारे[१६९] ही ग्रामनामे लोहारांच्या वस्तीचे अस्तित्व दर्शवितात, तर कनकचरा[१७०] आणि सोन्नलिगे नगर[१७१] यासारखी स्थलनामे सोनारांच्या वस्तींचे अस्तित्व दर्शवितात. तंबसहिका,[१७२] तंवतीर्थ[१७३] ही स्थलनामे तांबटांच्या वस्तीचे अस्तित्व दर्शवितात. कुरेग्राम[१७४] आणि कुरेग्ग्राम[१७५] ही दोनच स्थलनामे चांदीचे काम करणाऱ्या कारागिरांच्या वस्तींचे प्रतिनिधित्व करतात. ह्याशिवाय कोलिकवाटिक,[१७६] पजःणिखल्लि, पडिगह, पडिवसे, पटालसक, पट्टवर्धनपुर आणि पटवदे[१७७] ही नावे विणकर आणि कापड विणण्याच्या कामाशी संबंध असलेल्या लोकांच्या स्वतंत्र वसाहतींचेही अस्तित्व दर्शवितात.[१७८] वेदव्यासस्मृतिमध्ये गवळ्यांचा शूद्रांची उपजाती म्हणून उल्लेख आहे.[१७९] त्यामुळे त्यांच्याही स्वतंत्र वस्त्या असल्या पाहिजेत. गोवियाणकग्राम, गोविन, गोपकद्विप, गोवादिवा, गोलेगाव्हान ही या काळाशी संबंधित कोरीव लेखांमध्ये आढळणारी स्थलनामेही असेच सुचवितात.[१८०] अल्बेरुणीच्या हादी, डोंब, चाण्डाल, आणि वघातौ या जातीपैकी फक्त डोंबांच्या वस्तीचे निदर्शक स्थलनाम मिळाले आहे. महाराष्ट्रामध्ये या जातीच्या वस्तीचे अस्तित्व दर्शविणारे स्थलनाम प्रथम शिलाहार राजाच्या आणि नंतर यादव नृपतीच्या लेखांमध्ये मिळाले आहे. ही नावे आहेत अनुक्रमे डोम्बिलवाटक[१८१] आणि डोमेगाऊ.[१८२] खालच्या दर्जाचा व्यवसाय करणाऱ्या निरनिराळ्या जातींच्या स्वतंत्र वसाहतींची अस्तित्व दर्शविणारीही स्थलनामे या काळात अस्पृश्यतेची भावना किती प्रबळ झाली होती हे दर्शवितात.

## विवाह

जरी जातीअंतर्गत विवाह हा सर्वसाधारण नियम असला तरीही प्रतिलोम आणि अनुलोम या दोन्ही आंतरजातीय विवाह पद्धती तत्कालीन समाजात प्रचलित होत्या. प्राचीन विद्वांनाना ब्राह्मणाने क्षत्रिय किंवा वैश्य मुलीशी लग्न करणे मान्य असले, तरी ब्राह्मण, क्षत्रिय किंवा वैश्य मुलांनी शूद्र कन्येशी विवाह करण्याबाबत त्यांच्यामध्ये एकमत नव्हते.[१८३] बौद्धायन आणि गौतम यांनी अनुक्रमे अशौच आणि विभाजन याबाबत दिलेल्या नियमांवरून या काळात आंतरजातीय विवाह प्रचलित होते. परंतु समाजात ते विशेष प्रिय नव्हते असे दिसते. स्मृतिकारांनी अनुलोम विवाहांना कायदेशीर म्हणून मान्यता दिली होती. सोमदेवाच्या नीतिवाक्यामृतामध्ये मिळणाऱ्या माहितीवरून या प्रकारचे विवाह या काळात होत असत असे दिसते.[१८४] स्मृतिचंद्रिका ग्रंथात सांगितलेल्या काही बंधनांसह हा विवाह प्रकार या संपूर्ण काळात अस्तित्वात होता असे म्हणता येईल. मनुस्मृतीवरील भाष्यामध्ये मेधातिथी इ. स. ९० पर्यंत ब्राह्मणांचे क्षत्रिय व वैश्य कन्यांशी क्वचित विवाह होत होते, परंतु शूद्र मुलीशी होत

नव्हते असे सांगतो. मिताक्षराच्या वर्णनाप्रमाणे ते त्याच्या (इ. स. ११००) वेळेपर्यंत प्रचलित होते. परंतु हे विवाह त्याच्या अध्ययनाच्या काळाच्या अखेरीस अप्रिय होऊ लागले. मध्ययुगीन सारग्रंथांमध्ये, त्याचप्रमाणे स्मृतिचंद्रिका, हेमाद्रि यांनी सांगितल्याप्रमाणे आदित्यपुराणामध्ये या विवाह प्रकाराचा समावेश कलियुगात वर्ज्य समजलेल्या गोष्टींच्या यादीत केलेला आहे.[१८५]

यासंबंधी परदेशी प्रवाशांनी पुरविलेली माहिती काही प्रमाणात स्मृतिकारांनी दिलेल्या माहितीशी जुळते. इब्न खुर्दाद्बच्या वर्णनाप्रमाणे क्षत्रिय मुलींचे विवाह ब्राह्मण मुलांशी होत होते. परंतु ब्राह्मण त्यांच्या मुलींचे विवाह क्षत्रिय वरांशी करण्यास तयार नसत.[१८६] अल्बेरुणीच्या कथनाप्रमाणे आपल्या जातीपेक्षा वरच्या जातीच्या मुलीशी विवाह करण्याची कोणासही परवानगी नव्हती. जरी ब्राह्मणांना इतर जातीच्या मुलींशी विवाह करण्याची परवानगी असली तरी ते आपल्या जातीच्या मुलींखेरीज कोणत्याही इतर जातीच्या मुलींशी विवाह करीत नसत.[१८७]

यावरून असे म्हणता येईल की, इ. स. १० व्या शतकापर्यंत आंतरजातीय विवाह होत असत. उपलब्ध पुराव्याप्रमाणे हे विवाह इ. स. ९ व्या शतकाची पहिली पन्नास वर्षे ते इ. स. ११ वे शतक या दरम्यानच्या काळात क्वचितच होऊ लागले आणि त्यानंतर असे विवाह होणे पूर्णपणे बंद झाले.

विवाह हे सामान्यतः लहान वयातच होत. नीतिवाक्यामृतामध्ये दिल्याप्रमाणे विवाह-समयी मुलाचे वय १८ व मुलीचे वय १२ पेक्षा जास्त नसे. या काळातील स्मृतिकारांनी मुलीचा विवाह ती ऋतुमती होण्यापूर्वी करावा असे सुचविले होते. असे विवाह निदान ब्राह्मण समाजात तरी या काळात अस्तित्वात होते.[१८८] इ. स. च्या सहाव्या किंवा सातव्या शतकामध्ये ब्राह्मण मुलीचा विवाह आठ ते दहा वर्षे या वयात व्हावा असा नियम होता आणि हा नियम बऱ्याच काळापर्यंत अस्तित्वात होता.[१८९] अल्बेरूणीने[१९०] ह्या रूढीचा उल्लेख केला आहे. हिंदू लोक लहान वयात लग्न करतात असे त्याने सांगितले आहे. या काळामध्ये बहुपत्नीत्वाची पद्धती अस्तित्वात होती.[१९१] एखाद्या व्यक्तीने किती बायका कराव्यात हे त्या व्यक्तीच्या जातीवर अवलंबून होते असे अल्बेरुणी सांगतो.[१९२] त्याच्या म्हणण्याप्रमाणे ब्राह्मणाला चार, क्षत्रियाला तीन, वैश्याला दोन आणि शूद्राला एक पत्नी करण्याची परवानगी होती.

**कुटुंबव्यवस्था**

या काळामध्ये एकत्र कुटुंब पद्धती प्रिय होती. भिन्नभिन्न राजवंशातील राजांनी दिलेल्या प्रशस्ती लेखांतील नातेवाईकांचा उल्लेख तसेच सर्व कुटुंबघटकांना पुण्य मिळावे म्हणून दिलेल्या दानाचे राजांच्या लेखांतील उल्लेखही हेच सांगतात.[१९३] भावाभावांमध्ये उत्कट प्रेम असल्याचेही बदामीच्या चालुक्य राजांचा बदामी येथील वैष्णव शैलगृहातील लेख व महाकूट स्तंभ लेखातील वर्णनावरून दिसून येते.[१९४] धार्मिक समारंभ नेहमी पूर्ण कुटुंबाच्या समृद्धीकरिता केले जात. भिल्लम दुसरा याने आपल्या मातापित्याच्या व स्वतःच्या सौख्यवृद्धीकरिता दाने दिली होती.[१९५] काही वेळेस आपल्याला विभक्त कुटुंबांचीही उदाहरणे मिळतात. राष्ट्रकूटांच्या काही लेखांमध्ये

अग्रहार ग्रामांच्या हिस्सेदारांच्या यादीमध्ये पिता-पुत्रांचे हिस्से अगदी स्पष्टपणे सांगितले आहेत. यावरून काही वेळेस पिता-पुत्र वेगळे राहत होते असे दिसते.[१९६] राजा गोविंद तृतीय यांच्या तोरखेडे[१९७] लेखामध्ये दोन भावांचे हिस्से स्पष्टपणे सांगितले आहेत. हे भाऊ एकत्र कुटुंबाचे घटक नक्कीच नसावेत. शके ११४९ च्या चिक्कवागेवाडी लेखामध्ये[१९८] चार भावांच्या वेगवेगळ्या हिश्शांचा उल्लेख आहे, तर शके १२७१ च्या पैठण ताम्रपटामध्ये[१९९] पिता आपल्या सहा पुत्रांपासून वेगळा राहत असल्याचे वर्णन आहे. याशिवाय एकत्र कुटुंबाचे घटक नसलेल्या भावांचीही वरीच उदाहरणे मिळतात. स्मृमिकारांनी पित्याच्या जिवंतपणी कुटुंबाचे विभाजन होऊ नये असा कायदा केला होता. तरीही काही कुटुंबांना विभक्त राहणे जास्त पसंत होते. परंतु गोविंदप्रभुचरित्रामध्ये सुचविल्याप्रमाणे ते एकाच घरात राहत, धार्मिक समारंभ एकत्र साजरे करीत आणि एकाच शेताची मशागत करीत. गावामध्ये ते एकाच कुटुंबाचे घटक म्हणून ओळखले जात. चक्रधर चरित्रामध्ये कोणा एका कुटुंबातील सात भाऊ एकमेकांपासून वेगळे राहत असल्याचे उदाहरण दिलेले आहे. गावातील लोक या सर्वांना एकाच कुटुंबाचे सभासद मानीत. या कारणांमुळे वर जी कोरीव लेखांमध्ये आढळणारी विभक्त कुटुंबाची उदाहरणे दिली आहेत, त्यावरून सर्वत्र विभक्त कुटुंब पद्धती अस्तित्वात होती असे समजण्याचे कारण नाही. ही उदाहरणे केवळ तत्कालीन काही लोकांची विभक्त कुटुंब पद्धतीकडे असलेली ओढ दर्शवितात.[२००]

**स्त्रियांची परिस्थिती**

सर्व स्मृति, पुराणे आणि सारग्रंथामध्ये पत्नीची कर्तव्ये अगदी सविस्तर सांगितली आहेत. पती हा पत्नीसाठी परमेश्वर आहे, असे मत व्यक्त केले आहे. पत्नीचे तिच्या पतीच्या संबंधात असलेले स्थान पुराणांमध्ये दिलेल्या पतिव्रता या संज्ञेच्या व्याख्येमुळे स्फटिकाप्रमाणे स्वच्छ आहे. उदाहरणार्थ, पद्मपुराणातील सृष्टि खंडामध्ये असे म्हटले आहे की, जी पत्नी गुलामाप्रमाणे काम करते, गणिकेप्रमाणे लैंगिक सुख देते, मातेप्रमाणे पतीच्या भोजनाची काळजी घेते आणि अडचणीच्या प्रसंगी त्याला योग्य तो सल्ला देते, ती स्त्री पतिव्रता होय. पतीबरोबरच तिने त्याचे माता, पिता आणि इतर नातलगांची सेवा करावी अशी अपेक्षा असे. तत्कालीन समाजामध्ये हे नियम अस्तित्वात होते आणि पत्नीकडून या नियमांचे काटेकोरपणे पालन करून घेण्यात येई. पतीशिवाय तिला वेगळे व्यक्तिमत्त्व नव्हते.[२०१] आलमपूर प्रशस्तीमध्ये[२०२] चालुक्य राजा विजयादित्य याच्या राणीचे वर्णन या दृष्टीने पुरेसे बोलके आहे.

उपलब्ध पुराव्यानुसार दक्षिण भारतामध्ये पडदा पद्धती अस्तित्वात नव्हती. प्रसिद्ध लेखक अबुझैदने याबाबत केलेले निरीक्षण या दृष्टीने फार महत्त्वाचे आहे.[२०३] त्याच्या वर्णनाप्रमाणे भारतातील बहुतेक राजे दरबार भरवीत तेव्हा त्यांच्या राण्यांना एतद्देशीय तसेच परक्या लोकांसमोर दरबारात येण्याची परवानगी असे. यासाठी पडदा घेण्याची आवश्यकता नसे. राष्ट्रकूट राजा कृष्ण प्रथम याच्या कडव ताम्रपटामध्ये[२०४] आलेले स्त्रियांचे वर्णनही या विधानास पुष्टी देते.

या कालात स्त्रियांना वांशिक धमामध्ये हिस्सा मिळण्यास प्रारंभ झाला. याज्ञवल्क्यस्मृतीमध्ये निपुत्रिक गृहस्थाच्या मृत्यूनंतर त्याच्या विधवेला वारसाहक्क दिलेला आहे.[२०५] विष्णू, कात्यायन व इतर स्मृतिग्रंथांचे हेच मत आहे.[२०६] वसिष्ठ, आपस्तंब आणि इतरांच्या विरोधात जाऊन विज्ञानेश्वराने स्त्रियांना त्यांच्या पतीची संपत्ती वारसाहक्काने मिळावी असे सांगितले आहे. त्याच्या मताप्रमाणे स्त्री तिच्या ताब्यात असलेल्या व तिच्या नियंत्रणाखाली असलेल्या सर्व वस्तू वारसाहक्काने प्राप्त करू शकते.[२०७] यावरून आरंभीच्या सूत्र लेखकांपेक्षा मध्ययुगीन विद्वानांना स्त्रीच्या वांशिक धनाच्या अधिकारांची जास्त जाणीव होती असे दिसते. परंतु प्रत्यक्षात मात्र एकत्र हिंदू कुटुंबात तिला फक्त निर्वाहाचाच अधिकार होता. स्वतंत्र संपत्ती ठेवणाऱ्या गृहस्थाच्या विधवेची परिस्थितीही यापेक्षा फार वेगळी नव्हती. सामान्यतः ती संपत्तीपासून येणारे उत्पन्न उपभोगू शकत होती, परंतु संपत्ती दुसऱ्या कोणाच्या नावावर करण्याचा तिला अधिकार नव्हता. यास्कच्या सांगण्याप्रमाणे दक्षिणेकडील प्रदेशातील स्त्रीला तिच्या पतीची संपत्ती वारसाहक्काने प्राप्त होत असे.[२०८] काही उत्किर्ण लेखांमधील वर्णनानुसार मुलीला पित्याची संपत्ती वारसाहक्काने मिळत होती. उदाहरणार्थ सौदत्ती लेखाप्रमाणे[२०९] जेव्हा कोलार वंशीय मादिराज प्रथम हा युद्धामध्ये मारला गेला तेव्हा बनीहट्टीच्या प्रमुखाबरोबर विवाह झालेली त्याची मुलगी पित्याच्या लष्करी जहागिरीची वारस बनली. मुलीने पित्याच्या शेतजमिनीची विक्री केल्याची माहिती देणाऱ्या कोल्हापूर येथे प्राप्त झालेल्या एका अपूर्ण कोरीव लेखाचा उल्लेख आळतेकरांनी केला आहे.[२१०]

उपलब्ध साधने विधवांच्या पुनर्विवाहाच्या प्रथेचे अस्तित्व दर्शविणारा काहीही पुरावा देत नाहीत. तत्कालीन स्मृतिकारांमध्ये बाल विधवांच्या पुनर्विवाहाच्या बाबतीतही तीव्र मतभेद आहेत.[२११] त्यामुळे या प्रथेबद्दल निश्चितपणे मत व्यक्त करणे कठीण आहे. उच्चवर्गामध्ये विधवा विवाह फारसे प्रिय नव्हते. परंतु वर्तमान परिस्थितीप्रमाणे ते खालच्या वर्गात प्रचलित असावेत.

**विधवेचे केशवपन**

ब्राह्मण आणि इतर काही समाजामध्ये विधवेचे क्षौर करण्याची प्रथा होती. मदनपारिजात आणि इतर निबंधानी घेतलेल्या स्कंदपुराणातील 'विधवा कवरीबंधो' सारख्या श्लोकावरून इ. स. १४ व्या शतकात ही प्रथा अस्तित्वात होती असे दिसते. तरीपण ही पद्धत समाजजीवनात केव्हा व कशी आली हे सांगणे कठीण आहे.[२१२] मनु आणि याज्ञवल्क्य यांनी विधवेच्या जीवनाचे नियमन करण्यासाठी विस्तृत नियम दिलेले आहेत, परंतु तिच्या डोक्यावरील केस नियमितपणे पूर्णपणे काढून टाकण्याच्या बाबतीत त्यांनी मौन पाळले आहे.[२१३] निर्णयसिंधु व बालमभट्टी या अनुक्रमे इ. स. १६१२ आणि १८ व्या शतकाच्या अखेरीस रचल्या गेलेल्या ग्रंथांच्या ग्रंथकारांना या प्रथेचे अस्तित्व ज्ञात होते.[२१४] मुसलमान प्रवाशांनी विधवेच्या केस कापण्याच्या प्रथेबद्दल काहीही माहिती दिलेली नाही. याप्रमाणे ही प्रथा इ. स. १० व्या किंवा १२ व्या शतकानंतर हळूहळू वाढत गेली असावी आणि तिचा उदय बहुतेक वेदव्यासस्मृतीमध्ये

विधवेसंबंधात वापरलेल्या 'त्यक्तकेशा'[२१५] या संज्ञेच्या स्पष्टीकरणामधून झाला असावा. हेही शक्य आहे की, विधवांनी संन्याशांप्रमाणे संन्यस्त जीवन जगावे अशी अपेक्षा असल्यामुळे संन्याशी ज्याप्रमाणे मुंडण करतात त्याप्रमाणेच विधवांनीही नियमितपणे मुंडण करणे आवश्यक ठरले असावे. उपलब्ध कोरीव लेखामध्ये या प्रथेचे[२१६] अस्तित्व दर्शविणारा काहीही पुरावा मिळत नसला तरी महानुभाव साहित्यात या प्रथेविषयी उल्लेख आढळतात.

**सतीप्रथा**

सती प्रथा प्रामुख्याने राजघराण्यांमध्ये अस्तित्वात होती. पतिव्रता स्त्रीला समाजात आदराचे स्थान होते. परंतु पतीबरोबर सती जाणाऱ्या स्त्रीचे समाजातील स्थान अद्वितीय असे होते. ही प्रथा दक्षिण भारतामध्ये या काळात प्रचलित नव्हती. आळंदीला सापडलेल्या सतीस्मारकाप्रमाणे महाराष्ट्रात अन्य ठिकाणीसुद्धा सतीस्मारके मिळाली.[२१७] यादव काळाशी संबंधित प्रसिद्ध ग्रंथ 'ज्ञानेश्वरी' मध्ये दक्षिण भारतामध्ये यादव काळात सती प्रथा अस्तित्वात होती असा उल्लेख मिळतो.[२१८] महानुभाव ग्रंथातील वर्णनाप्रमाणे राजा रामचंद्र याची राणी कामायि हिच्यावर तिचा सावत्र मुलगा सिंघण दुसरा याने सती जाण्याची जबरदस्ती केली होती.[२१९] अल्बेरुणी[२२०] जेव्हा राण्यांकडून त्यांनी पतीबरोबर सती जाण्याची अपेक्षा होती असे म्हणतो तेव्हा त्याच्यासमोर तशी काही उदाहरणे असावीत.

**गणिका**

प्राचीन भारतीय समाजाचा अविभाज्य भाग असलेली गणिका संस्था या काळातही अस्तित्वात होती. गणिका संस्थेला कायदेशीर मान्यता होती. गणिकांना एकप्रकारे राजाश्रय होता. याज्ञवल्क्यस्मृतिवरील टीकाग्रंथ मिताक्षराप्रमाणे स्कंदपुराणामध्ये गणिका ही पंचचुडा नामक अप्सरेपासून निर्माण झालेली स्वतंत्र जात असल्याचा उल्लेख आहे. मिताक्षरा, नारद, मत्स्यपुराण,[२२१] दशकुमार चरित्र, अवन्तिसुंदरीकथा[२२२] इत्यादी ग्रंथांमध्ये त्यांच्या कर्तव्याबद्दल किंवा वेश्याधर्माचे नियम सांगितले आहेत. वात्स्यायन आणि दंडिन[२२३] यांनी त्यांची गणिका, रुपजीवा, नटी, शिल्पकारिका अशी नावे सांगितली आहेत, तर गोविंदप्रभुचरित आणि लीळाचरित[२२४] मध्ये त्यांना सामान्य स्त्री किंवा वेश्या अशी संबोधने दिली आहेत. ज्ञानेश्वरीमध्ये[२२५] त्यांचे वर्णन पण्यांगना, हातभेटीचे कलत्र, स्वैरिणी, मांगी या संज्ञांनी केलेले आहे. दंडिनच्या वर्णनाप्रमाणे गावात किंवा शहरात त्याच्या स्वतंत्र वसाहती होत्या. यादव शासनकालात एलिचपूर, रिद्धपूर, श्रीनगर आणि मेहकर यासारख्या मोठ्या नगरांतून त्या रहात होत्या.[२२६] यादव साम्राज्यात आणखी बऱ्याच नगरातून त्यांची वस्ती असावी.

गणिकेला मातेकडून आपल्या परंपरागत व्यवसायाचे शिक्षण मिळे. त्याबद्दल दंडिनने सविस्तर चर्चा केली आहे. गणिकेस चौसष्ट कलांचे आणि विशेषतः शृंगार शास्त्रांच्या

सर्व शाखांचे चांगले ज्ञान असावे अशी अपेक्षा असे. या शिक्षणाचा उद्देश तिचे व्यक्तिमत्व आकर्षक बनविणे, तिला सर्व कलांमध्ये पारंगत करणे हा होता. त्यांनी त्यांचा पारंपरिक व्यवसाय करावा अशी त्यांच्याकडून अपेक्षा होती. त्यांना सामान्य कौटुंबिक जीवन जगण्याची परवानगी नव्हती. गणिका या हावरटपणाबद्दल प्रसिद्ध होत्या. त्याकरिता त्या अगदी तिरस्करणीय वेषभूषा व गलिच्छ हावभाव करून लोकांचे त्यांच्याकडे लक्ष वेधून घेत.[२२७] महानुभाव ग्रंथ व ज्ञानेश्वरी यामध्ये त्यांच्यासाठी वापरलेल्या भिन्न भिन्न संज्ञा संबंधित कालखंडाच्या शेवटी समाजात त्यांना किती खालचा दर्जा प्राप्त झाला होता हे सुचवितात.

**आहार विहार**

या काळातील समाज अंशतः शाकाहारी व अंशतः मांसाहारी असा होता. पश्चिम भारतातील ब्राह्मण पूर्णपणे शाकाहारी होते, तर क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे मांसाहारी होते. तांदूळ हे प्रमुख खाद्यान्न होते. लोकांना तांदळाचे निरनिराळे पदार्थ बनविण्याचे ज्ञान होते. ज्वारी हे या काळातील दुसरे प्रमुख धान्य होते. याशिवाय धान्याच्या अन्य जाती उदाहरणार्थ, बाजरी, नाचणी उपलब्ध होत्या. आढकी, मसुर, मुग, उडीद या डाळींची आमटी करीत. खाद्यपदार्थ तयार करण्यासाठी तीळ, नारळ, करडईपासून काढलेली तेले वापरीत पदार्थ चविष्ट बनविण्यासाठी मीठ, मिरे, वेलदोडे या वस्तुंचाही उपयोग होत असे. गोड पदार्थ बनविण्यासाठी साखर व गुळाचा उपयोग होत असे. पूरक आहार म्हणून दुधाचे वेगवेगळे पदार्थ, भाज्या, फळे यांचा उपयोग करण्याचा प्रघात होता. राष्ट्रकूट साम्राज्यातील तामीळ प्रदेशात खाद्य वस्तुंच्या प्रचलित असलेल्या किंमतीत यादीवरूनही या काळात उपलब्ध असलेल्या खाद्य पदार्थांची कल्पना येते. या यादीमध्ये तांदूळ, डाळी, मीठ, मिरे, वेलदोडे, निरनिराळ्या तेलबिया इत्यादींचा अंतर्भाव केला आहे.[२२८] चालुक्य राजा जनमेजय याच्या शके १०७६ च्या चिकुर्डे ताम्रपटामध्ये[२२९] तेलघाणे, गुळाच्या भेल्या, धान्ये व तांदूळ यांचा उल्लेख दान दिलेल्या वस्तुंमध्ये आढळतो. शिलाहार राजा गण्डरादित्य याच्या शक संवत् १०४८ च्या कोल्हापूर दानपत्रामध्ये[२३०] पांढरा तांदूळ, चार भाज्या, आढकीची आमटी, ताक, तूप, तांबूल हे ब्राह्मणांच्या रोजच्या भोजनाचे पदार्थ असल्याचा उल्लेख आहे. विजयनगर साम्राज्याचा राजा संगमदेवराय याच्या शके १३३५ च्या बांदोडे लेखामध्ये[२३१] नागनाथ व महालक्ष्मी यांच्या नैवेद्याच्या पदार्थांमध्ये तूप, वडे, घाऱ्या आणि दोन भाज्या यांचा समावेश केला आहे. यादव काळामध्ये तांदळाचे पदार्थ उदा. खीर, मांडे, पुरी, शेवई, लाडू आणि भाज्या काही विशेष प्रसंगी करीत. परंतु रोजच्या भोजनामध्ये ज्वारी, तांदूळ, डाळी, वाटाणे (beans), कढी, लोणी इत्यादि वस्तुंपासून बनविलेले पदार्थ असत.[२३२] याशिवाय गव्हापासून बनविलेल्या काही पदार्थांचेही लोकांना ज्ञान होते.[२३३] या कालखंडात महाराष्ट्रावर राज्य करणाऱ्या सर्व राजवंशाच्या उत्किर्ण लेखांमध्ये महाराष्ट्रात होणाऱ्या वेगवेगळ्या धान्यांचा उल्लेख आहे.[२३४]

याशिवाय महाराष्ट्रातील पुरातत्त्विय उत्खननामध्ये सापडलेल्या तांदूळ, गहू, वार्ली, ज्वारी (millets), वेगवेगळी द्विदल धान्ये आणि डाळी यांच्या अवशेषांवरूनही असे दिसते की, महाराष्ट्रात आज उपयोगात असणाऱ्या धान्यांच्या जातीचे उत्पादन संबंधित काळाच्या बऱ्याच पूर्वीपासून होत असावे आणि विविध खाद्य पदार्थ बनविण्यासाठी त्यांचा उपयोग होत असावा.[२३५]

इ. स. च्या ९ व्या, १० व्या शतकातील अरब लेखकांनी पश्चिम भारतातील कसदार जमिनीचा तसेच धान्योत्पादन व फलोत्पादनाचा उल्लेख केला आहे. अल्बेरुणीच्या[२३६] म्हणण्याप्रमाणे ब्राह्मणांना कांदे, लसूण, एक प्रकारचा भोपळा, गाजरासारखी कंदमुळे व वाल या भाज्या खाण्यास परवानगी नव्हती. या यादीवरूनही या काळात उपलब्ध असलेल्या भाज्यांच्या प्रकारांची कल्पना येते. या उपलब्ध पुराव्यावरून तत्कालीन महाराष्ट्रातील लोकांचा आहार उच्च दर्जाचा होता असे म्हणता येईल.

## मांसाहार

वर नमूद केल्याप्रमाणे पश्चिम भारतातील ब्राह्मण पूर्णपणे शाकाहारी होते. परंतु क्षत्रिय, वैश्य आणि खालच्या दर्जाच्या लोकांमध्ये, प्रामुख्याने वन्य जमातीत मांसाहार प्रचलित होता. अलमसुदी आणि अलइद्रिसी यांच्या वर्णनाप्रमाणे क्षत्रिय हे शाकाहारी नव्हते. जरी या काळातील बरेच वैश्य लोक जैन धर्माच्या प्रभावामुळे शाकाहारी बनले असले तरी या समाजातील इतर लोकांनी मांसाहार पूर्णतः वर्ज्य केला नसावा. यावरून असे दिसते की, तत्कालीन समाजातील ब्राह्मणांखेरीज इतर घटक काही प्रमाणात मांसाहारी व काही प्रमाणात शाकाहारी होते.[२३७]

या काळी प्रचलित असलेल्या पेयांमध्ये दूध, ताक, फळांचे रस आणि मद्य यांचा उल्लेख करावा लागेल. मेधातिथी आणि विश्वरूप यांनी मद्य प्राशनाचा प्रथेचा उल्लेख केला आहे. सूत्र काळापासून ब्राह्मणाने कोणत्याही प्रकारचे उन्माद आणणारे पेय घेण्यास बंदी होती. परंतु क्षत्रिय व इतर लोकांना काही उन्मादक पेये घेण्याची परवानगी होती. राजदरबारामध्ये मद्य प्राशन करणे विशेष पसंत होते असे दिसते. मानसोल्लासमधील वर्णनाप्रमाणे सण वा विवाहादि विशेष प्रसंग राजा आपल्या राण्यांना मद्य देऊन साजरा करीत असे. याशिवाय या ग्रंथामध्ये राजाच्या आहारांचे भोजन व पेये अशा दोन भागामध्ये वर्णन दिले आहे. कथासरित्सागरमधील कथांवरून असे दिसते की, राजे लोक आपल्या मंत्र्यांबरोबर आणि अंतःपुरातील स्त्रियांबरोबर मोकळेपणाने मद्यपान करीत. अवन्तिसुंदरीकथा, कालिदासाची नाटके, बाणाची कादंबरी इत्यादि ग्रंथात मिळणाऱ्या माहितीवरून असे दिसते की, राण्या व उच्च घराण्यातील स्त्रिया यांना मद्यपान करण्याची सवय होती. मद्यपान गणिकांमध्येही प्रिय होते आणि त्यांच्याकडे येणाऱ्या लोकांनाही त्या मद्य देत असत.[२३८] इब्नखुर्दब एकीकडे असे सांगतो की, क्षत्रियांना तीन कप मद्य पिण्याची परवानगी होती, तर दुसरीकडे मद्यपान करणे

बेकायदेशीर होते असेही सांगतो.[२३९] यावरून असे दिसते की, त्याच्या वर्णनातील दुसरा भाग लोकांनी मद्यपान करण्याविषयीची भावना व्यक्त करतो. अल्बेरुणी[२४०] असे सांगतो की, त्याच्या काळी भारतीय लोक भोजनापूर्वी मद्यपान करीत असत. भारतीय लोकांना निरनिराळ्या प्रकारचे मद्य तयार करण्याचे ज्ञान होते हे जरी आपल्याला ज्ञात असले तरी ह्यू-एन-त्संगच्या (Yuan Chawng) वर्णनाप्रमाणे निरनिराळ्या वर्गांचे लोक वेगवेगळ्या प्रकारचे मद्य घेत होते असे ठामपणे सांगता येत नाही. कदाचित खालच्या वर्गातील मिश्र जाती आणि रानटी लोक आजच्याप्रमाणेच त्या काळीही कडक हातभट्टीच्या मद्यासारखे उन्मादक मद्य घेत असावेत.[२४१]

प्राचीन काळी विडा खाण्याची पद्धत होती. ही पद्धत ब्राह्मणांमध्ये प्रिय होती. देवांनाही विडा अर्पण केला जात असे. मित्र किंवा प्रियकर यांना विडा देणे ही पद्धत रूढ होती. अवन्तिसुंदरीकथा व दशकुमारचरित[२४२] या ग्रंथांमध्ये सांगितल्याप्रमाणे कात, गोड सुगंधी सुपारी, कापूर चूर्ण, शिंपला चूर्ण, आंब्याचे तेल, लवंग, लहान वेलदोडे यासारखे सुगंधी पदार्थ टाकून विडा खाण्याची पद्धत होती. विड्याच्या पानाबरोबर सुपारी आणि कात खाण्याच्या हिंदू लोकांच्या सवयीमुळे हिंदुंचे दात लाल असतात असे विधान अल्बेरुणीने[२४३] केले आहे.

**पोषाख**

हिंदुच्या त्या काळच्या पोषाखामध्ये कमरेपासून घोट्यापर्यंत पोहचणारे वस्त्र आणि कमरेच्या वरचा भाग झाकला जाईल अशा रितीने दोन्ही खांद्यांवरून घेतलेले वस्त्र अशा दोन न शिवलेल्या वस्त्रांचा समावेश होत होता.[२४४] यादव काळामध्ये पुरुष दोन्ही बाजूला काठ असलेले धोतर नेसत आणि रेशमी वस्त्राचा उपयोग उत्तरीय म्हणून करीत. कधी कधी सैलसर परंतु बटण नसलेला सदराही वापरीत.[२४५] औंढा येथील नागनाथ मंदिरावरील शिल्पांमध्ये जंघीका सारखे वस्त्र धारण केलेल्या सैनिकांची शिल्पे आहेत.[२४६] त्यावरून काही शिवलेली वस्त्रेही वापरण्याची पद्धत होती असे दिसते. पंढरपूर येथील शके ११९५-११९९ या कालखंडातील चौऱ्यांशीच्या लेखामध्ये[२४७] आलेल्या शिंप्याच्या उल्लेखावरून असे दिसते की, इ. स. १२०० च्या चतुर्थ पादात बहुतेक शिवलेल्या कपड्यांची मागणी इतकी वाढली की, काही लोक शिंप्याचा व्यवसाय करू लागले. डोके झाकण्यासाठी वापरलेल्या वस्त्राला हिंदू पुरुषांच्या पोषाखामध्ये महत्त्वाचे स्थान होते. या वस्त्राला पागोटे किंवा पगडी म्हणतात. हे पागोटे म्हणजे एकच लांब कापड असे व ते डोक्याभोवती कलात्मक पद्धतीने गोलाकारात बांधीत. कान्हेरी आणि भाजे येथील शिल्प आणि अजिंठा येथिल चित्रांवरून असे दिसते की, महाराष्ट्रामध्ये प्राचीन काळापासून पुरुष डोक्यावर लांब कापडाचे पागोटे घालीत असत. शैलगृहातील शिल्पांवरूनही याची कल्पना येते. औंढा येथील नागनाथ मंदिरावरील काही सैनिकशिल्पे[२४८] ही पद्धत येथे बऱ्याच नंतरच्या काळातही अस्तित्वात होती असे

सांगतात. ही पद्धत या कालखंडाच्या अखेरीपर्यंत महाराष्ट्रात अस्तित्वात होती. आजही लहान गावातील बरेच लोक पगडी वापरताना दिसतात. यादव काळामध्ये पुरुष बाहेर जाताना पटका वापरीत. डोके झाकण्यासाठी टोपीचाही उपयोग या लोकांना ज्ञात होता.[२४९] प्राचीन काळापासून भारतामध्ये पायात जोडे घालण्याची पद्धत होती. बौद्ध, जैन व इतर साहित्यातील उल्लेखांवरून येथील लोकांना वेगवेगळ्या प्रकारचे जोडे बनविण्याची कला[२५०] चांगलीच अवगत होती असे दिसते. यादव काळातील पुरुष बाहेर जाताना वहाणही[२५१] वापरीत. इत्सिंगच्या (I-tsing) वर्णनाप्रमाणे हिंदू पुरुषाच्या पोषाखामध्ये सध्याच्या धोतराप्रमाणे कमरेभोवती परिधान केलेले वस्त्र व कमरेच्या वरच्या अंगावर घेतलेले वस्त्र अशा दोन न शिवलेल्या वस्त्रांचा अंतर्भाव होत होता. इ. स. च्या अनुक्रमे १३ व्या व १४ व्या शतकात आलेल्या मार्कोपोलो आणि इब्नबतुता या प्रवाशांच्या वर्णनाप्रमाणे इ. स. च्या १४ व्या शतकापर्यंत याच प्रकारचा पोषाख अस्तित्वात होता.[२५२]

स्त्रियांचा पोषाख पुरुषांपेक्षा फारसा वेगळा नव्हता. जरी लांब परकर, आखूड परकर (skirt), झगे (tunk), पोकले, बंडी या सारख्या शिवलेल्या कपड्यांचे ज्ञान असले तरी अशा कपड्यांचा सर्वत्र उपयोग होत नव्हता, तर समाजातील काही वर्गापुरताच यासारख्या कपड्यांचा उपयोग मर्यादित होता. यादव काळात बऱ्याच स्त्रिया नऊवारी साडी व पोलके वापरीत.[२५३]

## करमणुकीची साधने

करमणुकींच्या साधनांबद्दल उपलब्ध असलेला पुरावा (१) गाणे-संगीत व वाद्यसंगीत, नृत्य, नाटक आणि (२) शिकार, प्राणी व पक्षी यांच्या झुंजी, कुस्त्या अशा दोन भागांमध्ये विभाजित करावा लागतो. या काळातील ही लोकप्रिय अशी करमणुकीची साधने होती. यापैकी पहिल्या वर्गातील साधने राजघराणी व सामान्य या दोन्ही गटात लोकप्रिय होतीच, पण देवालयांमध्ये देवतांच्या करमणुकीकरिताही गायक, नर्तक यांची नेमणूक करीत असत. उपलब्ध असलेल्या बऱ्याच उत्किर्ण लेखांमंध्ये[२५४] देवालयातील देवांच्या रंगभोगासाठी देणग्या दिल्याचा उल्लेख मिळतो. रंगभोगामध्ये संगीत, नृत्य, नाटके यांचा अंतर्भाव होत असावा. आळतेकरांच्या म्हणण्याप्रमाणे संगीत, नृत्य, नाटके यांचे आयोजन दसरा, होळी, रामनवमी, गुढीपाडवा यासारख्या प्रसंगी करीत असावेत.[२५५] राजे लोकांनाही असे कार्यक्रम करण्याची आवड होती. त्यामुळे संबंधित कलाकारांच्या निर्वाहाचीही ते काळजी घेत. काही राजांनी तर त्याकरिता कायम स्वरुपाच्या देणग्याही दिल्या होत्या. आलमपूर प्रशस्तीनुसार बदामीचा चालुक्य राजा विजयादित्य याने मंदिरांच्या दैनंदिन खर्चाकरिता व दुरुस्तीकरिता काही खेडी दान दिली होती. त्याचप्रमाणे या देवालयांमध्ये संगीत समारोह संपन्न करण्यासाठीही दाने दिली

होती. चालुक्य राजा विक्रमादित्य द्वितीय याच्या राणीने पूर्वी राजा विजयादित्य याने गायकाबरोबर झालेल्या कराराचे नूतनीकरण केले व या कराराचे पालन संपूर्ण राज्यभर व्हावे असा आदेश दिल्याची नोंद विक्रमादित्य दुसरा याच्या पट्टदकल लेखात केलेली आढळते. शके १३३४ च्या वेळुस शिलालेखामध्ये रवळनाथ देवाच्या मंदिरामधील भाविणीस (नर्तिकेला) देणग्या दिल्याचा उल्लेख आहे.[२५६] काही गायिकांनी वीणा व मृदंग वाजविण्याच्या कलेमध्ये प्राविण्य संपादन केले होते असे होट्टल, निलंगा, धर्मपुरी येथील मंदिरांवर असलेल्या सुरसुंदरी शिल्पांमध्ये ज्या वीणा वादक स्त्रिया आहेत त्यावरून दिसते. याशिवाय होट्टल येथे एक प्रकारचे तंतुवाद्य वाजविणारीही स्त्रीशिल्पे आहेत.[२५७] ही वाद्ये नृत्यांच्या साथीला इतर वाद्यांबरोबर वाजवित असत त्याचप्रमाणे स्वतंत्रपणेही वाजवित असत. मंदिरांमध्ये नियुक्त केलेल्या नृत्य करणाऱ्या मुलींना देवासमोर बऱ्याच वेळा नृत्य करावे लागत असे. होट्टल व धर्मपुरी[२५८] येथील मंदिरांवर बासरीच्या सुराच्या तालावर नृत्य करणारी काही स्त्रीशिल्पे आहेत. ती कदाचित मंदिरांमध्ये नृत्य करणाऱ्या मुलींचे प्रतिनिधीत्व करीत असावीत. औंढा येथील नागनाथाच्या मंदिरावर नृत्य समारोहाचे अस्तित्व दाखविणारी काही शिल्पे आहेत. या ठिकाणी दाखविलेल्या मिरवणुकीच्या दृश्यामध्ये तीन मूर्ती आहेत. यापैकी मधल्या मूर्तीचे हात डोक्याच्या वर उंच दाखविले आहेत, तर तिच्या बाजूला असलेल्या मूर्ती कमरेत वाकल्या असून त्या टाळ वाजवीत आहेत. त्याचप्रमाणे निलंगा येथील मंदिरावर दिसणारी मृदंग वादिका अशाच एखाद्या नृत्यसमारोहात भाग घेणारी असावी. नृत्य हे राजे लोकांच्या करमणुकीचे आवडते साधन होते. राष्ट्रकूट राजा कृष्ण प्रथम याच्या दरबारी, कडब ताम्रपटात[२५९] सांगितल्याप्रमाणे कुशल नर्तक होते. यादव राजा सिंघण याच्या एका लेखामध्ये ब्राह्मण आणि नर्तिकांना दाने दिल्याचा उल्लेख आहे. यादव राजांच्या लेखांमध्ये देवदासींचा उल्लेख मिळत नाही.[२६०] ही प्रथा गुजरात व दक्षिण भारतामध्ये अस्तित्वात होती. संन्यास पत्करावयाची इच्छा असणाऱ्या व्यक्तीच्या दृढनिश्चयाची परीक्षा प्रसंगी मंदिरातील नृत्यांगनेला पाठवून घेतली जाई.[२६१] अरब इतिहासकारांच्या मते आर्थिक लाभासाठी राजांनी या नृत्यांगनांना शहराचे आकर्षण केंद्र आणि प्रजेच्या मनात सुखाचे प्रलोभन उत्पन्न होईल असे बनविले होते आणि याप्रकारे प्राप्त होणाऱ्या उत्पन्नावर सैन्याचे पोषण केले जात असे.[२६२] नृत्यावरोबर नाटकांमध्येही राजांना रुची होती. यादव राजा रामचंद्र याच्या शके १२३२ च्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटामध्ये आमण याला नाटके पाहणे फार आवडत असे असा उल्लेख आहे. गायकांच्या स्वतंत्र वसाहती असत. करकरीग्राम, कोहोर, बेकूरी आणि तुर्रे यासारखी अनुक्रमे रट्ट बल्लाळ याच्या शके ११९२ च्या अर्धापूर[२६३] व शके ११९५-११९९ च्या पंढरपूर[२६४] येथील चौऱ्यांशीच्या लेखात उल्लेखिलेली गावे, तसेच रट्टांच्या शके ११२४ च्या कोल्हापूर[२६५] व यादव राजा कृष्ण याच्या शके ११८० च्या कान्हेगाव[२६६] लेखांमध्ये आलेली गावे वाद्यवादक आणि संगीत मंडळांची गावे असावीत. करकरी हे एक प्रकारचे तंतुवाद्य आहे आणि मोनियर विलियम्सने दिल्याप्रमाणे कोहोर हेही एक

वाद्य आहे. परंतु बेकूरी हे वाद्य नसून मोनियर विलियम्सने दिल्याप्रमाणे बेकूरी या शब्दाचा अर्थ वाद्य वाजविणे असा होतो. त्याचप्रमाणे संगीत मंडळांसाठी पाणिनीने तुर्रे हा शब्द दिला असून या मंडळाच्या प्रत्येक सभासदासाठी तुर्यांग अशी संज्ञा होती.[२६७] या अर्थानुसार करकरीग्राम आणि कोहोर ही गावे विशिष्ट प्रकारच्या वाद्ये वाजविणाऱ्यांच्या वस्तीची दिसतात, तर बेकूरी व तुर्रे ही नावे वादक मंडळ व संगीत मंडळांच्या गावांचा बोध करतात.

करमणुकीच्या साधनांच्या दुसऱ्या गटात अंतर्भूत असलेले "शिकार" हे राजे तसेच सामान्य जनता याचे आवडते साधन होते. राष्ट्रकूट राज्यामध्ये राजे व सरदार यांना शिकार खेळण्यासाठी बऱ्याच ठिकाणी राखीव जंगले होती.[२६८] यादव कालामध्ये कुत्र्यांच्या मदतीने सशाची शिकार करण्याची प्रथा रूढ होती.[२६९] याशिवाय लोखंडाची पाती असलेले बाण[२७०] आणि महाराष्ट्रात बऱ्याच ठिकाणी पुरातत्वीय उत्खननांद्वारे प्राप्त झालेल्या हाडांच्या बाणाग्रांपैकी बऱ्याच बाणाग्रांचा उपयोग शिकारीसाठी होत असला पाहिजे. प्राण्याची झुंज लावणे हा दुसरा एक लोकप्रिय खेळ या काळात होता. गंग वंशाच्या एका लेखामध्ये अस्वल आणि शिकारी कुत्रा यांच्यामधील झुंजीचे वर्णन आहे. अशा प्रकारच्या "झुंजी" लावण्याची पद्धत राष्ट्रकूट साम्राज्यात होती[२७१] असे दिसते. यादव काळामध्ये बैलांच्याही झुंजी लावत.[२७२] प्राचीन लोकांना "कुस्ती" या खेळाचीही आवड होती. सातगाव येथील मंदिराच्या भिंतीवर मजबूत आणि दणकट शरीरयष्टी असलेल्या मल्लाचे शिल्प[२७३] हे तत्कालीन लोकांचे कुस्ती विषयीचे प्रेमच दर्शविते. राष्ट्रकूट वंशाच्या शके ७२० च्या वडगाव लेखामध्ये[२७४] आलेले मल्लकग्राम, याच वंशाचा राजा अकालवर्ष याच्या शके ८८२ च्या कोल्हापूर लेखामध्ये[२७५] उल्लेखिलेले चोक, यादव राजा सिंघण याच्या पुळुंज कानडी लेखातील[२७६] पोरगाव आणि शके १२२१ च्या सावई वेरे लेखात[२७७] उल्लेखिलेले खाडे नामक गाव या सारखी स्थलनामे अनुक्रमे मल्ल, कुस्तीतील विशिष्ट पेच, कुस्ती व आखाडा यासाठी प्रसिद्ध असलेल्या गावाचे अस्तित्व दर्शवितात. यापैकी मल्लकग्राम हे मल्लाचे, तर चोक हे कुस्तीतील विशिष्ट डावपेचाचे ज्ञान असलेल्या मल्लाचे नाव असावे. किट्टेलने दिल्याप्रमाणे खाडे या शब्दाचा अर्थ कुस्तीचा सामना असा होतो. ज्ञानेश्वरीमध्ये "कठपुतळी" या मनोरंजक खेळाचा उल्लेख आहे.[२७८] येथे दिलेल्या वर्णनाप्रमाणे परमेश्वर हा या खेळातील सूत्रधार असून आपल्या मताप्रमाणे सूत्रे हालवून मानवरुपी कठपुतळ्यांना नाचवतो.

### व्रते आणि सण

व्रते आणि सणांच्या प्रसंगी निरनिराळ्या प्रकारे मनोरंजन करण्याची प्रथा होती. स्मृतिकारांनी पहिल्या तीन जातींनी निश्चितपणे पाळावयाच्या व्रतांची यादी दिलेली आहे. या कालखंडामध्ये एकादशी, अनंतव्रत, जन्माष्टमी, नवचण्डि, शिवलिंगार्चना पर्वणि, गुरुपूजा,[२७९] पंचलांगल आणि अग्निष्टिका[२८०] ही महत्त्वाची व्रते होती.

राष्ट्रकुटांच्या ताम्रपटांमध्ये तुलापुरुषदान, हिरण्यगर्भदान, राज्याभिषेक, पट्टबंध समारंभ यांची नोंद मिळते. उभयमुखीदानाचीही विशेष नोंद मिळते. गाय प्रसूत होताना दिलेल्या दानास उभयमुखीदान म्हणत.[२८१] महानुभाव साहित्यात विशेषतः स्थानपोथी व लीळाचरित्रात अग्निष्टिकाबाबत नोंद आलेली आहे. मुळात राष्ट्रकूट राजा कृष्ण तिसरा याच्या कंधार शिलालेखात शहराच्या विविध भागांमध्ये पाच ठिकाणी अग्निष्टिका आहेत अशी नोंद मिळते. अग्निष्टिका म्हणजे राजाने हिवाळ्यात थंडीपासून जनतेचे रक्षण करण्यासाठी निर्माण केलेली सामुदायिक शेकोटी असे बहुतेकांनी म्हटले आहे. वास्तविक पाहता या विषयीचे जे जे तपशील महानुभाव साहित्यात मिळतात त्यावरून अग्निष्टिका म्हणजे केवळ शेकोटी किंवा पाणपोई (प्रपा) प्रमाणे केलेली तात्पुरती सोय असे होत नाही, तर विधिपूर्वक करायचे हे एक व्रत असावे. ते सामुहिकपणे मोठ्या प्रमाणात केले जात असावे असे दिसते. अग्निष्टिका म्हणजे या व्रतासाठी केलेले यज्ञकुंड असे मानावे लागते. अशा अग्निष्टिका मंदिरालगत असल्याची नोंद मिळते.[२८२] उदाहरणार्थ, वेरूळ येथील जगतुंगाचे मंदिर, कनकली येथील एल्हनेश्वर मंदिर, नेऊर येथील कंठेश्वर मंदिर अशा मंदिरालगत अग्निष्टिका असल्याची नोंद आहे. याविषयीचे अन्य तपशीलही स्थानपोथीत आढळतात. स्थानपोथीमध्ये एकूण १५ गावांमध्ये अग्निष्टिका असल्याची नोंद आहे. पुरुषोत्तमपुरी ताम्रपटात याविषयी नोंद मिळते. नेऊर गावातील रामचंद्र यादव याच्या शके १२०० च्या लेखात ही नोंद आहे. हा लेख गो. म. दीक्षित यानी संपादित केला आहे. गंडरादित्याच्या ताळले ताम्रपटात शक संवत् १०३३ मधील एक प्रमुख व्रत म्हणून नोंद मिळते. या संदर्भात डॉ. मिराशी म्हणतात की, अग्निष्टिका व्रत हेमंत व शिशिर ऋतुत केले जाई. त्याचा प्रारंभ मार्गशीर्षात करीत. या व्रतात अग्निभोवती बसून धार्मिक व सामाजिक चर्चा होई. त्यायोगे पुण्यप्राप्ती होते अशी श्रद्धा असे. प्रामुख्याने गोदावरीच्या तीरावरील भागात हे व्रत आचरले जाई. तसेच गावाच्या बाहेर नदी, ओढा, लहान जलाशय याच्या काठी किंवा मंदिरालगत घाटावर अशा अग्निष्टिका असत. यांना स्थापत्यशास्त्रीय वैशिष्ट्य असे. एका मोठ्या चौथऱ्यावर अग्निष्टिका बांधीत. तेथपर्यंत चढून जाण्यासाठी पायऱ्या असत. पायऱ्यालगत ओटे (सोंडी) बांधलेले असत. मुख्य चौथऱ्यावर वेदिका व त्यावर बऱ्याचदा माहुटी (ओट्यावर बांधलेल्या छताचा भाग) असे. बहुतेकवेळा या अग्निष्टिकायुक्त चौथऱ्यास प्रशस्त असे आवार बांधून त्याला एक प्रवेशद्वार ठेवीत. याबाबतची तपशीलवार नोंद महानुभाव साहित्यातून उपलब्ध होते.[२८३] राष्ट्रकूट काळापासून यादव काळापर्यंत या व्रताचे सातत्यही जाणवते. यादव काळात रूढ असलेल्या अन्य व्रताबाबतची माहिती लीळाचरित्र व गोविंदप्रभू चरित्रात आली आहे. माहिमभट्टाने हे दोन्ही ग्रंथ अनुक्रमे शके १२०० व शके १२१० मध्ये लिहून पूर्ण केले. यातील नोंदीप्रमाणे यादव काळात सोमवती पर्वास विशेष महत्त्व असे, या दिवशी श्राद्ध विधी केले जात, पौर्णिमेला व सिंहस्थ पर्वणीलाही महत्त्व असे, एकादशीव्रत मोठ्या प्रमाणात केले जाई, अनंतचतुदर्शी,

कृष्णजन्माष्टमी किंवा गोकुळाष्टमी या व्रताबरोबरच नवचंडिकेची उपासनाही करीत, अक्षयतृतीयेचे (अखतिज) विशेष महत्त्व मानले जाई, आषाढी पौर्णिमेपासून कार्तिकी पौणिमेपर्यंत शिवलिंगास रोज बेल वाहून लिंगपूजाविषयक व्रताचे पालन करीत यासारख्या अनेक बाबींचा तपशील या साहित्यातून पहावयास मिळतो.[२८४]

याशिवाय नागपंचमी, गुढीपाडवा ह्यासारखे सण मोठ्या उत्साहाने साजरे करीत. यांचा उल्लेख तत्कालीन मराठी साहित्यातही मिळतो. त्याचप्रमाणे होळी, दिवाळी हेही महत्त्वाचे सण होते. याखेरीज श्रावणी, पौर्णिमा, पोळा, भावेषण आणि दमणक पर्व[२८५] हे सणही महत्त्वाचे होते.

## अंधश्रद्धा आणि विश्वास

तत्कालीन समाजामध्ये बऱ्याच अंध समजुती प्रचलित होत्या. यापैकी पुत्रप्राप्तीसाठी देवाला नवस करणे आजही अस्तित्वात आहे. शिलाहार राजा अपरादित्य याच्या शक संवत् ११०६ च्या लोनाड लेखामध्ये[२८६] ईश्वरनायक नामक व्यक्तीने पुत्र प्राप्तीसाठी शिव-पार्वतीची आराधना केल्याचा उल्लेख आहे. राजाला पुत्र प्राप्ती व्हावी म्हणून आपले स्वतःचे डोके कापून ईश्वरपदी वाहण्याचा नवस करणारेही लोक होत.[२८७] राष्ट्रकूट वंशाच्या काही लेखांमध्ये अशा प्रकारच्या नवसाचा उल्लेख मिळतो. काही विशिष्ट प्रकारच्या शपथा आणि अटी पाळल्या तर देवाला भक्तांच्या मनाप्रमाणे करावेच लागते असा विश्वास होता. काही लोक तर त्यांच्या मनाप्रमाणे न केल्यास परमेश्वराला असहकाराचाही धाक दाखविताना आढळतात. राष्ट्रकूट काळामध्ये सुगलादेवी नामक स्त्रीने जीवंत साप पकडला हे कृत्य तिच्या पावित्र्याची खूण मानून तिच्या सन्मानार्थ एक मंदिर बांधले अशी नोंद मिळते.[२८८] विशिष्ट दिवशी सापाचे पूजन करण्याची प्रथा होती. काही वेळेस त्याचे नेहमी पूजन करता यावे म्हणून दगडाच्या आणि इतर साहित्याच्या मूर्ती करून त्यांची देवळांमध्ये किंवा चौथऱ्यावर स्थापना करीत. राष्ट्रकूट वंशाच्या शके ७२० च्या वडगाव ताम्रपटामध्ये[२८९] उल्लेखिलेले उरगग्राम किंवा पाषाणोरगग्राम, त्याचप्रमाणे शिलाहार वंशाच्या शक संवत् ९३९ च्या ठाणे ताम्रपटात[२९०] वर्णिलेले नागाम्बा ही स्थलनामे महाराष्ट्रात अस्तित्वात असलेल्या या प्रथेस पुष्टी देतात. लोकांचा भूतपिशाच्यांच्या अस्तित्वावर विश्वास होता. भूतबाधा झालेल्या माणसाची भूतापासून सुटका व्हावी म्हणून लोक देवाची पूजा करीत असत. लीळाचरित्रामध्ये दिल्याप्रमाणे जर एखाद्या व्यक्तीला अपघाती मरण आले तर त्याचा आत्मा भूत बनतो व एखाद्या व्यक्तीच्या ठिकाणी वास करतो. त्या भुताला शांत करण्यासाठी काही धार्मिक विधी करणे आवश्यक समजत. लोकांचा परमेश्वराच्या अवतार सिद्धान्तावर विश्वास होता. त्याचप्रमाणे आपल्या गुरुलाही ते परमेश्वराचा अवतार समजत.[२९१]

### रूढी व चालीरीती

तत्कालीन समाजात प्रचलित असलेल्या चालीरीतींपैकी काही महत्त्वाच्या प्रभावी रूढी व चालीरीतींचाच परामर्श याठिकाणी घेतला आहे. जन्म व विवाह हे दोन प्रसंग सामाजिक सण म्हणून पाळले जात. अडचणीच्या प्रसंगी एकमेकांना मदत करण्याची पद्धत होती. अशा मदतीबद्दल मदत घेणारा त्या मदतकर्त्यांशी कृतज्ञतेने वागत असे. या दृष्टीने खाटेग्रामच्या दोनशे वाण्यांनी वेरे येथील सेट्टींना संकट प्रसंगी मदत केली. त्याची कृतज्ञतापूर्वक व अंशतः भरपाई करण्याच्या हेतूने दिलेला कायम स्वरूपाचा शासनपट वैशिष्ट्यपूर्ण आहे. या मानसन्मानाच्या शासनपटाद्वारे वेरे येथील तीन सेट्टींना खाटेग्रामच्या वाण्याकडून खाटेग्राम येथील चालीप्रमाणे विवाह, जन्मोत्सव आणि अशाच इतर विशिष्ट प्रसंगी विशिष्ट मानसन्मान कायम मिळत राहतील अशी व्यवस्था केली होती.[२०२] रणांगणी मृत्यू पावलेल्या वीरांच्या स्मृतिदाखल स्मारक उभारीत असत.[२०३] त्याचप्रमाणे सती[२०४] गेलेल्या स्त्रीचेही स्मारक उभारीत. श्रीमंत लोकांच्या घरामध्ये स्त्री गायक नोकरीस ठेवीत.[२०५] बेकायदेशीर पत्नी (अंगवस्त्र) ठेवण्याचीही श्रीमंत समाजात पद्धत होती.[२०६]

## अर्थव्यवस्था

कोणत्याही प्रदेशाच्या आर्थिक परिस्थितीचा आढावा त्या प्रदेशाची कृषिविषयक व औद्योगिक संपत्ती, त्याचप्रमाणे व्यापार व व्यापारविषयक कार्यक्रम यांच्या मदतीने घ्यावा लागतो. या दृष्टीने महाराष्ट्रातील बदामीच्या चालुक्य वंशाच्या राजवटीपासून ते यादव वंशाच्या शासनकालाच्या अखेरपर्यंतच्या कालखंडातील आर्थिक परिस्थितीची नोंद पुढीलप्रमाणे घेता येईल :–

### भूमी व जलाशय

सर्वसाधारणपणे सर्व जमीन ही राजाच्या मालकीची असे परंतु शेती करण्याकरिता ती निरनिराळ्या लोकांच्या गटात वाटली जाई. यापैकी राजाच्याही मालकीची सेवेलने दिल्याप्रमाणे काही शेतजमीन असे. तिला "खास जमीन" असे म्हणत. गुलाम, मजूर, कैदी यांच्या सहाय्याने या जमिनीची मशागत केली जाई.[२०७] काही जमीन शेतकरी स्वतः कष्ट करून कसत, तर ब्राह्मण व धर्मसंस्था यांना दान दिलेल्या काही जमिनीवर हे लोक मजुरांना नियुक्त करून त्यांच्या मदतीने शेतीविषयक कामे करून पीक काढत. याप्रमाणे या काळामध्ये शेतीची मशागत या दोन गटातील लोक करताना दिसतात. राजाच्या ताब्यात असलेल्या जमिनीचे उत्पन्न राजघराण्यातील जे लोक त्यांच्या निर्वाहासाठी राजावर अवलंबून असत त्यांच्यासाठी खर्च केले जाई. काही वेळेस राजा स्वतःच्या मालकीच्या शेतांपैकी शेते दान देत होता असे गौतमीपुत्राच्या नाशिक शैलगृहातील लेखावरून दिसते.[२०८] चालुक्य राजा पुलकेशी प्रथम याच्या लोहनेर लेखामध्ये[२०९] राजाला

मिळणाऱ्या सर्व उत्पन्नासह एक गाव दान दिल्याचा उल्लेख आहे. या दानपत्रावरून असे दिसते की, या गावातून मिळणाऱ्या उत्पन्नाचा काही भाग राजघराण्यातील म्हणजे शासन करणाऱ्या राजाचे कुटुंब सोडून इतर लोकांच्या खर्चासाठी ठेवला जात असे. काही चोलवंशीय लेखातील[३००] राजकुलाची जमीन म्हणून काही शेतांच्या आलेल्या उल्लेखावरून राजाची खास जमीन असे या विधानाला पुष्टी मिळते. याशिवाय मशागतयोग्य, पण पडीक असलेली शेतजमीन राजाच्या ताब्यात असे. अशी जमीन राजाने तेथे वसाहत स्थापन करून उपयोगात आणावी असे कौटिल्य[३०१] सांगतो. नरिंदकग्राम,[३०२] रासेनपूर,[३०३] अरसियवाड,[३०४] राजऊराग्राम,[३०५] राइग्राम,[३०६] रांजली,[३०७] राजगाऊ,[३०८] रायरी,[३०९] यासारख्या निरनिराळ्या राजवंशीय राजांच्या लेखामध्ये उल्लेखिलेल्या वसाहती त्यांच्या नावातील पहिल्या भागातील शब्दांनुसार राजांच्या मालकी होत्या असे दिसते. येथील जमीनही राजाच्या मालकीची असली पाहिजे हे उघड आहे. नवीन जमीन किंवा प्रदेश लागवडीखाली तसेच वसाहतीसाठी उपयोगात आणण्याची क्रिया या काळातही चालू होती. जे लोक व्यवसायाने शेतकरी होते त्याच्या व्यतिरिक्त न्हावी, सोनार, गावुंड, खलाशी, धोबी, माळी, देवदासी यासारख्या व्यक्तीही जमिनीच्या मालक होत्या असे कल्याणीच्या चालुक्य वंशीय राजांच्या चिकुर्डे, मरमुरी व मिरज[३१०] या कोरीव लेखातील उल्लेखावरून दिसते. हे लोक स्वतः जमीन कसत असावेत. काही लेखांमध्ये आलेल्या लोक न्हावी या संज्ञा यासारख्या शेतकऱ्यांचे प्रतिनिधित्व करीत असाव्यात.[३११] ज्या जमिनी शेतकरी आपली साधने देऊन दुसऱ्यांकडून कसून घेत असे त्या जमिनींना कामतभूमि[३१२] म्हणत, तर ज्या जमिनींची मशागत कुळांकडून केली जात असे, त्या जमिनीना वहिवाट अशी संज्ञा असे. या जमीनदारांचा दर्जा कोरीव लेखात उल्लेखिलेल्या जमिनीचे मालक असणारे ब्राह्मण व जमिनी बाळगणाऱ्या धार्मिक संख्या यांच्याप्रमाणे असावा. शेतावरील अधिकारांचे हस्तांतरण (Transfer) गावातील समाजाच्या किंवा गावातील महाजनाच्या पूर्वसंमतीखेरीज होत नसे. उदाहरणार्थ, जैत्र सामंत राज्य करीत असतांना त्याने आठगाव वेळितामधील अग्राहार घोणसविरी येथील हक्क (अष्टभोग तेज साम्यासहित) आदियक्षपालाकडून विकत घेतले व त्या गावातील काही अधिकारी व्यक्तिच्या परवानगीने गोविंद कवी याजकडे दिले. आपला भाऊ लखमिदेव कुवर व आपला प्रधान देऊगिनायक यांच्यासह जैत्र सामंत व गावचे महाजन हे त्या हक्काचे प्रतिपालक होते.[३१३] प्रभुत्वासंबंधी भविष्यकाळात काही प्रश्न उपस्थित होऊ नये म्हणून कदाचित ही दक्षता घेतली असावी. विज्ञानेश्वरानेही आपल्या "दायभाग" या भागाच्या प्रस्तावनेमध्ये जमिनीवरील प्रभुत्वाच्या हस्तांतरणासाठी गावातील समाज आणि जातींची संमती आवश्यक आहे असे सांगणाऱ्या काही मूळ ग्रंथाचा उल्लेख केलेला आहे. अशी परवानगी फक्त व्यवहाराच्या प्रसिद्धीसाठी आवश्यक आहे असेही तो पुढे म्हणतो. परंतु

अशी परवानगी घेतलेली नसेल तर केलेल्या व्यवहार रद्द होईल असे नाही; असेही त्याने पुढे विधान केलेले आहे, या संदर्भात आळतेकरांनी दोन लेखांचा उल्लेख केलेला आहे. सौदत्ती लेखानुसार जैन मंदिराला दिलेले जमिनीचे दान पन्नास शेतकऱ्यांच्या परवानगीने दिले होते. यावरून जमिनीच्या हस्तांतरणासाठी गावातील प्रमुखाची परवानगी घेणे आवश्यक होते हे सिद्ध होते, तर इ. स. १३ व्या शतकातील बेळगाव जिल्ह्यामध्ये मिळालेल्या लेखातील उल्लेखाप्रमाणे तशी परवानगी घेण्याची आवश्यकता हळूहळू कमी होऊ लागली होती असे दिसते. कारण या लेखानुसार रट्ट कार्तविर्याने नेसरगे येथील देवालयाला जेव्हा काही कम्म जमीन दान दिली तेव्हा या गावातील सहा गावप्रमुखांना प्रचलित असलेल्या प्रथेनुसार काही पैसे बक्षीस म्हणून दिले होते.[३१४] यावरून असे दिसते की, जमीन हस्तांतरणासाठी गावप्रमुखांची पूर्वपरवानगी घेणे याला एक औपचारिक व्यवहाराचे स्वरूप प्राप्त झाले होते. या लेखातील माहिती विज्ञानेश्वराच्या विधानाची पुष्टी करते.

भूमीचे मापन करण्यासाठी निवर्तन व मत्तरू (मत्तर) अशी दोन प्रमुख मापे अस्तित्वात होती. परंतु प्राचीन विद्वानांनी या मापांची व्याख्या वेगवेगळी केलेली आहे. उदाहणार्थ, कौटिल्य निर्वतन ९०० चौरस दंडाचे मानतो, तर भास्कराचार्याच्या लीलावतीमध्ये ते ४०० चौरस दंडाचे सांगितले आहे. शुक्रनीतिसार या ग्रंथामध्ये ते ६२५ चौरस दंडाचे दिसते.[३१५] कलचुरी नृपति शंकरगण याच्या आभोणे ताम्रपटात[३१६] उल्लेखिलेले निवर्तन १६०० चौरस दंडाचे असावे असे मिराशींचे मत आहे. निवर्तनाप्रमाणे मत्तरू या परिमाणाची अचूक व्याख्या करणे कठीण आहे. किट्टेलने मत्तरू हे भू-परिमाण आहे असे सांगितले आहे.[३१७] आळतेकरांनी मत्तरू भूमीतून मिळणाऱ्या उत्पन्नाच्या आधारे या परिमाणाची व्याख्या केलेली आहे. तिलगुंड लेखामध्ये एका मत्तरूतून दोन खण्डुग उत्पन्न मिळते असे सांगितले आहे. दोन खण्डुग म्हणजे ४० मण. आळतेकरांच्या म्हणण्याप्रमाणे दक्षिण भारतामध्ये प्रत्येक एकरी निव्वळ उत्पन्न ६ ते १२ मण होते. दर मत्तरू निव्वळ उत्पन्न ४० मणापेक्षा अधिक आहे म्हणून आळतेकर एक मत्तरू म्हणजे एकर अशी मत्तरूची व्याख्या करतात.[३१८] याशिवाय निवर्तने जमीन मोजण्यासाठी असलेले दंड निरनिराळ्या प्रदेशात वेगवेगळ्या प्रकारचे होते. उदा. शिलाहार राजा मुम्मुणिराज याच्या शक संवत् ९७० च्या ठाणे लेखामध्ये कल्लिवन दंडाचा उल्लेख आहे, तर राजा गण्डरादित्य याच्या शक संवत् १०४८ च्या कोल्हापूर लेखामध्ये दान दिलेली जमीन कुंडिदंडाने मोजल्याचे वर्णन आहे. राजा भोज याच्या शक संवत् ११०४ च्या कोल्हापूर लेखामध्ये एडेनाड दंडाचा उल्लेख आहे.[३१९] त्याचप्रमाणे गंग उदयादित्याच्या शके १०६६ च्या आंबे लेखात निवर्तनासाठी "सालिवण" दंडाचा, तर कलचुरी राजाच्या शके १०८६ च्या तेर लेखामध्ये सेलुटी दंडाचा उल्लेख केलेला आहे.[३२०] हीच परिस्थिती "मत्तर" मोजण्याच्या दंडाच्या बाबतीतही दिसून येते. आळतेकरांनी दिल्याप्रमाणे शिलाहार गोंक याच्या एका लेखात[३२१] तांबोल दंडाने २००० मत्तर जमीन, मागन (Magun) दंडाने दोन मत्तर

जमीन व भातशेतीची लहान दंडाने मोजलेली तीन मत्तर जमीन दान दिल्याचा उल्लेख आहे. एकाच राजाच्या एकाच लेखामध्ये केलेल्या या निरनिराळ्या दंडांच्या उल्लेखावरून हा मापन करण्याचा दंड निरनिराळ्या प्रदेशात वेगवेगळा होता हे दिसून येते असे आळतेकरांचे मत आहे. या प्रमुख परिमाणांखेरीज हस्त, कम्म आणि हल ही इतर परिमाणेही जमिनीचे मापन करण्यासाठी या काळात अस्तित्वात होती. यापैकी हस्त या मापाचा उल्लेख चालुक्य राजा जनमेजय याच्या चिकुर्डे व चालुक्य राजा वीर सत्याश्रय यांच्या मिरज ताम्रपटामध्ये आलेला आहे. या लेखानुसार दान दिलेली जमीन गृह हस्ताने मोजून दिलेली होती. तुळपुळे यांच्या मते गृह या संज्ञेचा अर्थ या ठिकाणी चौरस (square) असा आहे. कम्म या परिमाणाचाही उल्लेख महाराष्ट्रात उपलब्ध झालेल्या कोरीव लेखामध्ये मिळतो.[३२२] हे परिमाण मुख्यत्वेकरून कोल्हापूर, सांगली विभागात प्रचलित होते असे वाटते. शिलाहार महामंडलेश्वर बल्लाळ याच्या काळच्या कोल्हापूर लेखात दोनशे कम्म जमीन जैन मंदिराला दान दिल्याचा उल्लेख आहे.[३२३] कम्म हा शब्द स्तंभ असाही लिहीत असे राजा विजयादित्य याच्या शक संवत् १०७३ च्या बामणी लेखातील[३२४] दान दिलेल्या बगीचाच्या वर्णनावरून वाटते. हा बगीचा ३० कम्म होता. रट्टकार्तवीर्याने शके ५०० च्या रायबाग लेखात[३२५] नमूद केल्याप्रमाणे चार हजार शंभर कम्म जमीन दान दिली होती. चालुक्य राजा त्रैलोक्यमल्ल आणि रायमुरारी सोईदेव यांच्या भाळवणी कानडी लेखामध्ये[३२६] २०० कम्म जमीन भाळवणी येथील मंदिराला दान दिल्याचे नमूद केले आहे.

कम्म या मापाच्या व्याख्येबद्दलही विद्वानांमध्ये एकमत नाही. मिराशींच्या मते १०० कम्म म्हणजे एक मत्तर. परंतु कृष्ण मुरारीच्या म्हणण्यानुसार ९०० कम्म म्हणजे एक मत्तर.[३२७] काही वेळेस जमीन मोजण्यासाठी हल हे परिमाणही वापरीत. हल म्हणजे एका बैलजोडीने नांगरलेली जमीन. मिराशींच्या मते ही जमीन ५ एकर एवढी असते.[३२८] भट्टाचार्य पी. यांच्या म्हणण्यानुसार एक हल म्हणजे ३ एकर जमीन. नांगरलेल्या शेताला हलिक्षेत्र म्हणत.[३२९] शिलाहार राजा अपरादित्य याच्या शक संवत् ११०७ च्या ठाणे ताम्रपटामध्ये[३३०] ताण्डुल हलिक्षेत्रच्या उत्पन्नातून काही भाग दान दिल्याचा उल्लेख आहे. यादव राजा सिंघण याच्या शके ११२८ च्या पाटण लेखात शेतातील उत्पन्नाच्या संदर्भात "हल" शब्द दिला आहे.[३३१] परंतु या दोन्ही लेखांमध्ये "हल" हा शब्द भू-माप या अर्थाने दिलेला वाटत नाही. काही वेळेस जमिनीच्या उत्पादन क्षमतेनुसार जमिनीची मोजणी करीत. मठगाव लेखात[३३२] "भुमी भूमर्याची" असा उल्लेख असून संगम देवराय याच्या शके १३३५ च्या बांदोडे लेखामध्ये[३३३] वेदखंडिकेचे "कुलाग्र" असा उल्लेख आहे. वरील शब्दप्रयोगाचे तुळपुळेंच्या मताप्रमाणे अनुक्रमे दोन भरे (१६० पायल्या किंवा १० मण) व चार खंडी इतके धान्य निघेल इतकी भूमी असे अर्थ होतात. शेतातून प्रतिवर्षी धान्य किती निघते यावरून शेतात मापन करण्याची ही पद्धत अभिनवच म्हटली पाहिजे.

महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागातील जमिनीचे स्वरूप व उत्पादन क्षमता यामध्ये भिन्नता आहे. खरे म्हणजे पूर्ण महाराष्ट्राची जमीन ही काळ्या मातीची बनलेली आहे.

परंतु काही ठिकाणच्या जमिनीवर शतकानुशतके कार्बनडाय ऑक्साईड मिश्रित पावसाचे पाणी पडल्यामुळे त्याठिकाणी जमिनीचा रंग बदललेला आहे. या काळातही परिस्थिती फार वेगळी नसावी. महाराष्ट्राची जमीन कसदार असून तिची नियमित मशागत होते असे ह्यू-एन-त्संगने (Yuan Chwang) वर्णन केले आहे.[३३४] इ. स. च्या ९ व्या ते १० व्या शतकामध्ये भारताला भेटी दिलेल्या अरब प्रवाशांनी पश्चिम भारतातील कसदार जमिनीचा तसेच धान्ये व फळे यांच्या उत्नादनाचा उल्लेख केलेला आहे.[३३५] महाराष्ट्रामध्ये निरनिराळ्या ठिकाणी झालेल्या पुरातत्त्वीय उत्खननांमध्ये मिळालेले विळे[३३६] आणि फावडे[३३७] या खेरीज बैलांनी ओढावयाचा नांगर ही शेतीसाठी लागणारी अवजारे होती. नांगरलेल्या शेताला "हलिक्षेत्र" म्हणत. शिलाहार लेखामध्ये[३३८] ताण्डुल हलिक्षेत्र असा उल्लेख आहे. शेती ही पावसाचे पाणी आणि नद्या, सरोवरे, तलाव, राजे व इतर लोकांनी बांधलेल्या पाण्याच्या टाक्या व विहीरी इत्यादीपासून काढलेल्या पाटाच्या पाण्यावर अवलंबून होती. शिग्गाव ताम्रपटामध्ये[३३९] बदामीचा चालुक्य राजा विजयादित्य याने अकरा टाकी खोदल्याचा उल्लेख आहे. यादव राजांनी बांधलेल्या टाक्यांचा उल्लेख या वंशाच्या राजांनी दिलेल्या लेखांमध्ये मिळतो.[३४०] हेमाद्रि पाण्याच्या दानाला फार महत्त्व देतो. तलाव बांधणे हे सात पुण्यकर्मापैकी एक होते आणि माणसाने ते आपल्या आयुष्यात केले पाहिजे असे हेमाद्रि सांगतो. निरनिराळ्या राजवंशाच्या राजांच्या उत्किर्ण लेखांमध्ये आलेली तडवले, तडकल्लू, तडगुरू, तळावल्लिका, तळावलीपल्लिका केरेयेली यासारखी स्थलनामे या काळात अस्तित्वात असलेल्या नैसर्गिक तसेच बांधलेल्या तलावांबद्दल माहिती पुरवितात. यापैकी तडवले हे नाव राष्ट्रकूट राजा कृष्ण प्रथम याच्या शके ६९० या तळेगाव ताम्रपटातील आहे.[३४१] हे पुनक विषयात वसलेले होते. या नावातील सुरुवातीचा "तड" हा शब्द "तडाग" या शब्दाचे संक्षिप्त रूप आहे असे दिसते. चालुक्य राजा सोमेश्वर प्रथम व सोमेश्वर द्वितीय यांच्या अनुक्रमे शके ९६९ व ९९३ च्या ताडखेल लेखातील तडकल्ल व तडगुरा ही स्थलनामेही[३४२] वर दिलेल्या प्रकारचीच आहेत. तळावल्लिका[३४३] हे स्थलनाम चालुक्य वंशाच्या शके ६११ च्या दिवेअगर ताम्रपटामध्ये आलेले आहे, तर तळावलीपल्लिकाचा[३४४] उल्लेख शिलाहार राजा अरिकेसरीच्या ठाणे ताम्रपटात आहे. केरेयेलीचा (Kereyeli) उल्लेख चालुक्य वंशाच्या इ. स. ११३४ येरगी ताम्रपटात मिळतो.[३४५] केरे म्हणजे किट्टेलने दिल्याप्रमाणे तलाव असा अर्थ होतो. या स्थलांच्या सध्याच्या गावाशी केलेल्या तादात्म्यावरून पुणे, नांदेड, कोल्हापूर आणि ठाणे जिल्ह्यांमध्ये तसेच रायगड जिल्ह्यात बऱ्याच मोठ्या प्रमाणावर तलाव होते असे दिसते. यापैकी बरेच तलाव दगडांनी बांधून काढले असावेत असे तडकल्ल या नावावरून वाटते. या नावातील कल्ल या शब्दाचा किट्टेलच्या म्हणण्याप्रमाणे दगड, खडक असा अर्थ होतो. त्याचप्रमाणे तळावल्लिका आणि तळावलीपल्लिका या दोन्ही नावातील वल्लिका, वली या संज्ञा काही ठिकाणी तलावांच्या ओळी होत्या किंवा ओळीने तलाव होते असे सुचवितात. केरेयेली हे नावही याच प्रकारचे आहे. किट्टेलने दिल्याप्रमाणे येली हे वलीचे रूप असू शकते. त्यामुळे तळावल्लिका, तळावलीपल्लिका

व केरेयेली ही स्थलनामे येथे ओळीनें असणाऱ्या तलावांचा बोध करतात. ही नावे दक्षिण भारतामध्ये पलार नदीवर बांधलेल्या हजार तलावांच्या ओळीची आठवण करुन देतात. सरोवरे, तलाव यांच्यापासून पाण्याचे पाट काढून ते शेती व मळ्यापर्यंत नेत असावेत काही वेळेस अशा पाटांची संख्या इतकी मोठी असे की, ती गावे पाटांच्या नावानेच ओळखली जात. उदाहरणार्थ शिलाहार राजा मुम्मुणिराज याच्या शक संवत् ९८२ च्या अंबरनाथ शिलालेखामध्ये[३४६] उल्लेखिलेले पाटपल्या, राजा विक्रमादित्य याच्या शक संवत् १०६१ च्या पन्हाळे लेखातील[३४७] प्रणाले आणि प्रणालक तसेच राजा मल्लिकार्जून याच्या वसई लेखातील[३४८] पनलेंचे नगर ही स्थलनामे ठाणे व रत्नागिरी जिल्ह्यातील ही गावे या प्रकारची आहेत असे सुचवितात. यादव राजा रामचंद्र याच्या शके १२१० च्या कालवार लेखात[३४९] उल्लेखिलेले कालवाहार हे स्थलनामही या गावात असलेल्या कालव्यामुळे पडले असावे असे सुचविते. बांध घालण्यापूर्वी आणि विहिरी खोदण्यापूर्वी शेतजमिनीच्या मालकाची परवानगी घेणे आवश्यक होते असे मिताक्षरामध्ये[३५०] सांगितलेले आहे. तलाव खोदणे आणि बांधणे हे पुण्यकारक कृत्य समजले जाई. हेमाद्रि सर्व दानांमध्ये पाणी दान करणे सर्वांत जास्त पुण्यकारक समजतो.[३५१]

## पिके

शेतीपासून मिळणाऱ्या उत्पन्नाला सिद्धाय अशी संज्ञा होती[३५२] तांदूळ, बाजरी, डाळी, तेलबिया, ऊस ही या काळातील मुख्य पिके होती. तंतुमय पिकांमध्ये कापूस हे मुख्य पीक होते. खानदेश व वऱ्हाड हे प्रदेश कापूस उत्पादनासाठी प्रसिद्ध होते. निरनिराळ्या पुरातत्वीय उत्खननांमध्ये प्राप्त झालेल्या धान्याच्या अवशेषांवरुन महाराष्ट्रातील शेतकऱ्यांनी धान्य उत्पादनाचे तंत्रज्ञान या काळाच्याही पूर्वीच संपादन केले होते असे दिसते. प्राप्त झालेल्या अवशेपांमध्ये तांदूळ, गहू, वार्ली, तीन प्रकारची मिलेट, निरनिराळ्या प्रकारची द्विदल धान्ये आणि डाळी यांचा समावेश होतो. मार्गबंधुंच्या[३५३] म्हणण्याप्रमाणे या धान्याची प्राचीनता ताम्रपाषाणयुगामध्ये जाते. धान्याचे हे सर्व प्रकार शेताची मशागत करून उत्पन्न केलेले आहेत आणि आजही लोक या सर्व धान्याच्या प्रकारांचा उपयोग करतात. महाराष्ट्रात या धान्याचे अवशेष कौण्डिण्यपूर, पवनार, भोकरदन, नेवासा, तेर, भातकुली[३५४] इत्यादी ठिकाणी प्राप्त झालेले आहेत. काही ठिकाणे विशिष्ट धान्याच्या उत्पादनासाठी प्रसिद्ध होती.[३५५] धान्यामध्ये तांदूळ हे फार प्रिय धान्य होते असे दिसते. कदंब राजाचा गोवा ताम्रपट[३५६] आणि गंग राजाचा इस्लामपूर[३५७] ताम्रपट यामध्ये ब्राह्मणांना भात शेते दान दिल्याचा उल्लेख आहे. चालुक्यांच्या शके ४११ च्या अळते[३५८] ताम्रपटामध्ये आलक्तक प्रदेशात सालि व व्रीही या तांदळाच्या प्रकारचे भरपूर उत्पादन होत होते असा उल्लेख आहे. शिलाहारांच्या ठाणे[३५९] ताम्रपटात तांडुळ हलिक्षेत्र असा उल्लेख आहे, आणि कोल्हापूर लेखामध्ये[३६०] शालि-खल्ल क्षेत्राचा उल्लेख आहे. राष्ट्रकूट राजांच्या शासनकाळामध्ये तांदळाचे उत्पन्न इतक्या मोठ्या प्रमाणावर होई की, गावचा हिशेबनीस, सुतार, मजूर इत्यादिंचे पगार किंवा मजुरी तांदळामध्येच देत असत.[३६१] मानसोल्लास[३६२] या ग्रंथामध्ये

राजाच्या भोजनाच्या यादीत केलेला आठ प्रकारच्या तांदळांचा उल्लेख चालुक्य काळातही तांदळाच्या उत्पन्नाबाबतची परिस्थिती राष्ट्रकूट काळापेक्षा वेगळी नव्हती असेच दर्शवितो. कश्यपाने[३६३] दिलेल्या वर्णनाप्रमाणे तांदळाची रोपे आधी लहान लहान वाफ्यांमध्ये लावून नंतर त्यांची शेतामध्ये लावणी करीत. कोरीव लेखांमध्ये पिकांचा उल्लेख फक्त करांच्या आणि दानाच्या संदर्भातच केलेला आहे. परंतु कोरीव लेखामध्ये आलेल्या मूग, हरभरा, तूर इत्यादी धान्यांची नावे असलेल्या स्थलांच्या उल्लेखावरून या काळातील पिकांची माहिती मिळते.

**बागायती उत्पन्न**

कृषि उत्पादनाला बागायती उत्पन्नाची जोड देण्यात येई. या काळामध्ये लहान लहान मळे व विशिष्ट प्रकारच्या झाडांच्या लागवडी केलेले मोठमोठे मळे किंवा उपवनेही अस्तित्वात होती. कोरीव लेखांमध्ये यांचा उल्लेख, बाग, वाट, वाटक, वाटिका, वाडी, वाडे, कुळागर, इत्यादि संज्ञांनी केलेला आहे. या बागांमध्ये वेगवेगळ्या प्रकारची फळे, भाजीपाला बऱ्याच मोठ्या प्रमाणावर होत असला पाहिजे. याशिवाय काही स्थळे फणस, आंबे, द्राक्षे, आवळे, कवठ, बोरे, जांभळे, अंजीर यासारख्या फळांसाठीही प्रसिध्द होती. कोकण प्रदेश नारळांच्या उत्पन्नासाठी प्रसिद्ध होता.[३६४] इद्रिसीच्या वर्णनाप्रमाणे तत्कालीन रत्नागिरी जिल्ह्यातील सिंधुदुर्गचा प्रदेश[३६५] खजूर व नारळ उत्पादनासाठी प्रसिद्ध होता. भेंडी, कारली या भाज्यांखेरीज ब्राह्मणांना वर्ज्य असलेल्या कांदे, लसूण, वाली यांचेही उत्पादन होत होते.[३६६]

**झाडे वनस्पती**

दक्षिण भारतामध्ये जंगलापासून नेहमीच मोठ्या प्रमाणावर उत्पन्न मिळत होते. ह्यू-एन-त्संगच्या वर्णनाप्रमाणे दक्षिण भारतामध्ये दाट जंगले होती. द्राविड व कन्नड प्रदेशांच्यामध्ये तसेच कर्नाटक आणि महाराष्ट्र या प्रदेशांच्या मध्येही अरण्ये होती. यापैकी वराहमिहिरने उल्लेखिलेले अरण्य कर्नाटपासून चित्रकूट आणि नाशिकपर्यंत पसरलेले "महाटवी" अरण्य असावे. महाराष्ट्राच्या पूर्वेस व दक्षिणेस कलिंग आणि आंध्रप्रदेश यामध्ये पसरलेले अरण्य म्हणजे मिलिंदपन्होमध्ये वर्णिलेले कलिंगारण्य असावे. हेमाद्रिने त्याच्या व्रतखंडामध्ये बस्तरपासून गोदावरीचे काठ ते दौलताबादपर्यंत पसरलेल्या अरण्याचे वर्णन केले आहे. त्याच्या मते हे अरण्य म्हणजे रामायण काळात गोदावरी व तुंगभद्रा या नद्यांची खोरी व्यापलेल्या दंडकारण्याचा अवशेष भाग आहे. पुराणामध्ये दंडाकारण्याचा उल्लेख भारतातील पवित्र अरण्य असा आला आहे. बाण[३६७] यानेसुध्दा या अरण्याचा उल्लेख केला आहे. उपलब्ध कोरीव लेखांमध्ये "वन" आणि "वनी" या संज्ञांनी शेवट होणारी कालवीवन,[३६८] आम्रवन,[३६९] रंकाण,[३७०] चिपलून,[३७१] जुनावनी,[३७२] उम्बरवणी,[३७३] यासारखी स्थलनामे नाशिक, ठाणे, गोवा, या जिल्ह्याचा काही भाग मोठ्या प्रमाणावर अस्तित्वात असलेल्या विशिष्ट जातीच्या वृक्षांच्या लागवडीखाली प्रसिद्ध होता असे दर्शवितात. रत्नागिरी जिल्ह्यातील चिपळूण तालुका

चिप्प नामक सुवासिक गवतासाठी प्रसिद्ध होता. या गावाचे मूळ नाव "चिपलवन" असावे. त्याचप्रमाणे रंकाण हे स्थलनाम लंक नामक वनस्पती भरपूर प्रमाणात उपलब्ध असलेल्या स्थलाचा निर्देश करते. परंतु या स्थळांची ओळख पटलेली नाही. नांदेड जिल्ह्यात बिलोली तालुक्यातील जुन्नी आणि सांगली जिल्ह्यात जत तालुक्यातील उमराणी ही गावे त्यांच्या प्राचीन नावाबरोबर जोडलेल्या वनी या शब्दामुळे अनुक्रमे विशिष्ट जातीच्या वनस्पतीच्या आणि उंबरांच्या झाडासाठी प्रसिद्ध होती असे दिसते. काव्यमिमांसा या ग्रंथामध्ये पश्चिम भारतामध्ये उपलब्ध असलेले वेगवेगळ्या जातीचे बांबू पामवृक्ष आणि खजूर वृक्ष यांचा उल्लेख आहे.[३७४] उपलब्ध असलेल्या या काळातील कोरीव लेखांमध्ये अरण्यांचा निर्देश करणा-या स्थलनामांखेरीज वड, पिंपळ, चिंच, औदुंबर, बिल्व, बदर, चंदर, एरंड, महु, कदंब, करंदी, करंज, कवठ, खैर, पाटल, पळस, रुई, साल, शिंशपा, सिंदी, सुरु, ताल, इमारती लाकडाचे वृक्ष मंदार, पनग, बाभूळ, वेळू, श्रीपर्ण या वृक्षांचीही नावे असलेली स्थलनामे मिळतात. याशिवाय बऱ्याच जातीच्या वनस्पती, झुडपे, वेली यांचेही अस्तित्व लेखात वर्णिलेल्या स्थलनामावरून समजते.[३७५]

### पशुधन

पशुधन हे कृषि अर्थव्यवस्थेचे नेहमीच अविभाज्य आणि मौल्यवान अंग राहिलेले आहे. श्रीमंत लोकांच्या मालकीचे पशुधन असे, पशुपालनाचा व्यवसाय करणाऱ्या लोकांच्याही मालकीचे पशुधन असे. माणसाळलेल्या प्राण्यांमध्ये गाय, बैल, म्हैस, आणि शेळी हे प्राणी शेतकऱ्यांच्या दृष्टीने महत्वाचे होते आणि त्यांची निगा राखण्याच्या दृष्टीने काळजीही घेतली जात असे. पुरातत्वीय उत्खननांमध्ये निरनिराळ्या ठिकाणी पाठीवर पोक असलेली भारतीय जनावरे[३७६] उदाहरणार्थ म्हशी,[३७७] बकऱ्या,[३७८] शेळ्या,[३७९] डुक्कर,[३८०] यांच्या प्राप्त झालेल्या अवशेषांवरून असे दिसते की, ही सर्व जनावरे महाराष्ट्रातील लोकांना संबंधित काळाच्या ब-याच पूर्वीपासून ज्ञात होती. त्याचप्रमाणे महाराष्ट्रामध्ये हत्ती हा प्राणीही ज्ञात होता असे कार्ले, कान्हेरी, वेरूळ येथे यथातथ्य कोरलेली हत्तीशिल्पे,[३८१] भोकरदन, नेवासा, तेर या ठिकाणी पुरातत्त्वीय उत्खननात प्राप्त झालेल्या कज्जल शलाका,[३८२] बांगड्या,[३८३] कर्णभूषणे[३८४] स्त्रीमूर्ती[३८५] इत्यादी हस्तिदंती वस्तु व अजिंठा[३८६] येथील शैलगृहांमध्ये रंगवलेली हत्तीचित्रे यावरून दिसते, अपरान्त[३८७] मधील अरण्य हत्तीसाठी प्रसिद्ध होते. कोरीव लेखामध्ये उल्लेखिलेल्या स्थलनामावरून[३८८] भिवंडी आणि जत या अनुक्रमे ठाणे व सांगली जिल्ह्यांमध्ये असलेल्या तालुक्यांमध्ये काही ठिकाणे हत्ती किंवा हस्तिदंती वस्तुंसाठी प्रसिद्ध असली पाहिजेत असे वाटते. हत्तींचा बराच उपयोग होत असे. ते युद्धात फारच उपयुक्त होते. त्यांच्यासाठी खास राखीव जंगलेही असत. भारताच्या वेगवेगळ्या भागातील जंगलामध्ये वेगवेगळ्या जातींच्या हत्तींची निपज होत असे. राजे लोक फार कौशल्यपूर्ण पद्धतीने हत्ती पकडीत व त्यांचे आरोग्य, अन्न आणि शिक्षण इत्यादि बाबींसाठी ते विविध प्रकारची उपाययोजना करीत. काही जातीच्या हत्तींना एका पायास बांधून तबेल्यात ठेवावे लागे, या कामावर देखरेख करण्यासाठी खास अधिकारी असत. उदा. चालुक्य

राजा जनमेजय याच्या चिकुर्डे[३८९] येथे मिळालेल्या संभवतः शके १०७६ च्या लेखामध्ये राम गावुंड याचा मदहस्तीपादरक्षक पालक असा उल्लेख आहे. या संज्ञेवरून राम गावुंड हा हस्तिशाला किंवा राखीव जंगलातील हत्तींचा निगा राखणाऱ्या नोकरांवर देखरेख करणारा अधिकारी असावा असे वाटते. सांगली जिल्ह्यात मिरज येथे प्राप्त झालेल्या चालुक्य राजा वीर सत्याश्रम याच्या ताम्रपटामध्ये[३९०] मदकुणिके असे एक स्थलनाम आले आहे. या गावाचे तादात्म्य याच जिल्ह्यातील तासगाव तालुक्यातील मतबुणकी या गावाशी केलेले आहे. हे स्थळ वराहमिहिराने त्याच्या बृहत्संहिता[३९१] या ग्रंथामध्ये वर्णिलेल्या मतकुण प्रकारच्या हत्तीसाठी प्रसिद्ध असावे, वराहमिहिरच्या मताप्रमाणे या जातीचे हत्ती पाळण्यासाठी वर्ज्य समजावे. मोनीयर विलियम्स मतकुण[३९२] या शब्दांचा अर्थ दात नसलेला ठेंगण्या जातीचा हत्ती असा देतो. या मतकुण हत्तीचे कदाचित कौटिल्याने[३९३] वर्णन केलेल्या माज आलेल्या हत्तीशी साम्य असावे. कौटिल्य या प्रकारच्या हत्तींना वाईट प्रकारचे हत्ती असे म्हणतो आणि या हत्तींना हस्तीशालेत त्यांचे पाय बांधून ठेवावे व त्यावर पहारा ठेवावा असे सांगतो. या कामाकरिता नियुक्त केलेली व्यक्ती चिकुर्डे ताम्रपटातील मदहस्तीपाद रक्षकाप्रमाणे असावी. अशा मदहस्तीपाद रक्षकांवर देखरेख करणारा अधिकारी राम गावुंड यासारखा मदहस्तीपादरक्षपालक म्हणून ख्यात असावा. एकाच जिल्ह्यात प्राप्त झालेले एकाच वंशातील राजांनी दिलेले व बहुधा एकाच तिथीचे हे दोन ताम्रपट. त्यापैकी एकामध्ये आलेले स्थलनाम मदकुणिके आणि दोन्हींमध्ये आलेली 'मदहस्तीपादरक्षपालक' ही संज्ञा या गोष्टी चालुक्यांची वराहमिहिरने वर्णिलेल्या मतकुण जातीच्या हत्तींची व कौटिल्याच्या माज आलेल्या हत्तींची हस्तीशाला किंवा हत्तीसाठी राखीव जंगल चालुक्यांच्या काळात सांगली जिल्ह्यामध्ये होते असे सुचवितात.

### वन्य प्राणी

येथील अरण्यांमध्ये बऱ्याच प्रकारचे वन्य प्राणी होते. पेरिप्लसच्या वर्णनाप्रमाणे दक्षिण भारतातील अरण्यामध्ये चित्ता, वाघ, हत्ती, साप, तरस आणि विविध जातींचे मोठे वानर होते. गाथासप्तशती या ग्रंथामध्ये सांगितल्याप्रमाणे गोदावरी नदीच्या काठावरील अरण्यामध्ये सिंह होते. सिंहाचे विंध्य अरण्यातील अस्तित्व महाभारत[३९४] आणि बृहत्संहिता[३९५] यामधील उल्लेखांवरूनही कळते. पाळीव आणि वन्य जनावरे यांच्याशिवाय बेडूक, कासव, मगर, आणि मासे यासारखे जलचर प्राणीही येथे ज्ञात होते. सोमेश्वराच्या मानसोल्लास[३९६] या ग्रंथामध्ये ३४ जातीच्या माशांची नावे त्यांची राहण्याची ठिकाणे व अन्य याची माहिती दिली आहे. निरनिराळ्या जातीचे पक्षीही या प्रदेशात राहत होते.

### खनिज संपत्ती

कृषिविषयक संपत्तीला खनिज संपत्तीची जोड देत असत. पेरिप्लसने भडोचहून निर्यात होणाऱ्या तांब्याचा उल्लेख केलेला आहे. महाराष्ट्रामध्ये रत्नागिरी, भंडारा व चंद्रपूर येथे तांब्याच्या खाणी मिळालेल्या आहेत. त्यावरून येथे पूर्वी तांबे उपलब्ध

होते असे दिसते. येथून काढलेल्या तांब्यामध्ये महाराष्ट्राशेजारी असलेल्या आणि पूर्वी तांब्याच्या खाणी असलेल्या कुडाप्पा, बेल्लारी, नरसिंगपूर, विजापूर, धारवाड वगैरे प्रदेशातून व्यापाराद्वारे प्राप्त केलेल्या किंवा निर्यातीसाठी आणलेल्या तांब्याची भर पडत असावी, आजच्या प्रमाणेच तांबे हा धातू संबंधित काळात फार महाग होता. तांब्यांच्या खाणीमुळे महाराष्ट्राच्या संपन्नतेत बरीच भर पडली असावी. लोखंड हा दुसरा महत्त्वपूर्ण धातू होता. प्राचीन महाराष्ट्राला समृद्ध बनविण्यासाठी या धातुचाही परिणामकारक असा सहभाग असावा. दिपकरंजन दास यांच्या म्हणण्याप्रमाणे दक्षिण भारतामध्ये वेगवेगळ्या प्रकारच्या लोखंडाचे अगणित साठे होते. स्कॉफच्या उल्लेखाप्रमाणे चांगल्या दर्जाचे अशुद्ध लोखंड सध्याच्या मालवण बंदराच्या परिसरात उपलब्ध होते. इम्पिरीअल गॅझेटिअरमध्ये दिलेल्या माहितीप्रमाणे गोदावरी व वर्धा नदीच्या खोऱ्यांतील कालुकाश्म थरात लोखंडाचे मोठमोठे साठे आहेत. त्याप्रमाणे या खोऱ्यांच्यामध्ये वाढलेल्या कामठी टेकड्यांच्या श्रेणीमध्ये लोखंडयुक्त गारगोट्या (ferruginous pebbles) आणि अशुद्ध लोखंडयुक्त चिकण माती (clay iron ores) प्रचंड प्रमाणात उपलब्ध आहे.[३९७] नैकुंड[३९८] येथे लोखंड वितळविण्याच्या भट्टीचा जो पुरावा उपलब्ध झाला आहे. त्यावरून प्राचीन काळीही या साठ्यांचा उपयोग केला जात असण्याची शक्यता आहे.

**मौल्यवान रत्ने**

महाराष्ट्रात मौल्यवान रत्नाच्या खाणीही होत्या. चंद्रपूर जिल्ह्यातील वैरागड हा प्रदेश आतापर्यंत रत्नांच्या उत्पादनासाठी प्रसिध्द होता. या स्थळाचा वज्राकर, वजिरघर, वैरागर या वेगवेगळ्या नावाने पुरूषोत्तमपुरी ताम्रपट,[३९९] हाथिगुंफा शिलालेख[४००] आणि रतनपूर लेख[४०१] या अनुक्रमे यादव, महामेघवन आणि कलचुरी वंशांच्या राजांनी दिलेल्या कोरीव लेखांमध्ये उल्लेख आहे. चोल राजा कुलोत्तुंग याच्या एका लेखात या स्थळाचा उल्लेख "वयिरागर" असा केलेला आहे. त्याच्याच दुसऱ्या एका लेखात म्हणजे पाचव्या शासनवर्षीच्या लेखामध्ये हे नाव वजिरागर असे दिलेले आहे. हाथिगुंफा शिलालेखामध्ये दिलेल्या या स्थळाच्या नावावरून के. पी. जायस्वाल आणि आर. डी. बॅनर्जी या स्थळाचे मूळ नाव "वज्रगृह" असावे असे मत व्यक्त करतात. तर चोल लेखांमध्ये आलेल्या नावाच्या आधारे केलहॉर्न हे नाव वज्राकर[४०२] असावे असे प्रतिपादन करतात. या नावाचा शब्दशः अर्थ "हिऱ्याची खाण"[४०३] असा होतो. हे नाव यादव काळापर्यंत चांगलेच रूढ झालेले होते. कौटिल्याने दिलेल्या सहा प्रकारच्या रत्नांपैकी सभाराष्ट्रक हे रत्न विदर्भामध्ये उपलब्ध होते.[४०४] गरुडपुराणामध्ये[४०५] वेण्वातट[४०५] हे हिऱ्यांच्या आठ खाणीपैकी एक ठिकाण असल्याचा उल्लेख आहे. वराहमिहिर[४०६] वेण्वातट येथे मिळणारा हिरा शुद्ध प्रकारचा आहे असे सांगतो. तो पुढे असेही म्हणतो की, हे हिरे चंद्राप्रमाणे चमकतात. गरुडपुराण आणि वराहमिहिर यांनी उल्लेखिलेली वेण्वा ही नदी वैनगंगा असली पाहिजे. या दोन्ही ग्रंथकारांचा रोख या नदीवर वसलेल्या वैरागड कडेच असावा असे दिसते. येथे लाल, पिवळ्या रंगाच्या वालुकाश्म थरात (Lateritic grits) हिरे सापडतात. कौटिल्याने[४०७] उल्लेखिलेले

विदर्भातील सभाराष्ट्रक म्हणजे येथे प्राप्त होणाराच हिरा असावा. याप्रमाणे असे दिसते की, वज्राकर हे ठिकाण निदान इ. स. च्या अकराव्या शतकापर्यंत तरी हिऱ्यांसाठी प्रसिध्द असावे. तसेच सातपुडा पर्वत व पश्चिम घाटाचा उत्तर भाग हे प्रदेश वैदुर्य अथवा गोमेदच्या खाणीसाठी ख्यात असावेत. रामायणामध्ये अपरान्तच्या समुद्र प्रदेशात प्राप्त होणाऱ्या हिऱ्यांचा उल्लेख आहे.

महाराष्ट्राला लागून असणाऱ्या प्रदेशामध्ये बऱ्याच मोठ्या संख्येत हिऱ्यांच्या खाणी होत्या. उदाहरणार्थ कुडाप्पापासून कृष्णा नदीपर्यंतचा प्रदेश तसेच पुढे कृष्णा नदीच्या डाव्या काठापर्यंतचा प्रदेश हा हिऱ्यांच्या खाणीसाठी प्रख्यात होता.[४०८] ज्या परकीय प्रवाशांनी निरनिराळ्या कालखंडात भारताला भेट दिली त्यांनी आपल्या वृत्तांतामध्ये दक्षिण भारतातील हिऱ्यांच्या खाणींचा उल्लेख केलेला आहे. या वृत्तांतानुसार गुंटूर जिल्हा तसेच कॅम्बे, विजयनगर, गोवळकोंडा, कोलार[४०९] इत्यादी ठिकाणी हिऱ्यांच्या खाणी होत्या. या ठिकाणांहून महाराष्ट्रात व्यापाराद्वारे किंवा निर्यातीसाठी आणलेल्या हिऱ्यांमुळे महाराष्ट्राच्या संपत्तीत बऱ्याच मोठ्या प्रमाणात भर पडली असावी. इब्न-बतुताने (Ibn-Batuta) भारताला भेट दिली तेव्हा देवगिरी हे रत्नांच्या व्यापाराचे प्रसिद्ध केंद्र होते.[४१०]

## उद्योग धंदे

निरनिराळ्या राजवंशाच्या राजांनी दिलेल्या कोरीव लेखांमध्ये आलेली स्थलनामे व परकियांची इतिवृत्ते यांच्या सहाय्याने महाराष्ट्रातील तत्कालीन उद्योगधंद्याची चांगलीच कल्पना येते.

## गूळ उद्योग

राज्यातील प्रामुख्याने कोल्हापूर विभाग हा गूळ उत्पादनासाठी बऱ्याच पूर्वीपासून प्रसिद्ध आहे. बदामीच्या चालुक्य वंशाच्या शके ४११ च्या अळते ताम्रपटातील[४११] उल्लेखानुसार अलक्तक नगरी ७०० या विभागात ऊसाचे उत्पादन होत असे. ऊसाचा रस काढण्यासाठी येथील लोक यंत्रांचा उपयोग करीत. (गुड–यांत्रिक)[४१२] ऊसाचा यंत्राने रस काढल्यावर तो उकळून त्याचा गूळ बनविण्यात येत असावा हे स्पष्टच आहे. उपलब्ध स्थलनामांवरून असे दिसते की, येथे ऊसाचे उत्पादन घेण्याचा व गूळ तयार करण्याचा उद्योग नंतरच्या काळातही सतत चालूच होता. शिलाहार राजवंशाच्या कारकिर्दीपर्यंत या उद्योगाची इतकी प्रगती झाली होती की, काही गावांमध्ये हाच प्रमुख उद्योग बनला होता आणि या उद्योगामुळेच त्यांची भरभराट झाली होती. शिलाहार राजा गण्डरादित्य याच्या शक संवत् १०३३ च्या ताळले[४१३] ताम्रपटामध्ये ब्राम्हणांना गुडायग्राम या गावातील जमीन दान दिल्याचा उल्लेख आहे. तसेच गुडालयग्रामातील गुडालेश्वर मंदिरामध्ये राहणाऱ्या संन्याशांच्या निर्वाहासाठी व मंदिरातील देवांची पूजाअर्चा या सारखे विशिष्ट धार्मिक विधी करण्यासाठी गुडालय ग्रामातील जमीन दान दिल्याचीही नोंद आहे. या पुराव्यावरून असे दिसते की, या भागातील गूळ उद्योग

इ. स. च्या अकराव्या शतकाच्या प्रारंभी चांगलाच विकसित झाला होता. या प्रदेशाखेरीज इतर काही प्रदेशांमध्येही गूळ उद्योग अस्तित्वात असावा असे महाराष्ट्रावर राज्य करणाऱ्या इतर राजवंशाच्या कोरीव लेखांमध्ये आलेल्या काही स्थलमानावरून दिसते. उदाहरणार्थ राष्ट्रकूट राजा तिसरा गोविंद याच्या शके ७२७ च्या नसरी[४१४] ताम्रपटात उल्लेखिलेले इक्षुग्राम तसेच कल्याणीच्या चालुक्य वंशीय राजांच्या शके ९६९ व शके ९८८ च्या अनुक्रमे ताडखेल व एकलरा[४१५] लेखांमध्ये आणि इ. स. १०७९ व ११३० च्या करखेड[४१६] लेखांमध्ये उल्लेखिलेले सक्करगे ८०,८४,६० हे गाव साखर उद्योगाच्या उस्तित्वाचा निर्देश करते. यापैकी पहिले दोन लेख राजा सोमेश्वर प्रथमचे असून तिसरा लेख महामंडलेश्वर कर्करस व चौथा लेख सोमेश्वर तृतीयचा आहे. यादव राजा रामचंद्र याच्या शके १२०१ च्या उन्हकदेव[४१७] लेखामध्ये आलेले सकरगवाम हे स्थलनाम साखर उद्योगाचे अस्तित्व सांगते. या नामांपैकी इक्षुग्रामचे तादात्म्य रत्नागिरी जिल्ह्यात दापोली तालुक्यातील असलेल्या उसगावाशी केले असून सक्करगे गावाची ओळख नांदेड जिल्ह्यातील देगलूर तालुक्यात असलेल्या शेखरगा या नावाशी पटवलेली आहे आणि सकरगवाम हे यवतमाळ जिल्ह्यात केळापूर तालुक्यातील साखरगाव होय. शिलाहार लेखातील गावे कोल्हापूर जिल्ह्यात आहेत. या स्थलनामांचे सध्याच्या गावांशी केलेल्या तादात्म्यावरून कोल्हापूर, मराठवाडा व यवतमाळ जिल्ह्यातील काही भागात गूळ उद्योग अथवा साखर उद्योग अस्तित्वात होता असे दिसते. यापैकी जसा कोल्हापूरचा गूळ उद्योग फारच प्रसिध्द होता. तसा मराठवाडा प्रदेशातील गूळ उद्योग फारसा प्रिय झालेला दिसत नाही. परंतु या भागात विशिष्ट ऋतुमध्ये गूळ बनविण्यासाठी चालू असलेली गुऱ्हाळे पाहिली म्हणजे येथील या उद्योगाचे प्राचीन काळातील अस्तित्व नाकारणे कठीण होते. सक्करगे येथे चालू असलेल्या या उद्योगामुळे या गावाला एका शासन विभागाच्या प्रमुख स्थानाचा दर्जा त्यावेळी मिळाला असावा.

### कापड उद्योग

आज महाराष्ट्र राज्यात प्रमुख असलेल्या कापड उद्योगाला दीर्घ परंपरा आहे. प्राचीन काळीही हा प्रदेश उद्योगासाठी प्रसिद्ध होता. कापसाच्या उत्पादनाखेरीज महाराष्ट्रात ताग व रेशमासारख्या मऊ कापसाचेही उत्पादन होई असे कलचुरी नृपति संकमदेव आणि यादव नृपति भिल्लम याच्या शके १०९३ च्या माडगीहाळ लेखामध्ये व यादव रामचंद्र यांच्या शके १२०१ च्या उन्हकदेव लेखामध्ये आलेल्या अनुक्रमे सणमबडे[४१८] आणि सावेर[४१९] या स्थलमानावरून दिसते. या ठिकाणी होत असलेल्या ताग व रेशमी कापसाच्या उत्पादनामुळे ही नावे या गावांना पडली असावीत व तत्कालीन महाराष्ट्रातील कापड उद्योगाची ही माल पुरवठा करणारी केंद्रे असावीत. याशिवाय शिलाहार राजा अपराजित याच्या शक संवत् ९१९ च्या भादान ताम्रपटातील पडिगह,[४२०] याच वंशाचा राजा मल्लिकार्जून याच्या शक संवत् १०८३ च्या

वसई लेखात आलेले पटालसक,[४२१] राजा सोमेश्वर याच्या शक संवत् ११८१ च्या रानवड लेखातील पडिवसे[४२२] आणि यादव रामचंद्र याच्या शके १२०१ च्या उन्हकदेव लेखातील पटवदे[४२३] ही स्थलनामे येथील कापड उद्योग धंद्याशी संबंधित असली पाहिजेत. तसेच विष्णूकुंडिन राजा माधववर्मन याच्या खानापूर लेखामध्ये उल्लेखिलेली कोलिकाग्राम आणि कोलिकावाटिका[४२४] ही स्थलनामे विणकारांच्या वसाहतीचे अस्तित्व दर्शवितात. या सर्व गावांनी महाराष्ट्रातील कापड उद्योगाच्या विकासाला महत्त्वाचा हातभार लावला असला पाहिजे. महाराष्ट्रामध्ये पैठण व तगर ही कापड उद्योगाची प्रमुख केंद्रे होती, तर पैठण व वारंगल ही कापसाच्या तलम कापडासाठी म्हणजेच मलमलीच्या उत्पादनासाठी फार प्रसिद्ध होती. येथे तयार केलेल्या कापडाचा मार्कोपोलो हा तलम, नाजूक विरविरीत खळीचे कापड (buckrams) असे वर्णन करतो. त्याच्या वर्णनाप्रमाणे या कापडाचे पोत कोळ्यांनी (spider) विणलेल्या जाळ्यांच्या धाग्याप्रमाणे तलम व मुलायम होते. जगातील सर्व राजे व राण्या याना हे कापड आवडत असे. मार्कोपोलो कडूनच आपल्याला असेही कळते की, इ. स. १३ व्या शतकात ठाणे हे कापड उद्योगाचे तसेच कापड निर्यातीचे केंद्र होते. पैठणची पैठणी हे आजही महाराष्ट्रातील प्रमुख वस्त्र आहे. टॅव्हर्निअरच्या (Tavernier) वर्णनाप्रमाणे इ. स. च्या १७ व्या शतकात पर्शिया, टर्की, पोलंड, अरेबिया आणि कैरो[४२५] येथे निर्यात होणाऱ्या पांढऱ्या शुभ्र कॉलिको कापडाच्या उत्पादनासाठी बऱ्हाणपूर व वऱ्हाड प्रदेश प्रसिध्द होते. मानसोल्लास[४२६] याप्रसिध्द ग्रंथामध्ये राजा वापरीत असलेल्या निरनिराळ्या प्रकारच्या कापडांची नावे त्यांचे उत्पादन होणाऱ्या ठिकाणांच्या नावांसह दिलेली आहेत.

## चर्मोद्योग

बदामीच्या चालुक्य नृपति विनयादित्य याच्या शके ६१३ च्या मानोर ताम्रपटात उल्लेखिलेले कुराट विषय,[४२७] राष्ट्रकूट राजा कृष्ण तृतीय याच्या शके ८६२ च्या देवळी ताम्रपटातील वध्रीर,[४२८] शिलाहार नृपति अरिकेसरी यांच्या शक संवत् ९३९ च्या ठाणे लेखातील काटियालक ग्राम[४२९] आणि यादव राजे भिल्लम, जैतुगि, सिंघण आणि कलचुरी राजा संकमदेव याच्या मार्डी ताम्रपटात वर्णिलेले कसयग्राम[४३०] ही स्थलनामे अनुक्रमे चामडे विकणारे किंवा जोडे बनविणारे, चामड्याचे पट्टे बनविणारे, रानात भटकणारे किंवा शिकारी आणि खाटिक हे व्यवसाय करणाऱ्या लोकांचे अस्तित्व दर्शवितात. चामड्याचा व्यवसाय करणारा समाज वाकाटक वंशाच्या शासन काळात बराच प्रभावी झाला होता.[४३१] या वंशाने दिलेल्या बहुतेक सर्व ताम्रपटांमध्ये दान दिलेल्या खेड्यांना आसनासाठी चामडे पुरविण्याच्या जबाबदारीतून मुक्त करण्यात आले होते. यावरून खेडी ही चामडे पुरविणारी मूळ केंद्रे असावीत असे दिसते. चालुक्य शासन काळामध्ये एक पूर्ण शासन विभाग अर्थात "कुराट विषय" चर्मकारांच्या नावाने

ख्यात होता. मोनियर विलियम्सने दिल्याप्रमाणे कुराट शब्दाचा अर्थ जोडे बनविणारा किंवा चामड्याचे काम करणारा असा होतो. चालुक्य वंशाचा राजा विजयादित्य याच्या शिग्गाव[४३२] ताम्रपटातील वर्णनाप्रमाणे दान दिलेल्या गावातील एका भागात चर्मकार समाज रहात होता. त्याचप्रमाणे शिलाहार वंशाच्या लेखात आलेले कटियालक ग्राम हे रानात भटकणाऱ्या किंवा शिकारी लोकांच्या गावाचे अस्तित्व दर्शविते. याप्रमाणे चालुक्य व राष्ट्रकूट कालीन समाजामध्ये असलेले चांभाराचे अस्तित्व या वर्गाकडे कातडे कमाविण्याचे कामही असले पाहिजे असे सुचविते. चामड्याचा व्यवसाय करणाऱ्या या सर्व लोकांनी त्याचप्रमाणे शिकारी व कसाई यांनी या काळातील महाराष्ट्राच्या चर्मउद्योगाच्या प्रगतीला हातभार लावला असला पाहिजे. मार्कोपोलोने वर्णन केल्याप्रमाणे इ. स. १३ व्या शतकात येथील चर्मोद्योग बऱ्याच प्रगत अवस्थेत होता. या शतकामध्ये दक्षिण गुजरात व उत्तर महाराष्ट्र हे प्रदेश कातडी कमाविण्याच्या उद्योगाची केंद्रे होती असे मार्कोपोलो सांगतो. तो दक्षिण गुजरात व उत्तर महाराष्ट्रातील आसने बनविण्याच्या उद्योगांचाही उल्लेख करतो. त्याच्या वर्णनाप्रमाणे लाल व निळ्या रंगाच्या चामड्याची, पक्षी व पशुंच्या आकृत्या, विणलेली अथवा जडवलेली तसेच सोने व चांदीच्या तारांनी नक्षीकाम केलेली आसने मोठ्या प्रमाणावर निर्यात केली जात. ठाणे मोठ्या प्रमाणावर चामडे निर्यात करण्यासाठी प्रसिद्ध होते.[४३३] यादवकालीन लोक चपला (वहाणा) वापरीत. याप्रमाणे चामड्याच्या नवीन वस्तुंच्या मागणीमुळे चर्मकारांच्या प्रगतीला चांगलाच वाव मिळाला असावा.

### रत्नउद्योग

विविध रत्ने व त्यांची आभूषणे बणविणे तसेच विविध आकार-प्रकारचे मणी बनविणे हें महाराष्ट्रात ऐतिहासिक काळाच्या प्रारंभापासून सुरु होते. या काळातही याची नोंद मिळते. मणी उद्योग या काळातही चांगला भरभराटीला आला होता व मणीकारांच्या स्वतंत्र्य वस्त्याही होत्या असे राष्ट्रकूट वंशाच्या शके ७०१ च्या सिन्नर लेखात आलेले मणीपूर,[४३४] शिलाहारांच्या शक संवत् ९३० च्या खारेपाटण ताम्रपटात वर्णिलेल्या मणीग्राम[४३५] आणि यादव वंशाच्या शके १०२० च्या अश्वि[४३६] ताम्रपटामध्ये उल्लेखिलेल्या मणियवलीयग्राम या स्थलनामामुळे वाटते. मणीपूर या गावाचे तादात्म्यही औरंगाबाद जिल्ह्यात भोकरदन येथील मण्याच्या कारखान्यांचे अस्तित्व दर्शविणारे अवशेष मिळाले त्याच गावाशी केलेले आहे.

### जवाहिरे आणि रत्ने

बहुमोल दगडांच्या उपलब्धतेमुळे येथे जवाहिऱ्यांचा व्यवसाय अस्तित्वात आला. जवाहिऱ्याला मणीकार म्हणूनही ओळखत. तो शहरांमध्ये व बाजार असलेल्या गावांमध्ये रहात असला पाहिजे गाथासप्तशती[४३७] मध्ये त्याचा उल्लेख केलेला आहे. त्याला मणी बनविण्यासंबंधीचे शिक्षण असणे किंवा तो प्रशिक्षित असणे आवश्यक

समजले जाई. कारण असे शिक्षण नसलेली व्यक्ती रत्न खराब करण्याचीच शक्यता जास्त होती. शब्दकोशामध्ये दिलेल्या रत्नांच्या यादीमध्ये स्फटिक, सूर्यकांत मणी, चंद्रकांत मणी, पाचू माणिक, पोवळे, हिरा, इंद्रनील मणी, मोती इत्यादि रत्नांचा अंतर्भाव केला आहे. मानसोल्लास[४३८] या ग्रंथामध्ये विविध रत्नांचे प्राप्तीस्थान व त्याच्या वैशिष्ट्यांचे सविस्तर वर्णन दिले आहे. वारंगळ राज्यामध्ये मोठ्या प्रमाणावर व मोठ्या आकाराचे हिरे मिळत होते असे मार्कोपोलो[४३९] सांगतो. असा समज आहे की, इ. स. १२९४ मध्ये यादव राजाचा पराभव केल्यानंतर अल्लाउद्दिनने बऱ्याच मोठ्या प्रमाणावर मोती, रत्ने व १५,००० मण सोने लुटून नेले.[४४०] याप्रमाणे उपलब्ध पुरावा महाराष्ट्रामध्ये संबंधित काळात रत्नोद्योग चांगलाच विकसित झाला होता असे सांगतो.

## चुना उद्योग

यादव काळामध्ये उत्कृष्ट प्रतीचा चुना तयार होत असे. प्रसिद्ध ग्रंथ **लीळाचरित**[४४१] मध्ये जर तयार केलेला चुना कुत्र्याला खाण्यास दिला आणि त्याने तो दहीभाताप्रमाणे खाल्ला तर तो उत्कृष्ट चुना समजावा अशी व्याख्या दिलेली आहे.

## धातू उद्योग

या वर्गामध्ये लोखंड, तांबे, सोने, चांदी वगैरे धातूंवर आधारित उद्योगांचा समावेश करावा लागेल. हे सर्व धातू महाराष्ट्रामध्ये या आधीच्या कालखंडातही ज्ञात होते. प्रामुख्याने लोखंड, तांबे, सोने या धातुंचे काम करणारे कारागीर त्या त्या धातुच्या नावाने ओळखले जात. उदाहरणार्थ लोहकार, सुवर्णकार, ताम्रकुट्टक, वगैरे. महाराष्ट्रात निरनिराळ्या ठिकाणी झालेल्या पुरातत्त्वीय उत्खननांमध्ये प्राप्त झालेले या धातुंच्या वस्तुंचे अवशेष महाराष्ट्रातील धातू उद्योगाचे अस्तित्व दर्शवितात. या काळापर्यंत या उद्योगाने चांगलीच प्रगती केली असली पाहिजे. निरनिराळ्या राजवंशांच्या उत्किर्ण लेखांमध्ये लोखंड धातू व लोखंडाचे काम करणारे यांचे अस्तित्व दर्शविणारी स्थलनामे मिळतात. उदाहरणार्थ चालुक्य नृपति पुलकेशी प्रथम याचा शके ३१० चा पिंपळनेर ताम्रपट[४४२] राष्ट्रकुट राजा गोविंद चतुर्थ याचा शके ८८५ चा सांगली लेख[४४३] तसेच मुण्ड राजा आदित्यराज याचा मल्हारा ताम्रपट[४४४] यामध्ये दिलेली अनुक्रमे लोहनगर, लोहग्राम व लोहशलका ही स्थलनामे लोखंडाचे साठे असलेल्या ठिकाणांचा निर्देश करतात; तर लोहाराग्राम, लघुलोहाराग्राम,[४४५] लोहारे,[४४६] खातिगाऊं[४४७] ही अनुक्रमे राष्ट्रकूट राजा गोविंद तृतीय याचा शके ७३४ चा लोहारा लेख, शके ११९५-११९९ या कालखंडातील पंढरपूरचा चौऱ्यांशीचा लेख आणि यादव राजा रामचंद्र याचा शके ११९३ चा पैठण लेख यामध्ये उल्लेखिलेली स्थलनामे लोहारांच्या स्वतंत्र गावांचे अस्तित्व दर्शवितात. याप्रमाणेच तांबटांच्या अथवा तांब्याचे काम करणाऱ्या कारागिरांचे प्रतिनिधित्व करणारी तंबसाहिका[४४८] आणि तंबतीर्थ[४४९] अशी दोन स्थलनामे अनुक्रमे राष्ट्रकूटांच्या शके ६७१ च्या मानोर लेखात आणि विष्णूकुंडीन

वंशाच्या खानापूर लेखामध्ये मिळाली आहेत. यापैकी पहिल्या स्थळाचे तादात्म्य ठाणे जिल्ह्यातील गावाशी केलेले आहे, तर तंवतीर्थ या गावाची ओळख सातारा जिल्ह्यातील गावाशी पटवलेली आहे. पुरातत्वीय उत्खननांमध्ये प्राप्त झालेल्या तांब्याच्या वस्तु महाराष्ट्रातील तांब्याच्या उद्योगाची प्राचीनता संबंधित काळाच्या बऱ्याच आधीच्या काळात नेतात. यावरून या काळातही या उद्योगाचे अस्तित्व महाराष्ट्रात असलेच पाहिजे असे म्हणण्यास वाव आहे. या काळात कारागिराला सोनार[४५०] हे नाव प्राप्त झाल्याचे शिलाहार राजा गण्डरादित्य याच्या शक संवत् १०५८ च्या कोल्हापूर लेखात व राजा विजयादित्य याच्या शक संवत् १०६५-६६ च्या मिरज लेखामध्ये सोनाराने द्यावयाच्या कराच्या उल्लेखावरून दिसून येते. त्याला सुवर्णकार असेही म्हणत.[४५१] तो तत्कालीन सुवर्ण उद्योगाचे प्रतिनिधीत्व करतो असे म्हणण्यास हरकत नाही. त्याचे अस्तित्व दर्शविणारी फक्त दोन स्थलनामे उपलब्ध आहेत. त्यापैकी "कनकचरा" हे गाव चालुक्यांच्या[४५२] तिथी नसलेल्या संजान लेखात उल्लेखिलेले आहे, तर दुसरे "सोन्नलिगेनगर" याचा उल्लेख यादव राजा महादेव याच्या शके ११८६ च्या संगुर लेखात आणि यादव राजा जैतुगि याच्या तिथीरहीत जांवगाव[४५३] ताम्रपटामध्ये आहे. चांदीचे काम करणाऱ्या कारागिरांचे प्रतिनिधित्व करणारी कुरेग्राम आणि कुडेग्राम ही दोन गावे आहेत. यांचे वर्णन अनुक्रमे राष्ट्रकूट राजा गोविंद तृतीय याच्या शके ७२२ च्या अंजनवती लेखामध्ये आणि या वंशाचा राजा अकालवर्ष याच्या शके ८८२ च्या कोल्हापूर लेखामध्ये[४५४] आहे. महाराष्ट्रामध्ये निरनिराळ्या ठिकाणी पुरातत्त्वीय उत्खननामध्ये प्राप्त झालेले या धातुंच्या वस्तुंचे अवशेष व या काळाच्या बऱ्याच आधी लिहिल्या गेलेल्या कित्येक ग्रंथांमध्ये आलेले या धातुंच्या वस्तुंचे उल्लेख सदर धातुंचे काम करणाऱ्या कारागिरांचे अस्तित्व दर्शवितात त्यामुळे या काळापर्यंत महाराष्ट्रातील धातु उद्योगाने बरीच प्रगती केली असली पाहिजे असे दिसते. या कारागिरांची असलेली स्वतंत्र वसतिस्थानेही हेच दर्शवितात. वर दिल्याप्रमाणे शिलाहारांच्या लेखामध्ये सोनाराचे उल्लेख आहेत. याच वंशाच्या शक संवत् ९५६ च्या चिंचणी ताम्रपटात आलेला ह्यमनचा[४५५] उल्लेख सोनार, लोहार, तांबट, सुतार, पाथरवट यांच्या संघटनेचे अस्तित्व सांगतो. चिंचणी लेखाप्रमाणे ह्यमन प्रमुखाच्या उपस्थितीत दान दिले होते. या संघटनेचा उल्लेख या काळापर्यंत वेगवेगळे धातू उद्योग चांगलेच प्रस्थापित झाले होते. असे दर्शवितो.

### हस्तिदंत उद्योग

श्रीमंत समाजात हत्तीच्या दातापासून केलेल्या वस्तुंना फार मागणी होती. पुरातत्त्वीय उत्खननांमध्ये सापडलेल्या हस्तिदंती वस्तू व या प्रदेशावर शासन करणाऱ्या वेगवेगळ्या राजवंशांच्या लेखांमध्ये उल्लेखिलेली स्थलनामे[४५६] महाराष्ट्रात हा उद्योग अस्तित्वात होता असेच सांगतात.

## मीठ उद्योग

रोजच्या उपयोगात असलेल्या मीठ या खनिज पदार्थाचा उल्लेख शिलाहार राजा गण्डरादित्य याच्या शक संवत् १०५८ च्या कोल्हापूर लेखात[४५७] मुदगोडे येथील जैनमंदिराकरिता बाजारातील मीठ विक्रेत्याकडून कर वसूल करण्याच्या संदर्भात आलेला आहे. मीठ हा पदार्थ वेगवेगळ्या पद्धतीने तयार करतात समुद्र किनाऱ्यावरील प्रदेशामध्ये समुद्राचे पाणी वाफ्यांमध्ये साठवितात व त्याचे बाष्पीभवनाने मीठ तयार होते. या प्रकारे मीठ तयार करण्याचे ज्ञान शिलाहार वंशाच्या शासनकालापूर्वी येथील लोकांनी प्राप्त केले होते असे शिलाहार राजा अपराजित याच्या शक संवत् ९१९ च्या भादान[४५८] ताम्रपटामध्ये आलेल्या लवणेतट व याच वंशाचा दुसरा राजा मल्लिकार्जून याच्या शक संवत् १०८३ च्या वसई[४५९] ताम्रपटामध्ये वर्णिलेल्या लोनवाटका या स्थलनामावरून दिसते. या दोन्ही गावांचे तादात्म्य ठाणे जिल्ह्यातील भिवंडी तालुक्यात असलेल्या लोणाड या गावाशी केलेले आहे. याठिकाणी चालू असलेल्या मीठ उद्योगामुळे येथील देवाला लोणदित्य हे नाव पडले असले पाहिजे. काही ठिकाणी जमीन खोदून मीठ तयार करीत असत. कलचुरी राजा संकमदेव व यादव राजा भिल्लम यांच्या शके १०९३ च्या गाडगीहाळ लेखामध्ये लोणार[४६०] या गावी बहुतेक या पद्धतीने मीठ काढत असावेत. या स्थलाचे तादात्म्य वर्तमान लोणार या सांगली जिल्ह्यात जत तालुक्यात असलेल्या गावाशी केलेले आहे.

## तेल निर्मिती

तेल निर्मिती हा एक महत्त्वाचा व्यवसाय दिसतो. कल्याणीच्या चालुक्य घराण्यातील राजा जनमेजय याचा चिकुर्डे ताम्रपट (शके १०७६ चा), याच वंशाचा मरमुरी व मिरज ताम्रपट[४६१] शिलाहार राजा छित्तराज याचा शक संवत् ९५६ चा चिंचणी ताम्रपट[४६२] यादव राजा सिंघण याचा शके १०२८ चा पाटण ताम्रपट[४६३] इत्यादिमध्ये तेलघाण्यांचा उल्लेख आहे. या सर्व तेलघाण्यांना मंदिरामध्ये दिवे लावण्यासाठी व मंदिरातील इतर कामासाठी ठराविक मापे तेल कर म्हणून द्यावा लागत असे. शिलाहार नृपति रट्टराज याच्या शक संवत् ९३० च्या खारेपाटण[४६४] ताम्रपटामध्ये तेली कुटुंबाचा उल्लेख आहे.

## व्यापार

सामान्यपणे व्यापारी हे श्रेष्ठी, वणीज, नेंगम इत्यादि नावांनी ओळखली जात. व्यापार मोठ्या व लहान व्यापाऱ्यांच्या हातात होता. यांच्यापैकी पहिल्या वर्गामध्ये शहरात वा मोठ्या गावात दुकाने असलेल्या व येथेच स्थायिक झालेल्या व्यापाऱ्यांचा समावेश होतो, तर दुसऱ्या वर्गामध्ये लहान गावांमध्ये व शहरांमध्ये गल्ल्यागल्ल्यांमध्ये फिरून आपल्या मालाची विक्री करणाऱ्या व्यापाऱ्यांचा अंतर्भाव होता. या व्यापाऱ्यांना वैवधिक[४६५] या नावानेही ओळखत. याची वसतीस्थाने त्यांच्या उद्योगाच्या स्वरूपानुसार "वैवद्रक" या नावाने ओळखली जात. शहरे ही मोठ्या प्रमाणावर चालणाऱ्या

व्यापाराची प्रमुख केंद्रे होती. सौंदरराजन यांच्या म्हणण्याप्रमाणे व्यापारांच्या श्रेणी (guild) नामक संघटना होत्या. नगर हा व्यापारी श्रेणीचा[४६६] पर्यायी शब्दच आहे. काही गावे, जसे-चालुक्य विक्रम संवताच्या ४७ च्या वर्षीच्या विगरा लेखात आलेले नागरहाळ[४६७] हे गाव व्यापारी श्रेणीच्या नावाने अस्तित्वात आले होते. त्याचप्रमाणे यादव राजा महादेव याच्या शके ११८२ च्या काळेगाव ताम्रपटामध्ये उल्लेखिलेले नायगाव[४६८] हे गाव व्यापारी लोकांनी वसविलेले असावे किंवा या ठिकाणी व्यापारी घडामोडी मोठ्या प्रमाणावर चालत असाव्यात. नगरे ही व्यापाऱ्यांची संघटना केंद्रे असल्यामुळे निरनिराळ्या राजवंशांच्या कोरीव लेखामध्ये उल्लेखिलेली निदान काही नगरे तरी या काळात व्यापारी घडामोडींसाठी प्रसिध्द असावीत.

**बाजार**

स्थानिक बाजाराना हाट आणि पेठ या संज्ञा होत्या. काही ठिकाणे विशिष्ट वस्तुच्या बाजारासाठी प्रसिध्द होती. उदाहरणार्थ, सातवाहन राजवंशापासून पुढे बहुतेक सर्व राजवंशाच्या कोरीव लेखांमध्ये आलेले करहाट[४६९] हे गाव व शिलाहार राजा भोज द्वितीय याच्या कशेळी ताम्रपटात ज्याचा उल्लेख केला आहे तो अट्टवीर कोंकण विभाग[४७०] ही ठिकाणे अनुक्रमे सुगंधी फुलांच्या व निरनिराळ्या जातींच्या वनस्पतीच्या बाजारासाठी प्रसिद्ध असावीत. त्याचप्रमाणे राष्ट्रकूट राजा अभिमन्यू याच्या उण्डिकवाटिका लेखातील पेठ पांगारक[४७१] हे ठिकाण पांगाऱ्याच्या लाकडाच्या पेठेसाठी प्रसिध्द असावे. शिलाहार राजा विजयादित्य याच्या शक संवत् १०७३ च्या बामणी[४७२] लेखात वर्णिलेल्या पणतुरगेगोल्ल या नावावरून काही ठिकाणे घोड्याच्या बाजारासाठी प्रसिध्द होती असे दिसते, तर काही ठिकाणे राजा विजयादित्य याच्या शक सवंत् १०६५ च्या मिरज लेखात[४७३] उल्लेखिलेल्या सेडम्बाळ[४७४] या गावाप्रमाणे धान्य व इतर वस्तुंच्या बाजारासाठी प्रसिद्ध होती असे समजते. त्याचप्रमाणे निरनिराळ्या ठिकाणी आठवडी बाजार भरविण्याचीही पध्दत अस्तित्वात होती. काही ठिकाणी हा बाजार एखाद्या वृक्षाभोवती भरत असे, तर काही ठिकाणी शिलाहार राजा गण्डरादित्य याच्या शक सवंत् १०५८ च्या कोल्हापूर लेखात[४७५] व राजा विजयादित्य याच्या शक सवंत् १०६५-१०६६ च्या मिरज लेखात[४७६] सुचविल्याप्रमाणे बहुधा एखाद्या देवळाभोवती भरत असे. यापैकी मिरज लेखामध्ये सांगितल्याप्रमाणे एखाद्या धार्मिक उत्सवाच्या प्रसंगी खास बाजार भरविण्याचीही पध्दत होती.[४७७] या दोनही लेखांमध्ये सुपाऱ्या, विड्याची पाने, कपडा, तेल, तूप, अठरा प्रकारची धान्ये, आले सुंठ, हळद, लसूण, जिरे, पिंपळी, मोहरी, मीठ, सुकी आणि ताजी फळे, आवळे, फुले इत्यादि सारख्या वस्तुंच्या घाऊक व्यापाऱ्यांचा उल्लेख आहे. याशिवाय सोनार, चांभार, कुंभार, बांबू कामगारही आपण केलेल्या वस्तू बाजारात विक्रीसाठी आणीत.

**वजन, मापे**

या काळामध्ये धान्ये व द्रव पदार्थ मोजण्यासाठी प्रचलित असलेल्या वजने व मापांमध्ये चालुक्य, यादव, शिलाहार, आणि विजयनगरच्या राजवंशाच्या लेखातील वर्णनानुसार

चौथ, गिद, कुडव, कुवली इत्यादि मापांचा उपयोग धान्य मोजण्यासाठी होत होता. यादव सेनापती खोलेश्वर याच्या शके ११५० च्या आंबे[४७८] लेखामध्ये "चौथ" या मापाचा उल्लेख आहे, तर यादव राजा सिंघण याच्या शके ११२९ च्या पाटण[४७९] लेखामध्ये "गिद" या मापाचा उल्लेख केलेला दिसतो. येथे गिद हे माप "गिधवे" असे लिहिले आहे. विजयनगरचा राजा संगमदेवराय प्रथम याच्या शके १३३५ च्या बांदोडे लेखामध्ये[४८०] चौथ आणि गिद या दोन्ही मापांनी दान दिल्याचे दिसते. चालुक्य राजा जनमेजय याच्या चिकुर्डे[४८१] (शके १०७६) लेखात व शिलाहार राजा मुम्मुणिराज याच्या शक सवंत् ९७० च्या ठाणे[४८२] ताम्रपटामध्ये कुडव हे धान्याचे माप सांगितले आहे. याशिवाय चिकुर्डे[४८३] ताम्रपटात सौलसै व शिलाहार गण्डरादित्य याच्या शक संवत् १०५८ च्या कोल्हापूर ताम्रपटामध्ये[४८४] सोल्लगे आणि वर उल्लेखिलेल्या बांदोडे लेखामध्ये[४८५] सोळसि या मापाचा उल्लेख आहे. तुळपुळे यांच्या मते या मापांचा उपयोग तेल किंवा तूप मोजण्यासाठी होत असावा. कुवली या मापाचा उपयोग फक्त शिलाहारांच्या शिलालेखामध्ये केलेला दिसतो. उदाहरणार्थ शिलाहार केशिदेवाच्या शक सवंत् ११३१ च्या अक्षी[४८६] शिलालेखात नऊ कुवली धान्य देवीसाठी दिल्याचा उल्लेख आहे. याशिवाय शिलाहार मुम्मुणिराज याच्या शक संवत् ९७० च्या ठाणे लेखामध्ये "मूटक" या मापाने देणगी दिल्याचे सांगितले आहे. त्याचप्रमाणे तीन खण्डिका आणि पंधरा कुडव म्हणजे एक मूटक अशी मूटकची व्याख्याही या लेखामध्ये दिलेली आहे. या माहितीनुसार एक खण्डिका=वीस कुडव आणि चार खण्डिका=एक मूटक असे मिराशींनी कोष्टक मांडले आहे. श्रीस्थानक येथे कल्लिवन नामक माप होते असेही या लेखात नमूद केले आहे.[४८७]

## बाजारातील कर

शिलाहार राजा गण्डरादित्य याच्या शक संवत् १०५८ च्या कोल्हापूर लेखात व याच वंशाच्या राजा विजयादित्याच्या शक संवत् १०६५–६६ च्या मिरज लेखामध्ये बाजारात कर वसूल करण्यासाठी उपयोगात असलेल्या मापाविषयी मनोरंजक माहिती मिळते. यापैकी कोल्हापूर लेख जैन मंदिराला दान दिलेल्या उत्पन्नाबद्दल सांगताना असे म्हणतो की, सुपारी व विड्याची पाने यांची ओझे, अर्धओझे आणि हसर याप्रमाणे मापे होती. उदाहरणार्थ डोक्यावरून आणलेल्या ओझ्यावर पन्नास सुपाऱ्या, हसरावर पंचवीस विड्याची पाने, पूर्ण ओझ्यावर पन्नास, अर्ध्या ओझ्यावर वीस, हसरावर पाच सुपाऱ्या वगैरे. कापसावरील कर ठरविण्यासाठी "मळवे" व "हसर" ही मापे होती. आले, हळद, सुंठ, लसूण, बाजे, भद्रमुस्ते, जिरे, काळी मिरी, मोहरी, याच्यावर ओझे, अर्धओझे या परिमाणानुसार कर लावीत, तर मीठ आणि अठरा प्रकारचे धान्य त्याचप्रमाणे ओली व सुकी फळे यांच्यावर गाडीवरून आणलेले धान्य व डोक्यावर वाहून आणलेले धान्य अथवा वस्तू यानुसार कर लावीत. फुलांच्या प्रत्येक टोपलीवर कर द्यावा लागत असे[४८८] मिरज लेखातील उल्लेखाप्रमाणे या मापांच्या बरोबर सुपारीवर कर लावण्यासाठी खांद्याला अडकविलेली पिशवी, गाढवावर आणि बैलाच्या पाठीवर वाहून आणलेला माल या गोष्टी लक्षात घेत असत.[४८९]

## द्रव पदार्थ मोजण्याची मापे

तेल, तूप, यासारखे द्रव पदार्थ मोजण्यासाठी गडुआ, लोटी, घडा, सिद्दिगे, संगडी, भण्डिगोड, आणि गिद यासारखी परिणामे वापरीत. यापैकी गडुआ हे परिमाण चालुक्य राजा जनमेजय याच्या चिकुर्डे[४९०] (शके १०७६) ताम्रपटामध्ये आणि लोटी हे परिमाण यादव राजा सिंघण याच्या शके ११२९ च्या पाटण[४९१] लेखात उल्लेखिलेले आहे. बाकीच्या मापांपैकी घडा, सिद्दिगे, भण्डिगोड ही मापे शिलाहार साम्राज्यात उपयोगात होती असे वर उल्लेखिलेल्या शक संवत् १०५८ च्या कोल्हापूर[४९२] आणि शक संवत् १०६५ च्या मिरज[४९३] ताम्रपटाद्वारे ज्ञात होते. "गिद" हे गोवा प्रदेशात प्रचलित होते.[४९४] यादव राजा रामचंद्र याच्या शके १२१९ च्या आगासन[४९५] लेखाप्रमाणे कोकण विभागात नारळ मोजण्यासाठी सुक्ति हे परिमाण वापरीत असत. मालाचे वजन करणाऱ्या अधिकाऱ्याला मापाहारी म्हणत हे यादव राजा सिंघण याच्या शके ११२९ च्या पाटण लेखातील[४९६] वर्णनावरून स्पष्ट होते.

## विनिमयाची साधने

या काळात राजांना द्रव्य व वस्तू या दोन्ही रूपात महसूल मिळत असे. त्यामुळे काही वस्तूंचा विनिमय वस्तूंच्या अदलाबदलीने व काही वस्तुंची विक्री पैशाच्या रूपात असावी असे निरनिराळ्या राजवंशाच्या लेखांमध्ये आलेल्या विविध प्रकारच्या नाण्यांच्या उल्लेखावरून वाटते. उपलब्ध पुराव्यानुसार या काळातील लोक सोने, चांदी, तांबे इत्यादि धातूंची नाणी वापरीत. याशिवाय कवड्या, सुपाऱ्या यासारख्या काही वस्तूंचाही उपयोग विनिमयासाठी करीत.

### गद्याण

बहुतेक सर्व राजवंशाच्या लेखांमध्ये "गद्याण" या नाण्याचा उल्लेख आहे. त्यावरून हे नाणे या संपूर्ण काळात उपयोगात होते असे दिसते. हे सोन्याचे नाणे होते.[४९७] शके ११९५-११९९ मधील पंढरपूर[४९८] शिलालेखामध्ये वर्णिलेले "कस्तुरी गद्याण", यादव राजा सिंघण याच्या पुळुंज[४९९] कानडी लेखामध्ये उल्लेखिलेले "गजमलगद्याण" आणि कदंब राजा त्रिभुवनमल्ल याच्या कोरीव लेखामध्ये[५००] वर्णिलेले "बृहत्भैरव गद्याण" व "पांगे गद्याणक" हे अनुक्रमे यादव व कदंब राज्यांमध्ये अस्तित्वात असलेले गद्याणाचे प्रकार आहेत. भास्कराचार्यांचा प्रसिद्ध ग्रंथ[६६] लीलावती[५०१] मध्ये सुद्धा या नाण्यांचा उल्लेख आहे. आळतेकरांच्या[५०२] मते गद्याणकचे वजन ९० ग्रेन्स असते. त्यांनी दिलेल्या माहितीप्रमाणे कर्नाटक आणि तामिळनाडूमध्ये कळंजू, गद्याणक व आसू ही सुवर्ण नाणी प्रचलित होती. याशिवाय आळतेकर द्रम्म (रुपे), द्राम (सोने), कासू, मंडाडी व अक्कम यांचीही सुवर्ण नाणी म्हणून नोंद घेतात.

### सुवर्ण

राष्ट्रकूट राजा, गोविंद चतुर्थ च्या कॅम्बे[५०३] लेखामध्ये "सुवर्ण" ह्या सोन्याच्या नाण्याचा उल्लेख आहे. या लेखानुसार सात लाख सुवर्णाचे उत्पन्न देणाऱ्या १४०० खेड्यांचे

दान दिले होते. कौटिल्य, मनु वगैरे प्राचीन विद्वानांच्या मताप्रमाणे हे नाणे ८० रक्तिका किंवा १४६ ग्रेन्स वजनाच्या सोन्याच्या नाण्याचा निर्देश करते. आळतेकरांच्या मते या काळातील दक्षिण भारतातील वहुतेक सर्व सोन्याच्या नाण्यांचे वजन ४५ ते ५५ ग्रेन्स होते आणि १४६ ग्रेन्स वजनाचे नाणे तोपर्यंत सापडले नव्हते. अशा परिस्थितीत कॅम्बे लेखात उल्लेखिलेले नाणे १४६ ग्रेन्सचे होते किंवा नाही हे ठरविणे सोपे नाही. आळतेकरांच्या मते हे "सुवर्ण" नाणे १४६ ग्रेन्स वजनाचे पारिभाषिक "सुवर्ण" नाणे नसून त्याऐवजी त्यावेळी उपयोगात असलेल्या "द्रम्म" नाण्याप्रमाणे ६५ ग्रेन्स वजनाचे सोन्याचे नाणे असावे. शके ९३२ च्या दिवेआगर[५०४] ताम्रपटामध्ये सुवर्ण गद्याणका बरोबर सुवर्ण ह्या नाण्याचाही उल्लेख आहे.

## सुवर्ण धरण

हे नाणे आतापर्यंत फक्त एकाच लेखाद्वारे माहित झालेले आहे. शिलाहार राजा रट्टराज याच्या शक संवत् ९३० च्या खारेपाटण लेखानुसार[५०५] परदेशातून येणाऱ्या प्रत्येक जहाजास "सुवर्ण धरण" या नाण्यामध्ये जकात भरावयाची होती. मनुच्या म्हणण्याप्रमाणे "सुवर्ण धरण" या नाण्याचे वजन १० पळ किंवा ३२०० गुंज असे होते. परंतु शिलाहारांच्या लेखांतील "सुवर्ण धरण" हे नाणे या वजनाचे होते किंवा नाही हे नक्की ठरविता येत नाही. मिराशींच्या मते शिलाहारांच्या लेखातील "सुवर्ण गद्याण" आणि "सुवर्ण धरण" या नाण्याचे वजन लिलावती ग्रंथात वर्णिल्याप्रमाणे अनुक्रमे ४८ गुंजा व २४ गुंजा असावे.[५०६]

## आसू

आसू हे सुवर्णाचे नाणे असून यादव राजा सिंधण याच्या शके ११२९ च्या पाटण[५०७] लेखामध्ये व यादव सेनापती खोलेश्वर याच्या शके ११५० च्या आंबे[५०८] लेखामध्ये या नाण्याचा उल्लेख आहे. लीळाचरित[५०९] मध्ये दिल्याप्रमाणे यादव राजाने चक्रधरस्वामींना "आसू" दिले होते. याशिवाय गोविंदप्रभू चरितामध्ये[५१०] आसूच्या इतर प्रकारांचाही उल्लेख आहे.

## सोन्याची इतर नाणी

सोन्याच्या या नाण्यांखेरीज होंग,[५११] होन्न[५१२] पोन्न,[५१३] आणि दीनार[५१४] ही सोन्याची नाणी शिलाहार राज्यामध्ये उपयोगात होती असे शिलाहार वंशाच्या लेखांमध्ये आलेल्या वर्णनावरून कळते. राजा विजयादित्य याच्या शक संवत् १०६५-६६ च्या मिरज लेखानुसार ग्राहकाकडून मिळालेल्या प्रत्येक होंगावर २० सुपाऱ्या कर म्हणून वसूल करत असत. याच राजाच्या शक संवत् १०७८ च्या शेडबल लेखामध्ये वाद्ये वाजवून केलेल्या प्रत्येक विवाह प्रसंगी व व्यापाऱ्यांच्या श्रेणींनी विकलेल्या कापडाच्या क़िंमतीवर दर होन्नमागे एक "वीस" द्यावा असा उल्लेख आहे. त्याचप्रमाणे नागोज सोनाराने व व्यापारी श्रेणीच्या समितींना प्रत्येक होन्नुवर एक "वीस" या दराने जमवलेला "दवणाय कर" त्या समितींनी बांधलेल्या वसतीत व देवळात वाटून

द्यावयाचा होता. मिरज लेखात दिल्याप्रमाणे सेडम्वाल येथील ओहोळाच्या पूर्वेस बांधलेल्या दुकानांवर तेली आणि दुकानदार यांनी इतर करांबरोबर विड्याच्या पानाच्या ओझ्यावर एक पोण्ण द्यावयाचा होता. शिलाहार राजा अवसर द्वितीय याच्या शक संवत् ९१० च्या पट्टणकुडी ताम्रपटानुसार काही श्रेष्ठींनी आपल्या काही परंपराप्राप्त हक्कांच्या संरक्षणार्थ राजा अवसराची ४० दीनारानी पादपूजा केली होती.

### द्रम्म

ग्रीक द्राम्मा ह्या शब्दाचे द्रम्म हे संस्कृत रूप आहे. राष्ट्रकूट राजा अमोघ वर्ष प्रथम याच्या वेळच्या शके ७६५, ७७५ आणि ७९९ च्या कान्हेरी[५१५] शिलालेखांमध्ये कान्हेरी येथील बौद्ध मठाला द्रम्मामध्ये देणगी दिल्याचा उल्लेख आहे. काही लेखांमध्ये[५१६] या नावाचे संक्षिप्त रूप दा, द्रा, द्र, दां असे दिले आहे. काही ठिकाणी ते द्रम्म, द्रम, द्राम, दाम असे दिले आहे. शिलाहार राजा अपरादित्य द्वितीय याच्या शक संवत् ११०६ च्या लोनाड[५१७] लेखामध्ये व राजा सोमेश्वर याच्या शक संवत् ११८२ च्या चांजे[५१८] शिलालेखामध्ये "पोरूथा द्रम्म" मध्ये दान दिल्याचा उल्लेख मिळतो. पोरुथा द्रम्म हा द्रम्म या नाण्याचा एक प्रकार असावा असे वाटते. सोमेश्वरदेवाच्या पैठण लेखात[५१९] गुरवाला "आखत दामु" दिल्याचे सांगितले आहे. या नोंदीवरून "द्रम्म" या नाण्याची वेगवेगळी परिमाणेही अस्तित्वात होती असे दिसते. महानुभाव ग्रंथ लीळाचरित[५२०] मध्ये "सरदाम"चा उल्लेख आहे. आळतेकरांच्या वर्णनाप्रमाणे राष्ट्रकूट साम्राज्यामध्ये सोने व चांदी या दोन्ही धातूचे "द्रम्म" नाणे अस्तित्वात होते.[५२१] मिराशींच्या वर्णनाप्रमाणे कोकण विभागात त्यावेळी प्रचलित असलेली शिलाहार राजा छित्तराज याची "द्रम्म" नाणी सहा इंच आकाराची होती आणि त्यांचे वजन ५३ ग्रेन्स होते.[५२२]

### टंक किंवा टांक

टंक किंवा टांक या नाण्याचे "पद्मटंक व "रौक्य टंक" असे दोन प्रकार होते. यापैकी पद्मटंक हे सोन्याचे नाणे यादव राजा सिंघण याने प्रथम सुरू केले. पुढे यादव राजा कृष्ण महादेव आणि रामचंद्र यांनी त्यांच्या शासनकाळातही ते प्रचलित ठेवले.[५२३] शके १३१७ च्या मठगाव[५२४] शिलालेखात उल्लेखिलेले "रौक्य टंक" हे नाणे चांदीचे असावे. विजयनगरचा राजा संगम हरिहर दुसरा याच्या शके १३२४ च्या वेळूस[५२५] लेखात व संगम देवराय प्रथम याच्या शके १३३५ च्या बांदोडे[५२६] लेखामध्येही "टंक" नाण्याचा उल्लेख आहे. ठक्कुर फेरुच्या "गणित सार"[५२७] मध्ये ५० द्रम्म=१ टंक अशी व्याख्या दिली आहे. इंडियन म्युझियमच्या कॅटलॉगमध्ये चांदीच्या टंक नाण्याच्या वजनाचे १७५ ग्रेन्स =१०० रतीचे वजन असे वर्णन आहे आणि सुवर्ण टंकाचे वजन चांदीच्या टंकाच्या वजना इतकेच होते.[५२८] "खरतगच्छ बृहत्गुर्वावली" मध्ये हेमटंक आणि रौप्य टंकाचा उल्लेख आहे. परंतु दशरथ शर्मा यांच्या मते ही मुसलमान नाणी असावीत.[५२९]

**निष्क**

शिलाहार नृपति भोज द्वितीय याच्या शक संवत् ११९३ च्या कुतापूर[५३०] आणि चालुक्य राजा सोमेश्वर याच्या इ. स. च्या ११-१२ व्या शतकातील होट्टल[५३१] लेखामध्ये फक्त दानाच्या संदर्भात "निष्क" या नाण्याचा उल्लेख आहे. यापैकी पहिल्या लेखामधील निष्क हे चांदीचे (रजतनिष्क) असावे. परंतु नंतरच्या लेखातील "निष्क" नाणे कोणत्या धातुचे होते हे सांगता येत नाही. भास्कराचार्याच्या लीलावतीमध्ये १६ चांदीचे द्रम्म म्हणजे एक सोन्याचा टंक असे सांगितले आहे.

इ. स. ११-१२ व्या शतकामध्ये या दोन्ही नाण्यांचे एका परिमाणाचे (Unit) वजन ६० ग्रेन्स होत.[५३२].

**विसोवा**

विसोवा हे तांब्याचे नाणे होते. याचा उल्लेख कदंब राजा मुरुडदेवाच्या शके १०८६ च्या सावरगाव[५३३] आणि यादव राजा सिंघण याच्या शके ११२९ च्या पाटण[५३४] लेखामध्ये मिळतो. यापैकी पहिल्या लेखानुसार राजाच्या नोकराने अंबादेवीच्या देवालयाला "विसावा" दिला होता. तुळपुळे यांच्या मते "विसावा" ही संज्ञा येथे "विसोवा" ह्या नाण्याकरिता आहे असे वाटत नाही, तर ती शेतमळ्याच्या उत्पन्नाचा विसावा भाग असे दर्शविते. परंतु खरे यांच्या मते ही संज्ञा "विसावे" अशी असून ते एक नाणे आहे.[५३५] पाटण लेखाप्रमाणे पाटण शहराने प्रत्येक "आसू" मागे ग्राहकांकडून वसूल केलेल्या दामचा विसावा भाग दान दिला. यावरून असे दिसते की, वीस हा दामचा विसावा भाग असावा. फ्लिटच्या मते एक आण्याचा चौथा भाग "दुड्डू" म्हणजे एक "वीस" असावा.[५३६]

**पण**

यादव राजा सिंघण याच्या पुळुंज[५३७] कानडी लेखामध्ये तांब्याच्या "पण" या नाण्याबरोबर "हाग" (हग) या नाण्याचाही उल्लेख आहे. ही दोनही नाणी शिलाहार राज्यात चलनात होती असे या वंशाचा राजा बिजयदित्य याच्या शक संवत् १०६५-६६ च्या मिरज[५३८] लेखातील वर्णनावरून दिसते. या वर्णनाप्रमाणे आहत "पण" नाणी तपासणाऱ्या अधिकाऱ्याकडून प्रत्येक होंगावर एक हग नाणे घ्यावयाचे होते. तसेच या नगरातील लोकांनी प्रत्येक विवाहाच्या प्रसंगी एक हग नाणे द्यावयाचे होते आणि या नगरातील व्यापारी संघाच्या सभासदांनी एक हग दिवाळीच्या दिव्याकरिता द्यावयाचे होते. एक हग नाणे पण नाण्याच्या $\frac{१}{४}$ भागाइतके होते किंवा पणचा चौथा हिस्सा म्हणजे एक हग[५३९] भास्कराचार्यांच्या म्हणण्याप्रमाणे ८० कवड्या किंवा १६ पण = एक द्रम्म होय.[५४०]

**कवडा, पोकळी आणि इतर वस्तू**

निरनिराळ्या धातुपासून बनविलेल्या नाण्यांव्यतिरिक्त काही विशिष्ट वस्तूही विनिमयासाठी म्हणून वापरीत. उदाहरणार्थ गंग, उदयादित्याच्या शके १०६६ च्या आंबे[५४१]

दानपत्रानुसार आठवडे बाजाराच्या दिवशी प्रत्येक दुकानदाराने भूचरनाथाच्या पुजाऱ्याला एक "कवडा" द्यावयाचा होता. खोलेश्वराच्या शके ११५० च्या आंबे[५४२] लेखाप्रमाणे आंबे, केज, औसा, उदगीर या देशांच्या सैनिकी छावणीने सकलेश्वराच्या गुरवाला प्रत्येकी $\frac{१}{४}$ कवडा द्यावयाचा होता. लीळाचरितातील[५४३] काही उल्लेख "कवडा" हे विनिमयाचे माध्यम होते असे सांगतात. तारकवडा[५४४] हा कवडा या नाण्याचा एक उपप्रकारही अस्तित्वात होता. कवड्यावरोबर "पोकळी" ही विनिमयासाठी वापरीत असे, यादव सिंघण याच्या शके ११२९ च्या पाटण[५४५] व खोलेश्वराच्या शके ११५० च्या आंबे[५४६] लेखावरून समजते. ज्ञानेश्वरी[५४७] मध्ये चाम नामक चामड्याच्या नाण्याची माहिती मिळते. या नाण्यावर राजाचा ठसा मारलेला असे. हे नाणे सर्व प्रकारच्या वस्तूंच्या खरेदीसाठी वापरीत असत.

वर वर्णिलेल्या नाण्यांशिवाय कासु, वराह, फणम, दामाणी, चिंचोरा, अडू वगैरे नाण्यांचेही उल्लेख मिळतात. किट्टलच्या म्हणण्याप्रमाणे "कासु" हे तांब्यांचे लहान नाणे होते आणि "वराह" हे रुपयासारखे नाणे होते. परंतु आपल्याला फणम[५४८] या नाण्याबद्दल व त्याच्या नक्की मूल्याविषयी काही सांगता येत नाही. चिंचोके आणि पोकळी या वस्तुंच्या विनिमयाचे साधन म्हणून केलेल्या उल्लेखावरून या काळातही एक प्रकारची वस्तुविनिमय पध्दती अंमलात होती असे दिसते.

### परदेशीय व्यापार

या काळातील महाराष्ट्राच्या परदेशी व्यपारासंबंधीच्या माहितीसाठी पेरिप्लस, अल्बेरुणी, अल इद्रसी, मार्कोपोलो आणि इब्न बतुता ह्या विदेशी प्रवाशांनी आपापल्या वृत्तांतामध्ये दिलेल्या वर्णनांवर अवलंबून रहावे लागते. फार प्राचीन काळापासून भडोच हे महत्त्वाचे भारतीय बंदर होते. या काळातही त्याचे तेच स्थान कायम होते. अल इद्रसीच्या[५४९] म्हणण्याप्रमाणे चीन तसेच सिंध व इराणच्या आखातातून येणाऱ्या जहाजांचे हे प्रमुख बंदर होते. पश्चिम किनाऱ्यावर कल्याण हे या काळातील दुसरे महत्त्वाचे व नैसर्गिक बंदर होते. कॉसमसच्या म्हणण्याप्रमाणे इ. स. च्या सहाव्या शतकामध्ये कापड, पितळ, काळ्या लाकडाचे ओंडके या वस्तुंची निर्यात करणाऱ्या पाच बंदरापैकी हे एक महत्त्वाचे बंदर होते. याशिवाय नवसारी, सोपारा, ठाणे, चेमुल्य, दाभोळ, जयगड, देवगड आणि मालवण ही महत्त्वाची बंदरे होती. ही सर्व किनारी व्यापारामध्ये भाग घेत होती.[५५०] शिलाहार राज रट्टराज याच्या शक संवत् ९३० च्या ताम्रपटामध्ये कंदलमूलियहून[५५१] येणाऱ्या जहाजांचा उल्लेख आहे.

### निर्यात वस्तू

इ. स. च्या प्रारंभीच्या शतकांमध्ये भारत आणि पश्चिमेकडील राष्ट्रे यांच्यामध्ये मोठ्या प्रमाणावर सागरी व्यापार होत होता. भारतातील वनस्पतीपासून निर्माण होणाऱ्या वस्तू, मौल्यवान रत्ने, मोती, अत्तरे, रेशमी कापड, सुती कापड वगैरे

सुख-चैनीच्या वस्तुंची रोमन साम्राज्यात निर्यात होत असे. वर वर्णन केलेली नैसर्गिक साधन-संपत्ती आणि या काळापर्यंत विकसित झालेले उद्योग भारतातून सूती धागा आणि उत्तम तसेच कनिष्ठ प्रतीचे कापड, मलमल, चामडे, चटया किंवा आसने, सुपाऱ्या, नारळ, चंदन आणि इमारती लाकूड इत्यादि वस्तुंची निर्यात होत असली पाहिजे असे सुचवितात. पेरिप्लस, अल इद्रसी, मार्कोपोलो आणि इब्न बतुता या प्रवाशांनी दिलेल्या भारतातून निर्यात होणाऱ्या वस्तुंच्या यादीत या सर्वांचा समावेश झाला आहे. नंतरच्या काळातील टॅव्हरनिअर सारख्या लेखकांनी हिऱ्यांचाही समावेश निर्यात वस्तुंच्या यादीत केलेला आहे.[५५२]

**आयात वस्तु**

पेरिप्लसच्या वर्णनाप्रमाणे कनिष्ठ प्रतीच्या मोत्यांखेरीज गुलाम, थोड्या प्रमाणात इटालियन मद्य, तांबे, कथील, शिसे, पीत स्फटिक, सुगंधी लाकूड, लवंग, विलोरी काच, अँटिमनी, सोने, चांदीची नाणी त्याचप्रमाणे राजांकरिता गाणारी मुले-मुली यांची इराणच्या आखातातून भडोचला आयात होत असे.[५५३] यापैकी काही वस्तू भारतामध्ये उपलब्ध नव्हत्या म्हणून त्याचा अंतर्भाव भारतामध्ये या काळात आयात होणाऱ्या वस्तुंच्या यादीतही केलेला दिसतो. मार्कोपोलोच्या वर्णनाप्रमाणे इ. स. च्या १३ व्या शतकामध्ये ठाणे येथे सोने, चांदी व तांबे यांची आयात होत असे.[५५४] विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणते भारतामध्ये मोठ्या प्रमाणावर घोड्यांची आयात होत असे. मार्कोपोलोने नमूद केल्याप्रमाणे दक्षिण भारत व गुजरातमधील प्रत्येक बंदरामध्ये येणाऱ्या विदेशी जहाजांमध्ये इतर व्यापारी वस्तुंबरोबर घोडेही येत असत.[५५५] अरेबियन घोडे भारतामध्ये फार प्रिय होते. अरेबियन, तुर्कस्थानी आणि इतर विदेशी जातीचे घोडे इ. स. ८०० ते १३०० या काळात भारतात आयात केले जात. मार्कोपोलोच्या वर्णनाप्रमाणे इ. स. च्या १२-१३ व्या शतकामध्ये अश्व आयातीच्या प्रमाणात आश्चर्यकारक वाढ झाली होती. या काळातील अश्वतज्ज्ञांनी त्यांच्या अश्वांच्या वर्गवारीमध्ये विदेशी जातीच्या अश्वांना आणि विशेषकरून अरेबियन आणि इराणी अश्वांना प्रथम दर्जा दिला होता. भारतीय अश्वांना या यादीमध्ये अगदी खालचा दर्जा दिला होता. इ. स. १२०० मध्ये मनोरच्या खाडीमध्ये ताम्रपर्णी नदीच्या मुखावर वसलेल्या कायल या बंदराच्या ठिकाणी एक प्रभावी व्यापारी वसाहत होती.[५५६] दक्षिण भारतातील पाच राजे या ठिकाणी जवळजवळ २००० अश्व आयात करीत.[५५७] महाराष्ट्रावर या काळात शासन करणाऱ्या राजवंशानीही अश्व आयात केल्याची शक्यता नाकारता येत नाही.

विदेशी प्रवाशांच्या इतिवृत्तांमध्ये वर्णिलेल्या बंदराशिवाय ज्यांच्या नावाच्या शेवटी "पट्टल" ही संज्ञा आहे अशा बंदरातूनही परदेशी व्यापार चालत असे. उदाहरणार्थ राष्ट्रकूट नृपति अमोघवर्ष प्रथम याच्या शके ७९३ च्या संजान लेखात,[५५८] शिलाहार राजा छित्तराज याच्या शक संवत् ९५६ च्या आणि महामंडलेश्वर मोंढ याच्या शक संवत् ९७५ च्या चिंचणी[५५९] ताम्रपटांत आलेले अनुक्रमे संयान पत्तन व संधान पत्तन, शिलाहार राजा रट्टराज याच्या शक संवत् ९३० च्या खारेपाटण[५६०] ताम्रपटातील

बलिपत्तन आणि याच वंशाचा राजा अपरादित्य दुसरा याच्या शक संवत् ११०७ च्या ठाणे लेखातील[५६१] स्थानकिय पत्तन इत्यादि. यापैकी संयान हे ठाणे जिल्ह्यातील संजाने हे ठिकाण आहे तर स्थानकिय हे ठाण्याचे जुने नाव आहे. परदेशी प्रवाशांच्या वृत्तांतामध्ये याचा बंदर म्हणून उल्लेख आहे. बलिपत्तनचे तादात्म्य रत्नागिरी जिल्ह्यातील खारेपाटण या गावाशी केलेले आहे.

**जलमार्गीय व्यापार**

यामध्ये नद्यांमधून चाललेल्या व्यापाराचा समावेश करावा लागेल. ज्यांच्या नावाबरोबर पत्तन हा शब्द जोडलेला आहे अशी नद्यांच्या काठावर असलेली काही स्थळे देशांतर्गत व्यापाराची केंद्रे होती असे दिसते. बदामीच्या चालुक्य वंशाचा मांडलिक भोगशक्ति याच्या कलचुरी संवत् ४६१ च्या अंजनेरी[५६२] लेखामध्ये उल्लेखिलेले समगिरिपत्तन, राष्ट्रकूट नृपति इंद्र तृतीय याच्या शके ८३६ च्या वजीरखेडा ताम्रपटात उल्लेखिलेली श्रीमालपत्तन, चंदनापुरीपत्तन आणि वडनेरपत्तन[५६३] यासारखी गावे त्याकाळी नदीमार्गाने चालणाऱ्या व्यापाराचा निर्देश करतात.

**रस्ते आणि दळणवळणाची साधने**

समाकालीन साहित्यामध्ये अस्तित्वात असलेल्या रस्त्यांविषयी काहीही माहिती मिळत नाही. सातवाहन काळामध्ये महाराष्ट्रातील पैठण, नाशिक, जुन्नर, सोपारा इत्यादि मोठी शहरे इतर शहरांशी रस्त्यांनी जोडली गेली होती. परंतु पेरिप्लसने वर्णिल्याप्रमाणे दक्षिण भारतातून भडोचला जाण्यासाठी चांगले मार्ग नव्हते. इ. स. च्या १७ व्या शतकात, टॅव्हरनिअरच्या म्हणण्याप्रमाणे दक्षिण भारतातील घाटांमधून व डोंगराळ प्रदेशातून जाणारे मार्ग चांगले नव्हते.[५६४] परंतु संबंधित काळातील मार्गाची परिस्थिती चांगली असावी असे म्हणता येईल. दळणवळणाच्या साधनांमध्ये बैलगाडी हे मुख्य साधन होते. जलद वाहतुकीसाठी बैल, कनिष्ठ प्रतीचे घोडे, गाढवे, यांचाही उपयोग होत असे. त्याचप्रमाणे डोंगराळ भागामध्ये ज्याठिकाणी बैलगाडी जाऊ शकत नाही अशा भागांमध्येही या जनावरांचा वाहतुकीसाठी उपयोग होत असे. काही वेळेस माल नेण्यासाठी हमालही करीत असत. चोरांपासून आपल्या मालाचे रक्षण व्हावे या दृष्टीने व्यापारी नेहमी संयुक्तपणे (काफला, जथ्था) प्रवास करीत. निरनिराळ्या मंदिरांच्या ठिकाणी होणाऱ्या यात्रांप्रसंगी विशिष्ट जागी आपला माल जाऊन पोचला पाहिजे यादृष्टीने ते त्यांचा प्रवास कार्यक्रम आखीत.[५६५] आळतेकरांच्या म्हणण्याप्रमाणे मुसलमान शासनकालात बऱ्याच उपजातींनी काफल्याचा व्यवसाय स्वीकारला होता. ते एका गावांहून दुसऱ्या गावाला माल पोचवित. यासाठी प्रत्येकाजवळ जास्तीत जास्त १०० बैल असत.[५६६]

**श्रेणी**

या काळातील समाज जीवनामध्ये श्रेणी संघटनांना फार महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले होते. यांची व्यापारी श्रेणी व कामगार श्रेणी अशा दोन ठळक वर्गात विभागणी करता

येईल. आपली सत्ता किंवा अधिकार टिकविण्यासाठी आणि व्यापार व उद्योग यांना योग्य मार्गदर्शन करण्यासाठी त्यांचे स्वतःचे नियम व कायदे असत. मनु आणि याज्ञवल्क्य[५६७] यांच्या वर्णनाप्रमाणे जर हे नियम व कायदे समाजहिताच्या विरोधात नसतील तर ते राजांनाही पाळावे लागत. उत्तर कोकणच्या शिलाहार वंशातील राजा मुम्मुणिराज याच्या शक संवत् ९७० च्या ठाणे ताम्रपटामध्ये आलेल्या "ह्यंमन" आणि "नगर" या संज्ञा[५६८] अनुक्रमे सोनार, लोहार, तांबट, सुतार, पाथरवट यांच्या संघटना या व्यापारी श्रेणीच्या निदर्शक आहेत. विशेष बाब अशी की, शिलाहार वंशाच्या लेखांमध्ये व्यापारी श्रेणींचा स्पष्ट उल्लेख नाही. परंतु अय्यावोळे किंवा अहित्छत येथील वीरबणंज या आंतरप्रांतीय व्यापारी श्रेणीचे वर्णन त्यांच्या पुढील दोन लेखांमध्ये मिळते. १) शिलाहार राजा गण्डरादित्य याचा शक संवत् १०५८ चा कोल्हापूर लेख, व २) राजा विक्रमादित्य याचा शक संवत् १०६५-६६ चा मिरज लेख.[५६९] हे लेख या श्रेणींबद्दल बरीच माहिती देतात. या श्रेणींचे सभासद दूरवरच्या प्रदेशात पसरले होते. मिरज लेखाप्रमाणे ज्या निरनिराळ्या भागांमध्ये या श्रेणींचे सभासद होते त्या प्रदेशातील या श्रेणींचे १५ जणांचे मिळून बनलेले कार्यकारी मंडळ होते. अशा प्रकारच्या कार्यकारी मंडळाचा उल्लेख याज्ञवल्क्यस्मृति आणि नीतिवाक्यामृत[५७०] या ग्रंथांमध्येही मिळतो. या श्रेणीचे सामान्य धोरण आणि श्रेणीच्या संपत्तीतून द्यावयाचे दान, देणगी किंवा एखाद्या व्यक्तीकडून पुन्हा पुन्हा वसूल करावयाची देणगी याबद्दलचे निर्णय त्यासाठी बोलाविलेल्या श्रेणीच्या सर्वसाधारण सभेत घेतले जात. उदाहरणार्थ शिलाहार राजा गण्डरादित्य याच्या शके १०५८ च्या कोल्हापूर[५७१] कोरीव लेखातील वर्णनाप्रमाणे कोल्हापूर येथील जैन मंदिराच्या आचार्याला दान देण्यासाठी व्यापारी तसेच सोनार, माळी, कुंभार, कापड व्यापारी यांच्याकडून वस्तूंच्या स्वरूपात अथवा रोख पैशांमध्ये वसूल करावयाच्या कराबद्दलचा निर्णय वीरबणंज श्रेणीच्या अय्यावोळे नगराचे ५०० स्वामी, सेट्टि, राजश्रेष्ठी, मंडलश्रेष्ठी आणि या श्रेणींचे कुण्डि, तोरम्बगे, बळेवट्न, कवडेगोल्ल इत्यादि ठिकाणचे प्रतिनिधी यांच्या सभेत घेण्यात आला. तसेच इ. स. ११४४ मध्ये सेडम्बाल[५७२] येथे राजश्रेष्ठी, मुख्यश्रेष्ठी श्रेणींच्या निरनिराळ्या ठिकाणच्या प्रतिनिधींच्या सभेत येथील माधवेश्वराच्या मंदिराला सण साजरे करण्यासाठी देणगी देण्यासंबंधी तसेच येथील बाजारात आलेले व्यापारी, सोनार, कुंभार, चांभार, कातडी कमावणारे बुरुड यांच्याकडून त्यांच्या वस्तू विक्रीवरील कर व सेडम्बाल येथील लोकांवर लावावयाचे कर याबद्दल निर्णय घेण्यात आले. हे निर्णय बहुतेक बहुमताने घेण्यात आले होते. ते सर्व सभासदांवर बंधनकारक होते. या करांबद्दल लक्षात घेण्यासारखी महत्त्वाची बाब म्हणजे हे कर तत्कालीन शासनकर्त्यांने लावले नव्हते तर त्या श्रेणीच्या, व्यापाऱ्यांच्या आणि राजप्रतिनिधींच्या मिळून भरलेल्या सभांमध्ये निश्चित केलें होते. श्रेणींना आपल्या मालाच्या सुरक्षिततेसाठी सैन्य (श्रेणीबल) ठेवण्याची परवानगी होती आणि संकट समयी राजाही या सैन्याचा उपयोग करीत असे. श्रेणी बँकाचेही कार्य करीत. या काळातील श्रेणींच्या बँका स्थैर्यासाठी प्रसिद्ध होत्या.[५७३] कायम स्वरूपाच्या

देणग्या देण्याकरिता लोक आपल्या ठेवी श्रेणींजवळ ठेव म्हणून ठेवीत. श्रेणींना आपला ध्वज वापरण्याचीही परवानगी होती. वर उल्लेखिलेल्या कोल्हापूर लेखामध्ये[५७४] वीरबणंज श्रेणीच्या टेकडी चिन्हाने युक्त असलेल्या ध्वजाचा उल्लेख आहे. हरिवंश[५७५] या ग्रंथामध्ये कंस आणि कृष्ण यांच्यामधील कुस्ती सामना पहावयास आलेल्या वेगवेगळ्या श्रेणींच्या त्यांच्या उद्योगधंद्याशी संबंधीत अवजाराची चिन्हे असलेल्या ध्वजांचे वर्णन आले आहे. हे ध्वज बहुतेक श्रेणीच्या काफल्याच्या समोर किंवा सैन्याच्या समोर ठेवत असावेत.[५७६]

### व्याजाचा दर

काही समकालीन लेख या काळात प्रचलित असलेल्या व्याजाच्या दराची कल्पना देतात. राष्ट्रकूट राजा अमोघवर्ष प्रथम याच्या काळच्या कान्हेरी[५७७] शैलगृहातील एका लेखामध्ये एका उपासकाने येथील स्थानिक बँकेजवळ १०० द्रम्माची कायम ठेव कायम व्याज मिळवण्याकरिता ठेवली होती. या व्याजाचा विनियोग योग्य अधिकाऱ्यांनी कृष्णगिरी येथे महाराज महाविहारमध्ये राहणाऱ्या भिक्षूंच्या चीवरांकरिता आणि ध्यानधारणेकरिता आवश्यक असलेले लेणे खोदण्याकरिता करावयाचा होता. याच काळातील दुसऱ्या एका कान्हेरी[५७८] लेखामध्ये एका उपासकाने कृष्णगिरि येथील भगवान बुद्धाच्या पूजेकरिता वीस द्रम्म, विहाराच्या दुरुस्तीकरिता तीन द्रम्म, भिक्षूच्या चीवरांकरिता पाच द्रम्म आणि पुस्तकांकरिता एक द्रम्म (प्रतिवर्षी) मिळावा म्हणून प्रत्येकी ४० द्रम्मांच्या दोन आणि १२० द्रम्मांची एक अशा रकमा तेथील भिक्षुसंघाजवळ कायम ठेवी म्हणून ठेवल्या होत्या. या वर्णनावरून २०० द्रम्मांच्या रकमेवर वार्षिक २९ द्रम्म व्याज मिळावयाचे होते असे कळते. याप्रमाणे इ. स. च्या ९ व्या शतकाच्या अखेरीस कान्हेरी भोवतालच्या प्रदेशात दरसाल दरशेकडा १४.५० हा व्याजाचा दर होता असे मिराशी म्हणतात, तर यादव राजा सिंघण यांच्या पुळुंज[५७९] कानडी लेखांनुसार महाजनांजवळ ठेवलेल्या सहा गद्याणांच्या ठेवीवर वार्षिक एक दाम व्याज मिळणार होते. यावरून कान्हेरी प्रदेशापेक्षा सोलापूर विभागामध्ये व्याजाचा दर यादवकाळामध्ये कमी होता असे दिसते.

### धार्मिक परिस्थिती

या काळातील मानवी जीवनावर हिंदू, बौद्ध, जैन या प्रमुख धर्मांचा फार मोठा धार्मिक पगडा होता. या धर्मांपैकी हिंदू धर्म तर फारच प्रभावशाली होता. या धर्माचे वैष्णव व शैव या दोन प्रमुख पंथांनध्ये विभाजन झाले होते. या दोन्ही पंथांचे उपपंथही अस्तित्वात होते. परंतु निरनिराळे पंथ, उपपंथ असूनही समाजामध्ये धार्मिक व जातिविषयक ऐक्यभाव होता. या सर्व संप्रदायांना राजाश्रय तसेच लोकाश्रयही प्राप्त झाला होता. लोकांच्या मनात सर्व पंथ, उपपंथाविषयी समभावना होती आणि तत्कालीन शासकांनीही भेदभाव न करता सर्वच संप्रदायांना उदारपणे देणग्या दिल्या आणि सर्वांच्या प्रगतीला प्रोत्साहन दिले.

**धार्मिक वातावरण**

उपलब्ध अभिलेखांद्वारे प्राप्त झालेल्या माहितीवरून सर्वधर्मसमभाव हे प्रमुख वैशिष्ट्य दिसते. निरनिराळ्या राजवंशांच्या लेखांमध्ये प्रारंभिच निरनिराळ्या देवांना वंदन व आवाहन करण्याची जी पद्धती स्वीकारलेली आहे त्यावरूनही हीच गोष्ट सिद्ध होते. या पद्धतीच्या अवलोकनाला बदामीच्या चालुक्य वंशीय राजांच्या कोरीव लेखांपासून प्रारंभ करता येईल. या वंशाच्या बहुतेक लेखांचा प्रारंभ विष्णुच्या वराह अवताराच्या आवाहनाने होतो. परंतु या घराण्याचे सभासद वेगवेगळ्या धर्मानुसार आचरण करण्यास स्वतंत्र होते. उदाहरणार्थ राजा पुलकेशी प्रथम हा वैदिक यज्ञविधी करणारा होता. परंतु त्याने मकुटेश्वर शिवाचे मंदिर बांधले होते.[५८०] राजा मंगलेशचे वर्णन परम भगवत असे केले आहे. त्याच्या पाचव्या शासनवर्षीच्या महाकूट स्तंभ[५८१] लेखानुसार त्याने मकुटेश्वर शिवाच्या मंदिराला उदारपणे देणग्याही दिल्या होत्या. त्याच्या नेरूर[५८२] दानपत्राप्रमाणे त्याने विष्णुची पूजा करून नंतर ब्राह्मणांना दाने दिली होती. त्याच्या हुली[५८३] ताम्रपटानुसार रविशक्तिने जैन चैत्याला देणगी दिली होती. याप्रमाणे मंगलेश हा त्याकाळी सामान्यपणे सर्व उपखंडात प्रचलित असलेल्या धर्मातीत कल्पनेचे पूर्णपणे पालन करीत होता असे दिसते. राष्ट्रकूट राजा अमोघवर्ष प्रथम हा जैन धर्मानुयायी होता. पण त्याच्या राज्यात आलेल्या साथीच्या रोगाच्या संकटापासून राज्याचे रक्षण व्हावे म्हणून त्याने संजान येथील देवीला आपल्या हाताचे एक बोट कापून अर्पण केल्याचा उल्लेख त्याच्या शक ७९३ च्या संजान[५८४] ताम्रपटामध्ये मिळतो. त्याच्या वेळच्या कान्हेरी शिलालेखामध्ये कान्हेरी[५८५] येथील बौद्ध विहाराला देणग्या मिळाल्याचा उल्लेख मिळतो. उत्तर व दक्षिण कोकणचे शिलाहार राजे शिवाचे परम उपासक होते.[५८६] या वंशाचा राजा केशिदेव याच्या मंत्र्याने मांडवली येथे लक्ष्मीनारायणाचे मंदिर बांधल्याचा उल्लेख शक संवत् ११२५ च्या मांडवी लेखात मिळतो. कोल्हापूरमध्ये ब्रह्मपुरी येथील सूर्य मंदिराजवळ असलेली ब्रह्मा व विष्णू मंदिरे शिलाहार राजा गण्डरादित्यच्या काळात बांधली होती व त्यामध्ये मुर्तीचीही स्थापना केली होती असे त्याच्या शक संवत् १०४८ च्या कोल्हापूर लेखातील वर्णनावरून कळते.[५८८] याच नृपतीच्या १०३७ च्या कोल्हापूर लेखात[५८९] विष्णूच्या वराह अवताराची स्तुती केलेली आहे. कोल्हापूरच्या शिलाहार वंशाचे राजे कोल्हापूरच्या महालक्ष्मीचे उपासक होते[५९०] आणि राजा गण्डरादित्यचा सामन्त निंबरस हा जैन देवी पद्मावतीचा भक्त होता.[५९१] याशिवाय कोल्हापूरच्या शिलाहार नृपतींनी बऱ्याच जैन मंदिरांना देणग्या दिल्या होत्या.[५९२] राजा गण्डरादित्यच्या शक संवत् १०३३ च्या ताळले लेखातील उल्लेखावरून त्याने बांधलेल्या टाक्याच्या काठावर बुद्ध व अर्हत् यांच्या मूर्तीची प्रतिष्ठापना केली होती. या उल्लेखावरून इ. स. च्या १२ व्या शतकापर्यंत या विभागात बौद्धधर्म अस्तित्वात होता[५९३] हे स्पष्ट होते. यादव नृपति हे वैष्णव धर्माचे उपासक होते. परंतु इतर धर्मांप्रती त्यांची उदार वृत्ती होती (ecletic attitude). यादव राजा सेऊणचंद्र तिसरा याच्या शके १०१३ च्या अंजनेरी[५९४] ताम्रपटाचा प्रारंभ पंचपरमेष्ठींच्या वंदनाने झाला

आहे. या लेखानुसार त्याने चंद्रप्रभूस्वामींच्या मंदिराच्या खर्चाकरिता अंजनेरीमधील तीन दुकाने देणगी म्हणून दिली होती.

**आवाहने आणि चिन्हे**

या प्रकारच्या धर्मसहिष्णु वृत्तीचे दर्शन या काळात महाराष्ट्रावर राज्य केलेल्या निरनिराळ्या राजवंशीयांच्या लेखांच्या प्रारंभी केलेल्या आवाहनांमध्ये आणि या लेखांवर असलेल्या चिन्हांद्वारेही होते. उदाहरणार्थ राष्ट्रकूट नृपति हे शिव व विष्णू या दोन्ही देवांना वंदन करतात.[५९५] कल्याणीच्या चालुक्य वंशाच्या काही लेखांमध्ये देवांच्या गटांमध्ये याबाबत सामुदायिक आवाहन केलेले दिसते. जसे इ. स. ११९९ च्या कुडितीनी[५९६] लेखामध्ये शंभू, वराह, सुब्रम्हण्य आणि वागली[५९७] लेखामध्ये ब्रह्मा, शिव, गणपती आणि वराह अवतार यांचे आवाहन केलेले आढळते. इ. स. ११४८ च्या पेद्दतुम्बलम[५९८] लेखाचा प्रारंभ गणपती आणि शंभू यांच्या वंदनाने झाला आहे. इ. स. ११६० च्या बागली[५९९] लेखामध्ये हे मानाचे स्थान लक्ष्मीनारायणाला दिले आहे. तर इ. स. च्या ११७३-७४ च्या कुरुगोड लेखामध्ये सतत आठ श्लोकांमध्ये शिवाची स्तुती केलेली आहे. इ. स. १०२८ च्या होसुर[६००] लेखामध्ये जैन आणि वैष्णव देवतांचे आवाहन केले आहे. इ. स. १०९५-१०९६ च्या डम्बल[६०१] बौद्ध लेखामध्ये बौद्धदेवी तारादेवीचेही आवाहन केलेले दिसते. राजा जयसिंह द्वितीयची बहीण अक्कादेवी हिने जैन, बौद्ध, अनंत आणि रुद्र[६०२] आगमांनुसार दानकर्मे केली होती. शिलाहार वंशाच्या लेखाच्या आरंभी हर,[६०३] पुरुषोत्तम,[६०४] वराह,[६०५] विनायक,[६०६] गणनायक[६०७] या हिंदू देवांची तसेच लोकनाथ[६०८] व आदिनाथ[६०९] या जैन तीर्थंकरांची प्रार्थना केलेली आहे. या वंशाचा राजा मल्लिकार्जुन याच्या शक संवत् १०७८ च्या चिपळूण[६१०] लेखातील लखुमादेवी व तिलभांडेश्वर ही देवतांची नावे वैशिष्ठपूर्ण वाटतात. तुळपुळे यांच्यामते ही अनुक्रमे देवी लक्ष्मी व नारायणाची नावे असावीत. यादव नृपति भिल्लम तृतीय याच्या कळस बुद्रुक[६११] ताम्रपटाच्या आरंभी सर्वज्ञ परमेश्वराची प्रार्थना केली आहे आणि नंतरच्या श्लोकांमध्ये ब्रह्मा, विष्णू आणि शिव यांची अनुक्रमे हिरण्यगर्भ, अच्युत आणि चंद्रमौळी या नावांनी स्तुती केली आहे. नंतरच्या यादव वंशीय राजांच्या काही दानपत्रांचा प्रारंभ विष्णूच्या स्तुतीने होतो.[६१२] काही ठिकाणी द्वारजा या देवीचेही आवाहन केलेले आहे.[६१३]

वरीलप्रमाणे निरनिराळ्या राजवंशांनी उपयोग केलेल्या विविध प्रकारच्या चिन्हांची (emblems) माहिती पुढे दिलेली आहे. राष्ट्रकूट राजांच्या कोरीव लेखांवर विष्णूचे वाहन गरुड आढळतो तर त्यांच्या काही लेखांच्या मुद्रांवर योगी स्वरुपात नसलेला शिव आढळतो. त्यांच्या ताम्रपटात शिव व विष्णू या दोघांचीही प्रार्थना केलेली आढळते.[६१४] यादव राजांनी आपले ताम्रपट व शिलालेखांवर विविध प्रकारची चिन्हे कोरली आहेत. या चिन्हांमध्ये शंख, लिंग, पुजारी, गाय-वासरू, सूर्य, चंद्र, वृषभ, हात जोडून असलेला

गरुड, कलश, बंद केलेले छत्र आणि संन्याशाचा कमंडलू किंवा पळी हे बऱ्याच ठिकाणी आढळतात.[६१५] गरुड हे कोल्हापूरच्या शिलाहारांचे आवडते चिन्ह आहे. परंतु राजा विजयादित्याचा शक संवत् १०६५ चा कोल्हापूर शिलालेख[६१६] आणि शक संवत् १०७३ च्या बामणी[६१७] शिलालेख यांच्या शिळांवर अग्रभागी पद्मासन घालून संमुख बसलेली जिनाची आकृति, त्याच्या मागे सात फण्यांचा नाग, डाव्या बाजूला गाय-वासरू, उजवीकडे वक्र तलवार व या सर्वांच्या वर डावीकडे सूर्य व उजवीकडे चंद्र कोरलेले आहेत.

### इतर धर्म

इतर धर्मांच्या बाबतीतही या काळातील शासकांनी सहिष्णुतेचे धोरण पाळले होते. मुसलमान इतिहासकार अबु इश (Abu Is), हक अल इश्तख्री (Hak Al Istakhri)[६१८] आणि इब्न हौकल (Ibn Haukal)[६१९] यांच्या म्हणण्याप्रमाणे राष्ट्रकूट राजा अमोघवर्ष प्रथम याने मुसलमानांना मशिदी बांधण्याची आणि आपआपले धार्मिक विधी मोकळेपणाने करण्याचीही परवानगी दिली होती. तसेच या मुसलमानांवर शासनही मुसलमानच करीत. परंतु आळतेकरांच्या मते या विधानावरून मुसलमानांच्या व्यक्तीसंबंधित कायद्यांची व्यवस्था त्यांचा काझी पहात असे या विधानाचा अर्थ राष्ट्रकूट राजाने मुसलमान नागरिकांकरिता खास मुसलमान अधिकारी नेमला होता असा होत नाही.[६२०] शिलाहार वंशाच्या शासकांनीही हेच धोरण ठेवले होते आणि मुसलमानांना त्यांच्या राज्यात शांतपणे राहण्याची परवानगी दिली होती. राजा छित्तराज याच्या शक संवत् ९५६ च्या चिंचणी[६२१] लेखानुसार अल्लिय, महार आणि मधुमत हे मुसलमान व्यापारी संयान मंडलाचे प्रभावी नागरिक होते. यादव राजा रामचंद्र याच्या शके १२९८ च्या कोपराड[६२२] लेखामध्ये आलेला कन्नरदेवाच्या मुसलमान अधिकाऱ्याचा व अगास येथील मशिदीचा उल्लेख या काळातील यादव राजांनी मुसलमान धर्माच्याबाबतीत स्वीकारलेल्या सहिष्णु धोरणाचा निर्देश करतो.

## हिंदूधर्म

### प्राचीन वैदिक धर्म

उत्तर भारतामध्ये शुंग वंशाच्या शासनकाळात प्राचीन वैदिक धर्माच्या पुनरुज्जीवनास प्रारंभ झाला. महाराष्ट्रात या काळात ही चळवळ कळसाला पोहचलेली दिसते. आधीच्या कालखंडातील वाकाटकवंशीय राजाप्रमाणे या काळातील बदामीच्या चालुक्य घराण्याचे राजेही प्राचीन वैदिक धर्माचे उपासक होते.[६२३] त्यांनी बरेच वैदिक यज्ञही केले होते. बदामी[६२४] येथील शके ४६५ च्या शिलालेखाप्रमाणे चालुक्य राजा पुलकेशी प्रथम याने अश्वमेध यज्ञ आणि इतर यज्ञ मोठ्या प्रमाणावर केले होते. त्याने केलेल्या अश्वमेध यज्ञप्रसंगी धरतीचेही स्वतःचे पवित्र स्नान झाले होते असे वर्णन ऐहोळे[६२५] येथील शिलालेखामध्ये मिळते. राजा मंगलेश याच्या पाचव्या शासन वर्षीच्या महाकूट

स्तंभ लेखामध्ये[६२६] त्याने केलेल्या अग्निस्तोम, अग्निचयन, वाजपेय, बहुसुवर्ण, पौण्डरिक आणि हिरण्यगर्भ या यज्ञांचा उल्लेख आहे. राजा कीर्तीवर्मन प्रथम याच्या १२ व्या शासनवर्षीच्या गोडची[६२७] ताम्रपटामध्ये पुलकेशी प्रथम याने केलेल्या यज्ञांच्या वर्णनाबरोबरच पुलकेशी प्रथम याचा उल्लेख धर्ममहाराज असा केला आहे. राजा पुलकेशी द्वितीय याच्या तिथी नसलेल्या नेरूर[६२८] व चिपळूण[६२९] लेखामध्ये राजाने विविध यज्ञप्रसंगी केलेल्या पवित्र स्नानांचा उल्लेख आहे. कल्याणीच्या चालुक्य वंशाच्या लेखांमध्ये पुलकेशी प्रथम याने अश्वमेध यज्ञप्रसंगी वैदिक ब्राह्मणांना हत्ती आणि अश्वांसहीत २००० गावे दान दिल्याचा उल्लेख त्या वंशाच्या राजांना आपल्या या पूर्वजांबद्दल वाटणाऱ्या अभिमानाचा पुरावा आहेच. परंतु त्याबरोबर इतर लेखांमधून त्यांच्याविषयी मिळणाऱ्या माहितीलाही तो पुष्टी देतो. कल्याणी चालुक्य वंशाचा राजा सोमेश्वर तृतीय याच्या चम्पू काव्यामध्ये राजा पुलकेशी प्रथम याने प्रत्येक संक्रांत काळात १६ महादान केले आणि वैदिक ब्राह्मणांना त्यांच्या कार्यात गुंतवून ठेवले, शिवाय संतुष्टही ठेवले अशी माहिती मिळते.[६३०] बदामीचा चालुक्य राजा विक्रमादित्य प्रथम याच्या शके ६६४-६६५ च्या कर्नूल[६३१] लेखानुसार त्याने ५१० निवर्तने जमीन व एक मळा १० ब्राह्मणांना आपले यज्ञविषयक कार्य निर्वेधपणे करता यावे म्हणून दान दिला. हे ब्राह्मण वेदविद्येत पारंगत होते आणि त्यांची नेमून दिलेली सहा कर्मेही उत्तमरित्या पार पाडत होते. या पुराव्यानुसार असे दिसते की, इ. स. च्या सातव्या शतकाच्या मध्यापर्यंत चालुक्य राजांमध्ये वैदिक यज्ञकर्मे केली जात. राष्ट्रकूट राज्यामधील यज्ञविधींचे अस्तित्व फक्त राजा अमोघवर्ष प्रथम याचा शके ७३० चा संजान ताम्रपट[६३२] आणि राजा गोविंद चतुर्थ याच्या कॅम्बे[६३३] ताम्रपटाद्वारे ज्ञात होते. या ताम्रपटानुसार राजसूय, वाजपेय आणि अग्निस्तोम हे यज्ञ करण्याकरिता ब्राह्मणांना दाने दिली होती. शिलाहार[६३४] आणि यादव[६३५] वंशाच्या शासन काळामध्ये मात्र वैदिक यज्ञ बंद झालेले दिसतात. कारण यावेळी धर्मांवर स्मृति, पुराणे आणि निबंधामध्ये सांगितलेल्या सिद्धातांचा प्रभाव होता. स्मृतिकारांचा फक्त श्रौत विधी करण्याच्या प्रथेला प्रथम विरोध होता. अत्रीसारखे काही स्मृति लेखक स्मार्त धार्मिक विधी करण्यावर जास्त भर देतात.[६३६] अल्बेरुणीच्या वर्णनाप्रमाणे जेव्हा त्याने भारताला भेट दिली तेव्हा बहुतेक वैदिक यज्ञ विधी कमी झाले होते.[६३७]

### स्मार्त पौराणिक धर्म

वैदिक यज्ञ विधी अस्तंगत झाल्यानंतर समाजामध्ये स्मार्त पौराणिक धर्म फार प्रिय झाला. पंचमहायज्ञ, व्रते आणि उपवास, मूर्तीपूजा, दान देणे, यात्रा वगैरे सारखे विधी ही या धर्माची वैशिष्ट्ये आहेत.

### पंचमहायज्ञ

स्मृति ग्रंथामध्ये सांगितल्याप्रमाणे बलि, चरु, वैश्वदेव, अग्निहोत्र आणि अतिथीपूजन या पंचमहायज्ञांना तत्कालीन धार्मिक जीवनात महत्व आहे. हे यज्ञ मानवजातीच्या

कल्याणासाठी करीत आणि त्यामध्ये लोणी, तूप व धान्याचा उपयोग होत असे. यापैकी बलि यज्ञ हा देव, गंधर्व किंवा यक्ष आणि भूते इत्यादींना तृप्त करण्याकरिता करीत. चरु यज्ञांमध्ये देवता आणि पितर अथवा पूर्वजांना शिजविलेले अन्न अर्पण करीत. वैश्वदेव हा धार्मिक विधी रोज सकाळ-संध्याकाळ करीत आणि अन्न देणाऱ्या सर्व देवांसाठी या यज्ञामध्ये शिजविलेले अन्न अर्पण केले जात असे. अतिथीपूजन या विधीमध्ये अतिथिला भोजन व काहीतरी देणगी देत असत. अग्निहोत्र या विधीमध्ये अग्नीला अन्न अर्पण करून संतुष्ट करीत.[६३८] आळतेकर यांच्या मते हा विधी व्यवसायिक ब्राह्मण समाजात अस्तित्वात होता. अत्रिसंहितेमध्ये[६३९] अग्निहोत्र न करणाऱ्या ब्राह्मणाकडील अन्न वर्ज्य मानावे असे विधान आहे. अल्बेरुणीच्या वर्णनावरून या काळात अग्निहोत्र हा विधी अस्तित्वात होता.[६४०] बदामीचा चालुक्य राजा पुलकेशी प्रथम याने शके ५३९ च्या सातारा[६४१] ताम्रपटामधील उल्लेखाप्रमाणे आनंदतीर्थ हे पवित्र स्थळ वेदविधीमध्ये पारंगत असणाऱ्या पाच ब्राह्मणांना पाच यज्ञविधी करण्यासाठी कायमचे दान दिले होते हे समजते. याच नृपतीच्या इ. स. ६१५-६१६ च्या कंडलगाव[६४२] लेखानुसार रेवती द्विपातील पिरिगिप हे गावही याच उद्देशाने दान दिले होते. ही दान प्रथा राष्ट्रकूट, शिलाहार आणि यादव या राजघराण्यांच्या कारकिर्दीतही प्रचलित होती. राष्ट्रकूट राजा विभुराज याच्या तिसऱ्या शासन वर्षीच्या हिंगणी-बेरडी[६४३] ताम्रपटामध्ये नन्नस्वामी नामक ब्राह्मणाला धार्मिक विधी करण्यासाठी कमलिभुट्टक हे गाव व ५० सुवर्ण शलाका दान दिल्याचा उल्लेख आहे. सेंद्रक वैरदेव याच्या शके ६२४ च्या मेहुणबरे[६४४] ताम्रपटामध्ये देवीग्राम हे गाव बलि, चरू, अग्निहोत्र इत्यादी विधी करण्याकरिता ब्राह्मणाला दान दिले होते. दन्तिदुर्ग याच्या शके ६६३ च्या एलोरा[६४५] लेखात चंदनपुरी ८४ मधील पिप्पलाल हे गाव नवसारीहून आलेल्या ब्राह्मणाला अग्निहोत्र आणि यासारखे इतर विधी करण्याकरिता दान दिले होते. शिलाहार राजा अपराजित याच्या शक संवत् ९१५ च्या जंजिरा[६४६] ताम्रपटामध्ये करहाटहून आलेल्या ब्राह्मणाला बलि, चरू, वैश्वदेव, अग्निहोत्र वगैरे विधी करण्याकरिता एक मळा दान दिला होता. त्याचप्रमाणे राजा छित्तराज याच्या शक संवत् ९४८ च्या भांडुप[६४७] लेखामध्ये षटषष्टिविषयमधील नोऊरग्रामातील एक शेत याच उद्देशाने दान दिल्याचा उल्लेख आहे. यादव राजा भिल्लम दुसरा याचा शके ९२२ चा संगमनेर ताम्रपट व राजा भिल्लम तृतीय याचा शके ९९१ चा कळसबुद्रुक लेख याद्वारे प्राप्त झालेली माहिती हे यादव राजे पाराशर, अंगिरस व इतर स्मृतिकारांनी सांगितलेले विधी करीत होते असे सुचविते.[६४८] परंतु या काळात स्मृतींमध्ये सांगितलेले धार्मिक विधी मागे पडून त्याऐवजी आता पुराणे व निबंधामध्ये सांगितलेली व्रते प्रिय होऊ लागली होती.

**धार्मिक विधी**

स्मार्त धर्मातील धार्मिक विधी आरंभी फार साधे होते, परंतु कालांतराने ते श्रौत विधींप्रमाणे गुंतागुंतीचे होत गेले. उदाहरणार्थ मनु आणि याज्ञवल्क्य यासारख्या

स्मृतिकारांनी एकदा स्नान, दोन वेळा प्रार्थना व पंचमहायज्ञ[६४९] हे विधी करणे आवश्यक आहे असे सांगितले, तर निबंधकारांनी स्नानाची संख्या ब्राह्मणांसाठी तीन केली. त्याचप्रमाणे अत्रिसारख्या स्मृतिकारांनी संध्या करण्याची संख्या वाढवून तीन केली.. व्यासांनी गायत्री, सरस्वती आणि सावित्री या नावांनी अनुक्रमे सकाळी, दुपारी व संध्याकाळी एकूण तीन संध्या कराव्यात असे सांगितले आहे.[६५०]

## व्रते आणि उपवास

पुराणांनी व्रतांचा सिद्धांत मांडला होता. शंकरभट्टाच्या 'व्रतार्क' मध्ये ११३ व्रते सांगितली आहेत आणि त्यापैकी जवळजवळ ११० व्रते पुराणातील व्रतांवर आधारलेली आहेत. 'व्रतकौमुदि' ग्रंथामध्ये सांगितलेल्या १२८ व्रताबद्दल आणि 'व्रतराज[६५१]' ग्रंथामध्ये संग्रहित केलेल्या २०५ व्रताबद्दलही असेच म्हणावे लागेल. यादवनृपति महादेव व रामचंद्र यांच्या दरबारी असलेल्या हेमाद्रि नामक मंत्र्यांने सर्व व्रतांचा आणि उपवासांचा सारगंथ्र तयार केला आहे.[६५२] व्रतपालनामुळे प्रत्येक व्यक्तीला धार्मिक कार्यात भाग घेणे शक्य झाले. या कारणास्तव लोकांमध्ये व्रते फार प्रिय झाली. बदामीचा चालुक्य राजा विक्रमदित्य प्रथमच्या तिथी नसलेल्या हैदराबाद[६५३] ताम्रपटातील दान घेणारा ब्राह्मण हा चांद्रायण व्रताचे पालन करणारा होता. शिलाहार राजा गंड्डरादित्य याच्या शक संवत् १०३३ च्या ताळले[६५४] दानपत्रामधून पंचलागल आणि अग्निष्टिका या दोन व्रतांची नावे समजतात. पंचलागल व्रतामध्ये कठीण लाकडाचे पाच आणि सोन्याचे पाच असे दहा नांगर, दहा बैल आणि त्यांना नांगरता येईल एवढी जमीन यांचे दान देत असत. व्रतपालनाबरोबरच प्रायश्चित विधींनाही धर्मामध्ये फार महत्वाचे स्थान प्राप्त झाले होते. लघुसातातप, आपस्तंब आणि बृहद्यम यासारख्या स्मृतिकारांनी प्रायश्चिताबद्दल[६५५] सविस्तर चर्चा केली आहे.

## मूर्तीपूजा

या काळातील धार्मिक व्यवस्थेमध्ये वेगवेगळ्या देवतांच्या मूर्तीपूजनाला फार महत्त्वाचे स्थान होते. पुराणांमध्ये गौरव केलेल्या बहुतेक सर्व देवता लोकांमध्ये प्रिय झाल्या होत्या.[६५६] भिन्न भिन्न राजवंशांच्या कोरीव लेखांमध्ये आलेल्या निरनिराळ्या देवतांच्या उल्लेखावरून असे दिसते की, या काळातील प्रमुख देवता विष्णु व शिव यांच्यापैकी शिवाच्या वेगवेगळ्या रुपांची पूजा फार प्रिय होती.[६५७] मूर्तिपूजा पध्दतीमुळे निरनिराळ्या देवतांसाठी देवालये बांधण्यास प्रारंभ झाला. कालांतराने देवालये ही या काळात अस्तित्वात असलेल्या धार्मिक व्यवस्थेचा अविभाज्य अंग बनली. जरी बौद्ध आणि जैन धर्मियांचा देवाच्या अस्तित्वावर विश्वास नसला तरी त्यांना अनुक्रमे बुद्ध व तीर्थंकार यांचे पूजन व प्रार्थना करण्याकरिता सार्वजनिक पूजास्थानाची गरज भासू लागली. त्यामुळे त्यांनीही विहार, चैत्यालये आणि जिनालये बांधावयास प्रारंभ केला.

## देवालय

धर्मशास्त्रकार किंवा मनु हे मंदिरामध्ये स्थापन केलेल्या किंवा सार्वजनिक ठिकाणी स्थापलेल्या मुर्तिपूजा पद्धतीचा उल्लेख करीत नाहीत.[६५८] परंतु या काळातील मंदिर पूजा हे हिंदूच्या धार्मिक जीवनात विशेष अंग झाले होते. सार्वजनिक पूजास्थान किंवा प्रार्थना स्थळ म्हणून देवालयांना राष्ट्रीय जीवनात फार महत्वाचे स्थान होते. संबंधित कालखंडामध्ये मोठ्या प्रमाणावर मंदिरे बांधण्यात आली. वेगवेगळ्या राजवंशानी दिलेल्या कोरीव लेखांमध्ये मंदिरे व त्यामध्ये पूजल्या जाणाऱ्या देवतांचे उल्लेख मिळतात. राष्ट्रकूटांनी वेरूळच्या शैलगृहाबरोबर बांधीव मंदिरांना प्रोत्साहन दिले. राष्ट्रकूट राजा कृष्ण तिसरा याच्या कंधार लेखात बंकेश्वर, सागरेश्वर, तुडीगेश्वर, सोमनाथ, क्षेत्रपाल, कालप्रियनाथ इत्यादि मंदिरे बांधल्याची नोंद आहे. कल्याणीच्या चालुक्य राजांनी बांधलेल्या मंदिरामध्ये होट्टल येथील सोमेश्वर व सिद्धेश्वर ही मंदिरे या मंदिरामध्ये सापडलेल्या तिथीयुक्त शिलालेखांमुळे महत्त्वापूर्ण आहेत. यापैकी सोमेश्वर देवालयामध्ये ब्रह्मा, शिव व विष्णू यांची मंदिरे असून हे देवालय त्रिपुरूष किंवा त्रैपुरुष या नावाने ख्यात होते असे येथे मिळालेल्या राजा विक्रमादित्य सहावा याच्या २६ व्या शासन वर्षीच्या लेखाद्वारे कळते. त्याचप्रमाणे सिद्धेश्वर मंदिर रब्बेश्वर या नावाने प्रसिद्ध होते व ते वन्हीकुलाच्या अंमलाखाली असलेल्या व चालुक्यांचा मांडलिक असलेल्या सिद्धुगीने बांधले होते असे येथील लेखावरून कळते. हिप्पलगाव येथे प्राप्त झालेल्या चालुक्य विक्रमादित्य ६ वा याच्या विक्रम संवत् २४ च्या लेखामध्ये ब्रह्मा, शिव व विष्णू यांची मंदिरे बांधल्याचा उल्लेख आहे. यादव व शिलाहार राजांनीही बरीच मंदिरे बांधली. यादव वंशाची मंदिरे महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागामध्ये आढळतात. परंतु शिलाहारकालीन देवालये प्रामुख्याने उत्तर दक्षिण-कोकण व कोल्हापूर प्रदेशामध्येच आढळतात. कोरीव लेखांमध्ये दानासंदर्भात उल्लेखिलेल्या देवालयाखेरीज वेगवेगळ्या देवतांच्या प्रार्थना केलेल्या आढळतात. यादव आणि शिलाहार लेखांत विष्णू, कृष्ण, शिव, ब्रह्मा, शिव-पार्वती, लक्ष्मीनारायण, भवानी व गणेश या देवतांची त्यांच्या निरनिराळ्या नावाने केलेली स्तुती आढळते.[६५९] जैन मंदिरातील लेखांमध्ये जैन तीर्थकर किंवा जैन पंथ यांची स्तुती येते.

## पूजाविधी

देवतांची स्थापना करणे व त्यांची पूजा करणे या उद्देशाने प्रारंभी देवालये बांधली होती. कालांतराने त्यांना धार्मिक आणि सामाजिक जीवनामध्ये महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले. लोकांचे सर्व कार्यक्रम या भोवती केंद्रित झाले. देवालये बांधणे, त्यामध्ये मूर्तीची स्थापना करणे व देवालयाला देणग्या देणे ही पवित्र कृत्ये ठरली. वेगवेगळ्या प्रसंगी व वेगवेगळ्या उद्देशाने दाने दिली जात. देवाची पूजा हा या देवालयांमध्ये केला जाणारा महत्त्वाचा विधी होता. दिवसातून तीन वेळा म्हणजे सकाळ, दुपार व रात्री पूजाविधी होत असे (त्रिकालपूजा). संबंधित देवतेच्या पूजनासाठी वापरलेल्या साहित्याच्या

संख्येनुसार या पूजाविधीला पंचोपचार किंवा अष्टोपचार अशी नावे होती. शिलाहार नृपति रट्टराज याच्या शक संवत् ९३० च्या खारेपाटण ताम्रपटामध्ये अव्वेश्वर देवाच्या मंदिराच्या दुरूस्तीकरिता व पंचोपचार पूजेसाठी तीन गावे दिल्याचा उल्लेख आहे.[६६०] तर राजा गण्डरादित्य याच्या शक संवत् १०५८ च्या कोल्हापूर[६६१] लेखामध्ये व विजयादित्य याच्या १०७३ च्या बामणी[६६२] लेखामध्ये कवडेगोल्ल येथील बाजारातील मुद्गोडेमध्ये बांधलेल्या मंदिरातील पार्श्वनाथाच्या पूजेकरिता तसेच त्या देवळाच्या दुरूस्तीकरिता दान दिल्याचा उल्लेख आहे. वळवाड येथील पार्श्वनाथाच्या वस्तीतील देवाची अष्टोपचार पूजा, मंदिराची दुरूस्ती आणि मुनींना अन्नसंतर्पण याकरिताही काही जमीन, विशिष्ट मापाची फुलबाग व बारा चौरस हाताचे घर दान दिल्याचा त्यात उल्लेख आहे. काही लेखांमध्ये पूजेसाठी आवश्यक असलेले गंध, अक्षता, फुले, धूप, दीप, आणि नैवद्य यासारखे साहित्य देवालयाला पुरविण्यासाठी कायम स्वरुपाच्या देणग्या दिल्याचे सांगितले आहे. उदाहरणार्थ शके ११९५-११९९ या कालखंडातील पंढरपूर लेख[६६३] आणि सोमेश्वर देवाचा पैटण लेख[६६४] यामध्ये अनुक्रमे अक्षता आणि गंधाक्षता यासाठी दान दिल्याचे नमूद केले आहे. देवालयाला फुले पुरविण्यासाठी जमिनी व मळे दान देण्याची पद्धत होती. उदा. शिलाहार नृपति भोज द्वितीय याच्या शक संवत् ११०४ च्या कोल्हापूर[६६५] लेखामध्ये उमामहेश्वराच्या पूजेकरिता फुलांची बाग दान दिल्याचे सांगितले आहे. शं. गो. तुळपुळे यांनी संपादित केलेल्या विविध लेखातून या विषयीच्या नोंदी मिळतात.[६६६] यादव सेनापती खोलेश्वर याच्या शके ११५० च्या आंबे लेखातही बागा किंवा मळे दान दिल्याचा उल्लेख मिळतो. त्याचप्रमाणे फुले, माळा, धूप, दीप आणि नंदादीप किंवा दीपमाळा लावण्यासाठी तेल दान देण्याची प्रथा होती असे दिसते. उदाहरणार्थ गंग उदयादित्य याच्या शके १०६६ च्या आंबे लेखात फुले व त्यांची एक माळ भूचरनाथला मिळावी अशी व्यवस्था केलेली दिसते. खोलेश्वराच्या शके ११५० च्या आंबे लेखामध्ये बाजारातील प्रत्येक मळेवाल्याला माळा आणि फुले देण्यास सांगितले आहे. शके ११९५-११९९ या कालातील पंढरपूर शिलालेखामध्ये विठ्ठलदेवाला पुष्पमाळा दिल्याचे नमूद केले आहे. यादव राजा कृष्ण याच्या शके ११७२ च्या तासगाव ताम्रपटानुसार त्रिकाल धूपारती करण्यासाठी दान दिले होतें. विजयनगरचा राजा संगम हरिहर द्वितीय याच्या शके १३२४ च्या वेळूस लेखामध्ये देवाला धूप दाखविण्याकरिता टंक दान दिल्याची नोंद मिळते. याच वंशाचा राजा देवराय प्रथम याच्या शके १३३५ च्या बांदोडे लेखानुसार महालक्ष्मीच्या गंध-धूपाकरिता दान दिले होते. अखंडज्योत लावण्यासाठी सहा टंक दान दिल्याचा उल्लेख वेळूस लेखात मिळतो, तर बांदोडे लेखामध्ये दीपमाळा लावण्यासाठी दिव्याच्या वाती व दिवे यासाठी दान दिल्याचे नमूद केले आहे. काही वेळेस तेलाचे व्यापारी व तेलघाणे यांच्याकडून विशिष्ट माप भरून तेल या उद्देशाने द्यावे असा करार करण्यात येई असे गंग उदयादित्याच्या शके १०६६ च्या आंबे लेखातील उल्लेखावरून समजते. या लेखाप्रमाणे प्रत्येक तेलघाण्याने देवळासाठी तेल द्यावयाचे

असे यादव राजा सिंघण याच्या शके ११२९ च्या पाटण लेखामध्येही असाच उल्लेख मिळतो. शिलाहार राजा विजयादित्य याच्या शक संवत् १०६५ च्या मिरज[६६७] लेखानुसार गाडीभर तेलाच्या ओझ्यावर एक मण तेल येथील व्यापाऱ्यांनी माधवेश्वराच्या पूजेकरिता द्यावयाचे होते. तसेच वर उल्लेखिलेल्या संगम देवराय याने बांदोडे[६६८] लेखामध्ये नागनाथच्या देवळाकरिता तेल दान दिल्याचे नमूद केले आहे. देवाला नैवेद्य देण्याकरिताही कायम स्वरूपाची दाने दिली जात. कलचुरी राजा विज्जण याच्या शके १०८६ च्या तेर लेखानुसार देवाच्या नैवेद्याकरिता ४ आणि २३ निवर्तने करमुक्त जमीन दान दिली होती. तसेच यादव कृष्ण याच्या शके ११७२ च्या तासगाव ताम्रपटामध्ये कलिदेवाच्या अष्टांगभोगासाठी मंजरवाटक गाव दान दिले होते. या लेखानुसार कलिदेवास नित्य पंचामृत, त्रिकाळ धूपारती, दिव्याची वात, नंदादीप, फुले तसेच नैवेद्य दाखविण्याचे काम ब्राह्मणांकडे होते. काही लेखांमध्ये वेगवेगळ्या देवतांना दाखविण्यात येणाऱ्या नैवेद्याच्या पदार्थांचे सविस्तर वर्णन मिळते. उदाहरणार्थ विजयनगरचा राजा संगम देवराय प्रथम याच्या शके १३३३ च्या बांदोडे लेखामध्ये नागनाथ देव व महालक्ष्मी यांना भात, वडे, घाऱ्या, भाज्या, तूप आणि तांबूल अर्पण करण्यासाठी दाने दिल्याचे नमूद केले आहे. काही लेखांमध्ये नैवेद्याचा उल्लेख बोणे म्हणून केला आहे. उदाहरणार्थ शके ११९५-९९ या काळातील पंढरपूर लेखामध्ये सिद्धनाथ देवाच्या सातीबोणेचा उल्लेख मिळतो. यादव रामचंद्र याच्या शके १२०१ च्या उन्हकदेव लेखामध्ये ग्रामदेवतेला दिलेल्या बोण्याचा उल्लेख आहे. यादव रामचंद्र याच्या शके १२२७ च्या वेळापूर लेखानुसार काही लोकांनी दक्षिणावर्तिगुरु व महात्मे यांना बोणे व पुनीत बोणे देण्यासाठी दाने दिली होती. सोमेश्वर देवाच्या पैठण लेखानुसार गुरवाकडेवर्णत्रय बोणेकडे लक्ष देण्याचे काम होते. तुळपुळे यांच्या मताप्रमाणे या ठिकाणी वर्णत्रयबोणे हा वाक्प्रचार 'तीन जातींनी अर्पण केलेला नैवेद्य' या अर्थाने वापरला आहे. या काळात देवाला पान-पोकळ अर्पण करण्याचीही प्रथा होती आणि यासाठी दाने देत असत. शके १३१७ च्या मठगाव लेखानुसार विडा अर्पण करण्यासाठी ६ टंकांची देणगी दिली होती. विजयनगरचा राजा संगम हरिहर द्वितीय याच्या शके १३२४ च्या वेळूस लेखामध्ये वेंळूस येथील रवळनाथाला पान, पोफळी अर्पण करण्यासाठी देणग्या दिल्या होत्या अशी माहिती मिळते. एकादशीच्या उपवासाच्या दिवशी देवाला फळांची टोपली अर्पण करण्याचीही प्रथा असल्याचे सोमेश्वरदेवाच्या पैठण लेखामधील उल्लेखावरून समजते.

रोजचे धार्मिक विधी पार पाडण्याकरिता दिलेल्या दानांव्यतिरिक्त वेगवेगळ्या विशेष प्रसंगानिमित्त करावयाच्या खास विधींसाठीही दाने देण्याची पद्धत होती. शिलाहार नृपति अपरादित्य द्वितीय याच्या शक संवत् ११०७ च्या ठाणे[६६९] लेखानुसार चैत्रिक, पवित्रिक, शिवरात्रि, दक्षिणायन आणि उत्तरायण यासारख्या पंचपर्व प्रसंगीच्या सोमनाथाच्या पूजेसाठी दान दिले होते. या पंचपर्वांपैकी पवित्रिक पर्व पवित्रारोपण व्रत या नावानेही प्रसिद्ध होते. या प्रसंगी आपल्या इष्ट देवतेला पोवळे (पवित्र) अर्पण

करीत. वेगवेगळ्या देवतांसाठी वेगवेगळ्या तिथी पोवळे अर्पण करण्यासाठी पवित्र समजल्या जात. उदाहरणार्थ शंकराला पोवळे अर्पण करण्यासाठी कोणत्याही पक्षातील अष्टमी किंवा चतुर्दशी पवित्र मानीत. परंतु अश्विन महिन्यातील ही तिथी अतिउत्तम तर श्रावण महिन्यातील मध्यम व भाद्रपद महिन्यातील कनिष्ठ समजत. शके १२२३ च्या पंढरपूर लेखामध्ये चैत्रारोपण व वसंतपूजेचा उल्लेख आहे.[६७०] अशा प्रकारच्या काही उत्सवाचे अस्तित्व अल्बेरुणीच्या इतिवृत्तावरून कळते. त्याच्या वर्णनाप्रमाणे हिंदोळी उत्सव[६७१] चैत्र महिन्यात साजरा करीत. या उत्सवामध्ये वासुदेवाला पाळण्यात ठेवीत आणि झोके देत. अनंतदेव आपल्या 'स्मृतिकौस्तुभ'[६७२] या ग्रंथामध्ये दमणारोपण विधी चैत्र महिन्यात, तर पवित्रारोपण विधी श्रावण महिन्यात करावा असे सांगतात. येथे सांगितलेला दमणारोपण विधी हा सण वासुदेवाचा असावा आणि पवित्रारोपण हा भगवान शिवाचा सण असावा. याशिवाय काही विशिष्ट प्रसंगी व विशिष्ट हेतू पूर्तीसाठी होमहवन करण्याची व होमानंतर दान देण्याचीही पद्धत होती. काही प्रसंगी लक्ष होमही करीत. उदाहरणार्थ यादव राजा रामचंद्र याच्या शके १२२७ च्या वेळापूर[६७३] लेखांतील वर्णनाप्रमाणे वटेश्वराच्या मूळच्याच पूजास्थानावर भव्य असा प्रासाद उभारला व नंतर स्थापलेल्या मूर्तीच्या मांडणीत एकसूत्रता आणली. तसेच कलश प्रतिष्ठापना केली. याप्रसंगी देवळावर ध्वज लावला. यावेळी होमहवन, ब्राह्मणभोजन, षड्दक्षिणांचे दान झाले आणि देवासाठी काही जमीनही दान देण्यात आली. त्याचप्रमाणे गोपाल राठोड याने आपल्या नातेवाईकांच्या कल्याणार्थ लक्ष होम केले व त्या होमाच्या पूर्तीनंतर दाने दिली अशी माहिती यादव राजा कृष्ण याच्या शके ११८० च्या कान्हेगाव[६७४] लेखामध्ये मिळते. मोठमोठ्या देवालयांना जोडून असणाऱ्या सत्रांमध्ये राहणाऱ्या लोकांच्या व ब्राह्मणांच्या भोजनासाठी दाने देण्याची प्रथा होती. अशा प्रकारच्या सत्रांचा उल्लेख यादव सेनापती खोलेश्वर याच्या शके ११५० च्या आंबे लेखामध्ये व यादव राजा कृष्ण याच्या शके ११७२ च्या तासगाव[६७५] लेखामध्ये मिळतो.

**रंगभोग**

शिलाहार राजा विजयादित्य याच्या शक संवत् १०६५-६६ च्या मिरज[६७६] लेखामध्ये माधवेश्वराच्या रंगभोगाकरिता देणगी दिल्याचे सांगितले आहे. मिराशींच्या मते रंगभोग ही संज्ञा देवाच्या करमणुकीसाठी केलेल्या संगीत, नृत्य, वाद्यवृंद आणि नाटके यासारख्या कार्यक्रमांचा निर्देश करते.[६७७] आळतेकरांच्या मते ही संज्ञा वार्षिक यात्रा किंवा यासारख्या इतर प्रसंगी केलेल्या पौराणिक नाटके वगैरे सारख्या कार्यक्रमांचा निर्देश करते.[६७८] बदामीचा चालुक्य राजा विजयादित्याच्या आलमपूर[६७९] प्रशस्तीनुसार राजाने देवालयांमध्ये नियमितपणे संगीत मैफिली करण्यासाठी देणगी दिली होती. त्याचा पुत्र विक्रमादित्य याच्या पट्टदकल लेखामध्ये सांगितल्याप्रमाणे नंतर त्याची राणी लोकमहादेवी हिने राजा विजयादित्याने गायकांसाठी दिलेले दान कायम केले व

चालुक्य राज्यात नियमितपणे संगीत सभा भरवण्याच्या नियमाचे पालन होईल आणि नेहमीसाठी कायम राहील अशी व्यवस्था केली. यावरून राजा विजयादित्याने त्याच्या पूर्ण राज्यामधील देवालयामध्ये नियमितपणे संगीत सभा व्हाव्यात अशी व्यवस्था केली होती हे स्पष्ट होते. चालुक्य मांडलिक भोगशक्ति याच्या कलचुरी संवताच्या ४६१ व्या वर्षीच्या अंजनेरी[६८०] लेखामध्ये जयपूर येथील नारायण मंदिरामध्ये वाद्यसंगीतयुक्त असे नृत्य, गायन व संगीताचे कार्यक्रम करण्यासाठी दान दिल्याचा उल्लेख आहे. याशिवाय वराहमिहिराने देवतांच्या अभिषेक विधींचे जे वर्णन दिले आहे त्यावरूनही मूर्तीच्या पूजाविधीला वाद्यसंगीत, नृत्य आणि संगीत यांची साथ आवश्यक होती असे दिसते.[६८१] यादव राजा सिंघण आणि जैत्रपाल यांच्या इ. स. १२९० च्या वाफळे[६८२] लेखामध्ये शंखपुरक, काहालिक, मृदंगवादक, दुंदुभिवादक, जयघंटावादक आणि चंदैल यांना दाने दिल्याचा उल्लेख आहे. हे वाद्यवादक सकाळी देवाला निद्रेतून उठविण्यासाठी तसेच देवाच्या पूजाविधिच्या वेळेस वाद्ये वाजवीत असावेत. काही देवालयामध्ये ही प्रथा अजूनही अस्तित्वात आहे. विजयनगरचा नृपति संगम हरिहर द्वितीय याच्या शके १३२४ च्या वेळूस[६८३] लेखातील भाविणीच्या उल्लेखावरून देवाच्या करमणुकीकरिता देवालयांमध्ये स्त्री नर्तिकेची नेमणूक करीत असत असे दिसते. शिलाहार राजा रट्टराज याच्या शक संवत् ९३० च्या खारेपाटण[६८४] लेखामधील देवदासीचा उल्लेखही या प्रथेचे अस्तित्व दर्शवितो. महाराष्ट्रातील देवालयांमध्ये वाद्यवादक त्याचप्रमाणे नर्तक यांची नियुक्ती होत असे याची निलंगा, होट्टल, धर्मपुरी आणि मार्कंडी येथील मंदिरांच्या भिंतीवर असलेल्या वाद्यवादक आणि नर्तकांच्या शिल्पांवरूनही खात्री पटते.

देवालयांकडे देवाचा महाल ह्या दृष्टीने पाहत असत. तेथील कामासाठी वेगवेगळे नोकरही असत. याप्रमाणे वाद्यवादक, नर्तक, गायक आणि पुजारी इत्यादि व्यतिरिक्त इतर क्षेत्राची व्यवस्था पहाणारा, निरनिराळ्या समारंभाचे आयोजन करणारा अधिकारी-वर्गही देवालयात असे. मंदिरातील देवाच्या पूजेचे काम सामान्यतः ब्राह्मणांकडेच असे. देवालयातील बऱ्याच कामांची व्यवस्था काही ठिकाणी ज्या गुरवाकडे सोपविलेली असे तो गुरव याच काळात उदयाला आलेला दिसतो. आळतेकरांच्या म्हणण्याप्रमाणे गुरव हा मूलतः आर्य नव्हता.[६८५] यादव राजांच्या लेखांमध्ये गुरवाचा उल्लेख निरनिराळ्या संदर्भात आलेला आहे. उदाहरणार्थ यादव सेनापती खोलेश्वर याच्या शके ११५० च्या आंबे[६८६] लेखानुसार सकलेश्वर मंदिरातील गुरवाला अन्नछत्रासाठी सात चौथ (धान्य) व सण प्रसंगी चार देशनामक शासन विभागातील सैनिक छावणीतून मासी पाव कवडा मिळत होता. यादव राजा कृष्ण याच्या शके ११७२ च्या तासगांव[६८७] ताम्रपटानुसार गुरवाची पत्नी देवालयाची व्यवस्था पाहणारी तर गुरव क्षेत्रव्यवस्था पहात असे. सोमेश्वर देवाच्या पैठण[६८८] लेखात सांगितल्याप्रमाणे देवालयाची झाडलोट करण्यासाठी गुरवाला एक गद्याण मिळत असे तर देवाचे स्नान, गंधाक्षता, नैवेद्य, एकादशीचा नैवेद्य आणि देवाची शय्या तयार करणे यासाठी त्याला एक पूर्ण दाम मिळत असे. काही ठिकाणी गुरव हा देवालयाच्या पुजाऱ्याहून वेगळा होता असा पुरावा मिळतो.[६८९] विजयनगरचा राजा संगम देवराय प्रथम याच्या काळच्या शके १३३५ च्या वांदोडे

लेखामध्ये महालक्ष्मीच्या पुजाऱ्यास आणि देवारियास देणग्या दिल्याचा उल्लेख मिळतो. तुळपुळे यांच्या मते देवारिया म्हणजे पुजारी किंवा गुरव होय. देवालयांमध्ये पुजारी, गुरव यांच्याखेरीज तेली, कुंभार, माळी, धोबी यांचीही नेमणूक होत असे असा पुरावा शिलाहार राजा रट्टराज याच्या शक संवत् ९३० च्या खारेपाटण लेखामध्ये मिळतो.[६९०] हे सर्व लोक बहुतेक देवालयाच्या आवारांत राहत असावेत. बऱ्याच देवालयांमध्ये गरीब व अतिथी यांना भोजन देण्यासाठी अन्नछत्र असे.[६९१] अवुझेद ह्या अन्नछत्रांचा उल्लेख प्रवाशांच्या धर्मशाळा असा करतो.[६९२]

**दान कल्पना :** धार्मिक पुण्य मिळविण्याच्या दृष्टीने दान करणे हा फारच परिणामकारक मार्ग समजला जात असे. मनुस्मृति आणि इतर प्राचीन ग्रंथामध्ये निरनिराळ्या युगांमध्ये निरनिराळ्या प्रकाराची कार्ये धार्मिक पुण्य संपादन करण्यासाठी सांगितली आहेत. या ग्रंथाप्रमाणे तप आणि उग्र तपश्चर्या ही कृतयुगातील साधने आहेत.[६९३] तर ज्ञान लालसा आणि सत्य यांना त्रेतायुगात कमालीचे महत्त्व होते. त्याचप्रमाणे द्वापार युगात यज्ञ विधींनी फार महत्त्वाची कामगिरी केली, तर कलियुगामध्ये दान देण्याला अतिशय महत्त्व होते. विशेष म्हणजे या काळातही थोड्या फार प्रमाणात या सर्व साधनांचा उपयोग धार्मिक पुण्य मिळविण्यासाठी केला जात असे. यावेळी निरनिराळ्या प्रतिज्ञा व व्रतांच्या पालनासाठी कडक नियमांचे पालन करणे आवश्यक होते. शिलाहार राजांच्या काही कोरीव लेखांमध्ये[६९४] उल्लेखिलेले शैव आचार्य व तपस्वी, त्याचप्रमाणे इ. स. ९ व्या शतकामध्ये दक्षिण भारतामध्ये उग्र तपश्चर्या करणाऱ्या तपस्व्याचा सुलैमानने[६९५] केलेला उल्लेखही हेच सांगतो. शंकराचार्यांनी मांडलेले तत्त्वज्ञानविषयक नवीन सिद्धान्तही लोकांमध्ये वसत असलेल्या ज्ञानलालसेचा पुरावा देतात. जरी श्रौत यज्ञ विधींची जागा स्मार्त विधींनी घेतली असली तरी काही विधी देवांसाठी अग्निमध्ये उपहार अर्पण केल्याशिवाय पूर्ण होत नसत. परंतु सर्वसाधारण माणसाची दानधर्माच्या परिणामकारकतेवर जास्त श्रद्धा होती.[६९६] यादव राजा भिल्लम तृतीय याच्या शके ९४८ च्या कळस बुद्रुक[६९७] ताम्रपटातील वर्णनाप्रमाणे यादवांच्या मांडलिकाने पराशर, दस, कुत्स, अंगिरस, गौतम, मेरू आणि याज्ञवल्क्य यांची वचने लक्षात ठेऊन पितरांना उदक दिले, सूर्याला अर्घ्य दिले, शंभुचे पूजन केले व नंतर ब्राह्मणांना कळस गाव दान दिले. यावरूनही धार्मिक पुण्य संपादन करण्याकरिता दान देणे हे परिणामकारक साधन मानले जात होते हेच दिसून येते. सर्व संपत्ती जमिनीतून उत्पन्न होत असल्यामुळे जमीनदान अतिशय पुण्यप्रद समजत.[६९८] कोरीव लेखांमधील आशीर्वादात्मक श्लोकांमध्ये दानकर्मावर जास्त भर दिला आहे आणि शापात्मक श्लोकांमध्ये दानभंग केल्यास होणाऱ्या शिक्षा सांगणारी वचने स्मृति आणि पुराणांमध्ये घेतलेली आहेत.[६९९] त्यामुळे असे म्हणता येईल की, ही दाने स्मृति आणि पुराणामध्ये सांगितल्याप्रमाणेच दिली असली पाहिजेत. तसेच बहुतेक सर्व लेखांमध्ये उल्लेखिलेली या काळातील दाने स्मृति व पुराणांमध्ये सांगितलेल्या शुभ व विशिष्ट प्रसंगी दिलेली आहेत.

**दानाचे स्वरुप** : दाने ही द्रव्य, गावे, जमिनी, वस्तू अशा स्वरूपात देत. शिलाहार राजा अपरादित्य द्वितीय याच्या शक संवत् ११०७ च्या ठाणे[७००] लेखामध्ये राजाने वाटिकेच्या उत्पन्नातील चार द्रम्म आणि भात शेतीच्या उत्पन्नापैकी चोवीस द्रम्म सोमनाथाच्या पूजेकरिता दिले होते असे वर्णन आहे. शके ११९५ ते ११९९ या कालखंडातील पंढरपूर[७०१] शिलालेखामध्ये बरीच दाने गद्याणांमध्ये दिल्याचा उल्लेख आहे. शिलाहार राजा रट्टराज याच्या शक संवत् ९३० च्या खारेपाटण[७०२] लेखामध्ये राजाने अब्बेश्वर देवाच्या पूजेकरिता, मंदिराच्या दुरूस्तीकरिता, संन्यासी आणि त्यांचे शिष्य यांचे अन्न व वस्त्रांकरिता तसेच विद्वान व अतिथी यांच्या उपयोगांकरिता तीन गावे आपला गुरू, मत्तमथूर या शैव पंथाच्या कर्करोणी शाखेचा आचार्य अंभोजशंभु यांचा शिष्य आत्रेय याला दान दिल्याचे सांगितले आहे. शिलाहार राजा सोमेश्वर याच्या शक संवत् ११८२ च्या चांजे[७०३] लेखानुसार स्थालकनगरातील उत्तरेश्वर देवाला काही वाटिका व काही द्रम्म दान दिले होते. यादव राजा कृष्ण याचा शके ११७८ चा कवलापूर लेख[७०४] कवलापूरच्या पार्श्वनाथाच्या मंदिराला शेत दान दिल्याची माहिती देतो. काही वेळेस विशिष्ट उत्पन्नाचा काही भाग दान दिला जात असे. उदाहरणार्थ यादव राजा सिंघण याच्या शके ११२९ च्या पाटण[७०५] लेखानुसार नवीन तेलघाण्यांनी येथील मठाला मोठ्या प्रमाणात व इतर तेलघाण्यांनी काही डाव (चमचा) तेल दान म्हणून द्यावयाचे होते. गंग उदयादित्य याच्या शके १०६६ च्या आंबे[७०६] लेखामध्ये नामदेवाच्या उपाध्यायाला प्रत्येक तेलघाण्याने मोठा डावभर तेल देणगी म्हणून द्यावयाचे होते. सोमश्वर देवाच्या पैठण लेखामध्ये देवाला उंची वस्त्र (शेला) दान दिल्याचा उल्लेख आहे.[७०७] यादव सेनापती खोलेश्वर याच्या शके ११५० चा आंबे[७०८] लेख गवताच्या पेंडीचेही दान दिल्याचे सांगतो. शिलाहार राजा विजयादित्य याच्या शक संवत् १०६५-१०६६ च्या मिरज[७०९] लेखातील वर्णनाप्रमाणे येथे जमलेल्या व्यापाऱ्यांनी येथील माधवेश्वराला बाजारात वस्तू विकणाऱ्यांकडून वस्तूंवरील विक्रीकराच्यारूपात वसूल केलेल्या वस्तूंचे दान दिले होते. याशिवाय सोनेसुद्धा वेगवेगळ्या प्रकारे दान देण्याची पद्धत होती. चालुक्य राजा विजयादित्य याने आलमपूर[७१०] प्रशस्तीप्रमाणे स्वतःची स्वतंत्रपणे व आपल्या राणीबरोबर संयुक्तपणे सुवर्णतुला करून ते सोने दान दिले होते. या समारंभाला तुलापुरूष महादान असे म्हणत. अशा प्रकारचा तुलापुरूष महादान समारंभ राष्ट्रकूट राजा दंतिदुर्ग,[७११] अमोघवर्ष,[७१२] गोविंद तृतीय,[७१३] इंद्रतृतीय[७१४] आणि गोविंद चतुर्थ[७१५] यांनीही केला होता. या महादानाचा उल्लेख मत्स्यपुराण आणि हेमाद्रीच्या दानखंडात मिळतो. मत्स्यपुराणामध्ये हिरण्यगर्भ महादानाचे महत्त्व दिलेले आहे.[७१६] राष्ट्रकूट राजा दंतिदुर्ग[७१७] व गोविंद चतुर्थ[७१८] यांनीही हे महादान केले होते असा समज आहे. कल्याणीचा चालुक्य नृपति विक्रमादित्य सहावा याने इ. स. १०९२ मध्ये विश्वाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या सुवर्णविश्व चक्राचा अंतर्भाव असलेले महादान केले होते.[७१९]

**दाने आणि जनकल्याण** : तलाव बांधणे, विहिरी खोदणे, देवालये बांधणे, गरीबांसाठी घरे बांधणे, शाळा बांधणे, बागा तयार करणे इत्यादी जनकल्याणाच्या

कार्यासाठीही दाने देण्याची पद्धत होती. या काळातील स्मृति ग्रंथामध्ये या प्रकारच्या कामांना पूर्तकर्म असे म्हटले आहे.[७२०] तत्कालीन प्रमाणभूत स्मृतिंमध्ये इष्ट आणि पूर्त कर्माने पुण्यप्राप्ती होते असे सांगितले आहे. यापैकी इष्ट म्हणजे वैदिक यज्ञयाग होत. या कालात जनता तसेच राजेही पूर्त कर्मे अणि दानधर्मादि पुण्यकर्मे करून पुण्यार्जन करताना दिसतात. उदाहरणार्थ बदामीचा चालुक्य राजा विजयदित्य याने तलाव खोदले, देवालये बांधली आणि त्याच्या पूर्ण राज्यासाठी सर्व मंदिरामध्ये नियमितपणे संगीत सभांचे आयोजन करण्यासाठी कायम स्वरूपाची दाने दिली.[७२१] भोगशक्तीच्या कलचुरी संवत् ४६१ च्या अंजनेरी[७२२] ताम्रपटांनुसार भोगशक्तीने नारायण मंदिराला तीन ग्रामे दान दिली होती. या गावांचे उत्पन्न या देवालयाला जोडून असलेले अन्नछत्र चालू ठेवण्यासाठी आणि मंदिरामध्ये नृत्य, संगीत, गायन सभा भरविण्यासाठी उपयोगात आणावयाचे होते. वेरूळ येथील प्रसिद्ध कैलास मंदिर राष्ट्रकूट शासनकालात कोरले गेले.[७२३] शिलाहार राजे, त्यांचे मंत्री आणि सामान्य लोक यांनी बरीच देवालये बांधली[७२४] आणि देवांच्या पूजेसाठी, मंदिरांना-मठांना जोडून असलेली अन्नछत्रे, संन्यासी व त्यांचे शिष्य, विद्वान तसेच अतिथी यांच्या सोयीसाठी दाने दिली. शिलाहार नृपति गण्डरादित्याने शक संवत् १०३३ च्या ताळले[७२५] लेखातील वर्णनाप्रमाणे इरुकडी येथे गण्डसागर नामक तलाव खोदला. शिलाहार केशिदेव याच्या शक संवत् ११३१ च्या अक्षी[७२६] लेखात सांगितल्याप्रमाणे त्याच्या महाप्रधानाने तलाव किंवा विहिर खोदली होती. यादव राजेही त्यांच्या दान कार्यासाठी प्रसिद्ध होते. राजे आणि त्यांच्या राण्या. सेनापती, मंत्री, मांडलिक इत्यादिंनीही देवळे बांधली, दुरूस्त केली आणि मंदिरांच्या, विद्यार्थ्यांच्या आणि धर्मगुरुंच्या निर्वाहार्थ उदाहरणे देणग्या दिल्या.[७२७]

**शिक्षण आणि देणग्या** : खास शिक्षणाच्या उद्देशानेही देणग्या देण्याची पद्धत अस्तित्वात होती. उदाहरणार्थ यादव राजा सिंघण याच्या दरबारी असलेल्या चांगदेव या मुख्य ज्योतिषाने पाटण येथे बांधलेल्या विद्यालयाला निकुंभवंशीय सोईदेव व हेमाद्रि देव यांनी काही जमीन व इतर काही उत्पन्न देणगी म्हणून दिल्याची माहिती यादव राजा सिंघण याच्या शके ११२८ (९ ऑगस्ट १२०७) च्या पाटण लेखामध्ये मिळते.[७२८] हे दान सर्व लोकांच्या उपस्थितीत दिले होते. त्याचप्रमाणे येथे प्रवासी, विद्वान आणि गरजू लोकांना भोजन देण्याचाही प्रबंध केला होता. तसेच धर्मशिक्षक व इतर शिक्षकांनाही देणग्या दिल्या होत्या.[७२९]

**यात्रा** : या काळातील धार्मिक जीवनात पवित्र स्थळांना भेटी देणे या कल्पनेला बरेच महत्त्वाचे स्थान होते. स्मृति आणि पुराणे यामध्ये पवित्र स्थळांच्या भेटीला फार महत्त्व दिले आहे. त्यामुळे लोकांमध्येही ही कल्पना फार प्रिय झाली होती. पवित्र स्थानांच्या यात्रा करणे हे वैदिक यज्ञ करण्याइतकेच पुण्यकारक असल्याचे महाभारतामध्ये सांगितले आहे.[७३०] बहुतेक सर्व पुराणांमध्ये तीर्थस्थानांची मोठी यादी दिली आहे.[७३१] त्यापैकी बऱ्याच यादींमध्ये प्रयाग, वाराणसी आणि गया या तीर्थांचा आलेला उल्लेख या स्थानांना प्राप्त झालेले धार्मिक महात्म्य व या स्थानांची लोकप्रियता दर्शवितो.

उत्किर्ण लेखांमधील पुराव्यांवरून या प्रथेची लोकप्रियता लक्षात येते. राष्ट्रकूट राजा दंतिदुर्ग हिरण्यगर्भ हा महादान समारंभासाठी[७३२] उज्जैन येथे गेला होता. शिलाहार राजा नागार्जून याच्या शक संवत् ९६१ च्या ठाणे ताम्रपटात राजा अरिकेसरी याच्या सोमनाथ यात्रेचा उल्लेख आहे.[७३३] राजे लोक तीर्थस्थानाचेही दान देत असत. असे दान बहुधा त्या तीर्थाची योग्य ती व्यवस्था ठेवण्याचे दृष्टीने देत असावेत. उदाहरणार्थ चालुक्य राजा विष्णुवर्धन याच्या शके ५३९ च्या सातारा[७३४] लेखामध्ये श्रीनीलयभोगमध्ये असलेले आलंदतीर्थ ब्राह्मणांना दान दिल्याचे सांगितले आहे. त्याचप्रमाणे विष्णुकुंडीन राजा माधववर्मन याच्या खानापूर[७३५] लेखावरून इतर गावांबरोबर वकतीर्थ, तम्बतीर्थ आणि कदंबतीर्थ या तीर्थांचे दान दिल्याचेही ज्ञात आहे. शिलाहार राजा केशिदेव याच्या शक संवत् ११२५ च्या माण्डवी[७३६] दानपत्रानुसार मांडवली तीर्थाचे ठिकाणी असलेल्या मंदिराच्या व्यवस्थेकरिता दान दिले होते. मोठ्या आणि प्रसिद्ध तीर्थस्थानांशिवाय काही लहान तीर्थेही अस्तित्वात होती. उदाहरणार्थ सिंद आदित्यवर्मन याच्या अपूर्ण लेखांमध्ये[७३७] रामतीर्थिका या स्थळाचा उल्लेख आहे. या स्थलनामाच्या शेवटी आलेला तीर्थिका हा शब्द लहानसे तीर्थ असावे असे सुचवितो. त्यामुळे हे ८७ गावांचा समावेश असलेल्या शासन विभागाचे प्रमुख स्थान असावे. काही ठिकाणी गणेश वगैरे देवतांची मंदिरे असल्यामुळे तर काही ठिकाणी देवतांची स्वयंभूस्थाने असल्यामुळे त्यांना तीर्थाचा दर्जा प्राप्त झाला होता.[७३८] सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांच्या म्हणण्याप्रमाणे अशी तीर्थस्थाने हिमालयाच्या परिसरात असलेल्या नेपाळ, कांग्रा, स्वात प्रदेश इत्यादि प्रदेशात आढळतात.

## निरनिराळे धर्मपंथ

हिंदू धर्मातील वैष्णव व शैव या दोन प्रमुख पंथांनी या काळापर्यंत बरीच प्रगती केली होती आणि या दोन्ही पंथांच्या प्रमुख देवतांची वेगवेगळ्या स्वरूपात आणि वेगवेगळ्या नावांनी पूजा केली जात असे. याशिवाय पाशुपत संप्रदायाशी संबंधित असलेल्या शाक्त संप्रदायाचीही बरीच प्रगती झाली होती. या पंथाशिवाय बौद्ध आणि जैन धर्मही अस्तित्वात होते आणि या सर्व धर्म पंथाबरोबर प्राचीन (aboriginal) देवतांची पूजा करण्याचीही प्रथा अस्तित्वात होती.

**वैष्णव धर्म** : या काळातील वैष्णव धर्मामध्ये विष्णू ही वैदिक देवता, विश्वाचा आणि तत्त्वज्ञानाचा अधिष्ठाता नारायण, ऐतिहासिक देव वासुदेव आणि गवळ्यांचा परमेश्वर वासुदेव कृष्ण अशा वेगवेगळ्या देवतांचे पूजन करणाऱ्या किंवा आराध्य आणि सर्वश्रेष्ठ दैवत मानणाऱ्या चार विचारधारांचे मिश्रण झाले होते असे दिसते. यापैकी जुन्या पंचरात्र सिद्धांतावर आधारित असलेला वासुदेव पंथ फार प्रिय होता आणि त्याचे उपासक वासुदेव या मुख्य चैतन्यतत्त्वाची मोठ्या भक्तिभावाने पूजा करीत. परंतु त्यांना गोपालकृष्ण हे प्रमुख चैतन्यतत्व मान्य नव्हते. पंचरात्र संहितांपैकी

सात्वत संहिता ही नारायण हे प्रमुख तत्त्व असल्याचे सांगते आणि त्या शाश्वत चैतन्याची भाक्ती करण्याच्या तीन मार्गांचाही उल्लेख करते. या. संहितेप्रमाणे ज्या सर्वश्रेष्ठ चैतन्याला सर्वत्र हात, पाय, नेत्र आहेत आणि ज्याच्या ठिकाणी सहा गुणतत्त्वे आहेत ते सर्वोच्च होय. याशिवाय या सर्वश्रेष्ठ चैतन्याची तीन रूपे किंवा व्यूह आहेत. या तीन रुपांपैकी प्रत्येक रुपाचे ज्ञान व इतर गुण हे दुसऱ्या रुपापेक्षा भिन्न आहेत.[७३९] हे प्रत्येक रूप इच्छित वर सहजतेने प्रदान करते. या चतुरुप चैतन्याची भक्ती किंवा पूजा करणारे उपासक अमरकोश या प्रसिद्ध ग्रंथाचा लेखक अमर याच्याकाळी अस्तित्वात होते असे या ग्रंथात केलेल्या वर्णनावरून सिद्ध होते. वासुदेव कृष्ण याच्या पित्याचे नाव दिल्यानंतर ह्या लेखकाने संकर्षण व नंतर अनुक्रमाने अनिरुद्ध आणि प्रद्युम्न ह्या नावाचा उल्लेख केलेला आहे.[७४०] या पंथाचे उपासक"भागवत" या नावाने ओळखले जात. वराहमिहिर निरनिराळ्या देवतांच्या स्थापनेसाठी योग्य अशा उपाध्यायांच्या वर्णनामध्ये विष्णूच्या स्थापनेसाठी भागवत पंथीय उपाध्याय असावा असे सांगतो.[७४१] यावरून वराहमिहिराच्या वेळेपर्यंत भागवत हे विष्णूचे विशेष उपासक म्हणून ओळखले जावू लागले होते असे दिसते. शंकराचार्यांनी केलेल्या वर्णनानुसार भागवत हे वासुदेव या सर्वोच्च परमेश्वराची त्याच्या चार रुपांमध्ये पुढील पाच प्रकाराने पूजा करीत.[७४२] (१) वाणी, तन आणि मन या परमेश्वरावर केंद्रित करून त्याच्या मंदिरात जाणे, (२) पूजेसाठी साहित्य गोळा करणे, (३) मंत्रोच्चार करणे, (४) ध्यानसाधना आणि (५) पूजन. विष्णूच्या या संप्रदायाबरोबर त्याच्या सामान्य उपासकांमध्ये विष्णूचा अवतार सिद्धान्तही प्रिय झाला होता. वराह व भागवत पुराणांमध्ये दिल्याप्रमाणे बौद्ध धर्माचा संस्थापक गौतम बुद्धाला विष्णूचे अवतार म्हणून मान्यता प्राप्त झाली होती. अमितगतीच्या "धर्मपरीक्षा"[७४३] या ग्रंथामध्ये विष्णूचा अवतार म्हणून बुद्धाचा उल्लेख आहे. नंदाच्या गोकुळामध्ये विष्णू गवळी झाला होता असाही उल्लेख या ग्रंथामध्ये आढळतो. यावरून संबंधित काळामध्ये या दोन्ही वैष्णव संप्रदायांनी बरोबरच वाटचाल केली असे दिसते. वेरूळ येथील शिल्पांमुळेही या दोन्ही पद्धतींच्या महाराष्ट्रातील अस्तित्वाला पुष्टी मिळते. येथील दशावतार नामक शैलगृहामध्ये शेषशायी विष्णूचे शिल्प आहे. येथे विष्णू शेषमंचकावर पहुडला असून लक्ष्मी त्याचे पाय चेपीत आहे, विष्णूच्या नाभीतून निघालेल्या कमळावर ब्रह्मा वसला आहे. त्याप्रमाणे विष्णूची नरसिंह, वामन, वराह ही अवतार शिल्पे व गवळ्यांच्या वस्तीतील पशुंच्या कळपांवर गोवर्धन पर्वत उचलून छत्र धरणाऱ्या कृष्णाचेही शिल्प आहे. हे शैल मंदिर राष्ट्रकूट राजा दंतिदुर्ग याच्या शासनकाळात इ. स. च्या आठव्या शतकाच्या मध्यास तयार झाले आहे. इ. स. च्या आठव्या शतकाच्या उत्तरार्धात राष्ट्रकूट राजा कृष्ण याच्या कारकिर्दीत तयार झालेल्या कैलास मंदिरामध्येही अवतार शिल्पांबरोबर कालियावध करणाऱ्या कृष्णाचेही शिल्प आहे.[७४४]

**विठ्ठल संप्रदाय** : दक्षिण भारतामध्ये रामानुज, मध्व, निम्बार्क इत्यादि थोर मार्गदर्शकांच्या नेतृत्वाखाली पंचरात्र सिद्धांतावर आधारित असलेल्या वैष्णव धर्मातून भक्तीमार्गाचा उदय झाला. या धर्म मार्गदर्शकांनी स्वतःचे भक्ति सिद्धांत मांडले.[७४५] महाराष्ट्रात या भक्तिपंथाचे रूपांतर विठ्ठल पंथामध्ये झाले. या पंथांचे उपासक विठ्ठलाच्या स्वरूपात विष्णूंची उपासना करतात. हा संप्रदाय भागवत या नावाने प्रसिद्ध आहे. परंतु तो जुन्या पंचरात्र भागवत पंथपेक्षा वेगळा आहे. या संप्रदायाचे केंद्र पंढरपूरच्या विठ्ठलाभोवतीच केंद्रित झाले आहे.[७४६] महाराष्ट्रातील प्रसिद्ध संत नामदेव, तुकाराम यांच्या मते विठ्ठल पंथांच्या स्थापनेचे श्रेय पुंडलीकाकडे जाते. प्रचलित परंपरेप्रमाणे एकदा श्रीकृष्णाने पुंडलीकाला भेट दिली. पुंडलीक त्याच्या मातापित्यांच्या सेवेमध्ये इतका मग्न होता की, त्याने श्रीकृष्णाला आसन म्हणून एक वीट दिली आणि आपले काम पूर्ण होईपर्यंत त्या विटेवर उभे राहण्यास सांगितले. श्रीकृष्णाच्या शेजारी नंतर रुक्मिणीची स्थापना झाली आणि अशा रीतीने पंढरपूरचे देवालय अस्तित्वात आले. याप्रमाणे पाहता पुंडलीक हा विठ्ठल पंथाचा संस्थापक दिसतो. त्याने स्वतः पंढरपूर येथे वास्तव्य केले आणि पंढरपूरला पुंडलीक क्षेत्र[७४७] हे नाव प्राप्त झाले. पुंडलीकाने या पंथाची स्थापना केव्हा केली त्याची निश्चित तिथी सांगण्यासाठी काही साधन उपलब्ध नाही. परंतु पंढरपूर येथे मिळालेल्या शके १११११ च्या शिलालेखामध्ये[७४८] पंढरपूर येथे लहान देऊळ बांधल्याचा उल्लेख आहे. शके ११५९ च्या लेखामध्ये[७४९] ह्या स्थळाचा उल्लेख पंडरगे या नावाने केला असून देवाचे नाव विठोबा आणि विठ्ठल असे आहे. या लेखानुसार विठ्ठलाच्या अंग आणि रंगभोगासाठी पंडरगे दान दिले होते. शके ११७१ च्या मल्लसेट्टीच्या[७५०] लेखाप्रमाणे विष्णूच्या सान्निध्यासाठी बेळगाव जिल्ह्यातील पुंडरिक-क्षेत्राजवळील गाव दान दिले होते. या लेखातील वर्णनानुसार पुंडरिक क्षेत्र भीमरथीवर बसले होते. त्याचे तादात्म्य विद्वानांनी पंढरपूरशी केलेले आहे. शके ११९२ च्या पंढरपूर लेखामध्ये पांडुरंगपूर येथील दैवत अर्थात विठ्ठलासाठी आप्तोर्याम यज्ञ केल्याचे सांगितले आहे.[७५१] याप्रमाणे प्राप्त पुराव्यावरून येथे इ. स. १० व्या शतकामध्ये विठ्ठलाची पूजा होत होती असे म्हणता येईल. हे ठिकाण इ. स. १२-१३ व्या शतकामध्ये पंडरगे किंवा पांडुरंगपूर या नावाने ज्ञात होते. वारकरी संप्रदायामुळे पंढरपूर हे विठ्ठल भक्तीचे प्रमुख केंद्र बनले.

**वारकरी संप्रदाय** : इ. स. च्या १३ व्या आणि १४ व्या शतकामध्ये महाराष्ट्रात भक्तिमार्ग चळवळीला अपूर्व असा बहर आला होता. वेगवेगळ्या संतांच्या नेतृत्वाखाली या काळात जे कित्येक भक्ति संप्रदाय उदयाला आले, त्यापैकी वारकरी संप्रदाय फार महत्त्वाचा आहे. हा जरी वैष्णव असला तरी या पंथाला चार व्युहांचा सिद्धांत संमत नसल्यामुळे तो प्राचीन भागवत किंवा पंचरात्र पंथाहून वेगळा आहे. या संप्रदायाचा विठ्ठलाच्यारुपातील श्रीकृष्णाच्या पूजनावर विश्वास आहे. या सर्वश्रेष्ठ देवाची परम भक्ति हा या संप्रदायाचा मुख्य उद्देश आहे. या पंथाच्या उपासकांच्या मते तो सर्वश्रेष्ठ परमात्मा सगुण आणि निर्गुण असून त्याने सर्व विश्व व्यापलेले आहे. पंथाच्या

नावावरून याच्या उपासकांनी पंढरपूरच्या यात्रेचा विधी पूर्ण विश्वासाने किंवा परम भक्तीने करणे अपेक्षित आहे. ही यात्रा दर एकादशीला केली तर चांगलेच, परंतु ती आषाढ आणि कार्तिक शुद्ध एकादशीला करणे अतिशय पुण्यप्रद मानले जाते. आषाढ आणि कार्तिक शुद्ध एकादशीला पंढरपूरची यात्रा करण्याची प्रथा आजही रूढ आहे. ज्ञानेश्वर आणि नामदेव या दोन प्रभावी संतांच्या नेतृत्वाखाली या पंथाने चांगलीच प्रगती केली. ज्ञानेश्वराने भगवद्‌गीतेचा संदेश सोप्या भाषेत सांगून लोकांपर्यंत पोचविला, तर नामदेवाने आपल्या अभंगाद्वारे सामान्य माणसाला भक्ति मार्गाकडे नेले. ज्ञानेश्वराने भगवद्‌गीतेवर रचलेल्या भाष्यग्रंथाला ज्ञानेश्वरी म्हणतात. काहींच्या मते या संप्रदायाचा उदय ज्ञानेश्वराबरोबरच झाला. तर काही जण त्याही पूर्वीपासून त्याचे अस्तित्व असल्याचे सांगतात.

**योगी संप्रदाय** : ज्ञानेश्वराच्या काही काळ पूर्वी नाथ संप्रदाय अस्तित्वात आला. महाराष्ट्रातील धार्मिक जीवनावर या पंथाचा काही काळ प्रभाव होता. नाथ योगी हे पूर्ण राज्यामध्ये सिद्ध ह्या नावाने ओळखले जात. परंपरेनुसार या संप्रदायाचे नऊ नाथ व चौऱ्याऐंशी सिद्ध योगी होऊन गेले. नऊ नाथांपैकी इ. स. अकराव्या शतकात होऊन गेलेले गोरखनाथ हे अतिशय प्रभावशाली गुरु होते. वारकरी पंथाचे आद्य पुरस्कर्ते ज्ञानेश्वर यांचे गुरु निवृत्तिनाथांवर आध्यात्मिक अनुग्रह करणारे गहिनीनाथ हे तर साक्षात गोरखनाथांचे शिष्य होते.[७५२]

**महानुभाव पंथ** : यादव काळामध्ये वैष्णव धर्माच्या महानुभाव या नवीन पंथाचा उदय झाला. चक्रधरस्वामी या संप्रदायाचे संस्थापक होते. महानुभाव साहित्यातील वर्णनाप्रमाणे चक्रधरस्वामी हे गुजरातचे होते. त्यांचे नाव हरपालदेव असे होते. एकदा भौतिक जगाबद्दल वैराग्य उत्पन्न झाल्यामुळे ते महाराष्ट्रात ऋद्धपूर येथे येऊन राहिले. येथे त्यांची श्रीगोविंदप्रभूशी भेट झाली. गोविंदप्रभूनी त्यांना दीक्षा दिली आणि तेव्हापासून ते पुढे चक्रधरस्वामी म्हणून ओळखले जाऊ लागले. त्या काळातील ते प्रभावशाली संत होते. त्यांनी समाजाला जाती बंधनाच्या वाईट परिणामापासून मुक्त करण्यासाठी अखंड प्रयत्न केले आणि आपल्या शिष्यांना चारही वर्णाच्या लोकांकडून भिक्षा घेण्याची परवानगी दिली. समाजातील सर्व स्तरांवरील लोकांना त्यांच्या पंथात प्रवेश होता. स्त्रिया व शुद्र यांनाही संन्यास दीक्षा घेण्यास आडकाठी नव्हती. चक्रधरस्वामी दु:खापासून मुक्ति मिळविण्यासाठी विविध देवतांची विविध प्रकारे भक्ति करण्याच्याही विरुद्ध होते. त्यांच्या मताप्रमाणे फक्त त्या सर्वश्रेष्ठ आणि परिपूर्ण तत्त्वाच्या ठिकाणीच जगातील दु:खापासून मुक्ति देण्याची क्षमता असून ज्ञान व भक्ति हे त्याच्यापर्यंत पोहचण्याचे मार्ग आहेत. त्यातही भक्तिमार्ग हा ज्ञानमार्गापेक्षा श्रेष्ठ समजला जातो. जगातील दु:खापासून मुक्ति मिळविण्यासाठी माणसाने सर्व देवांची

पूजा करण्यापेक्षा त्या सर्वश्रेष्ठाचीच फक्त प्रार्थना करावी. या पंथाच्या तत्त्वाप्रमाणे तो सर्वश्रेष्ठ म्हणजे कृष्ण होता. महानुभाव पंथियांचा कृष्णाशिवाय इतर कोणत्याही देवावर विश्वास नव्हता. भगवद्‌गीता हा या पंथाचा मूळ ग्रंथ होय. महानुभाव पंथाच्याच एका संताने उद्धवगीता लिहिली. ते चक्रधरांकडे कृष्णाचा कलियुगातील अवतार या दृष्टीने पहात[५५३] महानुभाव संप्रदायाच्या संकल्पनेप्रमाणे दत्त, कृष्ण, चांगदेव, गुंडमराऊळ आणि चक्रधर हे ईश्वराचे पाच अवतार आहेत. श्रुती, स्मृती, सूत्रपाठ, लीळाचरित, गोविंदप्रभूचरित हे या संप्रदायाचे पवित्र ग्रंथ होत.

**शैवधर्म** : शैव धर्माचे शैव, पाशुपत, कारक आणि कालमुख किंवा कापालिक अशा चार पंथात विभाजन झाले होते.

**शैव** : महाराष्ट्रात या काळातील या पंथाच्या अस्तित्वाचा पुरावा तत्कालीन राजवंशीय राजांनी दिलेल्या कोरीव लेखांमध्ये मिळतो. राष्ट्रकूट राजा कृष्ण तृतीय याच्या शके ८८० च्या कऱ्हाड लेखामध्ये राजाने सर्व शैव-सिद्धांताचे पूर्ण ज्ञान असलेल्या आणि खडतर तपश्चर्या करणाऱ्या आचार्य गगनशिवाला एक ग्राम दान दिले होते. तो इशानशिवचा शिष्य होता आणि करहाटच्या वल्कलेश्वराच्या मठाचा अधिपती होता.[५५४] हा आचार्य त्याच्या नावाच्या शेवटी असलेल्या शिव या शब्दावरून शैव पंथीय होता असे दिसते. हा पंथ मत्तमयूर या दुसऱ्या नावानेही ज्ञात होता.[५५५] शिलाहार राजा छित्तराज याचा बर्लिन ताम्रपट आपल्याला शैव संप्रदायाच्या पश्चिमाम्नायच्या वाडाचार्यचा शिष्य ज्ञानशिव ह्याला कुडेग्राम मधील एक शेत दान दिल्याचे सांगतो. हे दान भाइपेश्वर देवळाच्या दुरुस्तीसाठी, देवाच्या पूजेसाठी आणि मंदिरात राहणाऱ्या संन्याशांच्या अन्न, वस्त्रासाठी दिले होते.[५५६] त्याचप्रमाणे दक्षिण कोकणचा शिलाहार राजा रट्टराज याच्या शक संवत् ९३० च्या खारेपाटण ताम्रपटाप्रमाणे राजाने मत्तमयूर नामक शैव संप्रदायाचा कर्करोणी शाखेचा आचार्य अम्भोजशंभु याचा शिष्य आणि आपला गुरु आत्रय याला तीन गावे दान दिली.[५५७] या दानाचा हेतूही वर दिलेल्या दानाप्रमाणेच होता. मिराशींच्या मते हा पंथ पाशुपत पंथाहून वेगळा होता. या पंथाच्या आचार्यांची नावे "शंभु" किंवा "शिव" पदान्त असतात व पाशुपतांची नावे "राशि" पदान्त असतात.[५५८] याप्रमाणे कोरीव लेखातील माहितीनुसार सातारा भोवतालचा प्रदेश व उत्तर आणि दक्षिण कोकण या प्रदेशामध्ये शैव संप्रदाय अस्तित्वात होता असे दिसते. याशिवाय काही शैव आचार्यांचे शिलाहार राजदरबारी बरेच प्रस्थ होते. शिलाहार राजा मल्लिकार्जून याच्या शक संवत् १०८३ च्या वसई लेखानुसार वेदशिव हा राजगुरू होता.[५५९]

**पाशुपत** : शिलाहार वंशाच्या शासन काळात दक्षिण कोकण प्रदेशात पाशुपत संप्रदाय अस्तित्वात होता. राजा मारसिंह याच्या शक संवत् ९८० च्या मिरज[५६०]

लेखाप्रमाणे पाशुपत पंडित ब्रह्मेश्वर याचा शिष्य चिक्कदेव मुनि याला कुंटवाड ग्राम दान दिले होते. याज्ञवल्क्य स्मृतिवरील "अपरार्क" टिकेत या संप्रदायाच्या आचारांचा निषेध केलेला आहे.[७६१]

**कापालिक** : वर उल्लेखिलेल्या शैव धर्माच्या दोन संप्रदायाखेरीज कापालिक किंवा कालमुख या आणखी एका शैव पंथाचे ज्ञान उपलब्ध कोरीव लेखांद्वारे प्राप्त होते. मानवी कवटीमध्ये अन्न घेऊन खाणे, मृत व्यक्तीची राख अंगाला फासणे, हातात दंडुका किंवा सोटा ठेवणे, मद्यपात्रात देव ठेऊन त्याची पूजा करणे यासारखे या संप्रदायाचे विचित्र धार्मिक विधी होते.[७६२] चालुक्य नृपति नागवर्धन याच्या तिथी नसलेल्या नांदगाव[७६३] लेखामध्ये गोपराष्ट्राच्या सरहद्दीवर असलेल्या कपालेश्वर देवाच्या पूजेप्रीत्यर्थ व देवालयात राहणाऱ्या महाव्रतींच्या निर्वाहाकरिता गोपराष्ट्रात असलेले बलेग्राम दान दिले असा उल्लेख आहे. या देवाच्या कपालेश्वर नावावरून हा नरमुंडमाळा धारण करणारा देव असला पाहिजे व येथे राहणारे महाव्रती म्हणजे खडतर तपस्या करणारे व संन्याशी असावेत असे दिसते. कपालेश्वर व महाव्रती या संज्ञा इ. स. च्या ७ व्या शतकाच्या मध्याच्या आसपास महाराष्ट्रात नाशिक, इगतपूरी विभागात कापालिक संप्रदायाचे अस्तित्व दर्शवितात. हा पंथ अहमदनगर जिल्ह्यातही अस्तित्वात होता. शके ९२२ च्या संगमनेरच्या[७३४] दानलेखानुसार राजा भिल्लम द्वितीय हा शैव धर्माचा उपासक होता आणि त्याने कालमुख पंथाचा संत विजयाभरण यांच्यासाठी मंदिर बांधले. या संताच्या नावाच्या शेवटी असलेली आभरण ही संज्ञा तो कालमुख पंथाचा उपासक होता असे दर्शविते. राजा भिल्लम पंचम आणि सिंघण हे सुद्धा कालमुख पंथाचे आश्रयदाते होते.[७६५] यादव काळात नांदेड जिल्ह्यात अर्धापूर परिसरामध्ये या पंथाचे मोठे केंद्र असल्याचे स्पष्ट झाले आहे.

**वीरशैव पंथ**

कर्नाटक प्रदेशामध्ये उदयाला आलेल्या वीरशैव संप्रदायाचे यादव वंशाच्या शासनकालात महाराष्ट्रामध्ये सोलापूर परिसरात मोठे केंद्र होते. राजा भिल्लम पाचवा हा या संप्रदायाचा आश्रयदाता होता. त्यांच्यानंतर होऊन गेलेले जैतुगि, सिंघण, कृष्ण आणि महादेव यानीही या संप्रदायाला प्रोत्साहन दिले.[७६६] यादव साम्राज्यात सोलापूर जिल्ह्यामध्ये सोन्नलिगे हे वीरशैव पंथाचा थोर संत सिद्धाराम याचे मूळ ठिकाण होते. सिद्धारामाला चेन्नबसव यांच्याकडून वीरशैव संप्रदायाची दीक्षा मिळाली. त्यामुळे सोन्नलिगे नगराला वीरशैवांच्या पवित्र आणि महत्त्वपूर्ण स्थानाचा दर्जा प्राप्त झाला. यादव नृपतींना या संताबद्दल इतका आदर होता की, त्यांच्या कोरीव लेखांमध्ये त्याच्या वचनांचा अंतर्भाव केलेला आहे. त्याच्या दोन वचनांचा समावेश असलेले कमीत कमी वीस लेख आहेत. ही दोन वचने सोन्नलिगे[७६७] येथील मल्लिकार्जून मंदिराला दिलेल्या देणग्यांचे रक्षण केल्यास अथवा नष्ट केल्यास मिळणारे पुण्य व लागणारे पाप यांच्या संबंधात आहेत. यादव राजा महादेव याच्या शके १०८६ च्या संगुर लेखामध्ये संत सिद्धारामनाथ यांची दोन वचने आहेत. राघवांक याने रचलेल्या सिद्धाराम पुराणामध्ये

सांगितल्याप्रमाणे सोन्नलिगे येथे तलाव बांधला आणि त्यावर बरीच शिवलिंगे स्थापन केली. असे सांगतात की, त्याने विद्यासमुद्र विशेषण लावणाऱ्या कर्पर नामक भिक्षुचा पराभव केला. दुसऱ्या शैव ग्रंथानुसार इ. स. ११६० मध्ये होऊन गेलेल्या बसव याच्या बहिणीचा मुलगा चेन्नबसव याने या पंथाच्या सोन्नलिगे ह्या स्थळाचे तादात्म्य सोलापूर शहराच्या उपविभागाशी केले आहे.[७६८] उपलब्ध पुराव्याप्रमाणे ते वीरशैवांचे पुण्यक्षेत्र होते. यादव नृपति जैतुगि, सिंघण, कृष्ण आणि महादेव यांच्या कारकिर्दीत या ठिकाणाला बऱ्याच देणग्या मिळाल्या.[७६९] याप्रमाणे महाराष्ट्रात यादवकालात वीरशैव संप्रदायांचे अस्तित्व होते असे दिसून येते. यादवकाळात सोलापूर जिल्ह्यात अक्कलकोट तालुक्यामध्ये हिल्ली हे वीरशैव पंथाचे दुसरे केंद्र होते. याठिकाणी असलेल्या कुंडल संगम मंदिराला सबंध दक्षिण भारतातील उपासक भेटी देत असत. राजा सिंघण याच्या राजवटीत या देवालयाला बऱ्याच देणग्या मिळाल्या होत्या. वीरशैव देवालयांना दान देणारे अधिकारी आणि राजघराण्यातील सभासद यांच्या व्यतिरिक्त सामान्य लोकांचाही वीरशैव आचारांवर विश्वास होता. त्यांच्यापैकी काहींनी तर त्यांची अंतिम क्रिया ही लिंगायत पंथाच्या विधीप्रमाणे करावी. अशी इच्छाही व्यक्त केली होती.[७७०]

**सामान्य उपासक** : शैव संप्रदायाचे सामान्य उपासक आणि संन्यासी किंवा आचार्य यांच्याखेरीज शिव भक्तांचा एक विशिष्ट असा वर्ग होता. त्यांचे वर्णन साधारण उपासक असे करता येईल. या उपासकांचा कोणत्याही विशिष्ट शैव पंथाशी संबंध नव्हता. शिवाच्या कोणत्याही स्वरूपाची प्रार्थना किंवा पूजा करण्यात त्यांना हरकत वाटत नव्हती. वेगवेगळ्या राजवंशांनी बांधलेली कोणत्याही विशिष्ट शैव पंथाशी संबंध नसलेली शिवमंदिरेही हेच दर्शवितात. शिवाय महाराष्ट्रामध्ये इ. स. सातव्या शतकापासून झालेला शैव धर्माचा प्रसारही दर्शवितात. उत्तर आणि दक्षिण कोकणचे शिलाहारवंशीय राजे कट्टर शिवभक्त होते.[७७१] या दोनही घराण्यांच्या राजांनी शिवमंदिरे बांधण्याकरिता व त्यामध्ये स्थापन केलेल्या मूर्तीच्या पूजनाकरिता दाने दिली.[७७२] शिलाहार राजा झंझ याने १२ शिवालये बांधली होती असे राजा नागार्जून याच्या शके ६९१ च्या ठाणे ताम्रपटातील माहितीवरून कळते.[७७३]

**शाक्त संप्रदाय**

वर पाहिल्याप्रमाणे शिलाहार राजे शिवाचे भक्त होते आणि शैव संप्रदायाच्या चार पंथांपैकी पाशुपत संप्रदाय कोल्हापूरच्या[७७४] शिलाहार राजांच्या राज्यांमध्ये अस्तित्वात होता असे राजा मारसिंह याच्या शके ९८० च्या मिरज ताम्रपटातील उल्लेखावरून दिसून येते. शाक्त संप्रदायाशी पाशुपत आणि कापालिक पंथांचा जवळचा संबंध होता. शाक्त संप्रदायाच्या कोल्हापूरची महालक्ष्मी आणि इतर देवी या केंद्र देवता होत्या.[७७५] देवी भागवतमध्ये कोल्हापूर हे लक्ष्मीचे महास्थान असल्याचा उल्लेख आहे.[७७६] कोल्हापूरचे महालक्ष्मीचे मंदिर करहाट येथून राज्य करणाऱ्या सिंद वंशीय राजाने बांधले होते असा समज आहे.[७७७] सिंद राजाने हे मंदिर बांधण्यापूर्वीच हे ठिकाण शाक्तपीठ

म्हणून प्रसिद्धीला आले असावे. कोल्हापूरचे शिलाहार राजे या देवीचे भक्त होते. त्यांनी या मंदिराला उदारपणे देणग्या दिल्या होत्या. त्यांच्या काही लेखांमध्ये ते स्वतःचे "महालक्ष्मीचा कृपाप्रसाद प्राप्त झालेला" असे वर्णन करतात. उदाहरणार्थ राजा गण्डरादित्याच्या शके १०४८ च्या कोल्हापूर ताम्रपटामध्ये शिलाहार राजाला महालक्ष्मीचा वरप्रसाद मिळाला होता असे वर्णन आहे.[७७८] चालुक्य राजा सोमदेव याच्या तिथी नसलेल्या कोल्हापूर[७७९] लेखानुसार चालुक्य नृपतीही या देवीचे उपासक होते. राजा सोमदेवाने महालक्ष्मीच्या पूजनासाठी करभंगी हे गाव दान दिले होते. यादव राजा सिंघण याच्या अनुक्रमे शके ११४०[७८०] आणि ११५७[७८१] च्या लेखांतील वर्णनावरून यादवांनी राज्याच्या समृद्धीसाठी कोल्हापूरच्या महालक्ष्मीची प्रार्थना केली होती. या दोन लेखांपैकी पहिल्या लेखात कोणा तैलपाने महालक्ष्मी मंदिराच्या समोर तोरण बांधले असल्याचा उल्लेख आहे, तर दुसऱ्या लेखात महालक्ष्मीची स्तुती करून यादव राजा सिंघण याची भरभराट होवो अशी इच्छा व्यक्त केली आहे. विजयनगरचा राजा संगम देवराय प्रथम याच्या शके १३३५ च्या बांदोडे दानपत्रामध्ये महालक्ष्मीला देणगी दिल्याचे नमूद केले आहे.[७८२] जोगेश्वरी या दुसऱ्या देवीचेही शिलाहार भक्त होते. या देवीच्या देवालयाशी संबंधित असलेल्या काही व्यक्तींना, उदाहरणार्थ मठपति, पुजारी इत्यादिंना गृहकर माफ केला होता असे राजा अपरादित्य प्रथम याच्या शक संवत् १०५९ च्या चित्रा[७८३] शिलालेखावरून दिसते. संयान येथील देवी भगवती ही राष्ट्रकूटांच्या शासनकालामध्ये प्रसिद्ध होती असे राष्ट्रकूट राजा अमोघवर्ष प्रथम याच्या संजान[७८४] ताम्रपटावरून कळते. शिलाहार राजा छित्तराज याच्या शक संवत् ९५६ च्या चिंचणी[७८५] लेखामध्ये संयान येथील भगवती देवीच्या कौतुक मठिकेला दान दिल्याचा उल्लेख आहे. राजा गण्डरादित्याच्या शक संवत् १०५८ च्या कोल्हापूर[७८६] लेखातील वर्णनाप्रमाणे हा शिलाहार राजा जैन देवी पद्मावतीचाही भक्त होता.

## जैन धर्म

या कालखंडामध्ये हिंदू धर्माबरोबरच जैन धर्मही प्रचलित होता. या काळात शासन करणाऱ्या राजवंशाकडून या धर्माला आश्रय मिळाला होता. बदामीच्या चालुक्य राजांचा जैन धर्माबद्दल उदार दृष्टिकोन होता. ऐहोळे[७८७] लेखाची रचना करणारा रविकिर्ती हा जैन होता आणि त्याला पुलकेशी द्वितीय याचा आश्रय प्राप्त झाला होता. याच वंशाचा राजा विजयादित्य[७८८] याचा सल्लागार निरवद्यपंडित हा मूलसंघाच्या (दिगंबर) देवगण शाखेचा श्रीपूज्यपाद याचा शिष्य असल्याचा उल्लेख चालुक्य राज्यामध्ये दिगंबर पंथाचे अस्तित्व दर्शवितो. राष्ट्रकूट राजांनी जैन धर्माला आश्रय देण्याची परंपरा चालू ठेवली. गणितावरील जैन ग्रंथ सारसंग्रहामध्ये राजा अमोघवर्ष प्रथम हा स्वादवादाचा उपासक होता अशी माहिती मिळते. जीनसेन हा अमोघवर्ष प्रथमचा गुरू होता असे जीनसेनाच्या पार्श्वाभ्युदय या ग्रंथातील वर्णनावरून समजते. अमोघवर्ष प्रथमने गुणभद्राची राजा कृष्ण द्वितीय आणि इंद्र तृतीय यांचा गुरू म्हणून नेमणूक केली होती.

या दोन्ही राजांनी अनुक्रमे जैन मंदिर आणि अर्हत शांती याच्या स्नान समारंभाच्या चौरंगासाठी दान दिले होते यावरून जे जैन धर्माचे आश्रयदाते होते असे दिसते. या वंशाचा शेवटचा राजा इंद्र चौथा जैन धर्माचा एकनिष्ठ उपासक होता.[७८९] बऱ्याच जैन लेखकांना आणि गुरुंना राष्ट्रकूट वंशाचा राजाश्रय प्राप्त झाला होता.[७९०] इ. स. ८००-१००० या कालावधीत खोदलेली वेरूळ येथील नं. ३०-३४ ही जैन शैल मंदिरे[७९१] या प्रदेशात राष्ट्रकूट वंशाच्या आणि नंतरच्या काळात जैन धर्म अस्तित्वात होता असे दर्शवितात. उत्तर आणि दक्षिण कोकणच्या शिलाहार वंशाच्या लेखामध्ये जैन मंदिराचा उल्लेख आढळत नाही. परंतु कोल्हापूरच्या शिलाहारांच्या राज्यात मात्र जैन धर्म बराच प्रभावी होता असे आढळते. माघनन्दिसिद्धान्तदेव सारखा प्रभावी आणि सन्माननीय विद्वान रूपनारायण या प्रसिद्ध जैन बसतीचा आचार्य होता. ही बसती राजा गण्डरादित्य याचा सामन्त निंबदेव याने बांधली होती आणि तिला राजा गण्डरादित्यांचे बिरुद रूपनारायण हे नाव दिले होते.[७९२] माघनन्दिसिद्धान्तदेवाचे बरेचसे शिष्य कोल्हापूर भोवतालच्या प्रदेशात बांधलेल्या जैन मंदिरांचे आचार्य होते. हाविनहेरिलिगे येथील पार्श्वनाथ मंदिर बांधणारा वासुदेव हा देशीय गणाचा आचार्य आणि मूलसंघाचा पुस्तकगच्छ माघनन्दिसिद्धान्तदेव यांचा शिष्य होता. राजा विजयादित्य याच्या शक संवत् १०६५ च्या कोल्हापूर लेखाप्रमाणे राजाचा सामन्त कामदेव याचा ताम्बूलधारी सेवक वासुदेव याने बांधलेल्या मंदिरातील पार्श्वनाथ तीर्थंकराची अष्टविधोपचारांनी पूजा, मंदिराची दुरुस्ती आणि मठातील मुनींना अन्नसंतर्पण यासाठी राजाने दिलेले दान पूर्वोक्त माघनन्दिसिद्धान्तदेवाचा शिष्य माणिक्यनन्दिपण्डित याचे पादप्रक्षालन करून देण्यात आले होते. याच राजाच्या शक संवत् १०७३ च्या बामणी लेखामध्ये बामणी येथील जैन मंदिराला दिलेले दान अर्हनन्दिसिद्धान्तदेव याचे पादप्रक्षालन करून दिले होते. हा अर्हनन्दिसिद्धान्तदेव कुन्दकुन्दावय याचा आचार्य आणि कुलचंद्र मुनीचा शिष्य माघनन्दिसिद्धान्तदेव याचा शिष्य होता. वर उल्लेखिलेल्या निंबदेव याने कवडेगोल्ल येथे पार्श्वनाथाचे मंदिर बांधले. या मंदिराला दिलेले दान कोल्हापूर येथील रूपनारायण या जैन बसतीचा आचार्य श्रुतकिर्ति त्रैविद्य याने स्वीकारले होते. तो मूलसंघाच्या देशीयगणाच्या पुस्तकगच्छाचा उपासक होता. याशिवाय राजा गण्डरादित्याने शक संवत् १०३३ च्या ताळले लेखाप्रमाणे मिरिंज देशात इरुकुडी येथे तलाव खोदला आणि त्याच्या काठावर शिव, बुद्ध आणि अर्हत (जैन तीर्थंकर) यांची मंदिरे बांधली, त्यांच्या पूजेसाठी काही जमीन दान दिली. सोमदेवाच्या शब्दार्णवचंद्रिका या ग्रंथातील वर्णनाप्रमाणे आजुरिका येथे गण्डरादित्याने एक जैन मंदिर बांधले. या मंदिराला त्याचे स्वतःचे त्रिभूवनतिलक हे नाव दिले. याच नावाचे आणखी एक देवालय हेर्ले येथेही होते, परंतु ते तीर्थंकर नेमिनाथाचे होते. सामन्त निंबरस याने आदिनाथ तीर्थंकरांचे मंदिर बांधल्याचा उल्लेख गण्डरादित्याच्या तिथी नसलेल्या कोल्हापूर लेखामध्ये मिळतो.[७९३] हे देवालय कोल्हापूरला महालक्ष्मीच्या देवालयाजवळ असावे. यादव राजा सेऊणचंद्र तृतीय याच्या शके १०६३ च्या अंजनेरी[७९४] ताम्रपटातील चंद्रप्रभूस्वामीच्या

मंदिराला उदारपणे देणगी दिल्याचा उल्लेख नाशिक विभागामध्ये जैन धर्माचे अस्तित्व होते असे दर्शवितो. या लेखाचा प्रारंभ पाच परमेष्ठी, अर्हत, सिद्ध, आचार्य उपाध्याय आणि साधुना वंदन याने केलेला आहे. जरी इतर यादव राजे वेगवेगळ्या धर्मपंथांचे उपासक असले तरी त्यांनी जैन मंदिर आणि संन्याशी यांना उदारपणे देणग्या दिल्या होत्या. त्यांचे बरेच मांडलिक राजे आणि अधिकारी जैन होते आणि त्यांनी जैन मंदिरे बांधली होती.[७९५]

## बौद्ध धर्म

या वेळेपर्यंत बौद्ध धर्माची लोकप्रियता कमी होऊ लागली होती. उपलब्ध लेखाद्वारे फक्त दोन बौद्ध केंद्रांची माहिती मिळते. यापेकी एक कान्हेरी येथे होते व दुसरे सोलापूर जिल्ह्यामध्ये काम्पिल्य येथे होते.[७९६] कान्हेरी येथील बौद्ध केंद्र या वेळेच्या आधिपासूनच प्रसिद्ध होते. येथील शैलगृहामध्ये राष्ट्रकूट राजा अमोघवर्ष प्रथम याच्या काळाच्या मिळालेल्या तीन लेखांमुळे या स्थानाने या काळातही आपले महत्त्व टिकविले होते असे दिसते. हे फारच लोकप्रिय यात्रास्थान होते. भारतातील बंगालसारख्या दूरवरच्या प्रदेशातून उपासक येथे दर्शनाला येत. राजा अमोघवर्ष प्रथम याचा महासामन्त कपर्दि द्वितीय याच्या शके ७७५ च्या कान्हेरी लेखामध्ये गौड[७९७] देशाहून आलेला बुद्धाच्या परमभक्ताने कृष्णगिरी येथे महाराज महाविहारमध्ये राहणाऱ्या भिक्षुंच्या चीवरांसाठी आणि ध्यानधारणेसाठी आवश्यक ते लयन खोदण्यासाठी शंभर द्रम्मांचा उक्षयनिधी ठेवला होता असा उल्लेख आहे. काम्पिल्य येथील बौद्ध मठाची माहिती दंतिवर्मन याच्या लेखाद्वारे होते. या लेखानुसार काम्पिल्य येथील बौद्ध मठाला एक गाव दान दिले होते. हा मठ बहुतेक उस्मानाबाद जिल्ह्यामध्ये तुळजापूर तालुक्यातील काम्पिल येथे असावा.[७९८] शिलाहार वंशाच्या शासनकाळात सोलापूर-कोल्हापूर विभागात बौद्ध धर्म अस्तित्वात होता असे दिसते. राजा गण्डरादित्याच्या शक संवत् १०३३ च्या ताळले ताम्रपटानुसार राजाने मिरिंज देशात इरुकुडी येथे शिव, जिन आणि बुद्ध यांची मंदिरे बांधली व त्यांच्या पूजेसाठी देणग्याही दिल्या.[७९९]

---

## तळटिपा

१ दंडिन याच्या काळी समाजाचे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शुद्र असे चार वर्णामध्ये विभाजन झालेले होते. गुप्ता, डी. के. **एस. सी. टी. डी.**, पृ. २००.

२ इब्न खुर्दब सांगतो की साबकुप्रिअ जातीमध्ये उच्च वर्गातील लोकांचा समावेश होतो आणि शासनकर्त्यांची निवड याच जातीमधून होते. बाकीच्या सर्व जातीचे लोक फक्त या जातीच्या लोकांनाच मान देतात. इलीयट एच. एम., **एच. आय.**, १, पृ. १६.

३ इब्न खुर्दबच्या लहुड ऐवजी अलइद्रसी झक्य जातीचा उल्लेख करतो. त्याच्या मते गारुडी, डोंबारी, विविध वाद्ये वाजविणारे वादक या लोकांचा यात समावेश होत होता. उपरोक्त पृ. ७६.

४ प्रारंभी फक्त चार वर्ण होते. त्यामध्ये ब्राह्मण सर्वोच्च वर्ण होता. त्यानंतर क्षत्रिय आणि अनुक्रमे वैश्य व शुद्र हे वर्ण होते असे अल्वेरुणी वर्णन करतो. त्याने दिलेल्या जातीच्या यादीमध्ये शुद्र सगळ्यांच्या शेवटी येतात व त्यांच्या नंतर अंत्यजांचा नंबर येतो. त्याच्या वर्णनाप्रमाणे वैश्य व शुद्र यांच्या दर्जामध्ये फार फरक नव्हता आणि ते एकाच गावात शेजारी शेजारीही राहत असत. सचाऊ, इ. सी., **अल्वेरुणीज इंडिया,** भाग १, लंडन, १९१४, पृ. १००-१०१.

५ तुळपुळे, शं. गो., **प्रा. म. को. ले.**, पुणे, १९६३, पृ. ३६९ वर्णत्रय बोने; आणखी पहा-तळटीप नं. १०.

६ रजकाभूमि, कित्ता, पृ. ३३२, नाविया भूमि पृ. ३४०.

७ मिराशी वा. वि., **शि. रा. इ. को. ले.**, नागपूर, १९७४, पृ. २८४-८५. २९७-२९८.

८ तुळपुळे, उपरोक्त, पृ. १८४.

९ आळतेकर, ए. एस., **आर. टी. टी.**, पुणे, १९३४, पृ. ३६८.

१० मिराशी वा. वि., उपरोक्त, पृ. २८१-२८२, ओळ ११-२४ भाषांतर पृ. २८४, २९४; मूळ लेख पृ. २९६-२९७. भाषांतर पृ. ३००-३०१.

११ खरे, ग. ह., **द. म. इ. सा.**, अंक ३, १९४९, पृ. ४९-५७.

१२ कोलते, वि. भि., भारत इतिहास संशोधन मंडळ, **त्रैमासिक,** ९ ऑक्टोबर १९७२, अंक ३५, पृ. ६३, ८२.

१३ आळतेकर, उपरोक्त, पृ. ३६८-३६९.

१४ मिराशी उपरोक्त, पृ. २७७-८४, २९३-३०२.

१५ काणे, पी. व्ही., **एच. डी. एस.**, खंड २, भाग १, पुणे, १९७४, पृ. ६८.

१६ आळतेकर, उपरोक्त, पृ. ३६९-३७०.

१७ काणे, पी. व्ही., **एच. डी. एस.**, खंड २, भाग १, पुणे, १९७४, पृ. ६८.

१८ **इ. आय.**, ३२ पृ. ४५-५५.

१९ मिराशी, वा. वि. पूर्वोक्त पृ. ८७.

२० तुळपुळे, शं. गो. पूर्वोक्त पृ. २२६.

२१ इलियट, एच. एम,. **एच. आय.**, पृ. २७, ३७.

२२ सचाऊ, इ. सी., **अल्बेरुणीज इंडिया**, पृ. १९ विद्वानांनी म्लेंच्छ या शब्दाचा अर्थ मुसलमान असा घेतला आहे.

२३ **पी. टी. ए. आय. ओ. सी.** १९६८ पृ. ३४४.

२४ भारत इतिहास संशोधन मंडळ, **त्रैमासिक**, ९, १८८०, पृ. ३.

२५ मिराशी, व्ही. व्ही., **सी. आय. आय.**, ४, १९५५, पृ. १५०.

२६ रित्ती, एस, ॲण्ड शेळके, **आय. एफ. एन. डी.**, पृ. २२४.

२७ **इ. आय.**, २८, पृ. ३१७.

२८ **इ. आय.**, ३८, पृ. २१.

२९ **आय. ए.**, १६, पृ. २४.

३० **इ. आय.**, २२, पृ. १०६.

३१ कुंदनगार, के. जी., **आय. एन. के. के.** नं. ३७, कोल्हापूर, १९३९, पृ. १८१.

३२ मिराशी, वा. वि. पूर्वोक्त पृ. ३४१.

३३ **इ. आय.**, ३२, पृ. ५३.

३४ **इ. आय.**, ८, नं. १८; गोपालचारी, **इ. एच. ए. सी.**, मद्रास, १९४१, पृ. ९२; **इ. आय.**, १० लिस्ट नं. १०९३, १०९६ या प्रकारच्या अधिक नावासाठी पहा : महाजन, एम., **सी. एच. एम. जी.**, सोशल स्ट्रक्चर, दिल्ली, १९८९, पृ. ३०९-३१५.

३५ रमेश, के. व्ही., **सी. व्ही.**, दिल्ली, १९८९, पृ. ५४-५५.

३६ **आय, ए.**, १४, बॉम्बे, पृ. ३३०-३३१.

३७ रमेश, उपरोक्त, पृ. ८५.

३८ **इ. आय.**, ८, पृ. १८२; आळतेकर, ए. एस. **आर. टी. टी.** पुणे, १९३४, पृ. ५००.

३९ मिराशी, वा. वि. पूर्वोक्त पृ. १२४.

४० वर्मा, ओ. पी., **वाय. टी. टी.**, नागपूर, १९७०, पृ. २५७.

४१ सचाऊ, इ. सी,. पूर्वोक्त १, पृ. १०२.

४२ इलीयट, एच. एम.. **एच. आय.**, १ पृ. ७६.

४३ **इ. आय. २५**, पृ. २५-३१; खरे, ग. ह., **द. म. इ. सा,.** पृ. ५६-५८.

४४ आळतेकर, ए. एस. **आर. टी. टी.** पुणे, १९३४, पृ. ४०२-४०३.

४५ कित्ता.

४६ वर्मा, उपरोक्त, पृ. २५७.

४७ काणे, पी. व्ही.. **एच. डी. एस.**, खंड २, भाग, १, पुणे, १९७४, पृ. ६८.

४८ मिराशी, वा. वि. पूर्वोक्त पृ. १२४.

४९ आळतेकर, उपरोक्त पृ. ११७.

५० रमेश, के. व्ही,. **सी. व्ही.**, दिल्ली, १९८९, पृ. ५४.

५१ आळतेकर, उपरोक्त पृ. ३२५.

५२ इ. •स. १०७० च्या लकुंडी लेखात धल्ल नामक ब्राह्मण हा महामंत्रकशपतताधिपति (Mahamantrackshapatatadhipati) म्हणून पूर्ण राज्याचा कारभार पहात असे. हा बहुतेक चालुक्य राजा तैल दुसरा याचा मुख्यमंत्री होता. कृष्ण मुरारी **सी. के.**,. पृ. २३१-२३२, २३४-२३५.

५३ मिराशी, वा. वि., **शि. रा. इ. को. ले.**, सामाजिक परिस्थिती पृ. ९३.

५४ कित्ता, पृ. ४३.

५५ वर्मा, ओ. पी. **वाय. टी. टी.**, नागपूर, १९७०, पृ. २३३; **आय. ए.**, १७, पृ.. ११८.

५६ आळतेकर, ए. एस., **आर. टी. टी.**, पृ. १६६.

५७ कृष्ण मुरारी, **सी. के.**, दिल्ली, १९७६, पृ. २३०.

५८ **इ. आय.**, १९, पृ. ६२-६५.

५९ **इ. आय.**, २८, पृ. २१ पासून पुढे.

६० कित्ता, ३६, पृ. ३१३-३१६.

६१ चकलधर, एच. सी., **आय. एच. क्यू.**, ४, कलकत्ता, १९२८, पृ. ४२५-३०.

